RIG VEDA SAMHITA Vol I

with

Marathi and English

translation

Vedarthayatna

वे दा १



# ऋग्वेदसंहिता

पदांसहित

व

तिचें मराठी आणि इंग्रजी

## भाषांतर.

(१७ व्या २५ व्या आकडाप्रमाणें नोंदलें आहे.)

---

मुंबई:

[illegible]

माझे

सर्व आर्य बंधु व भगिनी

यांस

हें भाषांतर

सादर समर्पण केलें आहे

भाषांतरकर्ता

३. अग्नीच्या योगानें [यजमान] यशःसंपन्न [आणि] उत्तम वीर्यवान् पुत्रांनीं युक्त अशा धनदौलतीसच दिवसानुदिवस पावो.

४. हे अग्नी, ज्या विघ्नरहित यज्ञासभोंवतालीं तूं परिवेष्टन करून राहतोस तोच [यज्ञ] देवांप्रत प्रविष्ट होतो.

५. अग्नि [हा] कुशल, कपटरहित [आणि] अतिशयेंकरून कीर्तिमान् [असा] होमसंपादक [होय]. [तो] देव [अग्नि] देवांसहित येथें येवो.

६. हे बा अग्नी, तूं हविर्दान करणाराचें जें कल्याण करिशील तें, हे अंगिरा, खरोखर तुझेंच कल्याण [होतें].

3. Through Agni the worshipper obta[ins] day to day, nothi[ng but] wealth and prospe[rity, ac]companied by reno[wn, and] full of valorous prog[eny].

4. That sacrifice al[one,] which thou, Agni, [art] protector on all [sides,] reaches unobstructe[d the] gods.

5. May Agni, the [skil]ful, true and most re[nown]ed minister of sacri[fice,] Agni the god come with the gods.

6. The good, Agn[i, which] thou mayest confer [on the] giver of oblations, be[comes,] O Angiras, truly thine [own].

---

३. या मंत्रांतील 'पोष' शब्दाचा अर्थ सायणाचार्य 'वर्धमान होणार' असा विशेषणार्थी करितात; पण वेदांत हा शब्द पुष्कळ ठिकाणीं आलेला आहे आणि याचा नेहमीं 'भरभराट' 'पौष्टिक' असाच अर्थ होतो, तो विशेषणार्थी होत नाहीं. ऋ. मं. १, सू. ९३, ऋक् २ पाहा. तेथें सायणाचार्यच 'अभिवृद्धि' म्हणजे भरभराट असा अर्थ करितात. तोच आम्हीं प्रस्तुत स्थळीं घेतला आहे.—'पावो'=अश्नवत्.' सायणाचार्य पावतो असा अर्थ करितात; पण लेट्चें रूप आहे म्हणून पावो हाच अर्थ युक्त आहे. व सायणाचार्यांनीही ऋ. १. ४०. ६–८ यांत तसाच केला आहे तो पाहा.

४. 'विघ्नरहित'='अध्वर.' इत्यर्थ असें आहे कीं, ज्या यज्ञाचें अग्नि चारी बाजूंस रक्षण करितो, तो यज्ञ निर्विघ्नपणें परिपूर्ण होऊन देवप्रीतिदायक होत असतो.—'देवांप्रत होतो.' मुळामध्यें 'देवांच्या ठिकाणीं जातो' असें आहे, म्ह. देवांस पोंहचतो.

६. 'अङ्गिरा' (अङ्गिरस्) हें ... वाचक आहे. त्याचा खरोखर अर्थ काय आहे तें खात्रीपूर्वक सांगवत नाहीं. "अंगिरसः" या नांवाचे कोणी प्राणी त्याचें आढळतें; आणि ते देवयोनि मनुष्ययोनि यांमध्यें मानिले आहेत

तं त्वाग्ने दिवेदिवे दोषांवस्तर्धिया वयम् ।
नमो भरन्त एमसि ॥ ७ ॥
त्वा । अग्ने । दिवेऽदिवे । दोषाऽवस्तः । धिया । वयम् ।
। भरन्तः । आ । इमसि ॥ ७ ॥
राजन्तमध्वराणां गोपामृतस्य दीदिविम् ।
वर्धमानं स्वे दमे ॥ ८ ॥
न्तम् । अध्वराणाम् । गोपाम् । ऋतस्य । दीदिविम् ।
ानम् । स्वे । दमे ॥ ८ ॥
स नः पितेव सूनवेऽग्ने सूपायनो भव ।
सचस्वा नः स्वस्तये ॥ ९ ॥ ॥ २ ॥
नः । पिताऽइव । सूनवे । अग्ने । सुऽउपायनः । भव ।
स्व । नः । स्वस्तये ॥ ९ ॥ २ ॥

---

भाषायम्

अग्ने वयं नमो भरन्तो दिवेदिवे दोषावस्तर्धिया त्वामुपैमः
णां राजानमृतस्य दीदिविं गोपां स्वे दमे वर्धमानम् ॥
त [त्वं] नः सूनवे पितेव सूपायनो भव । स्वस्तये नः सचस्व ॥

---

पुत्र' असें म्हटलें आहे. त्या- जातीचे आदिपुरुष आणि स्व- लें मनुष्यांप्रत प्राप्त करून देणारे केलेलें आहे. ते देवांनीं मनुष्य- ासुदायमाणें पाठविलेले असें वर्णिलेलें आढळतात. आणि

अग्नीला सुद्धां याच अर्थी हा शब्द लाविलेला असेल असें वाटतें. ......सु- प्रेंच कल्याण होतें' म्ह. अग्नीनें उपासकास संपत्ति दिली म्हणजे उपासक अग्नीला हवि अर्पण करितो व तेणेंकरून अग्नीचा काम होतो.

हे रात्रीच्या वेळीं प्रकाश- अग्नी, प्रतिदिनीं आम्ही पूर्वक नमन करीत तुझ्या ध येत असतों.

८. जो तूं यज्ञांचा राजा, धर्मकल्पाचा परम देदीप्यमान रक्षक [आणि] आपल्या स्वतःहाच्या घरीं मोठा होणारा [असा] होस.

९. म्हणून, हे अग्नी, जसा पिता पुत्राला सुगम असतो तसा तूं आम्हांप्रत हो; आमच्या कल्याणास्तव आम्हांबरोबर राहा.

7. To thee, Agni, that shinest by night, we daily approach, offering our respects with a pious mind;

8. who art the king of sacrifices, the resplendent protector of the sacred law, and who growest in thine own home.

9. Be thou, therefore, Agni, accessible to us as is a father to his son. Be with us for our good.

---

७. 'दोषावस्तर्' हें दोषावस्तृ याचें संबोधन होय. वस् (=प्रकाशणें) यापासून विवस्वान्, उषस्, इत्यादि शब्द निघाले आहेत. सायणाचार्य 'रात्रंदिवस' असा क्रियाविशेषणार्थी अर्थ करितात. हा शब्द ऋग्वेदांत आणखी दोन ठिकाणीं आला आहे. मं. ४, सू. ४, ऋ. ९ आणि मं. ७, १५, ऋ. १५ पाहा. शिवाय आश्वलायन श्रौतसूत्रांत "यदि सायम् । दोषावस्तर्नमः स्वाहेति । यदि प्रातः प्रातर्वस्तर्नमः स्वाहेति" (३.१२.४) असें लिहिलें आहे त्यावरून दोषावस्तर् ही दोषावस्तृ याची संबोधनविभक्ति आणि 'रात्रीच्या वेळीं प्रकाशणारा' हा अर्थ शुद्ध दिसतो.—"नमन करीत"; मूळांत 'नमन धारण करणारे' असा अक्षरशः अर्थ आहे.

८. 'यज्ञांचा राजा'='राजन्तमध्वराणाम्.' सायनाचार्य 'राजन्तम्' याचा येथें शोभणारा, प्रकाशणारा असा अर्थ करितात; पण राज् धातूचा अर्थ राजा असणें, मालक असणें असा वेदांत होतो. उदाहरणार्थ 'विश्वस्य दिवश्च ग्मश्च राजसि' हें (ऋ. १. २५. २०) पाहा. शिवाय 'त्वं वाजस्य श्रुत्यस्य राजसि' (ऋ. १. ३६. १२) येथें सुद्धा सायणाचार्यांनींच आमच्या प्रमाणें अर्थ केला आहे तो पाहा.—'आपल्या घरीं' म्ह. यज्ञशाळेंत अग्नि प्रदीप्त होतो त्या स्थळीं.

९. 'म्हणून' हें पद 'स......भव' असा जो प्रयोग आहे त्यापासून गम्यमान आहे हें सांगावयास नकोच.

## सूक्तम् २.

ऋषिर्विश्वामित्रपुत्रो मधुच्छन्दाः । देवता-१-३ वायुः; ४-६ इन्द्रवायू; ७-९ मित्रावरुणौ । गायत्री छन्दः ।

वायवा याहि दर्शतेमे सोमा अरंकृताः ।
तेषां पाहि श्रुधी हवम् ॥ १ ॥

वायो इति । आ । याहि । दर्शत । इमे । सोमाः । अरम्ऽकृताः ।
तेषाम् । पाहि । श्रुधि । हवम् ॥ १ ॥

वाय उक्थेभिर्जरन्ते त्वामच्छा जरितारः ।
सुतसोमा अहर्विदः ॥ २ ॥

वायो इति । उक्थेभिः । जरन्ते । त्वाम् । अच्छ । जरितारः ।
सुतऽसोमाः । अहःऽविदः ॥ २ ॥

वायो तव प्रपृञ्चती धेना जिगाति दाशुषे ।
उरूची सोमपीतये ॥ ३ ॥

वायो इति । तव । प्रऽपृञ्चती । धेना । जिगाति । दाशुषे ।
उरूची । सोमऽपीतये ॥ ३ ॥

इन्द्रवायू इमे सुता उप प्रयोभिरा गतम् ।
इन्दवो वामुशन्ति हि ॥ ४ ॥

इन्द्रवायू इति । इमे । सुताः । उप । प्रयःऽभिः । आ । गतम् ।
इन्दवः । वाम् । उशन्ति । हि ॥ ४ ॥

---

### भाषायाम्.

१. हे दर्शनीय वायो आयाहि । इमे सोमा अलंकृताः । तान्पिब । हवं [च] शृणु ॥
२. हे वायो सुतसोमा अहर्विदो जरितारस्त्वामच्छोक्थैर्जरन्ते ॥
३. हे वायो प्रपृञ्चत्युरूची तव धेना सोमपीतये दाशुषे गच्छति ॥

वायविन्द्रश्च चेतथः सुतानां वाजिनीवसू ।

तावा यातमुप द्रवत् ॥ ५ ॥ ३ ॥

वायो इति । इन्द्रः । च । चेतथः । सुतानाम् । वाजिनीवसू इति वाजिनीऽवसू । तौ । आ । यातम् । उप । द्रवत् ॥ ५ ॥ ३ ॥

वायविन्द्रश्च सुन्वत आ यातमुप निष्कृतम् ।

मक्ष्वि१त्था धिया नरा ॥ ६ ॥

वायो इति । इन्द्रः । च । सुन्वतः । आ । यातम् । उप । निःऽकृतम् । मक्षु । इत्था । धिया । नरा ॥ ६ ॥

मित्रं हुवे पूतदक्षं वरुणं च रिशादसम् ।

धियं घृताचीं साधन्ता ॥ ७ ॥

मित्रम् । हुवे । पूतऽदक्षम् । वरुणम् । च । रिशादसम् । धियम् । घृताचीम् । साधन्ता ॥ ७ ॥

---

भाषार्थम्.

५. हे वाजिनीवसू हे वायो [त्वम्] इन्द्रश्च चेतथः । तौ [युवां] द्रवत्(=शीघ्रम्) उपायातम् ॥

६. हे वायो [त्वम्] इन्द्रश्च हे नरौ सुन्वतो निष्कृतमित्था धिया मक्षु (=शीघ्रम्) उपायातम् ॥

७. पूतदक्षं मित्रं रिशादसं वरुणं च [इत्येतौ] घृताचीं धियं साधयन्तौ [आ] ह्वयामि ॥

---

समजून घेणारा असा अर्थ केला आहे; पण पृ धातूचा अर्थ भरणें, कोणाची भरती अथवा भरभराट करणें असा आढळतो. या ठिकाणीं 'आपणांस भरून घेणारी,' 'तृप्ति होईपर्यंत पिणारी' असा संभवेल.

४. तुमची वांछा,' तुम्हीं यावें अशी इच्छा.

## सूक्त २.

ऋ., विश्वामित्राचा पुत्र मधुच्छन्द. देवता, १-३ वायु, ४-६ इन्द्रवायू, ७-९ मित्रावरुण. वृत्त, गायत्री.

१. हे सुंदर वायू, येथें ये; हे सोमरस [तुजकारितां] तयार केले आहेत. ते पी [आणि] [आमची] प्रार्थना ऐक.

२. हे वायू, [यज्ञ]समय जाणणारे स्तोते सोमरस सिद्ध करून तुझ्या उद्देशानें स्तोत्रें गात आहेत.

३. हे वायू, तुझी लुब्ध [आणि] लांब जिह्वा सोमपानासाठीं हविर्दात्याकडेस जात असते.

४. हे इंद्रवायू हो, हे सोमरस [तुमच्या करितां येथें आहेत]. [आम्हांस] सुखें घेऊन या.. क्यां कीं, [हे] सोमरस तुमची वांछा करीत आहेत.

## Hymn 2.

To *Vâyu* 1-3, *Indra* and *Vâyu* 4-6, and *Mitra*-and-*Varuna* 7-9. By *Madhuchchhandas* son of *Viśvâmitra*. Metre *Gâyatri*.

1. Come hither, handsome Vâyu. [For thee] these Soma-draughts are prepared. Drink of them [and] hear our invocation.

2. The singers, Vâyu, cognizant of the proper time, having prepared Soma-draughts, are addressing their hymns to thee.

3. Thy tongue, Vâyu, that is eager and long, goes to the worshipper for drinking Soma.

4. Indra and Vâyu, here are Soma-libations for you. Approach ye with pleasures [for us]. For the libations are desiring you.

---

१. 'वायु' म्हणजे पवनरूप देवता. वायुदेवतेचा संबंध इंद्रदेवतेशीं फार आहे आणि फारकरून जसा अग्नीचा सोमाशीं संबंध आहे (अग्नीषोमी, सूर्याचंद्रमसी असें पुष्कळ ठिकाणीं आढळतें) तसा वायूचा इंद्राशीं संबंध आहे. आणि इंद्रवायूची स्तुति एकत्र केलेली आढळते. वायूच्या योगानें इंद्र जसा होतो असें कोठकोठें वर्णिलें आहे, जेथें वायु जातो तेथें वृष्टि होते असें वेदांत सांगितलें आहे.

३. 'जिह्वा'='धेना' 'धेना' शब्दाचा अर्थ बहुतकरून धेनु म्ह. दूध देणारी गाई असा होतो. आणि तोच अर्थ येथें कोणी करितात, पण तो नीट बसत नाहीं. सायणाचार्य येथें वाचा असा अर्थ करितात; परंतु आम्हीं येथें केलेला अर्थ सायणास फार सोडून नसतां अधिक सयुक्तिक दिसतो.—'लुब्ध'=मपृञ्चती, 'सोमातें विशेषेकरून शिवणारी.' सायणानाच अनु-

# वेदार्थयत्न.

## सूक्त १.

ऋषि, विश्वामित्राचा पुत्र मधुच्छन्द; देवता, अग्नि; छंद, गायत्री.

१. पुरोहित, यज्ञाचा देदीप्यमान ऋत्विज्, होता, [आणि] संपत्तीतें अतिशयेंकरून देणारा अग्नि त्यास मी स्तवितों.

२. अग्नि पूर्वींच्या ऋषींनीं व नव्या ऋषींनीं स्तुत्य [होय]; तो देवांस येथें आणो.

## Hymn 1.

*To Agni. By Madhuchch. son of Vis'vâmitra. Gâyatrî.*

1. I praise Agni, the representative, the resplendent priest of the sacrifice, the invoker [of the gods], the best giver of wealth.

2. Agni is [a god] to be praised by sages ancient and by sages modern. May he bring the gods hither.

---

१. 'पुरः हित' याचा शब्दशः अर्थ 'पुढें ठेविलेला' म्ह. आपल्या ऐवजीं पुढें केलेला, अर्थात् प्रतिनिधि किंवा वकील. अग्नीस देवांचा पृथ्वीवरील पुरोहित, असें पुष्कळ ठिकाणीं वेदांत म्हटलें आहे. कारण कीं, अग्नि हा मनुष्यांनीं दिलेलें हवि देवांकडेस पोंचवितो आणि तें आणण्यास पृथ्वीवर देव त्यालाच पाठवितात.—'होता' म्ह. बोलाविणारा, अर्थात् देवांस, म्हणूनच तें नांव पुरास-पाद... जे १६ ब्राह्मण असतात त्यांतून एकास पडलें आहे. येथें अग्नीस जसें ऋत्विज् असें आदरार्थ म्हटलें आहे तसेंच होता हें पद लाविलें आहे.

२. या ऋचेवरून स्पष्ट होतें कीं, या सूक्ताच्या कर्त्याच्या मताप्रमाणें कितीएक ऋषि म्हणजे वेदमंत्राचे कर्ते अथवा द्रष्टे प्राचीन आणि कितीएक नवीन होते, व तो आपणास नवीनांतील समजतो. ... हा ... लक्षात

मंश्नवत्पोषमेव दिवेदिवे ।
यशसं वीरवत्तमम् ॥ ३ ॥
। अश्नवत् । पोषम् । एव । दिवेऽदिवे ।
वीरवत्ऽतमम् ॥ ३ ॥
अग्ने यं यज्ञमध्वरं विश्वतः परिभूरसि ।
स इद्देवेषु गच्छति ॥ ४ ॥
। यम् । यज्ञम् । अध्वरम् । विश्वतः । परिऽभूः । असि ।
इत् । देवेषु । गच्छति ॥ ४ ॥
अग्निर्होता कविक्रतुः सत्यश्चित्रश्रवस्तमः ।
देवो देवेभिरागमत् ॥ ५ ॥ ॥ १ ॥
अग्निः । होता । कविऽक्रतुः । सत्यः । चित्रश्रवःऽतमः ।
देवः । देवेभिः । आ । गमत् ॥ ५ ॥ ॥ १ ॥
यदङ्ग दाशुषे त्वमग्ने भद्रं करिष्यसि ।
तवेत्तत्सत्यमङ्गिरः ॥ ६ ॥
यत् । अङ्ग । दाशुषे । त्वम् । अग्ने । भद्रम् । करिष्यसि ।
तव । इत् । तत् । सत्यम् । अङ्गिरः ॥ ६ ॥

---

भाषायाम्.

३. [redacted] अग्निना यशोयुक्तं वीरवत्तमं रयिं पोषं [च] एव दिवेदिवे [यजमानो] अश्नुयात् ॥
४. हे अग्ने [त्वं] यमध्वरं यज्ञं विश्वतः परिभूरसि स एव देवेषु गच्छति ॥
५. अग्निर्होता कविक्रतुः सत्यश्चित्रश्रवस्तमः देवो देवैरागच्छतु ॥
६. अङ्ग अग्ने त्वं यद्भद्रं दाशुषे करिष्यसि तत् हे अङ्गिरः सत्यं तवैव ॥

५. हे चपलाश्वगामी वायू आणि इंद्र हो, हे तयार केलेले सोमरस तुम्ही पाहात आहां. तर तुम्ही उभयतां धांवत येथें या.

६. हे वायू, तूं आणि इंद्र असे दोघे, हे शूरांनो, [आमच्या] सत्य स्तवनानें उपासकाच्या सोमरसाप्रत लौकर या.

७. ज्याचें मन पवित्र होय त्या मित्रास आणि शत्रूतें खाऊन टाकणाऱ्या वरुणास मी बोलावितों; ते दोघे [माझ्या अंगीं] घृतार्द्र स्तवनाची प्रेरणा करणारे [होत].

5. Vâyu and Indra possessed of quick horses, you observe these extracted Somas. Come ye then both hither running.

6. Vâyu, and thou Indra, ye heroes, come ye both quickly to the Soma of the worshipper by this sincere prayer.

7. I invoke Mitra of pure mind and Varuna the destroyer of the enemy—both inspirers of the prayer rich with clarified butter.

५. 'हे' इ०५दशः अर्थ 'हे वायू, [तूं] आणि इंद्र, तयार केलेल्या सोमरसास, हे चपलाश्वगामी हो पाहात आहां.'-

'चपलाश्वगामी'='वाजिनीवसू.' वाजिनीवसु या शब्दाचा अर्थ सायणाचार्य [illegible]मध्यें देतात अशी क्रिया तींत राहणारा.' असा बहुत ठिकाणीं करितात आणि प्रस्तुत स्थळींहि 'हविरन्नाच्या संततींत म्ह. मालिकेंत राहणारा' असा करितात. वस्तुतः वाजिनीवसु हें विशेषण वेदांत पुष्कळ ठिकाणीं (ऋ. १. ३७. ५, ५.७४.६, ८.५.३, १०.४०.२ इत्यादि पाहा) अश्विदेवांस लाविलेलें आढळतें. आणि क्वचित् इंद्रासहि लाविलेलें आहे (ऋ. ३.४२.५, १०.९६.८ पाहा). आतां अश्विदेव तर घोडेस्वार होत असें त्यांच्या नांवावरून सुद्धां उघड होय, व इंद्र हा चपल घोड्यावर बसून जातो अथवा उपासकाचा सोम पिण्यास येतो असें वेदांत सांगितलें आहे. यावरून वाजिनीवसु याचा अर्थ अश्ववान् असा सर्वत्र लागतो. शिवाय याच अर्थाचें वाजिनीवन्त् असेंहि विशेषण आहे आणि तें अश्विदेव, इंद्र, उषा, सरस्वती आणि अश्विदेवांच्या रथास लाविलेलें आढळतें, व हे सगळे चपल घोड्यावर बसून जातात असे वेदांत प्रसिद्ध आहे. वाजिनीवसु यांत पदें वाजिन् (अश्व) आणि वसु (द्रव्य ज्यास आहे तो, अर्थात् °वान्) अशीं आहेत! पूर्वपदाच्या अंतीं दीर्घ स्वर नसतां तो समासांत येतो याविषयीं दिवावसु (ऋ. ८. ३४. १), स्वावसु, प्रभूवसो (ऋ. १. ५७. ४) ह्या शब्दांवरून स्पष्ट होतें. व याच शब्दांवरून 'वसु' हें अंत्यपद असलें म्हणजे 'ज्याला आहे तो' असा अर्थ होतो हेंहि उघड होतें.

'तर तुम्ही'='तौ [युवाम्.]' स त्वम्=तर तूं, सोऽहम्=तर मी, ते वयम्=तर आम्ही, ते यूयम्=तर तुम्ही असे प्रयोग फार ठिकाणीं येत जातील.

६. 'हे शूरांनो,'='नरा' म्ह. वायु

**ऋतेन मित्रावरुणावृतावृधावृतस्पृशा ।**
**क्रतुं बृहन्तमाशाथे ॥ ८ ॥**

ऋतेन । मित्रावरुणौ । ऋतऽवृधौ । ऋतऽस्पृशा ।
क्रतुम् । बृहन्तम् । आशाथे इति ॥ ८ ॥

**कवी नो मित्रावरुणा तुविजाता उरुक्षया ।**
**दक्षं दधाते अपसम् ॥ ९ ॥ ४ ॥**

कवी इति । नः । मित्रावरुणा । तुविऽजाता । उरुऽक्षया ।
दक्षम् । दधाते इति । अपसम् ॥ ९ ॥ ४ ॥

## भाषायाम्.

८. हे ऋतवृधावृतस्पृशौ मित्रावरुणौ [युवां] बृहन्तं क्रतुमृतेनाशाथे ॥
९. कवी तुविजातावुरुक्षयौ मित्रावरुणौ नोऽपसं दक्षं दधाते ॥

आणि इंद्रच. वेदांत नर हा शब्द देवास पुष्कळ ठिकाणीं लाविलेला आढळतो.—'उपासकाच्या.' अक्षरशः 'सोमरस काढणाऱ्या यजमानाच्या.'

७. 'शत्रूंनें खाऊन टाकणाऱ्या'='रिशादसम्.' या शब्दाचा खरा काय अर्थ आहे तें स्पष्ट समजत नाहीं. सायणाचार्यांनीं केलेला अर्थ येथें आम्ही दिला आहे. रिशादस् हें विशेषण मरुतांस आणि इतर देवांस लाविलेलें आढळतें. 'घृताद्रें स्तवनाची' म्ह. घृत ज्याबरोबर अर्पण केलें जातें अशा स्तवनाची.

'मित्र' याचा मूळ अर्थ स्नेही, दोस्त. त्यावरून मनुष्यांचें प्रिय इच्छिणारा (प्रियतमो नृणाम् ऋ. ७. ६२. ४) जो अहर्देव म्ह. दिवसरूपी देव त्यास मित्र असें नांव पडलें. मित्रदेव मनुष्यांचें बरें इच्छिणारा व त्यांचा स्नेह करणारा असें वर्णन आढळतें.

'वरुण' म्ह. रात्रिरूपी देवता. मित्र आणि वरुण या दोन्ही देवतांचें जोडपें आहे. केवळ मित्रास अनुलक्षून केलेली स्तुति नाहीं आणि केवळ वरुणास अनुलक्षून केलेली स्तुति फारच थोडी आहे. मित्र आणि वरुण या दोघांस मिळून अनेक ठिकाणीं स्तविलें आहे. मित्राचे आणि वरुणाचे गुण काय काय आहेत, ते काय पराक्रम करितात, कोठें राहतात, कसे चालतात, ते कोणास अनुकूळ आणि कोणास प्रतिकूळ आहेत या सर्व गोष्टी मित्रावरुणांवरचीं सूक्तें येतील तसतशा उघड दिसून येतील.

८. हे सत्यधर्मानें आनंद पावणारे, [आणि] सत्यधर्मानें रक्षणारे मित्रावरुण हो, सत्यधर्माच्या योगानें [तुमची] मोठी वांछा तृप्त होत असते.

8. Ye Mitra and Varuna, taking delight in the sacred law, and defending the sacred law, have by the sacred law attained your great desire.

९. प्रज्ञावान, जन्मत: बलवान, [आणि] विस्तीर्ण स्थलीं वास करणारे मित्रावरुण आम्हांस कुशल बुद्धि देत असतात.

9. Mitra and Varuna, the wise, born mighty, and living in wide space, have conferred upon us an active intellect.

---

८. 'सत्यधर्माच्या योगानें [तुमची] मोठी वांछा तृप्त होत असते' म्ह. तुम्हांस असन्मार्गी, अयज्ञकर्ते आणि उपासनारहित जे लोक त्यांच्या करण्यापासून आनंद होत नाहीं. तर सोमाविषयीं वगैरे जी तुमची मोठी वांछा ती आर्य जनांच्या खऱ्या धर्मापासूनच तृप्त होते.—'वांछा'='क्रतुम्.' क्रतु शब्दाचे अर्थ वेदांत होतात ते येणेंप्रमाणें—१ उद्देश, युक्ति; २ इच्छा, वांछा (जसें पुरोळाशं जुषस्व नः, इन्द्र क्रतुर्हि ते बृहन्. ऋ. ३. ५२. ४); ३ शक्ति, प्रभाव, कुशलपण; ४ बुद्धि, प्रज्ञा (जसें, हस्ते वज्रं भरति शीर्षणि क्रतुम्. ऋ. २. १६. २); ५. ज्ञान.—'मित्रावरुण' म्ह. मित्र आणि वरुण हे दोघे देव. जसे मित्रावरुण तसे अग्नीषोमौ (अग्नि आणि सोम), सूर्याचन्द्रमसौ (सूर्य आणि चंद्रमा), द्यावापृथिवी (स्वर्ग आणि पृथिवी) हे देव दोनदोन एकत्र येत असतात.

९. 'कुशल बुद्धीतें'='दक्षम् अपसम्'. यांत दक्षम् हें नाम आणि अपसम् हें विशेषण. सायणाचार्य दक्षम् म्ह. बल आणि अपसम् म्ह. कर्म असा अर्थ करितात. परंतु, अपस् शब्द या मंत्रांत आद्युदात्त नाहीं आणि कर्म या अर्थी जो अपस् शब्द आहे तो आद्युदात्त आहे (अपः) व अंतोदात्त अपस् शब्द (अपाः) विशेषणार्थी आहे आणि त्याचा अर्थ वेदांत चपल, कुशल, असा किंवा चपल आणि कुशल काम करणारा अर्थात् कारीगर, असा होतो.

## सूक्तम् ३.

ऋषिर्विश्वामित्रपुत्रो मधुच्छन्दाः । देवता- १-३ अश्विनौ; ४-६ इन्द्रः; ७-९ विश्वेदेवाः; १०-१२ सरस्वती । गायत्री छन्दः ।

अश्विना यज्वरीरिषो द्रवत्पाणी शुभस्पती ।
पुरुभुजा चनस्यतम् ॥ १ ॥

अश्विना । यज्वरीः । इषः । द्रवत्पाणी इति द्रवत्ऽपाणी । शुभः । पती इति । पुरुऽभुजा । चनस्यतम् ॥ १ ॥

अश्विना पुरुदंससा नरा शवीरया धिया ।
धिष्ण्या वनतं गिरः ॥ २ ॥

अश्विना । पुरुऽदंससा । नरा । शवीरया । धिया । धिष्ण्या । वनतम् । गिरः ॥ २ ॥

---

### अपाठम्

१. हे द्रवत्पाणी शुभःपती पुरुभुजावश्विनौ [युवां] यज्वरीरिषश्चनस्यतम् ॥
२. हे पुरुदंससौ नरौ धिष्ण्यावश्विनौ [युवां] शवीरया धिया गिरो वनतम् ॥

## सूक्त ३.

देवता, १-३ अश्विदेव, ४-६ इंद्र, ७-९ विश्वेदेव, १०-१२ सरस्वती. ऋषि, पूर्ववत्. वृत्त, पूर्ववत्.

१. हे चपलाश्वगामी, कल्याणाधिपति, बहुसंपत्तिमान, अश्वी हो, हें यज्ञसंबंधि अन्न तुम्ही तृप्ति होईपर्यंत खा.

२. हे आश्चर्यकारक बहुकृत्यकर्ते, शूर [आणि] दानशाली अश्वी हो, तुम्ही शक्तियुक्त आदरबुद्धीनें आमचीं स्तवनें मान्य करून द्या.

## HYMN 3.

To the *As'vins* (1-3), *Indra* (4-6), the *Vis've Devás* (7-9) and *Sarasvati* (10-12). Author and metre as before.

1. O As'vins, riding on quick horses, lords of prosperity, and bestowers of plenty of food, eat the sacrificial offerings to your satisfaction.

2. O As'vins, achievers of many wonderful deeds, valorous, and renowned for liberality, accept our prayers with your mighty goodness.

---

१. 'चपलाश्वगामी' (=द्रवत्पाणी) म्ह. चपल घोड्यांवर बसून जाणारे. द्रवत् म्ह. चपल आणि पाणि म्ह. घोड्याचा खूर (ऋ. १. ३१. २ पाहा). द्रवत्पाणि या शब्दाप्रमाणें उवदश्व असें एक ('रथास' लाविलेलें. ऋ. ४. ४३. २) विशेषण आहे त्याचाहि अर्थ या शब्दाच्या अर्थाप्रमाणेंच आहे.

'अश्वी'='अश्विनौ.' 'अश्विन्' शब्दाचा मूळ अर्थ घोडेसवार. त्यावरून घोडेसवार देव अथवा घोड्यावर बसून जाणारे कोणी एक मानिलेले दोन देव. हे प्रकाशाभिमानी (प्रकाशरूपी) देव होत. ते प्रभातकाळीं अथवा दिवसांतून तीनदां यज्ञाप्रत येतात. त्यांचा रथ सुवर्णाचा आहे व ते रथांतून रत्नें उपासकास आणितात. त्यांच्या रथास पिवळे घोडे जुंपलेले असतात. अश्विदेव आपल्या उपासकांस संकटांतून मुक्त करण्याला येतात. आणि मुक्त करितात; ते रोग्यास बरे करितात आणि म्हाताऱ्यास पुन: तरुण करितात. त्यांच्या आईचें नांव सरण्यू आणि बापाचें अश्विनी असें सांगितलें आहे. हे 'घोडेस्वार देव' कोण समजावयाचे त्याविषयीं निर्णय होत नाहीं. यास्क (निरुक्त १२. १) म्हणतात कीं, "अश्विदेव हे आकाशांत प्रथम दिसतात... "त्यास अश्व (घोडे) आहेत म्हणून "त्यांचें नांव अश्वि[देव] असें औ"र्णभाव म्हणतो. तर अश्विदेव हे "कोण? ते द्यावापृथिवी होत असें "कोणी म्हणतात. ते दिवसरात्ररूपी "होत असें कोणी म्हणतात. कोणी "म्हणतात ते सूर्य आणि चंद्रमा होत. "दोघे राजे पुण्य करणारे होते तेच

दस्रा॑ युवा॒कवः॑ सु॒ता नास॑त्या वृ॒क्तब॑र्हिषः ।
आ या॑तं रुद्रवर्तनी ॥ ३ ॥

दस्रा॑ । यु॒वाकवः॑ । सु॒ताः । नास॑त्या । वृ॒क्तऽब॑र्हिषः ।
आ । या॒त॒म् । रु॒द्र॒व॒र्त॒नी॒ इति॑ रुद्रऽवर्तनी ॥ ३ ॥

इन्द्रा या॑हि चित्रभानो सु॒ता इ॒मे त्वा॒यवः॑ ।
अण्वी॑भि॒स्तना॑ पू॒तासः॑ ॥ ४ ॥

इन्द्र॑ । आ । या॒हि॒ । चि॒त्र॒भा॒नो॒ इति॑ चित्रऽभानो । सु॒ताः । इ॒मे । त्वा॒ऽयवः॑ ।
अण्वी॑भिः । तना॑ । पू॒तासः॑ ॥ ४ ॥

इन्द्रा या॑हि धि॒येषि॒तो विप्र॑जूतः सु॒ताव॑तः ।
उप॒ ब्रह्मा॑णि वा॒घतः॑ ॥ ५ ॥

इन्द्र॑ । आ । या॒हि॒ । धि॒या । इ॒षि॒तः । विप्र॑ऽजूतः । सु॒तऽव॑तः ।
उप॑ । ब्रह्मा॑णि । वा॒घतः॑ ॥ ५ ॥

इन्द्रा या॑हि॒ तूतु॑जान॒ उप॒ ब्रह्मा॑णि हरिवः ।
सु॒ते द॑धिष्व न॒श्चनः॑ ॥ ६ ॥ ५ ॥

इन्द्र॑ । आ । या॒हि॒ । तूतु॑जानः । उप॑ । ब्रह्मा॑णि । ह॒रि॒ऽवः॒ ।
सु॒ते । द॒धि॒ष्व॒ । नः॒ । चनः॑ ॥ ६ ॥ ५ ॥

---

**भाषायाम्.**

३. हे दस्रौ नासत्यौ वृक्तबर्हिषः सुता युवाकवः [सन्ति] । हे रुद्रवर्तनी आयातम् ॥
४ हे चित्रभानो इन्द्र आयाहि । अण्वीभिस्तना पूता इमे सुतास्त्वद्यायाः [सन्ति] ॥
५. हे इन्द्र [त्वं] धियेषितो विप्रजूतो वाघतः सुतवतो ब्रह्माण्युपायाहि ॥
६. हे हरिवन्निन्द्र [त्वं] ब्रह्माणि तूतुजान उपायाहि । नः सुते चनो दधिष्व ॥

---

" अश्विदेव सूर्य असें इतिहासकर्ते " म्हणतात ...... त्याचा वेळ सूर्यो- " दयापर्यंत असतो. ' हे अश्वी म्ह- णजे ज्यास संस्कृतांत मागाहून अश्विनी- कुमार असें नांव पडलें आहे आणि जे नकुलसहदेवांचे बाप असें भारता- दिकांत वर्णिलें आहे तेच होत.

२. 'आश्चर्यकारक बहुकृत्यकर्ते'= 'पुरुदंससमा' म्ह. बहुत अद्भुत कृत्यें कर- णारे. अद्भुतकृत्यें म्ह. च्यवन ऋषीस वृद्धपण आलें असतां त्यास पुनः तरुण केला ( ऋ. १-११६. १० ), विमदाला कमद्यु ही स्त्री मिळवून दिली (ऋ. १. ११६. १९ ) तीं व त्यासारिखीं दुसरीं.

३. हे अद्भुतकृत्यकर्ते, सत्य अश्वी हो, हे शुद्ध दर्भावर ठेविलेले सोमरस तुमचे आहेत. तर हे रुद्रवर्तनी हो, तुम्ही येथें या.

४. हे सुंदरतेजस्क इंद्रा, तू ये; हे बोटांनीं काढलेले नित्य पवित्र सोमरस तुझे आहेत.

५. हे इंद्रा, विद्वान पुरुषांच्या योगानें प्राप्त होतोस असा जो तू तो [आमच्या या] स्तवनानें प्रेरित होत्साता सोमरस अर्पण करणाऱ्या यजमानाच्या प्रार्थनेप्रत ये.

६. हे हरिताश्व इंद्रा, तूं फार त्वरा करून [या] प्रार्थनेप्रत ये; [आणि] आमच्या [ह्या] सोमरसानें तृप्त पाव.

3. [As'vins], achievers of wonderful deeds, and truthful ones, yours are [these] Somas placed on the Kus'a grass. Come, therefore, ye Rudravartani.

4. Come hither, Indra, of beautiful splendor. Thine are these Somas pressed by the fingers and ever pure.

5. Indra, who art moved by the learned, come hither, moved by [this our] praise, to the prayers of the worshipper who has pressed the Soma [for thee].

6. Indra, come hither quickly to our prayers, thou with the tawny horses. Gratify thyself with our Soma.

---

३. 'तम्चे'='युवाकवः,' युवाकु शब्दाचा अर्थ नित्य तुम्हा दोघांचा' असाच होतो उदकांनीं वगैरे मिश्रित असा, (सायणांनीं केलेला) होत नाहीं. ऋ. १. १२०. ३. यांत सायणाचार्यांनीं सुद्धां आमच्या सारिखाच अर्थ केला आहे.—'रुद्रवर्तनी' हें अश्विदेवांचेंच विशेषण येत असतें. ह्याचा अर्थ काय असेल तो असो. सायणाचार्य 'शत्रूंस रडविणारे' अशा भावार्थानें भाष्यांत लिहितात. अश्विदेवांच्या विशेषनामाप्रमाणें वापरलेलें आढळतें यास्तव आम्हीं हें पद तसेंच राहूं दिलें आहे.

५. मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, विद्वानांनीं (कवींनीं) केलेल्या स्तुतीनें इंद्र येत असतो तसाच तो आतां जी मी स्तुति करीत आहें ती ऐकून येओ आणि सोमरस काढून अर्पण करणाऱ्या उपासकाची प्रार्थना स्वीकारो.—'प्रार्थना'='ब्रह्माणि.' ब्रह्म हा शब्द मोठ्या महत्त्वाचा आहे हें सांगावयास नकोच. परंतु त्याचा अर्थ संहितेंत बहुत करून प्रार्थना, स्तवन, स्तोत्र, स्तोत्र अथवा भक्ति करण्याची धर्मबुद्धि मनांत येते ती असा होतो. तेव्हां हा शब्द आद्युदात्त (ब्रह्म) असतो आणि नित्य नपुंसकलिंगी असतो. आणि ब्रह्मा असा जो अंत्योदात्त पुल्लिंगी शब्द आहे त्या-

**ओमा॑सश्चर्षणीधृतो॒ विश्वे॑ देवास॒ आ ग॑त ।**
**दा॒श्वांसो॑ दा॒शुषः॑ सु॒तम् ॥ ७ ॥**

ओमा॑सः । च॒र्ष॒णि॒ऽधृ॒तः॒ । विश्वे॑ । दे॒वा॒सः॒ । आ । ग॒त॒ ।
दा॒श्वांसः॑ । दा॒शुषः॑ । सु॒तम् ॥ ७ ॥

**विश्वे॑ दे॒वासो॑ अ॒प्तुरः॑ सु॒तमा ग॑न्त॒ तूर्ण॑यः ।**
**उ॒स्रा इ॑व॒ स्वस॑राणि ॥ ८ ॥**

विश्वे॑ । दे॒वा॒सः॒ । अ॒प्ऽतुरः॑ । सु॒तम् । आ । ग॒न्त॒ । तूर्ण॑यः ।
उ॒स्राः । इ॒व॒ । स्वस॑राणि ॥ ८ ॥

**विश्वे॑ दे॒वासो॑ अ॒स्रिध॑ एहि॑मायासो अ॒द्रुहः॑ ।**
**मेधं॑ जुषन्त॒ वह्न॑यः ॥ ९ ॥**

विश्वे॑ । दे॒वा॒सः॒ । अ॒स्रिधः॑ । एहि॑ऽमायासः । अ॒द्रुहः॑ ।
मेध॑म् । जु॒ष॒न्त॒ । वह्न॑यः ॥ ९ ॥

### भाषायाम्.

७. हे ओमासश्चर्षणिधृतो विश्वे देवा दाश्वांसो [यूयं] दाशुषः सुतमागच्छत ॥
८. हे विश्वे देवास्तूर्णयोऽप्तुरो [यूयं] सुतं स्वसराण्युस्रा इवागच्छत ॥
९. एहिमाया वह्नयो विश्वेदेवा अस्रिधोऽद्रुहो मेधं जुषन्तु ॥

चा अर्थ ब्रह्मदेव असा वेदांत होत नाहीं, तर स्तोत्र (ब्रह्म) करणारा, सोम तयार करणारा असा व यज्ञांत जे होता, पोता इत्यादि ऋत्विज असतात त्यांपैकीं एक, व क्षत्रिय 'व्हे तो ब्राह्मणजातीचा मनुष्य असा अर्थ होतो.

६. 'तृप्ति पाव'-'चनो धाः' चनः हा शब्द धा या धातूच्या क्रियापदाच्या-च संयोगीं येतो. आणि 'चनो धा' म्ह. तृप्ती पावणें, खुष होणें, संतोष अथवा आनंद पावणें. ज्याचें तृप्ति होते तें द्वितीयांत अथवा सप्तम्यंत असतें. जसें 'चनो दधीत गिरो मे' (ऋ. २.३५.१); अग्निः स्तोमं चनो दधीत (ऋ. ८.१०.११) यदि मे रणः सुते उक्थे वा दधसे चनः (ऋ. ८.३२.६).—'हरिताश्व'—'हरिवान्' म्ह. पिंगट रंगाचे अश्व ज्याच्या रथास जोडलेले आहेत असा. इंद्राचे घोडे (किरण?) पिंगट रंगाचे आहेत असें पुष्कळ ठिकाणीं आलें आहे.

# सूचना.

आर्यलोकांच्या विधिनिषेधात्मक सकल धर्माचें मूळ, सकल शास्त्रांचें आदिस्थान, सकल इतिहासाचा आधार, सकल स्मृतींचें आदिकारण, सकल पुराणांचें उत्पत्तिस्थान, असा जो वेद त्याचें ज्ञान आर्यजनांस अवश्य असावें याविषयीं विशेष लिहावयास नको. कारण कीं अमुक गोष्ट करावी आणि अमुक गोष्ट करूं नये असें समजून जें आम्हीं पदोपदीं आचरण करितों त्याला प्रमाण काय? असें विचारतांच **वेद** असें उत्तर देतात. वेदांतादिक द्वैताद्वैतगांभीर्यांनीं आणि 'घटपटादिकांच्या खटपटीनें' वगैरे भरलेलीं शास्त्रें पढल्यानें पुण्य लागतें व मोक्ष होतो ह्यास प्रमाण काय? **वेद**. इंद्रानें शंभर यज्ञ करून इंद्रपद मिळविलें, शचीशीं लग्न केलें, आणि वृत्रासुराला मारिलें या इतिहासास प्रमाण काय? **वेद**. अमुक वर्णानें अमुक आचार करावा हा जो स्मृतींत नियम आहे त्यास आधार काय? **वेद**. जगाची सृष्टि, स्थिति आणि लय अमुक प्रकारें झाला व होईल म्हणून पुराणें वर्णितात त्यास प्रमाण काय? **वेद**. तर अनादि काळापासून ज्यांत सर्व गोष्टींचें प्रमाण आणि पूज्यता व पवित्रता हीं राहिलीं आहेत, आणि ज्याच्या ज्ञानांत मोक्षप्राप्ति निःसंशय राहिलेली आहे त्याचें ज्ञान आम्हांस असावें याविषयीं खात्री करण्यासाठीं विशेष खटपट करावयास नको.

वेदाचे भाग दोन आहेत, संहिता आणि ब्राह्मण. ऋग्वेदसंहिता, यजुर्वेदसंहिता, सामवेदसंहिता आणि अथर्ववेदसंहिता या चार संहिता प्रसिद्ध आहेत. त्यांतून सामवेदसंहिता ही ऋग्वेदसंहिता जी तीच होय, म्हणजे ज्या ऋचा ऋग्वेदांत आल्या आहेत त्याच सामवेदांत घेतल्या आहेत. मात्र ऋचांचा जो क्रम ऋग्वेदसंहितेंत आहे त्या क्रमाहून सामवेदसंहितेंत ऋचांचा क्रम वेगळा आहे. अथर्ववेदांतहि ऋग्वेदांतील पुष्कळ भाग आले आहेत. केवळ नवे असे मंत्र फार नाहींत. ऋग्वेदसंहिता, सामवेदसंहिता आणि अथर्ववेदसंहिता ह्या वृत्तबद्ध आहेत. यजुर्वेदसंहिता फार करून गद्यरूप आहे, आणि त्यांतहि ऋग्वेदसंहितेंतील भाग येत नाहींत असें नाहीं. त्यांत यज्ञ करण्याला उपयोगी असे विषय आहेत, इतर तीन वेदांप्रमाणें केवळ स्तुतिरूप असे भाग विरळ. तेव्हां वेदाचें खरें स्वरूप काय आहे तें समजण्यास ऋग्वेदसंहिता उत्तम आहे असें समजून तिचा अर्थ प्रथम देण्याचा आरंभ केला आहे.

प्रत्येक संहितेचीं वेगळीं वेगळीं ब्राह्मणें आहेत. ब्राह्मणांत बहुतकरून यज्ञ कसा करावा हें सांगितलेलें असतें. कोठकोठें संहितेंतील मंत्र घेऊन त्यांचा अर्थ केलेला असतो, व मंत्रांच्या संबंधानें कांहीं इतिहास सांगितलेला असतो, व निरनिराळ्या यज्ञांचीं फळें सांगितलेलीं असतात. कितीएक ठिकाणीं आचार वर्णिले आहेत. कोठकोठें शब्दांचें निर्वचन म्हणजे उत्पत्ति सांगितली आहे. हें जे ब्राह्मणांचें स्वरूप संक्षेपानें आम्हीं सांगितलें त्यावरून हीं ब्राह्मणें म्हणजे टीकेसारिखे ग्रंथ आहेत असें दिसून येईल; कारण त्यांत मूळसंहितांचा टीकेंत असतो तसा विस्तार केला आहे. ऋग्वेदसंहितेचें ऐतरेय ब्राह्मण प्रसिद्ध आहे. तसेंच

कौषीतकी ब्राह्मण हेंहि होय. यजुर्वेदाची जी कृष्णयजुर्वेद म्हणून शाखा आहे तिचें ब्राह्मण तैत्तिरीय ब्राह्मण हें होय. तसेंच यजुर्वेदाची जी वाजसनेयिसंहिता किंवा शुक्लयजुर्वेद म्हणून शाखा आहे तिचें शतपथ ब्राह्मण प्रसिद्ध आहे. सामवेदावर प्रौढब्राह्मण व अद्भुतब्राह्मण अशीं दोन मुख्य आहेत. अथर्ववेदाचें गोपथ म्हणून एक ब्राह्मण प्रसिद्ध आहे.

संहितांचा अर्थ समजल्यावर ब्राह्मणें समजण्यास कठिण नाहींत. आणि संहितांत प्रथम ऋक्संहिता. यास्तव तिचें भाषांतर केल्यानें वेदाचें स्वरूप समजावयास सुगम होईल असें समजून हा यत्न आम्हीं करीत आहों. मुख्य भाषांतर मराठी आहे; तथापि आपल्या देशांत ज्यांला मराठी समजत नाहीं असे गुजराथी, कानडी, बंगाली वगैरे लोक त्यांसहि वाचतां यावें म्हणून तूर्त बहुतेकांस समजते अशी जी इंग्रजी भाषा तींतहि तर्जुमा केला आहे. परंतु मुख्य भाषांतर मराठींत असल्यामुळें टिपा सर्व मराठींत दिल्या आहेत.

हा यत्न केवळ असंस्कृतज्ञ लोकांसच समजावा असा आमचा हेतु नाहीं. ज्यांस संस्कृताचें ज्ञान नाहीं त्यांस मराठी भाषांतर व टिपा इतकें उपयोगी पडेल. परंतु ज्यांस संस्कृताचा परिचय असेल त्यांसाठीं संहिता व पदें, आणि संहितेची भाषा फार प्राचीन असल्यामुळें समजण्यास अवघड पडते म्हणून अर्वाचीन संस्कृतांत प्रत्येक मंत्राचा अन्वय "भाषा" रूपानें दिला आहे, तो उपयोगी पडेल अशी आशा आहे.

ज्यांस इंग्रजीच भाषांतर मात्र उपयोगी पडणार आहे त्यांणीं तूर्त तितक्यानेंच तृप्त राहणें अवश्य आहे; कारण कीं, टिपा मराठीप्रमाणें इंग्रजींतहि देण्याची तूर्त सवड नाहीं. परंतु टिपा इंग्रजींतु.

देण्याची सवड नाहीं इतक्याच कारणामुळें इंग्रजींत तर्जुमाहि घालूं नये हें योग्य नाहीं असें समजून तो तर्जुमा तूर्त आम्हीं दिला आहे. इंग्रजीप्रमाणें हिंदुस्तानांत प्रचारांत असलेली मराठी-शिवाय दुसरी भाषा इंग्रजीप्रमाणें आम्हांस अवगत असती तर इंग्रजीऐवजीं तशा भाषेंत तर्जुमा केला असता.

ऋग्वेदसंहितेसारिखा प्राचीन ग्रंथ लावण्याचें काम कठीण आहे म्हणून सांगावयास नकोच. कोणताहि ग्रंथ फार जुना असला म्हणजे त्यांतील प्रथम तर भाषा समजत नाहीं. प्रसिद्ध भाषेस अनुसरून नाहींत अशीं अनेक रूपें, अनेक प्रयोग, अनेक शब्द असल्यामुळें ग्रंथ दुर्बोध होतो. शिवाय तशा ग्रंथांतील विचार, कल्पना, व त्या करण्याची आणि बोलून दाखविण्याची पद्धतिहि त्याच्या भाषेप्रमाणेंच आर्ष असते. कित्येक विशेषनामें आढळतात त्यांविषयीं प्रस्तुतकाळीं माहिती नसल्यामुळें दुर्बोधत्व वाढतें. तशा प्राचीन ग्रंथांत वर्णिलेले आचार, प्रचार व संप्रदाय चालू प्रसंगीं प्रसिद्ध नसल्यामुळें काठिन्य येतें. त्यामुळें कित्येक प्रसंगीं वेगळे वेगळे अर्थ करणारे वेगळे वेगळे अर्थ करूं लागतात. त्यावरून वस्तुतः असलेलें काठिन्य वाढतें. अशी प्रकार प्राचीन ग्रंथांची दशा होते. आणि ही स्थिति वेदास बऱ्याच अंशीं लागू आहे. परंतु ह्या सर्व अडचणी दूर व्हाव्या म्हणून आम्हीं मराठी टिपांत बहुतेक ठिकाणीं अर्थाची फोड करून सांगू. त्यामुळें, वेदाचा अर्थ काय आहे याविषयीं व तो करण्यास काय काय नडी येतात याविषयीं वाचणाऱ्यांस विचार करितां येईल.

ऋग्वेदसंहितेचा अर्थ करण्याच्या कामीं, आम्ही सर्व प्रकारच्या साहाय्यभूत ग्रंथांचा उपयोग करूं. ज्यांनीं ज्यांनीं या विषयावर आजपर्यंत मेहनत घेऊन व्यासंग केला आहे त्या सर्वांचे ग्रंथ यथाशक्ति

पाहून नंतर अर्थाचा निश्चय करण्याचा यत्न करूं. या संहितेवर सायणाचार्यांचें भाष्य आहे त्याचा पूर्ण विचार करून, जेव्हां जेव्हां त्या भाष्यापासून भिन्न अर्थ करण्याचा प्रसंग येईल तेव्हां तेव्हां आमच्या अर्थास काय काय आधार आहे तें आरंभीं तरी बहुत-करून तपशीलवार सांगत जाऊं. कारण हा आमचा **यत्न** अशा प्रकारचा आहे, आणि अशा हेतूनें केला आहे कीं, फार परि-श्रम केल्याअंतीं वेदवाणीचा काय अर्थ आहे तो आमच्या शक्ती-प्रमाणें दिला आहे व तो लोकांस समजावा इतकेंच नव्हे, पण तो योग्य आहे कीं नाहीं हें विद्वज्जनांस सांगतां यावें. वेदाचा अर्थ करण्यास अनेक अडचणी आहेत व जीं पाहिजेत तीं सर्व साधनें आम्हांस नसतील यामुळें, आणि. वेदाचा अभ्यास विद्वज्जनांनीं करावा तसा ते अगदींच करीत नाहींत यामुळें वेदाचा अर्थ समजावा तसा आम्हांस क्वचित् न समजेल ह्याविषयीं आमची पूर्ण खात्री आहे. तथापि आमच्या आर्यबांधवांस आम्ही खात्रीपूर्वक व निश्चयानें सांगतों कीं, खरोखर एक अर्थ आहे असें आम्हांस ठाऊक असतां तो आम्हांस अथवा लोकांस आवडणार नाहीं म्हणून किंवा चालत आले-ल्या प्रचारांस व समजुतीस विरुद्ध आहे म्हणून समजून उमजून दु-सरा अर्थ आम्ही कधीं देणार नाहीं; आणि वर सांगितलेल्या अडचणी येतील या भीतीनें आम्ही **यत्न** चालविण्यास सोडणार नाहीं. ज्या ठिकाणीं दुर्बोधामुळें अगदींच निरुपाय होईल त्या ठिकाणीं आम्ही तसेंच सांगण्यास काडीमात्र संशय घेणार नाहीं. कारण कीं, आमचा हेतु इतकाच आहे कीं, परमपुरातन, परमपूज्य आणि परमप्रमाणीभूत जो वेद त्याचा अभ्यास लोकांनीं करावा, आणि अर्थ सकल आर्यजनांनीं जाणून घ्यावा. 'तो हेतु कसा सिद्धीस जाईल याच गोष्टीकडे आमच्या सर्व परिश्रमांचें [illegible] म्हणू-'

नच सर्व कठिण कठिण स्थळीं अर्थ लावण्यास कोणकोणतीं साधनें उपलब्ध आहेत व कोणत्या गोष्टींविषयीं काठिन्य आहे व कोणत्या गोष्टींचा खुलासा झाल्यास सर्व अर्थ लागेल हें सांगत जाऊं.

ऋग्वेदाचीं दहा मंडलें आहेत. त्यांत एक हजारापेक्षां किंचित् अधिक सूक्तें आहेत. प्रत्येक सूक्तांत सरासरीनें दहा ऋचा या मानानें दहा हजारांपेक्षां थोड्याशा अधिक ऋचा आहेत. आमचे मासिक भागांत आरंभीं टिपा फार द्याव्या लागतील व त्या जेथें जेथें अवश्य दिसतील तेथें तेथें शेवटपर्यंत देऊं. परंतु एकच वैषम्य पुनःपुनः येत जाईल तेव्हां त्या त्या सर्व ठिकाणीं टिपांची जरूर पडणार नाहीं. यावरून आम्हांस वाटतें कीं, प्रस्तुतेपेक्षां उत्तरोत्तर अधिक अधिक भाषांतर व मूळ आणि थोड्या थोड्या टिपा येत जातील. तथापि नांवानें आबालवृद्धांस अगदीं प्रसिद्ध, परंतु अर्थानें अगदीं अज्ञात असा तो वेद त्याचा अर्थ सकल आर्यांस समजावा हा आमचा उद्देश आहे, त्यापेक्षां पुनरुक्तीचा दोष झाला तरी सोसावा; परंतु लोकांची वासना या अति अमूल्य विषयाकडे वळवावी म्हणून एकच खुलासा वारंवार देण्यास प्रसंगवशात् आळस करणार नाहीं.

तथापि अति गहन असा मानलेला (आणि कांहीं कारणांनीं क्वचित् तसा आहे खरा) व परम पुराण, आणि अनेक कारणांमुळें भाषेच्या संबंधानें व विचारांच्या संबंधानें कठिण असा जो वेद त्याचें प्राकृत भाषांतर केलें तरी तें एकाद्या कल्पित कादंबरीसारिखें सुबोध, एकाद्या अर्वाचीन कवितेसारिखें सुरस अथवा एकाद्या ठुमरी किंवा पदासारिखें मधुर लागेल अशी कोणी आशा करूं नये. परंतु वेदाच्या ऋचा कोणत्या प्रसंगीं किती हजार वर्षांपूर्वीं कोणीं कोठें प्रथम म्हटल्या व म्हटल्या यांचा विचार करीत करीत वाचकांनीं भाषांतर वा-

चीत जावें, अशी आमची. प्रार्थना आहे, म्हणजे अर्थ समजत नाहीं अशी निराशा होणार नाहीं. मूळ अर्थ हजारो वर्षांपासून आज-पर्यंत करणाऱ्यांनीं जे श्रम ज्या उद्देशानें केले आहेत त्याच ज्ञानेच्छेच्या उद्देशानें त्याप्रमाणें थोडा श्रम केला पाहिजे तरच भाषांतर समजेल असें कितीएक सूक्तां विषयीं कबूल करणें अवश्य आहे. आणि तसें झाल्यावरहि जर दुर्दैवेंकरून वाचकांची नि-राशा होईल तर त्याचा दोष वाचक कृपा करून भाषांतरकर्त्या-लाच सांगळा न लावितील अशी आशा आमच्यानें केल्याविना राहवत नाहीं. कारण कीं आम्ही केवळ अर्थवाहक आहों, अर्थकारक नाहीं. भांडारांत जें असेल तें आणून आम्ही आम-च्या प्रिय वाचकांपुढें ठेवूं. बाहेरचें आणून भांडारांतील हें आहे अशी अथवा भांडारांत अर्थ असून तो नाहीं अशी प्रतारणा करणार नाहीं. आणि या आमच्या कारभारांत आम्हांस देवाचे प्यारे सकल आर्यजन आपल्या "मित्रतेचा, अर्थाचा, आणि सच्छात्ररूपी संततींत जें बळ नित्य असतें त्याचा अनुग्रह करून साहाय्य "करितील" यांत संशय नाहीं. कारण कीं आम्ही

तमित्सखित्व ईमहे तं राये तं सुवीर्ये ।
स शक्र उत नः शकदिन्द्रो वसु दयमानः ॥

ऋ. १.१०.६.

**भाषांतरकर्ता.**

# ऋग्वेद.

ऋषिर्विश्वामित्रपुत्रो मधुच्छन्दाः । अग्निर्देवता । गायत्री छन्दः ॥

ह्या सूक्ताचा ब्रह्मयज्ञांत विनियोग आहे. आणि अग्निमीळे या मंत्राचा उत्सर्जन व उपाकर्म यांमध्यें अग्नीच्या उद्देशानें होम करण्याविषयीं विनियोग आहे.

## सूक्तम् १.

ॐ अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम् ।
होतारं रत्नधातमम् ॥ १ ॥

अग्निम् । ईळे । पुरःऽहितम् । यज्ञस्य । देवम् । ऋत्विजम् ।
होतारम् । रत्नऽधातमम् ॥ १ ॥

अग्निः पूर्वेभिर्ऋषिभिरीड्यो नूतनैरुत ।
स देवाँ एह वक्षति ॥ २ ॥

अग्निः । पूर्वेभिः । ऋषिऽभिः । ईड्यः । नूतनैः । उत ।
सः । देवान् । आ । इह । वक्षति ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

१. पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजं होतारं रत्नधातममग्निमीडे ॥
२. अग्निः पूर्वैर्नूतनैश्च ऋषिभिरीड्यः । स देवानिहावहतु ॥

७. संरक्षण करणारे [आणि] मनुष्यांतें आधार देणारे हे विश्वेदेव हो, [संपत्ति]दाते असे जे तुम्ही ते हविर्दात्याच्या सोमाप्रत या.

८. हे विश्वेदेव हो, कुशल [आणि] चपल असे जे तुह्मी ते, गाई आपल्या गोठ्याकडेस [धांवत जातात] त्याप्रमाणें [या] सोमाकडेस धांवत या.

९. अकल्याण न करणारे, मायाकुशल, वैररहित असे रथारूढ विश्वेदेव [हे] हविरन्न ग्रहण करोत.

7. Vis've Devâs, protectors, and supporters of men, come ye givers to the Soma of the giver (the worshipper).

8. Vis've Devâs, come ye diligent ones quickly to the Soma, like as the cows run to their abodes.

9. May the beneficent, artful Vis've Devâs, free from hatred and mounted on chariots, enjoy this offered food.

---

७. 'विश्वेदेव' याचा शब्दशः अर्थ 'सकल देव' असा आहे. पण जसे मरुत् देव यांचा गण आहे अथवा आदित्य देव यांचा गण आहे तसा 'विश्वेदेव' हा देवगण असावा असें दिसतें. सायणाचार्यहि 'विश्वेदेवाः' म्ह. विश्वेदेव या नांवाचे देवविशेष असा अर्थ करितात; परंतु यास्क विश्वेदेव म्ह. त्या नांवाचे देवविशेष असा अर्थ न करितां विश्वे शब्द, सर्व, सकल या अर्थी घेतात. आतां 'विश्वेदेव' हा देवविशेषांचा गण घेतला तर त्या गणांत कोणकोणते देव येतात आणि कोणकोणते येत नाहींत हें जरी स्पष्ट समजत नाहीं तरी जशी इंद्रदेवता पृथक्, मरुद्गण पृथक्, तसे विश्वेदेव हा पृथक् गण अशा समजुतीनें यांचें नांव संहितेंत येतें असें दिसतें.

आपल्या लोकांत वैश्वदेव करितात तो या विश्वेदेवांस अनुलक्षूनच करितात हें सांगावयास नकोच.

८. 'गाई आपल्या गोठ्याकडेस [धांवत जातात] त्याप्रमाणें'—'उस्रा इव स्वसराणि'. सायणाचार्य 'सूर्यकिरण दिवसाप्रत जसे जातात तद्वत्' असा अर्थ करितात. आणि यास्कांनीहि स्वसर पदाचा अर्थ दिवस असा केला आहे. आतां उस्रा याचा अर्थ गाई असा होतो याविषयीं ऋ. १. ७१.१ यावरील सायणाचार्याचेंच मत पाहा. आणि ज्या रीतीनें स्वसर शब्दाची प्रक्रिया करून दिवस असा अर्थ यास्क करितात तशाच रीतीनें स्रियते गम्यतेत्र इति सरम् गृहम् असा अर्थ होण्यास अडचण दिसत नाहीं.

९. 'मायाकुशल'—'एहिमायासः.' हा शब्द संदिग्धार्थ आहे. याचा अर्थ सायणाचार्य सुद्धां निश्चयानें करूं शकत नाहींत. परंतु अहिमाय (सर्पाप्रमाणें मायावी) जो शब्द वेदांत येतो त्याचा आणि या शब्दाचा अर्थ एकच असेल असें समजून येथें निर्वाह केला आहे.

पावका नः सरस्वती वाजेभिर्वाजिनीवती ।
यज्ञं वष्टु धियावसुः ॥ १० ॥

पावका । नः । सरस्वती । वाजेभिः । वाजिनीऽवती ।
यज्ञम् । वष्टु । धियाऽवसुः ॥ १० ॥

चोदयित्री सूनृतानां चेतन्ती सुमतीनाम् ।
यज्ञं दधे सरस्वती ॥ ११ ॥

चोदयित्री । सूनृतानाम् । चेतन्ती । सुऽमतीनाम् ।
यज्ञम् । दधे । सरस्वती ॥ ११ ॥

महो अर्णः सरस्वती प्रचेतयति केतुना ।
धियो विश्वा विराजति ॥ १२ ॥ ६ ॥ १ ॥

महः । अर्णः । सरस्वती । प्र । चेतयति । केतुना ।
धियः । विश्वाः । वि । राजति ॥ १२ ॥ ६ ॥ १ ॥

---

## भाषायाम्.

१०. पावका वाजिनीवती धियावसुः सरस्वती वाजेभिः यज्ञं वष्टु ॥

११. सूनृतानां चोदयित्री सुमतीनां चेतन्ती सरस्वती यज्ञं दधे ॥

१२. सरस्वती केतुना महोर्णः प्रचेतयति । विश्वा धियो विराजति [ च ] ॥

---

' रथारूढैः वह्नयः ' . वह्नि हें येथें विशेषण आहे. ' धन वाहून आणणारे ' असें सायण म्हणतात. आम्हीं केलेल्या अर्थास प्रयोगप्रमाणें पुष्कळ आहेत.

१०. पावन करणारी, चपलाश्वगामिनी [आणि] पुष्कळ लोकांनीं पूज्य, अशी सरस्वती आमच्या यज्ञाची मोठ्या उत्सुकतेनें वांछा करो.

१०. May Sarasvatî the purifier, the goddess mounted on a charger, [and] rich in the prayer of men greedily wish for our sacrifice.

११. मधुर गायनांची प्रेरणा करणारी [आणि] चांगल्या भजनबुद्धि देणारी सरस्वती यज्ञ संपादीत असते.

11. Sarasvatî, the inspirer of joyous hymns and provoker of good pious feelings, brings about the sacrifice.

१२. सरस्वती आपल्या प्रकाशानें मोठा उदकप्रवाह प्रगट करिते. ती सकल प्रार्थनांची स्वामिनी होय.

12. Sarasvatî exhibits with her light a great flood of water. She governs all pious prayers.

---

१०. 'चपलाश्वगामिनी'='वाजिनीवती'. वर २ ऱ्या सूक्ताच्या ५ व्या मंत्रावरील टीप पाहा.

'सरस्वती' ही एक वेदांत देवता कल्पिली आहे. सरस्वती हें वस्तुतः एका नदीचें नांव आहे. आणि ऋग्वेदांत जीं जीं स्तोत्रें सरस्वतीविषयीं आहेत त्यांत सरस्वती म्हणजे नदी हें बहुत करून स्पष्ट दिसून येतें. पण जरी प्रथम सरस्वती हें नदीचें नांव होतें तथापि सरस्वतीनदीच्या कांठीं यज्ञ होत होते म्हणून तिच्यावरहि इतर पदार्थांप्रमाणें ऋषींनीं देवत्वाचा आरोप केला. चपलाश्वगामिनी हें विशेषण इतर देवांस जसें लाविलेलें आढळतें तसें सरस्वतीस येथें लाविलें आहे. त्यांत विशेष प्रयोजन आहे असें दिसत नाहीं. सरस्वती म्हणजे वाग्देवी अशी जी कथा पुराण इतिहासांत वगैरे आहे तिचा उल्लेख ऋग्वेदांत नाहीं. येथें ती केवळ नदी आणि नदीरूपी देवताच आहे.

'मोठ्या उत्सुकतेनें'='वाजेभिः'. शब्दशः 'बलानें,' 'जोरानें.'

११. 'यज्ञ संपादीत असते' म्ह. यज्ञ करण्याची इच्छा उत्पन्न करिते.

१२. 'प्रकाशानें मोठा उदकप्रवाह प्रगट करिते'=' महो अर्णः प्र चेतयति केतुना.' याचें हृद्गत काय असेल तें स्पष्ट समजत नाहीं. सायण "सरस्वती नदी कर्मानें म्ह. प्रवाहरूपी कर्मानें पुष्कळ उदक प्रगट करिते" असा अर्थ करितात.

---

## सूक्तम् ४.

ऋषिर्विश्वामित्रपुत्रो मधुच्छन्दाः । इन्द्रो देवता । गायत्रीच्छन्दः ।

सुरूपकृत्नुमूतये सुदुघामिव गोदुहे ।
जुहूमसि द्यविद्यवि ॥ १ ॥

सुरूपऽकृत्नुम् । ऊतये । सुदुघाऽइव । गोऽदुहे ।
जुहूमसि । द्यविऽद्यवि ॥ १ ॥

उप नः सवना गहि सोमस्य सोमपाः पिब ।
गोदा इद्रेवतो मदः ॥ २ ॥

उप । नः । सवना । आ । गहि । सोमस्य । सोमऽपाः । पिब ।
गोऽदाः । इत् । रेवतः । मदः ॥ २ ॥

---

### भाषायाम्.

१. गोदुहे(= गोदोहनाय) सुदुघामिवोतये सुरूपकृत्नुं द्यविद्यव्याह्वयामः ॥

२. हे सोमपाः [ त्वं ] नः सवनान्युपागच्छ [सोमं [ च ] पिब । रेवतस्तव मदो गोद एव [भवति] ॥

## सूक्त ४.

देवता, इन्द्र; ऋषि आणि वृत्त पूर्ववत्.

१. प्रयासाशिवाय दूध काढूं देणाऱ्या गाईस दोहनार्थ जशी [हाक मारितात] तसे आम्ही, सुंदर कृत्यें करणाऱ्या इंद्रास रक्षणासाठीं प्रत्येक दिवशीं हाक मारितों.

२. [हे इंद्रा], तूं आमच्या यज्ञांप्रत ये. हे सोमपान करणाऱ्या, तूं [हा] सोम पी; [कां कीं] संपत्तिमान् जो तूं त्या तुला [सोमाचा] माद उत्पन्न झाला म्हणजे आम्हांस गाई खचित प्राप्त होणार.

## Hymn 4.

*To* Indra. *Author* and *metre* as before.

1. We invoke Indra the doer of beautiful deeds for protection daily like a good milch-cow for the purpose of milking.

2. Come hither to our sacrifices. Partake of the Soma, O Soma-drinker. The intoxication of thee the rich certainly gives us cows.

---

१. यांतील उपमा लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे. इंद्र आपल्या उपासकाच्या अगदी स्वाधीन होऊन जातो आणि हळलेल्या दुभत्या गाईस हाक मारितांच ती जशी येते तसा बोलावितांच तो येतो अशी कवीची कल्पना आहे.

२. 'संपत्तिमान् इ०.' शब्दशः भाषांतर, 'संपत्तिमानाचा माद गाई देणारा [होय].' सोम पिऊन इंद्रास माद उत्पन्न झाला म्हणजे तो उपासकाला गाई मिळवून देतो असें ऋषीचें हृद्गत आहे. यास्तव इंद्रास सोम पिण्यास बोलावितो. देव सोम पिऊन त्यास माद चढला म्हणजे ते आपल्या उपासकास धनदौलत देतात, संकटापासून बचावितात, युद्धांत मदत करितात आणि त्यांच्या शत्रूचा पराजय करितात असें वेदांत फारकरून सर्वत्र आढळतें.

सोम हा शब्द वेदांत मोठ्या महत्वाचा आहे. त्याचा अक्षरशः अर्थ पिळून काढलेला (रस) अथवा (सुधातूपासून) होतो. तेव्हां अक्षरशः अर्थ पाहिला असतां अमुक वल्लीविशेषाचा रस असें होत नाहीं. पिळून काढलेला रस म्हणजे मद्य असाच होतो. सोम मधुर, स्वादिष्ठ, तुरट, रसवान् आणि मादकारक असतो आणि इंद्रानें सोमपान केल्यावर इंद्रासमोर कोणी शत्रु उभा राहूं शकत नाहीं असें वर्णिलें आहे (ऋ. ६. ४७. १. २). उत्तरोत्तर सोम हें वल्लीविशेषाचेंच नांव पडलें. व सोमरसाला देवत्व आरोपून त्यास एक

अथा ते अन्तमानां विद्याम सुमतीनाम् ।
मा नो अति ख्य आ गहि ॥ ३ ॥

अथ । ते । अन्तमानाम् । विद्याम । सुऽमतीनाम् ।
मा । नः । अति । ख्यः । आ । गहि ॥ ३ ॥

परेहि विग्रमस्तृतमिन्द्रं पृच्छा विपश्चितम् ।
यस्ते सखिभ्य आ वरम् ॥ ४ ॥

परा । इहि । विग्रम् । अस्तृतम् । इन्द्रम् । पृच्छ । विपःऽचितम् ।
यः । ते । सखिऽभ्यः । आ । वरम् ॥ ४ ॥

उत ब्रुवन्तु नो निदो निरन्यतश्चिदारत ।
दधाना इन्द्र इद्दुवः ॥ ५ ॥ ७ ॥

उत । ब्रुवन्तु । नः । निदः । निः । अन्यतः । चित् । आरत ।
दधानाः । इन्द्रे । इत् । दुवः ॥ ५ ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

३. अथ तेन्तस्थाः सुमतीः [ वयं ] विद्याम । नो मातिख्यः । आगच्छ ॥

४. परेहि । यस्तव सखिभ्य आ वरम् [ अस्ति ] [ तं ] विग्रमस्तृतं विपश्चितमिन्द्रं पृच्छ.

५. उतेन्द्र एव दुवो दधाना अन्यतश्चिन्निरारत [ इति ] निदो (=निन्दकाः) नो ब्रुवन्तु ॥

---

महापराक्रमी देवता करून टाकिलें. व ऋग्वेदाचें एक सगळें मंडल ( ९ वें ) सोमास अर्पण केलें आहे. या सोमाविषयीं उत्तरोत्तर पुष्कळ लिहावें लागेल. यास्तव येथें केवळ दिग्दर्शन केलें आहे.

३. तुझे उत्तम अंतस्थ अनुग्रह आम्हीं जाणावे असें कर. तू आमचा अतिक्रम करूं नकोस, येथं ये.

४. जा, आणि तुझ्या मित्रांपेक्षां जो उत्तम [होय], जो बुद्धिमान्, अजित [आणि जो] प्रज्ञावान् असा इंद्र त्यास विचार,

५. कीं 'तुम्ही इंद्राचीच सेवा कराल तर सकल अन्य [देवतां]स अगदीच अंतराल' असे आमचे निंदक आम्हांस म्हणोत कीं काय,

3. May we know thy inmost favours. Do not pass us over. Come hither.

4. Go and ask Indra, the wise, the unconquered, the sage, and who is better than thy friends,

5. whether the revilers may say to us that we might indeed be lost to all other gods by serving Indra alone;

---

३. 'जाणावे असें कर'='विद्याम.' म्ह. तुझे जे अगदी आंतील, किंवा फार प्रिय अनुग्रह, मेहरबानग्या, त्या आम्हास मिळोत. 'अतिक्रम करूं नकोस,' आम्हांस वगळूं नकोस.

४. 'तुझ्या मित्रांपेक्षां जो उत्तम होय'='यस्ते सखिभ्य आ वरम्'. वरम् हें अव्यय आहे आणि त्याचा अर्थ ('कशाच्या तरी पेक्षां) चांगलें'. असा होतो. जसें, अभ्यर्ष देवान्सखिभ्य आ वरम्=तूं आपल्या मित्रांपेक्षां देवांस चांगलें पूज (ऋ. ९. ४५. २), अश्नं सम्राभ्य आ वरं प्रान्धं श्रोणं च तारिषत्=यानें आंधळ्यास आणि पांगळ्यास त्या सातांपेक्षां चांगलें तारिलें (ऋ. १०. २५. ११.)—'विचार'='पृच्छ.' याचें कर्म ५ व्या आणि ६ व्या मंत्रांत जे प्रश्न आहेत तेंच होय. इंद्राला विचारावयाचें तें हें कीं, आम्हास आमचे निंदक म्हणतात कीं, तुम्ही इंद्राचीच सेवा करितां दुसऱ्या देवाची करीत नाहीं, तर दुसरे सगळे देव तुम्हांस अंतरतील, तर असें त्यांनीं म्हटल्यास चिंता नाहीं ना? आम्ही त्यास सांगत असतों कीं, अंतरले तर अंतरोत, आम्हांस इंद्र आहे तितका पुरे; तर असें आमचें उत्तर बरोबर आहे ना? तुझ्या भरंवशावर आम्हीं राहावें ना? (५.). दुसरें विचारावयाचें असें कीं, अदेवभक्त जन आम्हांस भाग्यशाली असें उपहासानें म्हणतात आणि खरोखर आम्हांस भिकारी समजतात; तर ते आम्हांस तसें करोत, आम्ही इंद्राचा आश्रय सोडणार नाहीं असें आम्ही समजतों तें बरोबर आहे ना? म्ह. आम्हीं खुशाल तुझ्या भरंवशावर राहावें ना? (६).

५. 'सकल अन्य [देवतां]स अंतराल'='अन्यतः चित् निरारत.' म्ह. अन्य देवांस मुकाल. द्वितीयपुरुषीं अनेकवचनीं अन्यतः ही अन्यस्मात् या ऐवजीं पंचमी आहे. 'निरारत' याविषयीं, 'मा तें गोदत्र निरराम राधसः'=हे गाई देणाऱ्या इंद्रा, तुझ्या अनुग्रहास आम्ही न मुकूं असें कर (ऋ. ८. २१. १६).

उत नः सुभगाँ अरिर्वोचेयुर्दस्म कृष्टयः ।
स्यामेदिन्द्रस्य शर्मणि ॥ ६ ॥
उत । नः । सुऽभगान् । अरिः । वोचेयुः दस्म । कृष्टयः
स्याम । इत् । इन्द्रस्य । शर्मणि ॥ ६ ॥
एमाशुमाशवे भर यज्ञश्रियं नृमादनम् ।
पतयन्मन्दयत्सखम् ॥ ७ ॥
आ । ईम् । आशुम् । आशवे । भर । यज्ञऽश्रियम् । नृऽमादनम् ।
पतयत् । मन्दयत्ऽसखम् ॥ ७ ॥
अस्य पीत्वा शतक्रतो घनो वृत्राणामभवः ।
प्रावो वाजेषु वाजिनम् ॥ ८ ॥
अस्य । पीत्वा । शतक्रतो इति शतऽक्रतो । घनः । वृत्राणाम् । अभवः ।
प्र । आवः । वाजेषु । वाजिनम् ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

६. दस्मं [च पृच्छ] उत अरयः कृष्टयो नः सुभगान्वोचेयुः । इन्द्रस्यैव शर्मणि स्याम [वा न वेति] ॥

७. यज्ञश्रियं नृमादनं पतयन्मन्दयत्सखमेतमाशुमाशव आभर ॥

८. हे शतक्रतो इमं पीत्वा [ त्वं ] वृत्राणां हन्ताभवः । वाजेषु [ च ] वाजिनं प्रावः ॥

---

आणि, 'मा वो दात्रान्मरुतो निरराम'=हे मरुतांनो, तुमच्या देणगीस आम्ही न मुकूं असें करा (ऋ. ७.५६.२१), हें उदाहरणें पाहा.

६. कीं 'हे अद्भुत कृत्यें करणाऱ्या [इंद्रा], देवद्रोही जन आम्हांस भाग्यशाली असें म्हणोत कीं काय? आम्हीं इंद्राच्याच आश्रयाखालीं राहावें [कीं नाहीं]?'

७. यज्ञातें शोभविणारा, मनुष्यांतें माद आणणारा, सख्या [इंद्रा]ला धांवविणारा व त्याला मादयुक्त करणारा जो शीघ्रमादी [सोम] त्यास शीघ्रगामी [इंद्रा]प्रत अर्पण कर.

८. हे बहुमेधावी [इंद्रा], तूं हा [सोम] पिऊन [पूर्वी] शत्रूंस मारिता झालास; [आणि] युद्धांत योद्ध्यास संरक्षिता झालास.

6. [ask] the performer of wonderful deeds, whether ungodly men may call us fortunate, [and] whether we should remain under the protection of Indra alone.

7. Offer to quick [Indra] the quickly intoxicating [Soma] that graces the sacrifice, intoxicates men, [and] makes our friend [Indra] fly quick [to us and] be intoxicated.

8. Indra, possessed of many wisdoms, thou hast [before], having partaken of this (Soma), become the destroyer of our enemies, thou hast protected the warrior in battles.

---

६. 'देवद्रोही' 'अरिः'. अरिः हें रूप अरीः ( अर्यः=अरयः ) यांऐवजीं असावेंसें वाटतें. कृष्टयः याचें विशेषण.

७. 'सख्या इंद्राला धांवविणारा व त्याला मादयुक्त करणारा'='पतयत् मन्दयत्सखम्'=सखायं पतयन् मादयंश्च. आमचा सखा जो इंद्र त्याला आमच्या यज्ञाप्रत धांवत येण्याची इच्छा उत्पन्न करणारा व तो धांवत आल्यानंतर त्याला माद उत्पन्न करणारा. अर्पण केलेला सोम पाहून इंद्र शीघ्रचारी होऊन धांवत येतो आणि पिऊन मादयुक्त होतो असा ऋषीचा भावार्थ.—'शीघ्रगामी' म्ह. लवकर धांवून येणाऱ्या.

८. यापूर्वी तूं सोम पिऊन आमच्या व इतर उपासकांच्या शत्रूंचा नाश केलास व तुझे उपासक लढाईत गुंतले असतां त्यांचें तूं संरक्षण केलेंस. यास्तव आताहि येऊन सोम पी असें कवीचें हृद्गत. इंद्राला सोम अर्पण केल्यावर तो मादयुक्त होऊन उपासकांच्या शत्रूंचा नाश करितो आणि त्यास लढाईत बचावितो असें वेदांत जिकडे तिकडे आहे.—'बहुमेधावी'='शतक्रतु.' शतक्रतु हा शब्द फार महत्त्वाचा आहे. त्याचा मूळअर्थ शत म्ह. शेकडो, अर्थात् अनेक, आहेत क्रतु म्ह. बुद्धि, प्रज्ञा, मेधा ज्यास असा. हें विशेषण इंद्रास बहुतकरून लाविलेलें आढळतें तथापि इतर देवांसहि

**तं त्वा वाजेषु वाजिनं वाजयामः शतक्रतो ।**

**धनानामिन्द्र सातये ॥ ९ ॥**

तम् । त्वा । वाजेषु । वाजिनम् । वाजयामः । शतक्रतो इति शतऽक्रतो ।
धनानाम् । इन्द्र । सातये ॥ ९ ॥

**यो रायो३वनिर्महान्त्सुपारः सुन्वतः सखा ।**

**तस्मा इन्द्राय गायत ॥ १० ॥ ८ ॥**

यः । रायः । अवनिः । महान् । सुऽपारः । सुन्वतः । सखा ।
तस्मै । इन्द्राय । गायत ॥ १० ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

९. हे शतक्रतो इन्द्र तं वाजिनं त्वा धनानां सातये वाजेषु वाजयामः ॥

१०. यो रायो महानवनिः सुन्वतः [ च ] सुपारः सखा तस्मा इन्द्राय गायत ॥

---

क्वचित् लाविलेलें आहे. नंतर मागाहून क्रतुशब्दाचा अर्थ यज्ञ असा करूं लागले आणि जुने जे वेदमंत्र त्यात शतक्रतूंचा अर्थ बरोबर न समजून 'शंभर यज्ञ करणारा' असा अर्थ समजूं लागले; आणि त्यानंतर इंद्रानें शंभर यज्ञ केले आणि इंद्रत्व पावला व कोणी मानव शंभर यज्ञ करील तर इंद्रास आपलें इंद्रत्व जाईल अशी भीति पडते, आणि तो नव्याण्णव यज्ञ होतपर्यंत उगी राहतो आणि शंभराव्या यज्ञास आरंभ होतांच मत्सरी व भित्र्या मानवांप्रमाणें विघ्नसंतोषी होऊन रंभादिकांस पाठवून विघ्न करवितो अशा प्रकारचें भारूड रचलें गेलें आणि पुराणें, इतिहास, सूत्रें इत्यादि ग्रंथांत अंतर्गत होऊन प्रमाणीभूत झालें. 'शतक्रतु' म्ह. बहुमेधावी असा सायणाचार्य सुद्धां पुष्कळ ठिकाणीं अर्थ करितात, त्याचें उदाहरण पुढच्याच मंत्रांत शतक्रतु शब्द आला आहे त्यावरील त्याचें भाष्य पाहा.

९. यास्तवच, हे बहुमेधावी इंद्रा, लूट मिळावी म्हणून आम्ही लढाईंत तुला आमचा योद्धा करून पाठवितों.

१०. जो संपत्तीचा सागर, जो मोठा, जो सहज पार पाडणारा, जो सोम अर्पण करणाऱ्या उपासकाचा मित्र, त्या इंद्राप्रत तुम्ही गा.

9. Therefore, Indra possessed of many wisdoms, we move thee to be our champion in battles, that we may obtain booties.

10. Sing unto that Indra, who is a stream of wealth, who is great, who is a saviour, and who is the friend of the worshipper that presses the Soma [for him].

९. 'यास्तव......तुला'='तं त्वा.' ऋ. १. २. ५. यावरची 'नर तुम्ही' याविषयींची टीप पाहा.—'लूट मिळावी म्हणून'='धनानां सातये.' धन शब्दाचा मूळ अर्थ (धन=हन्, शत्रूस मारून त्याजकडून हरण केलेलें द्रव्य) या मंत्रांत आला आहे. बहुतकरून वेदसंहितांत हाच अर्थ असतो.

१०. 'संपत्तीचा सागर'='रायो अवनिः'. पदशः अर्थ 'संपत्तीचा प्रवाह,' संपत्तीचा आशय, संपत्तीचा आकर. अवनिशब्द येथें व ऋग्वेदसंहितेंत इतर स्थळीं स्त्रीलिंगी आहे. ऋ. १. ६१. १० या स्थळीं सायणाचार्य सुद्धां प्रवाह अशाच भावार्थानें निर्वाह करितात. ऋ. १. १०७. ७ हाहि मंत्र पाहा.

## सूक्तम् ५.

ऋषिर्विश्वामित्रपुत्रो मधुच्छन्दाः । इन्द्रो देवता । गायत्रीच्छन्दः ॥

आ त्वेता नि षीदतेन्द्रमभि प्र गायत ।
सखायः स्तोमवाहसः ॥ १ ॥

आ । तु । आ । इत । नि । सीदत । इन्द्रम् । अभि । प्र । गायत ।
सखायः । स्तोमऽवाहसः ॥ १ ॥

पुरूतमं पुरूणामीशानं वार्याणाम् ।
इन्द्रं सोमे सचा सुते ॥ २ ॥

पुरुऽतमम् । पुरूणाम् । ईशानम् । वार्याणाम् ।
इन्द्रम् । सोमे । सचा । सुते ॥ २ ॥

स घा नो योग आ भुवत्स राये स पुरंध्याम् ।
गमद्वाजेभिरा स नः ॥ ३ ॥

सः । घ । नः । योगे । आ । भुवत् । सः । राये । सः । पुरम्ऽध्याम् ।
गमत् । वाजेभिः । आ । सः । नः ॥ ३ ॥

यस्य संस्थे न वृण्वते हरी समत्सु शत्रवः ।
तस्मा इन्द्राय गायत ॥ ४ ॥

यस्य । संऽस्थे । न । वृण्वते । हरी इति । समत्ऽसु । शत्रवः ।
तस्मै । इन्द्राय । गायत ॥ ४ ॥

---

### भाषायाम्.

१. आ तु आ इत । निषीदत । स्तोमवाहसो हे सखाय इन्द्रमभि प्रगायत ॥

२. पुरूणां पुरूतमं वार्याणामीशानमिन्द्रं सोमे सुते सचा [प्रगायत] ॥

३. स ह नो योग आभुवत् । स राये । स पुरन्ध्याम् । स वाजैर्न आगच्छतु ॥

४. संस्थे समत्सु यस्य हरी शत्रवो न वृण्वते तस्मा इन्द्राय गायत ॥

## सूक्त ५.

ऋषि, पूर्ववत्. देवता, इंद्र. वृत्त, गायत्री.

१. या, हे मित्रांनो, स्तोत्रें रचून लौकर या; [आणि] बसा. [आणि] इंद्राविषयीं गा.

२. धनाढ्यांत परम धनाढ्य [आणि] इष्ट वस्तूंचा स्वामी जो इंद्र त्याप्रत, सोम गाळतांच गा.

३. तो आमच्या कामीं जवळ राहो, तो संपत्ति देओ, तो आम्ही हविरन्न समर्पण करितांना [जवळ राहो], तो आम्हांसाठीं धन घेऊन येओ.

४. ज्याच्या पिवळ्या घोड्यांच्या जोडीस द्वंद्वयुद्धांत [अथवा] समरांगणांत शत्रु घेरीत नाहीत त्या इंद्राप्रत तुम्ही गा.

## HYMN 5.

Author as before.—To *Indra*. Metre *Gâyatrî*.

1. Come hither, come, friends, quickly, offering hymns, and sing forth in honour of Indra;

2. the Soma being extracted, sing forth in honour of Indra, the richest of the rich and the lord of riches.

3. May he be present in our work, may he give us wealth, may he be present when we pour out the libation; may he come to us with booty.

4. Sing in honour of that Indra whose pair of tawny horses the enemies do not surround in a duel or in battles.

---

१. या मंत्राचा अर्थ लावतांना असें समजावयाचें कीं, मंत्रकर्ता आपल्या मित्रांस यावयास व बसून इंद्राची स्तुति गावयास सांगतो आहे.—'स्तोत्रें रचून'='स्तोमवाहसः.' पदशः अर्थ स्तोत्रें वाहून आणणारे, म्ह. जशी देवाची पूजा करतांना पुष्पादि सामग्री घेऊन येतात तशीं स्तोत्रें रचून घेऊन या असा भावार्थ.—'लौकर' हा अर्थ मूळांत जें 'तु' हें अव्यय आहे त्यापासून गम्यमान आहे.

२. 'धनाढ्यांत परम धनाढ्य'='पुरूतमं पुरूणाम्'. पुरूतम याचा अर्थ स्पष्ट असतां सायणाचार्य पुरून् म्ह. शत्रूंस त्रासवितो (तामयति) तो असा अतिक्लिष्ट आणि निराधार अर्थ कां करितात तें कळत नाहीं.—'सोम गाळतांच'='सोमे सचा सुते.' सचा हें क्रियाविशेषण.—'गा' हें क्रियापद पूर्वीच्या मंत्रांत आहे तेंच येथें अध्याहृत केलें पाहिजे.

३. हा मंत्र उघड आहे तथापि त्याच्या शब्दरचनेंत थोडेंसें काठिन्य दिसतें. परंतु आम्हीं केलेल्या अर्थावि-

सुतपाव्ने सुता इमे शुचयो यन्ति वीतये ।
सोमासो दध्याशिरः ॥ ५ ॥ ९ ॥

सुतऽपाव्ने । सुताः । इमे । शुचयः । यन्ति । वीतये ।
सोमासः । दधिऽआशिरः ॥ ५ ॥ ९ ॥

त्वं सुतस्य पीतये सद्यो वृद्धो अजायथाः ।
इन्द्र ज्यैष्ठ्याय सुक्रतो ॥ ६ ॥

त्वम् । सुतस्य । पीतये । सद्यः । वृद्धः । अजायथाः ।
इन्द्र । ज्यैष्ठ्याय । सुक्रतो इति सुऽक्रतो ॥ ६ ॥

आ त्वा विशन्त्वाशवः सोमास इन्द्र गिर्वणः ।
शं ते सन्तु प्रचेतसे ॥ ७ ॥

आ । त्वा । विशन्तु । आशवः । सोमासः । इन्द्र । गिर्वणः ।
शम् । ते । सन्तु । प्रऽचेतसे ॥ ७ ॥

---

भाषायाम्.

५. इमे शुचयो दध्याशिरः सुताः सोमाः सुतपाव्ने वीतये यन्ति ॥
६. हे सुक्रतो इन्द्र त्वं सुतस्य पीतये ज्यैष्ठ्याय [च] सद्यो वृद्धोऽजायथाः ॥
७. हे गिर्वण इन्द्र आशवः सोमास्त्वामाविशन्तु । प्रचेतसे तुभ्यं शं सन्तु ॥

---

थर्थी संशय दिसत नाहीं. 'कामा'='यो-गे'.— 'शंस्ती देओ'='राये [आ भुवत्]'. अक्षरशः 'तो आम्हास संप-त्तीसाठीं [म्ह. संपन्निमद] होओ.'— 'हविरन्न समर्पण करितांना'—'पुरं-ध्याम्.' या शब्दाचा अर्थ सायणाचार्य निश्चयानें करूं शकत नाहींत.

४. 'पिवळ्या घोड्यांच्या जोडीस' ='हरी'. इंद्र हा आपल्या रथास पिवळ्या घोड्यांची जोडी जोडीत असतो व ते घोडे अति चपळ आणि पराक्रमी आहेत असें वेदांत वर्णिलेलें आढळतें. त्या घोड्यांस 'शत्रु घेरीत नाहींत' म्हणजे शत्रूंच्यानें त्यांचा अतिक्रम अथवा पराजय होऊं शकत नाहीं.

५. हे पिळून काढलेले पवित्र [आणि] दधिमिश्रित सोमरस सोमपी [इंद्रा]नें प्राशन करावे म्हणून त्याजकडेस जात आहेत.

६. हे सुप्रज्ञ इंद्रा, तूं सोम पिण्यासाठीं आणि सकल देवांमध्यें प्रभुत्व भोगण्यासाठीं वाढलेलाच एकदम जन्मलास.

७. हे प्रियाव्हान इंद्रा, शीघ्रमादक सोमरस तुझ्या [पोटां]त शिरोत आणि तुज बुद्धिमंताला सुखकारक होओत.

5. These extracted Somas, pure and sweetened by curds, are going to the Soma-drinking Indra that he may drink them.

6. O Indra of excellent wisdom, thou wert at once born grown-up for drinking the extracted Soma and for enjoying superiority over the other gods.

7. Indra, who lovest to be invoked, let the quickly intoxicating Somas enter thy stomach and let them gratify thee who art wise.

---

५. 'सोमपी'='सुतपावन्.' म्हणजे सोम पिणारा. हें इंद्राचें नांव आहे. केवळ विशेषण नव्हे.—'जात आहेत.' उपासक सोमरसाचे प्याले इंद्रास अर्पण करून आपल्या समीर ठेवून म्हणतो आहे कीं, हे पाहा सोमरस इंद्राकडेस जात आहेत.

६. हा मंत्र कितीएक कारणामुळें लक्ष्यांत ठेवण्याजोगा आहे. एक तर 'क्रतु' शब्दाचा अर्थ बुद्धि किंवा प्रज्ञा होतो आणि शतक्रतु म्हणजे शंभर यज्ञ केलेला असा नव्हे तर शंभर प्रज्ञा ज्यास आहेत तो असें जें आम्हीं पूर्वीं सांगितलें आहे त्याचें पुष्टीकरण सुक्रतु या शब्दांत आहे. दुसरी ही गोष्ट कीं, सर्व देवांचा राजा जो इंद्र तो या मंत्राच्या कर्त्याच्या मताप्रमाणें अनादि नव्हे; परंतु जन्मलेला आहे. आणि तिसरें असें कीं, इंद्र जन्मला त्याचें सार्थक्य (या मंत्राच्या कर्त्याच्या समजुतीप्रमाणें) इतकेंच कीं त्याणें देवांचें आधिपत्य करून सर्वांच्या वांट्यापेक्षां मोठा सोमाचा वांटा प्यावा.—'वाढलेलाच'='वृद्धः.' म्हणजे इंद्र इतरांप्रमाणें जन्मतांच लहान नव्हता, मोठाच एकदम निपजला.

७. 'प्रियाव्हान'='गिर्वणः.' म्ह. लोकांनीं आपला धांवा अथवा स्तुति करावी अशी ज्याला आवड आहे तो. ऋषि इंद्रास सोमरस आवडोत म्हणून कसा आळवितो आहे ते लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे.

त्वां स्तोमा अवीवृधन्त्वामुक्था शतक्रतो ।
त्वां वर्धन्तु नो गिरः ॥ ८ ॥

त्वाम् । स्तोमाः । अवीवृधन् । त्वाम् । उक्था । शतक्रतो इति शत ऽक्रतो ।
त्वाम् । वर्धन्तु । नः । गिरः ॥ ८ ॥

अक्षितोतिः सनेदिमं वाजमिन्द्रः सहस्रिणम् ।
यस्मिन्विश्वानि पौंस्या ॥ ९ ॥

अक्षितऽऊतिः । सनेत् । इमम् । वाजम् । इन्द्रः । सहस्रिणम् ।
यस्मिन् । विश्वानि । पौंस्या ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

८. त्वा स्तोमा अवीवृधन् । हे शतक्रतो त्वामुक्थानि [ अवीवृधन् ] । त्वां नो गिरो वर्धयन्तु ॥

९. यस्मिन्विश्वानि पौंस्यानि [ स्युः ] इमम् (=एतादृशं ) सहस्रिणं वाजमक्षितोतिरिन्द्रः सनोतु ॥

८. हे बहुप्रज्ञ इंद्रा, तुला स्तोत्रांनीं, तुला स्तुतींनीं [ पूर्वीं ] वाढविलेलें आहे. तर तुला आमच्या स्तवनवाणी वाढवोत.

8. [Indra] of many wisdoms, thee have hymns magnified, thee the praises [of former poets]. May our praises [now] magnify thee.

९. अखंड आश्रय देणारा इंद्र आम्हांस अशी हजारपट शक्ति देवो कीं, जिजमध्यें सकल पराक्रम [ वास करीत ] असतील.

9. May Indra, who grants imperishable aid vouchsafe that thousand-fold strength unto us in which are contained all acts of valour.

---

८. 'बहुप्रज्ञ'='शतक्रतु'. वर सहाव्या मंत्रावरची टीप पाहा. या स्थळींहि सायणाचार्य बहुप्रज्ञ असा एकपक्षीं (दुसरे पक्षीं बहुकर्मा असा) अर्थ करितात. या मंत्रात कितीएक गोष्टी लक्ष्यांत ठेवण्याजोग्या आहेत. एक तर ही कीं, या ऋषीच्या समजुतीप्रमाणें इंद्राचें महत्त्व वाढलें तें उपासकांच्या स्तोत्रांनीं वाढलें आहे (आणि हें खरेंच आहे; कारण कीं, ज्ञानोबा, नामदेव आणि शेवटीं विशेषेंकरून तुकारामाच्या अभंगांनीं विठोबास 'वाढविलें' आहे हें कोण कबूल करणार नाहीं ?) दुसरें असें कीं, या ऋषीच्या म्हणण्याप्रमाणें हें जें सूक्त आहे तें अनादि नव्हे; कारण तें अनादि असते तर पूर्वी स्तोत्रांनीं वगैरे तूं वाढलास तसा आतां आमच्या स्तवनवाणींनीं तूं वाढ असें म्हणण्याचें अवश्य नव्हतें.

सायणाचार्य 'स्तोमाः' म्ह. साम गाणारांचीं स्तोत्रें आणि 'उक्था' म्ह. 'शस्त्राणि' असा नियत अर्थ करितात; पण तसें करण्याची आवश्यकता दिसत नाहीं.

९. 'अशी हजारपट शक्ति'-'इमं सहस्रिणं वाजम्.' इमं याचा अर्थ या ठिकाणीं किंचित् लक्ष्यांत ठेवण्याजोगा आहे. तो येथें दर्शक सर्वनामार्थी आहे, पुरुषवाचक सर्वनामार्थी नाहीं. 'ईदृशं' या अर्थी समजला पाहिजे. सहस्रिणम् हें शक्तीस जसें येथें विशेषण लाविलें आहे तसेंच ऋ. १. ३०. ८. यांत साहाय्य (ऊतिः) यास. ऋ. १.३१.१०.६ ८.१५,५.५४.१३ यांत संपत्ति (रायः) शब्दास आणि ऋ. ६.४५.३२ यांत देणगी (राति) यास लाविलेलें आहे. त्याचा अर्थ सायणाचार्य 'बहुत' असा करितात. तोच अर्थ प्रस्तुतस्थळीं 'हजारपट' या शब्दाचा समजावयाचा.

या मंत्रात इंद्राजवळ ऋषि काय मागतो याचा विचार आपण केला म्हणजे ऋषिजन देवांपेक्षांहि मोठे आणि ते विष्णूच्या वक्षःस्थळीं लाथ मारतील तर त्यापासून देवांचा देव विष्णु भूषण मानून घेईल या पौराणिक कथेची योग्यता समजून येईल. वेदांत ब्राह्मणांना देवांवर वर्चस्व बजावि-

मा नो मर्ता अभि द्रुहन्तनूनामिन्द्र गिर्वणः ।
ईशानो यवया वधम् ॥ १० ॥ १० ॥

मा । नः । मर्ताः । अभि । द्रुहन् । तनूनाम् । इन्द्र । गिर्वणः ।
ईशानः । यवय । वधम् ॥ १० ॥ १० ॥

## भाषायाम्.

१०. हे गिर्वण इन्द्र नस्तनूनां मर्ता मा अभिद्रुहन् । ईशानः [च त्वं] वधं यवय ॥

लेलें दृष्टीस पडत नाही. ऋषि हे देवांचे आपण उपासक आणि देव करितील तर आपलें कल्याण होईल अशीच सुबुद्धि बाळगीत होते.

या मंत्राचा अर्थ करितांना आम्हीं वाजम् आणि सनेत् यांचा अर्थ सायणांस सोडून केला आहे त्यास अनेक प्रमाणें आहेत आणि त्यांतून कित्येक खुद्द सायणाचार्यांच्या भाष्यांतीलच आहेत.

---

## सूक्तम् ६.

ऋषिर्विश्वामित्रपुत्रो मधुच्छन्दाः । देवता-१-३ इन्द्रः; ४.६.८.९ मरुतः;
५. ७ मरुत इन्द्रश्च; १० इन्द्रः । गायत्री छन्दः ॥

युञ्जन्ति ब्रध्नमरुषं चरन्तं परि तस्थुषः ।
रोचन्ते रोचना दिवि ॥ १ ॥

युञ्जन्ति । ब्रध्नम् । अरुषम् । चरन्तम् । परि । तस्थुषः ।
रोचन्ते । रोचना । दिवि ॥ १ ॥

## भाषायाम्.

१. परितस्थिवांसि चरन्तमरुषं ब्रध्नं युञ्जन्ति । दिवि रोचनानि रोचन्ते ॥

१०. हे प्रियाऽह्वान इंद्रा, आम्हांस मर्त्यजन उपद्रव न करोत. आमचा प्रभु असा जो तूं तो [ आपलें ] वज्र [ आम्हांवर ] पडूं देऊं नकोस.

10. Indra, who lovest to be invoked, may mortals never hurt us. Mayst thou the lord of our lives ward off thy thunderbolt [from us.]

१०. या मंत्रांत इतकीच प्रार्थना आहे कीं, हे इंद्रा आम्हांस मर्त्यजनापासून किंवा अमर्त्य जो आमचा प्रभु तूं त्यापासून उपद्रव न होओ.— 'प्रियाऽह्वान' वर सातव्या मंत्रावरची टीप पाहा.— 'आमचा प्रभु'=' तनूनामीशानः'. पदशः अर्थ तर शरीरांचा प्रभु असा आहे; पण 'तनु' हा शब्द 'आपण', 'आम्ही' जो बोलत आहे त्याचें शरीर म्हणजे स्वतः तोच, अशा अर्थी वेदांत वापरलेला आढळतो. ऋ. २. ९.२, १०.४.७ इत्यादि पाहा.— 'वज्र'=' वधम्'. सायणाचार्य वधशब्दाचा अर्थ येथें मरण असा करितात; पण वधशब्दाचा अर्थ वेदांत पुष्कळ ठिकाणीं मारणारा आणि विशेषेंकरून इंद्राचें वज्र असा होतो. याविषयीं ऋ. १. ५२. १५ यावरील सायणाचेंच भाष्य पाहा. त्या ठिकाणीं भृष्टिमता वधेन म्हणजे तीक्ष्ण धारेच्या वज्रानें असा त्यांनींच अर्थ केला आहे.

---

## सूक्त ६.

ऋषि, पूर्ववत्. देवता- १-३ इंद्र, ४-९ मरुत्, ५. ७ इंद्र आणि मरुत्, १० इंद्र. वृत्त, पूर्ववत्.

## Hymn 6.

Author, as before. To *Indra* (1-3), the *Maruts* (4-9), *Indra* and the *Maruts* (5.7), *Indra* (10). Metre, as before.

१. लाल घोडा चालतां चालतां त्यास जवळचे लोक रथास जोडीत आहेत. आकाशांत चांदण्या [ अजून ] चमकत आहेत.

1. The by-standers are harnessing the red horse, as he goes, to the chariot. The stars are still shining in the sky.

१. हें सूक्त बरेंच कठिण आहे. बराच त्याचा भाग रूपकयुक्त आहे त्यामुळें अर्थ स्पष्ट होऊं शकत नाहीं.— 'लाल घोडा' म्ह. सकाळींच आरक्त वर्णानें आच्छादित असून उगवणारा जो सूर्य तोच किंवा त्याचा घोडा; व तोच इंद्र असें सायणाचें भाष्य आहे. लाल हीचा मात्र अर्थ ते हिंसा न करणारा असा करितात.

युञ्जन्त्यस्य काम्या हरी विपक्षसा रथे।
शोणा धृष्णू नृवाहसा ॥ २ ॥
युञ्जन्ति । अस्य । काम्या । हरी इति । विऽपक्षसा । रथे ।
शोणा । धृष्णू इति । नृऽवाहसा ॥ २ ॥

केतुं कृण्वन्नकेतवे पेशो मर्या अपेशसे ।
समुषद्भिरजायथाः ॥ ३ ॥
केतुम् । कृण्वन् । अकेतवे । पेशः । मर्याः । अपेशसे ।
सम् । उषत्ऽभिः । अजायथाः ॥ ३ ॥

आदह स्वधामनु पुनर्गर्भत्वमेरिरे ।
दधाना नाम यज्ञियम् ॥ ४ ॥
आत् । अह । स्वधाम् । अनु । पुनः । गर्भऽत्वम् । आऽईरिरे ।
दधानाः । नाम । यज्ञियम् ॥ ४ ॥

## भाषायाम्.

२. विपक्षसौ शोणौ धृष्णू नृवाहसावस्य काम्यौ हरी रथे युञ्जन्ति ॥
३. हे [illegible]म्] अकेतवे केतुमपेशसे पेशः कृण्वन्नुषद्भिः [illegible]हाजायत ॥
४. अथानन्तरं यज्ञियं नाम दधाना [मरुतः] स्वधामनु पुनर्गर्भत्वमेरिरे ॥

मंत्राचें तो[illegible] असें दिसतें कीं, आका[illegible] अजून चांदण्या झिळमिळता-हेत इतक्यांत आरक्तवर्ण सूर्य रथास जोडलेल्या घोड्याप्रमाणें चालून येत आहे. हें प्रभातवर्णन आहे, व पुढच्या ऋचा सुद्धां तशाच अर्थाच्या समजल्या पाहिजेत.

केतु ग्रह अनिष्ट येतो तेव्हां व ग्रहणांत या मंत्राचा जप करतात आणि ग्रहमखांत या मंत्रानें केतूचें हवन करतात. परंतु यांत केतु या कल्पित ग्रहाचा कांहींच संबंध दिसत नाहीं.

२. ते याच्या दोन आवडत्या घोड्यांस रथाच्या प्रत्येक बाजूस जोडीत आहत. जे घोडे आरक्तवर्णाचे, चलाख [आणि] शूर [इंद्रा]स वाहून आणण्यास योग्य होत.

2. They are harnessing to his chariot, one on each side, his favourite pair of tawny horses, that are chesnut, fiery and able to carry their brave lord.

३. हे गड्यांनो, हा सूर्य अंधाराचे ठायीं उजेड आणि अरूपाचे ठायीं रूप उत्पन्न करीत करीत उषांबरोबर जन्मत असतो.

3. Causing light for darkness and form where there is no form this god is, ye men, born along with the dawns.

४. त्यानंतर लागलेच, पूज्य नाम धारण करणार [मरुद्देव] आपल्या परिपाटीप्रमाणे पुनः निपजतात.

4. Immediately after that those [Maruts] that bear a name that is worthy to be adored are born again according to their custom.

---

२. सकाळीं उगवणारा जो सूर्य तो इंद्र होय असें (सायणाचार्यप्रमाणे) समजून या मंत्राचा अर्थ केला पाहिजे.– 'याच्या'=' अस्य'. म्ह. इंद्राचे.

3. 'अंधाराचे ठायीं उजेड'= 'केतुमकेतवे.' 'अरूपाचे ठायीं रूप' =' अपेशसे पेशः'. ज्याला प्रकाश नाहीं त्याला प्रकाश आणि ज्याला रूप नाहीं त्याला रूप देणारा असाहि अर्थ (सायणाचार्यांनी केलेला) संभवतो.– 'गड्यांनो '=' मर्याः.' सूक्त म्हणणारा आपल्या जवळ असणाऱ्या लोकांस म्हणतो आहे.– 'जन्मत असतो'=' समजायथाः.' द्वितीयपुरुषीं आहे; पण संबोधन 'गड्यांनो' याचें असल्यामुळें तृतीयपुरुषीं अर्थ करावा लागला आहे.– उषांबरोबर' उषा म्हणजे प्रभात, पहाट, हीच कोणी एक देवता कल्पिली आहे ... अनेक आहेत असेंहि मानिले आहे, व वेदांत कितीएक सुंदर स्तोत्रें या देवतेच्या नावचीं आहेत. तीं पुढें येतीलच.

४. 'त्यानंतर लागलेच'= आत् अह.' म्हणजे सूर्यरूपी इंद्राचें जन्म झाल्याबरोबर. इंद्र निघतांच मरुत्‌हि निघतात असें तात्पर्य.– आपल्या परिपाटीप्रमाणें' =' स्वधामनु.' स्वधाशब्दाचा हा येथें केलेला अर्थ पुष्कळ दुसऱ्या मंत्रांत आढळतो. सायणाचार्य बहुतकरून अन्न अथवा उदक असा अर्थ करीत असतात.– 'पुनः निपजतात '= 'पुनर्गर्भत्वम् एरिरे' पुनः गर्भत्वाप्रत पावले, पुनः गर्भ झाले, पुनः जन्म घेते झाले. एरिरे हा पूर्ण भूतकाळ आहे.

वीळु चिदारुजत्नुभिर्गुहा चिदिन्द्र वह्निभिः ।
अविन्द उस्रिया अनु ॥ ५ ॥ ११ ॥

वीळु । चित् । आरुजत्नुऽभिः । गुहा । चित् । इन्द्र । वह्निऽभिः ।
अविन्दः । उस्रियाः । अनु ॥ ५ ॥ १२ ॥

देवयन्तो यथा मतिमच्छा विदद्वसुं गिरः ।
महामनूषत श्रुतम् ॥ ६ ॥

देवऽयन्तः । यथा । मतिम् । अच्छ । विदत्ऽवसुम् । गिरः ।
महाम् । अनूषत । श्रुतम् ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. हे इन्द्र दृढमपि भञ्जद्भिर्गुहायामपि वहद्भिरुस्रिया अन्वविन्दः ॥

६. देवयन्तो यथा मतिमच्छ गिरो विदद्वसुं महान्तं श्रुतमनूषत ॥

---

ह्याचा अर्थ वेदांत बहुतकरून रीति-वर्तमानकाळाप्रमाणें होत असतो. म्हणून गर्भत्वम् एरिरे ह्याचा अर्थ निपजत असतात असा करण्यांत आला आहे.

५. हे इंद्रा, कठिण [ पर्वतास ] सुद्धां फोडणारे, [ आणि ] गुहेमध्यें सुद्धां तुला वाट दाखवून नेणारे जे [ मरुत् ] त्यांच्या योगेंकरून तूं गाई शोधून काढिता झालास.

६. [ मग ] भाविक जे देवभक्त ते, द्रव्य मिळवून देणारा, मोठा, आणि प्रख्यात जो [ मरुद्गण ] त्याचीं स्तवनें, बुद्धिमंत [ इंद्रा ]चीं जशीं [ गाते झाले ] तशींच गाते झाले.

5. O Indra, by their aid who break asunder even the hard rock and who guide thee even into the cave, thou didst discover the cows.

6. [Then] pious men sang hymns in honour of the wealth-bestowing, great and renowned [host of Maruts] as they did in honour of the wise [ Indra.]

---

५. स्वर्गांतील गाई पणिनामक दैत्यांनीं हरण करून नेल्या आणि अति कठिण अशा पर्वतांतील अंधकारमय गुहेंत लपवून ठेविल्या. तो पर्वत फोडण्यास आणि गुहा हुडकून काढण्यास मरुतांनीं इंद्रास साहाय्य केलें त्यामुळें इंद्रानें त्या गाई सोडविल्या अशा कथेस अनुलक्षून वेदांत पुष्कळ सूक्तें व ऋचा आहेत. 'गाई शोधून काढिता झालास.' हें केवळ रूपक आहे. गाई म्ह. प्रकाश अथवा सूर्यकिरण, किंवा मेघोदक त्यांचा अंधकाररूपी अथवा मेघरूपी असुरानें अपहार केलेला असतो हें खरेंच व त्या गाई शोधून काढण्यास सूर्यरूपी इंद्राची अथवा मेघवृष्ट्युत्पादक वृष्टिशक्तिरूप इंद्राची व त्याचे स्नेही जे वायुरूप मरुत् त्यांची आवश्यकता नाहीं असें कोण म्हणूं शकेल?.

साधारण संस्कृतांत मरुत् शब्दाचा अर्थ साधारण देव असा समजतात; पण वेदांत तसा अर्थ होत नाहीं. तर, मरुत् म्हणजे त्या नांवाचे देवविशेष होत. ते मरुत् वायूच समजले पाहिजेत. त्यानाच रुद्र असेंहि म्हणतात. ते एकशें ऐंशीं ( ऋ. ८. ८५. ८ ) किंवा सत्तावीस आहेत ( ऋ. १. १३३. ६ ). त्यांच्या बापाचें नांव रुद्र आणि आईचें नांव पृश्नि. त्यास सिंधूचे पुत्र असेंहि म्हटलें आहे, तसेंच त्यास द्यूचे ( आकाशाचे ) पुत्र असेंहि म्हटलें आहे. मरुतांचा संबंध इंद्राशीं फार आहे. ते त्याचे स्नेही, साहाय्यकर्ते आणि त्याचें मोठेपण वाढविणारे होत. ते सोन्याचीं शस्त्रें व विजा धारण करितात. ते पावसाचा वर्षाव करितात. ते दिवसाला सुद्धां अंधकार उत्पन्न करितात, आणि पृथिवीवर जिकडे तिकडे पाऊस पाडितात आणि ऊष्मा नाहींसा करितात. ते पर्वत, पृथिवी आणि उभय भुवनें यांस कांपवितात. ते झाडें मोडून टाकितात. इत्यादि त्यांजविषयीं वेदांत सांगितलें आहे.

६. 'बुद्धिमंत' = 'मतिम्.'—[ मग ]

इन्द्रेण सं हि दृक्षसे संजग्मानो अबिभ्युषा ।
मन्दू समानवर्चसा ॥ ७ ॥

इन्द्रेण । सम् । हि । दृक्षसे । संऽजग्मानः । अबिभ्युषा ।
मन्दू इति । समानऽवर्चसा । ७ ॥

अनवद्यैरभिद्युभिर्मखः सहस्वदर्चति ।
गणैरिन्द्रस्य काम्यैः ॥ ८ ॥

अनवद्यैः । अभिद्युऽभिः । मखः । सहस्वत् । अर्चति ।
गणैः । इन्द्रस्य । काम्यैः ॥ ८ ॥

अतः परिज्मन्ना गहि दिवो वा रोचनादधि ।
समस्मिन्नृञ्जते गिरः ॥ ९ ॥

अतः । परिऽज्मन् । आ । गहि । दिवः । वा । रोचनात् । अधि ।
सम् । अस्मिन् । ऋञ्जते । गिरः ॥ ९ ॥

## भाषायाम्.

७. अबिभ्युषेन्द्रेण सह संजग्मानो दृश्यसे हि । मन्दू समानवर्चसौ ॥
८. [illegible]रभिद्युभिरिन्द्रस्य काम्यैर्गणैर्बलवद् [यथा तथा]अर्चति ॥
९. हे परिज्मन्नतो दिवो वा रोचनादध्यागच्छ । अस्मिन्गिरः समृञ्जते ॥

मह. इंद्रानें [illegible] शोधून काढतात. मंत्राचें तात्पर्य हें कीं, मरुतांच्या साहाय्यानें इंद्रानें गाईंचा शोध लावितात

देवभक्त जे ऋषि वगैरे त्यांनीं इंद्राची जशी स्तुति केली तशी मरुद्गणांचीहि केली.

७. कारण कीं, भ्याला नाहीं असा जो इंद्र त्यासह चाल करून जात असतांना [ हे मरुद्गणा ], तूं दृष्टीस पडलास. [ तूं आणि इंद्र असे ] उभयतां संतोष पावलेले [ आणि ] एकसारिखे तेजस्वी [ दिसलां.]

८. सुंदर [आणि] दिव्य जे इंद्राचे प्रिय गण त्यांसहवर्तमान [ हा ] यज्ञ मोठ्यानें [ इंद्राची ] स्तुति गात आहे.

९. हे भटकणाऱ्या मरुद्गणा, तूं तिकडून किंवा आकाशाच्या तेजस्वी प्रदेशांतून इकडे ये. या [तुझ्या येण्या ] विषयीं [ आमच्या ] वाणी उत्सुक आहेत.

7. For, host of Maruts, thou wert seen marching forth together with Indra who was not frightened: both were delighted and equally endowed with spirit.

8. With a loud voice and joined by the favourite attendants of Indra, who are blameless and divine, this sacrifice is singing [his praises.]

9. O wandering host, come hither whether from yonder or from the bright region of heaven. Our prayers are striving together for this (thy coming).

---

७. '[हे मरुद्गणा,] तूं.' मरुद्गण याचें वाचक पद वरील मंत्रांत जसें नाहीं तसें यांतहि नाहीं. तथापि तें अर्थावरून गम्यमान आहे हें सांगावयास नकोच. सायणाचार्यहि असाच अर्थ करितात.—'चाल करून जात असतांना' (='संजग्मानः'), अर्थात् शत्रूवर.—'भ्याला नाहीं असा.' इंद्र न भितां शत्रूवर चाल करून गेला असें तात्पर्य.

८. 'यज्ञ'='मखः.' म्ह. या यज्ञाचे संपादणारे ऋत्विज. भावार्थ असा दिसतो कीं, इंद्राचा जय झाला ही गोष्ट जसे आम्ही या यज्ञांत गात आहों, तसेच इंद्राचे प्रिय मित्र जे मरुद्गण तेहि गात आहेत. मरुद्गण गात आहेत ही मंत्रकर्ता कल्पना करीत आहे.

९. 'भटकणाऱ्या'='परिज्मन्.' म्ह. इकडे तिकडे फिरणाऱ्या. हें विशेषण पवनरूपी मरुद्देवास यथायोग्य लागलें आहे यांत संशय नाहीं.—'तिकडून'(='अतः') म्ह. अंतरिक्षांतून (पृथ्वी आणि आकाश यांच्यामध्यें असलेल्या प्रदेशांतून ), असें सायणाचार्य म्हणतात. परंतु या लोकांतून म्ह. पृथ्वीवरून असा अर्थ चांगला संभवतो.—'या [ तुझ्या येण्या ]विषयीं [ आमच्या ] वाणी उत्सुक आहेत'='सम् अस्मिन् ऋञ्जते गिरः.' याचा अर्थ सायण 'या [ कर्मा ] च्या ठायीं [ असलेला ऋत्विज् ] स्तोत्रें चांगल्या रीतीनें तयार करीत आहे' असा करितात. वस्तुतः 'ऋञ्जते' हें अनेकवचनी क्रियापद आहे आणि

इतो वा सातिमीमहे दिवो वा पार्थिवादधि ।
इन्द्रं महो वा रजसः ॥ १० ॥ १२ ॥

इतः । वा । सातिम् । ईमहे । दिवः । वा । पार्थिवात् । अधि ।
इन्द्रम् । महः । वा । रजसः ॥ १० ॥ १२ ॥

## भाषायाम्.

१० इतो वा दिवो वा पार्थिवादधि महतो वा रजस इन्द्रं सातिं याचामहे ॥

त्या शब्दाचा अर्थ ' प्रयत्न करीत आहेत ' असा आहे आणि त्याच भावार्थानें आम्हीं भाषांतर केलें आहे. तथापि अंत्य पादाचा अर्थ संदिग्ध आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

## सूक्तम् ७.

ऋषिर्विश्वामित्रपुत्रो मधुच्छन्दाः । इन्द्रो देवता । गायत्री च्छन्दः ॥

इन्द्रमिद्गाथिनो बृहदिन्द्रमर्केभिरर्किणः ।
इन्द्रं वाणीरनूषत ॥ १ ॥

इन्द्रम् । इत् । गाथिनः । बृहत् । इन्द्रम् । अर्केभिः । अर्किणः ।
इन्द्रम् । वाणीः । अनूषत ॥ १ ॥

## भाषायाम्.

१. इन्द्रमेव गाथिन इन्द्रम् [ एव ] अर्कैरर्किण इन्द्रम् [ एव ] वाण्यो बृहदनाविषुः ॥

१०. आम्ही इंद्राजवळ या आकाशांतून किंवा पृथिवींतून किंवा महान् अंतरिक्षांतून धन [देअस] प्रार्थितों.

10. We pray to Indra for riches either from this heaven or from the earth or from the spacious intermediate region.

१०. मंत्राचा भावार्थ असा कीं, आम्ही इंद्राजवळ धनदौलत मागतों. मग तो आम्हांस तीं स्वर्गांतून आणून देओ किंवा पृथ्वीवरून अथवा अंतरिक्षांतून आणून देओ. मूळांत जो 'अधि' शब्द आहे त्याचा अर्थ करून, पासून, आंतून असा केला पाहिजे.

---

## सूक्त ७.

ऋषि, पूर्ववत्. देवता, इंद्र. वृत्त, गायत्री.

१. इंद्राचीच स्तुति गायक लोक मोठ्यानें गात असतात; इंद्रालाच अर्कपाठक अर्कांनीं स्तवित असतात. इंद्रालाच फडानें गाणारे लोक स्तवित असतात.

## HYMN 7.

Author, as before. To *Indra*. Metre *Gâyatri*.

1. Indra alone is loudly celebrated by the singers; Indra alone is celebrated by hymn-singers with their hymns; Indra is celebrated by the choristers.

१. या मंत्रांत गायक तीन प्रकारचे सांगितलेले आहेत, गायक (गाथिनः), अर्कपाठक (अर्किणः) आणि फडानें गाणारे लोक (वाणीः). सायणाचार्यांच्या म्हणण्याप्रमाणें गाथिनः म्हणजे सामें अथवा सामवेदांतील मंत्र गाणारे ऋत्विज होत, अर्किणः म्हणजे ऋग्वेदांतील मंत्र म्हणणारे आणि वाणीः म्ह. इतर जे राहिलेले ऋत्विज त्यांणीं गाइलेले यजुर्वेदांतील मंत्रः कसें असलें तरी गाथिनः, अर्किणः आणि वाणीः हे निरनिराळ्या प्रकारचे गाणारे असावे असें दिसतें खरें. आणि अर्क हें एक प्रकारचें गायन असावें असें दिसतें.

या मंत्रांत इंद्राचें श्रेष्ठत्व वर्णण्याची कवीची इच्छा उघड दिसते. इंद्रालाच अनेक प्रकारचीं स्तोत्रें आणि गायनें गातात, इतर देवांस नाहींत असा भावार्थ आहे. पुढच्या मंत्रांत सुद्धां हाच झोंक आहे.

इन्द्र इद्धर्योः सचा संमिश्ल आ वचोयुजा ।
इन्द्रो वज्री हिरण्ययः ॥ २ ॥

इन्द्रः । इत् । हर्योः । सचा । संऽमिश्लः । आ । वचःऽयुजा ।
इन्द्रः । वज्री । हिरण्ययः ॥ २ ॥

इन्द्रो दीर्घाय चक्षस आ सूर्यं रोहयद्दिवि ।
वि गोभिरद्रिमैरयत् ॥ ३ ॥

इन्द्रः । दीर्घाय । चक्षसे । आ । सूर्यम् । रोहयत् । दिवि ।
वि । गोभिः । अद्रिम् । ऐरयत् ॥ ३ ॥

इन्द्र वाजेषु नोऽव सहस्रप्रधनेषु च ।
उग्र उग्राभिरूतिभिः ॥ ४ ॥

इन्द्र । वाजेषु । नः । अव । सहस्रऽप्रधनेषु । च ।
उग्रः । उग्राभिः । ऊतिऽभिः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

२. इन्द्र एव हर्योर्वचोयुजा [द्वयेन]साकं संमिश्रः [अस्ति] । इन्द्र [एव] वज्री । [इन्द्र एव] हिरण्ययः ॥

३. इन्द्रः सूर्यं दीर्घाय चक्षसे दिव्यारोहयत् । अद्रिं गोभिर्व्यैरयत् ॥

४. हे इन्द्र वाजेषु सहस्रप्रधनेषु च [उग्रस्] [त्वम्]उग्राभिरूतिभिरस्मानव ॥

२. इंद्रच पिंवळ्या घोड्यांची सांगतांच एकदम जुपली जाणारी जोडी वापरतो. इंद्रच वज्रधारी, [इंद्रच] सुवर्णमय [होय.]

2. Indra alone has the pair of tawny horses that harness themselves together at his command. Indra [alone] is the wielder of the thunderbolt, [Indra alone] bedecked with gold.

३. इंद्रच सूर्याला आकाशावर चढवून त्याला दूरपर्यंत पाहण्याची शक्ति देता झाला. [इंद्रच] गाईंसाठीं पर्वत फोडिता झाला.

3. It was Indra who seated the sun in heaven that it may see afar. It was Indra that broke the mountain for the cows.

४. हे इंद्रा युद्धांत आणि सहस्रवंशी समरांगणांत आम्हांस शक्तिमान् तूं आपल्या शक्तिमान् संरक्षणांनीं रक्षण कर.

4. O Indra, mayst thou mighty defend us in battles and in fights of a thousand duels with thy mighty protections.

२. 'इंद्रच' इ०. भावार्थ असा कीं, पिंवळ्या घोड्यांची जोडी कीं जीस आज्ञा होतांच आपल्या आपण जोडली जाते ती इंद्रालाच आहे. तशी जोडी दुसऱ्या देवांकडेस नाहीं. तसेंच दुसऱ्या देवांला वज्र नाहीं. आणि दुसऱ्या देवांला सुवर्णमयत्व नाहीं.

३. 'सूर्याला आकाशावर चढवून'. इ०. पदशः अर्थ असा कीं, 'इंद्रानें दूर दर्शना( म्हणजे दृष्टी )साठीं सूर्यास आकाशांत चढविलें', म्ह. सूर्य आकाशांत चढतो आणि दूर प्रदेशांवर आपली दृष्टि पोंहचवितो हा प्रताप इंद्राचा आहे.—'गाईंसाठीं पर्वत फोडिता झाला' (='वि गोभिः आद्रिं ऐरयत्') म्ह. पर्वत फोडून गाई बाहेर काढिता झाला. या ठिकाणीं गाई म्ह. उदकें आणि पर्वत म्ह. मेघ अथवा ढग. ढग फोडून उदकें खालीं पाडिता झाला असा भावार्थ. या रूपकाविषयीं ६ व्या सूक्ताच्या ५ व्या मंत्रावर पूर्वीं दिलेली टीप पाहा.

हें जें येथें व वेदांत दुसऱ्या अनेक ठिकाणीं उदकरूपी गाईंचें आणि मेघरूपी पर्वताचें रूपक आलें आहे तें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे. एक तर कारण असें कीं, त्यामुळें पुष्कळ मंत्र समजण्यास सोपे जातील; आणि दुसरें हें कीं, अर्वाचीन म्ह. वेदांच्या मागाहून झालेल्या पुराणादिक ग्रंथांत पर्वतांस पक्ष होते आणि ते इंद्रानें छेदिले, इंद्रानें पर्वतांचा उच्छेद केला, पर्वत सर्व आकाशभर फिरत होते आणि इंद्रास भिऊन कितीएक पर्वत समुद्रांत लपून राहिले इत्यादि कथा आहे, तिचें बीज या रूपकांत आहे, व या रूपकावरून या सर्व कथेचा विस्तार वाढविलेला आहे, असें दिसून येईल.

इन्द्रं॑ व॒यं म॑हाध॒न इन्द्र॒मर्भे॑ हवामहे ।

यु॒जं वृ॒त्रेषु॑ व॒ज्रिण॑म् ॥ ५ ॥ १३ ॥

इन्द्र॑म् । व॒यम् । म॒हा॒ऽध॒ने । इन्द्र॑म् । अर्भे॑ । ह॒वा॒म॒हे॒ ।

यु॒जम् । वृ॒त्रेषु॑ । व॒ज्रिण॑म् ॥ ५ ॥ १३ ॥

स नो॑ वृषन्न॒मुं च॒रुं सत्रा॑दाव॒न्नपा॑ वृधि ।

अ॒स्मभ्य॒मप्र॑तिष्कुतः ॥ ६ ॥

सः । नः॒ । वृ॒ष॒न् । अ॒मुम् । च॒रुम् । सत्रा॑ऽदाव॒न् । अप॑ । वृ॒धि॒ ।

अ॒स्मभ्य॑म् । अप्र॑तिऽस्कुतः ॥ ६ ॥

तु॒ञ्जेतु॑ञ्जे॒ य उत्त॑रे॒ स्तोमा॒ इन्द्र॑स्य व॒ज्रिणः॑ ।

न वि॑न्धे अस्य सुष्टु॒तिम् ॥ ७ ॥

तु॒ञ्जेऽतु॑ञ्जे । ये । उत्ऽत॑रे । स्तोमाः॑ । इन्द्र॑स्य । व॒ज्रिणः॑ ।

न । वि॒न्धे॒ । अ॒स्य । सु॒ऽस्तु॒तिम् ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

५. महाधने वयमिन्द्रं हवामहे । अर्भे [ च ] [ वयम् ] इन्द्रं [ हवामहे ] । वृत्रेषु [ वयं ] वज्रिणं युजं [ हवामहे ] ॥

६. स [ त्वं ] हे सत्रादावन्वृषन् अस्मभ्यममुं चरुमपावृणु । अस्मभ्यमप्रतिष्कुतो[ सि ] ॥

७. य उत्तरे तुञ्जे तुञ्जे (=उत्तरोत्तरे तुञ्जे) वज्रिण इन्द्रस्य स्तोमाः [ सन्ति ] [ ताम् ] अस्य [ स्तोमरूपां ] सुस्तुतिम् [ अहं ] न विन्धे ॥

---

४. ' सहस्रद्वंद्वी समरांगणात् '=' सहस्रप्रधनेषु.' ज्यांत हजारो द्वंद्वें लढत असतात अशा युद्धांत, अथवा ' ज्यांत हजारो लुटी सांपडतात अशा युद्धांत ' असाहि अर्थ होतो.

' उग्र उग्राभिरूतिभिः ' ह्या अंत्यपदांतील प्रास लक्ष्यांत ठेवावे. प्रासालंकाराची गोडी केवळ आधुनिक कवींसच आहे असें नाहीं.

५. इंद्रालाच आम्ही मोठ्या युद्धांत हाक मारितों [आणि] इंद्रालाच लहान युद्धांत हाक मारितों. [त्या आमच्या] वज्रधारी सहायासच शत्रूंशीं लढण्यास [आम्ही हाक मारितों.]

६. तर, हे वीर्यवान् शीघ्रदात्या, तूं आम्हांसाठीं हा मेघ फोडून उघड. [कां कीं] तूं आमचा निषेध करणारा नव्हेस.

७. एका संकटाहून दुसऱ्या संकटाच्या वेळीं पूर्वीपेक्षां उत्तम होतात अशा ज्या वज्रधारी इंद्राच्या स्तुती त्या याच्या उत्तम स्तुती मला करितां येत नाहींत असें नाहीं.

5. It is Indra we invoke in a great fight, it is Indra we invoke in a small fight. It is our ally the wielder of the thunderbolt [that we invoke] against our enemies.

6. Therefore do thou, O manly and quickly-generous [Indra], break open this cloud for us. [For] thou art never opposed to us

7. Whatever the hymns of Indra the wielder of the thunderbolt, that become more and more excellent in each succeeding danger, I am not without such excellent praises of him.

---

५. 'मोठ्या' इ०. युद्ध मोठें असो किंवा लहान असो त्यांत शत्रूंशीं लढण्यास आम्ही बोलावितों ते इंद्रालाच बोलावितों. वैदिक युगांत देवांचा उपयोग लोक काय समजत होते त्याचा हा एक चांगला मासला आहे.

६. 'तर...तूं'='स [त्वम्].' या प्रकारच्या प्रयोगाविषयीं पूर्वी लिहिलेंच आहे.—'हा मेघ,' "हा आम्हांसमोर दिसतो आहे हा", सायण.

७. हा मंत्र किंचित् कठिण आहे. आम्हीं केलेल्या भाषांतराचा भावार्थ हा आहे कीं, इंद्राच्या उपासकांवर जसजसे हल्ले होतात तसतशीं उत्तरोत्तर चांगलीं चांगलीं स्तोत्रें ते आपली मुक्ति त्या त्या संकटापासून व्हावी म्हणून करीत असतात. तर तसल्या 'उत्तम स्तुति ती मला करितां येत नाहीं' असें नाहीं.

या ऋचेंत दोन शब्द कठिण आहेत; एक 'तुञ्जेतुञ्जे' आणि दुसरा 'विन्धे'. सायणाचार्य 'तुञ्जेतुञ्जे' म्ह. 'ते ते जे फल देणारे दुसरे देव' असा आणि 'विन्धे' म्ह. 'मला मिळत नाहीं' (= न विन्दे) असा अर्थ करून सर्व मंत्राचा अर्थ "इतरे देवांच्या ज्या "उत्कृष्ट स्तुती त्या सर्व केल्या तरी "वज्रयुक्त इंद्राची योग्य स्तुति माझ्या- "नें होत नाहीं." असा करितात. यास्क 'तुञ्जेतुञ्जे' याचा 'त्या त्या दानीं' असा अर्थ करितात.

वस्तुतः 'विन्धे' हें क्रियापद प्र

वृषा यूथेव वंसगः कृष्टीरियर्त्योजसा ।
ईशानो अप्रतिष्कुतः ॥ ८ ॥

वृषा । यूथाऽइव । वंसगः । कृष्टीः । इयर्ति । ओजसा ।
ईशानः । अप्रतिऽस्कुतः ॥ ८ ॥

य एकश्चर्षणीनां वसूनामिरज्यति ।
इन्द्रः पञ्च क्षितीनाम् ॥ ९ ॥

यः । एकः । चर्षणीनाम् । वसूनाम् । इरज्यति ।
इन्द्रः । पञ्च । क्षितीनाम् ॥ ९ ॥

*इन्द्रं वो विश्वतस्परि हवामहे जनेभ्यः ।
अस्माकमस्तु केवलः ॥ १० ॥ १४ ॥ २ ॥

इन्द्रम् । वः । विश्वतः । परि । हवामहे । जनेभ्यः ।
अस्माकम् । अस्तु । केवलः ॥ १० ॥ १४ ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

८. वंसगो (=वृषभो) यूथानीवाप्रतिष्कुत ईशानो वृषा कृष्टीरोजसेयर्ति ॥

९. य [इन्द्रश्] चर्षणीनां वसूनां [च] एक इरज्यति (=ईष्टे) । [य] इन्द्रः पञ्च क्षितीनाम् [एक इरज्यति] ॥

१०. हे जना [वयं] विश्वतः [स्थलात्] परि युष्मभ्यमिन्द्रं हवामहे । [स] केवलोऽस्माकमस्तु ॥

---

विध् धातूपासून विधवा (विधवा शब्द वि आणि धव यापासून झालेला नाहीं. धव हाच विधवा यांतून 'वि' विषयीं चुकीच्या समजुतीनें काढिलेला आहे) आणि विधुर शब्द निघाले आहेत त्याचें रूप आहे. अर्थ, 'कशाच्या तरी हीन अथवा विरहित असणें.'

---

* गृहमखांत या मंत्राचा विनियोग इंद्राच्या आव्हानाकडे करितात.

८. जसा [एकादा] पोळ [गुराच्या] कळपांजवळ जातो तसा बलवान् [इंद्र] सर्वेश [आणि] अप्रतिहत् [होत्साता] [आपल्या] शक्तीसहित मनुष्यांकडे येतो.

8. Like a bull walking towards his herds the mighty [Indra] comes up with his power towards men, the lord unopposed.

९. कारण कीं, तो मनुष्यांचा [आणि] वस्तूंचा एकटा प्रभु होय; इंद्र पंचजनांचा [एकटा प्रभु होय].

9. For he is the sole ruler of men [and] of things: Indra [is the sole ruler] of the five tribes.

१०. तुम्हां [सकल] लोकांसाठीं आम्ही इंद्राला सर्व स्थलाहून बोलावितों. तो सगळा आमचाच होओ.

10. We call Indra from every quarter for you people. May he be wholly ours.

---

८. मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, जसा एकादा ज्वान पोळ गुरांच्या कळपाजवळ जातो आणि त्यास दुसरे पोळ हरकत (प्रतिहत) करूं शकत नाहीत व त्यामुळें तो सगळ्या पोळांचा राजा असल्याप्रमाणें चालतो तसा इंद्र आपल्या उपासकांजवळ त्यांची पूजा घेण्यास वगैरे येतो, तेव्हां त्यास कोणीहि हरकत करूं शकत नाहीत. तो आपलें बळ सगळें घेऊन येतो. वेदांत इंद्रास व इतर देवांस शक्तीविषयीं आणि सौंदर्याविषयीं पोळांची उपमा पुष्कळ ठिकाणीं दिलेली आहे.— 'पोळ,' 'वंसगः'. वंसग हा शब्द वेदांत पुष्कळ ठिकाणीं आला आहे. त्याचा अर्थ पोळ (अथवा बैल) असा होतो. सायणाचार्य पोळ "चांगल्या रीतीनें चालतो म्हणून त्याचें नांव 'वंसग'" असें पडलें आहे अशी व्युत्पत्ति करितात.

९. 'कारण कीं तो'- 'यः'. संबंधसर्वनामाचा असा अर्थ पुष्कळ ठिकाणीं करावा लागतो.— 'मनुष्यांचा,' 'चर्षणीनाम्.' चर्षणिशब्दाचा अर्थ चालणारा -जंगम असा कदाचित् होईल. आणि तसा घेतला तर चर्षणीनां म्हणजे 'जंगमांचा' असें भाषांतर करावें. परंतु सायणाचार्यांप्रमाणें आम्हीं केलेला अर्थ युक्त दिसतो.— 'पंचजनांचा.' आर्य लोकांचे पांच विभाग अथवा कुळें होतीं असें दिसतें. हे 'पंचजन' वेदांत पुष्कळ ठिकाणीं आढळतात; परंतु सायणाचार्य ब्राह्मणादि चार वर्ण आणि निषाद (म्ह. कोळी वगैरे रानटी लोक) हा पांचवा असे मिळून पांच वर्ण असें म्हणतात. असें म्हणण्यास अडचण

## सूक्तम् ८.

ऋषिर्विश्वामित्रपुत्रो मधुच्छन्दाः । इन्द्रो देवता । गायत्री च्छन्दः ॥

एन्द्र सानसिं रयिं सजित्वानं सदासहम् ।
वर्षिष्ठमूतये भर ॥ १ ॥

आ । इन्द्र । सानसिम् । रयिम् । सऽजित्वानम् । सदाऽसहम् ।
वर्षिष्ठम् । ऊतये । भर ॥ १ ॥

नि येन मुष्टिहत्यया नि वृत्रा रुणधामहै ।
त्वोतासो न्यर्वता ॥ २ ॥

नि । येन । मुष्टिऽहत्यया । नि । वृत्रा । रुणधामहै ।
त्वाऽऊतासः । नि । अर्वता ॥ २ ॥

इन्द्र त्वोतास आ वयं वज्रं घना ददीमहि ।
जयेम सं युधि स्पृधः ॥ ३ ॥

इन्द्र । त्वाऽऊतासः । आ । वयम् । वज्रम् । घना । ददीमहि ।
जयेम । सम् । युधि । स्पृधः ॥ ३ ॥

---

### भाषाग्राम्.

१. हे इन्द्र सानसिं सजित्वानं सदासहं वर्षिष्ठं [च] रयिम् [अस्माकम्] ऊतय आभर ॥

२. येन [रयिणा] वृत्राणि (=शत्रून्) मुष्टिहत्यया निरुणधामहै [वृत्राणि] नि [रुणधामहै] । त्वयोताः (=त्वया रक्षिता) [वयम्] अर्वता नि [रुणधामहै] ॥

३. हे इन्द्र त्वयोताः (=त्वया रक्षिता) वयं घनेन वज्रमाददीमहि । स्पृधो युधि संजयेम [च] ॥

---

इतकीच कीं, अति प्राचीन काळीं चार वर्णांचा भेद नव्हता तो मागाहून झाला असें समजण्यास कितीएक कारणें आहेत.

१०. 'तुम्हा सकल लोकांसाठीं'— 'यः जनेभ्यः.'— 'सर्वस्थलांहून', 'विश्वतः परि'.— 'तो सगळा आमचाच होओ' म्ह. त्याची सर्व कृपा आम्हांवरच होओ. तो दुसऱ्या उपासकाकडेस न जाओ.

## सूक्त ८.

ऋषि, मधुच्छंद. देवता, इंद्र. वृत्त, गायत्री.

१. हे इंद्रा, सुख देणारी, यशस्कर, सर्वकाळ स्थिर राहणारी [आणि] सर्वांत मोठी दौलत, [आम्हांस] आनंद होण्यासाठीं घेऊन ये.

२. ज्या [दौलती]च्या योगें करून आम्हीं तुवां रक्षित असे [आमच्या] मुष्टींनीं शत्रूंस मारून फडशा पाडूं, [किंवा] घोड्यावर बसून मारून फडशा पाडूं.

३. हे इंद्रा, आम्हीं [आपला] सोटा [हातीं] घतला म्हणजे तुवां रक्षिलेले असे जे त्या आम्हीं तुझें वज्रच धारण केल्याप्रमाणें होओ; [आणि] [आमच्या]. शत्रूंवर आम्हांस युद्धांत जय मिळो.

## HYMN 8.

To *Indra*. By *Madhuchchhandas*. Metre *Gáyatri*.

1. O Indra, bring [us] for [our] pleasure a blissful, victorious, everlasting [and] most powerful prosperity:

2. whereby we under thy auspices may crush down our enemies with our fists, crush down with our horses.

3. O Indra, may we armed with our club be, under thy auspices, armed [as if] with thy thunderbolt; may we vanquish our enemies in battle.

---

१. 'घेऊन ये' म्हणजे 'तूं ये आणि बरोबर ...... आण'.

२. 'मारून फडशा पाडूं', 'निरुणधामहै'.—'घोड्यावर बसून,' 'अर्वता.' अक्षरशः, घाड्यानें किंवा घोड्यावर बसलेल्या स्वाराच्या योगानें.

या मंत्रावरून इतकें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे कीं, वेदांचे ऋषि देवांपाशीं काय मागत होते आणि तें कशाकरितां मागत होते हें समजून येतें. आणि देवांवर त्यांची किती दृढ भक्ति होती हेंहि उघड दिसून येतें.

३. मंत्राचा भावार्थः—आम्ही सोटे हातीं घेऊन लढाईंत गेलों म्हणजे जणु काय तुझें वज्रच आम्हीं धारण केल्याप्रमाणें आम्हांस शक्ति येओ; कारण तूं आमचें संरक्षण करणार त्यापेक्षां आमच्या सोट्याच्या अंगीं तुझ्या वज्राची शक्ति सहज येईल.

या मंत्राच्या द्वितीयपादाचें भाषांतर जरा अक्षर सोडून करावें लागलें आहे. परंतु अर्थ स्पष्ट समजावा म्हणून तसें

वयं शूरेभिरस्तृभिरिन्द्र त्वया युजा वयम् ।
सासह्याम पृतन्यतः ॥ ४ ॥

वयम् । शूरेभिः । अस्तृऽभिः । इन्द्र । त्वया । युजा । वयम् ।
ससह्याम । पृतन्यतः ॥ ४ ॥

महाँ इन्द्रः परश्च नु महित्वमस्तु वज्रिणे ।
द्यौर्न प्रथिना शवः ॥ ५ ॥ १५ ॥

महान् । इन्द्रः । परः । च । नु । महिऽत्वम् । अस्तु । वज्रिणे ।
द्यौः । न । प्रथिना । शवः ॥ ५ ॥ १५ ॥

समोहे वा य आशत नरस्तोकस्य सनितौ ।
विप्रासो वा धियायवः ॥ ६ ॥

समऽओहे । वा । ये । आशत । नरः । तोकस्य । सनितौ ।
विप्रासः । वा । धियाऽयवः ॥ ६ ॥

## भाषायाम्.

४. हे इन्द्र वयं त्वया युजा (=सहायेन) [युक्ताः सन्तः] वयं शूरैरस्तृभिः [इव युक्ता भूत्वा] पृतन्यतः (=युयुत्सून् शत्रून्) सासह्याम ॥

५. इन्द्रो महान् [अस्ति] [महतो] पि च परस्ताद् [अस्ति] । वज्रिणे [इन्द्राय] महत्त्वमस्तु । [वज्रिणे] प्रथिम्ना द्यौरिव [प्रथितं] शवः (=बलम्) [अस्तु] ॥

६. विप्रा धियायवो (=भजका) नरा यथा समोहे तोकस्य सनितौ चाशत (इष्टमापुः),

करणें जरूर आहे.—'आपला सोटा हातां घेतला म्हणजे तुझें वज्र धारण केल्याप्रमाणे होओ'—'वज्रं घना आदद्महि.' पदशः अर्थः—'सोट्या[च्या रूपा]नें वज्र धरिल्यासें होओ.' 'घना' ही घनशब्दाची तृतीया आहे, व सायणाचार्यहि तसेंच म्हणतात.

४. हे इंद्रा, तुझें [एकट्याचें] साहाय्य मिळवून आम्ही [ जणुं काय ] [ अनेक ] शूर योद्ध्यांच्याच योगानें [आमच्या] लढवोर शत्रूंस जिंकून टाकूं असें कर.

५. इंद्र मोठा आणि [मोठ्यापेक्षां ]हि अधिक [ आहे ]. वज्रधारी [ इंद्रा ]च्या अंगीं मोठेपण राहो, [ आणि ] आकाशाप्रमाणें [ त्याचें ] बल विस्तीर्ण [ असो. ]

६. युद्धाविषयीं आणि अपत्यप्राप्तीविषयीं स्तुतिगायक व भाविक पुरुषांची जशी मनकामना पूर्ण होते; [ आणि ],

4. O Indra, may we with thee for our ally, may we completely conquer our enemies, [as if] with the aid of [many] heroes armed with slings.

5. Great is Indra and yet more [than great]. May he possess greatness. May his power be as extensive as heaven.

6. As wise and pious men attain their wishes in battle and as regards the obtaining of progeny; [and]

४. मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, जर एकट्या इंद्राचें साहाय्य मिळेल तर अनेक योद्ध्यांची मदत मिळाल्यासारखी होईल, तर हे इंद्रा, तशा तुझ्या साहाय्यानें आम्ही शत्रूंचें निर्दलन करून टाकूं असें कर.

'योद्ध्यांच्या योगानें'—'अस्तृभिः.' अक्षरशः अर्थ, 'गोफणीनें लढणाऱ्या योद्ध्यांच्या योगानें.'

५. 'अधिक'='परः'. परः या शब्दाचा अर्थ सायणाचार्य 'परम', 'श्रेष्ठ' असा करितात. परंतु श्रेष्ठ या अर्थाचा जो परशब्द तो आद्युदात्त ( परः ) असतो आणि परस् शब्द अव्यय असून अंतोदात्त ( पुरः ) आहे. त्याचा अर्थ 'पुढें', 'वर', ( परस्तात् ) 'अधिक' असा होतो. ऋ ५. ३०.५. यांत सायणाचार्यांनीच 'वर' असा अर्थ केला आहे तो पाहा.—'विस्तीर्ण'—'प्रथिना.' प्रथिना हें प्रथिमन् शब्दाची तृतीया असल्याप्रमाणें रूप दिसतें. प्रत्यक्ष अर्थ: 'प्रसृतपणानें त्याचें बल आकाशाप्रमाणें असो.'

६. या ऋचेपासून शेवटपर्यंत हें सूक्त कांहींसें कठिण आहे, आणि तो कठिणपणा शब्दार्थावरून झालेला नाहीं; परंतु अन्वयार्थावरून झालेला आहे. आम्ही ६ व्या ऋचेपासून तो १० व्या ऋचेपर्यंत एक अन्वय घेतला आहे. या पांच मंत्रांचें तात्पर्य असें आहे कीं, इंद्राची स्तुति गाणारे आणि इंद्राचें ध्यान करणारे जन जसे युद्धांत जय पावतात व संततिसंपन्न होतात ( ६ ), आणि इंद्राचें पोट उपासकांनीं दिलेला पुष्कळ सोम पिऊन, समुद्राप्रमाणें भरपूर होऊन आणि त्या सोमानें इंद्राचें तोंड

यः कुक्षिः सोमपातमः समुद्र इव पिन्वते ।
उर्वीरापो न काकुदः ॥ ७ ॥

यः । कुक्षिः । सोमऽपातमः । समुद्रःऽइव । पिन्वते ।
उर्वीः । आपः । न । काकुदः ॥ ७ ॥

एवा ह्यस्य सूनृता विरप्शी गोमती मही ।
पक्का शाखा न दाशुषे ॥ ८ ॥

एव । हि । अस्य । सूनृता । विऽरप्शी । गोऽमती । मही ।
पक्का । शाखा । न । दाशुषे ॥ ८ ॥

एवा हि ते विभूतय ऊतय इन्द्र मावते ।
सद्यश्चित्सन्ति दाशुषे ॥ ९ ॥

एव । हि । ते । विऽभूतयः । ऊतयः । इन्द्र । माऽवते ।
सद्यः । चित् । सन्ति । दाशुषे ॥ ९ ॥

## भाषायाम्.

७. सोमपातम [ इन्द्रस्य ] कुक्षिः समुद्र इव यथा पिन्वते काकुदश् [ च ] यथोर्व्यो (=विस्तीर्णा) आप इव सन्ति,

८. एवं ह्यस्य विरप्शी (=विपुला) गोमती महती सूनृता(=संपद्) दाशुषे पक्वा शाखेव [ भवति ],

९. एवं हि [ च ] हे इन्द्र तव विभूतयो (=विपुला) ऊतयो मादृशे दाशुषे सद्यश्चित्सन्ति,

एकाद्या तलावाप्रमाणें भरून वाऊन इंद्रास जसा मोठा आनंद होतो ( ७ ), त्याप्रमाणें इंद्र हविर्दात्यास जी देणगी देतो ती विपुळ, गाईनीं युक्त, आणि मोठी असते, आणि पिकलेल्या फळांनीं भरलेल्या वृक्षशाखेसारिखी आनंदकारक होते (८), आणि त्याप्रमाणेंच मज-सारिख्या हविर्दात्यालाहि इंद्र विपुळ सुखें एकदम प्राप्त करून देतो ( ९ ), आणि या सर्व कारणासाठीं आम्ही इंद्राचें स्तोत्र व चरित्र गाऊंया म्हणजे तो आमचें स्तोत्र ऐकून धावत येईल आणि हा जो आम्ही सोम तयार केला आहे तो पिऊन जाईल ( १० ).

'मनकामना पूर्ण होते'. 'आशत.' याचा पदशः अर्थ 'प्राप्त झाले', 'पावले' अर्थात इच्छेप्रत.

७. अतिशय सोम पिणारें [इंद्राचें] पोट समुद्राप्रमाणें जसें भरतें, [आणि] पाण्याच्या आशयासारिखें जसें [इंद्रा]चें तोंड [सोमा]नें भरलेलें [दिसतें],

८. तशीच त्याची विपुल, [व] गोसंपन्न, मोठी देणगी उपासकाला पक्व फळांनीं भरलेल्या वृक्षशाखेप्रमाणें [होत असते]; [आणि]

९. तसेच, हे इंद्रा, तुझे विपुल प्रसाद मजसारिख्या उपासकासाठीं तत्काळ सिद्ध असतात; [आणि]

7. as Indra's belly that drinks the largest quantity of Soma becomes swollen like the ocean, and as the cavity of his palate is as full with [Soma] as a collection of water;

8. so his bounteous gift, great and rich in cows is to the worshipper like a branch of a tree, laden with ripe fruit; [and]

9. so too, Indra, thy magnificent favours are at once ready for a worshipper like me; [and]

---

७. 'तोंड'='काकुदः'. हें काकुद् याचें अनेकवचन आहे. काकुद् हें जरी एकवचन येथें असावें, तरी 'आपः' हें अनेकवचन असल्यामुळें त्याच्या आकर्षण संबंधानें 'काकुदः' हेंहि अनेकवचन झालें.

८. 'देणगी'='सूनृता.' 'वृक्षशाखेप्रमाणें.' येथें जसें पक्व हें शाखेस विशेषण लाविलें आहे तसें ऋ. १.८७.५.३ यांत याच अर्थी वृक्षास लाविलें आहे तें पाहा.

एवा ह्यस्य काम्या स्तोम उक्थं च शंस्या ।
इन्द्राय सोमपीतये ॥ १० ॥ १६ ॥

एव । हि । अस्य । काम्या । स्तोमः । उक्थम् । च । शंस्या ।
इन्द्राय । सोमऽपीतये ॥ १० ॥ १६ ॥

## भाषायाम्.

१०. एवं हि [च] अस्य काम्यौ स्तोम उक्थं च [इत्येतौ] इन्द्राय सोमपीतये शंस्यौ [स्तः] ॥

---

## सूक्तम् ९.

ऋषिर्विश्वामित्रपुत्रो मधुच्छन्दाः । इन्द्रो देवता । गायत्री छन्दः ॥

इन्द्रेहि मत्स्यन्धसो विश्वेभिः सोमपर्वभिः ।
महाँ अभिष्टिरोजसा ॥ १ ॥

इन्द्र । आ । इहि । मत्सि । अन्धसः । विश्वेभिः । सोमपर्वऽभिः ।
महान् । अभिष्टिः । ओजसा ॥ १ ॥

एमेनं सृजता सुते मन्दिमिन्द्राय मन्दिने ।
चक्रिं विश्वानि चक्रये ॥ २ ॥

आ । ईम् । एनम् । सृजत । सुते । मन्दिम् । इन्द्राय । मन्दिने ।
चक्रिम् । विश्वानि । चक्रये ॥ २ ॥

## भाषायाम्.

१. हे इन्द्र [त्वम्] ओजसा आयाहि । महानभिष्टिः(=सहायम्) [त्वं] विश्वैः सोमपर्वभिरन्धसा माद्य (=हृष्टो भव) ॥

२. [सोमे] सुते [सति] एनं मन्दि [सोमं] मन्दिन इन्द्रायासृजत । विश्वानि [वस्तूनि] चक्रये (=कृतवते) चक्रिं [सोममासृजत] ॥

१०. तसेंच इंद्रास आवडणारें स्तोत्र आणि चरित्र हीं गावीं, कीं जेणेंकरून, इंद्र येऊन सोम पिईल.

10. so too Indra's favourite praise and song should be chanted, that he may come and drink the Soma.

१०. कीं 'जेणेंकरून इंद्र येऊन सोम पिईल'—'इंद्राय सोमपीतये'='इंद्राय सोमं पातुम्'-यथा इंद्रः सोमं पिबेत्! सोमपीतये हें तुमर्थ अव्यय आहे इंद्राय सोमपीतये याचा पदशः अर्थ 'इंद्राला सोम पिण्यासाठीं'.

---

## सूक्त ९.

ऋषि, मधुच्छंद. देवता, इंद्र. वृत्त, गायत्री.

## HYMN 9

To *Indra*. By *Madhuchchhandas*. Metre *Gayatri*.

१. हे इंद्रा, [तूं] येथें ये. मोठा साहाय्यकारी [असा तूं आपल्या] तेजासहित [येऊन] सकल सोमयज्ञांच्या प्रसंगीं हवि घेऊन तृप्त हो.

1. Come hither, Indra, with thy might. Do thou great helper regale thyself with the oblation at all the Soma-sacrifices.

२. सोमरस काढून तयार होतांच आनंदी इंद्रास तो आनंदकारक [सोम] अर्पण करा. सकल वस्तु उत्पन्न करणाऱ्या [इंद्रा]ला [सकल गोष्टी] सिद्ध करून देणारा [सोम अर्पण करा].

2. The Soma being extracted, pour out the exhilarating Soma to joyful Indra, the efficacious [Soma] to the Maker of all things.

१. 'साहाय्यकारी' म्ह. युद्धांत शत्रूचा पराजय करण्याच्या कामीं मदत करणारा.—'सकल सोमयज्ञाच्या प्रसंगीं,' 'विश्वेभिः सोमपर्वभिः.' पर्व म्हणजे प्रसंग, यज्ञकाळ. सोमपर्व म्हणजे ज्या प्रसंगीं सोम अर्पण केला जातो असा यज्ञप्रसंग.—'हवि घेऊन तृप्त हो.' 'अन्धसो मत्सि' याचा अर्थ पदशः 'अन्नानें तृप्त हो.'

२. 'आनंदी इंद्रास' म्ह. सोम पिण्याविषयीं आनंद ज्याला झाला आहे अशाला.—'आनंदकारक सोम' सोमपान केल्यानें माद (अंमल) येऊन हर्ष होतो म्हणून त्यास आनंदकारक असें

मत्स्वा सुशिप्र मन्दिभिः स्तोमेभिर्विश्वचर्षणे ।
सचैषु सवनेष्वा ॥ ३ ॥

मत्स्व । सुऽशिप्र । मन्दिऽभिः । स्तोमेभिः । विश्वऽचर्षणे ।
सचा । एषु । सवनेषु । आ ॥ ३ ॥

असृग्रमिन्द्र ते गिरः प्रति त्वामुदहासत ।
अजोषा वृषभं पतिम् ॥ ४ ॥

असृग्रम् । इन्द्र । ते । गिरः । प्रति । त्वाम् । उत् । अहासत ।
अजोषाः । वृषभम् । पतिम् ॥ ४ ॥

सं चोदय चित्रमर्वाग्राध इन्द्र वरेण्यम् ।
असदित्ते विभु प्रभु ॥ ५ ॥ १७ ॥

सम् । चोदय । चित्रम् । अर्वाक् । राधः । इन्द्र । वरेण्यम् ।
असत् । इत् । ते । विऽभु । प्रऽभु ॥ ५ ॥ १७ ॥

---

## भाषायाम्.

३. हे सुशिप्र विश्वचर्षणे एषु सवनेष्वा स्तोमैः माकं मन्दिभिः [ सोमैः ] माद्य ॥

४. हे इन्द्र [एतास्] तव गिरः [अहम्] असृजम् । [तास्] त्वां प्रत्युदहासत (उद्गत्य प्राप्नुवन्) । अजोषा वृषभं पतिम् [ उदहासत ] ॥

५. हे इन्द्र चित्रं वरेण्यं राधोऽर्वाक् संचोदय । तुभ्यं [हि] विभु प्रभु [राधः] स्यादेव ॥

---

म्हटलें आहे.—'[ सकल गोष्टी ] सिद्ध करून देणारा'='चक्रिम्.' याचा अक्षरशः अर्थ, 'करणारा'='कार्यकारी' = कार्यसिद्धि करणारा. कारण कीं, सोम पिऊन देव उपासकांचीं कार्ये करितात म्हणून.

३. हे सुमुख [ इंद्रा ], हे सगळ्यांकडेस जाणाऱ्या [ इंद्रा ], तूं [ ह्या ] हर्षकारक सोमरसांनीं [ आणि ] स्तोत्रांनीं या यज्ञांत हर्ष पाव.

४. हे इंद्रा, मीं तुझ्या ह्या स्तुती गाइल्या आहेत. त्या उत्सुक [ होऊन ] वीर्यवंता तुज पतीप्रत वर गेल्या आहेत.

५. हे इंद्रा, सुंदर [ आणि ] श्रेष्ठ संपत्ति इकडे पाठवून दे. [ कारण कीं ] विस्तीर्ण [ आणि ] मोठी [ संपत्ति ] तुझ्याजवळ असेलच [ यांत संशय नाहीं ].

3. [Indra,] possessed of good lips, O thou who goest to all men, regale thyself with the exhilarating Somas and with the praises, in these sacrifices.

4. These praises, Indra, I have sung in honour of thee. Eager they have gone up to thee their manly husband.

5. Indra, send hither beautiful [and] choice wealth. [For] doubtless there must be with thee extensive and powerful wealth.

---

३. 'सुमुख,' हा अर्थ आम्हीं 'सुशिप्र' या शब्दाचा केला आहे. सायणाचार्य येथें सुशिप्र म्हणजे चांगली हनवटी ज्याची अथवा चांगलें नाक ज्याचें असा अनिश्चित अर्थ करितात. आम्हीं दिलेल्या अर्थाचें तात्पर्य असें कीं, 'ज्याचे ओठ चांगले आहेत तो.' याला आधार इतका आहे कीं, जेथें जेथें हा शब्द येतो तेथें तेथें बहुत करून सोमपानाच्या संबंधाच्या भाषणांत आलेला आहे. 'सोम पिण्याविषयीं ज्याचें तोंड कुशल आहे' असा भावार्थ.—'सगळ्यांकडेस जाणाऱ्या', 'विश्वचर्षणे.' म्ह. जो सगळ्यांची पूजा ग्रहण करण्याकरितां जिकडे तिकडे जातो तो.—'या यज्ञांत', 'एषु सवनेषु आ.' म्हणजे सोम पिळून काढून ( सवन ) तुला ज्यांत अर्पण करीत आहों अशा पूजेच्या प्रसंगीं.

४. या ऋचेंत स्तुतीस पतीकडेस जाणाऱ्या स्त्रियांची उपमा विवक्षित आहे.—'उत्सुक [ होऊन ]', 'अजोषाः'. अजोषाः हें स्त्रीलिंगी अनेकवचन होय; 'गिरः' याचें विशेषण. जोष म्हणजे तृप्ति नाहीं ज्यांस त्या अजोषाः. परंतु सायणाचार्य क्रियापद समजतात आणि 'तादृशीर्गिरः' हें कर्म अध्याहृत घेतात, व अजोषाः याच्या पुढें असलेल्या 'वृषभं पतिम्' या शब्दांचा संबंध पूर्ववाक्याशीं लावितात. जोष ( म्हणजे तृप्ति ) हा शब्द वेदांत पुष्कळ ठिकाणीं आला आहे. ऋ. १. १२०. १ वगैरे पाहा.

५. 'असेलच [ यांत संशय नाहीं ]'—'असत् इत्.' असत् हें लेट्चें रूप आहे याचा अर्थ असावी, असली पाहिजे असा होतो.

अस्मान्त्सु तत्र चोदयेन्द्र राये रभस्वतः ।
तुविद्युम्न यशस्वतः ॥ ६ ॥

अस्मान् । सु । तत्र । चोदय । इन्द्र । राये । रभस्वतः ।
तुविऽद्युम्न । यशस्वतः ॥ ६ ॥

सं गोमदिन्द्र वाजवदस्मे पृथु श्रवो बृहत् ।
विश्वायुर्धेह्यक्षितम् ॥ ७ ॥

सम् । गोऽमत् । इन्द्र । वाजऽवत् । अस्मे इति । पृथु । श्रवः । बृहत् ।
विश्वऽआयुः । धेहि । अक्षितम् ॥ ७ ॥

अस्मे धेहि श्रवो बृहद्द्युम्नं सहस्रसातमम् ।
इन्द्र ता रथिनीरिषः ॥ ८ ॥

अस्मे इति । धेहि । श्रवः । बृहत् । द्युम्नम् । सहस्रऽसातमम् ।
इन्द्र । ताः । रथिनीः । इषः ॥ ८ ॥

वसोरिन्द्रं वसुपतिं गीर्भिर्गृणन्त ऋग्मियम् ।
होम गन्तारमूतये ॥ ९ ॥

वसोः । इन्द्रम् । वसुऽपतिम् । गीःऽभिः । गृणन्तः । ऋग्मियम् ।
होम । गन्तारम् । ऊतये ॥ ९ ॥

---

भाषायाम्.

६. तस्माद् हे तुविद्युम्न इन्द्र अस्मान्रभस्वतो यशस्वतश्[च] राये सम्यक्चोदय ॥

७. हे इन्द्र विश्वायुस् [त्वम्] अस्मभ्यं गोमद्वाजवत्पृथु बृहदक्षितं [च] श्रवः संदेहि ॥

८. हे इन्द्र अस्मभ्यं बृहच्छ्रवः सहस्रदातृतमं द्युम्नं ता रथिनीरिषश् [च] देहि ॥

९. वसोर्वसुपतिं ऋग्मियमूतये गन्तारमिन्द्रं गीर्भिर्गृणन्तो [वयं] ह्वयाम ॥

६. त्यापेक्षां हे महातेजस्वी इंद्रा, आम्हाला संपत्ति मिळविण्याविषयीं अशी प्रेरणा कर कीं, जेणेंकरून आम्हांस आवेश येऊन आम्ही यशस्वी होऊं.

६. Inspirit us, then, Indra of mighty splendor, to the attainment of wealth, so that we may be energetic and glorious.

७. हे इंद्रा, सकलांचा जीव असा जो तूं तो आम्हांस गोसंपन्न, अश्वसंपन्न, विस्तीर्ण, मोठें [आणि] अक्षय असें भाग्य दे.

7. Give us thou, Indra, who art the life of all, wealth that shall have cows and horses, that shall be extensive and great, and shall be inexhaustible.

८. मोठी कीर्ति, [ आणि ] सहस्रावधि लाभांनीं भरलेला अधिकार आम्हांस दे; हे इंद्रा, तूं गाडे भरून धान्य [ देत असतोस ] तें [ आम्हांस दे ].

8. Give us great fame [and] power coupled with thousands of benefits, [and], Indra, those cartfuls of corn [that thou bestowest].

९. संपत्तीचा स्वामी, स्तवनीय, [आणि] संरक्षण करण्यासाठीं [उपासकांप्रत] येणारा जो इंद्र त्याला स्तुतींनीं गाऊन आम्ही बोलावितों.

9. Praising with songs we invoke Indra, the lord of riches, who deserves to be praised [and] who goes to protect [his worshipper].

---

६. 'त्यापेक्षां'='तत्र'. ज्यापेक्षां 'विस्तीर्ण [ आणि ] मोठी संपत्ति तुझ्या जवळ असेलच [ यांत संशय नाहीं ]' त्यापेक्षां.

मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, आम्हांस चांगली संपत्ति दे म्हणजे आमच्या अंगीं उत्साह उत्पन्न होऊन आम्ही यशस्वी होऊं. अर्थ स्पष्ट समजावा म्हणून या मंत्राचें भाषांतर किंचित् विस्तरतः केलें आहे.

७. 'अश्वसंपन्न'='वाजवत्'. वाज-शब्दाचा अर्थ अश्व असाहि होतो. आणि खुद्द सायणाचार्यांनीच ऋ. ५.८४.२ आणि ३.३०.११ या मंत्रावरील भाष्यांत हाच अर्थ केला आहे. असें असतां येथें वाज म्हणजे अन्न असाच ते अर्थ करितात !

८. 'सहस्रावधिलाभांनीं भरलेला अधिकार'. 'सहस्रसातमं द्युम्नम्' याचा 'पदशः' अर्थ, 'पुष्कळ हजार फायदे ज्यापासून मिळतात तो अधिकार.'

९. 'संपत्तीचा स्वामी'='वसोः वसु-

**सुतेसुते न्योकसे बृहद्बृहत एदरिः ।**
**इन्द्राय शूषमर्चति ॥ १० ॥ १८ ॥**

सुतेऽसुते । निऽओकसे । बृहत् । बृहते । आ । इत् । अरिः ।
इन्द्राय । शूषम् । अर्चति ॥ १० ॥ १८ ॥

### भाषायाम्.

१०. अरिः(=उपासकः) सुतेसुते न्योकसे बृहते इन्द्राय बृहच्छूषमर्चति । अर्चगेव [ च स्तुयति ] ॥

पतिः'. वसुपतिः इतक्यावरूनच जरी 'संपत्तीचा स्वामी' असा अर्थ झाला असता तरी 'वसोः वसुपतिः' आणि 'वसूनां वसुपतिः' असे प्रयोग वेदांत पुष्कळ आढळतात. ऋ. ३. ३०.१९; ४.१७.६; ३.३६.९. इत्यादि मंत्रांत पाहा. सायणाचार्यहि त्या ठिकाणीं 'वसूनां वसुपतिः' याचा संबंध एकत्र घेतात.

---

## सूक्तम् १०.

ऋषिर्विश्वामित्रपुत्रो मधुच्छन्दाः । इन्द्रो देवता । अनुष्टुप् छन्दः ॥

***गायन्ति त्वा गायत्रिणोऽर्चन्त्यर्कमर्किणः ।**
**ब्रह्माणस्त्वा शतक्रत उद्वंशमिव येमिरे ॥ १ ॥**

गायन्ति । त्वा । गायत्रिणः । अर्चन्ति । अर्कम् । अर्किणः ।
ब्रह्माणः । त्वा । शतक्रतो इति शतऽक्रतो । उत् । वंशम्ऽइव । येमिरे ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. हे शतक्रतो त्वा गायत्रिणो गायन्ति । [ तुभ्यम् ]अर्किणोऽर्कमर्चन्ति । ब्रह्माणस्त्वां वंशमिवोद्येमिरे ॥

* या मंत्राचा विनियोग उदकशांतीत जपार्थ आहे. पण अर्थावरून पाहतां या मंत्राचा संबंध उदकशांतीकडे कार्य आहे त्याचा विचार थोडक्यांतच होतो.

१०. जेथें जेथें सोम असेल तेथें तेथें सुख पावणारा जो महान् इंद्र, त्याला उपासक मोठें स्तोत्र गातो, [आणि] आपणाकडेसच [बोलावितो].

10. The eager worshipper sings a great song for and invites to himself the great Indra who tarries to regale himself in every place where Soma is offered.

१०. 'जेथें जेथें सोम असेल तेथें तेथें सुख पावणारा...त्याला'='सुते सुते न्योकसे'. अक्षरशः 'प्रत्येक सोमाच्या ठायीं रमणाऱ्याला', म्हणजे जेथें जेथें सोमरस काढून उपासक इंद्रास अर्पण करितात तेथें तेथें राहून तृप्ति पावणारा जो इंद्र त्याला.—'स्तोत्र गातो' =' शूषमर्चति.' सायणाचार्य 'इंद्राय शूषमर्चति' याचा अर्थ "इंद्राला बल वर्णितो म्हणजे इंद्राचा पराक्रम वर्णितो" असा करितात. परंतु 'इंद्राय' ही चतुर्थी षष्ठ्यर्थी घेववत नाहीं. आणि घेणें अवश्यहि नाहीं. कारण कीं 'शूष' याचा अर्थ स्तोत्र असा होतो. आणि "इमं महे विदथ्याय शूषं शश्वत्कृत्व ईड्याय प्रजभ्रुः" (ऋ. ३.५४.१) यांत आणि "कुत्सा एते हर्यश्वाय शूषम् इ०" (ऋ. ७.२५.५) यांत खुद्द सायणाचार्यांनींच तसा अर्थ केला आहे. व इतर पुष्कळ मंत्रांत शूष म्हणजे स्तोत्र असा अर्थ होतो. ऋ. १०.९६.२;१.६२.१;९.४१.७ इत्यादि पाहा.—'उपासक'='अरिः'. अरिशब्दाचा अर्थ अक्षरशः उत्सुक=देवाची भक्ती करण्याविषयीं तत्पर=यजमान=उपासक. मंत्राचें तात्पर्य असें कीं, या वेळीं इंद्र सोम अर्पण करणाऱ्या अनेक उपासकांकडेस बसला असेल त्याला मी उपासक मोठ्यानें सूक्त गाऊन इकडे बोलावीत आहें.

## सूक्त १०.

ऋषि, मधुच्छंद. देवता, इंद्र. वृत्त, अनुष्टुभ्.

१. [हे इंद्रा], गायत्रें म्हणणारे तुला गायत्र म्हणून गातात; अर्क म्हणणारे अर्क गातात. हे शतप्रज्ञ इंद्रा, ब्रह्में म्हणणारे उपासक तुला वेळूप्रमाणें उंच करितात.

## Hymn 10.

To *Indra*. By *Madhuchchhandas*. Metre, *Anushṭubh*.

1. The singers of *gâyatras* sing their *gâyatras* to thee; the singers of *arkas* offer thee their *arkas*. O possessor of hundred wisdoms, the singers of *brahmas* raise thee like a bambu.

१. हा मंत्र जरी अगदीं सोपा आहे आणि तात्पर्य एकदम ध्यानांत येतें तथापि गायत्रें अर्क, आणि ब्रह्में या स्तोत्रवाचक वेगवेगळ्या वृत्तांत भेद

यत्सानोः सानुमारुहद्भूर्यस्पष्ट कर्त्वम् ।
तदिन्द्रो अर्थं चेतति यूथेन वृष्णिरेजति ॥ २ ॥
यत् । सानोः । सानुम् । आ । अरुहत् । भूरि । अस्पष्ट । कर्त्वम् ।
तत् । इन्द्रः । अर्थम् । चेतति । यूथेन । वृष्णिः । एजति ॥ २ ॥
युक्ष्वा हि केशिना हरी वृषणा कक्ष्यप्रा ।
अथा न इन्द्र सोमपा गिरामुपश्रुतिं चर ॥ ३ ॥
युक्ष्व । हि । केशिना । हरी इति । वृषणा । कक्ष्यऽप्रा ।
अथ । नः । इन्द्र । सोमऽपाः । गिराम् । उपऽश्रुतिम् । चर ॥ ३ ॥

---

### भाषायाम्.

२. यत्सानोः सानुमारुहद्भूरि कर्मास्पष्ट (=अपश्यच् ) [ च ] तदिन्द्रोऽर्थं चेतति । यूथेन वृष्णिरेजते ॥

३. हे सोमपा इन्द्र केशिनौ वृषणौ कक्ष्यप्रौ हरी युङ्क्ष्व हि । अथ (=अनन्तरम् ) अस्माकं गिरामुपश्रुतिं चर ॥

---

काय हें स्पष्ट सांगवत नाहीं. परंतु हीं निरनिराळीं वृत्तें आहेत, निदान स्तोत्रांचे निरनिराळे भेद आहेत यांत संशय नाहीं. गायत्री म्हणून जें वृत्त आहे त्यावरून गायत्र याचा विशेष अर्थ समजण्यास मार्ग दिसतो. कारण कीं, गायत्री म्हणजे गायत्रवृत्तबद्ध ऋचा. यावरून गायत्र म्हणजे गायत्री छंदांत गाइलेलीं गानें. परंतु अर्क आणि ब्रह्में हीं कोणत्या प्रकारचीं गानें? भाष्यकार म्हणतात कीं, 'गायत्रिणः' म्हणजे 'उद्गाते,' 'अर्किणः' म्हणजे 'होते' आणि 'ब्रह्माणः' म्हणजे 'ब्रह्मादि इतर' ऋत्विज.

'वेळूप्रमाणें उंच करितात' या उपमेचें स्वारस्य काय तें स्पष्ट कळत नाहीं. सायणाचार्यहि निश्चयानें सांगू शकत नाहींत ते म्हणतात, "जसें नाडग्यावर "चढून खेळणारे भोरपी नाडा उभारि-"तात तसा याला ते उन्नत करितात हा "एक अर्थ; नाहीं तर सन्मार्गानें चा-"लणारे लोक जसे आपल्या कुळाची "कीर्ति वाढवितात तसे इंद्राची कीर्ति "ते वाढवितात, असा अर्थ." कसें असलें तरी आपल्या गायनांनीं इंद्राची कीर्ति वाढवितात असें तात्पर्य आहे यांत संशय नाहीं.

'शतक्रतु' याजवर पूर्वीं ऋ. १.४.८ याजवर दिलेली टीप पाहा.

२. जेव्हां [ यजमान ] एका पर्वतशिखरापासून दुसऱ्या पर्वतशिखरावर चढतो [आणि] मोठें कर्म आरंभितो तेव्हां इंद्र यजमानाचें प्रयोजन समजतो. [आणि] तो कामवर्षक कळपाबरोबर कांपतो.

३. तूं [तुझी] अयाळी, जवान [आणि] पुष्ट पिंवळ्या घोड्यांची जोडी जोड. आणि मग हे सोम पिणाऱ्या इंद्रा, आमचीं स्तोत्रें ऐकण्यासाठीं ये.

2. When [the sacrificer] ascends one summit after another [and] commences the great work, Indra knows [the sacrificer's] object, [and] accomplisher of desires he trembles with the flock.

3. Harness thy pair of maned, youthful [and] stout tawny horses; and then, Soma-drinking Indra, come to hear our prayers.

---

२. या मंत्राचा पूर्वार्ध जरी अगदीं सोपा आहे आणि तिसऱ्या आणि चौथ्या पादाचा शब्दार्थ स्पष्ट आहे तरी भावार्थ समजत नाहीं. म्हणून आम्हीं सगळ्याच मंत्राचा अर्थ सायणाचार्यांप्रमाणें दिला आहे. वस्तुत: अर्थ असा दिसतो कीं, 'जेव्हां [सूर्यरूपी] इंद्र एका शिखरापासून दुसऱ्या शिखरावर चढतो आणि मोठें कर्म पाहतो तेव्हां तो (इंद्र) अर्थ अवलोकन करितो आणि मेंढा कळपाबरोबर कांपतो.' पहिल्या दोन चरणांचा भावार्थ असा कीं, 'सूर्यरूपी इंद्र जेव्हां उगवून एका पर्वतावरून दुसऱ्या पर्वतावर चढतो आणि अनेक कर्में (मनुष्यांनीं आरंभिलेलीं) पाहतो, तेव्हां.' परंतु तिसऱ्या चरणांत 'अर्थ अवलोकन करितो' आणि चौथ्या चरणांत 'मेंढा' म्हणजे काय?

सायणाचार्यांचा भावार्थ असा:– 'यजमान समिधा वगैरे आणण्यासाठीं एका पर्वतापासून दुसऱ्या पर्वतावर चढतो आणि यागादि कर्म आरंभितो तेव्हां इंद्र यजमानाचा हेतु काय आहे तो समजतो, आणि मरुद्गणरूपी कळपासह तो कामना पूर्ण करणारा इंद्र यज्ञास येऊं लागतो.' परंतु यजमान हें अध्याहृत करावें लागतें, आणि 'अस्पष्ट' याचा अप्रयोगसिद्ध आणि असाधारण अर्थास विरुद्ध अर्थ करावा लागतो.

एहि स्तोमाँ अभि स्वराभि गृणीह्या रुव ।
ब्रह्म च नो वसो सचेन्द्र यज्ञं च वर्धय ॥ ४ ॥
आ । इहि । स्तोमान् । अभि । स्वर । अभि । गृणीहि । आ । रुव ।
ब्रह्म । च । नः । वसो इति । सचा । इन्द्र । यज्ञम् । च । वर्धय ॥ ४ ॥
उक्थमिन्द्राय शंस्यं वर्धनं पुरुनिष्षिधे ।
शक्रो यथा सुतेषु णो रारणत्सख्येषु च ॥ ५ ॥
उक्थम् । इन्द्राय । शंस्यम् । वर्धनम् । पुरुनिःऽसिधे ।
शक्रः । यथा । सुतेषु । नः । ररणत् । सख्येषु । च ॥ ५ ॥
तमित्सखित्व ईमहे तं राये तं सुवीर्ये ।
स शक्र उत नः शकदिन्द्रो वसु दयमानः ॥ ६ ॥ १९ ॥
तम् । इत् । सखिऽत्वे । ईमहे । तम् । राये । तम् । सुऽवीर्ये ।
सः । शक्रः । उत । नः । शकत् । इन्द्रः । वसु । दयमानः ॥ ६ ॥ १९ ॥

---

भाषायाम्.

४. हे वसो इन्द्र [त्वम्] एहि । स्तोमानभिस्वर । [तान्] अभिगृणीहि । [तान्] आरुहि । अस्माकं ब्रह्म च यज्ञं चापि वर्धय ॥

५. यथा शक्र [इन्द्रः] अस्माकं सुतेषु सख्येषु च रणेत् [तथा] पुरुनिःषिध इन्द्राय वर्धनमुक्थं शंस्यम् [अस्ति] ॥

६. [वयं] तमेव सखित्वायेमहे (=याचामहे) । [तम्] एव [राय] ईमहे । तम् [एव] सुवीर्याय [ईमहे] । उत स शक्र इन्द्रो वसु दयमानो (=ददत्, दत्त्वा) अस्माञ्छक्नुयाद् (=अवेत्) ॥

४. येथें ये, या स्तोत्रांची वाहवा कर, वाखाणणी कर, त्यांस शाबास म्हणून स्वीकारून घे. हे कृपाळू इंद्रा, तूं आमचें स्तोत्र आणि आमची उपासना पण फलद्रूप कर.

4. Come hither, applaud our prayers, praise them, receive them approvingly; good Indra, bless our prayer and with it our sacrifice.

५. अनेक शत्रूंचा नाश करणाऱ्या इंद्राला तृप्तिकारक स्तोत्र गावें, कीं जेणेकरून शक्तिमान् [इंद्र] आमच्या सोमावर आणि सेवेवर कृपा करील.

5. An agreeable hymn has to be sung unto Indra the destroyer of many enemies, so that the mighty [Indra] may accept with pleasure our Somas and our friendships.

६. त्यालाच मैत्रीसाठीं आम्ही प्रार्थितों, त्यालाच धनासाठीं [आणि] त्यालाच सुशौर्यासाठीं [प्रार्थितों]. म्हणून तो शक्तिमान् इंद्र द्रव्य देऊन आम्हांस साहाय्य करो.

6. To Him alone we pray for friendship, to Him for wealth, to Him for great valour. May then he the mighty Indra bestow riches [upon us] and help us.

---

५. 'तृप्तिकारक'='वर्धनम्'. जेणेंकरून इंद्रास सुख होईल असें.—'अनेक शत्रूंचा नाश करणाऱ्या'='पुरुनिःषिधे.' हा अर्थ सायणाचार्यांस अनुसरून दिला आहे. व तो ते केवळ धात्वर्थावरून काढितात, प्रयोगावरून सिद्ध करीत नाहींत. ऋग्वेदांत निःषिध् शब्द बराच आढळतो, त्याचा अर्थ 'देणगी' असा दिसतो. आणि त्यावरून पुरुनिःषिध् म्हणजे अनेक आहेत देणग्या ज्याच्या तो असा या मंत्रांत घेण्यास कांहीं अडचण दिसत नाहीं.—'सेवेवर.' मुळांमध्यें 'सख्यत्वावर' असें आहे. आम्ही इंद्राची जी मैत्री करून त्याची सेवा करितों त्याजवर असा भावार्थ.

६. 'सुशौर्यासाठीं'='सुवीर्ये.' 'सुसंतति,' 'शौर्यसंपन्न पुत्र' असाहि अर्थ चांगला संभवतो.

सुविवृतं सुनिरजमिन्द्र त्वादातमिद्यशः ।
गवामप व्रजं वृधि कृणुष्व राधो अद्रिवः ॥ ७ ॥
सुऽविवृतम् । सुनिःऽअजम् । इन्द्र । त्वाऽदातम् । इत् । यशः ।
गवाम् । अप । व्रजम् । वृधि । कृणुष्व । राधः । अद्रिऽवः ॥ ७ ॥
नहि त्वा रोदसी उभे ऋघायमाणमिन्वतः ।
जेषः स्वर्वतीरपः सं गा अस्मभ्यं धूनुहि ॥ ८ ॥
नहि । त्वा । रोदसी इति । उभे इति । ऋघायमाणम् । इन्वतः ।
जेषः । स्वःऽवतीः । अपः । सम् । गाः । अस्मभ्यम् । धूनुहि ॥ ८ ॥

---

### भाषायाम्.

७. हे अद्रिवन्निन्द्र त्वया दत्तमेव यशः सुविवृतं सुनिरजं [ चास्ति ] । गवां व्रजम् [ अस्मभ्यम् ] अपवृतं कुरु । राधः कुरु [ च ] ॥

८. ऋघायमाणं त्वामुभे रोदसी नहीन्वतः । स्वर्वतीरपो जय । [ तार्श्च ] गा अस्मभ्यं संधूनुहि(=संप्रेरय) ॥

७. हे इंद्रा, तुवां दिलेलेंच वैभव सर्वत्र पसरतें [आणि] अनायासानें प्राप्त होतें. [यास्तव] गाईचा गोठा [आम्हांसाठीं] उघड [आणि] हे वज्रधारी, [आम्हांला] दौलत दे.

८. तूं जेव्हां संतापतोस तेव्हां पृथ्वी आणि आकाश ह्या दोनी तुला आवरून धरूं शकत नाहींत. [तर हे इंद्रा], तूं आकाशांतील उदकें जिंकून हरण कर [आणि] [त्या] गाई आम्हांस दे.

7. That wealth alone, Indra, which thou givest spreads in all directions [and] is easily obtainable. Throw open, then, the cow-fold [and], Thunderer, give us wealth.

8. Not both the earth and sky are able to overpower thee when thou ragest. Conquer thou the heavenly waters and send down to us those cows.

---

७. 'तुवां दिलेलें,' 'त्वादातम्'. याचा अर्थ या ठिकाणीं 'तुवां शोधिलेलें' असा सायणाचार्य करितात. पण आम्हीं दिलेला अर्थ सुयुक्तिक आणि स्थलोचित आहे इतकेंच नव्हे, पण दुसऱ्या दोन मंत्रांत सुद्द सायणाचार्यांनींच केलेल्या अर्थास अनुसरून आहे. 'इति चिन्मन्युमध्रिजस्त्वादातमा पशुं ददे' (ऋ. ५.७.१०.) यावर व 'यदिन्द्र चित्र मेहनास्ति त्वादातमद्रिवः। राधस्तन्न......आ भर' (ऋ. ५.७.३९.) यावर 'त्वां ग्रावयाचें' (अर्थात् तूं देत असतोस तें) असा ते अर्थ करितात तो पाहा.—'सर्वत्र पसरतें' ='सुविवृतम्', आणि 'अनायासानें प्राप्त होतें'='सुनिरजम्' हे अर्थ भाष्यास अनुसरून केले आहेत. भाष्यकार धात्वर्थावरूनच अर्थ करितात. प्रयोगांतर आढळत नाहीं.—'गाईचा गोठा उघड' म्ह. इंद्राच्या घरीं गाई पुष्कळ आहेत त्यांचा गोठा उघडून त्या ज्या गाई तीच दौलत आम्हांस दे असें ऋषीचें म्हणणें. अथवा असेंहि तात्पर्य संभवतें कीं, आकाशांत उदकधारारूपी गाई ज्या अभ्ररूपी गोठ्यांत कोंडून राहिल्या आहेत त्या तो गोठा फोडून बाहेर काढ, म्हणजे पाऊस पाड, मग आम्हांस दौलत सहज मिळेल. पुढचा मंत्र पाहा.—'वज्रधारी,' 'अद्रिवान्.' हें विशेषण बहुतकरून इंद्रास लाविलेलें वेदांत आढळतें. 'अद्रिवान्' याचा पदशः अर्थ अद्रि आहे ज्यास तो. अद्रि म्हणजे वज्र असें सायणाचार्य म्हणतात.

८. मंत्राचा भावार्थ:—तूं जेव्हां मेघरूपी वृत्रावरोबर लढतोस आणि भयंकर विद्युदाघात तेच कोणी वज्रप्रहार करितोस तेव्हां आकाश आणि पृथिवी हीं भितात आणि तूं त्यांत मावत

आश्रुत्कर्ण श्रुधी हवं नू चिद्दधिष्व मे गिरः ।
इन्द्र स्तोममिमं मम कृष्वा युजश्चिदन्तरम् ॥ ९ ॥
आश्रुत्ऽकर्ण । श्रुधि । हवम् । नु । चित् । दधिष्व । मे । गिरः ।
इन्द्र । स्तोमम् । इमम् । मम । कृष्व । युजः । चित् । अन्तरम् ॥ ९ ॥
विद्मा हि त्वा वृषन्तमं वाजेषु हवनश्रुतम् ।
वृषन्तमस्य हूमह ऊतिं सहस्रसातमाम् ॥ १० ॥
विद्म । हि । त्वा । वृषन्ऽतमम् । वाजेषु । हवनऽश्रुतम् ।
वृषन्ऽतमस्य । हूमहे । ऊतिम् । सहस्रऽसातमाम् ॥ १० ॥
आ तू न इन्द्र कौशिक मन्दसानः सुतं पिब ।
नव्यमायुः प्र सू तिर कृधी सहस्रसामृषिम् ॥ ११ ॥
आ । तु । नः । इन्द्र । कौशिक । मन्दसानः । सुतम् । पिब ।
नव्यम् । आयुः । प्र । सु । तिर । कृधि । सहस्रऽसाम् । ऋषिम् ॥ ११ ॥

---

भाषायाम्.

९. हे आश्रुत्कर्ण [त्वमस्माकं] हवं शृणुहि । इदानीमेव मम गिरो धत्स्व । हे इन्द्र इमं मम स्तोमं युजो(=मित्राद्)अप्यन्तरं (=समीपतरं) कुरु ॥

१०. त्वां हि [वयं] वाजेषु वृषतमं हवनश्रुतं [च] विद्मः । वृषतमस्य [तव] सहस्रदातृतमामूतिमाह्वयामः ॥

११. हे कौशिक इन्द्र [त्वं] शीघ्रम् [आयाहि] । मन्दसानो (=हृष्टस्) [त्वं] सुतं पिब । [मम] नव्यमायुः सम्यक्प्रतर । [मां च] सहस्रसां(=सहस्रलाभाननुभवन्तम) ऋषिं कुरु ॥

---

नाहींसा होतोस, तर वृत्राला मार, उदकें खालीं पाड, आणि त्याच गाई आम्हास दे. मेघोदकास वेदांत गाई असें म्हटलें आहे. आणि इंद्र वृत्राशीं लढून त्या जिंकून घेतो असें अनेक ठिकाणीं वर्णिलेलें आहे.

९. ज्याचे कान ऐकतात अशा हे इंद्रा, आमची ही हाक ऐक; ह्या माझ्या स्तुती आतांच स्वीकारून घे. हे इंद्रा, ह्या माझ्या स्तोत्राला तूं [आपल्या] मित्राहिपेक्षां जीवलग कर.

१०. कारण कीं, तूं युद्धप्रसंगांत परम वीर्यवान् [आणि] हाक ऐकणारा आहेस हें आम्ही जाणतों. ह्मणून तुझा परम वीर्यवंताचा सहस्रावधिद्रव्यदायक आस्रा आम्ही मागतों.

११. ये, कौशिक इंद्रा, लवकर ये [आणि] आनंद पावून [हा] आमचा सोम पी. [माझें] तरुणवय फार दिवस राख [आणि] हजारो लाभ ज्याला होतील असा मला ऋषि कर.

9. O Thou whose ears hear, hear my call. Just now accept my prayers. Make this my hymn, Indra, dearer [to thee] than even a friend.

10 For we know thee [to be] most valorous and attentive to invocation in battles. We, therefore, implore the protection of thee the most valorous, that confers a thousand benefits.

11. Come hither quick, O Kaus'ika Indra, [and] with delight drink our Soma. Lengthen [my] youth greatly [and] make me a poet obtaining a thousand benefits.

---

९. ही ऋचा फार सुंदर आहे. तिची भाषा जशी श्राव्य आहे तसाच तिचा अर्थ फार रमणीय आहे यांत संशय नाहीं. ऋषीची उत्सुकता, दृढ भक्ति आणि प्रेम हीं फार उत्कृष्ट दिसून येतात.—'मित्रापेक्षांहि जीवलग'= 'युजश्चिदन्तरम्.' युजः ही युज् शब्दाची पंचमी आणि अंतरं ही अंत (जवळ या अर्थाचा शब्द) याची 'तर'प्रत्ययान्त कोटी. अंत म्हणजे जवळचा. अंतर अधिक जवळचा, अंतम अत्यंत जवळचा.

१०. ऋचेचा भावार्थ. तुझे उपासक लढाईत तुला हाक मारितात तेव्हां तीं तूं ऐकितोस आणि त्यांस साहाय्य करितोस. अत एव तुला आम्ही हाक मारीत आहों. तर ज्याच्या पासून सहस्रावधि लाभ होतात असा आश्रय तूं आम्हांस दे.

या ऋचेवरून व वेदांतील बहुतेक ऋचांवरून सिद्ध होतें कीं, ब्राह्मणांनी ब्रह्मकर्म करावें, क्षत्रियांनीं युद्ध आणि राज्य करावें इत्यादि जे आचार मागाहून प्रचारांत आले ते वैदिक युगांत ठाऊक नव्हते. कारण ऋषि जसे यज्ञ करीत आणि वेदमंत्रांनीं देवभक्ति करी-

*परिं त्वा गिर्वणो गिरं इमा भवन्तु विश्वतः ।
वृद्धायुमनु वृद्धयो जुष्टा भवन्तु जुष्टयः ॥ १२ ॥ २० ॥

परिं । त्वा । गिर्वणः । गिरंः । इमाः । भवन्तु । विश्वतः ।
वृद्धऽआयुम् । अनुं । वृद्धयः । जुष्टाः । भवन्तु । जुष्टयः ॥ १२ ॥ २० ॥

## भाषार्थ.

१२. हे गिर्वणः एता गिरस्त्वां विश्वतः परिभवन्तु । वृद्धायुं [त्वाम्]अनु वृद्धयो [भवन्तु] । [त्वया] जुष्टा जुष्टयो भवन्तु ॥

त तसें युद्धहि करीत होते; आणि यज्ञात अर्पण केलेलें हवि आणि सोम सेवन करण्यासाठीं जसे इंद्रादिकांस बोलावीत तसेच ते युद्धात जाऊन लढत असतांना आपणास त्या देवांनीं मदत करावी आणि यश द्यावें अशी प्रार्थना करीत असत.

११. ही पण ऋचा फार चमत्कारिक व महत्त्वाची आहे. हिजवरून दोन गोष्टी फार महत्त्वाच्या दिसून येतात. पहिली–मंत्रकर्ता ऋषि होण्याची इच्छा करितो आणि त्यासाठीं इंद्रास प्रार्थितो. दुसरी–ऋषि म्हणजे केवळ निरपेक्ष तप करून राहणारे महापुरुष होते असा साधारण जनाचा समज आहे त्याला ही ऋचा विरुद्ध आहे. ऋषि झाल्यानें हजारो फायदे होत होते हें स्पष्ट दिसून येतें. हे फायदे म्हणजे आमच्या युगांत कविजनांस जे लाभ होतात तेच असें समजलें पाहिजे.

'कौशिक इंद्रा.' या सूक्ताचा कर्ता जो मधुच्छन्द तो कुशिककुळांतला होता. कौशिक म्हणजे कुशिककुळांत झालेला. येथें इंद्रास हें विशेषण लावण्याचें कारण असें दिसतें कीं, इंद्र हा कुशिककुळाचा मोठा मित्र होता व त्यावर त्याची कृपा होती. आमच्या युगांतहि 'पुंडलिकाचा विठ्ठल', असें म्हणण्याची रूढि नाहीं. असें नाहीं.– 'लवकर ये' हा अर्थ 'आ तु' या अव्ययापासून 'गम्यमान आहे.–'तरुणवय'='नव्यम् आयुः.' शब्दशः अर्थ 'नवें वय.'

* या मंत्राचा विनियोग विवाहसंस्कारात दंपतीस सूत्रवेष्टन करते समयीं करितात; परंतु या मंत्राचा त्या कर्माकडे काय संबंध आहे याचा विचार करितां, 'परि त्वा'='तुझ्या सभोंताली' हे शब्द त्यांत आले आहेत इतकेंच कारण दिसतें.

१२. हे गिर्वणा [इंद्रा], [आमच्या] ह्या वाणी तुला सर्व बाजूनीं वेष्टोत. तुझ्या जीवास सुखी करून [त्या] [आम्हांस] सुखकर होओत, तुला संतुष्ट करून [मग] आम्हांस संतोषकारक होओत.

12. May these prayers, O lover of prayers, crowd round thee on all sides. Having increased the pleasure of thy life may they then become pleasures [to us]; having been enjoyed [by thee] may they become [our] enjoyments.

१२. भावार्थः—ह्या ज्या या सूक्तांत आम्हीं वाणी गाइल्या आहेत त्या तुजप्रत प्रविष्ट होओत, आणि तुला सुख देओत व तुला त्यांपासून संतोष होओ. तसें झाल्यानंतर मग आम्हांस त्या सुखकर आणि संतोषकर होओत. म्हणजे तूं आम्हांस हें सूक्त ग्रहण करून घेऊन सुख आणि संतोष कर.

'गिर्वण' हें इंद्रास आणि अग्नीस लाविलेलें विशेषण आढळतें. त्याचा अर्थ 'ज्याला स्तुति आवडते तो'. तें इंद्र आणि अग्नि ह्या देवांचें जणू काय विशेषनामच बनून गेलें आहे. आणि मरुत् हें जसें वेदांत देवविशेषाचें नांव असून मागाहून देवांचें सामान्यनाम झालें तसेंच गिर्वण हें सामान्यनाम होऊन देववाचक झालें आहे. त्यावरून संस्कृत भाषेस गिर्वाणभाषा (=देवभाषा) असें आपण म्हणत असतों.— 'सर्व बाजूंनीं वेष्टोत.' जशा दासी वेष्टितात तशा.—'तुला संतुष्ट करून'. पदशः अर्थ. 'तुझ्या कडून उपभोगिलेल्या अशा [होऊन].'

## सूक्तम् ११.

ऋषिर्मधुच्छन्दसः पुत्रो जेता । इन्द्रो देवता । अनुष्टुप् छन्दः ॥

*इन्द्रं विश्वा अवीवृधन्त्समुद्रव्यचसं गिरः ।
रथीतमं रथीनां वाजानां सत्पतिं पतिम् ॥ १ ॥

इन्द्रम् । विश्वाः । अवीवृधन् । समुद्रऽव्यचसम् । गिरः ।
रथिऽतमम् । रथिनाम् । वाजानाम् । सत्ऽपतिम् । पतिम् ॥ १ ॥

सख्ये त इन्द्र वाजिनो मा भेम शवसस्पते ।
त्वामभि प्र णोनुमो जेतारमपराजितम् ॥ २ ॥

सख्ये । ते । इन्द्र । वाजिनः । मा । भेम । शवसः । पते ।
त्वाम् । अभि । प्र । नोनुमः । जेतारम् । अपराऽजितम् ॥ २ ॥

पूर्वीरिन्द्रस्य रातयो न वि दस्यन्त्यूतयः ।
यदी वाजस्य गोमतः स्तोतृभ्यो मंहते मघम् ॥ ३ ॥

पूर्वीः । इन्द्रस्य । रातयः । न । वि । दस्यन्ति । ऊतयः ।
यदि । वाजस्य । गोऽमतः । स्तोतृऽभ्यः । मंहते । मघम् ॥ ३ ॥

---

### भाषायाम्.

१. विश्वा गिरः समुद्रव्यचसं (=समुद्रवद्व्यापकं) रथिनां रथितमं वाजानां सत्पतिं पतिमिन्द्रमवीवृधन् ॥

२. हे शवसस्पते (=बलपते) इन्द्र [वयं] वाजिनः (=शूरस्य) तव सख्ये [तिष्ठन्तो] मा भैष्म । [वयम्] अपराजितं जेतारं त्वामभि प्रणोनुमः ॥

३. यदीन्द्रः स्तोतृभ्यो गोमतो वाजस्य मघं मंहते (=ददाति) [तर्हि] तस्य पूर्व्यो (=विपुला) रातय ऊतयश् [च] न विदस्यन्ति (विनश्यन्ति) ॥

---

* या मंत्राचा विनियोग इंद्रास बलि॰देण्याच्या कर्मांत करितात.

## सूक्त ११.

ऋषि, मधुच्छंदाचा पुत्र जेता. देवता, इंद्र. वृत्त, अनुष्टुभ्.

१. समुद्राप्रमाणें व्यापक, रथींमध्यें उत्तम रथी [आणि] द्रव्यांचा पराक्रमी प्रभु अशा इंद्राला सकल स्तुतींनीं वाढविलें आहे.

२. हे पराक्रमी इंद्रा, तुज शक्तिमंताच्या मैत्रींत [राहून] आम्ही न भिऊं असें कर. जयशाली [आणि] पराभवें न पावणाऱ्याला तुला आम्ही पराकाष्ठेच्या उत्सुकतेनें स्तवीत आहों.

३. जर गोसंपन्न संपत्तीचें धन इंद्र स्तोत्यांस [एक वेळ] देईल तर त्याच्या विपुळ देणग्या [आणि] त्याचे अनुग्रह [कधीं] संपणार नाहींत.

## HYMN 11.

To Indra. By Jetri, son of Madhuchchhandas. Metre Anushtubh.

1. Universal praises have glorified Indra who is as great as the ocean, who is the best charioteer of [all] charioteers [and] the mighty lord of riches.

2. May we never, O Indra, lord of might, be afraid [while] in the friendship of thee the mighty one. We most earnestly pray to thee the unconquered conqueror.

3. If Indra [once] gives to those who praise him the wealth of a booty consisting of cows, his copious gifts and kindnesses will be without end.

---

१. 'पराक्रमी,' 'सत्पतिम्.' हा शब्द वेदांत पुष्कळ मंत्रांत आला आहे. ते सर्व मंत्र पाहतां येथें केलेला अर्थ युक्त दिसतो. सायणाचार्य 'सतां पालक:' असा अर्थ करितात. हा शब्द लढाईच्या संबंधानें व शौर्याच्या संबंधानें फार येतो. प्रस्तुत मंत्रांत तरी तसाच संबंध आहे. कारण कीं 'रथी' म्हणजे रथावर बसून युद्ध करणारा असा अर्थ आहे. 'वाजानां सत्पतिं पतिम्' म्हणजे 'युद्धाचा पराक्रमी प्रभु' असाहि अर्थ संभवतो.

२. 'तुज शक्तिमंताच्या', 'ते वाजिन:'. वाजीशब्दाचा अर्थ येथें सायणाचार्य अन्नवान् असा करितात; पण तो येथें नीट बसत नाहीं. अन्नवंताच्या मैत्रींत राहणाऱ्यापेक्षां शक्तिमंताच्या मैत्रींत राहणारा विशेष निर्भय राहील हें सांगावयास नको. तशांत वाजी म्हणजे शक्तिमंत हा अर्थ सायणाचार्यांनींच अनेक स्थळीं दिला आहे. ऋ. ६.४५.४, ८.९३.३४, आणि ९.७.४. या मंत्रांवरील भाष्य उदाहरणार्थ पाहा.

३. मंत्राचा भावार्थ असा दिसतो

पुरां भिन्दुर्युवा कविरमितौजा अजायत ।
इन्द्रो विश्वस्य कर्मणो धर्ता वज्री पुरुष्टुतः ॥ ४ ॥
पुराम् । भिन्दुः । युवा । कविः । अमितऽओजाः । अजायत ।
इन्द्रः । विश्वस्य । कर्मणः । धर्ता । वज्री । पुरुऽस्तुतः ॥ ४ ॥

त्वं वलस्य गोमतोऽपावरद्रिवो बिलम् ।
त्वां देवा अबिभ्युषस्तुज्यमानास आविषुः ॥ ५ ॥
त्वम् । वलस्य । गोऽमतः । अप । अवः । अद्रिऽवः । बिलम् ।
त्वाम् । देवाः । अबिभ्युषः । तुज्यमानासः । आविषुः ॥ ५ ॥

तवाहं शूर रातिभिः प्रत्यायं सिन्धुमावदन् ।
उपातिष्ठन्त गिर्वणो विदुष्टे तस्य कारवः ॥ ६ ॥
तव । अहम् । शूर । रातिऽभिः । प्रति । आयम् । सिन्धुम् । आऽवदन् ।
उप । अतिष्ठन्त । गिर्वणः । विदुः । ते । तस्य । कारवः ॥ ६ ॥

---

भाषायाम्.

४. इन्द्रः पुरां भेत्ता युवा कविरमितौजा विश्वस्य कर्मणो धर्ता वज्री पुरुस्तुतश्[च] अजायत ॥

५. हे अद्रिवन् गोमतो (=गवां हर्तुः) वलस्य बिलं त्वमपावृणोः । तुज्यमाना देवा आभीतवन्तः [सन्तस्] त्वामावुः ॥

६. हे शूर तव रातिभिः सिन्धुमावदन्नहं प्रत्यायम् । हे गिर्वणः कारव उपातिष्ठन्त । [ते] तस्य तव विदुः ॥

---

कीं. जर इंद्र एकदा लढाईत यश देऊन गाईची वगैरे लूट मिळवून देईल तर मग इंद्रानें ती दिलेली संपत्ति जन्मभर पुरेल. पुनः लढाईत जाण्याची आणि द्रव्य मिळविण्याची गरज लागणार नाहीं.

४. इंद्र [जो जन्मला तो] [शत्रूंचीं] नगरें फोडून टाकणारा, तरुण, बुद्धिमंत, अमितपराक्रमी, सकल कर्मांचा पोषक, वज्र धारण करणारा, [आणि] बहुतांनीं स्तविलेला [असा] जन्मला.

५. हे वज्रधारी [इंद्रा], गाई घेऊन बसलेल्या वलाचें बीळ तूंच फोडून उघडिता झालास. त्रासलेले देव निर्भयपणें तुलाच मदत करिते झाले.

६. हे शूरा, मी तुझ्या प्रसादांनिमित्त तुजप्रत सोमाची वाखाणणी करीत करीत आलों आहें, आणि हे गिर्वणा, [इतर] कवि जवळ उभे आहेत; तर ते तुला जाणतात.

4. Indra was born a destroyer of the [enemies'] towns, youthful, wise, of unmeasured power, a supporter of all actions, a wielder of the thunderbolt [and] praised by many.

5. Thou didst, Thunderer, break open the hole of Vala who possessed the cows. Thee did the distressed gods aid without being terrified.

6. O valiant one, I, proclaiming the goodness of the Soma, have come to thee for thy favours. The poets stood by, O lover of prayers, and they, therefore, know thee.

---

४. '[शत्रूंचीं] नगरें फोडून टाकणारा'='पुरां भिन्दुः.' इंद्रानें शत्रूंचीं नगरें फोडिलीं असें वेदांत सांगितलें आहे. हीं नगरें म्हणजे आकाशांत जे ढग असतात ते होत व त्यांवर विद्युद्रूपी वज्रप्रहार बसून तीं फोडिलीं जातात असें रूपक आहे. हीं पुरें इंद्रानें फोडिलीं म्हणून इंद्रास 'पुरंदर' असें नांव पडलें आहे.

मंत्राचा भावार्थ असा कीं, इतरांच्या जन्मासारिखें इंद्राचें जन्म नव्हे. तो जो जन्मला तो एकदमच तरुण, आणि पुरें फोडणारा इत्यादि जन्मला.

५. 'गाई घेऊन बसलेल्या वलाचें बीळ.' "वल म्हणून कोणी एक राक्षस. "त्याणें देवांच्या गाई हरण करून "एका बिळांत म्हणजे गुहेंत लपवून "ठेविल्या. इंद्रानें त्या बिळासभों- "ताली आपल्या सैन्यानें वेढा घातला, "आणि त्या बिळापासून गाई बाहेर का- "ढिता झाला." अशी कथा सायणाचार्य लिहितात.

वस्तुत: आकाशांतून पावसाच्या पाण्याच्या ज्या धारा पडतात त्या गाई. त्याला मेघरूपी राक्षस जो वल तो आवरून गुहेंत (अभ्रांत) ठेवितो. त्या इंद्र सोडवितो म्हणजे विद्युद्रूपी वज्रप्रहारांनीं उदकें जमिनीवर पाडितो या गो-

मायाभिरिन्द्र मायिनं त्वं शुष्णमवातिरः ।
विदुष्टे तस्य मेधिरास्तेषां श्रवांस्युत्तिर ॥ ७ ॥
मायाभिः । इन्द्र । मायिनम् । त्वम् । शुष्णम् । अवं । अतिरः ।
विदुः । ते । तस्यं । मेधिराः । तेषाम् । श्रवांसि । उत् । तिर ॥ ७ ॥
इन्द्रमीशानमोजसाभि स्तोमा अनूषत ।
सहस्रं यस्य रातय उत वा सन्ति भूयसीः ॥ ८ ॥ २१ ॥ ३ ॥
इन्द्रम् । ईशानम् । ओजसा । अभि । स्तोमाः । अनूषत ।
सहस्रम् । यस्यं । रातयः । उत । वा । सन्ति । भूयसीः ॥ ८ ॥ २१ ॥ ३ ॥

## भाषायाम्.

७. हे इन्द्र त्वं मायाविनं शुष्णं मायाभिरवातरः (=पराजयः) । तस्य तव मेधिरा विदुः । तेषां श्रवांसि (=वैभवानि ) उत्तर (=वर्धय ) ॥

८. स्तोमा ओजसेशानमिन्द्रमभ्यनाविषुः । यस्य रातयः सहस्रमुत वा भूयस्यः सन्ति ॥

ष्टीचें रूपक हें आहे.—'मदत करिते झाले'='आविषुः' म्हणजे वळास मारण्याच्या कार्मा.

६. ह्या मंत्राचा शब्दार्थ उघड आहे तथापि भावार्थ उघड समजत नाहीं. आम्हीं शब्दशः अर्थ करून सायणाचार्याप्रमाणेंच केला आहे. तथापि 'रातिभिः' याचा अर्थ 'प्रसादांनीं' असा असतां 'प्रसादाकरितां' असा केलेला बरोबर आहे असें दिसत नाहीं. तसेंच तिसऱ्या व चवथ्या चरणाचें तात्पर्य काय आहे तें नीट समजत नाहीं. सायणाचार्य 'कारवः' म्हणजे ऋत्विज असें म्हणतात.

एक अर्थ असा संभवतो:—हे शूरा, तुझ्या प्रसादेंकरून मेघोदकास ( जें तूं पाहिलेंस म्हणून पूर्वील मंत्रांत सांगितलें त्यास ) मी भेटलों, म्हणजे तूं मेघ फोडून उदक बाहेर काढिलेंस तेव्हां तें मीं पाहिलें आणि त्यास भेटावयास पुढें आलों ( प्रति आयम् ) आणि त्याची प्रशंसा केली. त्यावेळीं दुसरे कवि पण जवळ उभे होते. म्हणून त्यांस तुझा महिमा समजला.

७. हे इंद्रा, तूं मायावी शुष्णास मायेनें जिंकिता झालास. म्हणून तुला कविजन जाणतात. [यास्तव] त्यांचीं वैभवें वाढीव.

८. बळाच्या योगानें प्रभु असा जो इंद्र त्याला [आमच्या या] स्तोत्रांनीं स्तविलें आहे; ज्याच्या कृपा सहस्र अथवा त्यांहूनहि अधिक [आहेत].

7. With thy designs thou didst crush the designing S'ushna. Therefore the poets know thee. Make their fortunes prosper.

8. [These our] prayers have praised Indra, the ruler on account of his power; whose favours are thousand or even more.

---

७. शुष्ण म्हणून एक असुर होता असें सायणाचार्य म्हणतात. शुष्णवध इंद्रानें केला या गोष्टीचा उल्लेख वेदांत बहुत ठिकाणीं आला आहे. शुष्ण म्हणजे पाणी शोषण करणारा मेघरूपी असुरच असावा.—'यास्तव' म्ह. तं शुष्णाला मायेनें (=कपटानें) मारिलें या कारणासाठीं तुझा जो तो शुष्णहननाचा पराक्रम तेणेंकरून तूं कविजनांत विख्यात झालास आणि ते तुझी कीर्ति गाऊं लागले.

८. 'बळाच्या योगानें प्रभु'='ओजसा ईशानम्.' म्हणजे ज्याचें प्रभुत्व उगीच मानलेलें नव्हे, पण खरोखर त्याला शक्ति आहे म्हणून त्यास प्रभु असा मानितात.

## सूक्तम् १२.

ऋषिः कण्वपुत्रो मेधातिथिः। अग्निर्देवता। ६ अग्निर्निर्मथ्योग्निराहवनीयश्च। गायत्री च्छन्दः ॥

*अग्निं दूतं वृणीमहे होतारं विश्ववेदसम्।
अस्य यज्ञस्य सुक्रतुम् ॥ १ ॥
अग्निम्। दूतम्। वृणीमहे। होतारम्। विश्वऽवेदसम्।
अस्य। यज्ञस्य। सुऽक्रतुम् ॥ १ ॥
अग्निमग्निं हवीमभिः सदा हवन्त विश्पतिम्।
हव्यवाहं पुरुप्रियम् ॥ २ ॥
अग्निम्ऽअग्निम्। हवीमऽभिः। सदा। हवन्त। विश्पतिम्।
हव्यऽवाहम्। पुरुऽप्रियम् ॥ २ ॥

### भाषायाम्.

१. [वयं] होतारं विश्ववेदसं सुक्रतुमग्निमस्य यज्ञस्य दूतं वृणीमहे ॥
२. विश्पतिं हव्यवाहं पुरुप्रियं (=बहुप्रियं) तदाग्निमग्निं हवीमभिरह्वयन् ॥

* हा मंत्र गृह्यसूत्रांत प्रत्यधिदेवतांच्या आह्वानामध्ये अग्नीच्या आह्वानार्थ योजिलेला आहे.

## सूक्त १२.

ऋषि, कण्वाचा पुत्र मेधातिथि. देवता, अग्नि. वृत्त, गायत्री.

१. होता, सकलधनसंपन्न [आणि] कुशल अग्नी या [आमच्या] यज्ञाचा दूत [व्हावा असें] आम्ही इच्छितों.

२. अग्नीला आणि अग्नीलाच आह्वनेंकरून सदा बोलावितात; [जो अग्नि] जनांचा प्रभु, हव्य वाहून नेणारा, आणि बहुतांस प्रिय [होय.]

## HYMN 12.

To *Agni*. By *Medhâtithi*, son of *Kaṇva*. Metre *Gâyatrí*.

1. We choose as the messenger of this sacrifice Agni the invoker the possessor of all riches [and] possessed of great wisdom.

2. Agni and Agni alone they ever invoke with [their] invocations—[Agni] the lord of men, the bearer of oblations [and] dear to many.

---

१. मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, या यज्ञांत जें आम्ही हवि अर्पण करितों तें देवांकडेस पोंहचविण्याकरितां आम्ही अग्नीची योजना करितों, अग्नीस आमचा दूत करितों.—होता म्हणजे यज्ञसंपादक एक ऋत्विज याचें नांव होय. अग्नि हा देव आणि मनुष्य यांच्यामध्यें दूतत्व करितो असें अनेक ठिकाणीं वेदांत वर्णिलें आहे.

२. 'अग्नीला आणि अग्नीलाच'='अग्निमग्निम्.' नेहमी अनेक प्रसंगीं अग्नीलाच बोलावितात, दुसऱ्यास बोलावीत नाहींत. ही केवळ अग्नीची प्रशंसा आहे. कारण कीं, वस्तुतः दुसऱ्या देवांसहि (इंद्र, वायु, इत्यादिकांस) बोलावितात हें सांगावयास नकोच. या प्रकारची प्रशंसा वेदांत पुष्कळ ठिकाणीं येत जाईल. त्याविषयीं येथे सूचना आम्हीं दिली म्हणजे पुरे आहे. कारण कीं, कृष्णाचें वर्णन कृष्णभक्त करूं लागले म्हणजे कृष्णास सकल देवांपेक्षां उंच, रामाचें वर्णन रामभक्त करूं लागले म्हणजे रामास सकल देवांपेक्षां उंच, शिवाचे भक्त शिवास सकल देवांपेक्षां उंच, विठोबाचे भक्त विठोबास सकल देवांपेक्षां उंच, आणि खंडोबाचे भक्त खंडोबास सकल देवांपेक्षां उंच करीत असतात हें कोणास ठाऊक नाहीं ?

'आह्वनेंकरून'='हवीमभिः.' म्हणजे अग्नीनें यावें अशा हाका मारून. आह्वन म्हणजे बोलाविणें.—'हव्य वाहून नेणारा.' देवांकडेस.—'बहुतांस प्रिय'. पूजकांस.

अग्ने देवाँ इहा वह जज्ञानो वृक्तबर्हिषे ।
अस्मि होता न ईड्यः ॥ ३ ॥

अग्ने । देवान् । इह । आ । वह । जज्ञानः । वृक्तऽबर्हिषे ।
असि । होता । नः । ईड्यः ॥ ३ ॥

ताँ उशतो वि बोधय यदग्ने यासि दूत्यम् ।
देवैरा सत्सि बर्हिषि ॥ ४ ॥

तान् । उशतः । वि । बोधय । यत् । अग्ने । यासि । दूत्यम् ।
देवैः । आ । सत्सि । बर्हिषि ॥ ४॥

घृताहवन दीदिवः प्रति ष्म रिषतो दह ।
अग्ने त्वं रक्षस्विनः ॥ ५ ॥

घृतऽआहवन । दीदिऽवः । प्रति । स्म । रिषतः । दह ।
अग्ने । त्वम् । रक्षस्विनः ॥ ५ ॥

अग्निनाग्निः समिध्यते कविर्गृहपतिर्युवा ।
हव्यवाड् जुह्वास्यः ॥ ६ ॥ २२ ॥

अग्निना । अग्निः । सम् । इध्यते । कविः । गृहऽपतिः । युवा ।
हव्यऽवाट् । जुहुऽआस्यः ॥ ६ ॥ २२ ॥

---

## भाषायाम्.

३. हे अग्ने [ त्वं ] जज्ञानः (=जातः) [ सन् ] देवानिह वृक्तबर्हिष आवह । [त्वं हि] अस्माकमीड्यो होतासि ॥

४. हे अग्ने यस्मात्त्वं दूत्यं यासि [तस्माद्] उशतस्तान्विबोधय । आ[गत्य च] देवैः[ सह ] बर्हिषि निषीद ॥

५. हे घृताहवन दीदिवन्नग्ने त्वम् [अस्माकं] रक्षस्विनो रिषतः प्रति दहस्म ॥

६. कविर्गृहपतिर्युवा हव्यवाड् जुह्वास्योऽग्निः अग्निना समिध्यते ॥

३. हे अग्नी, तूं उत्पन्न होतांच दर्भासन घालून वाट पाहात बसलेल्या उपासकाजवळ देवांला येथें घेऊन ये. [ कारण कीं ] तूं आमचा श्लाघ्य होता होस.

४. हे अग्नी, ज्यापेक्षां त्वां दूतपण पतकरिलें आहे [ त्यापेक्षां ] त्या उत्सुक देवांस जागे कर; [ आणि ] त्यांसह [ या ] दर्भासनावर येऊन बैस.

५. हे घृताहवन, देदीप्यमान अग्नी, राक्षसांचा सहवास करून आम्हांस उपद्रव करणाऱ्या [ शत्रूं ]स तूं जाळून भस्म कर.

६. मेधावी, गृहपति, तरुण, हवि वाहून नेणारा [ आणि ] ज्वालामुख असा अग्नि अग्नीच्या योगानें पेटविला जातो.

3. O Agni, so soon as thou art born bring hither the gods to the worshipper who has prepared a seat of Kus'as [for thee]. [For thou] art our praiseworthy priest.

4. Awake, Agni, those eager gods, since thou becomest the messenger. With them sit down on the Kus'a-seat.

5. O resplendent Agni, invoked with ghee, burn thou away [our] enemies associating with the devils.

6. By means of Agni is lighted Agni, the wise, the lord of the house, the youthful, the bearer of the oblation, [and] the flame-tongued.

---

३. 'उत्पन्न होतांच.' म्हणजे तुला आम्ही अरणींत घर्षणाच्या योगानें उत्पन्न करितांच. अग्नीला अरणींत उत्पन्न करीत.—'दर्भासन घालून वाट पाहात बसलेल्या उपासकाजवळ', 'वृक्तबर्हिषे.' पदशः 'दर्भ ज्याणें कापिले ( कापून पसरिले ) आहेत त्याजवळ'. 'वृक्तबर्हि' हें उपासकाचेंच वाचक झालें आहे.

४. 'जागे कर,' 'विबोधय.' वैदिक युगांतील भाविक जन आळसी नव्हते. ते मोठ्या पहाटेस जागे होऊन अग्नीला प्रदीप्त करीत आणि देवांसहि त्याजकडून जागे करवून त्यांस पहाटेस हव्यादि पूजा अर्पण करून उपासना करीत. पहाटेस उठून देवांची हव्यादिकानें उपासना करण्याची चाल उत्तरोत्तर पुढें दिसून येईल.—'उत्सुक', 'उशतः'. म्हणजे उठून हवि भक्षण्याविषयीं इच्छा करणारे.

५. 'घृताहवन' म्हणजे तूप अर्पण करून ज्याला बोलावितात तो.

शत्रूंचा नाश कर, आम्हांस उपद्रव देणाऱ्यांस नाहींसे कर आणि आम्हांस सुखी कर अशी प्रार्थना वेदांत पुष्कळ भरलेली आहे. ती उत्तरोत्तर पुष्कळ येत जाईल.

**कविमग्निमुप स्तुहि सत्यधर्माणमध्वरे ।**
**देवममीवचातनम् ॥ ७ ॥**

कविम् । अग्निम् । उप । स्तुहि । सत्यऽधर्माणम् । अध्वरे ।
देवम् । अमीवऽचातनम् ॥ ७ ॥

**यस्त्वामग्ने हविष्पतिर्दूतं देव सपर्यति ।**
**तस्य स्म प्राविता भव ॥ ८ ॥**

यः । त्वाम् । अग्ने । हविःऽपतिः । दूतम् । देव । सपर्यति ।
तस्य । स्म । प्रऽअविता । भव ॥ ८ ॥

**यो अग्निं देववीतये हविष्माँ आविवासति ।**
**तस्मै पावक मृळय ॥ ९ ॥**

यः । अग्निम् । देवऽवीतये । हविष्मान् । आऽविवासति ।
तस्मै । पावक । मृळय ॥ ९ ॥

**स नः पावक दीदिवोऽग्ने देवाँ इहा वह ।**
**उप यज्ञं हविश्च नः ॥ १० ॥**

सः । नः । पावक । दीदिऽवः । अग्ने । देवान् । इह । आ । वह ।
उप । यज्ञम् । हविः । च । नः ॥ १० ॥

**भाषायाम्.**

७. कविं सत्यधर्माणं देवममीवचातनं (=रोगनाशकम्) अग्निमध्वरे उपस्तुहि ॥

८. हे देव अग्ने यो हविष्पतिस्त्वां दूतं सपर्यति तस्यैव [त्वं] प्राविता भव ॥

९. यो हविष्मानग्निं (=हे अग्ने त्वां) देववीतये आविवासति तस्मै हे पावक [त्वं] मृळय ॥

१०. स [त्वं] हे पावक दीदिवन्नग्ने अस्मभ्यं देवानिहास्माकं यज्ञं हविश्चोपावह ॥

६. 'अग्नीच्या योगानें अग्नि पेटविला जातो,' 'अग्निनाग्निः समिध्यते.', याचा भावार्थ काय असेल तो नीट समजत नाहीं. शब्दार्थ स्पष्ट दिसतेच आहे.—'गृहपति,' म्हणजे यजमानाच्या गृहाचें पालन करणारा असें सायणाचार्य म्हणतात.—'ज्वालामुख' अथवा 'ज्वालाजिह्व' ज्वालाच आहे मुख किंवा जिह्वा ज्याची तो.

७. मेधावी, सत्यधर्मा [ आणि ] अनिष्टनाशक जो देव अग्नि त्याचें यज्ञांत स्तवन कर.

८. हे देवा अग्नी, जो हविर्युक्त [ उपासक ] तुला दूताला पूजितो त्याचाच तूं संरक्षणकर्ता हो.

९. जो हविर्युक्त [ उपासक ] देवांस भोजन पोंहचावें म्हणून अग्नीला पूजितो त्याला, हे पावका, तूं प्रसन्न हो.

१०. म्हणून हे पावका, हे देदीप्यमान अग्नी, तूं देवांस येथें आमच्या यज्ञाला आणि आमच्या हवीकडे घेऊन ये.

7. Praise in the sacrifice the wise Agni, whose law is correct, the god who destroys disease.

8. O god Agni, be thou the protector of him alone who serves thee with his oblations.

9. He who, in order to feast the gods, serves Agni with his oblations,—to him be favourable, O Pâvaka!

10. Do thou then, O Pâvaka, O resplendent Agni, bring the gods hither to our sacrifice and to our oblation.

---

७. 'सत्यधर्मा', म्ह. ज्याची आज्ञा सत्य अथवा सत्यधर्मप्रवर्तक आहे.— 'अनिष्टनाशक,' म्हणजे रोगादिकांचा नाश करणारा.

८. भावार्थ असा दिसतो कीं, जो उपासक अग्नीला हवि अर्पण करून भजतो त्याचेंच त्याणें संरक्षण करावें, इतरांचें म्हणजे अग्नीला हवि अर्पण न करणारे जे अनार्य वगैरे लोक भजत नाहींत त्यांचें करूं नये.—'हविर्युक्त [ उपासक ]', 'हविष्पतिः.' म्हणजे जो हवीचा मालक आहे असा भक्त.

९. या मंत्रांत प्रथम पादांत अग्नीविषयीं तृतीय पुरुषीं बोलून तृतीय पादांत अग्नीला पावक हें संबोधन करून द्वितीय पुरुषीं उच्चार आहे. असे प्रयोग वेदांत पुष्कळ ठिकाणीं येत जातील.— 'पावक' हें अग्नीचें नांव.

१०. 'म्हणून...तूं'='स [त्वम्].' म्हणजे ज्यापेक्षां तुला पुजणाऱ्या हविर्युक्त उपासकाचें संरक्षण तूं करितोस आणि त्याला प्रसन्न होतोस त्यापेक्षां.

**स नः स्तवान आ भर गायत्रेण नवीयसा ।**
**रयिं वीरवतीमिषम् ॥ ११ ॥**

सः । नः । स्तवानः । आ । भर । गायत्रेण । नवीयसा ।
रयिम् । वीरऽवतीम् । इषम् ॥ ११ ॥

**अग्ने शुक्रेण शोचिषा विश्वाभिर्देवहूतिभिः ।**
**इमं स्तोमं जुषस्व नः ॥ १२ ॥ २३ ॥**

अग्ने । शुक्रेण । शोचिषा । विश्वाभिः । देवहूतिऽभिः ।
इमम् । स्तोमम् । जुषस्व । नः ॥ १२ ॥ २३ ॥

## भाषायाम्.

११. स [त्वं] नवीयसा [अनेन] गायत्रेण स्तूयमानः [सन्] रयिं वीरवतीमिषं [च] अस्मभ्यमाभर (=आनय) ॥

१२. हे अग्ने [त्वं] शुक्रेण शोचिषा विश्वाभिर्देवहूतिभिश् [च] इममस्माकं स्तोमं जुषस्व ॥

११. म्हणून, [ हे अग्नी ], अगदीं नवीन रचलेल्या [ या ] आमच्या स्तोत्राच्या योगानें स्तविलेला असा तूं वैभव [ आणि ] शूरपुत्रसंपन्न संपत्तीतें घेऊन ये.

१२. हे अग्नी, तूं [ आपल्या ] शुद्ध तेजाच्या योगानें [ आणि ] आम्हीं केलेल्या सकल देवसेवांच्या योगानें हें आमचें स्तोत्र ग्रहण कर.

11. Bring hither then, praised by [this] our newest hymn, prosperity [and] plenty accompanied by valorous progeny.

12. O Agni, by virtue of [thy] brilliant splendor [and] by virtue of all [our] invocations of the gods, accept this our hymn.

---

११. हा मंत्र दोन कारणामुळे लक्षांत ठेवण्याजोगा आहे. पहिलें,—ऋषिजन आपापल्या देवतांची स्तुति करूं लागले म्हणजे जुनें सूक्त म्हटले तर देवास तादृश प्रिय होणार नाहीं असें समजून अगदीं नवीन रचून सूक्त म्हणत आणि तेणेंकरून स्तुति करीत. तशा प्रकारचें हें स्तोत्र आहे. दुसरें,—देवांपाशीं मागावयाच्या वस्तु म्हटल्या म्हणजे मोक्ष, सायुज्य स्थान इत्यादि नव्हत्या, तर धन, दौलत, शूर संतति, संपत्ति वगैरे मागत असत. ह्याच गोष्टींची आवश्यकता वैदिक युगांत ज्यास्ती होती यांत संशय नाहीं. आणि विशेषेंकरून शौर्यवान् पुत्रांची तर आवश्यकता फार होती. कारण कीं, आमचे आर्य पूर्वज या देशांत जेव्हां पहिल्यानें आले तेव्हां त्यांच्या आसपास अनार्य म्हणजे या देशचे मूळचे रहिवासी, ज्यांस आतां आपण महार, कोळी, गोंड, भिल्ल, वगैरे म्हणतों आणि ज्यांस ते दस्यु, कृष्णत्वच् वगैरे म्हणत, ते राहत होते, आणि हे लोक त्यांच्याशीं हमेश लढत असें वेदावरून दिसतें. त्या त्या लढाईत शूर पुत्रांची जरूर फार पडे हें सांगावयास नकोच.

१२. मंत्राचा भावार्थ असा कीं, अग्नि परम देदीप्यमान आहे आणि त्याची सेवा अनेक वेळ या उपासकानें केली आहे, तर ही गोष्ट लक्षांत ठेवून अग्नीनें हें स्तोत्र स्वीकारून घ्यावें. म्हणजे जरी अग्नि आपल्या मोठेपणामुळें उपासकाचें स्तोत्र स्वीकारून घेईल न घेईल याविषयीं संशय आहे तथापि उपासकानें अनेक वेळ पूर्वीं सेवा व भजन केलें आहे त्यापेक्षां त्या गोष्टीकडे लक्ष देऊन हें स्तोत्र ग्रहण करावें.

## सूक्तम् १३.

ऋषिः कण्वपुत्रो मेधातिथिः । आप्रीसूक्तम् । देवता–१ इध्मः समिद्धो वाग्निः । २ तनूनपात् । ३ नराशंसः । ४ इळः । ५ बर्हिः । ६ देवीर्द्वारः । ७ उषासानक्ता । ८ दैव्यौ होतारौ प्रचेतसौ । ९ तिस्रो देव्यः सरस्वतीळाभारत्यः । १० त्वष्टा । ११ वनस्पतिः । १२ स्वाहाकृतयः । गायत्री च्छन्दः ॥

**सुसमिद्धो न आ वह देवाँ अग्ने हविष्मते ।**
**होतः पावक यक्षि च ॥ १ ॥**

सुऽसमिद्धः । नः । आ । वह । देवान् । अग्ने । हविष्मते ।
होतरिति । पावक । यक्षि । च ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे अग्ने सुसमिद्धस् [ त्वं ] देवानस्माकं हविष्मते [ यजमानाय ] आवह । अपि च हे होतः हे पावक तान् यज ॥

## सूक्त १३.

ऋषि, कण्वकुळांत जन्मलेला मेधातिथि. देवता, १ सुसमिद्ध, २ तनूनपात्, ३ नराशंस, ४ इळा, ५ बर्हि, ६ द्वार, ७ उषा आणि रात्र, ८ प्रचेतस, ९ तीन देवी (सरस्वती, इळा, भारती), १० त्वष्टा, ११ वनस्पति, १२ स्वाहा. वृत्त, गायत्री.

१. हे अग्नी, तूं आतां चांगला पेटला आहेस, तर देवांस [या] आमच्या हवि देणाऱ्या [यजमाना]कडेस घेऊन ये, आणि हे होत्या, हे पावका अग्नी, तूं त्यांस पूज.

## HYMN 13.

By Medhâtithi of the family of Kaṇva. To 1 Susamiddha, 2 Tanûnapât, 3 Narâs'aṁsa, 4 Iḷâ, 5 Barhis, 6 The Doors, 7 Ushas and Night, 8 Prachetasau, 9 The three goddesses (Sarasvatî, Iḷâ, and Bhâratî), 10 Tvashṭâ, 11 Vanaspati, 12 Svâhâ. Metre Gâyatrî.

1. Well kindled do thou, Agni, bring the gods hither to our sacrificer, and, O brilliant invoker, sacrifice to them.

---

१. 'हें आप्रीसूक्त' होय. आप्रीसूक्तांत ज्या देवता येतात त्या वर दिल्या आहेत त्याच. त्यांपैकीं 'सुसमिद्ध' हें अग्नीचें विशेषण होय. 'तनूनपात्' हेंहि अग्नीचें नाव आहे. त्याप्रमाणेंच 'नराशंस'. 'बर्हि' म्हणजे दर्भ. 'द्वार' म्हणजे (ज्या खोलींत यज्ञ करावयाचा तिचीं) दारें, दरवाजे. 'उषा' म्हणजे प्रभात हें प्रसिद्धच आहे. 'सरस्वती' ही नदीरूपी देवता. भारती ही वाग्रूपी देवता. 'त्वष्टा' म्हणजे देवांचा सुतार, विश्वकर्मा. 'वनस्पति' म्हणजे वृक्ष अथवा वृक्षापासून झालेलें लांकूड, म्हणजे ज्या खांबास यज्ञपशु बांधावयाचा तो खांब (यूप). आणि 'स्वाहा' हा होमद्रव्य देतांना उच्चारावयाचा एक उद्गार.. आप्रीसूक्ताचा पशुयज्ञाच्या वेळां विनियोग करीत होते असें म्हणतात. आप्रीसूक्तांत बहुतकरून ११ ऋचा असतात. ऋग्वेदाचीं दश मंडळें मिळून दहा आप्रीसूक्तें आहेत. तीं येणेंप्रमाणें.—१.१३; १.१४२; १.१८८; २.३; ३.४; ५.५; ७.२; ९.५; १०.७०, १०.११०. ह्यांचे कर्ते निरनिराळ्या कुळांतील निरनिराळे पुरुष होते. 'आप्री' हें नांव आप्रीसूक्तांत ज्या देवता येतात त्यांस आपणास प्रिय अथवा अनुकूळ करून घेणें हा त्या सूक्तांच्या वक्त्यांचा उद्देश आहे म्हणून पडलें आहे असें म्हणतात. हीं दहा आप्रीसूक्तें अशाप्रकारचीं आहेत कीं, त्यांत वर सांगितलेल्या देवता, वर सांगितलेल्याच क्रमानें बहुतकरून येतात. व त्यांच्या ऋ-

मधुमन्तं तनूनपाद्यज्ञं देवेषु नः कवे ।
अद्या कृणुहि वीतये ॥ २ ॥

मधुऽमन्तम् । तनूऽनपात् । यज्ञम् । देवेषु । नः । कवे ।
अद्य । कृणुहि । वीतये ॥ २ ॥

नराशंसमिह प्रियमस्मिन्यज्ञ उप ह्वये ।
मधुजिह्वं हविष्कृतम् ॥ ३ ॥

नराशंसम् । इह । प्रियम् । अस्मिन् । यज्ञे । उप । ह्वये ।
मधुऽजिह्वम् । हविःऽकृतम् ॥ ३ ॥

## भाषायाम्.

२. हे कवे, हे तनूनपात्, [ त्वम् ] अद्य नो मधुमन्तं यज्ञं देवानां वीतये तेषु कुरु ( =प्रापय ) ॥

३. [ अहं ] प्रियं मधुजिह्वं हविष्कृतं नराशंसमिहास्मिन्यज्ञे उपह्वये ॥

चाचा भावार्थहि एकच असतो. आणि विशेष लक्ष्यांत ठेवण्याजोगें इतकें आहे कीं, ऋग्वेदांत यज्ञास अथवा यज्ञप्रसंगास अनुलक्षून न रचलेलीं अनेक सूक्तें आहेत व त्यांचा यज्ञाशीं वस्तुतः कांहीं संबंध नाहीं, तशीं हीं आप्रीसूक्तें नव्हेत. तीं यज्ञाला अनुलक्षूनच रचलेलीं व यज्ञप्रसंगीं विनियोज्य होत असें स्पष्ट दिसतें.

'तूं आतां चांगला पेटला आहेस'= 'सुसमिद्धः'. 'सुसमिद्ध' हें वस्तुतः विशेषण आहे व तसेंच समजून आम्हीं भाषांतर केलें आहे. सायणाचार्य 'सुसमिद्धनामक' अग्नि असा अर्थ करितात. तसा केला तरी मूळचा शब्दार्थ सोडण्याचें कारण दिसत नाहीं.—'आमच्या यजमानाकडेस'= 'नो हविष्मते.' सूक्तकर्ता हा एक कवि अथवा ऋषि होय व यज्ञ करणारा यजमान निराळा. यजमानानें दक्षिणा वगैरे देऊन कामीं लाविलेला ऋषि त्या यजमानाच्या तर्फे अग्नीची स्तुति करीत आहे. अति प्राचीन काळीं यजमान निराळा आणि स्तुति करणारा ब्राह्मण ( ऋषि ) निराळा असें नसे. जो यज्ञ करी तोच आपल्या तर्फे देवाची स्तुति करी. भटाभिक्षुकांचें आणि श्रोत्री ब्राह्मणांचें प्रयोजन मागाहून पडूं लागलें. पण या आप्रीसूक्तांत वक्ता वेगळा व यजमान वेगळा असें स्पष्ट होतें. त्यावरून हीं आप्रीसूक्तें परम प्राचीन (इतर सूक्तांप्रमाणें ) नसावीं असें दिसतें.—'हे होत्या'. अग्नीस होता असें म्हटल्याचीं उदाहरणें पूर्वीं आलींच आहेत.—'त्यास पूज'. अग्नि येऊन देवास आपणाबरोबर आणितो आणि त्यांचें यजन (पूजन, हवि इत्यादि देऊन भजन ) यजमानासाठीं करितो असें वेदांत अनेक ठिकाणीं सांगितलें आहे. अग्नींत टाकिलेलें हवि देवांप्रत पोंहचतें व देवास अग्नीच प्रसन्न करितो असें मानीत.

२. हे मेधावी तनूनपात् [अग्नी], [हें] आमचें सोमयुक्त हवि देवांनीं भक्षावें म्हणून तें [तूं] आज त्यांजप्रत प्रविष्ट कर.

३. प्रिय, मधुरवचन [आणि] हवि निष्पन्न करणारा जो नराशंस त्याला येथें या [यज्ञां]त मी बोलावितों.

2. O wise Tanûnapât, do thou this day take [this] our oblation accompanied by the sweet Soma to the gods that they may enjoy it.

3. I invoke here in this [sacrifice] Narâs'amsa the beloved, the sweet-tongued [and] the perfector of the oblation.

---

२. 'मेधावी तनूनपात्'='कविस्तनूनपात्.' तनूनपात् म्हणजे तनूनपात् या नांवाचा अग्नि असें सायणाचार्य म्हणतात. तें अग्नीचें एक नांव आहे यांत संशय नाहीं; पण तें कशावरून पडलें हें निश्चयानें सांगवत नाहीं. असें म्हणतात कीं, स्वताहाच्या शरीराचा म्हणजे आपला (तन्वाः) पुत्र म्हणून तनूनपात् होय; कारण अग्नी दुसऱ्यापासून उत्पन्न झालेला नव्हे, स्वताहाच उत्पन्न होतो. पण वस्तुतः काय व्युत्पत्ति असेल न कळे.—'सोमयुक्त'='मधुमन्तं'. म्हणजे मधुर सोमरस ज्याबरोबर अर्पण केला आहे तसें हवि. 'रसयुक्त' असाहि (सायणाचार्यांनीं केलेला) अर्थ होऊं शकेल. मधु म्हणजे सोम असा अर्थ होतो याविषयीं ऋ. १.१५.११ यावरील सायणाचार्यांचें भाष्य पाहा.

३. 'प्रिय' म्हणजे देवांचा आवडता असें सायणाचार्य म्हणतात.—'मधुरवचन' म्ह. देवांजवळ जाऊन मधुरवचनांनीं त्यांस प्रसन्न करून मनुष्यांजवळ त्यांस आणणारा.—'हवि निष्पन्न करणारा'='हविष्कृतम्.' म्हणजे हवि विस्तवावर ठेविल्यानें सिद्ध होतें आणि नंतर देवांस अर्पणीय होतें म्हणून.—'नराशंस'. हें अग्नीचें एक नांव होय. परंतु कशावरून पडलें तें निश्चयानें सांगवत नाहीं. "नरांणां शंसः"=मनुष्यें ज्याची स्तुति करितात तो असें सायणाचार्य म्हणतात. 'नराशंस' हें क्वचित् 'पूषा' या देवास लाविलेलें विशेषण आढळतें. कितीएकांच्या मतें 'नर्यशंह' म्हणून जो इंद्र (पारसिकांच्या आग्र) भाषेंत शब्द आहे तो आणि हा एकच, आणि मनुष्यांचा राजा असा अर्थ होय. दुसरे कितीएक म्हणतात कीं, त्याचा अर्थ 'सर्व मनुष्यांस इष्ट—सर्व मनुष्यांनीं वांछिलेला' असा होतो. मूळ अर्थ कांहीं असो, 'नराशंस' म्हणजे अग्नीचें एक नांव अथवा त्याची एक विभूति होय यांत संशय नाहीं.

अग्ने सुखतमे रथे देवाँ ईळित आ वह ।
असि होता मनुर्हितः ॥ ४ ॥
अग्ने । सुखऽतमे । रथे । देवान् । ईळितः । आ । वह ।
असि । होता । मनुःऽहितः ॥ ४ ॥

स्तृणीत बर्हिरानुषग्घृतपृष्ठं मनीषिणः ।
यत्रामृतस्य चक्षणम् ॥ ५ ॥
स्तृणीत । बर्हिः । आनुषक् । घृतऽपृष्ठम् । मनीषिणः ।
यत्र । अमृतस्य । चक्षणम् ॥ ५ ॥

वि श्रयन्तामृतावृधो द्वारो देवीरसश्चतः ।
अद्या नूनं च यष्टवे ॥ ६ ॥ २४ ॥
वि । श्रयन्ताम् । ऋतऽवृधः । द्वारः । देवीः । असश्चतः ।
अद्य । नूनम् । च । यष्टवे ॥ ६ ॥ २४ ॥

---

### भाषायाम्.

४. हे अग्ने, ईडितस् [ त्वं ] सुखतमे रथे देवानावह । [ त्वं हि ] मनुष्यहितो होतासि ॥

५. हे मनीषिणो [ यूयं ] घृतपृष्ठं बर्हिरानुषक् स्तृणीत । यत्र [ बर्हिषि ] अमृतस्य ( =अमराणां ) चक्षणं ( =दर्शनं ) [ स्यात् ] ॥

६. ऋतवर्धका असश्चन्त्यो द्वारो देव्यः अद्य अद्यैव यजनाय विश्रयन्ताम् ॥

४. हे अग्नी, [तूं] स्तविलेला [ होत्साता ] परम सुखकारक रथांत [ बसवून ] देवांस इकडे घेऊन ये. [ कारण, कीं तूं ] मनुष्यांस हितकारक असा होता आहेस.

५. हे बुद्धिमंत [ ऋत्विजांनो ], जे त्यांजवर तूप पसरल्याप्रमाणें मृदु आहेत असे दर्भ जवळ जवळ आंथरा, [कीं] ज्यांवर मरणरहित [ देवां ]चें दर्शन [ होईल ].

६. सत्यधर्माची प्रवृत्ति करणाऱ्या, [ आणि ] अप्रतिम अशा द्वार[ रूपी ] देवी आज, आतांच यज्ञ व्हावा म्हणून उघडोत.

4. Agni, being praised bring thou the gods hither in the easiest chariot. [For] thou art a hotri (invoker) favourable to men.

5. Strew, learned priests, the Kus'a grass close, soft as if sprinkled with clarified butter, that we may see the immortal ones thereon.

6. May the divine Doors the promoters of the sacred rite and without an equal, this day, this very time, be opened that we may sacrifice.

---

४. 'स्तविलेला'='ईळितः'. हा जो ईळित शब्द या मंत्रांत आहे त्यावरून हा मंत्र इळा देवीस अनुलक्षून आहे अशी सूचना समजावयाची.—'परमसुखकारक रथांत' यावरून इतकें सिद्ध होतें कीं, वैदिक युगांत रथ होते व त्यांत कौशल्य खर्चून सुख होई अशी युक्ति करीत असत. म्हणजे कितीएक सुखकारक व कितीएक हालण्यानें क्लेशकारक होते असें दिसून येतें.—'होता' या नांवाचा ऋत्विज्. होता याचा अर्थ 'बोलाविणारा.' अग्नीला होता म्हणण्याचें कारण हें कीं, होत्याप्रमाणें तो देवांस बोलावितो.

५. 'दर्भ'='बर्हिः'. 'बर्हि' शब्दाचा उच्चार या मंत्रांत आला यावरून ही ऋचा बर्हिनामक अग्नीस अनुलक्षून आहे असें सायणाचार्य म्हणतात.—'ज्यांवर देवांचें दर्शन होईल' म्हणजे ज्यांवर देव येऊन बसतील. यज्ञांत देवांस बैठकी घालीत ती दर्भांची घालीत व तिजवर तूप शिंपडल्याप्रमाणें ती गुळगुळीत व नरम असे. दर्भांचें आसन घालणें यांत फार आश्चर्य नाहीं. कारण अजून तरी गालिचा आंथरणारे लोक थोडेच. पण लवाळ्याची अथवा शेंदीच्या पातींची हातरी बसावयास घालणारे पुष्कळ.

६. ही ऋचा यज्ञ ज्यांत होतो त्या खोलीत करीत तिच्या म्हणजे यज्ञशाळेच्या दरवाजांविषयीं आहे.—'सत्यधर्माची प्रवृत्ति करणाऱ्या.' म्हणजे दरवाजे उघडल्यावर सत्यधर्मक्रियेस म्ह. यज्ञास आरंभ होतो म्हणून आणि यज्ञ हाच ( आर्य लोकांचा ) सत्यधर्म.—'यज्ञ व्हावा म्ह-

नक्तोषासा सुपेशसास्मिन्यज्ञ उप ह्वये ।
इदं नो बर्हिरासदे ॥ ७ ॥

नक्तोषसा । सुऽपेशसा । अस्मिन् । यज्ञे । उप । ह्वये ।
इदम् । नः । बर्हिः । आऽसदे ॥ ७ ॥

ता सुजिह्वा उप ह्वये होतारा दैव्या कवी ।
यज्ञं नो यक्षतामिमम् ॥ ८ ॥

ता । सुऽजिह्वौ । उप । ह्वये । होतारा । दैव्या । कवी इति ।
यज्ञम् । नः । यक्षताम् । इमम् ॥ ८ ॥

इळा सरस्वती मही तिस्रो देवीर्मयोभुवः ।
बर्हिः सीदन्त्वस्रिधः ॥ ९ ॥

इळा । सरस्वती । मही । तिस्रः । देवीः । मयःऽभुवः ।
बर्हिः । सीदन्तु । अस्रिधः ॥ ९ ॥

---

### भाषायाम्.

७. सुपेशसे (=सुरूपे) नक्तोषसावस्मिन्यज्ञे नो बर्हिरासीदितुम् [ अहम् ] उपह्वये ॥

८. [ अहं ] तौ (=प्रसिद्धौ) सुजिह्वौ कवी दिव्यौ होतारावुपह्वये । तावस्माकमिमं यज्ञं यजताम् ॥

९. इळा सरस्वती मही [ चेत्येतास् ] तिस्रो मयोभुवः (=सुखोत्पादका) अस्रिधः (=अहिंस्रा) देव्यो बर्हिषि सीदन्तु ॥

---

णन'='यष्टवे.' हें तुमर्थ अव्यय होय. 'यष्टुम्' या ऐवजीं. वस्तुतः यष्टुम् हें द्वितीयेचें रूप आहे तसेंच 'यष्टवे' हें चतुर्थीचें होय. अर्थ एकच. तुमर्थ अव्ययाऐवजीं यष्टुम्, यष्टवे, यष्टोः आणि यष्टौ हीं रूपें वेदांत संभवतात.—'अप्रतिम'='असश्चतः'. हा शब्द किंचित् कठिण आहे. सायणाचार्य निश्चयपूर्वक अर्थ करीत नाहींत. आम्ही प्रयोगान्तरांस अनुसरून केला आहे.

७. रूपवती ज्या रात्र आणि उषा त्यांस या यज्ञांत [मी] बोलावितों, [कीं त्यांनीं] येऊन [या] आमच्या कुशासनावर बसावें.

८. सुजिह्व, असे जे ते मेधावी दिव्य दोन होते त्यांस [मी] बोलावितों. ते आमचा हा यज्ञ संपादोत.

९. इळा, सरस्वती [आणि] मही [ह्या] तीन कल्याणकारक [आणि] दुःख न देणाऱ्या देवी कुशासनावर बसोत.

7. I invoke the beautiful Night and Dawn in this sacrifice that they may come and sit on this our Kus'a grass.

8. I invoke those two divine hotris, who are good-tongued [and] wise. May they perform this our sacrifice.

9. May Ilâ, Sarasvatî [and] Mahî, three blissful and unhurting goddesses sit on the Kus'a seat.

---

७. 'रात्र आणि उषा' म्हणजे येथें रात्र आणि उषा यांच्या अभिमानिनी देवी समजावयाच्या, रात्र आणि प्रभात हे काळ समजावयाचे नाहींत असें सायणाचार्य म्हणतात.—'त्यांनीं येऊन बसावें'='आसदे.' 'आसदे' हें चतुर्थ्यन्त तुमर्थ अव्यय आहे. 'यष्टवे' ही जशी पूर्वील ऋचेंत तुमर्थी चतुर्थी आहे तशी आसदे हीहि आहे हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. तात्पर्य असें कीं, रात्र आणि उषा एतद्रूपी देवतांनीं येऊन या दर्भासनावर बसावें म्हणून त्यांस मी बोलावीत आहें.

८. या मंत्रांत सांगितलेले दोन होते म्हणजे दोन प्रकारचे अग्नी (दैव्यहोतृनामक) असें सायणाचार्य म्हणतात. दुसऱ्या आप्रीसूक्तांवरून पाहतां हे दोघे 'प्रचेतसनामक' दोघे देव होत. ते दोघे म्हणजे अग्नि आणि आदित्य अथवा अग्नि आणि वरुण अथवा वरुण आणि आदित्य होत.—'सुजिह्व' म्हणजे सुवक्ते, गोड बोलणारे.

९. 'इळा'. (इडा) हें अन्नाचें अथवा स्तुतीचें नांव आहे. येथें स्तुतिरूपी देवतेचें नांव होय. 'सरस्वती' म्हणजे नदीविशेष त्याची देवता. 'मही' ह्या शब्दाचा मूळ अर्थ 'मोठी'. परंतु ह्या मंत्रांत तो अर्थ नाहीं. तें एका देवतेचें नांव आहे. अन्य आप्रीसूक्तांत इळा, सरस्वती आणि भारती अशा तीन देवी वर्णिल्या आहेत त्यापेक्षां येथें सांगितलेली मही ही भारतीच घ्यावी कीं [illegible] सायणाचार्य तर घेतातच. परंतु इतर दोन आप्रीसूक्तांत मही ही देवता आली आहे यास्तव ही स्वतंत्र असावी असें दिसतें. सायणाचार्य म्हणतात कीं, या तीन देवी म्हणजे अग्नीच्याच वेगवेगळ्या विभूती होत.

इह त्वष्टारमग्रियं विश्वरूपमुप ह्वये ।
अस्माकमस्तु केवलः ॥ १० ॥

इह । त्वष्टारम् । अग्रियम् । विश्वऽरूपम् । उप । ह्वये ।
अस्माकम् । अस्तु । केवलः ॥ १० ॥

अव सृजा वनस्पते देव देवेभ्यो हविः ।
प्र दातुरस्तु चेतनम् ॥ ११ ॥

अव । सृज । वनस्पते । देव । देवेभ्यः । हविः ।
प्र । दातुः । अस्तु । चेतनम् ॥ ११ ॥

स्वाहा यज्ञं कृणोतनेन्द्राय यज्वनो गृहे ।
तत्र देवाँ उप ह्वये ॥ १२ ॥ २५ ॥

स्वाहा । यज्ञम् । कृणोतन । इन्द्राय । यज्वनः । गृहे ।
तत्र । देवान् । उप । ह्वये ॥ १२ ॥ २५ ॥

---

भाषायाम्.

१०. इह अग्रियं विश्वरूपं [च] त्वष्टारम् [अहम्] उपह्वये । [स] केवलोस्माकमस्तु ॥

११. हे देव वनस्पते [त्वं] देवेभ्य [इदं] हविरवसृज । ['तस्य हविषो] दातुश्चेतनं प्रास्तु ॥

१२. [हे ऋत्विजः] यज्वनो गृहे इन्द्राय स्वाहया यज्ञं कुरुत । [अहं] तत्र देवानुपह्वये ॥

१०. श्रेष्ठ [ आणि ] विश्वरूप त्वष्ट्याला [मी] या [यज्ञां]त बोलावितों. [तो] सगळा आमचाच होओ

१०. I invoke Tvashtri, the foremost and the multiform, here. May he be wholly ours.

११. हे देवा वनस्पती, तूं हें हवि देवांप्रत प्रविष्ट कर. [ या ] हविर्दात्या [ यजमाना ]ची प्रसिद्ध भरभराट होओ.

11. Give to the gods, O god Vanaspati, [this] oblation. May the offerer [of it] prosper.

१२. यजमानाच्या घरीं स्वाहा म्हणून इंद्रासाठीं यज्ञ करा; [मी] तेथें देवांस बोलावितों.

12. Offer a sacrifice to Indra in the house of the sacrificer with [the exclamation] Svâhâ; I invoke the gods thither.

---

१०. 'त्वष्टा' हा देवाचा सुतार अथवा विश्वकर्मा. त्वष्ट्यानें सकल प्राणी निर्माण केले, त्याणें देवांचीं हत्यारें करून दिलीं ( उदाहरणार्थ इंद्राचें वज्र ), तो देवांचा शिल्पी होय, तो मनुष्यांचीं व जनावरांचीं शरीरें निर्मितो, तो वृद्धि, ऋद्धि, आणि सौंदर्य यांचा दाता होय इत्यादि वेदांत सांगितलें आहे. त्वष्टा आणि सूर्य एकच असें मागाहून मानूं लागले. त्याला या ऋचेंत 'विश्वरूप' असें म्हटलें आहे त्याचें कारण बहुतकरून असें असावें कीं, तो सकळ वस्तूंस रूप ( सौंदर्य ) देत असतो असें प्रसिद्ध आहे. सायणाचार्य त्वष्टा म्हणजे येथें अग्नीचीच एक विभूति असें म्हणतात.— 'तो सगळा आमचाच होओ' म्ह. तो इतर उपासकांकडे न जाओ. त्याची पूर्ण कृपा आम्हांवर, इतरांवर न होओ असें जेव्हां म्हणावयाचें असतें तेव्हां वैदिक ऋषि 'तो सगळा आमचाचं होओ' असा सुंदर प्रयोग करितात.

११. 'देवा वनस्पती'. हा वनस्पति म्हणजे यूप म्हणून जो लांकडाचा खांब पशूस बांधण्याकरितां असतो तो होय. पण तो खांब झाला तरी अग्नीचीच एक विभूति होय असें सायणाचार्य म्हणतात. यज्ञशालेच्या दरवाजांवर जसें देवत्व आरोपिलें तसाच या यूपावर देवत्वाचा आरोप केला आहे. यज्ञाला जीं जीं उपकरणें लागत तीं तीं सर्व यज्ञसिद्धीस अवश्य आहेत असें समजून त्यांस देव असें कल्पून त्यांस सूक्तांत गोविलें आहे.

१२. 'स्वाहा म्हणून'. 'स्वाहा' शब्द वेदांत क्रियाविशेषणार्थी आढळतो. जर मूळशब्द औकारान्त असेल तर येथें 'स्वाहया' ऐवजीं तृतीयेचें रूप समजलें पाहिजे. यज्ञहवि अर्पण करितांना 'स्वाहा' असें जें म्हणतात तोच हा शब्द. सायणाचार्य येथें स्वाहा म्हणजे एक अग्नीचीच विभूति असें म्हणतात.

या आप्रीसूक्तांत विशेष इतकें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे कीं, त्यांतील प्रत्येक ऋचेंत वेगवेगळी देवता सांगितली आहे. आणि फार प्राचीन जीं सूक्तें ऋग्वेदांत आहेत त्यांसारिखें हें केवळ भक्तिदर्शक स्तवनाचें सूक्त नव्हे तर यज्ञाच्या संबंधानें रचलेलें आहे.

## सूक्तम् १४.

ऋषिः कण्वपुत्रो मेधातिथिः । विश्वे देवा देवता । गायत्री छन्दः ॥

**ऐभिरग्ने दुवो गिरो विश्वेभिः सोमपीतये ।**
**देवेभिर्याहि यक्षि च ॥ १ ॥**

आ । एभिः । अग्ने । दुवः । गिरः । विश्वेभिः । सोमऽपीतये ।
देवेभिः । याहि । यक्षि । च ॥ १ ॥

**आ त्वा कण्वा अहूषत गृणन्ति विप्र ते धियः ।**
**देवेभिरग्न आ गहि ॥ २ ॥**

आ । त्वा । कण्वाः । अहूषत । गृणन्ति । विप्र । ते । धियः ।
देवेभिः । अग्ने । आ । गहि ॥ २ ॥

---

### भाषायाम्.

१. हे अग्ने एतैर्विश्वैर्देवैः [ साकम् ] [ अस्माकं ] दुवः ( =परिचर्या ) गिरः (=स्तुतीश्) [ च प्रति ] सोमपीतये आयाहि । [ तान् ] यज च ॥

२. हे विप्र कण्वास्त्वामाह्वयन्ति । [ ते ] तव धियः ( =त्वयि या परिचर्याधियस्ता ) गृणन्ति । हे अग्ने त्वं देवैः [ सह ] आगच्छ ॥

## सूक्त १४.

ऋषि आणि वृत्त, पूर्ववत्. देवता, विश्वेदेव.

१. हे अग्नी, [आमची जी ही] सेवा [आणि हीं] स्तोत्रें त्यांजप्रत त्या विश्वे देवांसहवर्तमान सोमपानार्थ ये आणि यज्ञ पूर्ण कर.

२. [हे अग्नी] कण्वांनीं तुला ही हाक मारिली आहे; हे मेधावी [अग्नी], ते तुझ्या विषयींच्या भक्तींचा घोष करीत आहेत; हे अग्नी, तूं देवांसहवर्तमान येथें ये.

## HYMN 14.

To the *Vis've Devas.* Author and Metre as before.

1. With those Vis've Devas come hither, Agni, to our service [and] prayers for drinking Soma, and perform the sacrifice.

2. The Kanvas are invoking thee; wise Agni, they are singing forth their pieties towards thee; come hither, Agni, with the gods.

---

१. 'विश्वेदेव' याचा पदशः अर्थ सकल देव. पण देवांचा वर्गविशेष या अर्थी 'विश्वेदेव' याचा प्रयोग आढळतो. याविषयीं सूक्त तीन ३. ऋ. ७ यावरील टीप पाहा ( पृष्ठ १८ ).

मंत्राचा भावार्थ असा कीं, अग्नीनें विश्वेदेवांस घेऊन यावें आणि त्यांचें यजन करावें. येण्याचें प्रयोजन सोमपान करणें हें होय.—'यज्ञ पूर्ण कर' म्हणजे मानवी होता जसा यज्ञ संपादितो तसा अग्नीनें येऊन यज्ञ संपादावा. यज्ञ संपादण्याची शक्ति अग्नीस असल्याविषयीं पूर्वी आलेंच आहे.

२. 'कण्वांनीं तुला ही हाक मारिली आहे.' असें दिसून येतें कीं, जो कवि अथवा ऋषि सूक्त रची आणि गाई त्याबरोबर त्याच्या कुटुंबांतील सगळीं माणसें तें सूक्त गात. आणि तें सूक्त ऋषीनें (म्हणजे कवीनें) जर एकट्यानें गाइलें तर तें तो आपल्या कुटुंबाच्या तर्फे गातो अशी समजूत असे. म्हणजे ख्रिस्ती लोकांमध्यें जशीं कुटुंबांतील सर्व माणसें एकत्र जमून प्रार्थना करितात तशी करण्याची चाल प्राचीन आर्य लोकांत होती. आणि कोणत्याहि ऋषीनें सूक्तें रचिलीं तरी तीं त्याच्या कुटुंबांतील वंशज मागाहून आपलीं सूक्तें आहेत असें समजून म्हणत असत. तूर्त काठेवाडांत व दुसऱ्या आर्यप्रदेशांत भाटांनीं रचिलेली कविता प्रत्येक राजपुतकुळांत पुरातन काळापासून चालत आलेली ती आपली प्रिय मिळकत असें समजून गात असतात. व जसें एकादें घरचें पुस्तक अथवा दागिना घराच्या बाहेर देण्यास लोक नाखुष असतात तशी ती कविता बाहेर जाऊं देत नाहींत. त्याप्रमाणेंच ऋग्वेदसूक्तांची अवस्था प्राचीनकाळीं होती. ज्या ज्या कुळांतील

इन्द्रवायू बृहस्पतिं मित्राग्निं पूषणं भगम् ।
आदित्यान्मारुतं गणम् ॥ ३ ॥

इन्द्रवायू इति । बृहस्पतिम् । मित्रा । अग्निम् । पूषणम् । भगम् ।
आदित्यान् । मारुतम् । गणम् ॥ ३ ॥

---

## भाषार्थम्.

३. [ अहम् ] इन्द्रवायू बृहस्पतिं मित्रेण [ सहितम् ] अग्निं पूषणं भगमादित्यान्मारुतं गणं [ च ] [ ह्वये ] ॥

---

ऋषींनीं स्तोत्रें रचिलीं त्याच्या त्याच्या कुटुंबांत व मागाहून वंशांत तीं तीं स्तोत्रें गात आणि प्रार्थना करीत. नंतर कांहीं काळानें हीं सर्व सूक्तें एकत्र करून त्यांची संहिता ( वेदव्यासानें? ) केली तेव्हां हीं ऋग्वेदाचीं सूक्तें अशाच असंहितस्थितींत होतीं.

म्हणून ह्या सूक्ताचा कर्ता मेधातिथि एकलाच होता तरी तो कण्वकुळांतील असल्यामुळें त्याच्या कुळांतील लोक त्याजबरोबर प्रार्थनेस बसले होते असें समजलें पाहिजे.–'घोष करीत आहेत' म्हणजे हें प्रस्तुत सूक्त म्हणून.–'देवासहवर्तमान ये.' अग्नि इतर देवांस घेऊन येतो आणि अर्पण केलेलें हविरन्न त्यांजकडून खाववितो. अथवा त्यांस न आणितां तें अन्न घेऊन जातो आणि देव असतील तेथें पोंहचवितो अशी प्राचीन आर्यजनांची समजूत इतकी प्रसिद्ध आहे कीं, ती जिकडे तिकडे वेदमंत्रांत व्यापून आहे.

३. इंद्र, वायु, बृहस्पति, मित्र, अग्नि, पूषा, भग, आदित्यगण [ आणि ] मरुद्गण यांस [ मी बोलावितों ].

3. [I invoke] Indra, Vâyu, Brihaspati, Mitra, Agni, Pûshan, Bhaga, the Âdityas and the host of the Maruts.

---

३. 'बृहस्पति' म्हणजे 'प्रार्थनेचा अथवा स्तुतीचा प्रभु'. ही एक देवता होय, आणि ती वेदांत मोठी महत्त्वाची आहे. बृहस्पति हा मनुष्यांनीं देवाला अर्पण केलेली स्तुति अथवा प्रार्थना सफल करितो. त्यालाच वाचस्पति आणि ब्रह्मणस्पति (ब्रह्मण:=स्तुतीचा, पति='प्रभु') असेंहि नांव आहे. तो देवभक्तांचा कनवाळू आणि भक्तिरहित नास्तिकांपासून त्यांचें संरक्षणकर्ता असें वर्णिलें आहे. तो देवाप्रत केलेल्या स्तुतींचा प्रभु असल्यामुळें त्यास देवांचा पुरोहित असें म्हणतात. आणि यावरूनच त्याला मागाहून इंद्रादि देवांचा गुरु मानिला आहे, आणि तो मोठा वक्ता आहे असें पुराणांत वगैरे प्रसिद्ध झालें आहे. दैत्यांचा गुरु शुक्र आणि देवांचा बृहस्पति असें पुराणादिकांत जें सांगितलें आहे व त्या संबंधानें ज्या कथा वर्णिल्या आहेत त्यांचें बीज वेदांत बृहस्पतीविषयीं जें सांगितलें आहे त्यांत आहे.—'पूषा' हीहि वेदामध्यें एक बरीच महत्त्वाची देवता होय. पूषा म्हणजे पोषणाची, अभिवृद्धीची व भरभराटीची देवता. तो अन्नाचा प्रभु ( इळस्पति ) आहे, त्याच्या घरीं अन्नें भरलेलीं आहेत, त्याजजवळ संपत्ति विपुळ आहे (विश्ववेदा:, पुरुवसु: ), तो देवांस घेऊन येतो व मनुष्यांचें रक्षण करितो. तो प्रकाश घेऊन येतो, तो सकळ जनांस पाहतो, तो सोन्याच्या तारवांतून समुद्रावर व अंतरिक्षांत चालतो, त्याच्या मागून त्याच्या मार्गानें सूर्य व तारे जातात, तो मनुष्यांचे मार्ग सुरक्षित ठेवणारा होय, इत्यादि त्याविषयीं वेदांत वर्णिलें आहे. तें मागाहून उत्तरोत्तर येत जाईल.—'भग' हाहि एक वैदिक देव आहे. तो अदितीचा मुलगा आणि कल्याणाचा दाता. उषा ही त्याची बहीण होय. असें वेदांत सांगितलें आहे.—'आदित्य.' आदित्यशब्दाचा अक्षरश: अर्थ 'अदितीचे पुत्र' असा आहे. पण ते किती आहेत व त्यांचीं नांवें काय हें निश्चयानें सांगवत नाहीं. केव्हां केव्हां एकट्या वरुणासच आदित्य असें म्हटलें आहे. मित्र आणि वरुण यांसच केव्हां केव्हां आदित्य म्हटलें आहे. इतर ठिकाणीं वरुण, मित्र आणि अर्यमा यांस तें नांव दिलें आहे, अथवा त्यांबरोबर इंद्र हा चौथा आदित्य गणिला जातो. केव्हां केव्हां पांच आदित्य सांगितले आहेत, ते सविता, भग, वरुण, मित्र आणि अर्यमा. इतर ठिकाणीं सहा सांगितले आहेत ते मित्र, अर्यमा, भग, वरुण आणि दक्ष. क्वचित् ते सात आहेत असाहि उल्लेख आहे. व आठांचाहि उल्लेख आहे. 'वसु' म्हणून जे देवविशेष वेदांत सांगितले आहेत त्यांजबरोबर यांचा उच्चार फारकरून येतो.—'मरुद्गण' पूर्वी ६ व्या सूक्तांत ५ व्या ऋचेवरची टीप पाहा ( पृष्ठ ४० ).

प्र वो भ्रियन्त इन्दवो मत्सरा मादयिष्णवः ।
द्रप्सा मध्वश्चमूषदः ॥ ४ ॥

प्र । वः । भ्रियन्ते । इन्दवः । मत्सराः । मादयिष्णवः ।
द्रप्साः । मध्वः । चमूऽसदः ॥ ४ ॥

ईळते त्वामवस्यवः कण्वासो वृक्तबर्हिषः ।
हविष्मन्तो अरंकृतः ॥ ५ ॥

ईळते । त्वाम् । अवस्यवः । कण्वासः । वृक्तऽबर्हिषः ।
हविष्मन्तः । अरम्ऽकृतः ॥ ५ ॥

---

## भाषायाम्.

४. [ हे देवा ] [ इमे ] मत्सरास् ( =तृप्तिकरा ) मादयिष्णवो द्रप्सा मधुराश्चमूषदः (=पात्रस्थिताः) इन्दवो युष्मभ्यं प्रभ्रियन्ते ॥

५. [ हे अग्ने ] त्वामवस्यवो वृक्तबर्हिषो हविष्मन्तोलंकर्तारः कण्वा ईडते ॥

४. [ हे देव हो ], हे जे पात्रांत घातलेले संतोषकारक, माद उत्पन्न करणारे, थपथप गळणारे, गोड सोमरस ते तुम्हांस अर्पण केले आहेत.

५. [ हे अग्नी ], [ तुझ्या ] कृपेविषयीं उत्सुक, [ तुझ्यासाठीं ] कुशासन पसरून सिद्ध असलेले, हवि घेऊन तयार असलेले आणि परिचर्यायुक्त [असे] कण्व तुजप्रत स्तवीत आहेत.

4. To you are offered, ye gods, [these] Somas standing in the cup, that are agreeable, intoxicating, falling in drops, [and] sweet.

5. [Agni], the Kanvas, desirous of [thy] favour, ready with the seat of the Kus'a grass, carrying the sacrificial oblation, [and] prepared to sacrifice, are [thus] praising thee.

४. वर तिसऱ्या ऋचेंत जे देव सांगितले व पहिल्या आणि दुसऱ्या ऋचांत जे देव सांगितले त्यास या चवथ्या ऋचेंत सोम अर्पण केले आहेत. ही ऋचा लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे. तींत सोमाचे कितीएक प्रसिद्ध गुण वर्णिले आहेत. एक तर सोमरस 'मत्सर' म्हणजे हर्षकारक, किंवा संतोषकारक होत. पण इतकेंच नव्हे, तर ते 'मादयिष्णु' म्हणजे माद आणणारे, अंमल चढे असें करणारे. शिवाय ते 'द्रप्स' म्हणजे थपथप गळणारे, व तेणेंकरून पानाची इच्छा उत्पन्न करणारे. सोम गाळतांना खालीं भांडें ( चमस=प्याला ) ठेविलें म्हणजे त्यांत ते गळत म्हणून 'द्रप्स' असें त्यास म्हटलें आहे. त्याशिवाय सोमरस हे मधुर, गोड ('मधु') होते, आणि ते प्याल्यांत घातलेले आहेत ते देवांस दिसतच आहेत. यावरून या सोमरसाचें स्वरूप व त्याची मातबरी किती होती तें सहज दिसून येतें. 'माद आणणारे' हा सोमाचा गुण वेदामध्यें प्रसिद्ध आहे आणि देवांस सोमरस अर्पण करितांना बहुतकरून हा सोम मादकारक आहे यास्तव तुम्हीं प्या अशी प्रार्थना उपासक करीत होते असें अनेक ऋचांवरून दिसून येतें. आधुनिक मद्यपी आधुनिक मद्याची प्रशंसा यापेक्षां चांगली करूं शकेल?

५. 'कण्व तुजप्रत स्तवीत आहेत.' म्हणजे कण्वकुळांत उत्पन्न झालेले आम्ही स्तवीत आहों, यास्तव तूं ये. देवांस आळविण्याची आणि प्रसन्न करून घेण्याची उत्सुकता प्राचीन आर्यजनांची कशी होती तें या ऋचेवरून दिसून येतें.

घृतपृष्ठा मनोयुजो ये त्वा वहन्ति वह्नयः ।
आ देवान्त्सोमपीतये ॥ ६ ॥ २६ ॥

घृतऽपृष्ठाः । मनःऽयुजः । ये । त्वा । वहन्ति । वह्नयः ।
आ । देवान् । सोमऽपीतये ॥ ६ ॥ २६ ॥

तान्यजत्राँ ऋतावृधोऽग्ने पत्नीवतस्कृधि ।
मध्वः सुजिह्व पायय ॥ ७ ॥

तान् । यजत्रान् । ऋतऽवृधः । अग्ने । पत्नीऽवतः । कृधि ।
मध्वः । सुऽजिह्व । पायय ॥ ७ ॥

ये यजत्रा य ईड्यास्ते ते पिबन्तु जिह्वया ।
मधोरग्ने वषट्कृति ॥ ८ ॥

ये । यजत्राः । ये । ईड्याः । ते । ते । पिबन्तु । जिह्वया ।
मधोः । अग्ने । वषट्ऽकृति ॥ ८ ॥

## भाषायाम्.

६. [ हे अग्ने ] ये घृतपृष्ठा मनोयुजो वह्नयो (=वाहास्) त्वां वहन्ति [ तैर् ] देवान् सोमपानार्थमा[ वह ] ॥

७. हे अग्ने यजनीयान्सत्यवर्धकांस्तान्पत्नीसहितान् [ अत्र ] स्थापय । हे सुजिह्व [ तान् ] मधुं (=सोमं) पायय [च] ॥

८. हे अग्ने ये [ ये ] यजनीया ये [ये] ईड्याः (=स्तवनीयास्) ते [ते] [सर्वे देवा ] वषडित्युक्ते सति तव जिह्वया मधुं पिबन्तु ॥

६. [ हे अग्नी ], जे [ तुझे ] मृदु आणि नरम पाठीचे घोडे, [तुझ्या] मनांत [संकल्प] येतांच जुंपले जाणारे असे, तुला वाहून नेत असतात [ त्यांच्या योगें करून ] देवांस सोम पिण्याकरितां येथें [ आण ].

७. हे अग्नी, त्या यजनीय [आणि] यज्ञवर्धक [देवां]स त्यांच्या पत्नींसहित घेऊन ये; [आणि] हे सुजिह्व [अग्नी], [ हा ] मधुर सोमरस त्यांस पाज.

८. हे अग्नी, जे [जे म्हणून] यजनीय [ आणि ] जे [जे] स्तुत्य [असतील] ते [ते सकल देव] [हा] मधुर सोमरस, वृषट् असें म्हणतांच, तुझ्या जिह्वेनें पिओत.

6. [By means of] the horses which have backs as soft and smooth as clarified butter [and] which, harnessing themselves promptly according to thy wish, carry thee, [bring thou] hither, [Agni], the gods to drink the Soma.

7. Put here with their wives those adorable gods that promote the sacrifice and, sweet-tongued [Agni], make them drink of the sweet Soma.

8. Whatever [the gods], Agni, that deserve to be sacrificed to [and] whatever [the gods] that deserve to be praised, may they drink of the sweet Soma with thy tongue, so soon as Vashat is pronounced.

६. 'मृदु आणि नरम पाठीचे'= 'घृतपृष्ठाः.' पदशः अर्थ, तुपाप्रमाणें [ गुळगुळीत आणि नरम ] आहे पाठ ज्याची.—'तुझ्या मनांत येतांच जुंपले जाणारे'='मनोयुजः'. म्हणजे त्यास हातानें जुंपावें लागत नाहीं. जुंपण्याचा संकल्प तुझ्या मनांत आला कीं ते लागलेच जुंपले जातात. मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, तुझे सुंदर जे घोडे तूं रथास जोडीत असतोस आणि जे तुझा रथ ओढीत असतात ते तूं आपल्या रथास जोडून त्यांत देवांस बसीव आणि त्यांस इकडे घेऊन ये.

७. 'यज्ञवर्धक'='ऋतावृधः'. ऋता-वृध् याचा अर्थ बहुतकरून सत्यधर्मापासून म्हणजे यज्ञापासून आनंद पावणारे, यज्ञाच्या योगानें सुख पावणारे असा नित्य होत असतो. सायणाचार्य यज्ञवर्धक असा अर्थ करितात तो संभवत नाहीं असें दिसत नाहीं. यास्तव तो येथें आम्हीं घेतला आहे, परंतु यज्ञानें तुष्ट होणारे यज्ञतुष्ट असा अर्थ केल्यास चालेल.—घेऊन 'ये'='कृधि'. अक्षरशः, 'ठेव' 'येथें ठेव.' शान्ते 'करिष्यसि' पदं पुनराश्रमेस्मिन् हें शाकुन्तल वाक्य आमच्या वाचकांस आठवतच असेल. शिवाय पूर्वी १३ व्या सूक्ताच्या ३ ऱ्या मंत्रांत कृधातूचा प्रयोग असाच

आकीं सूर्यस्य रोचनाद्विश्वान्देवाँ उषर्बुधः ।
विप्रो होतेह वक्षति ॥ ९ ॥
आकीम् । सूर्यस्य । रोचनात् । विश्वान् । देवान् । उषःऽबुधः ।
विप्रः । होता । इह । वक्षति ॥ ९ ॥
विश्वेभिः सोम्यं मध्वग्न इन्द्रेण वायुना ।
पिबा मित्रस्य धामभिः ॥ १० ॥
विश्वेभिः । सोम्यम् । मधु । अग्ने । इन्द्रेण । वायुना ।
पिब । मित्रस्य । धामऽभिः ॥ १० ॥
त्वं होता मनुर्हितोऽग्ने यज्ञेषु सीदसि ।
सेमं नो अध्वरं यज ॥ ११ ॥
त्वम् । होता । मनुःऽहितः । अग्ने । यज्ञेषु । सीदसि ।
सः । इमम् । नः । अध्वरम् । यज ॥ ११ ॥

## भाषायाम्.

९. विप्रो होता [ अग्निः ] उषर्बुधो विश्वान् देवान्सूर्यस्य रोचनात् ( =दीप्तप्रदेशाद् ) अत्रावहतु ॥

१०. हे अग्ने [त्वं ] विश्वै[ र्देवैः सह ] इन्द्रेण वायुना मित्रस्य धामभि[ र्विभूतिभिश्च सह ] मधुरं सोमं पिब ॥

११. हे अग्ने मनुर्हितो होता त्वं यज्ञेषु [नि]षीदसि । स [ त्वम् ] अस्माकमिममध्वरं यज ॥

केला आहे तो पाहा.—'सुजिह्व' म्ह. चांगली जिह्वा अथवा वचन, वाणी आहे ज्याची तो.

८. ही ऋचा फार चमत्कारिक आहे. १ ल्या ऋचेंत अग्नीस 'विश्वे देवांला' आणण्याविषयीं प्रार्थना झाली. २ ऱ्या ऋचेंत साधारण रीतीनें 'देवांस' घेऊन ये म्हणून सांगितलें. ३ ऱ्या ऋचेंत इंद्र, वायु, बृहस्पति, मित्र, पूषा, भग, आदित्यगण आणि मरुद्गण हे जे मुख्य देव त्यांचा विशेष निर्देश करून त्यांस मी बोलावितों असें ऋषि म्हणाला. ७ व्या ऋचेंत वर सांगितलेल्या सगळ्या देवांच्या बायका पण आण असें सांगितलें. इतकें झालें तरी ऋषीच्या मनांत शंका राहिली कीं, न जाणों याच्या बाहेरहि कांहीं देव व देवी राहिल्या असतील, व ते मधुर सोमाला चुकतील. यास्तव म्हणतो कीं, जे जे म्हणून पूजनीय, यजनीय, आणि स्तवनीय देव असतील ते सगळे घेऊन हा सोम पिओत. आतां यानंतर दुसरे राहिलेच नाहींत यांत संशय नाहीं.

वषट् ( किंवा वौषट् ) हा एक ओम् आणि स्वाहा शब्दाप्रमाणेंच परम गूढ आणि संदिग्ध अर्थाचा शब्द आहे. याज्येच्या अंतीं त्याचा उच्चार होत्यामें केल्यावर अध्वर्यूनें हवि अग्नींत टाकावें असा नियम आहे.

९. विद्वान् होता [ असा जो अग्नि तो ] प्रातःकाळीं जागृत होत असणाऱ्या विश्वे देवांस सूर्यप्रकाशित स्वर्लोकाहून येथें घेऊन येओ.

9. May the learned priest Agni bring hither from the region of solar light the Vis've Devas (*All the Gods*) that awake with the dawn.

१० हे अग्नी, तूं विश्वेदेव, इंद्र, वायु [ आणि ] मित्राच्या विभूती यांसहवर्तमान [ हें ] सोमाचें मधुर पेय पी.

10. With the Vis've Devas with Indra, Vâyu, and, with the forms of Mitra, drink thou, Agni, this sweet drink of Soma.

११. हे अग्नी, मनुष्यांस हितकारक असा तूं होता यज्ञांमध्यें बसत असतोस; तर तूं हा आमचा यज्ञ संपाद.

11. Thou, Agni, sittest in the sacrifices an invoker beneficent to men. Do thou, therefore, perform this our sacrifice.

---

९. 'प्रातःकाळीं जागृत होतें असणाऱ्या.' असें लक्ष्यांत ठविलें पाहिजे कीं, आधुनिक आर्यजनासारिखे प्राचीन आर्यजन आळशी व उशीर होईपर्यंत बिछान्यावर पडून राहणारे नव्हते. ते मोठ्या पहाटेस उठून देवयजन करीत. त्याप्रमाणें हें सूक्तहि मोठ्या पहाटेस म्हणत आहेत असें कल्पिलें पाहिजे. आपण पहाटेस उठून यजन करीत आहों, पण देव उठले असतील कीं नाहीं अशी ऋषीस प्रथम शंका आली. म्हणून म्हणतो कीं, देव प्रातःकाळीं जागृत होणारे आहेत.—'विश्वे देवांस' याचा 'सकळदेवांस', असाहि अर्थ केल्यास चालेल. पण सूक्त ३ ऋ. ७ यावरील टीप १८ व्या पृष्ठावर पाहा.

१०. 'विश्वे देव' सूक्त ३ ऋ. ७ यावरील टीप १८ व्या पृष्ठावर पाहा.—'मित्राच्या विभूती'='मित्रस्य धामभिः'. धाम याचा अर्थ गण असा येथें कोणी करितात. आम्हीं सायणास अनुसरून अर्थ केला आहे. मित्राच्या विभूती म्हणजे पूषा, भग, सविता, सूर्य ह्या असाव्या.—'सोमाचें मधुर पेय'=सोम्यं मधु=मधुं सोमम्. अग्नीनें येऊन देवांसहित सोम प्यावा म्हणून ऋषि कसी विनवणी करीत आहे तें पाहा.

११. 'मनुष्यांस हितकारक'='मनुर्हितः'. म्ह. देवांस मर्त्य जनांच्या यज्ञाप्रत बोलावून आणून तेणेंकरून हित करणारा.—'बसत असतोस'. साधारण मानवी होता बसत असतो तसा.—'आमचा', म्ह. कण्वाचा.

युक्ष्वा ह्यरुषी रथे हरितो देव रोहितः ।
ताभिर्देवाँ इहा वह ॥ १२ ॥ २७ ॥

युक्ष्व । हि । अरुषीः । रथे । हरितः । देव । रोहितः ।
ताभिः । देवान् । इह । आ । वह ॥ १२ ॥ २७ ॥

भाषायाम्.

१२. [हे अग्ने] [त्वम्] अरुषी रोहितो हरितो (=वडवा) रथे युङ्क्ष्व हि । ताभिर्देवानिह आवह ॥

---

## सूक्तम् १५.

ऋषिः कण्वपुत्रो मेधातिथिः । देवता– १ ऋतवः । २ मरुतः । ३ त्वष्टा । ४ अग्निः । ५ इन्द्रः । ६ मित्रावरुणौ । ७-१० द्रविणोदाः । ११ अश्विनौ । १२ अग्निः । गायत्री छन्दः ॥

इन्द्र सोमं पिब ऋतुना त्वा विशन्त्विन्दवः ।
मत्सरासस्तदोकसः ॥ १ ॥

इन्द्र । सोमम् । पिब । ऋतुना । आ । त्वा । विशन्तु । इन्दवः ।
मत्सरासः । तत्ऽओकसः ॥ १ ॥

भाषायाम्.

१. हे इन्द्र [त्वम्] ऋतौ सोमं पिब । मत्सरास् (=तृप्तिकरास्) तदोकस इन्दवः (=सोमबिन्दवस्) त्वामाविशन्तु ॥

१२. हे देवा [ अग्नी ], पिवळ्या [ आणि ] लाल घोड्या तूं [आपल्या] रथास जोडच [आणि] त्यांच्या योगेंकरून देवांस इकडे घेऊन ये.

12. Do thou, god Agni, harness thy tawny, [and] red mares to [thy] chariot [and] bring hither the gods by means of them.

१२. 'पिवळ्या'='अरुषीः'. सायणाचार्य जाणारी, चपळ, असा अर्थ करितात आणि 'हरितः' (घोड्या) याचा 'नेण्यास समर्थ' असा धात्वर्थास अनुसरून अर्थ सांगतात.

ह्या अग्नीच्या घोड्या कोण? ज्वाळा असाव्या असें म्हणण्यास सबल कारणें आहेत.

देवांस आणण्याविषयीं अग्नीची किती प्रकारें आणि किती वेळ विनवणी झाली तें लक्ष्यात ठेवण्याजोगें आहे. घोड्यावरून, रथांतून आणि शेवटीं घोड्या जोडून देवांस घेऊन ये असें ऋषि म्हणतो.

---

## सूक्त १५.

ऋषि आणि वृत्त, पूर्ववत्. देवता-१ ऋतु, २ मरुत्, ३, त्वष्टा, ४ अग्नि, ५ इंद्र, ६ मित्रावरुण, ७-१० द्रविणोदा, ११ अश्वी, १२ अग्नि.

## HYMN 15.

Author and Metre as before. To the *seasons* (1), The *Maruts* (2), *Tvashṭri* (3), *Agni* (4), *Indra* (5), *Mitrâvaruṇau* (6), *Draviṇodás* (7-10), The *As'vins* (11), *Agni* (12).

१. हे इंद्रा, तूं योग्य काळीं सोम पी. [ सोमरसाचे ] तृप्तिदायक बिंदु तुझ्या उदरांत, तेंच त्यांचें घर असल्याप्रमाणें, रिघोत.

1. Indra, drink the Soma in season. May the gratifying drops [of Soma] enter thy stomach as if that were their home.

१. अनुक्रमणिकेप्रमाणें पहिल्या ऋचेची देवता 'ऋतवः' म्हणजे वसन्तादि ऋतु होत. पण तसें म्हणण्यास तींत 'ऋतुना' हा शब्द आला आहे याशिवाय दुसरें कारण कांहीं नाहीं. वस्तुतः या ऋचेची देवता इंद्रच समजावयाची.

'योग्यकाळीं'='ऋतुना'. म्हणजे अर्पण करण्यास योग्य असा जो काळ आम्ही समजतों आणि ज्या तशा काळीं आम्ही सोम अर्पण करितों त्या काळीं पी. पिण्यास अवकाश करूं नकोस.— 'तेंच त्यांचें घर असल्याप्रमाणें'. हे शब्द ('तदोकसः') फार चमत्कारिक

मरुतः पिबत ऋतुना पोत्राद्यज्ञं पुनीतन ।
यूयं हि ष्ठा सुदानवः ॥ २ ॥

मरुतः । पिबत । ऋतुना । पोत्रात् । यज्ञम् । पुनीतन ।
यूयम् । हि । स्थ । सुऽदानवः ॥ २ ॥

अभि यज्ञं गृणीहि नो ग्नावो नेष्टः पिब ऋतुना ।
त्वं हि रत्नधा असि ॥ ३ ॥

अभि । यज्ञम् । गृणीहि । नः । ग्नावः । नेष्टरिति । पिब । ऋतुना ।
त्वम् । हि । रत्नऽधाः । असि ॥ ३ ॥

---

**भाषायाम्.**

२. हे मरुतः [ यूयम् ] ऋतौ पोत्रात् [ सोमं ] पिबत । यज्ञं पुनीत । यूयं हि सुदानवः स्थ ॥

३. हे स्त्रीमन् नेष्टः [ त्वम् ] अस्माकं यज्ञमभिगृणीहि । ऋतौ पिब । त्वं हि रत्नधा ( =रत्नस्य दाता ] असि ॥

---

आहेत. कोणी झाला तरी आपल्या घरांत मोठ्या सुखानें, औत्सुक्यानें व आनंदानें शिरतो. तसेंच हे आम्हीं अर्पण केलेले सोमरस मोठ्या सुखानें, औत्सुक्यानें व आनंदानें तुझ्या पोटांत शिरोत; म्हणजे त्यामुळें तुला आनंद होईल यांत संशय नाहीं. इंद्रानें सोम प्यावा म्हणून सूक्तवक्त्याची केवढी उत्सुकता आहे पाहा!

२. हे मरुतांनो, तुम्ही पोत्रांतून योग्य काळीं [सोम] प्या, [आणि ह्या] यज्ञास शोभा आणा; कारण कीं तुम्हीं मोठे दाते आहां.

३. हे पत्नीसहिता नेष्टया, तूं आमचा [हा] यज्ञ मान्य करून घे, [आणि] योग्य काळीं [सोम] पी. कारण कीं तूं उत्कृष्ट संपत्तीचा दाता आहेस.

2. Maruts, drink [the Soma] in season from the cup, [and] grace the sacrifice. For you are great givers.

3. Accept our sacrifice, O wife-accompanied Neshtri, [and] drink [the Soma] in season. For thou art a giver of excellent wealth.

---

२. 'पोत्रातून,' 'पोत्रात्,' पोत्र या भांड्यातून. पोत्र म्हणजे (सायणाचार्य म्हणतात) पीता म्हणून जो ऋत्विज असतो त्याचें भांडें अथवा पात्र.—'योग्य काळीं.' वरील टीप पाहा. 'योग्य काळीं सोम प्या' याच्या संबंधानें ऋत्विज् शब्दाची व्युत्पत्ति लक्ष्यात ठेवण्याजोगी आहे. कारण अर्पण केलेला सोम देवांनीं योग्य काळीं प्यावा अशी जशी उपासकांची इच्छा असे तसाच तो योग्य काळीं अर्पावा म्हणजे योग्य काळीं यज्ञ करावा हें मोठें भूषण मानण्याचा प्रचार होता. त्यावरूनच योग्य काळीं (ऋतुना) यजतो (यजते) म्हणून ऋत्विज् असें भूषणार्थ नांव उपासकास पडलें.—'कारण कीं तुम्हीं मोठे दाते आहां'. हा अर्थ आम्हीं 'यूयं हि ष्ठा सुदानवः' या शब्दांचा केला आहे. तो करण्यास शब्दांची, व्याकरणाची अथवा अन्वयाची कांहींच अडचण नाहीं; किं बहुना तसाच केला पाहिजे असें त्यावरून दिसतें. पण 'सुदानवः' हें पद सर्वानुदात्त असल्यामुळें स्वरावरून त्या अर्थास अडचण येते. स्वराचा विचार करतां 'कारण कीं, हे मोठे दाने हो, तुम्ही आहां' असा अर्थ केला पाहिजे. परंतु 'तुम्ही आहां' म्हणजे काय? यांत विधिपद मुळींच नाहीं. यास्तव 'यूयं हि ष्ठा सुदानवः' असा पाठ धरून आम्हीं भाषांतर केलें आहे. असें करण्यास आम्हास सबळ कारण असें दिसतें कीं, पुढच्या (७ व्या) ऋचेंत आणि ५ व्या ऋचेंत शेवटच्या चरणांत प्रस्तुत ऋचेच्या शेवटल्या चरणांत असलेल्या कारणासारिखेंच कारण सोम पिण्यासाठीं सांगितलें आहे. 'त्वं हि रत्नधा असि' आणि 'तवेद्धि सख्यमस्तृतम्' हीं जशीं सोम कां प्यावा याला कारणें आहेत तसेंच 'यूयं हि ष्ठा सुदानवः' हेंहि कारण आहे, आणि त्या कारणाचा अर्थ 'सुदानवः' अशा स्वराचा पाठ घेतल्याशिवाय होणार नाहीं.

३. या ऋचेंत थोडीशी अडचण आहे. आम्हीं अर्थ पदशः केला आहे. पण 'पत्नीसहित नेष्टा' हा कोण? सायणाचार्याप्रमाणें 'नेष्टा' म्हणजे 'त्वष्टा' देव (वर सू. १३ ऋचा १० यावरील

अग्ने देवाँ इहा वह सादया योनिषु त्रिषु ।
परि भूष पिब ऋतुना ॥ ४ ॥

अग्ने । देवान् । इह । आ । वह । सादय । योनिषु । त्रिषु ।
परि । भूष । पिब । ऋतुना ॥ ४ ॥

ब्राह्मणादिन्द्र राधसः पिबा सोममृतूँरनु ।
तवेद्धि सख्यमस्तृतम् ॥ ५ ॥

ब्राह्मणात् । इन्द्र । राधसः । पिब । सोमम् । ऋतून् । अनु ।
तव । इत् । हि । सख्यम् । अस्तृतम् ॥ ५ ॥

युवं दक्षं धृतव्रत मित्रावरुण दूळभम् ।
ऋतुना यज्ञमाशाथे ॥ ६ ॥ २८ ॥

युवम् । दक्षम् । धृतऽव्रता । मित्रावरुणा । दुःऽदभम् ।
ऋतुना । यज्ञम् । आशाथे इति ॥ ६ ॥ २८ ॥

## भाषायाम्.

४. हे अग्ने [ त्वं ] देवानिहावह । [ तान् ] त्रिषु योनिषु ( =स्थलेषु ) साद( =स्थापय ) । [ तान् ] परिभूष ( =अलंकुरु ) । ऋतौ पिब ॥

५. हे इन्द्र [ त्वं ] राधसो ब्राह्मणाद् (=ब्रह्मपात्राद्) ऋतूननु सोमं पिब । तवे हि सख्यमस्तृतम् ( =अविनष्टम् ) [ अस्ति ] ॥

६. हे धृतव्रतौ मित्रावरुणौ [ युवां ] दुर्दभं (दुष्प्रतारणीयं ) दक्षं ( =बलं [ तेन च ? ] ऋतौ यज्ञमाशाथे ॥

टीप पाहा ) आणि 'पत्नीसहित' म्हणजे 'स्त्रिया ज्याला आहेत तो.' पण ह्या स्त्रिया कोण्याच्या तें ते सांगत नाहींत. साधारण 'ग्ना' हें देवस्त्रियांचें नांव आहे. व साधारण 'नेष्टा' हें एका ऋत्विजाचें नांव आहे. पण येथें नेष्टा म्हणजे ऋत्विग्विशेष घेऊन निर्वाह होणार नाहीं. तेव्हां सायणाचार्यांप्रमाणें 'त्वष्टा' असा 'अर्थ समजणें भाग दिसतें. 'मान्य करून घे'='अभि गृणीहि.' पदश अर्थ, 'वाखाण,' 'बरा आहे अ म्हण.'—'कारण कीं, तूं उत्कृष्ट संपत्तीच दाता आहेस.' हें सोम पी असी प्रार्थना केली त्याचें कारण अथवा हे होय.

४. हे अग्नी, तूं देवांस येथें आण, [आणि] तीन ठिकाणीं बसीव, [आणि] शोभीव. [आणि] योग्य काळीं [सोम] पी.

५. हे इंद्रा, तूं हवी [ठेवण्या]च्या ब्रह्मपात्रांतून योग्य काळीं सोम पी. कारण कीं तुझीच मैत्री अविनाशी [ होय ].

६. ज्यांनीं [या जगांत] नियम बांधिले आहेत असे हे मित्रावरुण हो, जिची प्रतारणा करितां येत नाहीं अशी शक्ति तुम्हां दोघांस प्राप्त झाली आहे [आणि म्हणूनच] योग्य काळीं तुम्हांस यज्ञहवि प्राप्त होतें.

4. Agni, bring the gods hither, seat [them] in three places, beautify [them]. And drink [the Soma] in season.

5. Drink the Soma in season, Indra, out of the vessel of the Brahma-priest, which contains the oblation. For the friendship of thee only is everlasting.

6. Mitra and Varuna, who enforce your laws [in this universe], you [have attained] a power that cannot be deceived, [and therefore you] receive the sacrifice in season.

---

४. 'तीन ठिकाणीं'='त्रिषु योनिषु.' म्हणजे ज्या तीन ठिकाणीं अग्नि असतो तीं तीन स्थळें.—'शोभीव'='परिभूष.' 'तूं त्याच्या सभोंती राहा' असाहि अर्थ होईलसें वाटतें.

५. या मंत्रांत एक शब्दाविषयीं अडचण आहे तितकी खेरीज करून बाकी सोपा आहे. 'राधसः' हा शब्द कठिण आहे. राधः म्हणजे धन, अन्न; आणि देवांस द्यावयाचें अन्न ( हवि ) असाहि अर्थ होतो. व आम्हीं हा शेवटचा घेतला आहे. पण 'राधसो ब्राह्मणात्' हा प्रयोग कठिण आणि क्लिष्ट खरा. दुसऱ्या रीतीनें अर्थ करण्यास सुगम मार्ग दिसत नाहीं. 'ब्राह्मण' म्हणजे ब्रह्मा म्हणून जो यज्ञांत ऋत्विज् असतो त्याचें पात्र. सायणाचार्य 'राधसो ब्राह्मणात्' म्हणजे 'धनभूत ब्रह्मपात्रांतून' असें म्हणतात. पण अन्नमय ब्रह्मपात्रांतून म्हटल्यास शोभेल असे समजून आम्हीं अर्थ केला आहे.—'कारण कीं तुझीच मैत्री अविनाशी होय,' इतर देवांची अथवा मनुष्यांची तशी नव्हे, ती नाशवंत आहे. ही केवळ प्रशंसा आहे. इंद्रास सोम पिण्यास सांगितलें त्याचें हे कारण आहे.

६. हा मंत्र बराच कठिण आहे. काठिन्य हें कीं, 'दूळभं दक्षम्' म्हणजे काय आणि त्याचा संबंध कशाशीं घ्यावयाचा ? दक्ष म्हणजे शक्ति, बळ, प्रताप, आणि दूळभ ( दुर्, दभ=दुर्दभ ) म्हणजे जिला ठकवितां येत नाहीं ती. दक्ष हें द्वितीयान्त पद आम्ही ' आशाथे' या क्रियापदाचें ( यज्ञम् हेंहि कर्म

द्रविणोदा द्रविणसो ग्रावहस्तासो अध्वरे ।
यज्ञेषु देवमीळते ॥ ७ ॥

द्रविणःऽदाः । द्रविणसः । ग्रावऽहस्तासः । अध्वरे ।
यज्ञेषु । देवम् । ईळते ॥ ७ ॥

द्रविणोदा ददातु नो वसूनि यानि शृण्विरे ।
देवेषु ता वनामहे ॥ ८ ॥

द्रविणःऽदाः । ददातु । नः । वसूनि । यानि । शृण्विरे ।
देवेषु । ता । वनामहे ॥ ८ ॥

द्रविणोदाः पिपीषति जुहोत प्र च तिष्ठत ।
नेष्ट्रादृतुभिरिष्यत ॥ ९ ॥

द्रविणःऽदाः । पिपीषति । जुहोत । प्र । च । तिष्ठत ।
नेष्ट्रात् । ऋतुऽभिः । इष्यत ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

७. द्रविणसो (=द्रव्यं वाञ्छन्तो) ग्रावहस्ता अध्वरे यज्ञेषु [च] द्रविणोदां देवमीडते ॥

८. यानि [कानि] वसूनि शुश्रुविरे [तानि तानि] द्रविणोदा अस्मभ्यं ददातु । [वयं हि] तानि देवेषु (=देवयजनार्थं) वनामहे (=प्रार्थयामहे) ॥

९. द्रविणोदाः पिपासति । [यूयं] जुहुत । प्रतिष्ठत च । नेष्ट्रादृतौ [सोमम्] इष्यत (आसृजत) ॥

---

आहे तसेंच) कर्म समजतों.

परंतु सर्व ऋचेचा अर्थ ' ज्यांनीं ' [या जगांत] नियम बांधिले आहेत ' असे हे मित्रावरुण हो, कौशल्यानें के- ' लेला [आणि] कठिण [असा] ' यज्ञ तुम्ही दोघे वेळावर पावत अस- ' तां' असाहि केल्यास चालेल.

७. द्रव्याची इच्छा करणारे [उपासक] द्रव्यदात्या देवाला हातांत [सोम]पाषाण घेऊन अध्वरांत [आणि] यज्ञांत स्तवितात.

८. जीं [जीं] [म्हणून] धनें ऐकून ठाऊक आहेत [तीं] द्रव्यदाता [अग्नि] आम्हांस देओ. तीं आम्ही देवप्रीत्यर्थ वांछितों.

९. द्रव्यदात्या [अग्नीस] [सोम] पिण्याची इच्छा झाली आहे. [तर उपासक हो, तुम्ही] हवन करा, आणि संमुख उभे राहा. नेष्ट्रांतून योग्य काळीं [सोम] घाला.

7. Desirous of riches [the worshippers] with the [pressing] stones in their hands praise the god who is the giver of riches in the Soma [and-other] sacrifices.

8. May [Agni] the giver of riches give us whatever riches are heard of. Towards the [service of the] gods we desire them.

9. [Agni] the giver of riches wishes to drink [Soma]. Pour out oblations [to him], and stand forward. Offer from the neshtra-vessel in season.

---

७. 'द्रव्यदात्या' ='द्रविणोदाः.' हें विशेषण सायणाचार्य द्वितीयेचें एकवचन आहे असें समजतात. आणि पक्षीं प्रथमा समजून 'त्वं पिब' इतकें अध्याहृत घेतात. आम्हीं त्याच्या पहिल्या अर्थास अनुसरून भाषांतर केलें आहे. पण 'द्रविणोदाः' हें द्रविणोदाम् या अर्थी रूप चमत्कारिक आहे यांत संशय नाहीं. 'द्रविणोदाः' हें 'द्रविणोद' याचें अनेकवचनी प्रथमेचें रूप संभवेल (ऋ. १. ५३. १ पाहा); परंतु तसें मानिल्यास तें 'ग्रावहस्तासः' याचें जें अध्याहृत विशेष्य 'ऋत्विजः' त्याचें विशेषण होईल. आणि ऋत्विजास अथवा उपासकांस द्रव्यदाते हें विशेषण लावण्यांत स्वारस्य नाहीं. शिवाय पुढील दोन ऋचांत द्रविणोदाः हें मंत्रारंभींच (या ऋचेंत आहे तसें) असून अग्नीला लाविलें आहे.— '[सोम]पाषाण'= ग्राव. सोम ज्यांत कुटीत त्या पाषाणास ग्राव अशी संज्ञा आहे.—'अध्वरांत आणि यज्ञांत'='अध्वरे यज्ञेषु.' 'अध्वर' म्हणजे सोमयज्ञ आणि 'यज्ञ' म्हणजे दुसरे विशेष यज्ञ असें सायणाचार्य म्हणतात.—'देवाला'. हा देव म्हणजे येथें अग्नि समजावयाचा.

८. 'देवप्रीत्यर्थ'='देवेषु.' म्हणजे धनें मिळवून देवांची सेवा यज्ञादिकांनीं आम्हांस करितां यावी यासाठीं. मंत्रवक्त्याचा भावार्थ असा आहे कीं, अमुक प्रकारचीं धनें आम्हांस दे म्हणून सांगणें अवश्य नाहीं. जीं जीं धनें लोकांच्या ऐकण्यांत आजपावेतों आलीं आहेत तीं तीं सर्व तो आम्हांस देओ.

९. मंत्रवक्ता म्हणतो कीं, अग्नीस सोम पिण्याची इच्छा झाली आहे तर

यत्त्वा तुरीयमृतुभिर्द्रविणोदो यजामहे ।
अध स्मा नो ददिर्भव ॥ १० ॥

यत् । त्वा । तुरीयम् । ऋतुऽभिः । द्रविणःऽदः । यजामहे ।
अध । स्म । नः । ददिः । भव ॥ १० ॥

अश्विना पिबतं मधु दीद्यग्नी शुचिव्रता ।
ऋतुना यज्ञवाहसा ॥ ११ ॥

अश्विना । पिबतम् । मधु । दीद्यग्नी इति दीदिऽअग्नी । शुचिऽव्रता ।
ऋतुना । यज्ञऽवाहसा ॥ ११ ॥

गार्हपत्येन सन्त्य ऋतुना यज्ञनीरसि ।
देवान्देवयते यज ॥ १२ ॥ २९ ॥

गार्हऽपत्येन । सन्त्य । ऋतुना । यज्ञऽनीः । असि ।
देवान् । देवऽयते । यज ॥ १२ ॥ २९ ॥

## भाषायाम्.

१०. हे द्रविणोदः यस्माद् [ वयं ] त्वां तुरीयमृतावृतौ यजामहे तस्मात् [ त्वम् ] अस्माकं ददि( =दाता ) भव ॥

११ हे दीद्यग्नी ( =द्योतमानाग्नियुक्तौ ) शुचिव्रतौ यज्ञवाहसौ ( =यज्ञवाहकौ ) अश्विनौ, [ युवाम् ] ऋतौ मधु ( =मधुरं सोमं ) पिबतम् ॥

१२. हे सन्त्य ( =दातः ) [ अग्ने ] [ त्वं ] गार्हपत्येन ऋतौ यज्ञनीरसि । [ तस्मात् ] देवयते देवान्यज ॥

लौकर त्याला नेष्ट्रांतून सोम अर्पण करा.—'नेष्ट्रांतून.' 'नेष्टा' म्हणून जो यज्ञांत ऋत्विज् असतो त्याचें पात्र 'नेष्ट्र' होय असें सायणाचार्य म्हणतात.— 'घाला', 'इष्यत'. इष् धातूचा ( घालणें, सोडणें, ओतणें ) हा अर्थ इतर बऱ्याच ठिकाणीं आला आहे.

१०. हे द्रव्यदात्या [अग्नी], ज्याअर्थी आम्ही तुला चवथा [समजून] योग्यकाळीं यज्ञानें भजतों त्याअर्थी आम्हांस तूं दाता हो.

११. हे देदीप्यमान अग्नीनें युक्त [आणि] शुचिव्रत [आणि], यज्ञास वाहून नेणारे असे अश्वी हो, तुम्ही [हा] मधुर सोमरस योग्य काळीं प्या.

१२. हे [इष्ट]दात्या [अग्नी], तूं गृहपति या नात्यानें योग्य काळीं यज्ञनायक आहेस. [तर] [या] देवभक्तासाठीं [तूं येऊन] देवयजन कर.

10. Inasmuch as, Giver of riches, we sacrifice to thee in season as the Fourth, be thou therefore a giver to us.

11. As'vins, accompanied by brilliant Agni, observers of pure laws, [and] carriers of the sacrifice, drink in season [this] sweet Soma.

12. By thy position as 'Lord of the house', O beneficent [Agni], thou art the leader of the sacrifice in season. [Therefore] sacrifice to the gods in behalf of [this] pious worshipper.

---

१०. 'चवथा [समजून] ... भजतों'. 'चवथा' म्हणजे कार्य आणि पहिले तीन कोण? सायणाचार्यांच्या छापील भाष्यांत 'तुरीयं' (चवथा) याच्या अर्थावर भाष्यच नाहीं, तें कदाचित् छापतांना चुकून राहिलें असावें. परंतु गार्हपत्यादि जे तीन अग्नी अथवा अग्नीच्या तीन विभूती त्या तीन आणि द्रव्यदाता अग्नि ('द्रविणोदाः') हा चवथा असेलसें दिसतें. कारण ७ वी, ८ वी, ९ वी आणि ही १० वी या ऋचांत जो 'द्रविणोदाः' शब्द आला आहे आणि ज्याचें भाषांतर 'द्रव्यदाता [अग्नि]' असें आम्हीं केलें आहे तें केवळ विशेषण समजावयाचें नाहीं, तर अग्नीचें विशेषनामाप्रमाणें नांव समजावयाचें असें दिसतें.

११. 'देदीप्यमान अग्नीनें युक्त' 'दीप्ताग्नी.' सायणाचार्य म्हणतात "प्रकाशणारे असे आहवनीयादि अग्नी ज्याजबरोबर आहेत असे."—'शुचिव्रत.' म्हणजे ज्याचे नियम अथवा ज्याची वर्तणूक पवित्र आहे असे.—'अश्वी.' या देवजोडीविषयीं पूर्वी सूक्त ३ ऋ. १ यावर १४ व्या पृष्ठावर दिलेली टीप पाहा.

१२. मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, अग्नीला गृहपति अशी संज्ञा आहे त्यापेक्षां तो यज्ञाचा नायक म्हणजे मुख्य अधिकारी, पुरस्कर्ता होय. यास्तव त्याणें येऊन मंत्रवक्ता जो देवभक्त त्याजकरितां देवांस यज्ञ करावा. यांत गृहपति-(अथवा गार्हपत्य)- शब्दावर श्लेष आहे. अग्नीला यज्ञ संपादण्याची शक्ति आहे व जो पुरोहित आणि होता

## सूक्तम् १६.

ऋषिः कण्वपुत्रो मेधातिथिः । इन्द्रो देवता । गायत्री च्छन्दः ॥

आ त्वा वहन्तु हरयो वृषणं सोमपीतये ।
इन्द्र त्वा सूरचक्षसः ॥ १ ॥

आ । त्वा । वहन्तु । हरयः । वृषणम् । सोमऽपीतये ।
इन्द्र । त्वा । सूरऽचक्षसः ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. वृषणं त्वा हरयः सोमपानार्थमावहन्तु । हे इन्द्र सूर्यसदृशास् [ ते ] त्वाम् [ आवहन्तु ] ॥

आहे असें पूर्वी पुष्कळ ठिकाणीं आलें-च आहे.—'देव भक्तासाठीं' ='देवयते.' देवयन् म्हणजे देवाची भक्ति करणारा. आणि जे अनार्य देवाची भक्ति अथवा देवास यज्ञ करीत नसत त्यांचें नांव अदेवयन् असें आहे.

## सूक्त १६.

ऋषि आणि वृत्त, पूर्ववत्. देवता, इंद्र.

१. हे इंद्रा, [तुझे] पिवळे घोडे तुला बलवंताला सोम पिण्यासाठीं येथें वाहून आणोत, सूर्याप्रमाणें दिसणारे [ते घोडे] तुला येथें [आणोत].

## HYMN 16.

To *Indra*. Author and Metre as before.

1. May [thy] tawny horses, bring hither thee, who art manly, for drinking Soma; [may they] brilliant as the sun [bring] thee, O Indra.

१. मंत्राचें तात्पर्य इतकेंच कीं, सूर्याप्रमाणें ज्याची कांति जिकडे तिकडे एकदम पसरते असे इंद्राचे पिवळे घोडे बलवंत इंद्राला सोमपानार्थ मंत्रवक्त्याजवळ आणोत; म्हणजे ते घोडे आपल्या रथास जोडून इंद्र येओ आणि सोम पिओ.

'बलवंताला'=वृषणम्.' हा शब्द वैदिक भाषेंत मोठ्या महत्त्वाचा आहे. वृषन् म्हणजे मूळ अर्थ वर्षण करणारा, गळणारा. या अर्थी वृषन् हें विशेषण मेघाला लाविलेलें आढळतें (ऋ. १. १८१. ८.) आणि धारा आणि गाईच्या कासेसहि लाविलेलें आहे. त्यानंतर वर्षण म्हणजे सेचन, (=रेताचें सेचन) करण्यास समर्थ असा जो तो असा अर्थ होतो; म्हणजे पुरुषत्व ज्याला आहे, जो नपुंसक नव्हे तो. या अर्थी वृषन् हें पुरुषजातीच्या प्राण्यास (जसें पुरुषास, घोड्यास, बैलास) लाविलेलें आढळतें. नंतर केवळ शक्तिमान् असा त्याचा अर्थ होतो. या अर्थी तें मनुष्यांस मरुद्गणांस व इतर देवांस लागतें, व वस्तूंलाहि लागतें (उदाहरणार्थ सोम, रथ, वज्र, पाषाण, ध्वज, शर्म इत्यादि) व भाववाचक विशेष्यालाहि लागतें (उदाहरणार्थ स्तोम=स्तुति, ध्वनि, यज्ञ, तेज, संपत्ति इत्यादि). नंतर वृषन् याचा नामाप्रमाणें प्रयोग केलेला आढळतो, आणि त्याचा अर्थ पुरुषत्व ज्याला आहे असा पुरुष, नपुंसक नव्हे तो, जो षंढ (=वध्रि) नव्हे तो; नंतर स्त्रीची कामना ज्याला आहे असा मनुष्य, कामातुर पुरुष; नंतर मादीची इच्छा करणारा कोणत्याहि जनावरजातीचा नर. वृषन् हें विशेषण इंद्राला, अग्नीला वगैरे देवांस लाविलेलें पुष्कळ ठिकाणीं आढळतें. त्याचा अर्थ वीर्यवान्, शूर, पुरुषत्वोपेत असा समजला पाहिजे. परंतु सायणाचार्य वृषन् शब्दाच्या धात्वर्थास अनुलक्षून वर्षण करणारा, कामांचा म्हणजे मनुष्यांचे हेतु पूर्ण करणारा असा अर्थ करून पुष्कळ ठिकाणीं निर्वाह करितात.

पुरुषत्व ज्याला आहे तो म्हणजे नवऱ्याचें काम बजाविण्याच्या स्थितींत जो असतो तो बलवान् होय अशी कल्पना सर्वकाळीं सर्व देशीं आहे. म्हणूनच पुरुषत्ववाचक अथवा पतित्ववाचक जितके शब्द आहेत

इमा धाना घृतस्नुवो हरी इहोप वक्षतः ।
इन्द्रं सुखतमे रथे ॥ २ ॥

इमाः । धानाः । घृतऽस्नुवः । हरी इति । इह । उप । वक्षतः ।
इन्द्रम् । सुखऽतमे । रथे ॥ २ ॥

इन्द्रं प्रातर्हवामह इन्द्रं प्रयत्यध्वरे ।
इन्द्रं सोमस्य पीतये ॥ ३ ॥

इन्द्रम् । प्रातः । हवामहे । इन्द्रम् । प्रऽयति । अध्वरे ।
इन्द्रम् । सोमस्य । पीतये ॥ ३ ॥

उप नः सुतमा गहि हरिभिरिन्द्र केशिभिः ।
सुते हि त्वा हवामहे ॥ ४ ॥

उप । नः । सुतम् । आ । गहि । हरिऽभिः । इन्द्र । केशिऽभिः ।
सुते । हि । त्वा । हवामहे ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

२. हरी इन्द्रमेता घृतस्नुवो धाना (=भ्रष्टयवतण्डुलान्) [प्रति] सुखतमे रथे अत्रोपवहताम् ॥

३. इन्द्रं प्रातर्हवामहे । इन्द्रं प्रयति (=प्रारब्धे) अध्वरे [हवामहे]। इन्द्रं सोमस्य पानार्थं [हवामहे] ॥

४. हे इन्द्र [त्वम्] अस्माकं सुतम् (=अभिषुतं सोमं) [प्रति] केशिभिर्हरिभिरागच्छ । [सोमे] सुते (=अभिषुते) [सति] हि [वयं] त्वा हवामहे ॥

---

तितके बलवाचक होतात. याचें उत्तम उदाहरण मालवणी कोंकणी भाषेंत आहे. तिकडचे लोक म्हणतात कीं, 'माका उठांक घोपाण नाय'=मला उठावयाला घोपण नाहीं. घोपण म्हणजे घोवपण, घोव म्हणजे नवरा. त्यावरून घोपण म्हणजे नवरेपणा=शक्ति. त्याप्रमाणें स्त्रियाहि आपल्याविषयीं बोलत असतात.

२. तुपानें थपथपीत अशा ह्या लाह्यांजवळ पिवळे घोडे इंद्राला परम सुखकारक रथांतून येथें वाहून आणोत.

३. इंद्राला आम्ही प्रातःकाळीं, इंद्राला यज्ञ चालू होतांच, इंद्राला आम्ही सोमपानार्थ बोलावीत असतों.

४. हे इंद्रा, तूं [आपल्या] अयाळी पिवळ्या घोड्यांच्या योगानें आमच्या [ह्या] सोमाप्रत ये; कारण कीं, सोम पिळून काढतांच आम्ही तुला बोलावीत आहों.

2. To these grains of parched corn suffused with clarified butter may Indra's pair of tawny horses bring him down in the easiest chariot.

3. Indra we invoke in the morning, [invoke] Indra at the commencement of the sacrifice, Indra for drinking the Soma.

4. Come up, Indra, to our extracted Soma by means of thy maned tawny horses. For we are calling thee directly the Soma is extracted.

---

२. 'तुपानें थपथपीत अशा लाह्यांजवळ'. देवांस अर्पण करावयाचे पदार्थ अति प्राचीनकाळीं काय काय होते त्याचा हा चांगला मासला आहे. अति प्राचीन काळीं गुरें ढोरें, त्यांपासून झालेले अथवा केलेले खाद्य पदार्थ आणि धान्य हीच आर्यलोकांची मुख्य संपत्ति होती. व तशा संपत्तीचे भाग ते आपल्या देवांस अर्पण करीत. जें उत्तम अन्न, मिष्टान्न समजून ते स्वतः खात तेंच त्या काळीं ते आपल्या देवांस अर्पण करीत. आणि त्यासच ते यज्ञ असें म्हणत. लाह्या आणि तूप अर्पण करण्याचा जो प्रचार पूर्वकाळीं चालू होता तो अजून बंद पडला नाहीं. कारण अक्षता, लाह्या आणि घृत यांशिवाय कोणती पूजा, कोणती क्रिया, आणि कर्म आपण करीत असतों?

३. सायणाचार्य म्हणतात कीं, "प्रातःकाळीं कर्मारंभीं म्हणजे प्रातःसवनाच्या वेळीं आम्ही इंद्राला बोलावितों; तसाच सोमयागास आरंभ होतांच म्हणजे माध्यंदिन सवन म्हणून जें दोनप्रहरीं यजन व्हावयाचें त्यावेळीं इंद्राला आम्ही बोलावितों; तसाच यज्ञाच्या समाप्तीच्या वेळीं म्हणजे तृतीयसवनाच्या वेळीं सोमपानार्थ इंद्राला बोलावितों." असा अर्थ इष्ट दिसतो खरा. आम्हीं त्यासच अनुलक्षून पण पदशः अर्थ केला आहे.

४. 'कारण कीं, सोम पिळून काढतांच' इत्यादि हें कारण लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे. उपासक म्हणतो कीं, आम्हीं सोम काढून इतर देवांस अजून अर्पण केला नाहीं अथवा आम्हीही प्यालों नाहीं, काढतांच प्रथम तुला हाक मारितों आहों. यास्तव हे इंद्रा, तूं ये.

वैदिक युगांतील परम प्राचीन काळीं सोमरस कसा तयार करीत हें नक्की सम-

**सेमं नः स्तोममा गह्युपेदं सवनं सुतम् ।**
**गौरो न तृषितः पिब ॥ ५ ॥ ३० ॥**

सः । इम् । नः । स्तोमम् । आ । गहि । उप । इदम् । सवनम् । सुतम् ।
गौरः । न । तृषितः । पिब ॥ ५ ॥ ३० ॥

**इमे सोमास इन्दवः सुतासो अधि बर्हिषि ।**
**ताँ इन्द्र सहसे पिब ॥ ६ ॥**

इमे । सोमासः । इन्दवः । सुतासः । अधि । बर्हिषि ।
तान् । इन्द्र । सहसे । पिब ॥ ६ ॥

**अयं ते स्तोमो अग्रियो हृदिस्पृगस्तु शंतमः ।**
**अथा सोमं सुतं पिब ॥ ७ ॥**

अयम् । ते । स्तोमः । अग्रियः । हृदिऽस्पृक् । अस्तु । शम्ऽतमः ।
अथ । सोमम् । सुतम् । पिब ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

५. स [ त्वम् ] अस्माकमिमं स्तोममिमं सुतम् (=अभिषुतं ) सोमं [ च ] उपागच्छ । [ त्वं ] तृषितो गौर इव [ तं सोमं ] पिब ॥

६. इमे इन्दवः सोमा अधि बर्हिषि सुता ( =अभिषुताः ) [ सन्ति ] । हे इन्द्र [ त्वं ] तान्सहसे ( =बलाय ) पिब ॥

७. अयमग्रियो हृदिस्पृक् स्तोमस्तुभ्यं शंतमोस्तु । अनन्तरं सुतम् ( अभिषुतं ) सोमं पिब ॥

---

जल्यास फार चांगलें होईल यांत संशय नाहीं. ऋग्वेदाचें सगळें नववें मंडळ सोमाविषयीं आहे, व त्याशिवाय इतर मंडलांतहि पुष्कळ सूक्तें व सूक्तभाग सोमाविषयीं आहेत. तूर्त इतकें दिग्दर्शन करणें आहे कीं, सोमवल्ली आणून, ग्रावे म्हणून जे पाषाण असत त्यांजकडून मग ते तुकडे एका चाळणी सारिख्या पात्रांत ठेवून त्यांजवर पाणी घालीत. आणि खालीं एक द्रोण म्हणून पात्र ठेवीत. त्यांत सोमाचे बिंदु गळत. ते आंबट असावे असें दिसतें. मग त्यांत दहीं, पीठ वगैरे पदार्थ घालून अंमल चढे अशा रीतीनें त्यास शिजवीत. मग तो अंमली झाल्यावर देवांस अर्पण करीत व आपण पीत.

५. तर [हे इंद्रा], तूं आमच्या ह्या स्तुतीप्रत, आमच्या ह्या सोमसवनाप्रत ये, [आणि] ताहानेलेल्या गौरमृगाप्रमाणें [सोमरस], पी.

६. हे सोमबिंदु दर्भावर गाळून काढिले आहेत. ते बळ येण्यासाठीं, हे इंद्रा, तूं पी.

७. [हे इंद्रा], हें उत्तम [आणि] अंतःकरणास वेधणारें स्तोत्र तुला परमसुखकारक होओ. त्यानंतर [हा] पिळून काढिलेला सोम तूं पी.

5. Come therefore thou to this our prayer, to this our sacrifice of the expressed Soma. Drink like a thirsty stag.

6. These dropping Somas have been expressed on the Kus'a grass. Drink them, Indra, to obtain strength.

7. May this prayer [which is] excellent [and] touching to the heart be most agreeable to thee. Drink then, [Indra], the expressed Soma.

---

५. मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, आम्ही तुझी जी ही स्तुति करीत आहों आणि तुला जो हा सोम अर्पण करीत आहों ती स्तुति आणि तो सोम ग्रहण करण्याकरितां तूं ये. आणि गौरमृग ताहनेलेला असून पाणी पितो तसा तूं हा सोम पी.—'गौरमृग'='गौरः'. हें कोणतें जनावर होतें तें निश्चयानें सांगवत नाहीं. पण अक्षरशः पाहतां तें एक प्रकारचें सफेत जनावर अथवा सावज असावेंसें दिसतें. हरिण पाणि पिऊं लागलें म्हणजे मोठ्या झपाट्यानें एकदम पुष्कळ पीतें म्हणून प्रसिद्ध आहेच. घोड्यासारिखें अथवा बैलासारिखें मंद मंद पीत नसतें.—'तर तूं'='स [त्वम्].' सू. १ ऋचा ९ याजवरील टीप पृष्ठ ६ वर, आणि सू. ४ ऋ. ९ याजवरील टीप पृष्ठ २८ वर पाहा. 'सः इमम्' याचा संहितापाठांतील 'सेमम्' हा संधि लक्ष्यांत ठेवण्याजोगा आहे.

६. 'दर्भावर गाळून काढिले आहेत', 'सुतासः अधि बर्हिषि.' म्हणजे गाळून दर्भावर पात्रांत ठेविले आहेत.—'बळ येण्यासाठीं...पी'='सहसे पिब.' ते पी म्हणजे तुला बळ येईल असा भावार्थ. सोमपान केल्यानें बळ येतें, आंगांत शक्ति येते व पराक्रम करण्याचा आवेश प्राप्त होतो असें पूर्वी सांगितलेंच आहे.

७. मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, या ठिकाणीं दोन वस्तु तुला अर्पण केल्या आहेत, पहिली ह्या सूक्तद्वारें केलेली स्तुति, आणि दुसरी ही कीं, गाळून तयार केलेला सोम. हें स्तोत्र तुला अगोदर मान्य होओ आणि तें मान्य झाल्यावर तूं हा सोम पी.

सूक्तवक्त्याच्या मतें त्याचें सूक्त किती चांगलें आहे आणि कसें मनोवेधक आहे व त्यामुळें तें इंद्रास कसें मान्य होण्याजोगें आहे तें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे.

विश्वमित्सवनं सुतमिन्द्रो मदाय गच्छति ।
वृत्रहा सोमपीतये ॥ ८ ॥

विश्वम् । इत् । सवनम् । सुतम् । इन्द्रः । मदाय । गच्छति ।
वृत्रऽहा । सोमऽपीतये ॥ ८ ॥

---

## भाषार्थः.

८. इन्द्रो विश्वमपि सुतं सवनम् ( =अभिषुतं सोमं ) [ प्रति ] मदाय गच्छति । वृत्रहा सोमपानाय [ गच्छति ] ॥

८. जेथें जेथें सोम काढितात तेथें तेथें तो सोम प्यावा म्हणून [आणि] मादयुक्त व्हावें म्हणून वृत्रघ्न इंद्र जात असतो.

8. To every expressed Soma whatsoever Indra the killer of Vritra goes, that he may drink the Soma [and] be intoxicated.

८. 'जेथें जेथें सोम काढितात तेथें तेथें'—'विश्वमित्सवनं सुतम्.' पदशः. 'पिळून काढिलेल्या प्रत्येकाहि सोमाप्रत'. म्हणजे सर्व उपासकांकडेस सोम पिऊन मद्दोत्पन्न हर्ष पावण्यासाठीं इंद्र जात असतो. कितीहि उपासक असले तरी त्या सर्वांच; सोम पिण्यास इंद्र जातो. एकाचा सोम पिऊन आतां माझी तृप्ति झाली, आतां दुसऱ्या कडेस मी जात नाहीं असें म्हणत नसतो.—'वृत्रघ्न'. वृत्राला मारणारा. वृत्र हा शब्द वेदांत मोठ्याच महत्त्वाचा आहे. ह्याचा अक्षरशः अर्थ, 'घेरणारा', 'वेष्टणारा'. वेदांत असें रूपक आहे कीं, आकाशांतून मेघोदकें जीं जमिनीवर पडतात त्याच कोणी गाई होत. त्या आकाशांत वृत्र हा घेरून अडविट्टो, त्यास खालीं येऊं देत नाहीं. मग इंद्र वृत्राशीं लढतो आणि त्याला आपल्या वज्रानें प्रहार करून मारितो. त्या वज्राच्या धारेस सुवर्णासारिखी कांति आहे. इंद्रानें वृत्राला मारितांच उदकें ( अथवा उदकरूपी गाई ) खालीं येऊन जमिनीवर वाहूं लागतात. या वृत्राशीं इंद्र युद्ध करितो तेव्हां सकल पृथ्वी आणि आकाश थरथरां कांपतात.

आतां हें जें रूपक सांगितलें त्यावरून स्पष्ट दिसून येईल कीं, वृत्र म्हणजे ज्यांत उदकें आवरून राहिल्याप्रमाणें भासतात तो ढग अथवा मेघ. इंद्राचें वज्र म्हणजे विद्युल्लता, आणि वज्रप्रहार म्हणजे मेघाची जी गर्जना होते ती, इंद्राचें आणि वृत्राचें युद्ध म्हणजे पाऊस पडण्यापूर्वीं विजांचे जे गडगडाट आणि मेघगर्जना होतात तेंच होय. आणि इंद्र म्हणजे ह्या सर्व गोष्टी आकाशांत जिच्या प्रतापानें होतात ती दिव्यशक्ति.

नंतर वृत्र हें पुराणांतरीं व इतिहासांत वगैरे एका असुराचें नांव झालें आणि इंद्रानें त्याला मारिलें त्याविषयीं विस्तारानें कथा रचल्या गेल्या.

आम्हीं जो प्रथम वृत्र शब्दाचा अर्थ सांगितला त्यावरून साधारण शत्रूचेंहि नांव वृत्र असें पडलें आणि अशा अर्थीं वेदांत पुष्कळ स्थलीं तो शब्द वापरलेला आढळतो. व प्रस्तुतस्थळीं तरी सायणाचार्य 'वृत्रहा' याचा अर्थ 'शत्रूस मारणारा' असा (आम्हांस वाटतें बरोबर नसतां ) करितात.

'मादयुक्त व्हावें म्हणून'. हा उद्देश लक्ष्यांत ठेवण्याजोगा आहे ह्यांत संशय नाहीं.

**सेमं नः काममा पृण गोभिरश्वैः शतक्रतो ।**
**स्तवाम त्वा स्वाध्यः ॥ ९ ॥ ३१ ॥**

सः । इमम् । नः । कामम् । आ । पृण । गोभिः । अश्वैः । शतक्रतो इति शतऽक्रतो ।
स्तवाम । त्वा । सुऽआध्यः ॥ ९ ॥ ३१ ॥

## भाषायाम्.

९. स [ त्वं ] हे शतक्रतो गोभिरश्वैश् [ च ] इमम् (=एतादृशं=गोश्वसंबन्धिनम्) अस्माकं काममापूरय । [ वयं ] त्वा सुबुद्धयः स्तवाम ॥

---

## सूक्तम् १७.

ऋषिः कण्वपुत्रो मेधातिथिः । इन्द्रावरुणौ देवता । छन्दः—
१–३–६–९ गायत्री । ४-५ पादनिचृत् ॥

**इन्द्रावरुणयोरहं सम्राजोरव आ वृणे ।**
**ता नो मृळात ईदृशे ॥ १ ॥**

इन्द्रावरुणयोः । अहम् । सम्ऽराजोः । अवः । आ । वृणे ।
ता । नः । मृळातः । ईदृशे ॥ १ ॥

## भाषायाम्.

१. अहं सम्राजोरिन्द्रावरुणयोरवः (=अवनम्) आवृणे । तावस्मादृशे [ जनाय ] मृडताम् । अथवा । तावीदृग्भ्यः अस्मभ्यं मृडताम् ॥

९. तर हे शतप्रज्ञ [इंद्रा], तूं आमची ही इच्छा गाई [आणि] घोडे देऊन पूर्ण कर. तुला आम्ही भाविक अंतःकरणानें स्तवीत राहूं.

9. Do thou, therefore, possessed of a hundred wisdoms, fulfil this our desire by [giving us] cows and horses. With pious hearts we will be praising thee.

९. 'शतप्रज्ञ'. पूर्वी सू. ४ ऋचा ८ यांतील 'बहुमेधावी' शब्दावरील टीप पाहा.—'ही'='इमम्.' म्हणजे गाई, घोडे मिळावे ही इच्छा. दुसरी इच्छा वर प्रदर्शित केलेली नाहीं. इमम् म्हणजे येथें 'एतादृशम्' असा अर्थ करावा. 'गोभिरश्वैः एतादृशीम् (=एतत्संबन्धिनम्=गोश्वसंबन्धिनं) कामम्' असा अन्वय घेऊन अर्थ करावा. 'इमम्' याजविषयीं पूर्वी ३४ व्या पृष्ठावर ९ व्या ऋचेवरील टीप पाहा.—'गाई घोडे देऊन'. पदशः, 'गाईनीं [आणि] घोड्यांनीं'. इतक्या मोठ्या देवापाशीं एवढें मोठें स्तोत्र करून शेवटीं सूक्तकार मागतो काय तें पहा. पण परम पुरातन वैदिक युगांत गुरें ढोरें हीच मोठी संपत्ति असे, यापुढें दुसरें कांहींच नसे हें आपण लक्ष्यांत ठेविलें पाहिजे.

---

## सूक्त १७.

ऋषि आणि वृत्त, पूर्ववत्. देवता—इंद्रावरुणौ (इंद्र आणि वरुण हे उभयतां).

१. मी महाराजे इंद्रावरुण यांची कृपा भाकितों. ते आम्हां सारिख्यांवर दया करोत.

## HYMN 17.

To *Indra* and *Varuṇa*. Author and Metre as before.

1. I wish for the support of the great kings Indra and Varuṇa. May they favour such persons as we are.

१. 'कृपा भाकितों,' 'अवः आवृणे,' रक्षण इच्छितों, त्यांनीं माझें रक्षण करावें असें मी इच्छितों.—'आम्हा सारिख्यांवर'='नः ईदृशे.' ऋग्वेदांत ईदृक् शब्द चारच ठिकाणीं आला आहे आणि तो अशाच प्रयोगीं चतुर्थ्यन्त आला आहे. त्या सर्व स्थलांवर लक्ष्य देऊन आम्हीं येथें भाषांतर केलें आहे. त्या वाक्यांतून त्वमेकस्य वृत्रहन्नविता द्वयोरसि । उतेदृशे यथा वयम् (ऋ. ६. ४५. ५) ही ऋचा मुख्यत्वें करून पाहा. दुसऱ्या वेदांत हा शब्द

गन्तारा हि स्थोवसे हवं विप्रस्य मावतः ।
धर्तारा चर्षणीनाम् ॥ २ ॥
गन्तारा । हि । स्थः । अवसे । हवम् । विप्रस्य । माऽवतः ।
धर्तारा । चर्षणीनाम् ॥ २ ॥
अनुकामं तर्पयेथामिन्द्रावरुण राय आ ।
ता वां नेदिष्ठमीमहे ॥ ३ ॥
अनुऽकामम् । तर्पयेथाम् । इन्द्रावरुणा । रायः । आ ।
ता । वाम् । नेदिष्ठम् । ईमहे ॥ ३ ॥
युवाकु हि शचीनां युवाकु सुमतीनाम् ।
भूयाम वाजदाव्नाम् ॥ ४ ॥
युवाकु । हि । शचीनाम् । युवाकु । सुऽमतीनाम् ।
भूयाम । वाजऽदाव्नाम् । ॥ ४ ॥

## भाषायाम्.

२. [ हे इन्द्रावरुणौ ] चर्षणीनां ( =मनुष्याणां ) धर्तारौ [ युवां ] हि मत्सदृशस्य विप्रस्य हवम् अवसे ( =अवनाय ) गन्तारौ स्थः ॥

३. हे इन्द्रावरुणौ [ युवां ] रायः अनुकाममातर्पयेथाम् ( =तृप्तिर्यथा स्यात्तथा आपूरयतम् ) । तौ युवां [ वयं ] नेदिष्ठमीमहे ( =याचामहे ) ॥

४. [ वयं ] हि युवयोः शचीनाम् ( =अवनकर्मणां ) युवयोः वाजदाव्नां ( =वाजस्य दात्रीणां ) सुमतीनां [ च ] भूयाम ॥

येतो तो सुद्धा बहुतकरून चतुर्थ्यन्तच येतो.

या ऋचेंतील प्रार्थना किती नम्र आणि भाविक आहे पाहा. रक्षण करणारे देव 'महाराज' होत, म्हणजे मोठ्या शक्तीचे व अधिकाराचे राजे होत; आणि ज्याचें रक्षण करावयाचें तो दीन, दास, दीनवाण्या स्थितींत आहे असें उपासक मंत्रवक्ता (मेधातिथि ऋषि ) म्हणतो. हा जो देवभजक भाव त्याला, आणि देवाधिदेव विष्णूच्या छातीवर ब्राह्मणानें लाथ मारिली आणि तेणेंकरून जें क्षत पडलें तो एक अलंकारच आहे असें समजून विष्णूनें तें क्षत बिरुद करून बाळगिलें आणि तो आपल्यावर ब्राह्मणाचा प्रसाद झाला असें मानिलें या अघोर पातकरूपी कथेला किती अंतर आहे पाहा !

२. कारण कीं, जनांचे प्रभु असे जे तुम्ही ते मजसारिख्या कवीच्या हाकेला [ ऐकून ], रक्षण करण्यासाठीं, जात असतां.

३. हे इंद्रावरुण हो, तुम्ही [ आमच्या ] इच्छेप्रमाणें [आम्हां-स] धनें देऊन तृप्त करालच. म्हणून तुम्ही [ आमच्या] अतिसंनिध असावें असें आम्ही प्रार्थितों.

४. कां कीं, तुमच्या पराक्रमांचे आम्ही [ विषय.] होऊं, तुमच्या द्रव्यदात्या प्रसादांचे [ आम्ही विषय होऊं.] असें करा.

2. For, protectors of the people you [O Indra and Varuna,] go at the call of a poet like me in order to protect [him].

3. You will, Indra and Varuṇa, satisfy us by the grant of riches according to [our] desire. We therefore pray you [to be] nearest [to us].

4. For may we belong to your prowess, may we belong to your wealth-bestowing favours.

---

२. इंद्रावरुणाची करुणा भाकतों असें जें पूर्वऋचेंत सांगितलें त्याचें कारण या ऋचेंत आहे. तें हें कीं, मजसारिख्या दीन कवीनें इंद्रावरुणांस हाक मारिली कीं, तिजसरशीं ते त्याचें संरक्षण करण्यासाठीं जात असतात. ही मंत्रवक्त्याची भाविक भक्ति लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे.

3. 'अतिसंनिध असावें,' 'नेदिष्ठम्'.—'म्हणून तुम्ही...असावें'=' ता वाम्'.—'नेदिष्ठमीमहे' याचा 'आम्ही तुम्हांस अगदी जवळचे नातलग समजून तुम्हांजवळ धनें मागत आहों' असाहि अर्थ होऊं शकेल. आणि तो वर दिलेल्या अर्थापेक्षां चांगला दिसतो. नेदिष्ठ म्हणजे अगदी जवळचा नातलग, परम सगा, परम प्रिय असा संबंधी. कसाहि अर्थ केला तरी 'नेदिष्ठम्' हें येथें क्रियाविशेषण घेणें अवश्य आहे. परम प्रिय सगा असेल तो जशी मनकामना पूर्ण करील तशी दुसरा कोणीहि केवळ 'अगदी संनिध' असल्या कारणानेंच करणार नाहीं.

आम्हीं वर केलेला अर्थ सायणाचार्यास अनुसरून केला आहे.

४. या मंत्रांत 'युवाकु' शब्द आहे त्याचा अर्थ 'तुम्हां दोघांची' असा समजून आम्हीं भाषांतर केलें आहे. 'युवाकु' म्हणजे 'युवयोः' असा जरी षष्ठीचा अर्थ आहे तरी तें येथें अव्यय आहे.—'युवाकु' हा शब्द असाच अव्ययार्थी पण चतुर्थी ऐवजीं आणखी एकदा ऋग्वेदींत आला आहे. तो "दुहीयन् मित्रधितये युवाकु राये च नो मिमीतं वाजवत्यै" ( ऋ. १. १२०. ९ ) यांत आहे.—'तुमच्या पराक्रमांचे आम्ही [ विषय ] होऊं असें करा'= 'युवाकु शचीनां भूयाम'. पदशः अर्थ, 'आम्ही तुमच्या पराक्रमाचे व्हावें असें करा'. म्ह० आम्हासाठीं तुम्ही पराक्रमांची

इन्द्रः सहस्रदान्नां वरुणः शंस्यानाम् ।
क्रतुर्भवत्युक्थ्यः ॥ ५ ॥ ३२ ॥

इन्द्रः । सहस्रऽदान्नाम् । वरुणः । शंस्यानाम् ।
क्रतुः । भवति । उक्थ्यः ॥ ५ ॥ ३२ ॥

तयोरिदवसा वयं सनेम नि च धीमहि ।
स्यादुत प्ररेचनम् ॥ ६ ॥

तयोः । इत् । अवसा । वयम् । सनेम । नि । च । धीमहि ।
स्यात् । उत । प्रऽरेचनम् ॥ ६ ॥

इन्द्रावरुण वामहं हुवे चित्राय राधसे ।
अस्मान्त्सु जिग्युषस्कृतम् ॥ ७ ॥

इन्द्रावरुणा । वाम् । अहम् । हुवे । चित्राय । राधसे ।
अस्मान् । सु । जिग्युषः । कृतम् ॥ ७ ॥

## भाषायाम्.

५. इन्द्रो वरुणश् [ च ] सहस्रदातॄणां शंसनीयानां [ मध्ये स्तः ] । [ तयोः ] क्रतुः (=प्रज्ञा) उक्थ्यो (=स्तवनीयो) [ भवति ] ॥

६. तयोरेव अवसा (=अवनेन) वयं [ धनं ] सनेम (=सनुयाम) निदधीमहि च । अपि च प्ररेचनमस्तु ॥

७. हे इन्द्रावरुणौ अहं चित्राय राधसे युवामाह्वयामि । [ युवाम् ] अस्मान्सुष्ठ [ यथा स्यात्तथा ] जिग्युषो ( =जितवतो=जययुक्तान् ) कुरुतम् ॥

कृत्यें करावीं.—'तुमच्या द्रव्यदात्या प्रसादाचे आम्ही [ विषय ] होऊं असें करा'—'वाजदात्रा युवाकु सुमतीनां भूयाम'. म्हणजे तुम्हीं आम्हांवर तुमचे द्रव्यदाते प्रसाद ( =ज्यापासून द्रव्य-प्राप्ति होते असे प्रसाद ) करावे.

सायणाचार्य—"कारण कीं, शचीनां "[ म्हणजे आमच्या ] कर्माचें [ जें "सोमरूपी हवि तें ] युवाकु म्हणजे "वसतीवरी उदकांनीं आणि दूध, "सातू इत्यादि दुसऱ्या द्रव्यांनीं मि-"श्रित [ आहे ] [ त्या प्रमाणेंच ] सु-"मतीनां म्हणजे सुबुद्धियुक्त अशा "ऋत्विजांचें [ स्तोत्ररूप वचनहि ] यु-"वाकु आहे, म्हणजे नानाविध स्तुत्य "गुणांनीं मिश्रित [ आहे ], त्यापेक्षा "हे इंद्रावरुण हो, तशा प्रकारचें हवि "स्वीकारणारे जे तुम्ही त्या तुमच्या "[ प्रसादें करून ] वाजदात्रा म्हणजे अ-"न्नप्रद पुरुषांमध्यें आम्हीं [ मुख्य ] "होऊं असें करा". युवाकु शब्दाचा अर्थ ते 'मिश्रित' असा करितात, आणि 'सोमरूप हावि' आणि 'स्तोत्ररूप वचन' आणि 'मुख्य' हे इतके शब्द अध्याहृत घेतात. परंतु 'युवाकु' शब्दाविषयीं सूक्त ३ ऋचा ३ यावर दिलेली १६ व्या पृष्ठावरची 'तुमचे' या विषयींची टीप पाहा.

५. सहस्रावधि द्रव्यातें देणारे [आणि] स्तवनीय जे [देव] त्यांतून इंद्र [आणि] त्यांतून वरुण हा [आहे]. [यांची] प्रज्ञा स्तुतिपात्र [आहे].

5. Indra [is one] of those [gods] that bestow a thousand-fold wealth [and] deserve to be praised. Varuna [too] is [one] of them. [Their] wisdom deserves to be praised.

६. त्याच दोघांच्या कृपेनें असें घडो कीं, आम्हांस [धन] मिळो आणि आम्हांस [त्याचा] संग्रह करितां येओ, आणि त्याहूनहि आमच्या जवळ अधिक उरो.

6. Through their favour, then, may we obtain [wealth] and may we lay it by; nay, may we have even a surplus.

७. हे इंद्रावरुणानो, मी सर्वप्रख्यात संपत्ती [मिळण्या]साठीं तुमचा धांवा करीत आहे. तुम्ही आम्हांस उत्तम यशस्वी करा.

7. Indra and Varuna, I invoke you for famous wealth. Make us great victors.

---

५. आम्ही होईल तितका पदशः आणि सरळ अन्वय धरून अर्थ केला आहे. सायणाचार्य अन्वय किंचित् निराळा घेतात. ते म्हणतात "सहस्रा-"वधि द्रव्यातें देणारे जे त्यांत इंद्र "धनदानाचा क्रतु म्हणजे कर्ता होय, "म्हणजे पुष्कळ धन देतो असा अर्थ. "तसाच वरुण स्तुत्य जे आहेत त्यां- "जमध्यें उक्थ्य म्हणजे स्तुतिपात्र "आहे, म्हणजे परम स्तवनीय असा "अर्थ." 'क्रतु' शब्दाविषयीं पृष्ठ २६ यावर ८ व्या ऋचेवर 'बहुमेधावी' शब्दाविषयीं दिलेली टीप पाहा.

६. मंत्रवक्त्याचा भावार्थ असा आहे कीं, 'इंद्रावरुणांच्या कृपेनें आम्हांस धन मिळो म्हणजे आम्ही त्याचा उपभोग घेऊं असें होओ, आणि उपभोगुनहि संग्रहास ठेवितां येईल असें घडो. आणि इच्छेप्रमाणें संग्रहीं ठेविल्यानंतरहि आणखी धन उरो'. देवांच्या कृपेनें आपलें अमुक कल्याण होओ किंवा आपणास अमुकाची प्राप्ति होओ असें प्राचीन आर्य प्रार्थीत. त्याचा हा चांगला मासला आहे.

७. या मंत्रांत प्रथमार्धांत क्रियापद व त्याचा कर्ता हे एकवचनी आहेत. पण शेवटच्या चरणांत 'मला' यशस्वी करा असें न म्हणतां 'आम्हांस' यशस्वी करा असें म्हटलें आहे. याचें कारण इतकेंच कीं, प्रथमार्धांत जें एकवचन आहे तें वृत्तसुखार्थ समजावयाचें. कारण कीं, हें सूक्त जरी मेधातिथीनें रचिलें तथापि तो ज्या कुळांतला पुरुष होता त्या कुळांतील सर्व मनुष्यांच्या वतीनें तो बोलत आहे म्हणून अनेक वचनच युक्त आहे. पूर्वी १४ व्या सूक्तांतील

**इन्द्रावरुण नू नु वां सिषासन्तीषु धीष्वा ।**
**अस्मभ्यं शर्म यच्छतम् ॥ ८ ॥**

इन्द्रावरुणा । नु । नु । वाम् । सिसासन्तीषु । धीषु । आ ।
अस्मभ्यम् । शर्म । यच्छतम् ॥ ८ ॥

**प्र वामश्नोतु सुष्टुतिरिन्द्रावरुण यां हुवे ।**
**यामृधाथे सधस्तुतिम् ॥ ९ ॥ ३३ ॥ ४ ॥**

प्र । वाम् । अश्नोतु । सुऽस्तुतिः । इन्द्रावरुणा । याम् । हुवे ।
याम् । ऋधाथे इति । सधऽस्तुतिम् ॥ ९ ॥ ३३ ॥ ४ ॥

**भाषायाम्.**

८. हे इन्द्रावरुणौ [ युवाम् ] अस्मभ्यं वां सिषासन्तीषु धीष्वा ( =धीषु अधिकरणे ) शीघ्रमेव शर्म ( =स्थलं ) यच्छतम् ( =दत्तम् ) ॥

९. हे इन्द्रावरुणौ [ अहं ] यां सुस्तुतिं हुवे ( =उच्चारयामि ) सा युवामश्नोतु ( =प्राप्नोतु ) । याम् ( =अपि च तां ) सहस्तुतिं [ युवाम् ] ऋध्नुतम् ॥

२ त्या ऋचेंत 'कण्वांनीं तुला ही हाक मारिली आहे' याजवर दिलेली टीप पाहा.—'सर्वप्रख्यात संपत्तीसाठीं,'='चित्राय राधसे.' चित्र म्हणजे इतकें सुंदर कीं, ज्याजकडे लोक पाहतात आणि त्याची प्रशंसा व प्रख्याति करितात.

८. हे इंद्रावरुणानो, तुम्हां दोघांची प्राप्ति व्हावी असे जे मनोरथ त्यांत तुम्ही आम्हांस लौकर लौकर स्थळ द्या.

९. हे इंद्रावरुणानो, [ ही ] जी मी [ तुमची ] चांगली स्तुति गातें आहें [ ती ] तुम्हांप्रत प्रविष्ट होओ; आणि ही [ तुम्हां दोघांची ] एकत्र केलेली स्तुति तुम्ही सफळ करा.

8. Indra and Varuna, give us a place quickly in those desires which wish for you both.

9. Indra and Varuna, may this good praise which I am singing reach you both; and may you fulfil that prayer addressed to you both.

८. 'तुम्हां दोघांची प्राप्ति व्हावी असे जे मनोरथ त्यांत' इ०='वां सिषासन्तीषु धीषु आ'. 'वाम्' ही त्वम् याची द्विवचनी द्वितिया. ऋचेचा भावार्थ असा आहे कीं, 'तुमची प्राप्ति व्हावी अशा ज्या बुद्धी त्यांत आम्हास जागा द्या'. म्हणजे तुमची प्राप्ति करून घेण्याविषयीं आम्हास बुद्धी द्या. धीषु ही जर सतिसप्तमी केली तर 'तुम्हां दोघांची प्राप्ति व्हावी असे आमचे मनोरथ असल्यामुळें तुम्ही आम्हास लौकर लौकर आश्रय द्या' असें भाषांतर करावें. परंतु सतिसप्तमी करण्यास 'आ' याची अडचण आहे. सतिसप्तमीच्या मागून 'आ' येत नसतो, आणि हा 'आ' 'यच्छतम्' याजबरोबर उत्तरपादांत घेणें बरोबर दिसत नाहीं.

९. मंत्राचें तात्पर्य इतकेंच कीं, हे इंद्रावरुणानो, ही चांगली स्तुति तुमची दोघांची मिळून मी एकत्र केली आहे ती तुम्ही सफळ करा.—'चांगली स्तुति'='सुस्तुतिः'. म्हणजे जी चांगली, सुश्राव्य, मधुर, आणि तुम्हांस मान्य व्हावी म्हणून मी श्रम करून रचिली आहे अशी. सूक्तवक्ता आपल्याच सूक्ताची आपणच प्रशंसा करतो असें समजावयाचें नाहीं, तर जी चांगली होण्याविषयीं आपण फार श्रम केले आहेत ती असा भावार्थ.—'जी गात आहें'='यां हुवे'. 'याम्' हें कर्म आणि 'हुवे' हें क्रियापद 'हुवे' याचा अर्थ बहुत करून 'बोलावितों' असा होतो, परंतु केव्हां केव्हां त्याच संबंधाचे दुसरेहि अर्थ होतात. आणि उच्चारणें, गाणें, हाहि अर्थ होतो तो आम्हीं येथें घेतला आहे. ( उदाहरणार्थ, 'आदित्यानां नाम अह्वे' असें ऋ. ३.५६.४ यांत, 'अन्धाय भरमह्वयत्' असें ऋ. १. ११७. १८ यांत, 'वो नाम हुवे' असें ऋ. ७. ५६. १० यांत आलें आहे तें पाहा ). परंतु सायणाचार्य हुवे याचा धात्वर्थ 'बोलावितों' हा कायम ठेवून 'यां सुष्टुतिं [ प्रति ] हुवे' असा अन्वय करून 'प्रति' याचा ( आम्हास वाटतें कीं कारण नसतां ) अध्याहार करितात.—'आणि ती...... सफळ करा'='याम् ऋधाथे'. 'एकत्र केलेली स्तुति,' 'सधस्तुतिम्.' सध=सह.

## सूक्तम् १८.

ऋषिः कण्वपुत्रो मेधातिथिः । १-३ ब्रह्मणस्पतिः । ४ ब्रह्मणस्पतिरिन्द्रश्च सोमश्च । ५ ब्रह्मणस्पतिर्दक्षिणा च । ६-८ सदसस्पतिः । ९ सदसस्पतिर्नराशंसो वा । गायत्री छन्दः ॥

**सोमानं स्वरणं कृणुहि ब्रह्मणस्पते ।**
**कक्षीवन्तं य औशिजः ॥ १ ॥**

सोमानम् । स्वरणम् । कृणुहि । ब्रह्मणः । पते ।
कक्षीवन्तम् । यः । औशिजः ॥ १ ॥

---

## भाषायाम्.

१. हे ब्रह्मणस्पते [ त्वं ] सोमानं ( =सोमं सुतवन्तं ) [ मां ] कक्षीवन्तम् [ इव ] स्वरणं ( =प्रकाशनवन्तं ) कुरु । यः [ कक्षीवान् ] औशिज [ आसीत् ] ॥

## सूक्त १८.

**ऋषि** आणि **वृत्त** पूर्ववत्. **देवता**—१-५ ब्रह्मणस्पति (परंतु चवथींत इंद्र आणि सोम ह्या आणि पांचवींत दक्षिणा ह्याहि देवता आहेत); ६-९ सदसस्पति (परंतु नववींमध्यें सदसस्पति अथवा नराशंस ही देवता होय).

१. हे ब्रह्मणस्पती, सोम अर्पण करणारा [जो मी त्या म]ला औशिज कक्षीवाना [प्रमाणें] तेजःपुंज कर.

## HYMN 18.

To *Brahmaṇaspati* (1-5, with *Indra* and *Soma* in 4 and with *Dakshiṇá* in 5), *Sadasaspati* (6-9, but in 9 *Sadasaspati or Narás'aṁsa*).

1. *Brahmaṇaspati*, make [me], who offer Soma, brilliant [like] Kakshivân the son of Us'ij.

---

१. या मंत्रात थोडीशी अडचण आहे. आणि ती ही कीं, त्यात दोन मुख्य शब्दांचा अध्याहार केला पाहिजे. मंत्राचा पदशः अर्थ, 'हे ब्रह्मणस्पते जो औशिज होय त्या सोम अर्पण करणाऱ्या कक्षीवानाला तेजःपुंज कर.' परंतु हा मंत्र कक्षीवानानें केलेल्या सूक्तांत नाहीं. कण्वकुलोत्पन्न मेधातिथीनें केलेल्या सूक्तांत आहे. म्हणून 'मला' (=मेधातिथीला) हें एक आणि 'प्रमाणें' हें एक अशीं दोन पदें सायणाचार्यांप्रमाणें अध्याहृत घेऊन आम्हीं निर्वाह केला आहे. परंतु तसें करण्यास निरुपाय आणि सायणाचार्यांचा आधार याशिवाय कारणें नाहींत असें म्हणणें सांप्रत अवश्य आहे.

'औशिज कक्षीवाना [प्रमाणें'= 'कक्षीवन्तं य औशिजः'. औशिज म्हणजे (सायणाचार्य म्हणतात) 'उशिजेचा पुत्र.' ऋ. १. ११२. ११ याजवरील भाष्यांत ते म्हणतात कीं, "उशिज् म्हणून दीर्घतमा ऋषीची बायको." पण कथा अशी आहे कीं, कलिंग देशाच्या एका राजास पुत्रसंतान नसल्यामुळें त्यानें आपल्या राणीला दीर्घतमा या नावाच्या ऋषीकडेस जावयास सांगितलें. पण तो ऋषि वार्धक्यामुळें वगैरे कमनीय नव्हता म्हणून तिणें त्याजजवळ आपली उशिज् नावाची दासी पाठविली. तिच्या पोटीं दीर्घतमापासून झालेला जो पुत्र त्याचें नाव कक्षीवान्. तोच मागाहून कक्षीवान् ऋषि म्हणून प्रसिद्ध झाला. हा कक्षीवान् पुष्कळ वेदसूक्तांचा कर्ता होय. आणि तो क्षत्रियाच्या दासीचा पुत्र होता म्हणून त्याचीं सूक्तें इतर सूक्तांपेक्षां कमी पूजनीय आहेत असें मानीत नाहींत.

'ब्रह्मणस्पति.' पूर्वी १४ व्या सूक्ताच्या तिसऱ्या ऋचेवर दिलेली टीप पाहा.

यो रेवान्यो अमीवहा वसुवित्पुष्टिवर्धनः ।
स नः सिषक्तु यस्तुरः ॥ २ ॥
यः । रेवान् । यः । अमीवऽहा । वसुऽवित् । पुष्टिऽवर्धनः ।
सः । नः । सिसक्तु । यः । तुरः ॥ २ ॥

मा नः शंसो अररुषो धूर्तिः प्रणङ्मर्त्यस्य ।
रक्षा णो ब्रह्मणस्पते ॥ ३ ॥
मा । नः । शंसः । अररुषः । धूर्तिः । प्रणक् । मर्त्यस्य ।
रक्ष । नः । ब्रह्मणः । पते ॥ ३ ॥

स घा वीरो न रिष्यति यमिन्द्रो ब्रह्मणस्पतिः ।
सोमो हिनोति मर्त्यम् ॥ ४ ॥
सः । घ । वीरः । न । रिष्यति । यम् । इन्द्रः । ब्रह्मणः । पतिः ।
सोमः । हिनोति । मर्त्यम् ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

२. यो रेवान् [ अस्ति ] यः अमीवहा (=रोगघातको) वसुवित् ( संपत्तेर्दाता ) [ यः ] पुष्टिवर्धनः यश् [ च ] तुरो (=बलवान्) [ अस्ति ] स [ ब्रह्मणस्पतिः ] अस्मान् सिषक्तु ॥

३. हे ब्रह्मणस्पते अस्मानररुषो (=दुष्टस्य) मर्त्यस्य शंसो धूर्तिश् [ च ] मा प्रणक् (=मा संप्रणक्तु) । [ त्वम् ] अस्मान्रक्ष ॥

४. स एव वीरो [ भवति ] न [ च ] रिष्यति (=विनश्यति) यमिन्द्रः ब्रह्मणस्पतिः सोमश् [ च ] हिनोति (=मृळति) ॥

२. जो संपत्तिमान्, जो रोगनाशक, जो द्रव्य मिळवून देणारा, जो अभिवृद्धि करणारा, [ आणि ] जो शक्तिमान् [ होय ] तो [ ब्रह्मणस्पति ] सदैव आमचे पाठबळ असो.

३. दुष्ट मर्त्यांचा शाप [ अथवा ] उपद्रव आम्हांसि न बाधो. हे ब्रह्मणस्पती, तूं आम्हांस रक्ष.

४. ज्या मर्त्यावर इंद्र, ब्रह्मणस्पति [ आणि ] सोम [ हे ] लोभ करितात तोच [ मर्त्य ] शूर [ होतो आणि तोच मर्त्य ] नाश पावत नाहीं.

2. He who is wealthy, who destroys disease, who is liberal, [and] increases prosperity, and who is valiant, may that [Brahmaṇaspati] be our constant helper.

3. May neither the curse nor the harmful imprecation of the wicked mortal injure us. Protect us, Brahmaṇaspati.

4. That mortal alone becomes a hero and does not perish whom Indra, Brahmaṇaspati [and] Soma love.

---

२. ब्रह्मणस्पति हा संपत्ति मिळवून देतो, रोग दूर करितो, आणि उपासकाची भरभराट करितो असें वेदांत सांगितलें आहे.—'सदैव आमचें पाठबळ असो'='नः सिषक्तु.' अक्षरशः अर्थ, 'नित्य आमच्या बरोबर असो,' म्ह. आमचें रक्षण करण्यासाठीं नित्य सिद्ध असो.

३. 'उपद्रव'='धूर्तिः.' सायणाचार्य 'धूर्ति' हें 'शंस' या शब्दाचें विशेषण होय असें समजून 'उपद्रवकारक शाप' असा 'धूर्तिः शंसः' याचा अर्थ करितात. परंतु प्रयोगांतरांकडेस लक्ष्य देऊन आम्हीं असलें भाषांतर केलें आहे.—'मर्त्यांचा' मरणशील जो मनुष्य त्याचा. 'मर्त्य' हा उत्कृष्ट शब्द अलीकडे व्यवहारांतून गेला आहे, पण मूळ ऋचेचा अर्थ यथायोग्य होण्यासाठीं अप्रसिद्ध असला तरी चांगला द्व्यर्थद्योतक आहे म्हणून आम्हीं तो प्रचारांत आणण्याच्या हेतूनें येथें वापरला आहे. व दुसरेहि असेच कितीएक निवडक शब्द या भाषांतरांत वापरीत जाऊं.

४. आर्यजनांचें देवांवर किती अवलंबन होतें तें या मंत्रावरून दिसून येतें. त्यांची अशी पक्की खात्री आणि दृढ भक्ति होती कीं, जर देव कृपा करितील तरच आपलें कल्याण होईल.—'लोभ करितात'='हिनोति.' या धातूहून 'हित' (लोभ ठेविलेला, प्रीति ज्यावर केली आहे तो, अर्थात् स्नेही) हा शब्द निघाला आहे. आणि 'प्रीति करीत नाहीं तो' अहित—शत्रु.—'सोम'—

त्वं तं ब्रह्मणस्पते सोम इन्द्रश्च मर्त्यम् ।
दक्षिणा पात्वंहसः ॥ ५ ॥ ३४ ॥

त्वम् । तम् । ब्रह्मणः । पते । सोमः । इन्द्रः । च । मर्त्यम् ।
दक्षिणा । पातु । अंहसः ॥ ५ ॥ ३४ ॥

*सदसस्पतिमद्भुतं प्रियमिन्द्रस्य काम्यम् ।
सनिं मेधामयासिषम् ॥ ६ ॥

सदसः । पतिम् । अद्भुतम् । प्रियम् । इन्द्रस्य । काम्यम् ।
सनिम् । मेधाम् । अयासिषम् ॥ ६ ॥

## भाषायाम्.

५. तं मर्त्यं हे ब्रह्मणस्पते त्वम् [अंहसो] (=दुरितात्) [पाहि] । इन्द्रश्च दक्षिणा [ च ] अंहसः पातु ॥

६. अद्भुतमिन्द्रस्य प्रियं काम्यं सदसस्पतिम् [ अहं ] सनिं (=धनं) मेधां [ च ] याचे ॥

'सोमः.' येथें सोम ही सोमरसावरची देवता समजावयाची. पूर्वील सूक्त ४ ऋचा २ यांतील 'सोम' शब्दावरील टीप ९२ व्या पृष्ठावर पाहा.

* या मंत्राचा विनियोग अनुप्रवचनीय होमांत करितात.

५. त्या मर्त्याला, हे ब्रह्मणस्पती, तूं संकटापासून [ रक्ष ]; [आणि] सोम, इंद्र [आणि] दक्षिणा हींहि रक्षोत.

5. Brahmanaspati, protect thou and may Soma, Indra and Dakshinâ [ too ] protect that mortal from danger.

६. आश्चर्यकर [ आणि ] इंद्राचा प्रिय आवडता जो सदसस्पति त्याजवळ मी संपत्ती [ आणि ] बुद्धी ह्या मागत आहें.

6. I pray to the wonderful Sadasaspati, the dear [ and ] beloved [ friend ] of Indra, for wealth [ and ] wisdom.

---

५. 'त्या मर्त्याला' म्हणजे ज्याजवर ब्रह्मणस्पति, सोम, इंद्र हे लोभ ठेवितात असें पूर्वील मंत्रांत सांगितलें त्या भाविक उपासकाला.—'दक्षिणा.' सायणाचार्य येथें "दक्षिणा या नांवाची देवी" इतकेंच म्हणतात. यज्ञांत ब्राह्मणाला जी गाय दान देत, तिचें नांव दक्षिणा. त्यानंतर गाई न देतां दुसरी देणगी ब्राह्मणास दिली तरी तिचेंहि नांव 'दक्षिणा' असें पडलें. प्रस्तुत ठिकाणीं "दक्षिणा' म्हणजे दक्षिणा जी देणगी तद्रूपी देवता. दक्षिणेस देवता केली यांत आश्चर्य मानण्याजोगें कांहीं नाहीं. कारण मनुष्यांनीं प्यावयाचा आणि देवांस पाजावयाचा जो सोम तोहि देव होऊन बसला व या 'दक्षिणे' देवीबरोबर या मंत्रांतच संनिध आहे.

६. 'आश्चर्यकर'='अद्भुतम्.' 'दृष्टीला अगोचर,' 'अदृश्य', 'दृष्टी न पडणारा' असाहि अर्थ होईल.—'सदसस्पति.' या पदाचा अक्षरशः अर्थ 'घराचा पति.' हें घराच्या देवतेचें नांव होय. जसा 'सोम' म्हणजे सोमरसावरची देवता, 'अग्नि' म्हणजे आगीची देवता, 'वायु' म्हणजे वाऱ्याची देवता, 'ब्रह्मणस्पति' म्हणजे स्तुतीची देवता, तशी 'सदसस्पति' म्हणजे गृहदेवता अथवा घराची देवता. सदसस्पतीला (ब्रह्मणस्पतीला बृहस्पति जशी तशी ) सदस्पति अशीहि संज्ञा आहे. त्याला इंद्राचा प्रिय मित्र आणि आश्चर्यकारक कां म्हटलें आहे कळत नाहीं. सायण म्हणतात इंद्राबरोबर तो सोम पीतो म्हणून तो त्याला प्रिय होय. वस्तुतः सदसस्पति इंद्राला ज्या यज्ञांत यथेष्ट खाण्याला अन्न आणि पिण्याला सोम मिळतो तसा यज्ञ यजमानाकडून करवितो. म्हणजे घरांत विपुलता असलेली पाहून यज्ञ करावा अशी प्रेरणा उपासकाला होते, म्हणून सदसस्पति हा इंद्राला प्रिय आणि आवडता झाला असावा. आणि इंद्रासारिख्या देवाचा प्रिय आणि आवडता अशी सदसस्पतीसारिख्या क्षुद्र देवाची वाखाणणी करणें हें स्वाभाविक आहे. कारण कीं, कोणाहि मनुष्याची आपण स्तुती करूं लागलों म्हणजे तो मनुष्य अमुक एक मोठ्या मनुष्याच्या किंवा राजाच्या प्रीतींतला आहे असें म्हणण्याची चाल आहेच.—'मागत आहे'=अयासिषम्.'

**यस्मादृते न सिध्यति यज्ञो विपश्चितश्चन ।**
**स धीनां योगमिन्वति ॥ ७ ॥**

यस्मात् । ऋते । न । सिध्यति । यज्ञः । विपःऽचितः । चन ।
सः । धीनाम् । योगम् । इन्वति ॥ ७ ॥

**आदृध्नोति हविष्कृतिं प्राञ्चं कृणोत्यध्वरम् ।**
**होत्रा देवेषु गच्छति ॥ ८ ॥**

आत् । ऋध्नोति । हविःऽकृतिम् । प्राञ्चम् । कृणोति । अध्वरम् ।
होत्रा । देवेषु । गच्छति ॥ ८ ॥

## भाषायाम्.

७. यस्मादृते विपश्चितोपि (विदुषोपि) यज्ञो न सिध्यति स [सदसस्पतिः] धियां (=भक्त्यात्मकबुद्धीनां) योगं (=प्रयोगम्) इन्वति (=प्रेरयति)॥

८. अनन्तरं [सदसस्पतिः] हविष्कृतिमृध्नोति । अध्वरं [च] प्राञ्चं (=निर्विघ्नतया चलन्तं) करोति । [तदनन्तरमस्माकं] होत्रा (=स्तुतिः) देवेषु गच्छति ॥

सायणाचार्य मागणें, प्रार्थणें हा अर्थ न करितां गेलों, प्राप्त झालों असा करितात, आणि सगळ्या मंत्राचें भाष्य "मेधा मिळविण्यासाठीं मी सदस- "स्पतीजवळ प्राप्त झालों आहें; जो "सदसस्पति आश्चर्यकर, इंद्राला प्रिय, "कमनीय, धनदाता (सनि) असा होय" असें करितात. पण 'या' धातूचा अर्थ मागणें, प्रार्थणें, इच्छिणें असा होतो याविषयीं अनेक प्रयोग आहेत. त्यांतून ऋ० १.२४.११ आणि १. ५८. ७ यांत खुद्द सायणाचार्यांनीं या धातूचा अर्थ याचणें, मागणें असा केला आहे तो पाहा. दुसरे प्रयोग अनेक आहेत.

७. ज्याखेरीज प्रज्ञावंताचाहि यज्ञ सिद्धीस जात नसतो तो [सदसस्पति] [प्रथमत:] बुद्धींस यजन करण्याविषयींची प्रेरणा करितो;

८. आणि नंतर यज्ञपाक सिद्ध करितो [आणि] यज्ञ चालू करितो. [आणि मग आमची] प्रार्थना देवांप्रत जाते.

7. He without whom the sacrifice even of a wise man does not prosper—that [Sadasaspati] [first] prompts the exercise of the pious feelings;

8. and then he perfects the sacrificial food [and] sets the sacrifice in motion. [Our] prayer [then] reaches the gods.

---

७. मंत्रवक्त्याचा भावार्थ असा आहे कीं, देवांस यजन करून भजावें अशी जी बुद्धींस प्रेरणा होते ती प्रथम सदसस्पति करितो, (नंतर काय करितो तें पुढच्या मंत्रांत आहा) आणि त्या सदसस्पतीचा पराक्रम असा आहे कीं, त्याविना मोठ्या विद्वानाचाहि यज्ञ सिद्धीस जात नाहीं. सदसस्पति ती प्रेरणा कशी करितो आणि त्यावाचून यज्ञसिद्धि होत नाहीं हा पराक्रम त्याला कोठून व कसा आला हें स्पष्ट सांगवत नाहीं. पण घरांत सर्व सुख असलें म्हणजे यज्ञ करण्याची प्रेरणा होते असा भावार्थ असावा, आणि यज्ञसिद्धीस अवश्य असलेलीं साधनें (धान्य, मांस, सोम, इत्यादि) सदसस्पतीकडून न मिळतील, तर (म्हणजे घरांत नसतील तर) यज्ञ सिद्धीला जाणें नाहीं असा भावार्थ आहे असें दिसतें.

८. यज्ञ करण्याविषयीं बुद्धीला सदसस्पति प्रेरणा करितो असें पूर्वील मंत्रांत सांगितलें. त्यानंतर काय होतें तें प्रस्तुत मंत्रांत सांगतो. प्रेरणा केल्यावर सदसस्पति यज्ञहवि सिद्ध करितो म्ह. उपासकाकडून तयार करवितो आणि यज्ञ चालू (प्रारंभ) करितो. आणि नंतर आम्हां जी देवांची स्तुति करितों ती देवांप्रत प्रविष्ट होते. म्हणजे हवि तयार होतांच आम्ही देवांस येण्याविषयीं आणि तें ग्रहण करण्याविषयीं प्रार्थना करितों.

'सदसस्पति' म्हणजे ज्यापेक्षां गृहदेवता अथवा ज्यांत यज्ञसामग्री असते त्या घराची देवता, होय, त्यापेक्षां तो हवि तयार करवितो आणि यज्ञ चालू करवितो असें म्हणण्यांत अर्थयोग्यता आहे यांत संशय नाहीं.

नराशंसं सुधृष्टममपश्यं सप्रथस्तमम् ।
दिवो न सद्ममखसम् ॥ ९ ॥ ३५ ॥

नराशंसम् । सुऽधृष्टमम् । अपश्यम् । सप्रथःऽतमम् ।
दिवः । न । सद्मऽमखसम् ॥ ९ ॥ ३५ ॥

भाषार्थम्.

९. [ अहं ] नराशंसं सुधृष्टमम् ( =अतिशयेन धाष्ट्र्ययुक्तं ) सप्रथस्तमं (=विस्तीर्णतमं) दिवः सद्ममखसमिवापश्यम् ॥

---

सूक्तम् १९.

कण्वपुत्रो मेधातिथिर्ऋषिः । अग्निमरुतौ देवता । गायत्री च्छन्दः ॥

प्रति त्यं चारुमध्वरं गोपीथाय प्र हूयसे ।
मरुद्भिरग्न आ गहि ॥ १ ॥

प्रति । त्यम् । चारुम् । अध्वरम् । गोऽपीथाय । प्र । हूयसे ।
मरुत्ऽभिः । अग्ने । आ । गहि ॥ १ ॥

भाषार्थम्.

१. [ त्वं ] त्यं (=तं तं प्रसिद्धं ) चारुमध्वरं प्रति (=अध्वरमध्वरं प्रति ) गोपीथाय (=सोमपानाय? ) प्रहूयसे । [ तस्मात् ] हे अग्ने [ त्वं ] मरुद्भिः [ सह ] आगच्छ ॥

९. परम धारिष्टवान्, [आणि] अति विस्तीर्ण नराशंस [अग्नि] मला द्युलोकाच्या स्थानांतील तेजानें भरलेला असा दृष्टीस पडला.

9. I have seen the most valiant [and] the most extensive Narâs'aṁsa [to be] full of the splendor of the centre of heaven.

९. हा मंत्र कठिण आहे. परंतु त्याचे प्रथमचे दोन चरण सोपे आहेत. शेवटल्या चरणाचाच अर्थ कठिण आहे. 'दिवो न सद्ममखसम्' यांतील विशेषणांचा आणि उपमेचा अर्थ काय आहे तो कळत नाहीं. सद्ममखसम् म्हणजे सायणाचार्य सन्नमहसम्= प्राप्ततेजस्कम् असा अर्थ करितात; आणि शेवटील पादाचें, "[सूर्यचंद्रादि] दिव्यलोकांप्रमाणें तेजस्वी असा जो नराशंस त्यास" असें भाष्य करितात.

वस्तुतः भावार्थ असा दिसतो कीं, 'मी नराशंस पाहिला तो इतका अतिप्रचंड (सुधृष्टम) आणि इतका परम विस्तीर्ण (सप्रथस्तम) होता, कीं, तो सूर्यलोकाप्रमाणें देदीप्यमान दिसला.' परंतु सद्ममखसम् याचा अर्थ फार संदिग्ध आहे यांत संशय नाहीं.

कितीएकांच्या मतें सद्ममखसम् म्हणजे 'सद्नीं (=यज्ञशाळेंत) मख (=यज्ञ) करणारा' असा अर्थ. परंतु 'दिवो न' याचा अर्थ मग नीट होणार नाहीं. कसें-हि करून या अंत्यचरणाविषयीं निर्वाह करणें आहे असें म्हणणें भाग आहे.

'नराशंस' हें अग्नीचें नांव आहे याविषयीं सू. १३ ऋ. ३ यावरील टीप पाहा.

नराशंस मंत्रवक्त्याच्या दृष्टीस पडला व तो सूर्यलोकाप्रमाणें तेजःपुंज होता तो कसा याची कल्पनाच करणें आहे.

## सूक्त १९.

**ऋषि** आणि **वृत्त** पूर्वीप्रमाणें.

**देवता** अग्नि आणि मरुत्.

## HYMN 19.

To *Agni* and the *Maruts*. Author and Metre as before.

१. जो जो म्हणून सुंदर यज्ञ असतो त्या त्या यज्ञाप्रत सोम पिण्यास तुला बोलावित असतात; [तर] हे अग्नी, मरुतांसह तूं येथें ये.

1. To every handsome sacrifice thou art invoked to drink the Soma; come hither, Agni, with the Maruts.

१. 'जो जो म्हणून सुंदर यज्ञ असतो त्या त्या यज्ञाप्रत,'='त्यं चारुम-ध्वरम्.' 'त्य' हें सर्वनाम जरी 'स' या अर्थी आहे तथापि त्याचा भावार्थ

नहि देवो न मर्त्यो महस्तव क्रतुं परः ।
मरुद्भिरग्न आ गहि ॥ २ ॥

नहि । देवः । न । मर्त्यः । महः । तव । क्रतुम् । परः ।
मरुत्ऽभिः । अग्ने । आ । गहि ॥ २ ॥

ये महो रजसो विदुर्विश्वे देवासो अद्रुहः ।
मरुद्भिरग्न आ गहि ॥ ३ ॥

ये । महः । रजसः । विदुः । विश्वे । देवासः । अद्रुहः ।
मरुत्ऽभिः । अग्ने । आ । गहि ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. महतस्तव क्रतुं (=प्रज्ञां) परः (=परस्तात्) देवो न हि [अस्ति] मर्त्यः [अपि] न [अस्ति] । [तस्मात्] हे अग्ने [त्वं] मरुद्भिः [सह] आगच्छ ॥

३. ये अद्रुहो (=द्वेषरहिताः) देवा [मरुतः] महतो रजसो (=महतोन्तरिक्षलोकस्य) विदुः (=निवासस्थानत्वेन जानन्ति) । हे अग्ने [त्वं] [तैः] विश्वैः (=सकलैः) मरुद्भिः [सह] आगच्छ ॥

---

आम्हीं येथें दिल्याप्रमाणें असतो.

ऋचेचा भावार्थ असा आहे कीं, 'हे अग्नी, जो कोणी सुंदर यज्ञ करितो तो तुला आपल्या यज्ञाप्रत सोम पिण्यास बोलावीत असतो. यास्तव मरुतांस घेऊन तूं या आमच्या यज्ञाप्रत ये'. 'गोपीथाय' याचा अर्थ 'सोम पिण्यास' हा सायणाचार्यांप्रमाणें केला आहे. परंतु 'दूध पिण्यास' असा अर्थ चांगला संभवतो.

मरुत् म्हणजे सामान्य देव नव्हेत, तर वायुरूपी देवता होत याविषयीं पृष्ठ ४० सूक्त ६ मंत्र ५ यावरील टीप पाहा.

२. कारण कीं महान् असा जो तूं त्या तुझ्या प्रज्ञेपलीकडे [ कोणी ] देव नाहीं, [ कोणी ] मर्त्य नाहीं; [ तर ] हे अग्नी, मरुतांसह तूं येथें ये.

३. हे अग्नी, जे [ मरुत् ] देव महान् अंतरिक्षांत राहत असतात [ आणि ] जे कोणाचें वाईट करणारे नव्हेत त्या सकल मरुतांसह तूं येथें ये.

2. For neither god nor mortal is above the wisdom of thee, who art great; come hither, Agni, with the Maruts.

3. Those that dwell in the vast ethereal regions [and] are harmless,—come hither, Agni, with all those divine Maruts.

---

२. या ऋचेचा भावार्थ असा आहे कीं, 'हे अग्नी, तूं इतका बुद्धिमान् आहेस कीं, तुझ्या बुद्धीच्या पलीकडे देव जाऊं शकत नाहीं आणि मर्त्य मनुष्यहि जाऊं शकत नाहीं. यास्तव हे अग्नी, तूं मरुतांस घेऊन आमच्या या यज्ञाप्रत ये.'

या ऋचेंत जो 'परः' शब्द आहे त्याचा अर्थ आम्हीं 'पलीकडे' असा अव्ययार्थी केला आहे. सायणाचार्य 'परः' म्हणजे 'उत्कृष्ट' असा अर्थ करितात, आणि 'क्रतुम्' म्हणजे 'कर्मविशेष' असा अर्थ करून 'उल्लङ्घ्य' (=उल्लंघून करून ) या पदाचा अध्याहार करितात. परंतु परः हें येथें अंतोदात्त पद आहे, त्याचा अर्थ अव्ययार्थी 'वर', 'पलीकडे', 'अधिक' असा होतो. आणि 'श्रेष्ठ' या अर्थाचा 'पर' शब्द आद्युदात्त (पर:) आहे. याविषयीं सूक्त ८ ऋचा ५. याजवर दिलेली ५४ व्या पृष्ठावरील टीप पाहा.

'क्रतु' शब्दाचा अर्थ 'बुद्धि' असा होतो याविषयीं पूर्वीं पुष्कळ ठिकाणीं सांगितलेंच आहे. पृष्ठ ३४ सूक्त ५ मंत्र ८ याजवरील टीप पाहा.

३. 'जे महान् अंतरिक्षांत राहत असतात,'='ये महो रजसो विदुः'. अक्षरशः अर्थ, 'जे मोठ्या अंतरिक्षाप्रत जाणतात' म्हणजे ज्यांस मोठ्या अंतरिक्षाचा परिचय आहे. 'जे अंतरिक्ष प्रदेशांत राहतात' हें विशेषण वायुरूपी देवांस योग्य आहे यांत संशय नाहीं.

'कोणाचें वाईट करणारे नव्हेत,'='अद्रुहः.' म्हणजे निरुपद्रवी,=दुसऱ्या देवांप्रमाणें दुःख देणारे नव्हेत, कल्याण करणारे.

सायणाचार्य 'ये महो रजसो विदुः' याचा अर्थ 'जे वर्षण प्रकार जाणतात' असा करितात. परंतु 'रजः', म्हणजे अंतरिक्षादि लोक असा अर्थ यास्कांनीं केला आहे. आणि मरुत् हे अंतरिक्ष प्रदेशांत राहतात असें पुष्कळ ठिकाणीं वेदांत आलें आहे.

य उग्रा अर्कमानृचुरनाधृष्टास ओजसा ।
मरुद्भिरग्न आ गहि ॥ ४ ॥

ये । उग्राः । अर्कम् । आनृचुः । अनाधृष्टासः । ओजसा ।
मरुत्ऽभिः । अग्ने । आ । गहि ॥ ४ ॥

ये शुभ्रा घोरवर्पसः सुक्षत्रासो रिशादसः ।
मरुद्भिरग्न आ गहि ॥ ५ ॥ ३६ ॥

ये । शुभ्राः । घोरऽवर्पसः । सुऽक्षत्रासः । रिशादसः ।
मरुत्ऽभिः । अग्ने । आ । गहि ॥ ५ ॥ ३६ ॥

ये नाकस्याधि रोचने दिवि देवास आसते ।
मरुद्भिरग्न आ गहि ॥ ६ ॥

ये । नाकस्य । अधि । रोचने । दिवि । देवासः । आसते ।
मरुत्ऽभिः । अग्ने । आ । गहि ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

४. ये उग्राः (=प्रचण्डाः) [स्वेन] ओजसा (=बलेन) अनाधृष्टाः (=अतिरस्कृताः) [मरुतः] अर्कमानृचुः (=गायनं जगुः), हे अग्ने [त्वं] [तैः] मरुद्भिः [सह] आगच्छ ॥

५. ये [मरुतः] शुभ्राः (=शोभमानाः) घोररूपाः सुबलाः रिशादसः (=शत्रुघातकाश्) [च], हे अग्ने [त्वं] [तैः] मरुद्भिः [सह] आगच्छ ॥

६. ये देवा [मरुतः] नाकस्योपरि रोचने (=तेजस्विनि) द्युलोके आसते, हे अग्ने [त्वं] [तैः] मरुद्भिः [सह] आगच्छ ॥

४. हे अग्नी, जे प्रचंड [ मरुत् ] गायन गात असतात [आणि] ज्यांचें बळ इतकें आहे कीं, त्यांस कधींहि कोणी. जिंकिलेलें नाहीं, त्या मरुतांसह, तूं येथें ये.

५. हे अग्नी, जे तेजस्वी, घोररूपधारी, सुप्रतापी [ आणि ] शत्रूंतें खाऊन टाकणारे [ असे होत], त्या मरुतांसह तूं येथें ये.

६. हे अग्नी, जे मरुद्देव आकाशावर [ असलेल्या] देदीप्यमान स्वर्गीं [आहेत], त्या मरुतांसह तूं येथें ये.

4. [Those] mighty [Maruts] that sing the song [and] that by virtue of their power remain unconquered—come hither, Agni, with those Maruts.

5. [Those] who are resplendent, have frightful shapes, are great in power, [and] are destroyers of the enemy—come hither, Agni, with those Maruts.

6. [Those] divine [Maruts] who sit in resplendent heaven above the sky—come hither, Agni, with those Maruts.

---

४. ऋचेचा भावार्थ असा आहे कीं, जे मरुत् प्रचंड होत, जे अंतरिक्षांत वायुगर्जनारूप गायन गातात आणि ज्यांचें बळ इतकें अनिवार्य आहे कीं, त्यांस कोणी जिंकूं शकत नाहीं अशा मरुतांसह, हे अग्नी, तूं येथें ये.

'गायन गात असतात'='अर्कम् आनृचुः.' 'अर्क' शब्दाचे अर्थ दोन आहेत, किरण आणि गायन. आणि 'अर्क' शब्द ज्या अर्च् धातूपासून निघाला आहे त्याचेहि दोन अर्थ होतात. प्रकाशणें, आणि गाणें. दोनहि अर्थ वेदांत प्रसिद्ध आहेत. 'आनृचुः' हा पूर्णभूतकाळ रीतिवर्तमान काळाच्या अर्थी योजिला आहे. व असे प्रयोग वेदांत अनेक ठिकाणीं येतात, त्यांचीं उदाहरणें पूर्वीं दिलींच आहेत.—'ज्यांचें बळ इतकें आहे कीं, त्यांस कधींहि कोणी जिंकिलेलें नाहीं', हा अर्थ 'अनाधृष्टासः ओजसा' या दोन शब्दांचा आहे. 'अनाधृष्टासः' म्हणजे, तुम्हीं माझ्या बरोबर लढण्यास या असें ज्यांस म्हणण्यास कोणासहि धैर्य होत नाहीं ते. आम्हीं केलेलें भाषांतर अक्षरशः नाहीं. स्पष्ट अर्थ समजावा म्हणून विस्तारानें केलें आहे.

५. या मंत्रांत मरुद्देवांस लाविलेलीं तेजस्वी, घोररूपधारी इत्यादि विशेषणें लक्ष्यांत ठेवण्याजोगीं आहेत. 'घोररूपधारी,' 'सुप्रतापी,' आणि 'शत्रूंतें खाऊन टाकणारे' हीं विशेषणें प्रिय आणि पूज्य देवतेस कितीहि अयुक्त असलीं तरी तीं मरुतांसारिख्या देवतांस शोभतात यांत संशय नाहीं.

६. मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, आकाशापेक्षाहि उंच असा जो द्युलोक त्यांत वास करणाऱ्या मरुतांसह अग्नीनें यावें. तिसऱ्या मंत्रांत मरुद्देव अंतरिक्षीं

**य ईङ्खयन्ति पर्वतान्तिरः समुद्रमर्णवम् ।**
**मरुद्भिरग्न आ गहि ॥ ७ ॥**

ये । ईङ्खयन्ति । पर्वतान् । तिरः । समुद्रम् । अर्णवम् ।
मरुत्ऽभिः । अग्ने । आ । गहि ॥ ७ ॥

**आ ये तन्वन्ति रश्मिभिस्तिरः समुद्रमोजसा ॥**
**मरुद्भिरग्न आ गहि ॥ ८ ॥**

आ । ये । तन्वन्ति । रश्मिऽभिः । तिरः । समुद्रम् । ओजसा ।
मरुत्ऽभिः । अग्ने । आ । गहि ॥ ८ ॥

---

### भाषायाम्.

७. ये [ मरुतः ] पर्वतान् (=मेघान् ) तिरः अर्णवं समुद्रं (=क्षुब्धं समुद्रम्, अन्तरिक्षरूपिणः समुद्रात्परस्तात् ) ईङ्खयन्ति (=गमयन्ति ), हे अग्ने [ त्वं ] [ तैः ] मरुद्भिः [ सह ] आगच्छ ॥

८. ये [ मरुतः ] रश्मिभिः (=स्वकीयतेजसः किरणैः ) ओजसा [ च ] तिरः समुद्रम् [ आत्मानम् ] आतन्वन्ति (=प्रसारयन्ति ), हे अग्ने [ त्वं ] [ तैः ] मरुद्भिः [ सह ] आगच्छ ॥

---

राहतात असें सांगितलें त्यास येथें वस्तुतः विरोध येत नाहीं; कारण कीं, कोणत्याहि देवतेची प्रशंसा करूं लागलें म्हणजे अर्वाचीन कवींप्रमाणें प्राचीन ऋषी सुद्धां खरोखर असलेल्या गुणापेक्षां अथवा योग्यतेपेक्षां अधिक गुणांचा अथवा योग्यतेचा आरोप त्या त्या देवतावर करीत असतात.

७. जे [मरुत्] पर्वतांस खवळलेल्या समुद्रापलीकडे हाकून नेतात त्या मरुतांसह, हे अग्नी, तूं येथें ये.

८. जे [मरुत्] [आपल्या] किरणांनीं [आणि] तेजानें सर्व व्यापून समुद्रापलीकडे जातात त्या मरुतांसह, हे अग्नी, तूं येथें ये.

7. [Those Maruts] who drive away the mountains across the waving sea—come hither, Agni, with those Maruts.

8. [Those Maruts] who spread themselves beyond the ocean with [their] rays [and] splendor—come hither, Agni, with those Maruts.

---

७. या ऋचेचा भावार्थ असा आहे कीं, अंतरिक्षरूपी समुद्रापलीकडे मेघरूपी पर्वतांस हाकून लावणारे जे मरुत् त्यांसह अग्नीनें यावें.

'पर्वतांस', 'पर्वतान्' 'पर्वत' शब्दाचा अर्थ मेघ असा अर्वाचीन संस्कृतांत तर होतोच. पण तो कशाकरितां होतो त्या कारणाचें बीज या व अशा प्रकारच्या मंत्रांत आहे, तें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे. जे जे शब्द पर्वतवाचक ते ते याप्रमाणेंच मेघवाचक झाले आहेत.—'खवळलेल्या', 'अर्णवम्' हा 'अर्णव' शब्द येथें विशेषणार्थी आहे, साधारण संस्कृतांत नेहमी नामार्थी असतो, व उदक असाच त्याचा अर्थ होतो.

'समुद्रापलीकडे'='तिरः समुद्रम्.' 'तिरः' हें शब्दयोगि अव्यय असून त्याचा संबंध द्वितीयान्त नामाशीं होतो. सायणाचार्य 'तिरः' हें क्रियाविशेषण समजून 'कुर्वन्ति' असें क्रियापद अध्याहृत घेतात; आणि "अर्णवं म्हणजे "उदकयुक्त समुद्राप्रत तिरस्कृत करितात म्हणजे सफल करितात" असा अर्थ करितात. पण तसें करण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. 'तिरः' हें शब्दयोगि अव्यय आहे यास्तव 'पर्वतान् तिरः अर्णवं समुद्रमीङ्खयन्ति' असा अन्वय करणें उचित आहे.

मरुत् म्हणजे वायुरूपी देवता मेघरूपी पर्वतांस अंतरिक्षरूपी समुद्रापलीकडे हाकून लावीत असतात ही केवळ स्वभावोक्ति आहे, तेव्हां त्याविषयीं विशेष सांगावयास नको.

८. मंत्राचा भावार्थः—मरुत् आपले किरण आणि आपलें तेज अंतरिक्षरूपी समुद्रापलीकडेहि पसरतात, म्हणजे ज्यांच्या तेजाचे किरण सर्व अंतरिक्ष व्यापून त्याच्या पलीकडेहि पोंहचतात त्या मरुतांसह अग्नीनें येथें यावें.

मरुतांस तेज म्हणजे बळ आहे असें म्हणणें हें योग्यच आहे; पण त्यांच्या प्रकाशाचे किरण सर्व आकाश व्यापून त्या पलीकडेस पसरतात असें म्हणणें ही केवळ मरुतांची प्रशस्ति दिसते. या मंत्रांत तरी 'समुद्र' म्हणजे अंतरिक्षरूपी समुद्र समजला पाहिजे.

अभि त्वा पूर्वपीतये सृजामि सोम्यं मधु ।
मरुद्भिरग्न आ गहि ॥ ९ ॥ ३७ ॥ १ ॥

अभि । त्वा । पूर्वऽपीतये । सृजामि । सोम्यम् । मधु ।
मरुत्ऽभिः । अग्ने । आ । गहि ॥ ९ ॥ ३७ ॥ १ ॥

भाषार्थम्.

९. पूर्वपीतये (=सर्वेभ्योपि देवेभ्यः पूर्वं पातुम्) मधुरं सोमं त्वामभि सृजामि (आवर्जयामि) । [तस्मात्] हे अग्ने त्वं मरुद्भिः [सह] आगच्छ ॥

---

सूक्तम् २०.

कण्वपुत्रो मेधातिथिर्ऋषिः । ऋभवो देवता । गायत्री च्छन्दः ॥

अयं देवाय जन्मने स्तोमो विप्रेभिरासया ।
अकारि रत्नधातमः ॥ १ ॥

अयम् । देवाय । जन्मने । स्तोमः । विप्रेभिः । आसया ।
अकारि । रत्नऽधातमः ॥ १ ॥

भाषार्थम्.

१. अयं रत्नधातमः (=रत्नस्य अतिशयेन दातृतमः) स्तोमः विप्रैः (=अस्माभिः कविभिः) [ऋभ्वात्मने] दिव्यजनाय आसया (=समक्षम्) अकारि (=प्रचितोस्ति) ॥

९. [सर्वांच्या] अगोदर [तुला] प्यावयास मिळावें म्हणून [हें] सोमरसाचें मधुर पेय मी तुला अर्पण करीत आहें; वर हे अग्नी, तूं मरुतांसह येथें ये.

9. To thee I pour out the sweet drink of Soma, that thou mayest drink first [of all]—come hither, Agni, with the Maruts.

९. मंत्राचा भावार्थ स्पष्ट आहे. पण त्यांत लक्ष्यांत ठेवण्याजोगें इतकें आहे कीं, मंत्रवक्ता ऋषि एकाद्या लाडक्या मुलाचें प्रीतिपूर्वक गोड शब्दांनीं लालन करितात तसें अग्नीचें लालन करून म्हणतो कीं, सर्व देवांस अर्पण करण्यापूर्वी तुला सोम अर्पण करीत आहें, यास्तव मरुतांस घेऊन तूं ये आणि सोमपान कर.

यांत सोमपानासाठीं अग्नीनें मरुतांसह यावें म्हणून ऋषीनें कशी विनवणी केली आहे तिच्याकडेस लक्ष्य दिलें पाहिजे.

---

## सूक्त. २०

ऋषि आणि वृत्त पूर्वीप्रमाणें. देवता ऋभु.

१. अत्यंत विपुल संपत्तीतें देवविणारें हें स्तोत्र [या ऋभूंच्या] दिव्य गणासाठीं स्तोत्यांनीं [ऋभूंच्या] समक्ष रचिलें आहे.

## HYMN 20.

To the *Ribhus*. Author and Metre as before.

1. This hymn, the best giver of wealth, is composed extempore by the poets in honour of the divine race of the Ribhus.

१. हें सूक्त ऋभु या देवाविषयीं आहे. ऋभु हे प्रथम मनुष्य असून मागाहून देव झाले असें वेदांत सांगितलें आहे. ते तिघे आहेत; एकाचें नांव ऋभु, दुसऱ्याचें विभु आणि तिसऱ्याचें नांव वाज. ते देवाचे कारीगर होत. त्यांनीं इंद्रास रथ आणि घोडे करून दिले. त्यांच्या बापाचें नांव 'आंगिरस' सुधन्वा'. ऋभूंस सूर्यानें अमर केलें. त्यांनीं आपल्या आईबापांस वृद्धवयांत पुनः तरुण केलें. ते त्वष्टा या देवाचे शिष्य होत. त्वष्ट्यानें एक यज्ञपात्र (चमस) केलें होतें, त्याचीं ऋभूंनीं आपल्या चातुर्याच्या योगानें चार पात्रें केलीं म्हणून त्वष्ट्यास लाज वाटली आणि त्यामुळें त्याणें ऋभूंस मारण्याचा प्रयत्न केला. ऋभु हे आकाश सांवरून धरितात. त्यांनीं अनेक वेगवेगळ्या भक्तांचीं संकटें निवारिलीं, असें कितीएक सूक्तांत सांगितलें आहे. ऋभूंविषयींचीं सूक्तें फार चमत्कारिक आहेत, तीं पुढें येत जातील.

य इन्द्राय वचोयुजा ततक्षुर्मनसा हरी ।
शमीभिर्यज्ञमाशत ॥ २ ॥

ये । इन्द्राय । वचःऽयुजा । ततक्षुः । मनसा । हरी इति ।
शमीभिः । यज्ञम् । आशत ॥ २ ॥

तक्षन्नासत्याभ्यां परिज्मानं सुखं रथम् ।
तक्षन्धेनुं सबर्दुघाम् ॥ ३ ॥

तक्षन् । नासत्याभ्याम् । परिऽज्मानम् । सुऽखम् । रथम् ।
तक्षन् । धेनुम् । सबःऽदुघाम् ॥ ३ ॥

---

**भाषायाम्.**

२. ये इन्द्राय वचोयुजौ (=वचसैव युज्यमानौ) हरी (=हर्यश्वौ) मनसा (=मनःसंकल्पेन मनश्चातुर्येण वा) ततक्षुः (=अकार्षुः) [ते ऋभवः]. [तादृशीभिः] शमीभिः (=चातुर्यकर्मभिः) यज्ञमाशत (=यज्ञियत्वं प्रापुः) ॥

३. [ऋभवः] नासत्याभ्यां परिज्मानं (=परिगन्तारं) सुखं रथमतक्षन् [ते] सबर्दुघां (=क्षीरस्य दोग्ध्रीं) धेनुमतक्षन् ॥

---

या पहिल्या मंत्राचें तात्पर्य असें आहे कीं, सूक्त गाणारे जे आम्हीं त्या आम्हीं कवींनीं हें सूक्त ऋभुगणासाठीं येथल्या येथेंच ऋभूंसमक्ष रचिले आहे, म्हणजे पूर्वीं पाठ करून तें आतां या ठिकाणीं आम्ही म्हणत आहों असें नाहीं; आताच्या आताच रचून म्हणत आहों.

ऋभूंच्या समक्ष आताच्या आताच सूक्त रचून गात आहों हा, जो अर्थ सांगितला तो लक्ष्यांत ठेविला पाहिजे. कारण कीं, त्यावरून वेदांतील सर्व सूक्तें अनादि आहेत असें जें म्हणणें तें कसें सिद्ध होतें असा प्रश्न निघतो.

'अत्यंत विपुल संपत्तीतें देवविणारें', 'रत्नधातमः'. अक्षरशः अर्थ, 'संपत्तीतें अतिशयेंकरून देणारें.' म्हणजे हें स्तोत्र आम्ही गाइलें, म्हणजे आम्हांस ऋभुदेव अति विपुल संपत्ती देतील. '[ऋभूंच्या] दिव्य गणासाठीं,' 'देवाय जन्मने.' म्ह. ऋभुदेवांचा जो गण त्यासाठीं.

'समक्ष'='आसया.' म्हणजे 'तोंडापर,' 'संमुख.' अक्षरशः, 'तोंडानें.' 'समक्ष' हा पर्यवसित अर्थ प्रयोगांतरांवर लक्ष्य देऊन केला आहे.

'स्तोत्यांनीं'=विप्रेभिः, म्हणजे आम्ही जे कवी त्यांहीं. सूक्त रचणारा आणि गाणारा वस्तुतः एकलाच मेधातिथि आहे, तथापि 'आम्हीं स्तोत्यांनीं' हा अनेकवचनी प्रयोग कां केला याविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे.

२. जे [ ऋभु ] तोंडानें आज्ञा केल्याबरोबर जुंपली जाणारी घोड्यांची जोडी इंद्राकरितां मनःसंकल्पानें निर्मिते झाले ते [ऋभु] आपल्या कौशल्यकृत्यांच्या योगानें यज्ञाप्रत पावले.

३. ते सभोंवताली फिरणारा सुखकारक रथ अश्वींकरितां निर्माण करिते झाले. ते दूध देणारी गाय निर्माण करिते झाले.

2. [The Ribhus] who by their wisdom fashioned for Indra his pair of tawny horses that yoke themselves at his command, attained the sacrifice by their acts of skill.

3. They fashioned for the truthful As'vins their chariot, circumambient and easy. They fashioned the cow that gives ambrosia.

---

२. या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, ऋभूंनीं इंद्राचे घोडे करून दिले हें जें त्यांचें कौशल्याचें कृत्य त्या कृत्यामुळें आणि दुसऱ्या अशाच कौशल्याच्या कृत्यांमुळें ते देवत्व पावले आणि त्यानंतर त्यांस मनुष्यें यज्ञ करूं लागलीं.

'तोंडानें आज्ञा केल्याबरोबर जुंपली जाणारी,' 'वचोयुजा'. म्हणजे ज्यांस हातानें जोडावयाचें अवश्य नाहीं, जोडले जा असें सांगितलें म्हणजे आपले आपण रथास जोडले जातात अशा घोड्यांची जोडी.

इंद्रासाठीं घोडे करून दिले हा ऋभूंचा पराक्रम या मंत्रांत वर्णिला आहे. आणि प्रथम मनुष्य असून आपल्या कौशल्यानें देवांसाठीं घोडे वगैरे करून दिले म्हणून ऋभु देव झाले असें सांगण्याचा भावार्थ आहे.

३. या मंत्रांत ऋभूंनीं अश्विदेवांस रथ करून दिला हा त्यांचा पराक्रम वर्णिला आहे. आणि क्षीर देणारी धेनु त्यांणीं निर्माण केली हाहि पराक्रम वर्णिला आहे. ही धेनु कोणती व कोणासाठीं त्यांनीं निर्मिली तें या ऋचेवरून समजत नाहीं. जिला मागाहून कामधेनु म्हणूं लागले आणि जिच्या विषयीं पुराणांतरीं वगैरे अनेक कथा आपण वाचतों तीच ही? किंवा जसे इंद्राला घोडे करून दिले, आणि अश्वींस रथ करून दिला तशीच ही गाय दुसऱ्या एकाद्या देवास अथवा एकाद्या उपासकास करून दिली तें समजत नाहीं.

'सभोंवताली फिरणारा' म्हणजे पृथ्वीसभोंवताली फिरणारा, सूर्याप्रमाणें पृथ्वीसभोंवताली प्रदक्षिणा करणारा, अश्वींस आकाशांतून पृथ्वीसभोंवताली नेणारा.

'अश्वींकरितां.' अश्वी हे कोण देव आहेत, त्याविषयीं पूर्वीं टीप दिली आहे ती पृष्ठ १४ वर सूक्त ३ ऋचा १ यावर पाहा.

युवाना पितरा पुनः सत्यमन्त्रा ऋजूयवः ।
ऋभवो विष्ट्यक्रत ॥ ४ ॥

युवाना । पितरा । पुनरिति । सत्यऽमन्त्राः । ऋजुऽयवः ।
ऋभवः । विष्टी । अक्रत ॥ ४ ॥

सं वो मदासो अग्मतेन्द्रेण च मरुत्वता ।
आदित्येभिश्च राजभिः ॥ ५ ॥ १ ॥

सम् । वः । मदासः । अग्मत । इन्द्रेण । च । मरुत्वता ।
आदित्येभिः । च । राजऽभिः ॥ ५ ॥ १ ॥

उत त्यं चमसं नवं त्वष्टुर्देवस्य निष्कृतम् ।
अकर्त चतुरः पुनः ॥ ६ ॥

उत । त्यम् । चमसम् । नवम् । त्वष्टुः । देवस्य । निःऽकृतम् ।
अकर्त । चतुरः । पुनरिति ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

४. सत्यमन्त्राः (=सत्यवचनाः) ऋजूयवः(=ऋजवः ) ऋभवो विष्ट्या (=चातुर्य-कर्मणा ) स्वकीयौ पितरौ पुनर्युवानावकार्षुः ॥

५. [हे ऋभवः ] मदयुक्ताः सोमा मरुत्वता इन्द्रेण च राजभिरादित्यैश्च सह युष्मान्समगच्छन्त ॥

६. उत ( =अपि च) त्यं ( प्रसिद्धं ) देवेन त्वष्ट्रा कृतं नवं चमसं [ यूयं ] पुनश्चतुरः अकृषत ॥

४. सत्यवचनी [ आणि ] प्रामाणिक ऋभु कौशल्याच्या योगानें [ आपल्या ] आईबापांस पुनः तरुण करिते झाले.

५. [ नंतर हे ऋभुदेव हो ], मरुद्युक्त इंद्राबरोबर [ आणि ] राजे आदित्य यांजबरोबर तुम्हांस मदकारक सोम प्राप्त झाले.

६. शिवाय त्वष्ट्या देवानें तयार केलेला जो तो नवा पेला त्याचे तुम्ही पुनः चार पेले करिते झालां.

4. The truth-speaking, honest Ribhus made [their] parents young again, by their [skilful] work.

5. [Then O Ribhus] you came to be offered the intoxicating Somas, in company with Indra accompanied by the Maruts, and with the kingly Âdityas.

6. Besides, you again made into four that new bowl fashioned by the god Tvashtâ.

---

४. ऋभूंनीं आपल्या आईबापांस वृद्धवयांत पुनः तरुण केलें हा एक त्यांचा पराक्रम पुष्कळ ठिकाणीं वेदांत सांगितला आहे तोच या मंत्रांत ओळा आहे.

'सत्यवचनी'='सत्यमन्त्राः' याचा 'ज्यांची योजना बिनचूक आहे ते' असाहि अर्थ होण्याचा संभव आहे.

'कौशल्याच्या योगानें'='विष्टी.' हें 'विष्टी' पद येथें तृतीयान्त क्रियाविशेषण आहे. अक्षरशः अर्थ, 'कृत्यानें', 'कामानें' असा आहे. त्यावरून कौशल्यकृत्यानें असें तात्पर्य.

५. या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, वर सांगितलेलीं कृत्यें ऋभूंनीं केल्यानंतर ऋभूंस अमरत्व प्राप्त झालें आणि त्यांस इंद्रादि देवांप्रमाणें सोम अर्पण होऊं लागला.

'मरुद्युक्त इंद्राबरोबर' म्हणजे ज्याजबरोबर मरुत् आहेत अशा इंद्रासह.

'आदित्यांबरोबर' इ०. सायणाचार्य म्हणतात कीं, "ऋभूंस इंद्रादि-" त्यांसह तृतीयसवनाच्या ठायीं सो-" मपान असतें." 'आदित्य' याविषयीं सू. १४ ऋ. ३ यावरील पृष्ठ १०२ वर टीप पाहा.

या मंत्रांत आदित्यांस राजे असें म्हटलें आहे त्याजकडेस लक्ष्य द्यावें. ऋग्वेदांत देवांस 'राजे' म्हणण्याची चाल पुष्कळ आहे. उदाहरणार्थ.—"राजन् एनांसि शिश्रथः कृतानि" असें वरुणास म्हटलें आहे (१. २४. १४. याच सूक्ताचे ७. ८. १२. १३ हे मंत्र पाहा). न घ राजा इन्द्रः आ दभत् १.१७८.२, शुष्मी राजा वृत्रहा सोमपावा ५.४०.४, असें इंद्राविषयीं म्हटलें आहे; वरुणः मित्रः अर्यमा क्षत्रं राजानः आशत ७.६६.११, आणि वि दुर्गा वि द्विषः पुरो घ्नन्ति राजान एषाम् १.४१.३ असें आदित्यांविषयीं म्हटलें आहे. याशिवाय दुसरे अनेक प्रयोग आहेत. देवांस राजा अ-

ते नो रत्नानि धत्तन त्रिरा साप्तानि सुन्वते ।
एकमेकं सुशस्तिभिः ॥ ७ ॥

ते । नः । रत्नानि । धत्तन । त्रिः । आ । साप्तानि । सुन्वते ।
एकम्ऽएकम् । सुशस्तिऽभिः ॥ ७ ॥

अधारयन्त वह्नयोऽभजन्त सुकृत्यया ।
भागं देवेषु यज्ञियम् ॥ ८ ॥ २ ॥

अधारयन्त । वह्नयः । अभजन्त । सुऽकृत्यया ।
भागम् । देवेषु । यज्ञियम् ॥ ८ ॥ २ ॥

## भाषायाम्.

७. ते [यूयम्] [अस्माकमेताभिः] सुशस्तिभिः अस्माकं सुन्वते (=यजमानाय) त्रिरा (=त्रिः आवृत्तानि) रत्नानि एकैकं धत्त (=दत्त) । त्रिरावृत्तानि साप्तानि (=सप्तसंख्याकानि कर्माणि) [संपादयत च] ॥

अथवा । ते [यूयम्] [अस्माकमेताभिः] सुशस्तिभिः अस्माकं सुन्वते (=यजमानाय) त्रिरावृत्तानि साप्तानि (=सप्तसंख्याकानि) रत्नानि धत्त (=दत्त) ॥

८. वह्नयः (=यज्ञस्य संपादयितारः) [ऋभवः] अधारयन्त (=मरणाद्रक्षिताः) । सुकृत्यया (=सुकर्मभिः) देवेषु यज्ञियं भागमभजन्त ॥

थवा राजे असें म्हणण्याचें तात्पर्य असें कीं, देव हे आम्हां मनुष्यांचे राजे होत आणि राजा जसा प्रजांचें पालन करितो तसें आमचें पालन ते करितात आणि प्रजाप्रमाणें पाप न करण्याविषयीं व सन्मार्गानें चालण्याविषयीं वगैरे त्यांच्या आज्ञा आम्हीं पाळिल्या पाहिजेत.

६. त्वष्टा हा देवांचा शिल्पी होय. तो देवांचा विश्वकर्मा. सूक्त १३ मंत्र १०•पृष्ठ ९८ याजवरील टीप पाहा. त्वष्ट्यानें केलेला सोम पिण्याचा पेला एक होता. त्याचे ऋभूंनीं चार केले असें पूर्वीं सांगितलेंच आहे.

—c—

७. तर [ हे ऋभूंनो ], तुम्ही [ आमच्या ह्या ] सुस्तवनांच्या योगेंकरून आमच्या यजमानाला क्रमानें एक एक अशीं त्रिवार धनें द्या; [ आणि ] सातसातपट जीं त्रिवार कर्में तीं संपादन करा.

८. यज्ञनिष्पादक [ ऋभु ] अमर्त्य झाले, [ आणि ] [आपल्या] चातुर्याच्या योगानें देवांमध्यें यज्ञसंबंधी हविर्भाग पावले.

7. Confer, therefore, ye [ Ribhus ], by [virtue of these our] good prayers, the three-fold riches upon our sacrificer, one by one; [and] accomplish the thrice seven-fold works.

8. Accomplishers of the sacrifice [the Ribhus] were preserved [from death]; by [their] skill they obtained a part of the sacrifice among the gods.

७. या मंत्रांतील सर्व शब्द सोपे आहेत आणि पदशः अर्थ स्पष्ट दिसत आहे तथापि भावार्थ कठिण आहे. आम्हीं सायणास अनुसरून अर्थ केला आहे. परंतु आमच्या मनाची खात्री तो अर्थ नीट आणि सर्वांशीं खरा असेल अशी होत नाहीं तथापि दुसरा अर्थ असा आम्हीहि सांगूं शकत नाहीं कीं, ज्यामध्यें कांहींच अडचणी येणार नाहींत. आम्हांस वाटतो तो सरळ अर्थ असा:—"तर "[ हे ऋभूंनो ], तुम्ही आमच्या ह्या "सुस्तवनाच्या योगेंकरून आमच्या य- "जमानास क्रमानें एक एक अशीं "त्रिवार सातपट धनें द्या.". परंतु "त्रिवार सातपट" म्हणजे काय आणि तीं कोणतीं धनें? आम्हीं जो सायणास अनसरून वर अर्थ दिला आहे त्यांत सायणाचार्यांप्रमाणें त्रिवार धनें म्हणजे उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ मिळून त्रिवीं., आणि 'सातपट जीं त्रिवार कर्में' (हा इतका अर्थ केवळ 'सप्तानि' इतक्या एका शब्दाचा त्रिवार हें पुनः अध्याहृत घेऊन ते करितात ) म्हणजे "अग्न्याधेय, दर्शपूर्णमास इत्यादि जे सात हविर्यज्ञ तो एक वर्ग, औपासन होम, वैश्वदेव इत्यादि सात पाकयज्ञांचा दुसरा वर्ग, आणि अग्निष्टोम, अत्यग्निष्टोम इत्यादि सात सोमसंस्थ यज्ञांचा तिसरा वर्ग." परंतु 'साप्त' यांत 'सप्तसंख्याक कर्म' इतक्या अर्थाचा समावेश लक्षणेनें तरी या स्थलीं होईल असें आम्हांस वाटत नाहीं. शिवाय 'एकमेकम्' हें पद सायणाचार्य 'त्रिवार' धनांकडेस मात्र घेतात. कर्मांकडेस त्याचा संबंध लावीत नाहींत, आणि अन्वयाकडे पाहूं गेलें असतां 'सातपट त्रिवार कर्में' याजकडेसच त्याचा संबंध लावावा हें योग्य दिसतें.

८. ह्या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, ऋभु हे आपल्या कौशल्याच्या योगानें (म्हणजे होमास अवश्य अशा चमसादिक वस्तू निर्माण करून असें सायणाचार्य म्हणतात ) अमरत्व प्रथम मनुष्य असताहि पावले आणि मग सहजच मानवी प्राणी त्यास इतर देवांप्रमाणें यज्ञहवि अर्पण करूं लागले. ते देवलोकीं झाले.

## सूक्तम् २१.

कण्वपुत्रो मेधातिथिर्ऋषिः । इन्द्राग्नी देवता । गायत्री छन्दः ॥

**इहेन्द्राग्नी उप ह्वये तयोरित्स्तोममुश्मसि ।**
**ता सोमं सोमपातमा ॥ १ ॥**

इह । इन्द्राग्नी इति । उप । ह्वये । तयोः । इत् । स्तोमम् । उश्मसि ।
ता । सोमम् । सोमऽपातमा ॥ १ ॥

**ता यज्ञेषु प्र शंसतेन्द्राग्नी शुम्भता नरः ।**
**ता गायत्रेषु गायत ॥ २ ॥**

ता । यज्ञेषु । प्र । शंसत । इन्द्राग्नी इति । शुम्भत । नरः ।
ता । गायत्रेषु । गायत ॥ २ ॥

---

### भाषायाम्.

१. [अहम्] इन्द्राग्नी इह आह्वयामि । [वयं] तयोरेव स्तुतिमुश्मः (=कामयामहे) । तौ [हि] सोमस्य अतिशयेन पातारौ [स्तः] ॥

२. हे नरः [यूयं] ताविन्द्राग्नी प्रशंसत (=स्तुत) शोभयत [च] । [यूयं] तौ गायत्रेषु गायत ॥

---

हा भावार्थ स्पष्ट आहे तरी दोन शब्द या मंत्रात किंचित् कठिण आहेत, ते 'अधारयन्त' आणि 'वह्नयः' 'वह्नयः' म्हणजे नेणारे, संपादन करणारे, यज्ञसंपादणारे, ऋत्विज (उप ये त्वा गृणन्ति वह्नयः १. ४८. ११ पहा). यांतील यज्ञाची पूर्णता करणारे हा अर्थ सायणास अनुसरून येथें आम्हीं घेतला आहे. तथापि याहून सयुक्तिक अर्थ येथें अपेक्षित आहे असें कबूल करणें भाग आहे. 'वह्नयः' हें देवाचें साधारण नाव आहे, म्हणजे वेदांत तसा त्याचा अर्थ होतो, त्यापेक्षा केवळ देव असा अर्थ केल्यास चालेल; परंतु 'देव झाले' असें तात्पर्य अधारयन्त या क्रियापदापासून काढावयाचें आहे त्यापेक्षा 'वह्नयः' म्हणजे देव हा अर्थ बरा दिसत नाहीं. 'अधारयन्त' याचा अर्थ 'आपणास रक्षिते झाले,' अर्थात् मरणापासून असा अर्थ आत्मनेपद असल्यामुळें काढिला पाहिजे.

## सूक्त २१.

**ऋषि** आणि **वृत्त** पूर्वीप्रमाणें.
**देवता** इंद्राग्नी.

१. मी इंद्राग्नींस येथें बोलावितों. आम्हांस त्यांचेंच स्तोत्र आवडतें. [ कारण कीं ], ते दोघेहि अत्यत सोम पिणारे [ होत ].

२. त्यांला[च ] यज्ञांमध्यें स्तवा; हे वीर हो, इंद्राग्नींचें[ च] गौरव वाढवा; त्यांला[ च ] [ तुम्ही आपल्या ] गायत्रांत गा.

## HYMN 21.

To *Indrâgni* (*i. e. Indra* and *Agni*). Author and Metre as before.

1. I invoke here Indra and Agni; we love their praises exclusively. [For] they are both the greatest drinkers of Soma.

2. Them ye shall praise in your sacrifices; ye heroes, ye shall glorify Indra and Agni. Sing their praises in [your] *gâyatras*.

---

१. ही ऋचा लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे. तिचा भावार्थ स्पष्टच आहे. इंद्र आणि अग्नि हे सोम फार पीत असतात यास्तव त्यांच्याच स्तुती करणें हें आम्हांस आवडतें, इतरांच्या आवडत नाहींत म्हणून त्यांस मी बोलावितों असें मंत्रवक्त्याचें हृद्ग. सोम फार पिणारे आहेत म्हणून इंद्राग्नी हे ऋषीस प्रिय होत व स्तुत्यर्ह होत हें कारण लक्ष्यांत ठेवण्याजोगें होय.

'इंद्राग्नींस' म्हणजे इंद्र आणि अग्नि यांस. वेदांत कितीएक देवांचीं जोडपीं येतात. जसें अग्नीषोमौ, सूर्याचन्द्रमसौ, मित्रावरुणौ, इन्द्रावरुणौ; त्यांपैकींच इन्द्राग्नी हें आहे. सूक्त २ मंत्र ८ याजवरील टीप १२ व्या पृष्ठावर पाहा.

'आम्हांस त्यांचेंच स्तोत्र आवडतें=' 'तयोरित्स्तोममुश्मसि.' म्हणजे इतरांचें आवडत नाहीं. ही केवळ प्रशंसा आहे. याच ऋषीनें पूर्वील सूक्तांत मरुतांची व ऋभूंची स्तुति केली आहे व इतर देवांचीहि या पूर्वीच्या सूक्तांत केली आहे ती पाहा. या प्रशंसेविषयीं सूक्त १२ ऋचा २ यावर दिलेली ८२ व्या पृष्ठावरची टीप पाहा.

'अत्यंत सोम पिणारे होत'='सोमं सोमपातमा.' सोमं या द्वितीयेचा संबंध सोमपातमा. याशीं करावयाचा. सायणाचार्य पिबताम् या क्रियापदाचा अध्याहार करून त्याच्याशीं सोमम् याचा संबंध लावितात, पण तसें करण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं.

२. 'त्यांला[च]'='ता.' म्ह. इंद्राग्नीलाच.—हे 'वीर हो,'='नरः' हें संबोधन कण्वकुळांतील जो मेधातिथि या सूक्ताचा वक्ता त्याजबरोबर गाणारे जे लोक होते त्यांचें आहे.—'गायत्रांत गा' ='गायत्रेषु गायत.' गायत्रें म्हणजे एक प्रकारचीं गायनें, फारकरून गायत्रवृत्तामध्यें असलेलीं गायनें, या सूक्ताप्रमाणें सूक्तें. गायत्रशब्दावर सूक्त १० ऋचा १ यावर दिलेली टीप ६४ व्या पृष्ठावर पाहा.

ता मित्रस्य प्रशस्तय इन्द्राग्नी ता हवामहे ।
सोमपा सोमपीतये ॥ ३ ॥

ता । मित्रस्य । प्रऽशस्तये । इन्द्राग्नी इति । ता । हवामहे ।
सोमऽपा । सोमऽपीतये ॥ ३ ॥

उग्रा सन्ता हवामह उपेदं सवनं सुतम् ।
इन्द्राग्नी एह गच्छताम् ॥ ४ ॥

उग्रा । सन्ता । हवामहे । उप । इदम् । सवनम् । सुतम् ।
इन्द्राग्नी इति । आ । इह । गच्छताम् ॥ ४ ॥

ता महान्ता सदस्पती इन्द्राग्नी रक्ष उब्जतम् ।
अप्रजाः सन्त्वत्रिणः ॥ ५ ॥

ता । महान्ता । सदस्पती इति । इन्द्राग्नी इति । रक्षः । उब्जतम् ।
अप्रजाः । सन्तु । अत्रिणः ॥ ५ ॥

---

## भाषायाम्

३. ताविन्द्राग्नी मित्रस्य प्रशस्तये (=कीर्तये) [वयं] तौ [इन्द्राग्नी] हवामहे (=आह्वयामः) । सोमपौ [तौ] सोमं पातुं [हवामहे] ॥

४. उग्रौ (=ओजस्विनौ) [सन्तावपि] सन्तौ (=साधू) [इन्द्राग्नी वयम्] इदं सुतं (=अभिषुतं) सोमं प्रति हवामहे (=आह्वयामः) । [तौ] इन्द्राग्नी इह आगच्छताम् ॥

५. हे इन्द्राग्नी तौ महान्तौ सदस्पती (=गृहपती) [युवां] रक्ष उब्जतम् (=अधोमुखं पातयतम्) । अत्रिणः (=भक्षका राक्षसा) अप्रजाः सन्तु ॥

३. मित्राची प्रसन्नता प्राप्त व्हावी म्हणून त्या इंद्राग्नींस, त्या [इंद्राग्नीं]स [आम्ही] बोलावितों; त्या सोम पिणाऱ्या [इंद्राग्नीं]स [आम्ही] सोम पिण्यासाठीं [ बोलावितों ].

3. These Indrâgnî, these, we invoke for the favour of Mitra; [we invoke] the two Soma-drinking [gods] to drink the Soma.

४ बलवान् [ आहेत तरीहि ] कल्याण करणारे [ जे ] इंद्राग्नी त्यांस गाळून काढिलेल्या या सोमाप्रत आम्ही बोलावितों. [ तर ] इंद्राग्नी येथें येओत.

4. We call the mighty [but] kind [Indra and Agni] to this sacrifice of extracted Soma. May Indra and Agni come hither.

५. तर हे इंद्राग्नी हो, मोठे [ आणि ] गृहपती [ असे जे ] तुम्ही ते राक्षसाला नाहींसे करा. [ आम्हांस ] खाऊन टाकणाऱ्या राक्षसांचें निसंतान होओ.

5. Ye, therefore, Indra and Agni, great protectors of the house, suppress the Rakshas. May the destructive demons be void of issue.

---

३. 'मित्राची प्रसन्नता व्हावी म्हणून'='मित्रस्य प्रशस्तये.' म्हणजे 'मित्रानें आम्हांवर प्रसन्न व्हावें या उद्देशानें. मित्र हा एक वैदिक देव आहे. याविषयीं पूर्वीं सूक्त २ ऋचा ७ याजवर दिलेली टीप ११ व्या पृष्ठावर पाहा.

'सोम पिणाऱ्या [इंद्राग्नीं]स.' सोम पिणारे हें विशेषण आदरार्थी येथें लाविलें आहे. उपासकानें अर्पण केलेला सोमरस पिणारे असें तात्पर्य.

'[आम्ही] बोलावितों.' सूक्त म्हणणारा एकटाच ( मेधातिथि ) आहे, तथापि त्याजबरोबर त्याच्या कुटुंबाचीं दुसरीं माणसें अनेक होतीं म्हणून अनेकवचन घातलें आहे. पूर्वीं सूक्त १४ मंत्र २ याजवर पृष्ठ १०० यांत दिलेली टीप पाहा.

४. 'बलवान् [ आहेत तरीहि ] कल्याण करणारे'='उग्रा सन्ता.' सन्ता (=सन्तौ ) याचा अर्थ 'कुशल', 'चतुर' असाहि होईल. तसा केल्यास 'बलवान् आणि चतुर' असा अर्थ करावा.— 'गाळून काढिलेल्या या सोमाप्रत.' म्हणजे ज्या यज्ञांत सोम काढून अर्पण केला जातो अशा यज्ञाप्रत.

५. 'गृहपती,'='सद्स्पती,' म्हणजे उपासकाच्या घराचें रक्षण करणारे. यज्ञ करणाऱ्याच्या घरादाराचें रक्षण करितात असे.—'नाहींसे करा'='उब्जतम्.' अक्षरशः पायांखालीं घाला, चिरडून टाका. ऋ. १. ८५.९ याजवरील सायणाचार्यांचें भाष्य पाहा.

'आम्हांस खाऊन टाकणाऱ्या राक्षसांचें निसंतान होओ.' ही विनंती ल-

तेन सत्येन जागृतमधि प्रचेतुने पदे ।
इन्द्राग्नी शर्म यच्छतम् ॥ ६ ॥ ३ ॥

तेन । सत्येन । जागृतम् । अधि । प्रऽचेतुने । पदे ।
इन्द्राग्नी इति । शर्म । यच्छतम् ॥ ६ ॥ ३ ॥

## भाषार्थम्.

६. हे इन्द्राग्नी तेन सत्येन [युवां] प्रचेतुने पदे (=प्रज्ञापके स्थले) अधि जागृतम् । [युवामस्मभ्यं] शर्म (=शरणस्थानं) यच्छतं (=दत्तम्) ॥

क्ष्यात ठेवण्याजोगी आहे. हे राक्षस म्हणजे कोण? 'अत्रिन्' याचा शब्द- शः अर्थ 'खाऊन टाकणारे' असा आहे.

---

## सूक्तम् २२.

कण्वपुत्रो मेधातिथिर्ऋषिः । देवता १-४ अश्विनौ । ५-८ सविता । ९-१० अग्निः । ११ देव्यः । १२ इन्द्राणीवरुणान्यग्नाय्यः । १३.१४ द्यावापृथिव्यौ । १५ पृथिवी । १६ विष्णुर्देवो वा । १७-२१ विष्णुः । गायत्री च्छन्दः ॥

प्रातर्युजा वि बोधयाश्विनावेह गच्छताम् ।
अस्य सोमस्य पीतये ॥ १ ॥

प्रातःऽयुजा । वि । बोधय । अश्विनौ । आ । इह । गच्छताम् ।
अस्य । सोमस्य । पीतये ॥ १ ॥

## भाषार्थम्.

१. प्रातर्युजौ (=प्रातःकाले अश्वौ रथे योजयन्तौ) अश्विनौ विबोधय (=प्रबोधय) । [तौ]अश्विनौ अस्य सोमस्य पानाय अत्र आगच्छताम् ॥

६. आणि हें [ वर म्हटलेलें] खरें आहे तर तुम्ही प्रसिद्ध स्थानीं जागृत राहा. हे इंद्राग्नीहो, [तुम्ही आम्हांस] आश्रय द्या.

6. And since that is true, be ye wakeful, India and Agni, in a conspicuous place. Indra and Agni, give [us] protection.

६. 'हें [ वर म्हटलेलें ] खरें आहे तर'='तेन सत्येन.' म्हणजे तुम्हाविषयीं जें आम्हीं या सूक्तांत सांगितलें तें खरें आहे त्यापेक्षां. म्हणजे' आम्ही तुम्हाविषयीं मनःपूर्वक स्तुती करीत आहों त्यापेक्षां.

'प्रसिद्ध स्थानीं'='अधि प्रचेतुने पदे.' म्हणजे ज्या ठिकाणाहून आम्हास तुम्ही नीट पाहूं शकाल अशा प्रमुख स्थळीं. मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'ज्यापेक्षां आम्ही तुमची स्तुती मनःपूर्वक प्रीतीनें करीत आहों त्यापेक्षां तुम्ही प्रसिद्ध स्थळीं आम्हासाठीं जागृत राहून आम्हास आश्रय द्या, आणि आमचें संरक्षण करा.'

---

## सूक्त २२.

ऋषि आणि वृत्त पूर्ववत्. देवता—१-४ अश्वी, ५-८ सविता, ९-१० अग्नि, ११ देवी, १२ इंद्राणी, वरुणानी, अग्नायी, १३-१४ द्यावापृथिवी, १५ पृथिवी, १६-२१ विष्णु (१६ विष्णु अथवा देव).

१. प्रातःकाळीं [आपला रथ] जुंपणाऱ्या [अश्वीं]ला जागृत कर; अश्वी येथें येओत; हा सोम पिण्यासाठीं [अश्वी येथें येओत].

## HYMN 22.

To the *As'vins* (1-4), *Savitá* (5-8), *Agni* (9-10), *Devís* (11), *Indráṇí*, *Varuṇáni* and *Agnáyí* (12), *Dyávápṛithiví* (13-14), *Pṛithiví* (15), *Vishṇu* (16-21) in the sixteenth *Vishṇu* or *Deva*.

1. Wake [the As'vins] that harness [their chariot] in the morning. May the As'vins come hither to drink this Soma.

१. 'प्रातःकाळीं [ आपला रथ ] जुंपणाऱ्या'= 'प्रातर्युजा.' म्हणजे जे अश्वी प्रातःकाळीं आपल्या रथास घोडे जोडून गमन करीत असतात. 'अश्वीं'-विषयीं सूक्त ३ मंत्र १ पृष्ठ १४ याजवरील टीप पाहा. 'प्रातर्युजा' याचा अर्थ "प्रातःसवनानें संयुक्त" असा सायणाचार्य करितात.

'अश्वींला जागृत कर.' "हें होता अध्वर्यूला म्हणत आहे" असें सायणा-

या सुरथा रथीतमोभा देवा दिविस्पृशा ।
अश्विना ता हवामहे ॥ २ ॥

या । सुऽरथा । रथिऽतमा । उभा । देवा । दिविऽस्पृशा ।
अश्विना । ता । हवामहे ॥ २ ॥

या वां कशा मधुमत्यश्विना सूनृतावती ।
तया यज्ञं मिमिक्षतम् ॥ ३ ॥

या । वाम् । कशा । मधुऽमती । अश्विना । सूनृताऽवती ।
तया । यज्ञम् । मिमिक्षतम् ॥ ३ ॥

नहि वामस्ति दूरके यत्रा रथेन गच्छथः ।
अश्विना सोमिनो गृहम् ॥ ४ ॥

नहि । वाम् । अस्ति । दूरके । यत्र । रथेन । गच्छथः ।
अश्विना । सोमिनः । गृहम् ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

२. यावुभावश्विनौ देवौ सुरथौ रथितमौ दिविस्पृशौ (=द्युलोकस्पृशौ) [च स्तः] तौ [अश्विनौ वयं] हवामहे ॥

३. हे अश्विनौ युवयोर्या कशा (=प्रतोदः) मधुमती सूनृतावती (=प्रियध्वनियुक्ता) [चास्ति] तया [इमं] यज्ञं मिमिक्षतं (=सेक्तुमिच्छतम्) ॥

४. यत् सोमिनो गृहं [प्रति] [युवां] रथेन गच्छथः तद् हे अश्विनौ युवयोर्दूरे नास्ति हि ॥

---

चार्य म्हणतात. 'अश्विंस (स्तोत्रानें?) जागृत कर' यावरून बोलणारा मोठ्या पहाटेस उठून देवभजन करण्यास सिद्ध झाला आहे हें, सांगावयास नकोच. आपले पूर्वज पहाटेस उठून देवयजन करीत याविषयीं पूर्वीं आम्हीं सांगितलेंच आहे.

'हा सोम पिण्यासाठीं' म्हणजे जो सोम अर्पण करीत आहें तो असा अर्थ. देवाला बोलाविण्याचें मुख्य प्रयोजन म्हटलें म्हणजे त्यांणीं येऊन हविरन्न घ्यावें आणि सोम प्यावा असें होतें.

२. ज्यांचे रथ चांगले, जे रथींमध्यें उत्तम रथी [ असे ] उभयतां आकाशस्पर्शी अश्वी देव, त्यांस [ आम्ही ] बोलावितों.

2. Those two gods, possessed of a good chariot; [and] excellent charioteers [and] touching the sky [with their chariot] we invoke those As'vins.

३. हे अश्वी हो, जो तुमचा चाबूक मधुररसानें भरलेला [ आणि ] मंजुळ ध्वनि करणारा तेणेंकरून [ ह्या ] यज्ञावर सेचन करा.

3. With your whip, As'vins, which is full of sweet juice [and] has a sweet sound, sprinkle this sacrifice.

४. कारण कीं, हे अश्वी हो, सोमरस काढून अर्पण करणाऱ्या [ भजका ]चें घर तुम्हांस दूर नाहीं, कां कीं, [ तुम्ही ] तेथें रथांत बसून जात असतां.

4. For to you, As'vins, the house of the Soma-sacrificer, whither you go in your chariot, is not far off.

---

२. मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'ज्यांचे रथ चांगले आहेत आणि जे रथ हाकण्याविषयीं अति कुशल आणि ज्यांचे रथ इतके मोठे आणि उंच आहेत कीं, ते आकाशापर्यंत पोंहचतात अशा दोनहि अश्वी देवांस आम्हीं येथें यज्ञास बोलावितों.'

'जे रथींमध्यें उत्तम रथी.' कितीहि मोठा शूर अथवा योद्धा असला तरी प्रस्तुतकाळीं आपण त्याची प्रशंसा करूं लागलों म्हणजे त्याला गाडी चांगली हाकतां येते असें आपण म्हणणार नाहीं. परंतु प्राचीन काळच्या योद्ध्यांचें वर्णन होऊं लागलें म्हणजे तो उत्तम रथी म्हणजे गाडी चांगली हाकणारा असें आपल्या पाहण्यांत येतें. याचें कारण काय ? याचें उत्तर इतकें आहे कीं, प्राचीन काळीं रस्ते आतां आहेत तसे सुंदर बांधलेले नसत. रानींत आबडधोबड रस्त्यावरून गाडी हाकणें म्हणजे अजूनहि कठिण काम आहे. मग प्राचीन काळीं तर ( अरण्यें वगैरे अडचणी फार असल्यामुळें ) फारच कठिण असेल यांत संशय नाहीं. म्हणून मानवी शूरांस जें विशेषण लावावें तेंच ह्या सूक्ताच्या कर्त्यानें सहजच अश्वींस लाविलें आहे. अश्वी हे उत्तम रथांत बसून आकाशमार्गानें गमन करितात असें वेदांत वर्णन आहे.

३. अश्वींस जसा उत्तम रथ आहे असें आर्यजन म्हणत, तसेंच त्याला मधुररसानें भरलेला आणि मधुर ध्वनीनें युक्त असा चाबूक आहे असेंहि म्हणत असत, तेंच या मंत्रांत सांगितलें आहे. कारण घोडे आणि रथ आहेत त्यापेक्षां चाबकाशिवाय कसें चालेल ?

**हिरण्यपाणिमूतये सवितारमुप ह्वये ।**
**स चेत्ता देवता पदम् ॥ ५ ॥ ४ ॥**

हिरण्यऽपाणिम् । ऊतये । सवितारम् । उप । ह्वये ।
सः । चेत्ता । देवता । पदम् ॥ ५ ॥ ४ ॥

**अपां नपातमवसे सवितारमुप स्तुहि ।**
**तस्य व्रतान्युश्मसि ॥ ६ ॥**

अपाम् । नपातम् । अवसे । सवितारम् । उप । स्तुहि ।
तस्य । व्रतानि । उश्मसि ॥ ६ ॥

## भाषायाम्.

५. [ अहं ] हिरण्यपाणिं सवितारमूतये आह्वयामि । देवेषु [ हि ] स पदस्य (=अस्माकं स्थानस्य ) चेत्ता (=द्रष्टा भवति ) ॥

६. अपां नपातं (=पुत्रं ) सवितारम् अवसे (=रक्षणाय ) उपस्तुहि । तस्य व्रतानि (=कर्माणि ) [ हि ] [ वयम् ] उश्मः (=कामयामहे ) ॥

चाबकानें 'ह्या यज्ञावर सेचन करा' म्हणजे ह्या आमच्या यज्ञावर अनुग्रह करा. मधुररसानें म्हणजे गोडीनें भरलेला चाबूक आहे तेणेंकरून जर यज्ञावर सेचन केलें तर चाबकांत असलेली गोडी यज्ञांत येईल असा भावार्थ आहे. या ठिकाणीं यज्ञ म्हणजे देवांस अर्पण करावयाचे जे अन्नादि पदार्थ ते असा अर्थ समजावयाचा.

४. मंत्राचें तात्पर्य असें कीं, 'जो भक्त यज्ञांत अश्वींस सोमरस अर्पण करीत असतो त्याचे घरीं अश्वी हे रथांत बसून जातात, त्यापेक्षां अश्वींस तें घर लांब आहे असें नाहीं. अतएव वरच्या मंत्रांत जी प्रार्थना केली ती आमची प्रार्थना अश्वी सहज मान्य करूं शकतील.'

प्राचीन आर्य लोक आपल्या आराध्यदेवतांशी कशी विनवणी करीत त्याचा हा एक चांगला मासला आहे.

५. ज्याचे हात सुवर्णमय [आहेत] त्या सवित्यास [आमचें] रक्षण करण्यासाठीं मी येथें बोलावितों. देवांमध्यें स्थान जाणणारा तो होय.

६. उदकांचा पुत्र असा जो सविता त्याला [आमचे] रक्षणासाठीं स्तव. त्याचीं व्रतें आम्हांस आवडतात.

5. I call the golden-handed Savitâ hither for [our] protection; among the gods he is the one that sees the place.

6. Praise Savitâ the son of the waters for protection. We love his ordinances.

५. या सूक्तांतील ५ पासून ८ पर्यंत ऋचा 'सवित्या' देवाविषयीं आहेत. सविता हा वैदिक देव मोठ्या महत्त्वाचा आहे. यांजविषयीं वेदांत पुष्कळ सूक्तें येतात. सविता म्हणजे सूर्याभिमानिनी देवता, म्हणजे सूर्यरूपी देव. सविता देव सकल वस्तूंच्या अंगीं प्राण निर्माण करितो. सूर्याचे जे किरण तेच सवित्याचे हात. त्याला चित्रभानु म्हणजे चित्रविचित्र रंगाचा प्रकाश ज्याचा आहे तो, असें नाव आहे. त्याला 'नृचक्षाः' ('मनुष्यांस पाहणारा,') 'हिरण्यहस्त,' 'हिरण्यपाणि,' 'हिरण्याक्ष,' 'सुपाणि', सुजिह्व,' 'सुरत्न, 'पूर्णगभस्ति', 'विश्वधर्मा', 'विश्वानर', 'विचर्षणि' (भटकणारा) इत्यादि विशेषणें लाविलेलीं आढळतात.

या सवित्या देवाला 'हिरण्यपाणि' म्हणजे सोन्याच्या हाताचा म्हटलें हें योग्यच आहे, कारण कीं, सूर्यकिरण हे सुवर्णाच्या कांतीचे असतात.

'देवांमध्यें स्थान जाणणारा तो होय'='स चेत्ता देवता पदम्.' देवता हें या ठिकाणीं क्रियाविशेषण अव्यय होय, 'देवेषु' या अर्थी. 'देवांमध्यें स्थान जाणणारा तो होय' म्हणजे सकल देवांपैकीं हा देव उपासकाचें स्थान कोठें आहे हें जाणणारा होय असा अर्थ.

सायणाचार्य या तृतीयपादाचा अर्थ करितात तो येणेंप्रमाणें:—"तो सविता "देव या मंत्रांत सांगितलेली देवता "होऊन पदम् म्हणजे यजमाना-"नें ज्या पदाप्रत पावावें त्या पदाप्रत "म्हणजे स्थानाला चेत्ता म्हणजे "दाखविणारा होतो."—'हिरण्यपाणि याचाहि सायणाचार्य यजमानाला देण्याकरितां हातांत सुवर्ण धारण करणारा' असा अर्थ करितात.

६. 'उदकांचा पुत्र...त्याला'=अपां नपातम्. 'उदकांचा पुत्र' हें विशेषण नित्य अग्निवाचक असतें. त्याचा अर्थ उदकांत जन्मलेला म्हणून उदकांचा पुत्र असा होतो. आकाशांत मेघोदकें असतात आणि त्यांत विद्युद्रूपी अग्नीची उत्पत्ति होते म्हणून त्यास उदकांत जन्मलेला असें समजून 'उदकांचा पुत्र' अशी संज्ञा अग्नीला मिळाली आहे. परंतु सवित्या देवास लाविलेलें हें विशेषण ज्यांत आहे असा हा एकच प्रयोग दिसतो.—'[आमचे] रक्षणा-

**विभक्तारं हवामहे वसोश्चित्रस्य राधसः ।**
**सवितारं नृचक्षसम् ॥ ७ ॥**

विऽभक्तारम् । हवामहे । वसोः । चित्रस्य । राधसः ।
सवितारम् । नृऽचक्षसम् ॥ ७ ॥

**सखाय आ नि षीदत सविता स्तोम्यो नु नः ।**
**दाता राधांसि शुम्भति ॥ ८ ॥**

सखायः । आ । नि । सीदत । सविता । स्तोम्यः । नु । नः ।
दाता । राधांसि । शुम्भति ॥ ८ ॥

**अग्ने पत्नीरिहा वह देवानामुशतीरुप ।**
**त्वष्टारं सोमपीतये ॥ ९ ॥**

अग्ने । पत्नीः । इह । आ । वह । देवानाम् । उशतीः । उप ।
त्वष्टारम् । सोमऽपीतये ॥ ९ ॥

---

**भाषायाम्.**

७. वसुनः (=समीचीनस्य ) चित्रस्य (=सुन्दरस्य ) [ च ] राधसः (=धनस्य ) विभक्तारं नृचक्षसं (=नराणां द्रष्टारं ) सवितारं [ वयं ] हवामहे ॥

८. हे सखायः, आ[गच्छत] निषीदत [च] । सविता[हि ] अधुना अस्माभिः स्तवनीयः । राधसां (=धनानां) दाता [स] शुम्भति (=शोभते) ॥

९. हे अग्ने, देवानाम् उशतीः ( =आगन्तुमिच्छन्तीः ) पत्नीः त्वष्टारं [च] सोमपानाय इह उपावह ॥

---

साठीं स्तव'='अवसे उपस्तुहि.' हें मंत्रवक्ता जवळ असलेल्या दुसऱ्या उपासकास सांगतो आहे अशी कल्पना करावी.—'त्याचीं व्रतें आम्हांस आवडतात.' म्हणजे सवित्याच्या प्रीत्यर्थ जीं काय कर्मे करावयाचीं असतात तीं करणें हें आम्हांस आवडतें. तीं कर्मे म्हणजे अमुक वेळीं सवित्यास सोमादि अर्पण करून त्यास भजणें, इत्यादि.

७. चांगली [आणि] सुंदर संपत्ती वांटून देणारा [आणि] मनुष्यांतें पाहणारा [जो] सविता त्याला [आम्ही] बोलाविशों

८. हे मित्रांनो, या वसा, आतां आम्हांस सवित्याची स्तुति गावयाची आहे; [तो] संपत्तींचा दाता तेजःपुंज* प्रकाशत आहे.

९. हे अग्नी, [इकडे येण्याविषयीं] उत्सुक [ज्या] देवांच्या पत्नी त्यांस, [आणि] त्वष्ट्यास सोम पिण्यासाठीं येथें घेऊन ये.

7. We invoke Savitâ the distributor of beneficent [and] beautiful wealth, [and] the observer of men.

8. Friends, come [and] sit down; Savitâ has now to be praised by us, [he] the bestower of riches is shining brightly.

9. Agni, bring hither the anxious wives of the gods [and] [the god] Tvashtâ to drink [our] Soma.

---

७. मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, सविता म्हणजे सूर्य उगवला म्हणजे या जगांत जी संपत्ति आहे ती निरनिराळ्या मनुष्यांस जणुं काय वांटली जाते. कारण सूर्य उगवण्याच्या पूर्वी अंधार असल्यामुळें सर्व वस्तु एकत्र घोटाळ्यांत पडल्यासारिख्या असतात, आणि सूर्य उगवतांच प्रत्येक मनुष्यास आपलें काय आणि दुसऱ्याचें काय तें समजतें, त्यामुळें सूर्यदेवता सविता हा संपत्ती वांटून देतो जणुं काय, असें कल्पिलें आहे.

'मनुष्यांतें पाहणारा,' म्हणजे कोण मनुष्य काय करितो हें आपण प्रत्यक्ष पाहणारा. हें विशेषण सूर्यरूपी जो सविता देव त्याला उत्तम रीतीनें योग्य दिसतें हें सांगावयास नकोच.

८. मंत्रकर्ता म्हणतो आहे कीं, 'हे मित्र हो 'या, आपण सवित्याची स्तुती करीत बसूं या; तो संपत्तीतें देणारा सविता उगवून प्रकाशत आहे. यास्तव स्तुतीचा समय झाला आहे.'

हा मंत्र लक्ष्यांत ठेवून ह्याचा विचार करण्याजोगा आहे. ऋग्वेदांतील सूक्तें सगळीं कुटुंबांचीं माणसें मिळून अथवा सगळी मित्रमंडळी मिळून गात होते आणि ख्रिस्ती लोकांसारिखे सामाजिक प्रार्थना करीत होते असें सूक्त १४ मंत्र २ याजवरील टिपेंत (पृष्ठ १०० या स्थळीं) सांगितलें आहे त्याला हें प्रमाण विशेष आहे.

९. ही आणि पुढची (दाहवी) ऋचा अग्निविषयीं आहे. मंत्रवक्ता म्हणतो कीं, 'देवांच्या स्त्रिया हा आमचा सोम पिण्यासाठीं यावयास आधींच उत्सुक आहेत, तर त्यांस आणि त्यांजबरोबर त्वष्ट्या देवास सोमपानार्थ इकडे आमच्या यज्ञाजवळ घेऊन ये.'

त्वष्टा हा कोण आहे याविषयीं पूर्वी सांगितलेंच आहे. सूक्त १३ ऋचा १०

**आ ग्ना अंग्न इहावसे होत्रां यविष्ठ भारतीम् ।**
**वरूत्रीं धिषणां वह ॥ १० ॥ ५ ॥**

आ । ग्नाः । अग्ने । इह । अवसे । होत्राम् । यविष्ठ । भारतीम् ।
वरूत्रीम् । धिषणाम् । वह ॥ १० ॥ ५ ॥

## भाषायाम्.

१०. हे यविष्ठ अग्ने, ग्नाः (=देवपत्नीः) अवसे (=रक्षणाय) आ[वह] । होत्रां भारतीं वरूत्रीं धिषणां [च] [आ]वह (=आनय) ॥

यावरची टीप पृष्ठ ९८ यावर पाहा.

सोम पिण्यासाठीं अग्नीनें देवांस व देवांच्या बायकांस उपासकाजवळ घेऊन येणें हें अग्नीचें काम वेदांत प्रसिद्ध आहे.

देवपत्नींविषयीं उल्लेख जो वेदांत येतो तो त्वष्ट्याशीं (या ऋचेंत आहे तसा) येतो. याविषयीं ऋ. ७. ३५. ६ 'त्वष्टा ग्नाभिः इह शृणोतु,' १०.६६. ३ 'त्वष्टा नो ग्नाभिः सुविताय जिन्वतु, १.१६१. ४ 'त्वष्टा ग्नासु अन्तः नि आनजे,' हीं स्थलें पाहा.

१०. हे परम तरुण अग्नी, [तूं] देवपत्नींस [आमच्या] रक्षणासाठीं येथें [आण]—होत्रा, भारती, वरूत्री [आणि] धिषणा यांस घेऊन ये.

10. O youthful Agni, bring the goddesses hither for [our] protection, [bring] Hotrâ, Bhârati, Varûtrî [and] Dhishaṇâ.

---

१०. 'परम तरुण अग्नी,'='यविष्ठ अग्ने.' अग्नीला 'यविष्ठ' अति तरुण हें विशेषण पुष्कळ ठिकाणीं लागलेलें आढळतें. त्या विशेषणाच्या योग्यतेविषयीं सांगावयास नकोच; कारण कीं, अनादि काळापासून अग्नि आहे तरी तो पुरातन काळीं होता तसाच अजूनहि तरुणच आहे.

'होत्रा' म्हणजे आव्हानाची देवता, हाकेची देवता. देवतास स्तोते जी हाक मारितात तद्रूपी एक मानिलेली देवता.

'भारती' म्हणजे वाग्रूपी, देवता. पूर्वी सूक्त १३ मंत्र ९ यावरील टीप ९६ व्या पृष्ठावर माहा.

'वरूत्री' म्हणजे संरक्षणाची देवता. संरक्षण करण्याविषयीं जिला मनुष्यें बोलावितात अशी एक वैदिक देवता.

'धिषणा' हीहि एक वैदिक देवता आहे. हिचें काम मनुष्यास संपत्ती प्राप्त करून देणें आणि मनुष्यांवर देवांची कृपा करून देणें. सायणाचार्य धिषणा म्हणजे वाग्रूपी देवता असें म्हणतात. आणि तें खरेंच आहे, कारण कीं मनुष्यांच्या वाचा म्हणजे देवांप्रत केलेल्या प्रार्थना देवांचा प्रसाद मनुष्यांवर होई असें करून देवांकडून त्यास द्रव्य मिळवून देतात, असा आर्यजनांचा भरंवसा होताच.

आतां ज्या देवपत्नी ( ग्नाः ) मंत्रांत सांगितल्या त्या होत्रा, भारती, वरूत्री आणि धिषणा ह्याच किंवा देवपत्नी वेगळ्या आणि ह्या देवता वेगळ्या हें ह्या मंत्रावरून स्पष्ट होत नाहीं, पण एकच असाव्या असें दिसतें. देवपत्नींस घेऊन ये असें साधारण रीतीनें सांगून मग देवपत्नींपैकीं कितीएकांचीं नांवें सांगितलीं आहेत असें दिसतें.

आव्हानाची देवता म्हणजे काय आणि ती कशाला कल्पिली, आणि भारती व धिषणा ह्या वाग्रूपी देवता कशाला कल्पिल्या, आणि वरूत्री ही संरक्षणाची देवता कल्पिण्याची आवश्यकता काय आहे? असा प्रश्न निघेल तर आगच्यांच्या शीतळा देवी कशाला कल्पिल्या? माता जोगणी ( जादूचा उपद्रव न होऊं देणारी ), माता खोडियार (खोडकर मनुष्यापासून उपद्रव होऊं न देणारी देवी ) ( गुजराथेंत ), मरी ( पटकीची देवी ), वाघजाई ( वाघाचा उपद्रव न होऊं देणारी ) आणि सटवाई ( सहाव्या दिवशीं मूल मरूं न देणारी ) ह्या व दुसऱ्या देवी कशाला पाहिजेत आणि त्या कशाला कल्पिल्या? हेंच त्या प्रश्नाचें उत्तर.

अभि नो देवीरवसा महः शर्मणा नृपत्नीः ।
अच्छिन्नपत्ताः सचन्ताम् ॥ ११ ॥

अभि । नः । देवीः । अवसा । महः । शर्मणा । नृऽपत्नीः ।
अच्छिन्नऽपत्ताः । सचन्ताम् ॥ ११ ॥

इहेन्द्राणीमुप ह्वये वरुणानीं स्वस्तये ।
अग्नायीं सोमपीतये ॥ १२ ॥

इह । इन्द्राणीम् । उप । ह्वये । वरुणानीम् । स्वस्तये ।
अग्नायीम् । सोमऽपीतये ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

११. महत्यो देव्यो नृपत्न्यः अवसा (=प्रसादेन) शर्मणा (=कल्याणेन) [च सह] अच्छिन्नपक्षाः अस्मानभिसचन्ताम् (=आभिमुख्येन सेवन्ताम्) ॥

१२. [अहम्] इन्द्राणीं वरुणानीम् अग्नायीं [च] स्वस्तये सोमपानाय [च] अत्रोपाह्वयामि ॥

११. मोठ्या [ अशा ज्या ] मनुष्यांच्या स्वामिनी देवी [ त्या ] प्रसादासहित [आणि] कल्याणासहित अच्छिन्नपक्ष येथें आम्हांकडेस येओत.

१२. इंद्राणी, वरुणानी [आणि] अग्नायी यांस [आमचें] कल्याण करण्यासाठीं [आणि] सोम पिण्यासाठीं मी येथें बोलावितों.

11. May the goddesses, the protectresses of men, come hither unto us swiftly with their protection [and] support.

12. I invoke here Indrâṇî, Varuṇânî [and] Agnâyî for doing good [to us] [and] for drinking [our] Soma.

---

११. 'मनुष्यांच्या स्वामिनी देवी' म्हणजे वरच्या ( १० व्या ) मंत्रांत ज्या देवपत्नी म्हणून सांगितल्या त्याच येथें समजावयाच्या. 'मनुष्यांच्या स्वामिनी' म्हणजे मनुष्यांचें पालन करणाऱ्या असें सायणाचार्य म्हणतात.–'अच्छिन्नपक्ष' म्हणजे ज्यांचे पक्ष छिन्न ( तुटले ) नाहींत अशा. यांत या देवींस पक्ष्यांची साम्यता विवक्षित आहे. 'अच्छिन्नपक्ष येओत' 'म्हणजे जसे पक्षी अच्छिन्नपक्ष असले तर लवकर येतील तशा येओत.– 'प्रसादासहित [ आणि ] कल्याणासहित.' म्हणजे प्रसाद आणि कल्याण घेऊन येओत. येओत आणि आम्हांस प्रसन्न होऊन आमचें कल्याण करोत असें तात्पर्य.–'येथें आम्हांकडेस येओत'='नः अभिसचन्ताम्.' शब्दशः अर्थ, 'मदतीसाठीं आम्हांकडेस येओत.'

नवव्या ऋचेंत देवांच्या पत्नींचें आह्वान केलें आहे त्यांत 'देवानां पत्नीः' असे शब्द आहेत, आणि या अकराव्या मंत्रांत, 'नृपत्नीः' (=नृणां पत्नीः ) असे शब्द आहेत, त्यापेक्षां त्या मंत्रांत देवपत्नीरूपी देवी आणि या मंत्रांत नृपत्नीः म्हणजे मनुष्यपत्नीरूपी देवी असा अर्थ होण्याचा चांगला संभव आहे. आणि तसें केलें तर नृपत्नी म्हणजे कोणी मनुष्यांच्या स्त्रिया मरून, जसे 'पितर' हे (देव झाले तशा), देवी झालेल्या देवी असें समजावें.

१२. इंद्राणी, वरुणानी आणि अग्नायी ह्या अनुक्रमें इंद्र, वरुण आणि अग्नि ह्यांच्या बायका. 'इंद्राणी' शब्दाचा अर्थ 'इंद्राची बायको.' त्याप्रमाणेंच वरुणानी आणि अग्नायी यांविषयीं समजावयाचें. परंतु इंद्राची ही जी बायको तिचें नांव काय आणि अग्नीच्या व वरुणाच्या बायकोचें नांव काय आहे तें समजत नाहीं. मागाहून झालेल्या ग्रंथांत इंद्राची बायको 'शची' अशी कथा आहे, आणि 'स्वाहा' ही अग्नीची बायको असें सांगितलें आहे. परंतु 'शची' शब्दाचा अर्थ प्रथम काय होता आणि मागाहून शची म्हणजे इंद्राची बायको कशी ह्याविषयीं पुढें सांगण्यात येईल.

***मही द्यौः पृथिवी च न इमं यज्ञं मिमिक्षताम् ।**
**पिपृतां नो भरीमभिः ॥ १३ ॥**

मही । द्यौः । पृथिवी । च । नः । इमम् । यज्ञम् । मिमिक्षताम् ।
पिपृताम् । नः । भरीमऽभिः ॥ १३ ॥

**तयोरिद्घृतवत्पयो विप्रा रिहन्ति धीतिभिः ।**
**गन्धर्वस्य ध्रुवे पदे ॥ १४ ॥**

तयोः । इत् । घृतऽवत् । पयः । विप्राः । रिहन्ति । धीतिऽभिः ।
गन्धर्वस्य । ध्रुवे । पदे ॥ १४ ॥

---

### भाषायाम्.

१३. महती द्यौः [ महती ] पृथिवी च अस्माकमिमं यज्ञं मिमिक्षतां (=सेक्तुमिच्छतां=सिञ्चताम् ) । भरणैरस्मान्पूरयताम् ॥

१४. तयोरेव घृतवत् (=रसवत्=स्निग्धरसार्द्रं ) पयो विप्रा (=मेधाविनो ) गन्धर्वस्य ध्रुवे पदे (=आकाशे ) लिहन्ति ॥

---

* ही ऋचा पुण्याहवाचनांत कलशाराधनसमयीं योजिली आहे.

१३. मोठ्या [ अशा ज्या ] द्यावापृथिवी त्या उभयतां आमच्या या यज्ञावर [ मधुर रसाचें ] सेचन करोत. त्या आम्हांस पोषणांनीं भरपूर करोत.

१४. त्यांचेंच स्निग्ध पय देवभजक लोक आपल्या भक्तीच्या योगानें गंधर्वाच्या अचल स्थलाच्या ठायीं चाटीत असतात.

13. May the great Heaven and Earth sprinkle [with sweetness] this our sacrifice; may they fill us with nourishments.

14. It is the fatty milk of these two that the singers taste in the eternal home of the *Gandharva*.

---

१३. 'मोठ्या' हें स्वभावोक्तियुक्त विशेषण येथें द्यावापृथ्वींस लाविलें तें यथायोग्य आहे यांत संशय नाहीं.—'[मधुररसाचें] सेचन करोत,' 'मिमिक्षताम्.' 'अक्षरशः, 'सेचन करोत,' 'भिजवोत,' 'आर्द्र करोत.' म्हणजे यज्ञाला ( सोमरस इत्यादि जे पदार्थ यज्ञांत देवांस अर्पण करावयाचे त्या पदार्थांला ) मधुर करोत. 'मिमिक्षताम्.' या क्रियापदाच्या अर्थाविषयीं याच सूक्ताच्या ३ ऱ्या मंत्रावरील टीप पाहा.—'पोषणांनीं भरपूर करोत' म्हणजे पुष्टिकारक पदार्थांनीं आम्हांस भरून टाकोत.

१४. 'त्यांचेंच' म्ह. द्यावापृथिवींचेंच.—'स्निग्ध पय' म्ह. चिकण दूध. 'देवभजक लोक...चाटीत असतात'= 'विप्राः रिहन्ति.' या शब्दांचा भावार्थ काय आहे तें स्पष्ट समजत नाहीं. आणि द्यावापृथिवींचें चिकण दूध तें कोणतें व तें देवभक्त कसें चाटितात तें नीट समजत नाहीं. आम्हीं सायणास अनुसरून शब्दशः अर्थ केला आहे. ते म्हणतात कीं, "गंधर्वाचें अचल स्थल " म्हणजे अंतरिक्ष, म्हणजे आकाश; " आणि द्यावापृथिवींचें दूध म्हणजे " उदक." गंधर्वाचें स्थल म्हणजे आकाश हा अर्थ खरा दिसतो आणि मंत्राचें तात्पर्य असें दिसतें कीं, देवभक्तांस जें मिष्ट उदक आकाशांतून पडत म्हणजे वर्षत असलेलें प्यावयास मिळतें तें द्यावापृथिवींचेंच दूध होय. अथवा या जगांत संपत्तिरूप मिष्ट दूध जें देवभक्तांस प्यावयास मिळतें तें आकाशांतून पडणारें द्यावापृथिवींचेंच मिष्ट दूध होय. किंवा हें चिकण दूध म्हणजे सोमरस असाहि कवीचा भावार्थ असेल.

'गंधर्वाचें अचल स्थल'='गन्धर्वस्य ध्रुवं पदम्.' गंधर्व म्हणून एक प्रकारचा देवयोनींतील प्राणी आहे. आणि गंधर्व ही एक प्रकारची देवांची विशेष जातिहि आहे. अर्वाचीन म्हणजे पुराणादिक ग्रंथांत गंधर्व हे स्वर्गींचे गायक लोक आहेत असें सांगितलें आहे. परंतु वेदांत गंधर्व हा एकच व्यक्ति आहे असें बहुतकरून सांगितलेलें आढळतें. आणि ऋग्वेदांत गंधर्वाविषयीं जे उल्लेख आहेत त्यांचें तात्पर्य खालीं उतरून घेतलें आहे.

*स्योना पृथिवि भवानृक्षरा निवेशनी ।
यच्छा नः शर्म सप्रथः ॥ १५ ॥ ६ ॥
स्योना । पृथिवि । भव । अनृक्षरा । निऽवेशनी ।
यच्छ । नः । शर्म । सऽप्रथः ॥ १५ ॥ ६ ॥

## भाषाभाष्यम्.

१५. हे पृथिवि [ त्वम् ] अस्मभ्यं स्योना (=सुखा) अनृक्षरा (=अकण्टका) निवेशनी (=विश्रान्तिस्थलवती ) [ च ] भव । [ अस्मभ्यं ] विस्तृतमाश्रयं [ च ] [प्र] यच्छ ॥

"गंधर्वाचा संबंध सूर्याशीं फार आहे. तो सूर्याच्या घोड्याचा लगाम आपल्या हातांत धरून रथ हाकतो. आणि तो आकाशांत अति उंच स्थलीं असतो. त्याच्या हातीं लखलखीत शस्त्रें असतात. त्याच्या अंगावर सुवासित आणि लखलखीत वस्त्रें आहेत, आणि तो पृथ्वीवर उजेड पाडतो. तो आकाशांतून मोठ्या त्वरेनें चालतो आणि त्याला आकाशांतून मोठ्या झपाट्यानें उडत जाणारा जो सुपर्ण (=पक्षी ) म्हणजे सूर्य त्याची उपमा दिलेली आढळते. सविता, पूषा आणि सोमदेव यांच्याशीं याचा संबंध फार येतो. आणि सोमाची उपमा त्याला दिलेली आढळते.

"गंधर्वास स्वर्गींचीं उदकें (=मेघोदकें ) वेष्टून असतात आणि तीं उदकें त्याच्या समक्ष खालीं भूमीवर वाहतात असें सांगितलें आहे. आणि हीं जीं खालीं वाहणारीं उदकें त्यांत दिव्य सोमरस असतो अशी विवक्षा पुष्कळ सूक्तांत दिसते. त्या सोमाचा रक्षक, आणि दाता गंधर्व आहे असें सांगितलें आहे. असेंहि सांगितलें आहे कीं, सोमवल्लीच्या अंगीं दिव्य सोमशक्ति येई असें करणारे गंधर्व कितीएक आहेत. गंधर्व म्हणून जो कोणी आहे त्याची बायको अप्सरा असें सांगितलें आहे. तिलाच 'अप्या योषा' आणि 'अप्या योषणा' असें नांव आहे. 'गंधर्व' आणि 'अप्या योषा' यांच्या पासून मनुष्यजातीचें जें पहिलें जोडपें यम आणि यमी त्यांची उत्पत्ति झाली. 'गंधर्व' याचा अधिकार अविवाहित कन्येवर मोठा असतो. अविवाहित युवति प्रथम 'गंधर्व' याची असते, मग ती सोमाची होते आणि त्यानंतर अग्नीची होते. आणि विवाहसमयीं नवरी नवऱ्याच्या स्वाधीन करण्याच्या पूर्वीं गंधर्वाची प्रार्थना केली पाहिजे. गंधर्वांचीं विशेषणें 'विश्वावसु' ( सर्व द्रव्यें ज्याजवळ आहे तो ), 'दिव्य, आणि 'वायुकेश ' अशीं आढळतात. गंधर्वांच्या गायनाविषयींहि क्वचित स्थळीं उल्लेख येतो ( ऋ. १०. १७७. २ ). गंधर्वास देवांचीं गुह्यें ठाऊक असतात. इत्यादि वेदांत सांगितलें आहे."

* ह्या ऋचेचा उपयोग याज्ञिक भूस्पर्शनाकडेस करितात.

१५. हे पृथ्वी, [ तूं आम्हांस ] सुखकारक, कंटकरहित [आणि] विश्रांती घेण्यास स्थल देणारी हो; आम्हांस विस्तीर्ण आश्रय दे.

15. O Earth, be thou blissful, thornless, [ and ] harbouring [unto us], give unto us an extensive abode.

---

१५. 'आम्हांस विस्तीर्ण आश्रय दे' म्हणजे आम्हांस पुष्कळ आश्रो मिळो; जेणंकरून आम्हांस सुख होई असें विस्तीर्ण स्थल तुझ्या पाठीवर आम्हांस मिळो. यांत केलेली प्रार्थना पृथ्वीला उद्देशून करण्याजोगी आहे यांत संशय नाहीं.

°अतो॑ दे॒वा अ॑वन्तु नो॒ यतो॒ विष्णु॑र्विच॒क्र॒मे ।
पृ॒थि॒व्याः स॒प्त धाम॑भिः ॥ १६ ॥

अतः॑ । दे॒वाः । अ॒व॒न्तु॒ । नः॒ । यतः॑ । विष्णुः॑ । वि॒ऽच॒क्र॒मे ।
पृ॒थि॒व्याः । स॒प्त । धाम॑ऽभिः ॥ १६ ॥

## भाषार्थीय.

१६. यस्मात् [ स्थलाद् ] विष्णुः विचक्रमे (=पदानि स्थापितवान्) तस्मात् [ स्थलात् ] देवाः पृथिव्याः सप्त धामभिः (?) अस्मानवन्तु ॥°

° या ऋचेपासून या सूक्ताच्या समाप्तीपर्यंत सहा ऋचांस विष्णुसूक्त म्हणतात व यांतील "अतो देवा०" व "इदं विष्णु०" या मंत्रांचा उपयोग याज्ञिक प्रायश्चित्तहोमांत व यज्ञोपवीताभिमंत्रणांत वगैरे अनेक ठिकाणीं करितात.

१६. जेथून विष्णूनें पावलें टाकिलीं तेथून [ येऊन ] देव पृथ्वीच्या सप्त धामांनीं आम्हांस रक्षोत.

16. May the gods protect us with the seven places of the earth, from thence whence Vishṇu put his steps.

---

१६. येथपासून ते सूक्ताच्या शेवट-पर्यंत मंत्र विष्णूविषयीं आहेत असें अनुक्रमणिकेवरून दिसून येईल.

हा सोळावा मंत्र पदशः अर्थ घेऊन पाहिलें तर सोपा आहे आणि भावार्थ-हि सोपा आहे. कारण कीं, देव आम्हांस रक्षोत हेंच तात्पर्य आहे. पण 'जेथून विष्णूनें पावलें टाकिलीं' ती जागा कोणती आणि 'पृथ्वीचीं सप्त धामें' म्हणजे काय ?

सायणाचार्याचें भाष्य आहे तें असें:— " विष्णु म्हणजे परमेश्वर सप्त धामांनीं " म्हणजे गायत्री वगैरे सात वृत्तांच्या " साधनांनीं ज्या पृथ्वीवरून म्हणजे. " पृथ्वीच्या ज्या प्रदेशीवरून पावलें " टाकिता झाला त्या भूप्रदेशाहून देव " आम्हांस रक्षोत.

" तैत्तिरीय ब्राह्मणांत असें सांगितलें " आहे कीं, 'विष्णूस पुढें घालून देव " वृत्तांच्या योगानें हे अजिंक्य लोक " जिंकिते झाले.' पृथिवीच्या प्रदेशा-" हून रक्षण म्हणजे भूलोकीं असले-" ल्या पापांपासून रक्षण असा अर्थ."

परंतु 'जेथून विष्णूनें पावलें टाकिलीं तेथून देव पृथ्वीच्या सप्त धामांनीं आम्हांस रक्षोत' हा पदशः अर्थ सयुक्तिक आणि स्पष्ट व अक्लिष्ट दिसतो.

विष्णु ही देवता वैदिक युगानंतरच्या काळीं जशी प्रख्यात आणि प्रमुख आहे तशी वेदांत नाहीं. वेदांत विष्णु हा इतर देवांप्रमाणें एक देव आहे. किंबहुना तो इतर कित्येक देवांपेक्षां कमीच मानिलेला आहे. अग्नि, इंद्र, मित्र, वरुण, अश्वी, उषा, सोम ( सोमरसाची देवता ) यांचें जितकें माहात्म्य वेदांत आहे तितकें सुद्धां विष्णूचें वैदिक युगांत नव्हतें असें दिसून येतें.

ऋग्वेदांत विष्णूविषयीं जें सांगितलें आहे त्यास आणि पुराणांत वगैरे त्याजविषयीं सांगितलेल्या कथांस पुष्कळ अंतर आहे. विष्णूस अजून बायकोची व मुलांची आणि संसार करण्याची जरूर लागली नव्हती. तो ब्राह्मणाकडून लाथा मारून घेऊन त्यांतच आपला मान आहे असें मानून घेण्यास शिकला नव्हता.

वेदांत त्याविषयीं सांगितलें आहे त्याचा सारांश येणेंप्रमाणें:—तो तीन पावलें टाकितो आणि तीन पावलांत सकल भुवनाचें आक्रमण करितो. तो ज्या ज्या ठिकाणीं आपलें पाऊल ठेवितो तेथें तेथें सुखें असतात. तो सकल प्राण्यांचें एकटा रक्षण करितो. त्याचें फार उंच पाऊल जेथें पडतें तेथें पुण्यवंत मनुष्य राहत असतात. विष्णु हा इंद्राचा सखा होय, आणि तो इंद्राबरोबर सोम पितो आणि इंद्रास वृत्र मारण्याला मदत करितो. केव्हां केव्हां त्याला इंद्रानें शक्ति दिली व कोठकोठें इंद्रास त्याणें शक्ति दिली असेंहि सांगितलें आहे. इंद्रासाठीं विष्णु सोम सिद्ध करितो असेंहि सांगितलें आहे. विष्णूचें

इदं विष्णुर्विचक्रमे त्रेधा नि दधे पदम् ।
समूळ्हमस्य पांसुरे ॥ १७ ॥
इदम् । विष्णुः । वि । चक्रमे । त्रेधा । नि । दधे । पदम् ।
समऽऊळ्हम् । अस्य । पांसुरे ॥ १७ ॥

## भाषार्थम्.

१७. इदं [ जगत् ] विष्णुः विचक्रमे । [ एतस्मिन् ] त्रीणि पदानि निदधे । अस्य [ विष्णोः ] पांसुरे [ पदे ] [ इदं जगत् ] समूळ्हम् ( =सम्यगूढम् ) ॥

आव्हान पूषा देवासह फार करून होतें; केव्हां केव्हां मरुत् आणि त्वष्टा यांजबरोबर होतें. त्वष्टा हा स्त्रियांच्या पोटीं गर्भ उत्पन्न करितो आणि विष्णु गर्भाशय उत्पन्न करितो ( विष्णुर्योनिं कल्पयतु त्वष्टा रूपाणि पिंशतु ऋ. १०. १८४. १ ). विष्णूचें आव्हान सविता, वात, सूर्य, अश्वी वगैरे देवांबरोबरहि होत असतें.

यावरून असें दिसून येईल कीं, विष्णु म्हणजे सूर्यरूपीच देवता. सूर्य उगवतो तेव्हां त्याचें पहिलें पाऊल (पद) पडतें असें समजावयाचें; तो मध्यान्हीं आकाशमध्यांत येतो तेव्हां तें दुसरें पाऊल, आणि तो मावळला म्हणजे तें तिसरें पाऊल. आणि हीं तिन्ही पावलें झालीं म्हणजे सूर्यरूपी विष्णु सकल भुवनाचें आक्रमण संपवितो म्हणजे तीन पावलांनीं सकल भुवन चालून जातो हें खरेंच आहे. त्याप्रमाणेंच सूर्य जेथें जेथें असतो तेथें तेथें त्याच्या प्रकाशाच्या योगें करून कांति आणि सुख वाढतें यास्तव सूर्यरूपी जो विष्णु तो जेथें जेथें पाऊल टाकितो तेथें तेथें सुखें असतात हें खरेंच. ( दोन चार दिवस सूर्य मुळींच उगवला नाहीं अशी कल्पना करा म्हणजे आपलीं किती सुखें अंतरतील तीं पाहा ). त्याप्रमाणेंच सूर्याचें अति उच्चस्थान जें मध्यान्हीचें स्थान तेंच तद्रूप विष्णूचें अति उंच पाऊल. तें अति उच्च प्रदेशीं असल्यामुळें पुण्यवंत प्राणी व देव तेथें राहत असतील असें समजणें हें साहजिक आहे. विष्णु सकल प्राण्यांचें संरक्षण करितो हें खरेंच. कारण सूर्य जर या जगांतून नाहींसा होईल तर सर्व प्राणी मरून जातील. आणि तो इंद्राचा स्नेही हेंहि खरेंच. कारण कीं, सूर्य नसेल तर सोम कसा उत्पन्न होईल, आणि पाऊस कसा पडेल?

आणि यावरून विष्णु जेथून पावलें टाकितो तेथून येऊन देव आम्हांस रक्षोत, म्हणजे तात्पर्य असें कीं, तेथून देव येतील तर ते सुखें घेऊन येतील.

वर सांगितलेल्या साराशावरून विष्णूच्या वामनावताराची अथवा त्रिविक्रमावताराची कथा कशी रचिली गेली हें वाचकाच्या लक्ष्यांत सहज येऊन चुकेल. त्रि=तीन, विक्रम=पाऊल=तीन पावलांचा देव. अर्थात् सूर्यरूपी देवता.

१७. या [भुवना]वरून विष्णु चालत असतो, [आणि] तीनदा पाऊल टाकितो. [सकल भुवन] त्याच्या धूलिमय [पावला]च्या आंत झांकून जातें.

17. This [universe] Vishnu traverses; he puts his triple step. [This universe] becomes collected within his dusty [triple step].

१७. वरील टिपेंतील सारांशांत जें सांगितलें आहे तेंच येथें आलें आहे. भावार्थ असा आहे कीं, 'सूर्यरूपी विष्णु तीन पावलें चालून सर्व भुवन व्यापून टाकितो. आणि तो इतक्या झपाट्यानें चालतो कीं, त्याच्या पावलांची जी धूळ उडते तींत सकल भुवन झांकून जातें.'

'तीनदा पाऊल टाकितो'--'त्रेधा निदधे पदम्.' हे जे शब्द आहेत त्यांत वामनावताराचें आणि त्रिविक्रमावताराचें बीज आहे हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे.

'आंत झांकून जातें,' 'समूढम्.' म्हणजे पाऊल या भुवनाच्या बाहेर जातें आणि भुवन पावलापेक्षा लहान दिसतें असें तात्पर्य.

'विचक्रमे' आणि 'पदं निदधे' या क्रियापदांचा अनुक्रमें करून 'चालत असतो' आणि 'पाऊल टाकितो' असा रीतिवर्तमानकाळीं अर्थ केला आहे. वैदिक संस्कृतांत पूर्णभूत अथवा पूर्णवर्तमान काळीं असलेल्या क्रियापदांचा रीतिवर्तमानकाळीं असल्याप्रमाणें अर्थ करावा लागतो याविषयीं पूर्वीं लिहिलेंच आहे. उदाहरणार्थ सूक्त ६, मंत्र ४ याजवर दिलेली (पृष्ठ ३८) 'पुनः निपजतात' यावरची टीप पाहा.

**त्रीणि प॒दा वि च॑क्रमे॒ विष्णु॑र्गो॒पा अदा॑भ्यः ।**
**अतो॒ धर्मा॑णि धा॒रय॑न् ॥ १८ ॥**

त्रीणि॑ । प॒दा । वि । च॒क्र॒मे॒ । विष्णुः॑ । गो॒पाः । अदा॑भ्यः ।
अतः॑ । धर्मा॑णि । धा॒रय॑न् ॥ १८ ॥

**विष्णोः॒ कर्मा॑णि पश्यत॒ यतो॑ व्र॒तानि॑ पस्प॒शे ।**
**इन्द्र॑स्य॒ युज्यः॒ सखा॑ ॥ १९ ॥**

विष्णोः॑ । कर्मा॑णि । प॒श्य॒त॒ । यतः॑ । व्र॒तानि॑ । प॒स्प॒शे ।
इन्द्र॑स्य । युज्यः॑ । सखा॑ ॥ १९ ॥

## भाषायाम्.

१८. अदम्भनीयः पालको विष्णुस्त्रीणि पदानि विचक्रमे । [ पदविक्रमणं कुर्वंश्च ] अतः (=त्रयाणां पदानां स्थले ) धर्मान्धारयति ॥

१९. विष्णुः यतः [ स्थानाद् ] [ युष्माकं ] व्रतानि (=कर्माणि ) पश्यति [ तत्र ] तस्य कर्माणि [ यूयं ] पश्यत । [ स हि ] इन्द्रस्य युज्यः (=प्रियतमः) सखा [ भवति ] ॥

१८. [सर्वांचा] अप्रतारणीय रक्षिता विष्णु तीन पावलें चालतो, आणि [जेथं जेथं त्याचीं पावलें पडतात] तेथं तेथं तो धर्माचें संरक्षण करीत असतो.

१९. [हे मित्रांनो], ज्या ठिकाणाहून विष्णु [तुमचीं] कामें पाहतो तेथें त्याचे पराक्रम [तुम्ही] पाहा. तो इंद्राचा जीवलग मित्र [होय].

18. Vishnu the undeceivable protector, traverses three steps, preserving the sacred laws wherever he goes.

19. See the deeds of Vishnu [therefrom] whence he observes [your] works. He [is] the intimate friend of Indra.

१८. सूर्यरूपी 'देव विष्णु सर्वांचें रक्षण करितो' म्हणून १६ व्या ऋचेच्या टिपेंत सांगितलेंच आहे. ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर अशी त्रिमूर्ति मागाहून पुराणादिकांत प्रसिद्ध झाली त्यांतून विष्णूचें काम रक्षण करणें हें होय अशी जी रचना आहे तिचें बीज या मंत्रांत 'गोपाः' या शब्दांत आहे. ऋग्वेदांत इतर ठिकाणींहि विष्णूच्या रक्षकपणाविषयीं सांगितलें आहे.

'अप्रतारणीय रक्षिता' म्हणजे जो विष्णु अशा प्रकारचा रक्षण करणारा आहे कीं, त्याला कोणीं ठकवूं शकत नाहीं. बिनचूक राखणारा, ज्याणें केलेलें रक्षण निर्धोक होय.

'जेथें जेथें त्याचीं पावलें पडतात तेथें तेथें'='अतः.' अक्षरशः अर्थ 'तेथें,' म्हणजे 'त्रीणि पदा विचक्रमे' याच्या अधिकरणस्थलीं.

'धर्माचें संरक्षण करीत असतो.' म्हणजे सूर्य उगवतो म्हणून सर्व कांहीं व्यापार चालतात. तो नसेल तर व्यापार म्हणजे कांहींच कर्में, क्रिया, कामें वगैरे चाळणार नाहींत व मग धर्म चालणार नाहींत. 'धर्माचें संरक्षण करीत असतो' असें जें येथें (व अन्य स्थलींहि वेदांत) सांगितलें आहे तें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे. कारण जेव्हां धर्माचा ऱ्हास राक्षसादिकांच्या दुष्टपणामुळें होतो तेव्हां तेव्हां विष्णु अवतारानें वगैरे धर्माचें पुनरुज्जीवन करून धर्मसंस्थापना करितो अशा ज्या प्रसिद्ध कथा पुराणांतरीं वगैरे आढळतात त्याचें मूळ यांत आहे.

१९. या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, विष्णु (म्हणजे सूर्य हाच कोणी एक देव) मनुष्यांनीं केलेलीं कृत्यें—यज्ञादि, पापपुण्यादि,—आकाशांतून चालत असतां पाहतो. आणि तो जेथून पाहतो तेथें म्हणजे आकाशांत सूर्य काय काय पराक्रम करीत असतो तें म्हणजे तीन पावलांनीं सकल भुवनांचें आक्रमण करणें, सकलांचें रक्षण करणें इत्यादि पराक्रम तुम्ही पाहा.

'तो इंद्राचा जीवलग मित्र [होय]'. 'इंद्रस्य युज्यः सखा.' म्हणजे तो इंद्राबरोबर सोमरस प्यावयास उपासकांकडे-

**तद्विष्णोः परमं पदं सदा पश्यन्ति सूरयः ।**
**दिवीव चक्षुराततम् ॥ २० ॥**

तत् । विष्णोः । परमम् । पदम् । सदा । पश्यन्ति । सूरयः ।
दिविऽइव । चक्षुः । आऽततम् ॥ २० ॥

**तद्विप्रासो विपन्यवो जागृवांसः समिन्धते ।**
**विष्णोर्यत्परमं पदम् ॥ २१ ॥ ७ ॥**

तत् । विप्रासः । विपन्यवः । जागृऽवांसः । सम् । इन्धते ।
विष्णोः । यत् । परमम् । पदम् ॥ २१ ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

२०. तद् विष्णोः परमम् (=उच्चैस्तमम्) पदं (=पादप्रक्षेपं) दिवि आततं (=विस्तृतं) चक्षुरिव सूरयः सदा पश्यन्ति ॥

२१. विष्णोः परमम् (=उच्चैस्तमं) पदम् [ इति ] यद् [ वदन्ति ] तद् विपन्यवः (=स्तुतिकृतः) जागरूका विप्राः (=मेधाविनः) समिन्धते (=अतिशयेण समिद्धं कुर्वन्ति) ॥

स जातो आणि वृत्राला मारण्याच्या कामीं इंद्रास फार मदत करितो. वर १६ व्या मंत्रावरील टिपेंतील विष्णुवृत्तान्ताचा सारांश पाहा. 'इंद्राचा जीवलग मित्र' हे शब्द मोठ्या महत्त्वाचे आहेत. कारण कीं, पुराणांतरीं इतिहासांत व काव्यांत वगैरे कोणी असुरानें पृथ्वीचा, देवांचा वगैरे छळ मांडला म्हणजे इंद्र विष्णूकडेस सल्ला विचारण्यास जात असतो त्या कथेचें हें बीज आहे.

२०. विष्णूचें [जें] अति उंच पाऊल तें, आकाशांत लावून ठेविलेल्या मोठ्या डोळ्याप्रमाणें, विद्वज्जनांच्या नित्य दृष्टीस पडत असतें.

२१. विष्णूचें अति उंच पाऊल ज्याला म्हणतात तें [देवगुण]गायक [आणि] जागरूक विद्वज्जन प्रदीप्त करीत असतात.

20. That highest step of Vishnu the learned always see like a broad eye fixed in heaven.

21. That which is the highest step of Vishnu the pious [and] watchful singers kindle.

२०. मंत्राचें तात्पर्य असें आहे कीं, 'विष्णूचें अति उंच पाऊल कशाला म्हणावें? तर त्याला उत्तर हें कीं, नित्य सूर्य मध्याह्नीं आकाशाच्या शिखरावर चढतो त्यालाच बुधजन विष्णूचें 'परमं पदम्' (अत्युच्च पाऊल) असें म्हणतात. तो जो मध्याह्नींचा आकाशशिखरावर असलेला सूर्य तो, जणुं काय इंद्राचा अथवा वरुणाचा डोळा आकाशांत पसरून ठेविल्याप्रमाणें दिसतो.' ऋ. १.११५.१, १.१३६.२ पाहा. 'लावून ठेविलेल्या मोठ्या' हा अर्थ 'आततम्' यापासून गम्यमान आहे.

२१. मंत्राचें तात्पर्य असें दिसतें कीं, विष्णूचें अति उंच पाऊल म्हणजे मध्याह्नींचा आकाशशिखरावर चढलेला जो सूर्य त्याला देवभजन व देवयजन करणारे गायक लोक प्रदीप्त करितात. म्हणजे अग्नीला प्रदीप्त करितात. मध्याह्नींचा जो प्रखरतेजस्क सूर्य तद्रूपी अग्नीस पेटवितात. म्हणजे यज्ञ करणारे लोक यज्ञासाठीं अग्नि म्हणून जो पेटवितात तो मध्याह्नींचा प्रखरतेजस्क सूर्यच अथवा तद्रूपी विष्णूचें अति उंच पाऊलच होय' असें समजावयाचें असा भावार्थ आहे.

''जागरूक' = 'जागृवांसः.' म्हणजे योग्यकाळीं देवयजन करण्याविषयीं तत्पर.

## सूक्तम् २३.

कण्वपुत्रो मेधातिथिर्ऋषिः। देवता—१ वायुः। २-३ इन्द्रवायू। ४-६ मित्रावरुणौ। ७-९ इन्द्रो मरुत्वान्। १०-१२ विश्वे देवाः। १३-१५ पूषा। १६-२३ आपः। २३-२४ अग्निः। छन्दः—१-१८ गायत्री। १९ पुरउष्णिक्। २० अनुष्टुप्। २१ प्रतिष्ठा। २२-२४ अनुष्टुप्॥

**तीव्राः सोमास आ गह्याशीर्वन्तः सुता इमे।**
**वायो तान्प्रस्थितान्पिब॥ १॥**

तीव्राः। सोमासः। आ। गहि। आशीःऽवन्तः। सुताः। इमे।
वायो इति। तान्। प्रऽस्थितान्। पिब॥ १॥

**उभा देवा दिविस्पृशेन्द्रवायू हवामहे।**
**अस्य सोमस्य पीतये॥ २॥**

उभा। देवा। दिविऽस्पृशा। इन्द्रवायू इति। हवामहे।
अस्य। सोमस्य। पीतये॥ २॥

---

### भाषायाम्.

१. [अमी] सोमास्तीक्ष्णाः [सन्ति]। [तस्माद्] [हे वायो] [त्वम्] आगच्छ। इमे सुताः (=अभिषुताः सोमाः) आशीर्वन्तः (=पक्वदुग्धमिश्रिताः) [सन्ति]। हे वायो तान् [एतान्प्रभृतान्] पिब॥

२. उभौ दिविस्पृशौ (=द्युलोकस्पृशौ) देवाविन्द्रवायू अस्य सोमस्य पानाय [वयं] हवामहे (=आह्वयामः)॥

## सूक्त २३.

**ऋषि,** पूर्ववत्. **वृत्त,** गायत्री; पण १९ चें पुरउष्णिक्, २० चें अनुष्टुप्, २१ चें प्रतिष्ठा आणि २२-२४ चें अनुष्टुप्. **देवता**–१ वायु, २-३ इंद्रवायु, ४-६ मित्रावरुण, ७-९ मरुद्युक्त इंद्र, १०-१२ विश्वे देव, १३-१५ पूषा, १६-२३ आपो देवी, २३-२४ अग्नि.

१. [ हे ] सोमरस तीक्ष्ण [ आहेत ], [ तर हे वायू ] तूं येथें ये; हे सोमरस दुग्धमिश्रित [ आहेत ]. [ तर ] हे वायू, हे अर्पण केलेले [ सोमरस तूं ] पी.

२. आकाशस्पर्शी [ जे ] दोघे देव इंद्रवायू त्यांस हा सोम पिण्याकरितां [ आम्ही ] बोलावितों.

## HYMN 23.

To *Vâyu* (1), *Indra* and *Vâyu* (2-3), *Mitrâvarunau* (4-6), *Indra accompanied by the Maruts* (7-9), the *Vis've-Devas* (10-12), *Pûshâ* (13-15), *Âpas i. e.* the *Waters* (16-23), and *Agni* (23-24). Metre—*Gâyatrî*, but the *Pura-ushnik* in 19, *Anushtup* in 20, *Pratishthâ* in 21 and *Anushtup* again in 22-24. Author as before.

1. [These] Somas [are] sharp, come hither, [Vâyu], these extracted juices [are] mixed with boiled milk. Drink them Vâyu, [as they are] offered [to thee.]

2. We invoke the two gods Indra and Vâyu that reach the sky, in order that they may drink this Soma.

---

१. हा मंत्र महत्त्वाचा आहे. कारण कीं, यावरून सोम कसा असला म्हणजे आणि त्यांत काय काय घातलें म्हणजे तो देवांस प्रिय होईल असें आमचे पूर्वज आर्यजन समजत तें दिसून येतें. प्रथमतः ऋषि म्हणतो कीं, हे सोमरस तीक्ष्ण आहेत, म्हणजे आंबट अथवा तुरट आहेत, केवळ गुळचट नाहींत. पण नुसते तीक्ष्णच नाहींत, तर त्यांत ऊन दूध मिसळलें आहे. यावरून दूध ऊन करून सोमरसांत घालीत असें दिसतें.

ह्या दोन गुणांनीं युक्त असे हे सोमरस आहेत, यास्तव हे वायू, तूं ये आणि हे तूं पी, असें तात्पर्य.

२. 'आकाशस्पर्शी,'= 'दिविस्पृशा.' म्हणजे जे इतके मोठे आहेत अथवा ज्यांचें गमन इतकें आहे कीं, ते आकाशापर्यंत जाऊन पोंहचतात. सूक्त २२ ऋचा २ आणि त्याजवरील टीप पाहा.– 'हा सोम' म्हणजे हा जो आम्हीं अर्पण केला आहे तो.–'आम्ही बोलावितों.' मंत्रकर्ता ऋषि एकटाच आहे तरी अनेकवचनीं प्रयोग असण्याचें कारण सूक्त १४ मंत्र २ यावरील टिपेंत १००व्या पृष्ठावर पाहा.

इन्द्रवायू मनोजुवा विप्रा हवन्त ऊतये ।
सहस्राक्षा धियस्पती ॥ ३ ॥

इन्द्रवायू इति । मनःऽजुवा । विप्राः । हवन्ते । ऊतये ।
सहस्रऽअक्षा । धियः । पती इति ॥ ३ ॥

मित्रं वयं हवामहे वरुणं सोमपीतये ।
जज्ञाना पूतदक्षसा ॥ ४ ॥

मित्रम् । वयम् । हवामहे । वरुणम् । सोमऽपीतये ।
जज्ञाना । पूतऽदक्षसा ॥ ४ ॥

ऋतेन यावृतावृधावृतस्य ज्योतिषस्पती ।
ता मित्रावरुणा हुवे ॥ ५ ॥ ८ ॥

ऋतेन । यौ । ऋतऽवृधौ । ऋतस्य । ज्योतिषः । पती इति ।
ता । मित्रावरुणा हुवे ॥ ५ ॥ ८ ॥

वरुणः प्राविता भुवन्मित्रो विश्वाभिरूतिभिः ।
करतां नः सुराधसः ॥ ६ ॥

वरुणः । प्रऽअविता । भुवत् । मित्रः । विश्वाभिः । ऊतिऽभिः ।
करताम् । नः । सुऽराधसः ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

३. मनोजवौ सहस्राक्षौ धियस्पती (=देवयजनबुद्धेः पती) इन्द्रवायू ऊतये विप्रा (=मेधाविनः) आह्वयन्ति ॥

४. वयं मित्रं वरुणं [चेत्येतौ] जातमात्रौ पूतदक्षौ (=पवित्रमनस्कौ) सोमपानाय आह्वयामः ॥

५. यौ ऋतेन (=सत्यधर्माचरणेन) ऋतावृधौ (=ऋतेन सत्येन वर्धमानौ=लब्धहर्षौ) ऋतस्य ज्योतिषः (=सत्यस्य प्रकाशस्य) पती [स्तः] तौ मित्रावरुणौ [अहम्] आह्वयामि ॥

६. वरुणो मित्रश् [च] विश्वाभिरूतिभिः (=रक्षणैः) प्राविता (=रक्षिता) भवतु । [तावुभौ] अस्मान् सुराधसः (=प्रभूतधनवतः) कुरुताम् ॥

३. [जे] मनाप्रमाणें चपल, [आणि] ज्यांस हजार डोळे आहेत [आणि] भजनबुद्धीचे प्रभु [असे जे] इंद्रवायू त्यांस विद्वज्जन [आपल्या] संरक्षणासाठीं बोलावितात.

४. जन्मतः पवित्र मनाचे जे मित्र [आणि] वरुण त्यांस आम्ही सोम प्यावयास बोलावितों.

५. सत्याचरणानें प्रसन्न होणारे [आणि] सत्य प्रकाशाचे स्वामी जे ते मित्रावरुण त्यांस [मी] बोलावितों.

६. वरुण [आणि] मित्र सकल संरक्षणांसहित [येऊन] [आमचे] संरक्षित होओत., ते आम्हांस चांगले संपत्तिमान करोत.

3. The pious singers invoke for protection Indra and Vâyu who are as quick as the mind, who have a thousand eyes [and] who are the lords of prayer.

4. We invoke Mitra [and] Varuṇa born pure of mind, that they may drink [our] Soma.

5. I invoke that Mitra [and] that Varuṇa who are pleased with the practice of truth, [and] who are the lords of the true light.

6. May Varuṇa [and] Mitra become [our] protectors with all [their] protections; may they make us possessors of great riches.

---

३. या मंत्रांत इंद्रवायूंस लाविलेलीं विशेषणें लक्ष्यांत ठेवण्याजोगीं आहेत. 'ते मनाप्रमाणें चपळ' आहेत म्हणजे त्यांस उपासकाजवळ येण्यास वेळ लागत नाहीं, मनाप्रमाणें धावून येतात. तसेच त्यांस सहस्र नेत्र आहेत, म्हणजे ते सर्वत्र पाहूं शकतात. आणि ते भजनबुद्धीचे प्रभु होत; म्हणजे देवभजनाची जी बुद्धि मनुष्यांमध्यें उत्पन्न होते तिचे प्रेरक तेच होत, आणि सर्व भक्ति त्यांसच अर्पण करण्यास योग्य होय.

४. 'जन्मतः पवित्र मनाचे,'='जज्ञाना पूतदक्षसा.' म्हणजे जे जन्मले तेच पवित्रमनस्क असे जन्मले, इतरांप्रमाणें जन्मानंतर विद्याभ्यासानें अथवा सत्संगानें वगैरे ज्यांचें मन पवित्र झालेलें आहे असे नव्हेत. यांत 'जज्ञाना पूतदक्षसा' हे शब्द महत्त्वाचे आहेत. मर्त्यजनाविषयीं जसें जन्ममरणादि बोलतात तसेंच इंद्रवायूंविषयीं ऋषि येथें बोलत आहे.

५. 'सत्याचरणानें प्रसन्न होणारे' ='ऋतेन ऋतावृधौ' यांत 'ऋतेन' हें पद पुनरुक्त (अवश्य नाहीं असें) आहे. तथापि असे प्रयोग साधारण भाषेमध्यें जसे पुष्कळ आढळतात तसेच वेदांताहि पुष्कळ येतात. उदाहरण 'वसूनां वसुपतिः', इ०. सत्याचरणानें प्रसन्न

**मरुत्वन्तं हवामह इन्द्रमा सोमपीतये ।**
**सजूर्गणेन तृम्पतु ॥ ७ ॥**

मरुत्वन्तम् । हवामहे । इन्द्रम् । आ । सोमऽपीतये ।
सऽजूः । गणेन । तृम्पतु ॥ ७ ॥

**इन्द्रज्येष्ठा मरुद्गणा देवासः पूषरातयः ।**
**विश्वे मम श्रुता हवम् ॥ ८ ॥**

इन्द्रऽज्येष्ठाः । मरुत्ऽगणाः । देवासः । पूषऽरातयः ।
विश्वे । मम । श्रुत । हवम् ॥ ८ ॥

**हत वृत्रं सुदानव इन्द्रेण सहसा युजा ।**
**मा नो दुःशंस ईशत ॥ ९ ॥**

हत । वृत्रम् । सुऽदानवः । इन्द्रेण । सहसा । युजा ।
मा । नः । दुःऽशंसः । ईशत ॥ ९ ॥

---

**भाषायाम्.**

७. मरुत्वन्तमिन्द्रं सोमपानाय आह्वयामः । [स] [मरुतां] गणेन सजूः (=युक्तः सन्) तृप्यतु ॥

८. हे इन्द्रज्येष्ठाः पूषरातयः (=पूषोदाराः) विश्वे मरुद्गणा देवाः, मम हवम् (=आह्वानं) शृणुत ॥

९. हे सुदानवः (=शोभनदानयुक्ताः) [मरुतः] इन्द्रेण युजा (=मित्रेण) [सह] वृत्रं (=शत्रुं) सहसा (=बलेन) हत (=नाशयत) । दुःशंसः (=दुःशब्दयुक्तः) अस्मान् मा ईशत (= प्रभवतु) ॥

---

होणारे म्हणजे आर्यधर्मरूपी जें सत्य त्याच्या आचरणानें संतुष्ट होणारे.

'सत्यप्रकाशाचे स्वामी'='ऋतस्य ज्योतिषः पती.' यांत ऋतं ज्योतिः म्हणजे काय ?

६. 'सकल संरक्षणांसहित,'='विश्वाभिरूतिभिः' म्हणजे संरक्षण करण्याचे जे जे त्याचे अनेक प्रकार आहेत त्यांसहित. उदाहरणार्थ, अन्न देऊन, सुस्थळ देऊन, संकटांतून पार पाडून इत्यादि.

९. 'ते आम्हांस चांगले संपत्तिमान करोत.' देवांपाशीं मागावयाचा मुख्य प्रसाद आर्यजनांचा हाच असे हें पूर्वी आम्हीं सांगितलेंच आहे.

७. मरुद्युक्त इंद्रास सोम पिण्यासाठीं [ आम्ही ] इकडे बोलावितों. तो [ मरुतांच्या ] गणासहित तृप्ती पावो.

८. ज्यांजमध्यें इंद्र श्रेष्ठ आहे [ आणि ] ज्यांत पूषा [ उत्कृष्ट ] दाता आहे असे अहो देव मरुद्गण हो, [ तुम्ही ] सर्वजण माझी [ ही ] हाक ऐका.

९. हे महा उदार देवांनो, तुमचा मित्र जो इंद्र त्याच्या साहाय्यानें पराक्रम करून [ आमच्या ] शत्रूला मारा. दुष्टाचा अधिकार आम्हांवर न चाले असें करा.

7. We invoke hither Indra with his Maruts to drink the Soma. May he be gratified together with that host [of his friends].

8. Ye divine hosts of Maruts, with Indra at your head [and] among whom Pûshâ is [most] liberal, hear all ye this my call.

9. O liberal gods, do ye, aided by your friend Indra, slay our enemy with your might. May not the wicked govern us.

---

७. 'मरुद्युक्त इंद्रास'='मरुत्वन्तम् इन्द्रम्.' म्हणजे ज्यांजवरीवर मरुद्गण असतो त्या इंद्राला.—'[ मरुतांच्या ] गणासहित,' 'सजूः गणेन.' 'सजूः' हें विशेषण होय.—'तृप्ती पावो' म्हणजे येऊन सोम पिओ आणि सोम पिऊन तृप्ती पावो.

८. 'ज्यांजमध्यें इंद्र श्रेष्ठ आहे'='इन्द्रज्येष्ठाः.' म्हणजे ज्यांचा श्रेष्ठ इंद्र आहे, इंद्र ज्यांचा नायक अथवा प्रभु होय असे.—'ज्यांत पूषा [उत्कृष्ट] दाता आहे असे'='पूषरातयः' म्हणजे ज्यांपैकीं पूषा हा दाता आहे. 'पूषा' कोण आहे याविषयीं सूक्त १४ मंत्र ३ याजवरील टीप १०२ व्या पृष्ठावर पाहा. पूषदेव म्हणजे सूर्य देवाचीच एक विभूति होय असें समजावयाचें.

या मंत्रांत इतकें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे कीं, मरुद्गण हें अनेकवचनी आहे आणि पूर्वीच्या मंत्रांत एकवचनी आहे. त्यांत इंद्र आणि पूषा हे देव आणि तसेच इतर देव आहेत या कारणास्तव अनेकवचन असावें असें वाटतें.

'[तुम्ही] सर्वजण माझी [ही] हाक ऐका'='विश्वे मम श्रुता हवम्.' यांत मंत्रवक्त्याची भक्ति आणि देवाविषयीं श्रद्धा केवढी आहे ती पाहा.

९. 'महा उदार देवांनो'='सुदानवः.' शब्दशः अर्थ 'ज्यांचें दान चांगलें आहे ते', म्हणजे मोठे दानशाली. हें संबोधन मरुद्गणांस आहे असें सायणाचार्य म्हणतात. आणि अनुक्रमणिकेवरून पाहतां तसेंच आहे असें दिसतें.

या मंत्रांतील प्रार्थना ध्यानांत ठेव-

**विश्वान्देवान्हवामहे मरुतः सोमपीतये ।**
**उग्रा हि पृश्निमातरः ॥ १० ॥ ९ ॥**

विश्वान् । देवान् । हवामहे । मरुतः । सोमऽपीतये ।
उग्राः । हि । पृश्निऽमातरः ॥ १० ॥ ९ ॥

**जयतामिव तन्यतुर्मरुतामेति धृष्णुया ।**
**यच्छुभं याथना नरः ॥ ११ ॥**

जयताम्ऽइव । तन्यतुः । मरुताम् । एति । धृष्णुऽया ।
यत् । शुभम् । याथन । नरः ॥ ११ ॥

**हस्कारादिद्युतस्पर्यतो जाता अवन्तु नः ।**
**मरुतो मृळयन्तु नः ॥ १२ ॥**

हस्कारात् । विऽद्युतः । परि । अतः । जाताः । अवन्तु । नः ।
मरुतः । मृळयन्तु । नः ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

१०. [ वयं ] विश्वान् मरुतो देवान् सोमपानाय आह्वयामः ; [ ते ] पृश्निमातर उग्रा (=ओजस्विनो ) हि ॥

११. हे नरः (=शूरा ) मरुतो, यदा [ यूयं ] शुभं (=यज्ञं ) याथ [ तदा ] युष्माकं तन्यतुः (=शब्दो ] जयतां [ तन्यतुः ] इव धृष्णुया (=बलवत्तया ) एति ॥

१२. हस्कारात् (=हसनकृतो ) विद्युतो (=विशेषेण दीप्यमानाद् ) अतः [ अन्तरिक्षलोकात् ] जाता [ मरुतः ] अस्मानवन्तु । मरुतः अस्मभ्यं मृळयन्तु (=अस्मान्सुखयन्तु ) ॥

---

ण्याजोगी आहे. साधारण शत्रूस मारणें आणि दुष्ट लोकांचा अधिकार आपणावर न चालूं देणें ह्या कामीं देवाचें साहाय्य असेल तर तसें घडून येईल अशी भावना आमच्या आर्य पूर्वजांची या मंत्रावरून उघड दिसून येते.

१०. सकल मरुद्देवांस [आम्ही] सोम पिण्यासाठीं बोलावितों. कारण कीं, [ते] पृश्नीचे पुत्र शक्तिमंत [आहेत].

10. We invoke all the Marut gods to drink our Soma. For they, the sons of Pris'nî, are mighty.

११. हे शूर मरुतांनो, तुम्ही जेव्हां यज्ञाला जातां तेव्हां तुमची गर्जना जय मिळालेल्या वीरांच्या [गर्जने]सारिखी आवेशानें निघत असते.

11. When, brave Maruts, you go to the sacrifice, your shout proceeds loudly as [that] of conquerors.

१२. हें जें हास्यमुख [आणि] देदीप्यमान [अंतरिक्ष], त्यापासून उत्पन्न झालेले [मरुत्] आम्हांस रक्षोत, मरुत् आम्हांवर कृपा करोत.

12. May the [Maruts] born from that laughing [and] resplendent [region] protect us, may the Maruts favour us.

१०. 'पृश्नीचे पुत्र'='पृश्निमातरः,' म्हणजे मरुत् देव. 'पृश्नि' हें मरुतांच्या आईचें नांव. या शब्दाचा मूळ अर्थ 'चित्रविचित्र रंगाची' असा आहे. त्यावरून चित्रविचित्र रंगाची गाय, चित्रविचित्र रंगाची अशी मेघरूपी गाय. मरुतांची आई म्हणजे बहुत करून चित्रविचित्र रंगाचा ढग असाच अर्थ समजावयाचा आहे.

११. आम्हीं या मंत्राचें भाषांतर सायणाचार्यांच्या भाष्यास अनुसरून केलें आहे. त्याचा भावार्थ असा आहे कीं, जेव्हां मरुत् उपासकाच्या यज्ञास यावयास निघतात तेव्हां त्यांची गर्जना जशी काय युद्धांत जय मिळालेल्या योद्ध्याप्रमाणेंच गंभीर ऐकूं येते.

परंतु 'यज्ञास' हा अर्थ ज्याचा केला आहे तो शब्द 'शुभम्' हा आहे. आणि त्याचा तसा अर्थ होईल अशी खात्री सांगवत नाहीं. 'शुभम्' अथवा 'शुभे' हें रूप पुष्कळ ठिकाणीं आलेलें आहे आणि त्याचा प्रयोग तुमर्थ अव्ययासारिखा होतो असें दिसतें. आणि त्याचा अर्थ, 'शोभविण्यास', 'अलंकृत करण्यास' 'अलंकार घालण्यास' असा व्हावा असें दिसतें. परंतु प्रस्तुत स्थळीं तसा अर्थ नीट बसत नाहीं म्हणून आम्ही सायणाचार्यांस अनुसरलों आहों.

'आवेशानें'='धृष्णुया.' 'धृष्णुया' हें क्रियाविशेषणाच्या अर्थाचें तृतीयान्त अव्यय आहे.

१२. 'हास्यमुख......पासून'='हस्कारात्.' हें विशेषण आहे. आणि 'त्या अंतरिक्षापासून' हा अर्थ 'अतः' या अव्ययांतून आम्हीं भाष्यास अनुसरून घेतला आहे. तसा गम्यमान दिसतो असें आम्हांस वाटतें.

'उत्पन्न झालेले'='जाताः'. अक्षरशः

**आ पूषञ्चित्रबर्हिषमाघृणे धरुणं दिवः ।**
**आजा नष्टं यथा पशुम् ॥ १३ ॥**

आ । पूषन् । चित्रऽबर्हिषम् । आघृणे । धरुणम् । दिवः ।
आ । अज । नष्टम् । यथा । पशुम् ॥ १३ ॥

**पूषा राजानमाघृणिरपगूळ्हं गुहा हितम् ।**
**अविन्दच्चित्रबर्हिषम् ॥ १४ ॥**

पूषा । राजानम् । आघृणिः । अपऽगूळ्हम् । गुहा । हितम् ।
अविन्दत् । चित्रऽबर्हिषम् ॥ १४ ॥

**उतो स मह्यमिन्दुभिः षड्युक्ताँ अनुसेषिधत् ।**
**गोभिर्यवं न चर्कृषत् ॥ १५ ॥ १० ॥**

उतो इति । सः । मह्यम् । इन्दुऽभिः । षट् । युक्तान् । अनुऽसेसिधत् ।
गोभिः । यवम् । न । चर्कृषत् ॥ १५ ॥ १० ॥

---

**भाषायाम्.**

१३. हे आघृणे (=देदीप्यमान ) पूषन् दिवो धरुणं (=धारकं ) चित्रबर्हिषं नष्टं पशुं यथा इह आज (=आनय ) ॥

१४. आघृणिः पूषा गुहायां [ नि]हितमपगूढं (=निह्नुतं ) राजानं चित्रबर्हिषमविन्दत् ॥

१५. अपि च स मह्यम् इन्दुभिः (=सोमैः ) युक्तान्षड् [ ऋतून् ] गोभिः (=बलीवर्दैः ) यवं (=यवक्षेत्रं ) यथा पुनः पुनः कृषति [ तथा ] अनुसेषिधत् (=पुनः पुनः आनयन् ) [ वर्तते ] ॥

---

अर्थ जन्मलेला असा आहे. हें विशेषण महत्त्वाचें आहे. कारण त्यावरून असें दिसून येतें कीं, मरुत् हे देव आहेत तथापि ते अनादि नव्हेत, जन्मलेले आहेत.

१३. हे जाज्वल्य पूषा, आकाशातें धारण करणारा जो विचित्रपक्ष [सोम] त्याला चुकार जनावराप्रमाणें इकडे हाकून आण.

१४. जाज्वल्य पूषा गुहेमध्यें लपवून ठेविलेल्या विचित्रपक्ष राजा [सोमा]ला शोधून काढिता झाला.

१५. आणि तो मजसाठीं [सोम]बिंदूंनीं युक्त असा सहा [ऋतूंस], बैलांनीं शेत नांगरल्याप्रमाणें, नित्यशः आणीत असतो.

13. Resplendent Púshan, drive hither [Soma] of variegated feathers, the supporter of the sky, as [one drives] back a stray animal.

14. The resplendent Púshâ found out the variegated-feathered king [Soma] [though] concealed in the cave.

15. And he always brings me the six [seasons] accompanied by Soma-drops. as a man ploughs a field with bullocks.

---

१३. 'जाज्वल्य पूषा.' पूषा हा जो देव आहे त्याविषयीं वर ८ व्या मंत्रावरील टीप पाहा.

'[सोम]'='चित्रबर्हिषम्.' भाष्यास अनुसरून अर्थ केला आहे, पण सोम म्हणजे या ठिकाणीं प्यावयाचा जो सोम तो घ्यावयाचा कीं चंद्र घ्यावयाचा तें निश्चयानें सांगवत नाहीं, आणि कोणताहि अर्थ घेतला तरी 'सोमास' चुकार गुराप्रमाणें पूषा देव कसा आणणार तेंहि सांगवत नाहीं. आणि 'सोम' (कोणत्याहि अर्थी घेतला तरी) आकाशातें धारण करणारा कसा तेंहि खात्रीनें सांगता येत नाहीं. चित्रबर्हिः याचा पदशः अर्थ विचित्रदर्भांनीं युक्त असा सायणाचार्य करितात.

'इकडे हाकून आण'= आ अज'. या शब्दांचा आम्हीं केल्याप्रमाणें अर्थ प्रयोगान्तरांवरून वगैरे स्पष्ट असतां सायणाचार्य 'हे गमनशीला,' असा अर्थ करून 'आ हर' (=हाकून आण) असें क्रियापद कां अध्याहृत घेतात कळत नाहीं.

१४. 'गुहेमध्यें लपवून ठेविलेल्यास' ='गुहा हितम् अपगूढम्.' सायणाचार्य म्हणतात कीं, गुहेसारिखा दुर्गम जो द्युलोक तेथें असलेला सोम असा अर्थ घ्यावयाचा. सोम पृथ्वीवर पूषा देवानें आणिला असा त्याचा भावार्थ.

१५. हा मंत्र फार संदिग्ध आहे आणि त्याचा भावार्थ मंत्रातील शब्दांवरून तर समजत नाहीं. आम्हीं भाषांतर केवळ सायणाचार्यांस अनुसरून केलें आहे. व याशिवाय मंत्राचा अर्थ स्पष्ट करण्याकरितां म्हणून ते कांहीच सांगत नाहींत. 'ऋतूंस' हें अध्याहृत पद आम्हीं सायणप्रमाणें घेतलें आहे, पण असा प्रकारचा अध्याहार करावा लागणें म्हणजे अर्थ समजत नाहीं असें कबूल करणेंच होय असें म्हटलें पाहिजे. वेदांत कितीएक कठिण मंत्र आहेत त्यांतील हा एक होय.

**अम्बयो यन्त्यध्वभिर्जामयो अध्वरीयताम् ।**
**पृञ्चतीर्मधुना पयः ॥ १६ ॥**

अम्बयः । यन्ति । अध्वऽभिः । जामयः । अध्वरिऽयताम् ।
पृञ्चतीः । मधुना । पयः ॥ १६ ॥

**अमूर्या उप सूर्ये याभिर्वा सूर्यः सह ।**
**ता नो हिन्वन्त्वध्वरम् ॥ १७ ॥**

अमूः । याः । उप । सूर्ये । याभिः । वा । सूर्यः । सह ।
ताः । नः । हिन्वन्तु । अध्वरम् ॥ १७ ॥

**अपो देवीरुप ह्वये यत्र गावः पिबन्ति नः ।**
**सिन्धुभ्यः कर्त्वं हविः ॥ १८ ॥**

अपः । देवीः । उप । ह्वये । यत्र । गावः । पिबन्ति । नः ।
सिन्धुऽभ्यः । कर्त्वम् । हविः ॥ १८ ॥

## भाषायाम्.

१६. अध्वरीयताम् (=अध्वरेण देवयजनं कर्तुमिच्छताम्) जामयः (=प्रियाः) अम्बयो (=मातरः) मधुना [स्वकीयं] पयः पृञ्चत्यो (=मिश्रयन्त्यः) अध्वभिर्यन्ति ॥

१७. या अमूः (=एताः) सूर्येण सह याभिः सह सूर्यो वा [अस्ति] ता आपोऽस्माकमध्वरं हिन्वन्तु (=साधयन्तु) ॥

१८. यासु [अप्सु] अस्माकं गावः पिबन्ति ता अपो देवीः [अहम्] आह्वयामि । [ताभ्यः] सिन्धुभ्यः हविः कर्तव्यम् [अस्ति हि] ॥

तेरा, चवदा आणि पंधरा हे मंत्र सोमाविषयीं नसतां मेघाविषयीं असतील असें विशेष संभवतें. 'आकाशातें धारण करणाऱ्या' आणि 'विचित्रपक्ष' मेघास 'हाकून' उपासकाकडे 'आणणें' यात चांगला अर्थ आहे. तसाच 'विचित्रपक्ष राजा [मेघा]ला' गुहेंतून पूषा 'शोधून काढिता झाला' यांतहि अर्थ योग्य दिसतो.

१६. यज्ञेच्छू जनांच्या प्रिय माता [अशा ह्या आपो देवी] माधुर्यानें [आपलें] पय मिश्र करीत करीत मार्गानें जात आहेत.

१७. ह्या ज्या [आपो देवी] सूर्याजवळ [असतात] अथवा ज्याजवळ सूर्य [असतो] त्या आमच्या यज्ञास साहाय्य करोत.

१८. [मी] आपो देवींस येथें बोलावितों, कारण कीं, आमचीं गुरें त्यांजजवळ पीत असतात. [त्या] नद्यांस हवि देणें योग्य [होय].

16. The [sacred waters], dear mothers of the sacrificers, are going by the way, mixing their milk with sweetness.

17. Those [goddesses of the sacred waters] who [are] near the sun or to whom the sun [is] near—may they promote our sacrifice.

18. I invoke hither the goddesses, [the sacred] waters, at which our cows drink. A sacrifice deserves to be offered to these rivers.

---

१६. हा मंत्र 'आपो देवीं' विषयीं आहे. 'आपो देवी' म्हणजे उदकें जीं त्याच कोणी देवी. त्यांस यज्ञकर्त्यांच्या प्रिय माता म्हणणें हें योग्यच आहे. कारण जसें मातेचें दूध जीवनोपायभूत आहे, तसें नद्यांचें उदक जीवनोपायभूत आहे. आधुनिक आर्यांची जशी नद्यांच्या वगैरे पाण्यावर भक्ति आहे (म्हणूनच ते नद्यांस पवित्र मानितात) तशीच प्राचीन आर्यजनांची प्रीतिपुरःसर भक्ति उदकांवर असे. म्हणूनच उदकें ह्या देवता होत असें ते मानीत.

१७. 'ज्या...सूर्याजवळ ..अथवा ज्यांजवळ सूर्य'. म्हणजे येथें मेघोदकें जीं त्याच कोणी देवी असें समजावयाचें.,आणि मेघोदकें तर सूर्याजवळ म्हणजे आकाशांत असतात म्हणून सांगावयास नकोच.

१८. या मंत्रांत जे 'कारण कीं आमचीं गुरें त्यांजजवळ पीत असतात'= 'यत्र गावः पिबन्ति नः,' असे शब्द आहेत त्यांवरून 'आपो देवी' म्हणजे केवळ उदकें, दुसरें कांहीं नाहीं हें स्पष्ट होतें ह्या ठिकाणीं नद्या ज्या तद्रूपी 'आपो देवी' समजावयाच्या. वर १७ व्या मंत्रांत सांगितलेल्या 'आपो देवी' म्हणजे मेघोदकें जीं तद्रूपी समजावयाच्या असें दिसतें.

अप्स्व१ न्तरमृतमप्सु भेषजमपामुत प्रशस्तये ।
देवा भवत वाजिनः ॥ १९ ॥

अप्ऽसु । अन्तः । अमृतम् । अप्ऽसु । भेषजम् । अपाम् । उत । प्रऽशस्तये ।
देवाः । भवत । वाजिनः ॥ १९ ॥

*अप्सु मे सोमो अब्रवीदन्तर्विश्वानि भेषजा ।
अग्निं च विश्वशंभुवमापश्च विश्वभेषजीः ॥ २० ॥ ११ ॥

अप्ऽसु । मे । सोमः । अब्रवीत् । अन्तः । विश्वानि । भेषजा ।
अग्निम् । च । विश्वऽशंभुवम् । आपः । च । विश्वऽभेषजीः ॥ २० ॥ ११ ॥

आपः पृणीत भेषजं वरूथं तन्वे३ मम ।
ज्योक्च सूर्यं दृशे ॥ २१ ॥

आपः । पृणीत । भेषजम् । वरूथम् । तन्वे । मम ।
ज्योक् । च । सूर्यम् । दृशे ॥ २१ ॥

---

भाषायाम्.

१९. अपामन्तः अमृतम् अपामन्तः भेषजं [ भवति ] । हे देवा (=दिव्या ऋत्विजः ) अपां प्रशस्तये (=कीर्तये ) वाजिनो (=बलवन्तो ) भवत, ॥

२०. अपामन्तर्विश्वानि भेषजानि विश्वशंभूः (=विश्वेषां सुखकरः) अग्निश् [चास्तीति] आपश्च विश्वभेषजवत्यः [ सन्तीति ] सोमो ममाब्रवीत् ॥

२१. हे आपः मम शरीराय वरूथं (=रक्षककवचभूतं ) भेषजं पृणीत (=अर्पयत ) । ज्योक् (=चिरं ) दर्शनाय च सूर्यम् [ अर्पयत ] ॥

---

* या मंत्रापासून पुढील तीन् ऋचा संध्यावंदनकर्मांत मार्जनास घेतात.

१९. आपो देवींच्या अंगीं अमृत [ आणि ] आपो देवींच्या अंगीं औषध [ आहे ]. आणि हे देव हो, आपो देवींची स्तुती करण्यासाठीं [ तुम्ही ] शक्तिमान् व्हा.

19. [There is] ambrosia in the waters, [there is] medicine in the waters. Be, ye gods, powerful in order to glorify the waters.

२०. मला सोमानें सांगितलें आहे [ कीं ], आपो देवींच्या अंगीं सकल औषधें [ आहेत ], आणि सर्वांचें कल्याण करणारा अग्नि [ त्यांत आहे असें ] आणि आपो देवी सकलौषधसंपन्न [ आहेत असें सांगितलें आहे ].

20. Soma has revealed to me that in the waters are all medicaments and Agni the benefactor of all, [and that] the waters are possessed of all medicines.

२१. हे आपो देवी हो, माझ्या शरीराचें संरक्षण करणारें असें औषध मला द्या आणि सूर्य फार दिवस माझ्या दृष्टीस पडे असें करा.

21. Waters, grant unto me a medicament that shall be an armour to my body and [grant] the sun that I may behold it long.

---

१९. 'देव.' येथें 'देव' म्हणजे ऋत्विज असा अर्थ आहे असें सायणाचार्य म्हणतात. आणि 'शक्तिमान् व्हा' म्हणजे 'वेगवंत व्हा,' 'लौकर प्रशंसा करा' असा अर्थ आहे म्हणून म्हणतात.

२०. 'मला सोमानें सांगितलें आहे' म्हणजे काय? सोमापासून उत्पन्न झालेल्या हर्षांत मी असतांना मला समजलें कीं, उदकांत सकल औषधें आणि सकल जनांचा हितकर्ता अग्नि आहे, असें उत्तर आहेसें वाटतें.

उदकांत औषधें आणि अग्नि आहे असे उल्लेख अनेक ठिकाणीं येत जातील. त्याचा अर्थ असा कीं, उदकानें वनस्पति, वृक्ष इ. वाढतात आणि वनस्पति व वृक्ष यांशिवाय औषधें व अग्नि नाहीं हें सांगावयास नकोच.

२१. भावार्थ असा आहे कीं, 'ज्या औषधाच्या योगेंकरून माझ्या अंगावर कवच घातल्याप्रमाणें माझें संरक्षण होईल अशा रीतीचें औषध मला द्या, आणि मी फार दिवस जगेन असें करा.'

'सूर्य फार दिवस माझ्या दृष्टीस पडे असें करा'=' [पुनीत ] ज्योक् च सूर्यं दृशे.', पदशः, 'सूर्य मला द्या कीं मी त्याला फार दिवस पाहीन' असा अर्थ.

इदमापः प्र वहत यत्किं च दुरितं मयि ।
यद्वाहमभिदुद्रोह यद्वा शेप उतानृतम् ॥ २२ ॥

इदम् । आपः । प्र । वहत । यत् । किम् । च । दुःऽइतम् । मयि ।
यत् । वा । अहम् । अभिऽदुद्रोह । यत् । वा । शेपे । उत । अनृतम्
॥ २२ ॥

आपो अद्यान्वचारिषं रसेन समगस्महि ।
पयस्वानग्न आ गहि तं मा सं सृज वर्चसा ॥ २३ ॥

आपः । अद्य । अनु । अचारिषम् । रसेन । सम् । अगस्महि ।
पयस्वान् । अग्ने । आ । गहि । तम् । मा । सम् । सृज । वर्चसा ॥ २३ ॥

सं माग्ने वर्चसा सृज सं प्रजया समायुषा ।
विद्युर्मे अस्य देवा इन्द्रो विद्यात्सह ऋषिभिः ॥ २४ ॥
॥ १२ ॥ ५ ॥

सम् । मा । अग्ने । वर्चसा । सृज । सम् । प्रऽजया । सम् । आयुषा ।
विद्युः । मे । अस्य । देवाः । इन्द्रः । विद्यात् । सह । ऋषिऽभिः ॥
॥ २४ ॥ १२ ॥ ५ ॥

---

## भाषायाम्.

२२. हे आपः यत्किं च मयि दुरितम् [ अस्ति ] यत् [ किं च ] वा [ अहम् ] अभिदुद्रोह (=द्रोहरूपं पापं कृतवानस्मि ) यत् (=किं च ) वा [ अहं ] शेपे अनृतं वा [ बभाषे ] [ तत्सकलं ] [ यूयं ] प्रवहत ॥

२३. हे आपः [ अहम् ] अद्य [ युष्मान् ] अन्वचारिषम् (=अनुचरितवानस्मि ) । रसेन (=उदकरसेन ) [ वयं ] संगताः स्मः । हे अग्ने [ त्वं ] पयसा सह आगच्छ । अनन्तरं च मां वर्चसा (=तेजसा ) संसृज (=संयोजय ) ॥

२४. हे अग्ने, मां वर्चसा संसृज (=संयोजय ) । प्रजया सं[सृज ] । आयुषा सं[सृज ] । अनन्तरं च देवा मां विद्युः । ऋषिभिः सह इन्द्रो विद्यात् ॥

२२. हे आपो देवी हो, जें कांहीं पातक माझ्या अंगीं [ असेल ] अथवा जें मी [ दुसऱ्याचें ] वाईट केलें आहे, अथवा जे मी शाप दिले आहेत आणि [ जें ] खोटें [ बोललों असेन ] तें [ तुम्ही ] सर्व वाहून न्या.

22. Waters, whatever sin there is in me, whatever ill-will I may have borne [to others], whatever imprecations I may have uttered and whatever falsehoods [I may have told], wash it away all [from me].

२३. हे आपो देवी हो, आज मीं तुमचा शोध केला [ आणि ] आम्ही उदकसाराप्रत पावलों. हे अग्नी, तूं आज उदकरस घेऊन ये आणि मग मला तेजानें युक्त कर.

23. Waters, I sought [you] to-day, [and] we have obtained the juice. Come, Agni, with the milk [of the waters] and then fill me with splendor.

२४. हे अग्नी, मला तेज दे, मला संतती दे, मला आयुष्य दे. आणि मग ऋषींसहित मला देव जाणोत, आणि इंद्र जाणो.

24. Agni, confer upon me splendor, confer progeny, confer life. And then may the gods know me, may Indra know me among the poets.

---

२२. या मंत्रांत जी आपो देवींची प्रार्थना केली आहे ती उदकास अनुलक्षून करण्याजोगी आहे, मात्र सकल पातकें उदकाच्या योगें करून नाहींशीं होतील असा भावार्थ नाहीं. परंतु अशा प्रकारच्या समजुतीचें बीज या मंत्रांत आहे यांत संशय नाहीं.

२३. सायणाचार्य ही ऋचा अवभृथाच्या वेळीं ( यज्ञाच्या शेवटीं जें यज्ञकर्त्यानें स्नान करावयाचें त्यावेळीं ) म्हणावयाची अशा समजुतीनें असें तात्पर्य सांगतात कीं, "मी आज अवभृ-"थासाठीं पाण्यांत शिरलों; शिरून "जलाचें जें सार तें आम्ही पावलों. "हे अग्नी, उदकांत जें साररूप दुग्ध "आहे त्यासहित तूं आज ये. आणि "अवभृथस्नान न्हालेला जो मी त्या "मला तेज दे."

२४. 'ऋषींसहित मला देव जाणोत.' सायणाचार्य, "ऋषिगणांसहित देव मला जाणोत" असा अर्थ करितात. पण 'मला ऋषींबरोबर' जाणो, म्हणजे मला 'ऋषीप्रमाणें गणो,' 'मी ऋषी होईं असें करो,' 'इतरांस ऋषी केले तसा मलाहि करो' असा अर्थ चांगला संभवतो.

## सूक्तम् २४.

अजीगर्तपुत्रः शुनःशेप ऋषिः (कृत्रिमो वैश्वामित्रो देवरातः)॥
देवता–१ प्रजापतिः। २ अग्निः। ३-५ सविता। ५ भगो वा। ६-१५
वरुणः॥ छन्दः–१.२.६-१५ त्रिष्टुप्। ३-५ गायत्री॥

**कस्य॑ नू॒नं क॑त॒मस्या॒मृता॑नां॒ मना॑महे॒ चारु॑ दे॒वस्य॒ नाम॑।**
**को नो॑ म॒ह्या अदि॑तये॒ पुन॑र्दात्पि॒तरं॑ च दृ॒शेयं॑ मा॒तरं॑ च॥१॥**

कस्य॑। नू॒नम्। क॒त॒मस्य॑। अ॒मृता॑नाम्। मना॑महे। चारु॑। दे॒वस्य॑।
नाम॑।
कः। नः॒। म॒ह्यै। अदि॑तये। पुन॑रिति॑। दा॒त्। पि॒तर॑म्। च॒। दृ॒शेय॑म्।
मा॒तर॑म्। च॒॥१॥

## भाषायाम्.

१. नूनम् (=अधुना) कस्य [नाम], अमृतानाम् (=अमराणां) [देवानां] [मध्ये] कस्य देवस्य चारु (=प्रियं) नाम मनामहे (=ध्यायामः)। को मां महत्यै अदितये (=पृथिव्यै) पुनर्दद्याद् [येन] [अहं] पितरं च मातरं च पुनः पश्येयम्॥

## सूक्त २४.

**ऋषि**, अजीगर्ताचा मुलगा शुनःशेप, ज्याला विश्वामित्रानें दत्तक घेऊन **देवरात** असें नांव दिलें होतें. **देवता**—१ ल्या ऋचेची प्रजापति असें समजण्याची चाल पडली आहे, २ रीची अग्नि,३-५ ची सविता पण ५ वीची सविता अथवा भग,६-१५ची वरुण. **वृत्त**—१.२.६-१५ त्रिष्टुप्,३-५ गायत्री.

१. आतां कोणाचें नांव,-अमरांतून कोणत्या देवाचें प्रियकर नांव आम्हीं मनांत आणूं ? आम्हांस पुनः मोठ्या पृथ्वीच्या स्वाधीन कोण करील कीं जेणेंकरून मी [माझ्या] बापाला आणि आईला [पुनः] पाहीन?

## HYMN 24.

To *Varuna*; but *Prajápati* is conventionally regarded as the deity of 1, *Agni* is the deity of 2, and *Savitá* of 3-5, but of 5 *Savitá* or *Bhaga*. By *S'unas's'epa* the son of *Ajigarta*, otherwise called *Devaráta* the adopted son of *Vis'vámitra*. Metre of 1, 2, 6-15 *Trishtup*; of 3-5 *Gáyatrí*.

1 . Whose name, of which of the immortal gods should we contemplate the dear name ? Who will deliver us back to the vast Earth that I may see both my father and mother ?

---

१. या सूक्ताचा कर्ता अजीगर्तपुत्र शुनःशेप होय. अजीगर्ताची कथा ऐतरेय ब्राह्मणांत, सांख्यायन सूत्रांत आणि दुसऱ्या ग्रंथांत दिली आहे, ती संक्षेपानें सांगतों:-वेधसाचा मुलगा हरिश्चंद्र म्हणून राजा होता. त्याला शंभर बायका होत्या तरी त्याला मुलगा होत नव्हता. त्याच्या घरीं पर्वत आणि नारद हे मुनी राहत असत. त्यानें नारदाला विचारिलें कीं, पुत्रवांछा सर्वांस असते. तर पुत्रोत्पत्तीपासून काय लाभ आहे? नारदानें उत्तर दिलें कीं, "पुत्रमुख पाहिल्यानें बाप ऋणमुक्त होतो, आणि अमर होतो; पृथ्वी, अग्नि आणि उदकें यांपासून जे उपभोग होतात त्यापेक्षां पुत्रोत्पत्तीपासून अधिक उपभोग मिळतात; पुत्रलाभापासून तमाचा नाश होतो; पुत्र ही एक अन्नानें भरलेली नौकाच होय; गृहस्थाश्रमादि आश्रमांत काय अर्थ आहे? तप करण्यांत काय अर्थ आहे? मुलगा हाच स्वर्ग, यास्तव ब्राह्मणांनीं पुत्राची इच्छा करावी. अन्नापासून प्राण, वस्त्रापासून रक्षण, सुवर्णापासून सौंदर्य, आणि गुरांपासून संपत्ति होते, स्त्री म्हणजे एक मित्र होय, कन्या प्राप्त झाल्यानें क्लेश होतात, परंतु पुत्र म्हणजे केवळ अत्युच्च आकाशामधील ज्योतीच होय; नवरा आपल्या बायकोच्या पोटीं पुत्ररूपानें दहाव्या महिन्यांत पुनः जन्मतो;

आपल्या बायकोच्या पोटीं पुत्ररूपानें नवरा जन्मतो (जायते) म्हणून तिला "जाया" असें म्हणतात; देव आणि ऋषी हे तिच्या अंगीं मोठें तेज भरिता-त, देवांनीं मनुष्यांस सांगितलें आहे कीं, तुमच्या बायकोच्या पोटींच तुम्ही जन्म पावाल. अपुत्रकाला स्वर्ग नाहीं ही गोष्ट पशूहि जाणतात, आणि त्यां-जमध्यें पुत्राचा संबंध मातेशीं आणि भावाचा संबंध बहिणीशीं होत असतो; ज्यास पुत्रलाभ होऊन दुःख नसतें त्यास कीर्ति प्राप्त होते, ही गोष्ट पशु-पक्ष्यांसहि ठाऊक आहे म्हणूनच ते मातेशीं सद्धां संबंध करितात." याप्रमा-णें नारदांनीं सांगितल्यावर हरिश्चंद्र म्हणाला, तर मग मला पुत्रप्राप्तीचा मार्ग सांग. नारद म्हणाला, तूं राजा वरुणाकडे जा, आणि मला पुत्र दे म्हणजे तो मी तुला बळी देईन असें सांग. हरिश्चंद्रानें त्याप्रमाणें केल्या-वर वरुणानें तें मान्य केलें. मग हरि-श्चंद्रास पुत्र झाला. त्याचें नांव रोहित. मग वरुण म्हणाला तुला आतां पुत्र झाला आहे तो मला बळी दे. हरिश्चंद्र म्ह-णाला पशु दहा दिवसांचा झाल्यावर यज्ञास योग्य होतो. हा माझा पुत्र दहा दिवसांचा होऊं दे म्हणजे याला बळी देईन. वरुण म्हणाला बरें आहे. तो दहा दिवसांचा झाला. नंतर त्याला बळी दे असें वरुणानें सांगितलें. हरिश्चंद्र म्हणाला पशूंस दांत आले म्हणजे ते यज्ञयोग्य होतात, याला दांत येऊं दे म्हणजे याला बळी देईन. रोहितास दांत आल्यावर वरुणानें मागणें केलें. तेव्हां हरिश्चंद्र म्हणाला पशूचे दांत पडले म्हणजे तो यज्ञयोग्य होतो, याचे दांत पडूं दे म्हणजे मी याला बळी देईन. दांत पडल्यावर वरुणानें मागणें केल्यावरून हरिश्चंद्र म्हणाला पशूस पुनः दांत आले म्हणजे तो यज्ञयोग्य होतो, याला पुनः दांत येऊं दे म्हणजे याला बळी देईन. दुसरे दांत आल्यावर पुनः वरुणानें मागणें केल्यावरून हरि-श्चंद्र म्हणाला क्षत्रियाचा मुलगा कवच धारण करण्यास योग्य झाला म्हणजे तो बलियोग्य होतो, त्याप्रमाणें माझा मुलगा झाल्यावर बळी देईन. रोहित कवचधर झाल्यावर वरुणानें आतां मुलगा मला बळी दे असें सांगि-तल्यावरून हरिश्चंद्र बोलला, बरें आहे. असें म्हणून त्याणें रोहितास आपणा-पाशीं बोलावून सांगितलें कीं, तूं या वरुणाच्या योगानें मला प्राप्त झाला आहेस, म्हणून तुला मी याच्या प्रीत्यर्थ बळी देतों. रोहित म्हणाला "नको देऊं", आणि धनुष्य घेऊन अरण्यांत पळून गेला, आणि एक वर्षपर्यंत तसाच फिरत होता. इकडे वरुणानें हरिश्चंद्रास धरिलें, त्यामुळें त्याला उदरव्याधि झाली. हें ऐकून रोहित अरण्यांतून गा-वीं आला. त्याला इंद्र मनुष्याचें रूप घेऊन भेटला, आणि म्हणाला अरे रोहिता, जो मनुष्य फिरत नसतो त्याला सुख नाहीं, असें आम्हीं ऐकिलें आहे; जो मनुष्य फिरत नाहीं तो पापी होय, आणि जो फिरतो त्याचा सखा इंद्र होय, यास्तव तूं फिरावयास जा. हें ब्राह्मणवचन आहे असें समजून रोहि-त पुनः एकवर्षपर्यंत तसाच अरण्यांत फिरत राहिला, आणि मग गांवीं आला. तेव्हां इंद्र मनुष्यरूपानें त्यास पुनः भे-टला आणि म्हणाला, जो फिरतो त्याचे पाय प्रफुल्लित वृक्षशाखांप्रमाणें असता-त, आणि तो फलाचा स्वताहाच उप-

भोक्ता होतो, आणि त्याचीं सर्व पातकें चालतां चालतां मार्गांतच नष्ट होतात; तर तूं चल आणि फिरत राहा. त्याप्रमाणें रोहित अरण्यांत तिसरें वर्ष संपेपर्यंत फिरला, आणि मग गांवीं आल्यावर त्यास इंद्र पूर्वीप्रमाणें मनुष्यवेषानें भेटून म्हणाला, जो मनुष्य बसून राहतो त्याचें भाग्य बसतें, जो उठतो त्याचें उठतें, जो निजतो त्याचें निजतें, आणि जो चालत असतो त्याचें भाग्य चालतें; तर तूं जा आणि चालत राहा. त्याप्रमाणें चवथें वर्ष अरण्यवासांत घालवून रोहित पुनः गांवीं आल्यावर पुनः इंद्र मनुष्यरूपानें त्याला भेटून म्हणाला, जो मनुष्य निजतो तो कलि होय, जो जागृत असतो तो द्वापर होय, जो उठतो तो त्रेतायुगाप्रमाणें होय, परंतु जो चालत राहतो तो कृतयुगाप्रमाणें होय, तर तूं चालत राहा. त्याअन्वयें पांचवें वर्ष रोहितानें अरण्यांत घालवून घरीं आल्यावर पुनः मनुष्यरूप घेऊन इंद्र त्यास भेटला आणि म्हणाला, जो फिरतो त्यास मध मिळतो, आणि जो फिरतो त्यास गोड अंजीर मिळतात; पाहा कीं सूर्य नित्य फिरतो आणि थकत नाहीं व सुखी असतो, तर तूं फिरावयास जा. त्याप्रमाणें तो अरण्यांत जाऊन आणखी एक वर्षभर फिरला, आणि पूर्वीप्रमाणेंच इंद्रानें आणखी कांहीं उपदेश केल्यावरून सातवें वर्ष फिरला. फिरतां फिरतां त्याणें भुकेनें मरत होता असा सूयवसाचा पुत्र अजीगर्त या नांवाचा एक ऋषि पाहिला. त्याला शुनःपुच्छ, शुनःशेप, आणि शुनोलांगूल, असे तिघे पुत्र होते. रोहित म्हणाला हे ऋषी, मी तुला शंभर गाई देतों, या तिघां पुत्रांतून एक पुत्र मला दे म्हणजे मी त्याच्या योगानें आपली मोकळीक करून घेईन. ऋषि वडील पुत्रास आलिंगन देऊन म्हणाला हा मिळणार नाहीं; त्याप्रमाणेंच कनिष्ठ पुत्राला आईनें आलिंगन देऊन हा मिळणार नाहीं असें म्हटलें. नंतर मधला जो शुनःशेप त्याला देण्याविषयीं आईबापांनीं ठरविलें. त्याप्रमाणें रोहितानें शंभर गाई देऊन शुनःशेप विकत घेतला, आणि त्यास घेऊन अरण्यांतून गांवीं गेला. आणि बापाजवळ जाऊन म्हणाला, हा पुरुष देऊन मी आपली मोकळीक करणार. हरिश्चंद्र वरुणापाशीं जाऊन म्हणाला हा पुरुष मी तुला बळी देतों. वरुणानें क्षत्रियापेक्षां ब्राह्मण बळी चांगला असें म्हणून तें बोलणें मान्य केलें, आणि राजसूय यज्ञ करावयास सांगितलें. मग शुनःशेपास बळी द्यावयास यज्ञभूमीकडे नेलें.

या प्रसंगीं हरिश्चंद्राचा होता विश्वामित्र ऋषि असे, अध्वर्यु जमदग्नि होता, ब्रह्मा वसिष्ठ होता, आणि उद्गाता अयास्य ऋषि होता. शुनःशेपास तयार करून आणिल्यावर त्याला यूपाला बांधण्यास कोणी कबूल होईना, तेव्हां शुनःशेपाचा बाप अजीगर्त म्हणाला जर तुम्ही मला आणखी शंभर गाई द्याल, तर मीच याला बांधीन. त्याला आणखी शंभर गाई दिल्या. त्यावरून त्यानें शुनःशेपास यूपाला बांधिलें. पुढें त्याला मारण्याची वेळ आली तेव्हां मारण्यास कोणी पुढें होईना. पुनः अजीगर्त म्हणाला, आणखी शंभर गाई मला द्याल तर मीच याला मारीन. त्याप्रमाणें त्यांनीं त्यास आणखी शंभर गाई दिल्या. तो तलवार तयार करून

आपल्या मुलास मारावयास आला. तेव्हां शुनःशेपास आतां आपणास खरोखरच मारतात असें वाटलें, आणि त्याणें सर्व देवांमध्यें प्रथम देव जो प्रजापति त्याचा धांवा ( कस्य नूनं इ० हा पहिला मंत्र म्हणून ) केला. प्रजापतीनें त्याला सांगितलें, अग्नि हा देवांतून अगदी जवळचा देव आहे, त्याचा तूं धांवा कर. त्याणें अग्नीचा धांवा ( अग्नेर्वयं प्रथमस्य इ० हा द्वितीय मंत्र म्हणून ) केल्यावरून अग्नि म्हणाला, सर्वांचा उत्पन्नकर्ता सविता देव आहे, त्याचा तूं धांवा कर. सवित्याचा धांवा (मंत्र तिसरा अभि त्वा देव इ० ) केल्यावरून सविता म्हणाला, तुला वरुणासाठीं बांधिलें आहे, त्याचा धांवा कर. त्यावरून वरुणाचा धांवा केला. वरुण म्हणाला, अग्नि हें देवांचें मुख होय, आणि तो फार दयाळु आहे त्याची स्तुती कर म्हणजे आम्ही तुला मोकळा करूं. त्याप्रमाणें अग्नीचा धांवा केल्यावर अग्नि म्हणाला, विश्वेदेवांचा धांवा कर म्हणजे आम्ही तुला सोडूं. विश्वेदेवांचा धांवा केल्यावर विश्वेदेव म्हणाले, इंद्र हा सर्वांत मोठा, बलिष्ठ आणि दयाळु आहे, त्याची स्तुती करशील तर तुला सोडूं. त्याणें इंद्राची स्तुती केली. नंतर इंद्र प्रसन्न झाला, आणि त्याणें त्याला सुवर्णाचा एक रथ आपल्या मनांत दिला, त्याबद्दल शुनःशेपानें त्याचे आभार एक ऋचा रचून मानिले. इंद्र म्हणाला तूं अश्वींची स्तुती कर म्हणजे तुला सोडूं. अश्वींची स्तुती केल्यावर अश्वी म्हणाले, तूं उषेची स्तुती कर म्हणजे तुला सोडूं. त्यावरून त्यानें उषेची स्तुती केली. नंतर त्याचे पाश हळुहळु तुटूं लागले, आणि प्रत्येक ऋचेबरोबर हरिश्चंद्राचें उदरहि लहान लहान होत गेलें. शेवटची ऋचा म्हटल्याबरोबर शुनःशेप अगदी मोकळा झाला, आणि हरिश्चंद्रहि बरा झाला.

नंतर त्या दिवसाचा यज्ञ शुनःशेपाच्या हातानें विश्वामित्रादि ऋषींनीं करविला, आणि विश्वामित्रानें शुनःशेपास आपल्या मांडीवर बसवून दत्तक घेतलें. अजीगर्त आपला मुलगा आपणास परत मिळावा म्हणून पुष्कळ प्रयत्न करूं लागला, व त्यानें शुनःशेपालाहि पुष्कळ सांगितलें कीं तूं आपलें कुळ सोडून दुसऱ्या कुळांत जाऊं नकोस. परंत शुनःशेपानें सांगितलें कीं, तूं हातांत तलवार घेऊन आपल्याच मुलाला मारण्यास आलास हें शूद्रानेंहि करण्यास अयोग्य असें कृत्य केलेंस त्यापेक्षां मी येत नाहीं. विश्वामित्र म्हणाला या शुनःशेपाला देवांनीं मरणापासून सोडवून मला दिलें आहे त्यापेक्षां हा देवरात ( देवांनीं दिलेला) माझा दत्तपुत्र झाला; आतां हा परत मिळणार नाहीं.

या कथेविषयीं आम्हांस प्रथमतः असें सांगावयाचें आहे कीं, प्रस्तुत सूक्त समजेनासें झालें तेव्हां ही कथा ऐतरेय ब्राह्मणांत वगैरे मागाहून पुष्कळ दिवसांनीं रचिली गेली अशी शंका वाटते. तथापि इतकें खरें आहे कीं, या सूक्ताचे आरंभींचे जे मंत्र आहेत ते आणि कितीएक नंतरचेहि शुनःशेपाच्या संकटासारिख्या संकटांत असलेल्या कोणा तरी मनुष्याविषयीं आहेत. आणि त्यावरूनच शुनःशेपाची कथा उत्पन्न झाली असावी असें म्हणण्यास कारण दिसतें.

परंतु ही सर्व कथा घडलेल्या गोष्टीचा अनुवाद असो, अथवा घडले-

ल्या लहानशा एकाद्या गोष्टीच्या बीजावरून केलेला कल्पनाविस्तार असो; इतकें खरें आहे कीं, तींत फार प्राचीनकाळीं चालू होत्या अशा कितीएक चमत्कारिक गोष्टींचा उल्लेख आहे तो लक्ष्यांत ठेवण्याजोगा आहे. पहिली ही कीं, प्राचीनकाळीं वैदिक युगांत (कृतयुगांत) पुरुषमेध करण्याची म्हणजे मनुष्यास बळी देण्याची भयंकर चाल होती, कीं जिचें नांव घेतलें असतां आधुनिक आर्यजनांतून अगदीं जंगली लोकांच्याहि आंगावर शाहरे उठतील. दुसरी ही कीं, सर्व युगांत उत्तम युग जें मानितात, त्या युगांत ऋषिपुत्र शें दोनशें गाई घेऊन आपल्या पोटचा मुलगा बळी देण्याकरितां जो विकत मागेल त्यास विकीत होते इतकेंच नव्हे, पण आताच्या वेळचे अति नीच मानिलेले खाटिक सुद्धां जें काम कधींहि करणार नाहींत तें आपल्याच मुलास आपल्या हातानें तलवार घेऊन मारावयाचें काम थोडक्याच मोलासाठीं करण्यास तयार होते. तिसरी ही कीं, ब्राह्मणकुळांतील मुलगा क्षत्रिय कुळांत ( विश्वामित्र क्षत्रियकुळांतील होता ) दत्तक घेतला जाण्यास कांहीं एक हरकत नव्हती.

चवथी एक गोष्ट ध्यानांत ठेवण्याजोगी अशी आहे कीं, यज्ञांत जे बळी देत त्यास पुनः जीवंत करण्याची शक्ति आणि चाल पुरातन काळच्या लोकांत होती म्हणून जशी प्राणी मारून हत्या करण्याची चाल होती तशीच मारलेल्या प्राण्यास फिरून जीव आणण्याचीहि शक्ति असे असें सांप्रतकाळीं मानितात; परंतु त्याला कांहीं आधार आहे असें दिसत नाहीं. कारण कीं, जर असता तर शुनःशेपास मारल्यानंतर आपण पुनः जीवंत होईन या भरंवशावर तो उगीच राहिला असता अथवा हरिश्चंद्राचा मुलगा रोहित यास मारला असता तरी काय अडचण होती? तो पुनः जीवंत झाला असता? तो सहा सात वर्षेंपर्यंत पळून का जाता असे? शिवाय जर पुनः जीवंत करितां आलें असतें, तर मला मारिलें तरी हे वरुणा मला पुनः जीवंत कर असें शुनःशेपानें म्हटलें नसतें काय?

पहिल्या ऋचेचा भावार्थ असा आहे कीं, मी संकटांत पडलों आहें, तर आतां मी कोणत्या देवाचा धांवा करूं कीं जेणेंकरून माझी मुक्ति होईल, आणि माझीं आईबापें माझ्या पुनः दृष्टीस पडतील. या मंत्रांत "आम्हीं" आणि "आम्हास" हीं जीं अनेकवचनें आहेत तीं केवळ वृत्तसरवार्थ आहेत. वस्तुतः बोलणाऱ्याच्या मनांत 'कोणत्या देवाचें प्रियकर नांव मी मनांत आणूं? मला पुनः मोठ्या पृथ्वीच्या स्वाधीन कोण करील?' असेंच आहे. ही गोष्ट 'मी माझ्या बापाला आणि आईला पुनः पाहीन' असें जें शेवटीं एकवचन आहे त्यावरूनहि उघड होते.—'पुनः मोठ्या पृथ्वीच्या स्वाधीन कोण करील?' असें समजावयाचें कीं बोलणारा मोठ्या संकटांत आहे, आणि मृत्यूच्या मुखीं गेला आहे, तेणेंकरून हा भूलोक जसा कांहीं त्याला सुटलाच आहे. त्या ह्या भूलोकाच्या स्वाधीन त्यास केला म्हणजे तो सहजच संकटांतून सुटला असें समजावयाचें.

ह्या मंत्रांतील प्रश्नाची कोमलता आणि शब्दांची सरणी फार सुंदर आहे. आणि अनेक देवांतून कोणत्या देवाचें प्रिय नांव घेतल्यानें आपली मोकळीक होईल हें जरी प्रश्न विचारणाऱ्यास ठाऊ-

**अग्नेर्वयं प्रथमस्यामृतानां मनामहे चारु देवस्य नाम ।**
**स नो मह्या अदितये पुनर्दात्पितरं च दृशेयं मातरं च॥२॥**

अग्नेः । वयम् । प्रथमस्य । अमृतानाम् । मनामहे । चारु । देवस्य । नाम ।
सः । नः । मह्यै । अदितये । पुनः । दात् । पितरम् । च । दृशेयम् ।
मातरम् । च ॥ २ ॥

**अभि त्वा देव सवितरीशानं वार्याणाम् ।**
**सदावन्भागमीमहे ॥ ३ ॥**

अभि । त्वा । देव । सवितः । ईशानम् । वार्याणाम् ।
सदा । अवन् । भागम् । ईमहे ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. अमृतानां (=मरणरहितानां) [ देवानां ] [ मध्ये ] प्रथमो योऽग्निर्देवस्तस्य चारु (=प्रियं) नाम मनामहे (=ध्यायामः) । स मां महत्यै अदितये (=पृथिव्यै) पुनर्दास्यति [ येन ] [ अहं ] पितरं च मातरं च पुनः पश्येयम् ॥

३. हे देव सवितः हे सदा अवन् (=रक्षक) वार्याणां (=श्रेष्ठानां धनानाम्) ईशं त्वा अभि (=त्वां प्रति) [ वयं ] भाग्यमीमहे (=याचामहे) ॥

---

क नसल्यासारिखें दिसतें, तथापि कोणी तरी एकादा देव आपणास सोडवील आणि आपल्या आईबापाचें मुख आपणास पुनः दाखवील अशी त्याची खात्री दिसून येते आणि देवाच्या नांवाविषयींहि त्याचें प्रेम उघड दिसून येतें.

ह्या मंत्राची देवता प्रजापति असें मानण्याची चाल पडली आहे. त्याचें खरोखर कारण असें कीं, यांत 'कस्य' हा शब्द आहे आणि त्याचा अर्थ 'कचा' असा (त्या चालीस अनुसरून) करीत असतात, 'क' म्हणजे प्रजापति असें म्हणतात. परंतु 'क' शब्दाचा अर्थ प्रजापति असा आहे ही समजूत मागाहून पडली, अति प्राचीन काळीं नव्हती. आणि इतकें तरी खरें कीं, या मंत्रांत 'प्रजापतीचा' संबंध कांहीं नाहीं हें या मंत्राचा अर्थ केल्यानें व याचा आणि पुढील मंत्राचा संबंध काय आहे त्याचा विचार केल्यानें एकदम दिसून येईल.

वर जी ऐतरेय ब्राह्मणांतून शुनःशेपाविषयीं कथा सांगितली आहे तींत शुनःशेपानें आपली सुटका होण्याविषयीं प्रथम प्रजापतीची प्रार्थना केली असें जें सांगितलें आहे तें 'क' म्हणजे प्रजापति आणि तीच या पहिल्या मंत्राची देवता आहे या समजुतीनें होय. परंतु 'कस्य' म्हणजे 'प्रजापतीचा' असा अर्थ होत नाहीं, व ध्यावयाचाहि नाहीं, तेव्हां या ब्राह्मणकथेची मातबरी किती आहे तें सांगावयास नको. ब्राह्मणांत ज्या कथा असतात त्या बहुतकरून अशाच तऱ्हेच्या असतात.

२. देवांमध्यें पहिला असा जो अग्नि त्याचें प्रियकर नांव आम्ही मनांत आणूं; तो आम्हांस पुन: मोठ्या पृथ्वीच्या स्वाधीन करील, कीं जेणेंकरून [पुन:] मी माझ्या बापास आणि आईस पाहीन.

३. हे देवा सवित्या, हे नित्य रक्षण करणाऱ्या, उत्तम धनांचा स्वामी जो तूं त्या तुजजवळ आम्ही भाग्य मागतों.

2. Of Agni, the first among the gods, we will contemplate the dear name. He will deliver us back to the vast earth that I may see both my father and mother.

3. Divine [and] ever protecting Savitá, from thee, the lord of all that is desirable, we ask for wealth;

---

२. पहिल्या मंत्रांत जो प्रश्न विचारिला कीं कोणत्या देवाचा धांवा केला असतां आपली सुटका होईल, त्याचें उत्तर प्रश्न विचारणारा आपणच या मंत्रांत देतो, आणि म्हणतो आपण अग्नीचा धांवा करूं म्हणजे तो आम्हांस सोडवील.—'देवांमध्यें 'पहिला...त्याचें' ='प्रथमस्य अमृतानाम्.' ही केवळ प्रशंसा आहे असें नाहीं. अग्नीस सकल देवांमध्यें मोठा असें म्हटल्यास नवल नाहीं. कारण कीं "वरुणासारिखेहि मोठे देव यशस्वी होतात ते अग्नीच्याच योगानें होतात"=त्वया हि अग्ने वरुणो धृतव्रतो मित्रः शाशद्रे अर्यमा सुदानवः १.१४१.९, इत्यादि अग्नीच्या श्रेष्ठत्वाविषयीं मंत्र वेदांत आहेत.

प्रजापतीनें अग्नीची स्तुती करावयास सांगितल्यावरून शुनःशेपानें ही ऋचा अग्नीविषयीं म्हटली असें (ऐतरेय ब्राह्मणांत सांगितल्याप्रमाणें) म्हणण्यास कांहींच सूचक नाहीं इतकेंच नव्हे, पण तसें कांहींच न घडतां पहिल्या मंत्रांत बोलणारानें जो प्रश्न विचारिला त्याचें आपणच या मंत्रांत उत्तर दिलें आहे असें स्पष्ट दिसून येतें, तें खरें न मानिलें तर या सुंदर मंत्राचें सर्व सौंदर्य, माधुर्य आणि प्रसाद हीं सर्व व्यर्थ जातील असें दिसतें.

३. या मंत्रांत जो 'आम्ही.... मागतों' असा अनेकवचनीं प्रयोग केला आहे तो 'मी......मागतों' या एकवचनार्थी असेल यांत संशय नाहीं. वृत्तसुखासाठीं सुद्धां असे प्रयोग पुष्कळ ठिकाणीं येत असतात. परंतु अग्नीनें सवित्याची स्तुती करावयास सांगितली त्यावरून या तिसऱ्या मंत्रांत सांगितलेली स्तुति शुनःशेपानें केली असें ( ऐतरेय ब्राह्मणकथेंत सांगितल्याप्रमाणें ) समजण्यास त्या कथेशिवाय दुसरा कांहींच आधार नाहीं.

'उत्तम धनांचा स्वामी'='ईशानं वार्याणाम्.' अक्षरशः अर्थ 'वांछनीय वस्तूंचा प्रभु.' म्हणजे ज्या ज्या म्हणून वस्तूंची वांछा करण्यास योग्य आहे त्या सर्वांचा प्रभु, म्हणजे त्या त्या देणारा. दुसऱ्या एका मंत्रांत सविता देव

**यश्चिद्धि त इत्था भगः शशमानः पुरा निदः ।**
**अद्वेषो हस्तयोर्दधे ॥ ४ ॥**

यः । चित् । हि । ते । इत्था । भगः । शशमानः । पुरा । निदः ।
अद्वेषः । हस्तयोः । दधे ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. यत् किंचित् हि परं प्रशस्तं द्वेषरहितं भाग्यं पुरा निदः (=निन्दकानां बाधा न स्यादिति ) तव हस्तयोर्दधे ( =धृतं ) [ तत् वयम् ईमहे ] ॥

पृथ्वीपासून, उदकापासून आणि द्युलोकापासून वांछनीय संपत्ती आम्हांस पाठवितो अशा अर्थानें प्रार्थना आहे. ( अस्मभ्यं तद्दिवो अद्भ्यः पृथिव्यास्त्वया दत्तं काम्यं राध आ गात् । २. ३८. ११ ). सविता देव सर्व सुवर्णमय आहे आणि तो संपत्ती देतो असें पुष्कळ ठिकाणीं वेदांत आलें आहे.

या मंत्रांत–'भगः' मागतों' म्हणून म्हटलें आहे, तें कोणतें भाग्य हें पुढच्या मंत्रांत सांगितलें आहे. तो मंत्र व त्यावरील टीप पाहा.

४. निंदकांनीं निंदा करूं नये म्हणून जें जें, उत्तम रीतीनें वाखाणिलेलें भाग्य तूं सदय होऊन [आपल्या उपासकांसाठीं] हातांत धरितोस [तें तें आम्ही मागतों].

4. [We ask for] whatever wealth, which is so much praised, and is filled with kindness, is held in thy hands [by thee] [for thy worshipper] against [the attacks of] the slanderer.

४. हा मंत्र कठिण आहे. आणि आम्हीं होईल तितके श्रम करून भाषांतर केलें आहे. तें अर्थ समजावा म्हणून बरेंच विस्तरानें करावें लागलें आहे, तथापि असें म्हटलें पाहिजेच कीं, झालें आहे त्यापेक्षा चांगल्याची अपेक्षा आहे. वरील मंत्रात 'भाग्य [illegible] मागतों' म्हणून सांगितलें, तें भाग्य कोणतें त्याचा खुलासा या चवथ्या मंत्रात सांगितला आहे असें दिसतें. उपासक म्हणतो कीं, ज्या त्वां दिलेल्या भाग्याची कविजन फार प्रशंसा करितात, आणि तुझ्या उपासकांची निंदा त्याच्या निंदकांनीं करूं नये म्हणून तूं आपल्या हातांत धरितोस ( म्हणजे जें देण्यास तूं नेहमी तयार असतोस ), आणि ज्यामध्यें तुझी दया भरलेली असते तें भाग्य आम्ही मागतों. भावार्थ असा आहे कीं, तुम्ही सवित्याची सेवा कशाला करितां, तो तुम्हास काय देणार आहे? असें सवित्या देवाच्या उपासकांची निंदा करणारे लोक म्हणतात; तर आपली सेवा व्यर्थ होत नाहीं असें निंदकांस दाखविण्याकरितां सविता देव आपल्या हातांत भाग्य घेऊन देण्यास तयार असतो, आणि तें इतकें चांगलें असतें कीं, कविजन त्याची स्तुती करीत असतात आणि त्यांत सवित्याची दया परिपूर्ण भरलेली असते.

'निंदकांनीं निंदा करूं नये म्हणून' ='पुरा निदः'. म्हणजे पदशः अर्थ 'निंदकाविरूद्ध' असा आहे. 'पुरा' हे शब्दयोगी अव्यय असून पंचम्यंत शब्दापूर्वी येत असतें. त्याचा प्रसिद्ध अर्थ जरी 'पूर्वी' असा आहे तथापि पर्यवसितार्थ 'विरूद्ध' असाहि होतो. उदाहरणार्थः— पवस्व सोम देववीतये वृषा इन्द्रस्य हार्दि सोमधानम् आ विश । पुरा नो बाधाद् दुरिता अति पारय इ० ऋ. ९.७०.९. शिवाय ऋ. ४.३.१ हेंहि स्थल पाहा.—'उत्तम रीतीनें वाखाणिलेलें'= 'इत्था शशमानः'. या शब्दांचा अर्थ 'इतकें वाखाणिलेलें' असा आहे. 'इतकें' म्हणजे लोकांत प्रसिद्ध आहे अशा रीतीनें. अर्थात् 'फार'.—'सदय होऊन' हा अर्थ 'अद्वेषः' यामधून घेतला आहे. अद्वेषः हें 'भगः' असा जो भाग्य या अर्थी शब्द आहे त्याचें विशेषण आहे. त्याचा अर्थ 'ज्यांत द्वेष नाहीं', म्हणजे 'ज्यांत कृपा आहे' असें तात्पर्य.

या मंत्रात जे 'यश्चिद्धि' असे शब्द आहेत त्यांचा अर्थ 'जरी तो' असा अथवा अशा जवळ जवळ असेल असें वाटतें. कारण कीं 'यच्चिद्धि' याचा अर्थ नेहमीं 'जरी' असा होतो. खालीं सूक्त २९ मंत्र १ आणि सूक्त २८ मंत्र ५ पाहा. आणि आम्हीं केलेल्या अर्थापेक्षा चांगल्या अर्थाची अपेक्षा आहे म्हणून सांगितलें आहे. तो अर्थ कोणी शोधून काढण्याचा प्रयत्न करील तर त्याणें या गोष्टीचा विचार करण्यासारिखा आहे.

भगंभक्तस्य ते वयमुदंशेम तवावसा ।
मूर्धानं राय आरभे ॥ ५ ॥ १३ ॥

भगऽभक्तस्य । ते । वयम् । उत् । अशेम । तव । अवसा ।
मूर्धानम् । रायः । आऽरभे ॥ ५ ॥ १३ ॥

नहि ते क्षत्रं न सहो न मन्युं वयश्चनामी पतयन्त आपुः ।
नेमा आपो अनिमिषं चरन्तीर्न ये वातस्य प्रमिनन्त्यभ्वम् ॥ ६ ॥

नहि । ते । क्षत्रम् । न । सहः । न । मन्युम् । वयः । चन । अमी इति । पतयन्तः । आपुः ।

न । इमाः । आपः । अनिऽमिषम् । चरन्तीः । न । ये । वातस्य । प्रऽमिनन्ति । अभ्वम् ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. तव अवसा (=रक्षणेन) [हे सवितः] भगभक्तस्य (=धनयुक्तस्य) तव [अवसा] वयं रायः (=संपत्तेः) मूर्धानम् (=अग्रम्) उदशेम (=गाप्नुयाम) [यथा ते मूर्धानम्] आरभामहे (=गृहीत्वा तिष्ठेम) [तथा] ॥

६. तव क्षत्रं (=बलं) हि अमी पतयन्तो (=अन्तरिक्षे गच्छन्तो) वयोपि (=पक्षिणोपि) न आपुः (=न प्राप्ताः) । [तव] सहः (=पराक्रमणं) न [आपुः] । [तव] मन्युं (=क्रोधं) न [आपुः] [तव] अनिमिषं (=सर्वदा) चरन्त्यः इमा आपः न [आपुः] । वातस्य अभ्वं (=वेगं) ये प्रमिनन्ति (=अतिक्रमन्ति) [ते अश्वादयोपि] न [आपुः] ॥

५. [हे सवित्या] धनयुक्त, जो तूं त्या तुझ्या आश्रयानें आम्हांस संपत्तीचें शिखर प्राप्त होओ, कीं जेणेंकरून तें आम्ही धरून राहूं.

६. कारण कीं, हे [ आकाशांत पाहिजे तिकडे] उडणारे पक्षीहि तुझ्या शक्तीप्रत पावत नाहींत, बळाप्रत पावत नाहींत, क्रोधाप्रत पावत नाहींत; हीं सतत चालणारीं उदकें देखील पावत नाहींत; वायूचें सामर्थ्य [illegible] करणारे जे ते देखील पावत नाहींत.

5. [O Savitâ,] may we under the protection of thee, who art rich in wealth, obtain the best of prosperity that we may seize it.

6. For not even these birds that fly attain to thy power, nor to thy valour, nor to thy rage; nor have these waters, that flow without interruption, nor they that overcome the strength of the wind.

---

५. मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, सवित्याचा आश्रय मिळावा आणि तेणेंकरून बोलणारास उत्कृष्ट संपत्तीची प्राप्ति होऊन ती त्याच्या हातीं राहावी असें व्हावें.

'धनयुक्त जो तूं त्या तुझ्या'='भगभक्तस्य ते.' हा अर्थ सायणाचार्यांप्रमाणें आम्हीं केला आहे. परंतु 'देवांनीं दिलेली जी तिचें' असा अर्थ करून 'रायः' याचें विशेषण घेता येईल.—'कीं जेणेंकरून तें आम्ही धरून राहूं' हा अर्थ 'आरभे' या तुमर्थ अव्ययापासून काढिला आहे.

या मंत्राचा अर्थ असाहि संभवेल कीं,'संपत्तियुक्त जो तूं त्या तुझे [अंकित असे ] आम्ही तुझ्या कृपेनें आरंभींच दौलतीच्या शिखरास पोंहचूं असें कर.'

या पांचव्या मंत्राची देवता सविता आहे अथवा भग आहे म्हणून सूक्तारंभीं सांगितलें आहे. आतां या मंत्रांत सवित्याचें देवतात्व स्पष्टच आहे. पण 'भग' देव याची देवता कशी होते असा प्रश्न निघतो. त्याचें उत्तर इतकेंच कीं, या पांचव्या मंत्रांत भग हा शब्द भगभक्तस्य या समासांत आला आहे. पण या स्थळीं भग शब्दाचा अर्थ भगदेव असा होत नाहीं, भाग्य असा होतो. केवळ शब्दसाम्यावरून भग देवता मानण्याचा संप्रदाय आजपर्यंत पडला आहे.

६. अनुक्रमणिकेंत या ऋचेची देवता वरुण असें सांगितलें आहे, आणि त्याप्रमाणें आम्हीं सूक्तारंभीं दर्शविलेंच आहे. व ऐतरेय ब्राह्मणांत सांगितल्याप्रमाणें सायणाचार्यहि म्हणतात कीं, या ऋचेपासून पुढें उरलेलें हें सगळें सूक्त व याच्या पुढचें ( पंचविसावें ) सूक्त उच्चारून शुनःशेपानें वरुणाची स्तुती केली. वास्तव ही ऋचा व उरलेलें सर्व सूक्त वरुणदेवतेविषयीं आहे. परंतु पांचवा मंत्र ज्या ( सवित्या ) देववि-

अबुध्ने राजा वरुणो वनस्योर्ध्वं स्तूपं ददते पूतदक्षः ।
नीचीनाः स्थुरुपरि बुध्न एषामस्मे अन्तर्निहिताः केतवः स्युः ॥
॥ ७ ॥

अबुध्ने । राजा । वरुणः । वनस्य । ऊर्ध्वम् । स्तूपम् । ददते । पूतऽदक्षः ।
नीचीनाः । स्थुः । उपरि । बुध्नः । एषाम् । अस्मे इति । अन्तः । निऽहिताः । केतवः । स्युरिति स्युः ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. पूतदक्षः (=पवित्रबलो) राजा वरुणः वनस्य (=वनरूपिणो मेघमण्डलस्य) ऊर्ध्वं स्तूपं (=शेखरं) अबुध्ने (=मूलादृतेपि) ददते (=धारयति) । एते केतवः (=किरणाः) नीचैर्मुखाः (=अधोमुखाः) [अ]स्थुः (=तिष्ठन्ति) तेषां केतूनां बुध्नः (=मूलम्) उपरि (=उर्ध्वमुखं) [तिष्ठति] । एते केतवः अस्मासु अन्तः निहिताः स्युः (=तान् अस्माकं मध्ये निधापय) ॥

षयीं आहे त्याविषयींच हा सहावा मंत्र आहे असें म्हणण्यास कांहीं अडचण दिसत नाहीं. किंबहुना अर्थसंदर्भावरून हे दोन्हीं मंत्र एकाच देवाविषयीं आहेत असें दिसतें. आणि या सहाव्या मंत्रांत जें काय सांगितलें आहे तें जसें वरुणास लागेल असें म्हणतां येईल त्याप्रमाणेंच सवित्यास लागेल.

'हे उडणारे पक्षी.' सायणाचार्य हे पक्षी म्हणजे श्येनादिपक्षीच समजतात, आकाशांतून फिरणारे नक्षत्ररूपी अथवा वायुरूपी पक्षी समजत नाहींत. उदकांविषयीं सांगितलें आहे त्यापेक्षां साहचर्यसंबंधावरून सायणाचार्यांचा अर्थ युक्त दिसतो खरा.

'वायूचें सामर्थ्य नाहींसें करणारे जे' ='ये वातस्य प्रमिनन्ति अभ्वम्.' हे कोण? अश्वादि जे चपळ पशु ते असावे असें दिसतें.

मंत्राचें तात्पर्य असें दिसतें की, "चपळ पक्षी, चपळ उदकें आणि चपळ अश्वादिक पशु हेहि तुझ्या गतीची, बळाची, पराक्रमाची आणि क्रोधाची बरोबरी करूं शकत नाहींत."

आताच्या काळीं एकाद्या लहानसान देवाविषयीं जरी आम्ही प्रशंसा करूं लागलों तरी 'हे अमुक देवा, सर्व पाखरें, सर्व उदकें आणि जनावरें तुझ्या बळाची आणि क्रोधाची बरोबरी करूं शकत नाहींत,' असें आपण बहुतकरून म्हणणार नाहीं. पण अशा प्रकारच्या स्तुतीपेक्षां अधिक साधी स्तुती आतां आम्हांस करितां येणार नाहीं आणि या साधेपणांत एक प्रकारचें सौंदर्य आहे यांत संशय नाहीं.

७. ज्याचें बल पवित्र होय तो राजा वरुण मेघमंडलाचा घुमट बुडाशिवायच अंतराळीं धारण करितो. हे किरण अधोमुख आहेत [ आणि ] ह्यांचें बूड वर आहे; ते आम्हांमध्यें स्थापिले जाओत.

7. King Varuṇa, of sacred might, holds up the dome of the forest (=cloud-region?) without a bottom. These rays stand head downwards, their bottom being upwards; may they be fixed in us.

७. या मंत्राचा शब्दार्थ फार कठिण आहे असें नाहीं, पण तात्पर्य काय आहे तें समजणें कठिण आहे. परंतु जें समजतें तें असें दिसतें कीं, 'हें जें अंतरिक्षरूपी अरण्य आहे तें बुडाशिवायच वरुण अंतराळीं धारण करितो; आणि सूर्यकिरणरूपी जीं हीं झाडें दिसतात त्यांचीं डोकीं म्हणजे अग्रें खालीं असून त्यांचीं बुडें वर आहेत हाहि प्रताप वरुणाचाच आहे. तर हे जे किरण ते आम्हांवर राहोत.' बुडाशिवाय अंतरिक्ष वरचेवर धारण केलें आहे, आणि सूर्यकिरणांचीं बुडें वर करून शेवटें खालीं करून ते भूमीवर जिकडे तिकडे पसरले हे वरुणाचे दोन पराक्रम वाखाणण्याचें या मंत्रकर्त्याच्या मनांत आहे.

परंतु 'वनस्य' म्हणजे अक्षरशः अर्थ 'वनाचा' असा असतां अंतरिक्षरूपी वनाचा असा अर्थ करावा लागतो, आणि 'हे किरण' म्हणजे 'सूर्याचे हे किरण' असें विवक्षित आहे तरी 'सूर्याचे' असें दर्शविण्यास शब्द नाहीं. परंतु सूर्याचे न घ्यावे तर दुसरे संभवत नाहींत.–'ते आम्हांमध्यें स्थापिले जाओत' ह्याचा भावार्थ आम्ही सूर्यकिरणांशिवाय राहूं असें न होओ असा असावा.

शुनःशेपासारिख्या संकटस्थ मनुष्यानें वरुणासारिख्या मोठ्या देवाचा धांवा करितेवेळीं हा मंत्र म्हणावा असें या मंत्रांत कांहीं दिसत नाहीं. त्याणें आपल्या संकटाच्या प्रसंगीं हा मंत्र म्हटला असेल कीं नाहीं याविषयीं संशय घेण्यास बरीच जागा आहे असें आम्हांस वाटतें. व असेंच या सूक्तांतील कित्येक ऋचांविषयीं म्हणणें भाग आहे. संकटाच्या वेळीं न म्हणावयाचीं जीं सूक्तें अनेक आहेत त्यांतील मंत्राप्रमाणेंच हा व दुसरे मंत्र या सूक्तांत आहेत.

उरुं हि राजा वरुणश्चकार सूर्याय पन्थामन्वेतवा उ ।
अपदे पादा प्रतिधातवेऽकरुतापवक्ता हृदयाविधश्चित् ॥ ८॥

उरुम् । हि । राजा । वरुणः । चकार । सूर्याय । पन्थाम् । अनु । एतवै ।
ऊम् इति ।
अपदे । पादा । प्रतिऽधातवे । अकः । उत । अपऽवक्ता । हृदयऽविधः ।
चित् ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

८. राजा वरुणो हि सूर्याय अन्वयनार्थम् उरुं (=विस्तीर्णं) पन्थानं चकार । अपि च पादरहिताय [सूर्याय] पादौ अकार्षीः । अपि च [स] हृदयविधश्चित् (=हृदयभेदिनः शत्रुणोपि) अपवक्ता (=रक्षिता) [अस्ति]।

८. कां कीं राजा वरुण सूर्याला गमन करण्यासाठीं रुंद रस्ता करून देता झाला, [ आणि ] पादहीन सूर्याला चालण्यास पाय देता झाला, आणि तो हृदयभेदी· [ शत्रू]पासूनहि रक्षण करणारा होय.

8. For king Varuṇa made the broad path for Sûrya ( the sun ) to go along, he gave feet to the footless [Sûrya] to go on; and he is a defender from that [foe] even that breaks the heart.

---

८. या मंत्राचा अर्थ सोपा आहे. तो हा कीं, आकाशांतून ज्या मार्गानें सूर्य जातो तो रुंद मार्ग सूर्यासाठीं वरुणानें करून दिला, आणि त्या मार्गानें जाण्यास सूर्यास पाय नव्हते ते त्यास वरुणानेंच दिले; आणि आम्हास न कळत जर आमचा शत्रु आमचें हृदय फोडून टाकील तर तशा शत्रूपासून अथवा रोगापासून आमचा बचावहि वरुणच करीत असतो.

ह्या तीन गोष्टींतून पहिल्या दोन गोष्टींचा विचार करून पाहूं लागलें तर अर्वाचीन काळीं वरुणाविषयीं जी कल्पना आहे कीं, तो केवळ समुद्राची आणि इतर उदकाची देवता होय तिला आणि वेदांत वरुणाविषयीं सांगितलें आहे त्याला बरेंच अंतर आहे. वेदांत वरुण देवता मोठ्या महत्त्वाची आहे; आणि तो आकाश निर्माण करितो आणि सूर्यास पाय देऊन त्यास चालवितो हा त्याचा मोठा पराक्रम वर्णिला आहे. व त्यास 'राजा' असेंहि म्हटलें आहे. तो पापपुण्याचा पाहणारा आहे, आणि गुप्तपणें नाश करूं इच्छिणाऱ्या शत्रूपासून अथवा रोगापासून सुद्धा संरक्षण करणारा होय.

'हृदयभेदी [शत्रू]पासूनहि रक्षण करणारा'='अपवक्ता हृदया[विधः] [illegible].' याचा अर्थ 'हृदयभेदी [रोगा]पासूनहि रक्षण करणारा' असाहि होऊं शकेल. वरुण रोगापासून मुक्त करितो आणि तो मोठा वैद्य आहे याविषयीं पुढचाच मंत्र पाहा.

शतं ते राजन्भिषजः सहस्रमुर्वी गभीरा सुमतिष्टे अस्तु।
बाधस्व दूरे निर्ऋतिं पराचैः कृतं चिदेनः प्र मुमुग्ध्यस्मत् ॥९॥

शतम् । ते । राजन् । भिषजः । सहस्रम् । उर्वी । गभीरा । सुऽमतिः । ते । अस्तु ।
बाधस्व । दूरे । निःऽऋतिम् । पराचैः । कृतम् । चित् । एनः । प्र । मुमुग्धि । अस्मत् ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

९. हे राजन् [ वरुण ] तुभ्यं शतं सहस्रं [ वापि ] भिषजः (=भेषजानि ) [ सन्तु ] । तुभ्यम् उर्वी (=दीर्घा) गभीरा सुमतिः (=सुप्रज्ञा) [अस्मदर्थम् ] अस्तु । [ त्वं ] निर्ऋतिं (=पाप्मानं) दूरे बाधस्व ( =परागमय) । कृतं चित् (=अस्माभिः कृतमपि) एनः (=पापम्) अस्मत् प्रमुमुग्धि (=प्रमोचय) ॥

९. हे राजा [वरुणा], [आम्हांसाठीं] तुझ्या जवळ शेकडो [आणि] हजारो औषधें [असोत], [आम्हांविषयीं] तुझी कृपा मोठी [आणि] गंभीर असो; निर्ऋतीस जवळ येऊं न देतां दूर हटीव; [आणि] [आमच्या हातून पाप] घडलें जरी असेल तरी तें आम्हांपासून दूर काढून टाक.

9. O king [Varuṇa], [may there be] with thee a hundred, [nay] a thousand medicines [for us]; may thy kindness be great [and] unfathomed; chase away Nirriti far off [from us]; [and] snatch away from us sin that has even been committed.

९. भावार्थः 'आम्हांस कोणताहि रोग झाला तरी तो बरा करण्यासाठीं तुजजवळ हजारो औषधें असोत; आम्हांवर तुझी कृपा असो, आणि ती मोठी आणि अगाध असो; आम्हीं पातकें करावीं म्हणून आम्हांस शिकविणारी पापदेवता निर्ऋति या नावाची आम्हांजवळ येत असेल तर तिला दूर हाकून दे, आणि जीं पातकें आमच्या हातून घडलेलीं असतील तीं आम्हांपासून काढून टाक.'

हा मंत्र चमत्कारिक व महत्त्वाचा आहे. यांत वरुणदेवतेचीं कामें आणि त्या देवाचे अधिकार व त्याच्या शक्ती सांगितल्या आहेत. रोग झाल्यास ते बरे करणें हें वरुणाचें काम; वरुणाची कृपा होईल तर ती मोठ्या जलाशयाप्रमाणें विस्तीर्ण आणि अगाध असते; पाप करण्याविषयीं वांछा उत्पन्न करण्यास निर्ऋति येईल तर तिला हाकून देण्याची शक्ति त्याला आहे; आणि जें पाप मनुष्याच्या हातून घडून गेलें असेल त्याची क्षमा करण्याचा अधिकार त्याचा आहे.

'निर्ऋति' हें येथें विशेषनाम आहे. या शब्दाचा साधारण अर्थ नाश असा होतो; त्यावरून नाश जिच्या प्रेरणेनें होतो अशी पापरूपी एक देवता; जिजपासून आपली मुक्ति व्हावी असें ऋषिजन वेदांत पुष्कळ ठिकाणीं म्हणत असतात. त्यावरून अर्वाचीन संस्कृतांत निर्ऋति म्हणजे राक्षस असा अर्थ होऊं लागला. व 'निर्ऋति' ही वाईट देवता अथवा पिशाचें ज्या दिशेस राहतात असें समजूं लागले त्या दिशेचें नांव त्यावरूनच 'नैर्ऋत्य' दिशा असें पडलें.

'पाप घडलें असेल तरी तें आम्हांपासून दूर काढून टाक.' अशी प्रार्थना वरुणाची करण्याचें तात्पर्य असें आहे कीं, पाप घडलें म्हणजे वरुण तें पाहतो आणि त्याबद्दल शिक्षा करितो अशी वैदिक काळीं समजूत असल्याविषयीं वेदांवरून समजून येतें. अर्वाचीन काळीं पापपुण्याचा न्याय करून शिक्षा अथवा स्वर्गसुख देण्याचें काम यमाकडे आलें आहे. तें अति प्राचीन काळीं वरुणाकडेस होतें. यम म्हणून जी देवता आपण मानितों तिचा अति प्राचीनकाळच्या वेदभागांत उल्लेख नाहीं.

अमी य ऋक्षा निहितास उच्चा नक्तं ददृश्रे कुह चिद्दिवेयुः।
अदब्धानि वरुणस्य व्रतानि विचाकशच्चन्द्रमा नक्तमेति ॥
॥१०॥१४॥

अमी इति। ये। ऋक्षाः। निऽहितासः। उच्चा। नक्तम्। ददृश्रे। कुह। चित्। दिवा। ईयुः।
अदब्धानि। वरुणस्य। व्रतानि। विऽचाकशत्। चन्द्रमाः। नक्तम्। एति॥ १०॥ १४॥

---

भाषायाम्.

१०. अमी ये ऋक्षाः (=सप्तर्षयो नाम नक्षत्राणि) उच्चैः निहिताः नक्तं (=रात्रौ) दृश्यन्ते [ते] दिवा (=दिवसे) क्वापि गच्छन्ति। विचाकशत् (=देदीप्यमानश्) चन्द्रमाः नक्तं (=रात्रौ) एति (=आयाति)। [तस्माद्] वरुणस्य व्रतानि (=शासनानि) अदब्धानि (=अप्रतिहतानि) [वर्तन्ते]॥

१०. हे जे ऋक्ष उच्चस्थलीं स्थापिलेले रात्रीच्या वेळीं दिसत असतात ते दिवसा कोठें तरी जात असतात. वरुणाचे नियम कोणी मोडीत नाहीं; देदीप्यमान चंद्रमा रात्रीं येत असतो.

10. These Bears (the *Ursa-Major and Ursa Minor*) which are visible at night placed high above, disappear somewhere during the day. The ordinances of Varuna are inviolate; in all her effulgence the moon comes at night.

१०. मंत्राचा भावार्थः–'हे जे रात्रीच्या वेळीं आकाशांत उंच ठिकाणीं सप्तर्षि नांवाचे तारे आमच्या दृष्टीस पडतात ते दिवसाला कोठें तरी जात असतात. कारण कीं, दिवसाला ते दृष्टीस पडत नाहींत. तसाच दिवसाला दृष्टीस पडत नसतो अत एव दिवसास कोठें तरी जात असेल, अथवा दृष्टीस पडलाच तरी निस्तेज असा दृष्टीस पडतो, असा चंद्रमा रात्रीच्या वेळीं नियमित काळीं बिनचूक येत असतो. आणि ह्या ज्या गोष्टी घडून येतात त्या वरुणाच्या हुकुमावरून घडून येत असतात. यास्तव वरुणाचे नियम अथवा हुकूम कोणी मोडीत नाहीं असें म्हटलें पाहिजे.'

'ऋक्ष' या शब्दाचा मूळअर्थ फाडून टाकणारा; त्यावरून अस्वल असा अर्थ होतो, याचें उदाहरण, 'मीळ्हुष्मंतीव पृथिवी पराहता मदन्त्येत्यस्मदा। ऋक्षो न वो मरुतः शिमीवाँ अमो दुध्रो गौरिव भीमयुः।' ऋ. ५.५६.३. त्यावरून ज्याला आधुनिक भाषेमध्यें सप्तर्षि असें अथवा मराठींत खाटलेंबाजलें असें नांव पडलें आहे, ते सात तारे. नंतर 'ऋक्ष' हें साधारण कोणत्याहि नक्षत्राचें नांव पडलें आहे, आणि त्यावरूनच ऋक्षराज म्हणजे नक्षत्रपति असें चंद्राचें नांव पडलें आहे.

हा मंत्र मोठ्याच महत्त्वाचा आहे. कारण कीं, 'ऋक्षाः' हें जें 'सप्तर्षीस' नांव येथें आहे या गोष्टीवरून असें सिद्ध होतें कीं, या नक्षत्राचें हें नांव ग्रीक आणि रोमन लोकांनीं आम्हांकडून घेतलें असेल एक, अथवा ज्या वेळीं आर्य लोकांच्या ग्रीक आणि रोमन ह्या शाखा पौर्व आर्य लोकांस (हिंदूंस) सोडून पश्चिमेकडेस गेल्या त्यापूर्वींच या नक्षत्रास 'ऋक्षाः' हें नांव आर्यलोकांनीं दिलें होतें; आणि तें पौर्व आर्य पूर्वेकडेस (हिंदुस्तानाकडेस) आले तेव्हां त्यांनीं इकडे आणिलें आणि पाश्चिम आर्य म्ह. ग्रीक व रोमन पश्चिमेकडेस (युरोपांत) गेले तेव्हां ते पश्चिमेकडे घेऊन गेले. नाहीं तर या प्रसिद्ध नक्षत्रास संस्कृतांत (ऋक्ष), ग्रीक भाषेंत (आर्क्तियन) आणि लाटिन भाषेंत (अर्सो) एकच नांव असण्याचें कारण काय असावें? आम्हीं हें नांव पाश्चिम आर्य लोकांकडून घेतलें हें तर अगदीं म्हणतां येणार नाहीं, कारण ऋग्वेदासारिख्या पुरातन संस्कृत ग्रंथांत तें आढळतें. आणि जर अति पुरातन ग्रीक अथवा रोमन ग्रंथांत तें सांपडत नसेल तर आमच्या कडून ग्रीक लोकांनीं आणि ग्रीक लोकांकडून नंतर रोमन

**तत्त्वा॑ यामि॒ ब्रह्म॑णा॒ वन्द॑मान॒स्तदा शा॑स्ते॒ यज॑मानो ह॒विर्भि॑ः ।**
**अहे॑ळमानो वरुणे॒ह बो॒ध्युरु॑शंस॒ मा न॒ आयुः॒ प्र मो॑षीः ॥ ११ ॥**

तत् । त्वा॒ । या॒मि॒ । ब्रह्म॑णा । वन्द॑मानः । तत् । आ । शा॒स्ते॒ । यज॑मानः । ह॒विःऽभि॑ः ।
अहे॑ळमानः । व॒रु॒ण॒ । इ॒ह । बो॒धि॒ । उरु॑ऽशंस । मा । नः॒ । आयुः॑ । प्र । मो॒षीः॒ ॥ ११ ॥

**तदिन्नक्तं तद्दिवा मह्य॑माहु॒स्तद॒यं केतो॑ हृ॒द आ वि च॑ष्टे ।**
**शुनः॒शेपो॒ यमह्व॑द्गृभी॒तः सो अ॒स्मान्राजा॒ वरु॑णो मुमोक्तु ॥ १२ ॥**

तत् । इत् । नक्त॑म् । तत् । दिवा॑ । मह्य॑म् । आ॒हुः॒ । तत् । अ॒यम् । केत॑ः । हृ॒दः । आ । वि । च॒ष्टे॒ ।
शुनः॒ऽशेप॑ः । यम् । अह्व॑त् । गृ॒भी॒तः । सः । अ॒स्मान् । राजा॑ । वरु॑णः । मु॒मो॒क्तु॒ ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

११. [ हे वरुण ] [ अहं ] ब्रह्मणा ( =स्तोत्रेण ) त्वां वन्दमानः [ ए ]तद् यामि ( =याचे ), यजमानो[ ऽपि ] हविर्भिः [ए]तद् आशास्ते ( =[illegible] ) [illegible] [ यद्: हे उरुशंस ( =बहुस्तुत ) वरुण [त्वं] अहेळमानः ( =अक्रुध्यन् ) इह ( =अस्मद्विषये ) बोधि ( =बुध्यस्व=अस्मान् शृणु ) । अस्माकम् आयुः मा प्रमोषीः ( =मा चोरय ) ॥

१२. [ए]तदेव नक्तम् [ अपि च ] [ए]तदेव मह्यं दिवसे [ जना ] आहुः [ अपि च ] हृदयस्य अयं केतः ( =वांच्छा ) [ए]तद् आविचष्टे ( =आह ) [यद्] गृहीतः [ सन् ] शुनःशेपः यं [ वरुणं ] अह्वत् ( =आह्वयत् ) स वरुणो राजा अस्मान्मुमोक्तु ( =मोचयेत् ) ॥

---

लोकांनीं तें घेतलें असें म्हणणें भाग पडेल. आणि आम्हीं राशिचक्राचें ज्योतिष सर्व ग्रीक लोकांकडून घेतलें असें जें कितीएकांचें म्हणणें आहे त्याच्या संबंधानें हें नाव असें सिद्ध करील कीं, जर हिंदूंनीं ग्रीक लोकांपासून' कांहींशा अर्वाचीन काळीं ज्योतिषाचे कांहीं विषय घेतले तर ग्रीक लोकांनींहि त्यापूर्वींच हिंदूंपासून कितीएक ज्योतिषाच्या गोष्टी घेतल्या होत्या.

दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी आहे कीं 'देदीप्यमान चंद्रमा रात्रीं येत असतो', असें म्हटलें आहे त्यापेक्षां ही ऋचा रचिली गेली तेव्हां हिंदुलोक हिंदुस्तानासारिख्या उष्ण प्रदेशांत राहत होते. कारण जर मध्य एशियासारिख्या अति थंड प्रदेशांत राहते तर इंग्लंडादि देशांत असतो तसा चंद्रमा फिकट आणि निस्तेज असता, आणि त्याला 'देदीप्यमान' असें आर्यलोकांनीं म्हटलें नसतें असें आम्हांस वाटतें.

११. मी वंदन करून तुजजवळ स्तोत्रानें हेंच याचितों, यज्ञ करणारा[हि ] हवींच्या योगानें हेंच मागतो, [ कीं ] हे वरुणा, तूं अव्हेर न करितां या इकडेस कृपादृष्टी कर, [ आणि ] हे बहुस्तुता [ वरुणा ], आमचें आयुष्य हरण करूं नको.

11. This is what I with adoration ask of thee through my hymn, [and] this is what the sacrificer seeks by his oblations,—[viz.] Varuna, look down hither without anger and, O thou praised by many, do not deprive us of our life.

१२. मला रात्री हेंच [आणि ] दिवसा[हि] हेंच सांगतात, [आणि] [माझ्या]हृदयांतील ही इच्छा[सुद्धा] हेंच सांगते; [ कीं ] शुनःशेपाला धरिलें तेव्हां त्यानें ज्याला हाक मारिली तो राजा वरुण आम्हांस मुक्त करो.

12. This is what they have told me at night, this in the day time, this is what the desire of [my] heart perceives.—[viz.] may that king Varuna, whom S'unas's'epa invoked [when] seized, liberate us.

११. भावार्थ असा आहे कीं, 'मी हा नमस्कार करून आणि हें स्तोत्र गाऊन जें मागतों आहें आणि यज्ञ करणारा जें मागतो तें हें कीं, हे अनेकांनीं स्तविलेल्या वरुणा, तूं इकडे कृपावलोकन कर आणि आमचा (म्हणजे माझा) जीव घेऊं नको.'

'स्तोत्रानें'='ब्रह्मणा.' हा 'ब्रह्म' शब्द मोठ्या योग्यतेचा आहे. ब्रह्मशब्दाचा जो अगदीं मूळचा अर्थ आहे तो या ठिकाणीं आला आहे. तो हा कीं, 'स्तोत्र', 'प्रार्थना,' 'स्तुति'. आणि ती जो करी त्याचें नांव 'ब्राह्मण', मग तो कोणी असो. 'ब्राह्मण' याचा अर्थ अमुक एक जातीचा मनुष्य असा आरंभीं होत नव्हता.

हा मंत्र • संकटाच्या वेळीं म्हटला होता असें म्हणण्यापेक्षां सामान्य एका या यज्ञाच्या प्रसंगीं म्हटला असावा असें चांगलें संभवतें. कारण मंत्र बोलणारा आपण आणि यज्ञ करणारा (यजमान) यांजमध्यें विरोध दर्शवून आपण वंदन करून प्रार्थना करीत आहे आणि यजमान हवींच्या आहुती देत आहे असें दाखवून दोघांचेंहि मागणें एकच आहे कीं, वरुणानें कृपावलोकन करून दोघांच्याहि आयुष्याचें रक्षण करावें, असें म्हणतो आहे असें दिसतें.

आयुष्य रक्षणें अथवा लयास नेणें हें हल्लीं आपण यमाच्या स्वाधीन आहे असें समजतों, पण तें काम प्राचीन काळीं वरुणाकडेस होतें असें या मंत्रावरून दिसून येईल.

'बहुस्तुत' म्हणजे पुष्कळ लोक ज्याची स्तुती करीत असतात तो. हें विशे-

शुनःशेपो ह्यह्वद्गृभीतस्त्रिष्वादित्यं द्रुपदेषु बद्धः ।
अवैनं राजा वरुणः ससृज्याद्विद्वाँ अदब्धो वि मुमोक्तु पाशान्
॥ १३ ॥

शुनःशेपः । हि । अह्वत् । गृभीतः । त्रिषु । आदित्यम् । द्रुऽपदेषु । बद्धः ।
अव । एनम् । राजा । वरुणः । ससृज्यात् । विद्वान् । अदब्धः । वि ।
मुमोक्तु । पाशान् ॥ १३ ॥

## भाषायाम्.

१३. शुनःशेपो हि गृहीतः [ सन् ] त्रिषु द्रुपदेषु ( =त्रिषु यूपपदेषु ) बद्धश् [ च सन् ] आदित्यं ( =अदितेः पुत्रं ) [ वरुणम् ] [एवं] अह्वत् ( =आह्वयत् ) [ यथा ] विद्वान् अदब्धः ( =केनापि अप्रतारितः ] राजा वरुण एनं [शुनःशेपं] अवसृजेत् पाशांश्[च] विमोचयेत् ]॥

षण इंद्रास आणि इतर कितीएक देवांस लाविलेलें वेदांत आढळतें.

१२. मंत्रवक्त्याचा भावार्थ असा आहे कीं, 'मला रात्रंदिवस लोक असें सांगत आले आहेत आणि माझी मनोदेवताहि असें सांगते कीं, शुनःशेपानें ज्या वरुणाचा धांवा केला त्याचा धांवा जर आम्हीं केला तर शुनःशेपाची केली तशी आमचीहि तो मुक्ती करील.'

'शुनःशेपाला धरिलें तेव्हां त्यानें ज्याला हाक मारिली तो राजा वरुण आम्हास मुक्त करो', यावरून हा मंत्र शुनःशेपानें केलेला अथवा म्हटलेला नसावा आणि जर म्हटलाच असेल तर त्याला यूपाला बांधिला आणि मारावयास काढिला तेव्हां तरी निदान म्हटलेला नसेल, पुढें एकाद्या प्रसंगीं म्हटला असेल. सायणाचार्य तर ऐतरेय ब्राह्मणांतील कथेस अनुलक्षून हा मंत्र शुनःशेपानें यूपबंधाच्या संकटाच्या वेळींचें म्हटला असें म्हणतात आणि त्याप्रमाणें अर्थ करून 'आम्हांस मुक्त करो' म्हणजे मला शुनःशेपाला मुक्त करो असाच अर्थ करितात. परंतु अर्थ तसा करण्यास ऐतरेय ब्राह्मणांतील वगैरे शुनःशेपाच्या कथेखेरीज दुसरा आधार कांहीं नाहीं. आणि या सूक्तावरून ही कथा उत्पन्न झाली असेल असें म्हणण्यास बरींच कारणें व इतर सूक्तांचीं उदाहरणें आहेत.

१३. कारण कीं जेव्हां शुनःशेपाला धरून तीन खांबांजवळ बांधिला, तेव्हां त्याणें [ या ] आदित्याचा धांवा केला, [ कीं ] 'राजा वरुण, जो [सर्व] जाणतो [ आणि ] ज्याला कोणीहि ठकवूं शकत नाहीं, तो या [ जना]ला सोडवो [ आणि ] पाश सोडून टाको'.

13. For S'unas's'epa [when] seized [and] tied at the three posts invoked [this] Âditya, [that] king Varuna, who knows [all] [and] whom none can deceive, might liberate him, [and] loosen his bonds.

---

१३. मंत्रवक्त्याचा भावार्थः—'जेव्हां शुनःशेपाला धरून खांबास बांधिलें तेव्हां त्या शुनःशेपानें वरुणाचा असा धांवा केला: 'हे राजा वरुणा, तूं सर्व जाणतोस, आणि तुला कोणीहि ठकवूं शकत नाहीं. तूं मला सोडीव आणि तूं माझे पाश सोडून टाक'. असा हा वरुणाचा प्रताप आहे. यास्तव तो आम्हांसहि तारो.' आमच्या मतें हा मंत्र शुनःशेपास धरून यूपाला बांधिला तेव्हां म्हटलेला नव्हे, तर दुसऱ्या प्रसंगीं शुनःशेपानें अथवा दुसऱ्याच कोणी मनुष्यानें म्हटलेला आहे, आणि शुनःशेपास वरुणानें कसा रक्षिला त्याचा दाखला या मंत्रांत दिला आहे.

'तीन खांबांजवळ'—'त्रिषु द्रुपदेषु.' हे तीन खांब कोणते? 'द्रुपद्' या पदाची व्युत्पत्ती सायणाचार्य 'द्रोः'—काष्ठाचें, 'पदम्'-स्थल, अशी करितात. परंतु तीन कोणतीं स्थलें तें ते सांगत नाहींत. कसेंहि असो द्रुपद म्हणून जें देशाचें नांव आहे, आणि ज्यावरून द्रौपदी हें पांडवांच्या बायकोचें नांव पडलें तें याच शब्दावरून झालें आहे. पण त्याचा संबंध या स्थलाशीं काय आहे तें समजत नाहीं.—'[या] आदित्याचा' म्हणजे वरुणाचा. वरुण हा एक आदित्यांपैकीं आदित्य आहे. याविषयीं पूर्वीं १४ व्या सूक्तांतील ३ या मंत्रावर पृष्ठ १०२ येथें उजवीकडे 'आदित्य' शब्दावरची टीप पाहा. तेथें सांगितलेंच आहे कीं, "केव्हां केव्हां एकट्या वरुणासच आदित्य असें म्हटलें आहे.'

***अव॑ ते॒ हेळो॑ वरुण॒ नमो॑भि॒रव॑ य॒ज्ञेभि॑रीमहे ह॒विर्भिः॑ ।**

**क्षय॑न्न॒स्मभ्य॑मसुर प्रचेता॒ राज॒न्नेनां॑सि शिश्रथः कृ॒तानि॑ ॥ १४ ॥**

अव॑ । ते॒ । हेळः॑ । व॒रु॒ण॒ । नमः॑ऽभिः । अव॑ । य॒ज्ञेभिः॑ । ई॒म॒हे॒ । ह॒विःऽभिः॑ ।
क्षय॑न् । अ॒स्मभ्य॑म् । अ॒सु॒र॒ । प्र॒चे॒त॒ इति॑ प्रऽचेतः । राज॑न् । एनां॑सि ।
शि॒श्र॒थः॒ । कृ॒तानि॑ ॥ १४ ॥

---

## भाषायाम्.

१४. हे वरुण, [वयं] तव हेळः ( =क्रोधं ) नमोभिः ( =नमस्कारैः ) अवेमहे ( =अपगच्छत्विति याचामहे ) । [ तथा] यज्ञैः अवेमहे हविर्भिश्[च] अवेमहे । हे असुर ( =देव ), हे प्रचेतः, हे राजन्, [त्वं] क्षयन् ( =प्रभवन् सन् ) [ अस्माभिः] कृतानि एनांसि (=पापानि) अस्मभ्यं शिश्रथः (=शिथिलीकुरु=मोचय) ॥

---

* हा मंत्र उपाकर्मात स्नानविधींत गृहीत आहे. परंतु याचा संबंध त्याशीं किती आहे त्याचा विचार केला तर या स्मार्तविनियोगाविषयीं फार सांगावयास नको असें दिसून येईल.

१४. हे वरुणा, तुझी अवकृपा न व्हावी म्हणून आम्ही नमस्कारांनीं प्रार्थितों, यजनेंकरून प्रार्थितों, [ आणि ] हवींच्या योगानें प्रार्थितों. हे देवा, हे बुद्धिमंता राजा [ वरुणा ], [ आम्हीं ] केलेल्या पापांची [आम्हांपासून] सुटका करून त्यांची आम्हांला क्षमा कर.

14. We propitiate thy anger, Varuna, by adorations, propitiate by sacrifices, [and] by oblations. Forgive us, O God, O wise king, the sins committed [by us] and slacken their bonds.

---

१४. ह्या मंत्राचें तात्पर्य असें आहे कीं, 'हे वरुणा, तुझा क्रोध आम्हांवर न व्हावा म्हणून आम्ही तुला नमस्कार करितों, तुजप्रीत्यर्थ यज्ञ करितों, आणि तुला हवि देतों; तर हे बुद्धिमंता राजा वरुणा, आम्हीं केलेलीं पातकें आम्हांस माफ कर आणि त्या पातकांचे जे पाश आम्हांस बाधीत आहेत ते, तूं शुनःशेपाचे पाश सोडविलेस तसे, सोडून सैल कर.' आमच्या मतें हाहि मंत्र शुनःशेपास यूपाला बांधिलों त्या संकटाच्या वेळीं शुनःशेपानें म्हटलेला नव्हे, तर दुसऱ्यानेंच अन्य प्रसंगीं म्हटला असेल. आणि यांत शुनःशेपाचा दाखला यावा असें मंत्रवक्त्याच्या मनांत विवक्षित असेल असें दिसतें.

यांत एक शब्द मोठा चमत्कारिक आहे. तो 'असुर' हा होय. यांचेंच आम्हीं 'देवा' असें भाषांतर केलें आहे. साधारण संस्कृतांत 'असुर' शब्दाचा अर्थ देव असा होत नाहीं, तर देवांचे जे शत्रु दैत्य ते असा होतो. विद्वज्जनांस ठाऊक आहे कीं, पारसिकांच्या धर्मांत हिंदूंच्या देवांस देव असें म्हणतात; परंतु त्यांच्या भाषेंत देव शब्दाचा अर्थ भूत, दैत्य असा होतो. आणि ते आपल्या स्वताहाच्या देवांस असुर (अहुर) असें म्हणतात. यावरून आम्ही वेदाआलीकडील संस्कृतांत आमचे देव खेरिज करून जे इतर देव त्यांस असुर असें म्हणतों आणि आमच्या देवांस ते देव ( =दैत्य ) म्हणतात असें झालें. दुसरी 'असुर' शब्दाविषयीं अशी चमत्कारिक गोष्ट लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे कीं, ऋग्वेदांत आणि इतर वेदांत 'सुर' शब्द मुळींच येत नाहीं. तो मागाहून 'असुर' शब्दापासून उत्पन्न झाला असें म्हटलें पाहिजे. तो येणेंप्रमाणें:—प्रथम 'असुर' असें सर्व देवांस आपण म्हणत होतों. नंतर तो शब्द दुसऱ्या लोकांच्या ( पारसिकादिकांच्या ) देवांस अथवा वाईट देवांस म्हणजे दैत्यादिकांस तुच्छनार्थी लावूं लागलों, आणि त्याहून जे भिन्न म्हणजे आमचे (चांगले) देव त्यांस नांव पाहिजे तें 'असुर' यापासूनच आम्हीं काढिलें. असुर याची खरी व्युत्पत्ती अस् धातूपासून असलेली क्षणभर विसरून 'असुर' शब्दांत जो 'अ' आहे तो 'न' या अर्थी आहे असें गैर समजून 'सुर' शब्द निर्माण केला आणि 'असुर' म्हणजे वाईट देव नव्हेत ते

**उदुत्तमं वरुण पाशमस्मदवाधमं वि मध्यमं श्रथाय ।**
**अथा वयमादित्य व्रते तवानागसो अदितये स्याम ॥ १५ ॥ १५ ॥**

उत् । उत्ऽतमम् । वरुण । पाशम् । अस्मत् । अव । अधमम् । वि । मध्यमम् । श्रथय ।
अथ । वयम् । आदित्य । व्रते । तव । अनागसः । अदितये । स्याम ॥ १५ ॥ १५ ॥

## भाषायाम्.

१५. हे वरुण, उत्तमम् (=उपरि वर्तमानं) पाशम् अस्मद् उच्छ्रथय । अधमम् (=अधो वर्तमानं) पाशम् अवश्रथय । मध्यमं (=मध्ये वर्तमानं) पाशं विश्रथय । अथ (=तदनन्तरं) हे आदित्य [वरुण], वयम् अनागसः (=निष्पापाः सन्तः) तव व्रते (=शासने) अदितये (=अखण्डितत्वाय=उन्नतये) स्याम ॥

'सुर' असें समजून 'सुर' हें नांव आम्हीं आपल्या देवांस लाविलें. याप्रमाणेंच दुसरीं उदाहरणें:—'अदिति' शब्दावरून 'दिति' आणि तिचे पुत्र 'दैत्य' हे आपण निर्माण केले; तसाच 'विधवा' शब्दापासून (हा शब्द वि-धवा असा झाला आहे असें गैर समजून) 'धव' म्हणजे नवरा आम्हीं निर्माण केला आहे, आणि त्यानंतर मा-धव, रमा-धव, उमा-धव हे प्रचारांत आले. आणि तिसरें उदाहरण हें कीं, 'नादार' नव्हे तो 'दार' म्हणजे पैसा भरण्यास समर्थ असा शब्द नुकाच उत्पन्न होऊन आमच्या कोर्टांत प्रचारांत येत चालला आहे.

वेदांत वरुणास राजा कां म्हणतात त्याचें कारण या मंत्रावरून समजून येईल. कारण जसा प्रजांनीं केलेला अपराध राजा माफ करितो तशीं मनुष्यांनीं केलेलीं पातकें [illegible] क्षमा करण्याविषयीं या ऋचेंत त्याची प्रार्थना केली आहे.

'पापांची [आम्हांपासून] सुटका करून त्यांची आम्हांला क्षमा कर'= 'क्षयन् अस्मभ्यं...एनांसि शिश्रथः'. शब्दशः अर्थ 'आम्हांस माफ करून पापांची [आम्हांपासून] सुटका कर.' 'पापांची सुटका कर' यांत पापरूपी पाश जे आम्हांस बांधीत आहेत ते आमचे अंगापासून सोडीव असें विवक्षित आहे. 'क्षयन्' याचा अक्षरशः अर्थ, '[पातकांवर तूं आपला] हुकूम करणार असा होतसाता'.

१५. हे वरुणा, आम्हांपासून वरचा पाश वर [सैल कर], खालचा खालीं [ सैल कर ], [ आणि ] मधला [ मधें ] सैल कर, कीं जेणेंकरून हे आदित्या, आम्ही निष्पाप होऊन तुझ्या सेवेंत राहूं आणि उन्नतीप्रत पावूं.

15. Loosen up, Varuṇa, the upper bond from us, loosen down the lower bond, and loosen the middle bond, that we may then, Âditya, be free from sin and be in thy ordinance and prosper.

१५. बोलणाऱ्याचा अभिप्राय असा आहे कीं, आपणास तीन बंधांनीं बांधिलें आहे. त्यांतून वरचा बंध, हे वरुणा, वर सोडून टाक, मधला मधें आणि खालचा खालीं सोडून टाक. म्हणजे मग आम्ही निष्पाप होऊन तुझ्या हुकुमांत, म्हणजे पाप न करावें, चांगलें करून देवयजन करावें इत्यादि आज्ञेंत, राहूं आणि भरभराटीस पावूं.

'आदित्य' म्हणजे येथें वरुणच समजावयाचा. वर १३व्या मंत्रावरील टीप पाहा.

'तुझ्या सेवेंत राहूं'='तव व्रते स्याम.' व्रत म्हणजे आज्ञा, हुकूम, घालून दिलेला नियम, कीं मनुष्यांनीं नित्य वरुणाची सेवा करावी हें एक 'व्रत', पातक करूं नये हें एक 'व्रत'. सूर्यचंद्रांनीं नियमित काळीं आकाशांत गमन करावें हें एक वरुणाचें 'व्रत'. पाऊस जमिनीवर पडावा व समृद्धि व्हावी हें इंद्राचें 'व्रत'. हा जो व्रत शब्दाचा अर्थ आहे त्यापासून त्या शब्दाचा आलीकडे प्रचारांत असलेला अर्थ वेगळा आहे हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. 'सत्यनारायणाचें व्रत' या अर्थी 'व्रत' शब्दाचा प्रयोग वैदिक युगांत होत नसे हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. वेदांत जो 'व्रत' शब्दाचा हुकम असा अर्थ होतो म्हणून सांगितलें तें पुढच्या सूक्तांतील पहिल्या मंत्रांत केलेल्या त्याच शब्दाच्या प्रयोगावरून स्पष्ट दिसून येईल.

## सूक्तम् २५.

अजीगर्तपुत्रः शुनःशेप ऋषिः । वरुणो देवता । गायत्री छन्दः ॥

***यच्चिद्धि ते विशो यथा प्र देव वरुण व्रतम् ।**
**मिनीमसि द्यविद्यवि ॥ १ ॥**

यत् । चित् । हि । ते । विशः । यथा । प्र । देव । वरुण । व्रतम् ।
मिनीमसि । द्यविऽद्यवि ॥ १ ॥

**मा नो वधाय हत्नवे जिहीळानस्य रीरधः ।**
**मा हृणानस्य मन्यवे ॥ २ ॥**

मा । नः । वधाय । हत्नवे । जिहीळानस्य । रीरधः ।
मा । हृणानस्य । मन्यवे ॥ २ ॥

### भाषायाम्.

१. हे वरुण देव, यच्चिद्धि (=यद्यपि) [वयम्] [अन्या] विशो यथा (=जना इव) तव व्रतम् (=शासनं) द्यविद्यवि (=दिनेदिने) प्रमिमीमसि (=[illegible]ः),

२. [तथापि] जिहीळानस्य (=क्रुद्धस्य) [तव] हत्नवे (=घातकाय) वधाय (=शस्त्राय) नः (=अस्मान्) मा रीरधः (=देहि) । हृणानस्य (=रुष्टस्य) [तव] मन्यवे (=क्रोधाय) [नो] मा [रीरधः] ॥

* या मंत्रांपासून पुढील दहा ऋचांची योजना सायंसंध्येंत वरुणोपस्थान म्हणून केली आहे.

## सूक्त २५.

ऋषि–पूर्ववत्. वृत्त–गायत्री. देवता–वरुण.

१. हे देवा वरुणा, जरी [इतर] लोकांप्रमाणें [आम्ही] तुझा हुकूम दररोज मोडीत असतों,

२. [तरीहि] रागावून तूं आम्हांस [आपल्या] घातक [आणि] मारक शस्त्राच्या स्वाधीन करूं नकोस; तूं क्रोधायमान होऊन [आम्हांस] [आपल्या] क्रोधाच्या [स्वाधीन करूं] नकोस.

## Hymn 25.

To *Varuṇa*. By *S'unas's'epa* the author of the previous hymn. Metre *Gáyatri*.

1. Though like [other] people, divine Varuṇa, we daily break thy ordinance,

2. [nevertheless] do not deliver us to thy deadly [and] dangerous weapon in wrath, do not [deliver us] to thy rage in anger.

---

१. पूर्वीच्या सूक्तारंभीं जी शुनःशेपाची कथा ऐतरेय ब्राह्मणांतून दिली आहे तींत सांगितल्याप्रमाणें तर हें सूक्तहि यूपास बांधल्या वेळींच शुनःशेपानें म्हटलेलें आहे. पण प्रत्येक मंत्राचा विचार करून पाहूं लागलें तर या मंत्रांत त्या प्रसंगास अनुलक्षून कांहींच भाषण नाहीं. किंबहुना इतर प्रसंगींच हें रचिलें असावें असें दिसून येतें.

वरुण हा मनुष्यांनीं केलेल्या पापाबद्दल शासन करणारा देव आहे असें पूर्वीं सांगितलें आहे तें लक्ष्यांत ठेविलें तर या मंत्राचा अर्थ चांगला समजतो. व त्यांतील हृद्य फार सुंदर आहे असें दिसून येतें. मंत्रकर्ता म्हणतो, 'आम्ही किती झालों तरी मर्त्य आहों, यास्तव प्रत्यहीं कांहींना कांहीं तरी पाप आमच्या हातून होत असतें. यास्तव तूं कृपा करून क्षमा केली पाहिजे.'

२. आमच्या हातून पाप तर होतच असतें, आणि वास्तविक म्हटलें तर आम्ही तुझ्या शासनास पात्र होतोंच. तथापि हे वरुणा, आम्हांला क्षमा कर, आम्हांवर रागावूं नको. आणि आम्हांस आपल्या भयंकर आणि घातक शस्त्रानें मारूं नको, असें मंत्रवक्ता या मंत्रांत म्हणतो. शासन करणारा जो राजा वरुणदेव त्याची ही उत्तम प्रार्थना आहे यांत संशय नाहीं.

'घातकशस्त्राच्या'. 'वध' शब्दाचा अर्थ सायणाचार्य 'मरण' असाच करितात, पण येथें घातक अथवा मारणारें शस्त्र असा अर्थ अधिक सयुक्तिक दिसतो तो आम्हीं केला आहे. त्याला आधार सायणोक्तीच आहे. याविषयीं पूर्वीं सूक्त ५ मंत्र १० यावर दिलेली टीप पृष्ठ ३६ याजवर पाहा. येथें इतकेंच सांगावयाचें कीं, 'वध' म्हणजे केवळ इंद्राचें वज्रच असा अर्थ नाहीं. साधारण घातक शस्त्र असाहि अर्थ होतो.

**वि मृळीकाय ते मनो रथीरश्वं न संदितम् ।**
**गीर्भिर्वरुण सीमहि ॥ ३ ॥**

वि । मृळीकाय । ते । मनः । रथीः । अश्वम् । न । सम्ऽदितम् ।
गीःऽभिः । वरुण । सीमहि ॥ ३ ॥

**परा हि मे विमन्यवः पतन्ति वस्यइष्टये ।**
**वयो न वसतीरुप ॥ ४ ॥**

परा । हि । मे । विऽमन्यवः । पतन्ति । वस्यःऽइष्टये ।
वयः । न । वसतीः । उप ॥ ४ ॥

**कदा क्षत्रश्रियं नरमा वरुणं करामहे ।**
**मृळीकायोरुचक्षसम् ॥ ५ ॥ १६ ॥**

कदा । क्षत्रऽश्रियम् । नरम् । आ । वरुणम् । करामहे ।
मृळीकाय । उरुऽचक्षसम् ॥ ५ ॥ १६ ॥

## भाषायाम्.

३. हे वरुण, [ वयं ] मृळीकाय ( =तव प्रसादाय ) तव मनः, [ कश्चिद् ] रथीः संदितं ( =बद्धम् ) अश्वमिव, गीर्भिः ( =स्तोत्रैः ) विसीमहि ( =विमोचयाम ) ॥

४. मे ( =मम ) विमन्यवो ( =वाञ्छा ) हि, वयः ( =पक्षिणः ) उपवसतीर्न ( =निवासस्थानानि प्रति इव ), वस्यइष्टये ( =वसीयसः उत्तमस्य धनस्य प्राप्तये ) परापतन्ति ( =उत्पतन्ति ) ॥

५. क्षत्रश्रियं ( =बलधारिणं ) नरं ( =शूरम् ) उरुचक्षसं ( =दीर्घदर्शिनं ) वरुणं मृळीकाय ( =अस्मद्विषयप्रसादाय ) कदा आकरामहे ( =आह्वयामहे ) ॥

३. [तुझी] कृपा व्हावी म्हणून आम्ही, हे वरुणा, [एकादा] गाडीवान बांधिलेल्या घोड्यास [मोकळा करितो] तसें [आमच्या] स्तवनांनीं तुझें मन मोकळें करीत आहों.

४. कारण कीं, जसे पक्षी [आपल्या] निवासस्थानांकडेस [धांवतात] तशा माझ्या वासना उत्कृष्ट धनाच्या प्राप्तीकडेस धांवतात.

५. बलधारी [आणि] दूरदर्शी [जो] शूर वरुण [त्याणें आम्हांवर] प्रसन्न व्हावें म्हणून त्याला आम्हीं केव्हां येथें बोलवावें?

3. As a charioteer [unties] [his] horse that is tied, we, Varuṇa, for [thy] favour untie thy mind with [our] prayers.

4. For like birds [that fly towards their] homes my desires fly forth towards the attainment of the highest wealth.

5. When should we call hither the mighty, the brave [and] the far-seeing Varuṇa, that he may be favourable?

---

3. या मंत्राचें तात्पर्य असें आहे कीं, 'जसा एकादा गाडीवान आपल्या रथाच्या अथवा गाडीच्या घोड्यास मोकळा करितो आणि तो घोडा सुख होतो तसें, हे वरुणा, तुझें मन जें आम्हाविषयीं रागानें बांधिल्यासारिखें झालें आहे तें आम्हीं स्तोत्रें म्हणून मोकळें करीत आहों, तर तूं आम्हांवर कृपा कर.'

सायणाचार्य 'विसीमहि' या क्रियापदाचा 'विशेषें करून बांधितों' असा अर्थ करून "हे वरुणा, आमच्या सु-" खासाठीं तुझें मन स्तुतींनीं बांधितों " म्हणजे प्रसन्न करितों. दृष्टांत. जसा " एकादा रथी दुरून आल्यामुळें थक- " लेल्या घोड्यास बांधितो म्हणजे गवत " वगैरे घालून सुख करितो तद्वत्," असा अर्थ करितात. पण 'विसीमहि' क्रियापदाचा अर्थ आम्हीं केल्याप्रमाणें होतो. त्याला प्रयोगान्तरांचे पुष्कळ दाखले आहेत.

या मंत्रांत यूपास बांधिलेल्या शुनःशेपानें म्हणण्याजोगें कांहीं दिसत नाहीं. हें उघड आहे. आणि असेंच पुढच्या मंत्राविषयींहि म्हटलें पाहिजे. तो मंत्र पाहा.

४. या मंत्रांतील जी उपमा आहे ती चमत्कारिक आहे इतकें सांगण्यापलीकडे या मंत्रांत विशेष कांहीं दिसत नाहीं. आलीकडचे कवी अशी उपमा बहुत करून देणार नाहींत. पण या उपमेंत एक प्रकारची मोठीच स्थलयोग्यता आहे असें आम्हास वाटतें.

५. 'त्याला आम्हीं केव्हां बोलवावें?' ='कदा आकरामहे.' म्हणजे आम्हीं त्याला येथें केव्हां बोलाविलें असतां

तदित्समानमाशाते वेनन्ता न प्र युच्छतः ।
धृतव्रताय दाशुषे ॥ ६ ॥

तत् । इत् । समानम् । आशाते इति । वेनन्ता । न । प्र । युच्छतः ।
धृतऽव्रताय । दाशुषे ॥ ६ ॥

वेदा यो वीनां पदमन्तरिक्षेण पतताम् ।
वेद नावः समुद्रियः ॥ ७ ॥

वेद । यः । वीनाम् । पदम् । अन्तरिक्षेण । पतताम् ।
वेद । नावः । समुद्रियः ॥ ७ ॥

---

**भाषायाम्. ।**

६. वेनन्तौ (=कामयमानौ) [मित्रावरुणौ] धृतव्रताय दाशुषे (=अनुष्ठितशासनाय हविर्दत्तवते यजमानाय) तदेव समानम् (=एकमेव साधारणं) [हविः] आशाते (=प्राप्नुतः) । [तौ] न प्रयुच्छतः (=अनवहितौ न भवतः) ॥

७. यो [वरुणः] अन्तरिक्षेण पतताम् (=उत्पतताम्) वीनां (=पक्षिणां) पदं (=पदवीं) वेद (=जानाति) । [यः] समुद्रियो नावः (=समुद्रगाः समुद्रे गच्छन्त्या नौकायाः) [पदं] वेद (=जानाति);

---

तो प्रसन्न होईल असा प्रश्न पुसण्याचा भावार्थ दिसतो.—'दूरदर्शी'='उरुचक्षसम्.' वरुण देव असा आहे कीं, तो मनुष्यांनीं चोरून केलेलेंहि पातक दुरून पाहतो. खालीं अकरावा मंत्र पाहा. मनुष्याचा खरेखोटेपणा तो पाहात असतो असें ऋ. ७.४९. ३ यांत (यासां राजा वरुणो याति मध्ये सत्यानृते अवपश्यन् जानानाम्) सांगितलें आहे.

६. [ मित्रावरुणांची ] आज्ञा पाळणारा जो हविर्दाता उपासक त्याच्या प्रीत्यर्थ [मित्रावरुण हे] उभयतांहि प्रसन्न होऊन एकच [हवि] ग्रहण करितात, [ आणि ] अव्हेर करीत नाहींत;

६. They (Mitrâ-Varunau) both lovingly receive one and the same [offering] out of consideration for the sacrificer who observes the sacred law, [and] are not indifferent [to him].

७. ज्या [ वरुणा]ला अंतरिक्षांतून उडत असणाऱ्या पक्ष्यांचा मार्ग ठाऊक असतो, [आणि] ज्या [ वरुणा]ला समुद्रावरच्या तारवाचा [मार्ग] ठाऊक असतो,

7. [He] who knows the way of the birds that fly in the firmament, [and] knows [the way] of the ship that is on the sea;

---

६. या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'मित्रावरुणांचे नियम उपासक पाळितो यासाठीं त्याणें मित्र आणि वरुण यांस वेगळें वेगळें हविर्दान न केलें तरी त्यावर कृपा करून एकच हवि दोघे मिळून स्वीकारून घेतात. दोघांस मिळून एकच हवि दिलें म्हणून त्यां उपासकाचा ते अव्हेर करीत नाहींत.'

'आज्ञा पाळणारा जो हविर्दाता'= 'धृतव्रतः.' धृतव्रत या शब्दाचा अर्थ वेदांत फारकरून 'ज्याची आज्ञा अथवा हुकूम किंवा कायदा लोक मानितात तो' ( वरुण, इंद्र इत्यादि कोणी तरी देव ) असा होतो. परंतु त्या शब्दाचा अर्थ केव्हां केव्हां 'जो आज्ञा अथवा हुकूम मानितो तो' ( उपासक ) असाहि होतो, त्याचें हें या मंत्रात उदाहरण आहे.

७. हा मंत्र फार चमत्कारिक आणि ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. भावार्थ असा आहे कीं,'आकाशांत पक्ष्यांनीं कोणत्या रस्त्यानें जावें आणि समुद्रावर तारवांनीं कोणत्या रस्त्यानें जावें हें वरुणास समजतें;' इतरांस आकाशांतील पक्ष्यांचा आणि समुद्रावर तारवांचा मार्ग समजत नाहीं, पण वरुणास समजतो. म्हणजे वरुणास समजतें कीं, अमुक ठिकाणीं पक्ष्यांचा आणि अमुक ठिकाणीं जहाजाचा मार्ग आहे. अमुक रस्त्यानें पक्ष्यानें आकाशांत आणि जहाजानें समुद्रावर चालावें म्हणजे त्यांस संकट येणार नाहीं, अशी प्रेरणा तो करितो.

'समुद्रावरच्या तारवाचा'='नावः समुद्रियः'. यांत 'नावः' आणि 'समुद्रियः' हे दोन्ही शब्द षष्ठीच्या अनेकवचनीं आहेत असें आम्ही समजतों. सायणाचार्य नावः इतकीच षष्ठी समजून 'समुद्रियः'हें वरुणवाची जो 'यः' शब्द त्याचें विशेषण करितात, आणि 'जले गच्छन्त्याः' (=पाण्यावरून जाणाऱ्या ) इतकें अध्याहृत घेतात वस्तुतः 'समुद्रियः' ही 'समुद्री' या स्त्रीलिंगी विशेषणाची षष्ठी आहे.

वेद॒ मासो॑ धृ॒तव्र॑तो॒ द्वाद॑श प्र॒जाव॑तः ।
वेदा॒ य उ॑प॒जाय॑ते ॥ ८ ॥

वेद॑ । मा॒सः । धृ॒तऽव्र॑तः । द्वाद॑श । प्र॒जाऽव॑तः ।
वेद॑ । यः । उ॒प॒ऽजाय॑ते ॥ ८ ॥

वेद॒ वात॑स्य व॒र्तनि॑मु॒रोर्ऋ॒ष्वस्य॑ बृह॒तः ।
वेदा॒ ये अ॒ध्यास॑ते ॥ ९ ॥

वेद॑ । वात॑स्य । व॒र्तनि॑म् । उ॒रोः । ऋ॒ष्वस्य॑ । बृ॒ह॒तः ।
वेद॑ । ये । अ॒धि॒ऽआस॑ते ॥ ९ ॥

## भाषायाम्.

८. [ यो ] धृतव्रतः ( =स्थापितशासनो ) [ वरुणः ] प्रजावतः ( =तेषु तेषु जातप्राणियुक्तान् ) द्वादश मासान् वेद, यश्[च मासः] उपजायते ( =अधिकत्वेन उत्पद्यते ) [ तं यो ] वेद ( =जानाति );

९. [ यो वरुणः ] उरोः ( =विस्तीर्णस्य ) ऋष्वस्य ( =उन्नतस्य ) बृहतः ( =महतः ) वातस्य वर्तनिं ( =मार्गं ) वेद ( =जानाति ) । [ तं वर्तनिं ] ये [ मरुतः ? ] अध्यासते [ तान् यो ] वेद ( =जानाति );

या मंत्रांत समुद्रावरील तारवाचा मार्ग वरुण जाणतो असें जें सांगितलें आहे त्यांत वरुणाविषयीं पुराणादिक ग्रंथांत वरुण हा समुद्रदेवता आहे आणि तो समुद्रांत राहतो, तो तारवें बुडवितो अथवा बचावितो वगैरे याविषयीं ज्या कथा आल्या आहेत त्यांचें बीज आहे हें ध्यानांत ठेवावें.

'ज्या वरुणास' ठाऊक आहे असें या मंत्रांत सांगितलें त्याचा संबंध खालीं १२ व्या ऋचेंत स्पष्ट झाला आहे.

८. [जो] धृतव्रत वरुण बारा महिने आणि त्यांत उत्पन्न होणारे प्राणी जाणतो [आणि], जो [वरुण] [त्या बारा महिन्यां]-जवळ उत्पन्न होणाऱ्या [अधिक महिन्या]ला जाणतो;

8. [he who] knows the twelve months with the life born in them, [and] who knows [the intercalary month] that arises by the side of [the twelve];

९. [जो वरुण] विस्तीर्ण, उंच, [आणि] मोठ्या वायूचा मार्ग जाणतो, [आणि] जो [त्या मार्गा]वर बसणारे जे [मरुत्] त्यांस जाणतो;

9. [he who] knows the road of the broad, high [and] vast wind, [and] knows [those Maruts] who ride on [it];

---

८. मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'वरुण जसा पक्ष्यांचे मार्ग आणि तारवांचे मार्ग जाणतो, तसाच बारा महिने कसे होतात आणि बारा महिन्यांच्या जवळ तेरावा अधिक मास कसा येतो तेंहि जाणतो'.

हाहि मंत्र फारच मौल्यवान आणि ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. कारण कीं, सर्व पृथ्वीवर सुधारणुकेविषयीं नामांकित असे जे रोमन लोक, त्यांजमध्यें ख्रिस्ती शकाच्या पूर्वी साडेचार शतकें पर्यंत वर्षाचे महिने दहाच होते, आणि अधिक मास घालून चांद्रमानाचा आणि सौर मानाचा मेळ घालावा हें ज्ञान युरोपीयन लोकांमध्यें ख्रिस्ती शकाच्या पूर्वी पांच शतकें पर्यंत नव्हतें. परंतु हा मंत्र जेव्हां रचिला तेव्हां आम्हांमध्यें वर्षाचे महिने बारा मानीत इतकेंच नव्हे, पण अधिक मास घालून कालव्यवस्था करण्याची युक्ति या मंत्राच्या रचनेपूर्वी पुष्कळच दिवस ठाऊक होती असें समजलें पाहिजे. कारण तेरावा महिना घालण्याची युक्ति स्थापित होऊन जर पुष्कळ वर्षे झालीं नसतीं तर त्यांत कांहीं तरी विशेष चमत्कार आहे, व तें दैविक कृत्य आहे, आणि तें वरुण जाणतो असा आश्चर्यप्रदर्शक आणि वरुणमहत्त्वप्रदर्शक उद्गार या मंत्राच्या कर्त्यानें काढिला नसता. यावरून आमच्या आर्य लोकांचें ज्ञान किती पुरातन आहे तें दिसून येतें. या मंत्रांत 'अधिक मास' असे शब्द जरी नाहींत तरी त्याच्या उत्पत्तीविषयीं जे शब्द आहेत त्यावरून अधिक मासच विवक्षित आहे असें दिसतें. शिवाय सायणाचार्यहि तोच अर्थ समजतात आणि इतर (पाश्चिमात्य) विद्वानहि तोच समजतात असें दिसतें. तेव्हां अधिक मासाविषयींच उल्लेख आहे यांत संशय दिसत नाहीं.

'धृतव्रत' म्हणजे ज्याचे नियम लोक पाळीत असतात तो.

९. या मंत्रांत वरुण वातप्रदेश म्हणजे वायु कोणत्या मार्गानें कसें गमन करितो तें जाणतो असें सांगण्याचा

**नि षसाद धृतव्रतो वरुणः पस्त्याःस्वा ।**

**साम्राज्याय सुक्रतुः ॥ १० ॥ १७ ॥**

नि । ससाद । धृतऽव्रतः । वरुणः । पस्त्यासु । आ ।

साम्ऽराज्याय । सुऽक्रतुः ॥ १० ॥ १७ ॥

**अतो विश्वान्यद्भुता चिकित्वाँ अभि पश्यति ।**

**कृतानि या च कर्त्वा ॥ ११ ॥**

अतः । विश्वानि । अद्भुता । चिकित्वान् । अभि । पश्यति ।

कृतानि । या । च । कर्त्वा ॥ ११ ॥

---

## भाषायाम्. (

१०. [ यो ] धृतव्रतः ( =स्थापितशासनः ) सुक्रतुः ( =सुप्रज्ञो ) वरुणः साम्राज्याय ( =साम्राज्यं कर्तुं ) पस्त्यासु आ ( =स्वगृहे ) निषसाद ( =निषीदति );

११. [ यश्च वरुणः ] चिकित्वान् ( =विद्वान् ) [ सन् ] अद्भुतानि ( =परोक्षाणि ) विश्वानि ( =सर्वाणि ) [ यानि ] कृतानि . [ कर्माणि ] यानि च कृत्वानि ( =कर्तव्यानि ) [ कर्माणि ] [ तानि ] अतः ( =पस्त्याभ्यः=स्वगृहात् ) अभिपश्यति;

---

अभिप्राय आहे.

परंतु 'वर बसणारे जे' ते कोण हें मंत्रातील शब्दावरून समजत नाहीं. सायणाचार्य 'वर बसणारे' म्हणजे मांगीवर बसणारे असा अर्थ न करिता 'वर ( म्हणजे आकाशात? ) बसणारे' इतकाच अर्थ करून देव असें म्हणतात. पण कोणते देव तेंहि सांगत नाहींत. सामान्य देव असा त्यांचा भावार्थ दिसतो.

१०. [ जो ] बुद्धिमान् वरुण आपले अधिकार [ सर्वत्र ] बसवून सर्वांवर राज्य करण्यासाठीं [ आपल्या ] घरीं बसला आहे;

११. [ आणि जो वरुण ] त्याला नकळत केलेलीं आणि करावयाचीं जीं तीं सर्व कर्में तेथून जाणतो आणि पाहतो;

10. the wise Varuna [who] having established his laws has sat down in [his] home to rule [his] empire;

11. [who] from thence knows and observes all deeds that are done, and that are intended to be done, in his absence;

---

१०. या मंत्रात वरुणाचें सार्वभौमत्व वर्णिलें आहे. त्याणें आपले कायदे जिकडे तिकडे बसवून, म्हणजे अमुक रस्त्यानें पक्ष्यांनीं उडावें, अमुक मार्गानें समुद्रावर तारवांनीं जावें, वायूनें अमुक रस्त्यानें अमुक वेळीं वाहावें, अमुक महिन्यांत अमुकें व्हावें इत्यादि नियम स्थापित करून आपल्या घरीं खुशाल बसला आहे, आणि तेथून सर्व भुवनांचा सार्वभौम राजा होत्साता राज्य करीत आहे.

हें वरुणाचें महत्त्व ध्यानांत ठेवावें. कारण कीं, तें मागाहून आर्यलोक विसरले, आणि तें मोठेपण त्यांनीं दुसऱ्या देवास अथवा देवांस देऊन वरुणास समुद्राचेंच आधिपत्य देऊन निमूट बसविलें, हें आतां आपणास ठाऊक आहेच.

११. या मंत्रांतहि वरुणाचा महिमा वर्णिला आहे. वरच्या मंत्रांत वरुण आपल्या घरीं बसला आहे असें सांगितलें. या मंत्रात तो त्या घरांतून काय करितो तें सांगितलें आहे. तें हें कीं, तो आपल्या घरच्या घरींच बसून मनुष्यें त्याला नकळत म्हणून जीं कर्में करितात तीं पाहतो, आणि जीं वाईट बरीं कर्में करावयाचीं म्हणून मनुष्यें आपल्या मनांत आणितात तीं तो जाणतो.

ही वरुणाची शक्ति मागाहून वरुणाकडून गेली असें दिसतें. कारण कीं असें वर्णन पुराणादिक ग्रंथांत बहुतकरून यम आणि यमाचे जे चित्रगुप्तादि दिवाण त्यांजविषयीं येत असतें.

'त्याला नकळत केलेलीं'='अद्भुता.' 'अद्भुत' म्हणजे 'परोक्ष आहे तें', 'आपल्या समक्ष नव्हे तें', 'अदृश्य'. अर्थात् 'वरुणानें पाहूं अथवा जाणूं नये अशा समजुतीनें केलेलीं असा पर्यवसानीं अर्थ समजावयाचा. अद्भुत म्हणजे अदृश्य याविषयीं "अतस्त्वं दृश्याँ अग्न एतान्पड्भिः पश्येरद्भुताँ अर्य एवैः" ( ऋ. ४. २. १२ ) हें स्थळ आणि ऋ. १. १७०.१ हेंहि पाहा.

**स नो॑ वि॒श्वाहा॑ सु॒क्रतु॑रादि॒त्यः सु॒पथा॑ करत् ।**
**प्र ण॒ आयूं॑षि तारिषत् ॥ १२ ॥**

सः । नः॒ । वि॒श्वाहा॑ । सु॒ऽक्रतुः॑ । आ॒दि॒त्यः । सु॒ऽपथा॑ । क॒र॒त् ।
प्र । नः॒ । आयूं॑षि । ता॒रि॒ष॒त् ॥ १२ ॥

**बिभ्र॑द्द्रा॒पिं हि॑र॒ण्ययं॒ वरु॑णो वस्त नि॒र्णिज॑म् ।**
**परि॑ स्पशो॒ नि षे॑दिरे ॥ १३ ॥**

बिभ्र॑त् । द्रा॒पिम् । हि॒र॒ण्यय॑म् । वरु॑णः । व॒स्त॒ । निः॒ऽनिज॑म् ।
परि॑ । स्पशः॑ । नि । से॒दि॒रे॒ ॥ १३ ॥

**न यं दिप्स॑न्ति दि॒प्सवो॒ न द्रुह्वा॑णो॒ जना॑नाम् ।**
**न दे॒वम॒भिमा॑तयः ॥ १४ ॥**

न । यम् । दिप्स॑न्ति । दि॒प्सवः॑ । न । द्रुह्वा॑णः । जना॑नाम् ।
न । दे॒वम् । अ॒भिऽमा॑तयः ॥ १४ ॥

---

## भाषायाम्.

१२. स सुक्रतुः (=सुप्रज्ञः) आदित्य! (=अदितेः पुत्रो) [वरुणो] विश्वाहा (=नित्यम्) अस्मभ्यं सुपथानि (=सुगमानि) करोतु । अस्माकम् आयूंषि प्रतारिषत् (=प्रतारयतु=दीर्घीकरोतु) ॥

१३. हिरण्यमयं द्रापिं (=कवचं) बिभ्रद् धारयन् वरुणो [हिरण्मयं] निर्णिजम् (=अलंकारं) वस्त (=परिधत्ते) । [तस्य] स्पशः (=प्रेष्याः) परिनिषेदिरे (=आसमन्तान्निषीदन्ति) ॥

१४. यं [वरुणं] दिप्सवो (=हिंसितुमिच्छन्तो वैरिणो) न दिप्सन्ति (=हिंसितुं नेच्छन्ति) । जनानां (=मनुष्याणां) द्रुह्वाणो (=द्रोहिणो) [यं] न [दिप्सन्ति] । [यं] देवं [वरुणम्] अभिमातयः (=साहसकारिणो) न [दिप्सन्ति] ॥

१२. तो बुद्धिमान् आदित्य ( वरुण ) सदैव आम्हांस सर्व सुगम करो, [तो] आमचीं आयुष्यें वाढवो;

12. may that Âditya (Varuṇa) make [all] things easily accessible to us; may he prolong our lives.

१३. वरुण सोन्याचें कवच धारण करून [सोन्याचे] अलंकार घालीत असतो. [त्याचे] जासूद त्याच्या सभोंवतालीं बसतात;

13. Varuṇa puts on a golden mail and wears golden [ornaments.] [His] messengers sit round him.

१४. ज्या देवा [वरुणा]चें वाईट करण्याची इच्छा वैरी करीत नाहींत, [आणि] मनुष्यद्रोही-[हि] [इच्छा करीत] नाहींत [आणि] घालेकरी [हि] करीत नाहींत;

14. And those that are desirous of doing harm do not wish to harm this god, nor do the haters of men, nor do the assassins.

---

१२. सातव्या ऋचेपासून 'जो,' 'जो' असा जो संबंध आला तो या मंत्रात पुरा झाला. म्हणजे चार मंत्रात वरुणाविषयीं स्तुती करून या पांचव्या मंत्रात त्या वरुणापाशीं जें काय मागावयाचें तें मागतो; त्यांतून 'आम्हांस सर्व सुगम करो' या मोघम शब्दांत काय असेल तें असो, पण 'तो आमचीं आयुष्यें वाढवो' यांत एवढ्या मोठ्या देवाजवळ जितकें मागावयाचें तितकें मागितलें नाहीं असें म्हटलें पाहिजे. आलीकडचे खंडोबा आणि म्हसोबा यांचे भगत सुद्धां त्या आपल्या देवाकडेस मोक्षादि मोठमोठे वर मागतात. असो, आमचे आर्य पूर्वज वरुणाच्या सार्वभौमत्वाच्या वेळीं कोणत्या स्थितींत होते तें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे.

१३. वरुण हा आपल्या घरीं बसतो आणि तेथून मनुष्यांनीं केलेलीं बरीं वाईट सर्व केलेलीं कृत्यें पाहतो असें पूर्वीं सांगितलें आहे. आतां त्याचे अलंकार, कपडे वगैरे कसे असतात, आणि त्याच्या दरबारास कोण कोण असतात तें या मंत्रांत सांगितलें आहे.

'अलंकार'='निर्णिजम्.' या स्थलीं सायणाचार्य 'निर्णिज्' शब्दाचा अर्थ पुष्ट असा विशेषणार्थी करून 'शरीर' इतकें पद अध्याहृत घेऊन त्याजकडेस त्याचा संबंध लावितात. आम्हीं केलेल्या अर्थास प्रयोगांतराचे आधार पुष्कळ आहेत.

'जासूद'='स्पशः'. स्पश् म्हणजे जो चाकर बातमी आणण्या नेण्याकरितां कामीं लावितात तो, हेर. सायणाचार्य या स्थलीं 'किरण' असा विनाकारण अर्थ करितात, पण ऋ. १. ३३. ८ यांत त्यांनींच 'अनुचर'=चाकर असा अर्थ केला आहे तो पाहा. दुसरेहि प्रयोग पुष्कळ आहेत.

१४. सातव्या पासून दहाव्या मं-

**उत यो मानुषेष्वा यशश्चक्रे असाम्या ।**
**अस्माकमुदरेष्वा ॥ १५ ॥ १८ ॥**

उत । यः । मानुषेषु । आ । यशः । चक्रे । असामि । आ ।
अस्माकम् । उदरेषु । आ ॥ १५ ॥ १८ ॥

**परा मे यन्ति धीतयो गावो न गव्यूतीरनु ।**
**इच्छन्तीरुरुचक्षसम् ॥ १६ ॥**

परा । मे । यन्ति । धीतयः । गावः । न । गव्यूतीः । अनु ।
इच्छन्तीः । उरुऽचक्षसम् ॥ १६ ॥

**सं नु वोचावहै पुनर्यतो मे मध्वाभृतम् ।**
**होतेव क्षदसे प्रियम् ॥ १७ ॥**

सम् । नु । वोचावहै । पुनः । यतः । मे । मधु । आऽभृतम् ।
होताऽइव । क्षदसे । प्रियम् ॥ १७ ॥

---

## भाषायाम्.

१५. उत (=अपि च) यो [वरुणो] मानुषेषु आ (=मनुष्येषु) असामि (=संपूर्णं) यशः (=अन्नं ?) चक्रे (=स्थापयामास), [तथा] अस्माकमुदरेषु [चक्रे=स्थापयामास] ॥

१६. उरुचक्षसं (=विस्तीर्णदर्शिनं) [वरुणम्] इच्छन्त्यो मे धीतयो (=बुद्धयो), गावो गव्यूतीरनु (=यवसस्थानानि प्रति) इव, परायन्ति (=मत् वरुणं प्रति प्रगच्छन्ति) ॥

१७. नु (=अधुना) [आवां] यतः [स्थानात्] मे मधु (=मधुरं पेयम्) आभृतम् (=आनीतं) [तत्र] पुनः संवोचावहै (=संवदावहै)। [त्वं] होतेव प्रियं [मधु] क्षदसे (=अश्नासि ?) ॥

---

त्रांत जे वरुणाविषयीं गुण आणि पराक्रम सांगितले त्याशिवाय या आणि पुढच्या मंत्रांत मिळून आणखी कांहींसे अधिक सांगितले आहेत. मंत्राचा भावार्थ स्पष्टच आहे. मानवी राजास ज्यापासून उपद्रव होतो अशा शत्रूंपासून आणि द्वेष्ट्यापासून आणि मारेकऱ्यापासून वरुणास कांहींच उपद्रव होत नाहीं, म्हणून हा वरुण राजा इतर राजांहून फार भिन्न आहे असें तात्पर्य आहे.

१५. आणि जो [ वरुण ] मनुष्यांमध्यें [ आणि विशेषेंकरून ] आमच्या उदरामध्यें विपुलपणें अन्न घालिता झाला आहे.

१६. गाई कुरणांकडेस [ धांवतात ] तसे माझे विचार दीर्घदर्शी वरुणाची इच्छा करून त्याजकडेस धांव घेत आहेत.

१७. आतां जेथून मला मधुर [ अन्न ] आणिलें आहे तेथें आपण दोघेहि पुनः संभाषण करूं. तूं होत्याप्रमाणें आपलें प्रिय [ अन्न ] खातोस.

15. And he has put food plentifully in men [and especially] in our stomachs.

16. My thoughts rush forth earnestly towards the farseeing [Varuṇa] like as the cows towards their pasture-lands.

17. Now let us again converse [ there ] from whence my sweet offering has been brought up; thou eatest thy agreeable [offering] like a Hotâ.

१५. ही ऋचा स्पष्टार्थ आहे, आणि वरुणानें मनुष्यांवर आणि या मंत्राच्या कर्त्यावर केलेले उपकार स्मरावे इतकाच हिचा उद्देश आहे. तथापि एका शब्दाच्या अर्थाविषयीं आम्हांस फार संशय आहे. 'यशः' म्हणजे 'अन्न' असा अर्थ आम्हीं सायणास अनुसरून केला आहे, पण तसा त्याचा अर्थ होतो कीं काय याविषयीं फार संशय आहे. सायणानीं तरी 'उदरेषु' हें पद मंत्रात आहे, त्यापेक्षां उदरांत घालावयाचें तें अन्नच अशी कल्पना बसवून 'अन्न' असा अर्थ केला असावा असें भासतें. तथापि या ठिकाणीं नीट बसे असा दुसरा अर्थ आमच्यानें सूचववत नाहीं, यास्तव आम्ही सायणासच अनुसरलों आहों.

१६. या मंत्रांत उपासकाचें मन किती भाविक आहे पाहा. त्याचे विचार मोठ्या औत्सुक्यानें वरुणाकडेस धांवा घेत आहेत, जशा काय त्या गाईच होत आणि गोठ्यांतून सोडल्याबरोबर कुरणांकडेस धांवून जाताहेत.

'कुरणांकडेस'='गव्यूतीः अनु.' सायणाचार्य येथें गोठ्यांकडेस असा अर्थ करितात, पण आम्हीं केलेला अधिक सयुक्तिक दिसतो. "जहि शत्रुमन्तिके दूरके च य उर्वी गव्यूतिमभयं च नः कृधि" ( ऋ.९. ७८. ५ ) यांत आणि ९. ८५. ८ यांतील "अर्ष सूर्वीर्यमुर्वी गव्यूतिम्" यांत व दुसऱ्या कितीएक मंत्रांत तोच अर्थ इष्ट दिसतो.

'दीर्घदर्शी.' म्हणजे एका ठिकाणीं बसूनहि पुष्कळ दूरपर्यंत ज्याची दृष्टि पोंहचत असते तो.

१७. या मंत्राचा भावार्थ समजत नाहीं. आम्हीं केवळ शब्दार्थ केला आहे. मंत्रवक्ता कोणाशीं बोलत आहे तेंहि कळत नाहीं. सायणाचार्य जो याचा अर्थ करितात त्यावरून तरी विशेष

**दर्शं नु विश्वदर्शतं दर्शं रथमधि क्षमि ।**
**एता जुषत मे गिरः ॥ १८ ॥**

दर्शम् । नु । विश्वऽदर्शतम् । दर्शम् । रथम् । अधि । क्षमि ।
एताः । जुषत । मे । गिरः ॥ १८ ॥

**इमं मे वरुण श्रुधी हवमद्या च मृळय ।**
**त्वामवस्युरा चके ॥ १९ ॥**

इमम् । मे । वरुण । श्रुधि । हवम् । अद्य । च । मृळय ।
त्वाम् । अवस्युः । आ । चके ॥ १९ ॥

**त्वं विश्वस्य मेधिर दिवश्च ग्मश्च राजसि ।**
**स यामनि प्रति श्रुधि ॥ २० ॥**

त्वम् । विश्वस्य । मेधिर । दिवः । च । ग्मः । च । राजसि ।
सः । यामनि । प्रति । श्रुधि ॥ २० ॥

## भाषायाम्.

१८. [अहं] नु (=अधुना) विश्वदर्शतं (=सर्वैर्दर्शनीयं=कमनीयं) [वरुणम्] [अ]-दर्शम् (=अपश्यम्) । अधि क्षमि (=पृथिव्यां) रथम् [अ]दर्शम् (=अपश्यम्) । एता मे गिरः [स वरुणः] [अ]जुषत (=सिषेवे) ॥

१९. हे वरुण, [त्वम्] इदं मे हवम् (=आह्वानं) शृणु । अद्य च [त्वं] [मह्यं] मृळय (=प्रसन्नो भव) । [अहं हि] अवस्युः (=रक्षणेच्छुः) [सन्] त्वामाचके (=त्वां स्तौमि) ॥

२०. हे मेधिर (=मेधाविन्), त्वं विश्वस्य दिवश्च (=द्युलोकस्य च) ग्मश्च (=पृथिव्याश्च) राजसि (=राजा असि) । स [त्वं] यामनि (=उपासनायां) प्रतिशृणु (=प्रसन्नो भव) ॥

तृप्ति होते असें नाहीं. ते म्हणतातः— " ज्यापेक्षां मी जगावें म्हणून मधुर हवि " अर्पण केलें आहे त्यापेक्षां होमकर्त्या- " प्रमाणें तूं (वरुण) हि प्रिय अन्न " खातोस. आणि त्वां (म्हणजे वरुणा- " नें) हवि स्वीकारून घेतल्यानंतर " तृप्त झालेला तूं आणि सुटलेला मी " असे मिळून प्रियवार्ता करूं." परंतु हें भाष्य केवळ हें सूक्त शुनःशेपाला यूपास बांधिला त्या वेळेस त्याणें म्हटलें असें समजून केलें आहे. आम्हांस या दोनी गोष्टींविषयीं संशय आहे.

ऋग्वेदांत असे कितीएक बरेच मधें मधें मंत्र आहेत कीं, त्यांचा अर्थ समजत नाहीं, त्यांपैकींच हा एक आहे असें समजून राहणें अवश्य दिसतें.

१८. आतां विश्वदर्शनीय [वरुणा]स [हा] मी पाहिला, [हा] [त्याचा] रथ पृथ्वीवर मला दिसत आहे. त्याणें ह्या माझ्या प्रार्थना स्वीकारून घेतल्या.

१९. हे वरुणा, ही माझी हाक ऐक आणि आज [मजवर] कृपा कर. [तुझ्या] अभयाची इच्छा धरून मी तुला [ही] हाक मारिली आहे.

२०. हे बुद्धिमान् [वरुणा], तूं सकलांचा [राजा होस], [तूं] द्युलोकाचा [राजा होस], [तूं] पृथ्वीचा [राजा होस]. यास्तव तूं [या] उपासनाप्रसंगीं [आम्हांस] प्रसन्न हो.

18. Now I see [Varuṇa] that deserves to be seen by all, [now] I see [his] chariot on earth. These my prayers he has accepted.

19. Varuṇa, hear this my call and favour [me] today. Desirous of [thy] protection, I have invoked thee.

20. Thou art, wise [Varuṇa], the king of all, king of Heaven, king of Earth. Be thou, therefore, favourable in [this our] service.

१८. उपासक म्हणतो कीं, वर ज्या वरुणाच्या मी स्तुती केल्या त्या त्यानें स्वीकारून घेतल्या आणि तो रथांत बसून येत आहे, आणि तो आणि त्याचा रथ हे माझ्या दृष्टीस पडत आहेत. वरुण खरोखर जरी उपासकाच्या प्रत्यक्ष दृष्टीस पडला नाहीं (कारण पडला असता तर पुढच्या म्हणजे एकुणिसाव्या मंत्रांत माझी ही हाक ऐक अशी प्रार्थना फिरून केली नसती), तथापि त्या उपासकाची भक्ति आणि वरुणावर भरंवसा हे अति उत्तम होत यांत संशय नाहीं. दृष्टीस पडला म्हणजे अंतर्दृष्टीस गोचर झाला असें समजावें. अशा प्रकारें उत्तम भक्तीचे आलाप आधुनिक तुकारामादिकांच्या कवितेंतहि पुष्कळ सांपडतात.

१९. या मंत्रावरून दिसून येईल कीं, पूर्वीच्या मंत्रांत जें "वरुणास मी पाहिलें, हा त्याचा रथ पृथ्वीवर मला दिसत आहे" म्हणून म्हटलें तें प्रत्यक्ष दर्शन नव्हे.

२०. हा मंत्र फार सुंदर आहे. यांत वरुणाचा मोठेपणा किती नम्रभावानें मंत्रवक्ता वर्णीत आहे तें ध्यानांत ठेवावें. ज्या वरुणाच्या प्रसादाची इच्छा मंत्रवक्ता करितो तो साधारण एकाद्या जेजुरीसारिख्या लहानशा गांवांतील देव आहे असें नाहीं, तर तो सकल द्युलोकाचा आणि सकल पृथ्वीचा राजा आणि सकल भुवनांचा राजा होय. आणि उपासक उद्धट आणि गर्विष्ठ कर्मठ ब्राह्मण नाहीं, तर लीन आणि अनन्यभावें आपल्या देवाला शरण जाऊन आपली हाक ऐक अशी नम्रतापूर्ण साधी प्रार्थना करणार एक सेवक होय.

उदुत्तमं मुमुग्धि नो वि पाशं मध्यमं चृत ।
अवाधमानि जीवसे ॥ २१ ॥ १९ ॥

उत् । उत्ऽतमम् । मुमुग्धि । नः । वि । पाशम् । मध्यमम् । चृत ।
अव । अधमानि । जीवसे ॥ २१ ॥ १९ ॥

## भाषायाम्.

२१. [ हे वरुण ], जीवसे ( =अस्माकं जीवनार्थ=वयं जीवेमेत्यर्थ) [ त्वम् ] उत्तमम् ( =ऊर्ध्वतमं ) नः ( =अस्माकं ) पाशम् उन्मुमुग्धि (=ऊर्ध्वमेव मोचय ), मध्यमं [पाशं] विचृत ( =वियोजय ), अधमानि ( =अधः स्थितान् पाशान् ) अव ( =अध एव ) [ विचृत ] ॥

ब्राह्मणाचा शब्द असला तर पुरे, देवांचे दगड होतील आणि दगडांचे देव होतील अशी शक्ति भूदेवांस वैदिक युगांत आली नव्हती. त्या वेळचे उपासक बिचारे आम्हांसारिखेच गरीब आणि निर्बळ मानव, पण अधिक भाविक, अधिक प्रामाणिक आणि अधिक भजनोत्सुक होते.

---

## सूक्तम् २६.

अजीगर्तपुत्रः शुनःशेप ऋषिः । अग्निर्देवता । गायत्री च्छन्दः ॥

वसिष्वा हि मियेध्य वस्त्राण्यूर्जां पते ।
सेमं नो अध्वरं यज ॥ १ ॥

वसिष्व । हि । मियेध्य । वस्त्राणि । ऊर्जाम् । पते ।
सः । इमम् । नः । अध्वरम् । यज ॥ १ ॥

## भाषार्थम्.

१. हे मियेध्य ( =यजनयोग्य ) हे ऊर्जां पते ( =बलानां पते ) [ अग्ने ], त्वं हि वस्त्राणि वसिष्व ( =परिधत्स्व ) । स [ त्वम् ] ( =अनन्तरं च त्वम् ) इमं नोऽध्वरं यज ( =अस्मदर्थमनुतिष्ठ ) ॥

२१. [हे वरुणा], आम्हीं जगावें म्हणून आमचा वरील पाश वरच सोडीव, मधला मधें तोड, [आणि] खालचे [पाश] खालीं [तोड].

21. O Varuṇa, loosen up our upper [bond], break off the middle bond [and] break off the lower [bonds], that we may live.

२१. हा मंत्र सुद्धां वाचून वैदिककाळच्या उपासकांच्या साधेपणाविषयीं एक प्रकारचा आनंद वाटतो. ते समजत कीं, जो वरुण देव त्यास नकळत केलेलीं सर्व कर्मे पाहणारा, आणि ज्याचें राज्य सर्व द्युलोक आणि सर्व पृथ्वी यांजवर चालतें, आणि जो पापपुण्याचा हिशोब पाहणारा, तो आम्हीं पापी मनुष्यांनीं केलेल्या पातकांचे पाश आमच्या शरीराच्या शिरोभागीं, मध्यभागीं, आणि अधोभागीं बांधीत असतो. आणि ते पाश जोंपर्यंत तुटले नाहींत तोंपर्यंत खरोखर जीवन नाहीं. यास्तव मंत्रवक्ता वरुणास ते पाश तोडण्याविषयीं विनंती करितो.

पूर्वीच्या ऋषींस आपल्या मंत्रसामर्थ्यानें आणि आपल्या तपोबळानें पाहिजे तें करण्याची शक्ति होती हा जो त्यांजवर आम्ही आरोप करितों, त्याविषयीं असल्या एकाग्र साध्या सूक्ताचे कर्ते ऋषी जर पुनः जीवंत होऊन आमचा आरोप ऐकतील तर ते काय म्हणतील बरें?

---

## सूक्त.-२६.

ऋषि आणि वृत्त—पूर्ववत्. देवता—अग्नि.

१. हे यजनीय अन्नपती, तूं वस्त्रें आंगावर घे, आणि नंतर हा आमचा यज्ञ संपाद.

## HYMN 26.

To *Agni*. Author and Metre as before.

1. Put on thy clothes, venerable lord of nourishments, and do thou then perform this our sacrifice.

१. या सूक्ताचाहि कर्ता शुनःशेप आहे. ऐतरेय ब्राह्मणांतून जी आम्हीं कथा पूर्वीं उतरून घेतली आहे तिला अनुसरून सायणाचार्य म्हणतात कीं, वरुणाची स्तुती करून संपल्यावर, त्या देवानें शुनःशेपास अग्नीची स्तुती करावयास सांगितली; त्यावरून हें सूक्त आणि पुढचें सूक्त अशीं दोन रचून त्याणें अग्नीची स्तुति केली.

परंतु वस्तुतः तसें कांहीं दिसत नाहीं असा आमचा अभिप्राय आम्हीं पूर्वी दिलाच आहे. त्याचें प्रमाण या पहिल्याच मंत्रांत आहे. कारण जर यूपास बांधिलेल्या शुनःशेपानें आपली सुटका

नि नो होता वरेण्यः सदा यविष्ठ मन्मभिः ।
अग्ने दिवित्मता वचः ॥ २ ॥

नि । नः । होता । वरेण्यः । सदा । यविष्ठ । मन्मऽभिः ।
अग्ने । दिवित्मता । वचः ॥ २ ॥

आ हि ष्मा सूनवे पितापिर्यजत्यापये ।
सखा सख्ये वरेण्यः ॥ ३ ॥

आ । हि । स्म । सूनवे । पिता । आपिः । यजति । आपये ।
सखा । सख्ये । वरेण्यः ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. हे सदा यविष्ठ (=नित्यतरुणतम) अग्ने, [अस्माकं] मन्मभिः (=ध्यानैः) दिवित्मता (=दिव्येन) वचसा (=वाण्या) [च] [स्तूयमानः सन्] [त्वम्] अस्माकं वरेण्यः (=श्रेष्ठो) होता [भूत्वा] [नो यज्ञमनुष्ठातुं] नि[षीद] ॥

३. वरेण्यः [अग्नि]र्हि सूनवे पिता [इव], आपिः (=बन्धुः) आपये (=बन्धवे) [इव], सखा सख्ये [इव], [निजोपासकाय] आयजति स्म (=यज्ञं निष्पादयत्येव तद्द्वारा च अभीष्टं प्रापयत्येव) ॥

---

होण्यासाठीं हें सूक्त म्हटलें असतें तर अग्नीला 'हा आमचा यज्ञ संपाद' अशी प्रार्थना केली नसती, आणि शुनःशेपानें आपल्या संकटास अनुलक्षून कांहीं तरी म्हटलें असतें. हें सूक्त दुसऱ्याच प्रसंगासाठीं रचिलेलें आहे असें आम्हांस वाटतें.

या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'हे अग्नी, आमचा मानवी होता जसा वस्त्रें वगैरे घालून तयार होऊन बसतो आणि यज्ञ संपादितो, तसा तूं वस्त्रें घालून हा आमचा यज्ञ संपाद.' होता वगैरे ऋत्विज यज्ञसंपादनाच्या वेळीं वस्त्रादिक घालून बसत असें या मंत्रावरून अनुमान काढिलें पाहिजे असें आम्हांस वाटतें.

'ऊर्जपती'='ऊर्जां पते.' हें अग्नीचें संबोधन. 'ऊर्जां पति' म्हणजे 'बळांचा प्रभु' असाहि अर्थ निघूं शकेल. सायणाचार्य 'अन्नांचा पालक' असें म्हणतात.

२. हे सदा परमतरुण अग्नी, [आमच्या] मननांच्या आणि दिव्य स्तवनांच्या योगानें [तूं] आमचा श्रेष्ठ होता हो आणि बैस

३. कारण कीं, हा श्रेष्ठ [होता अग्नि] पुत्रासाठीं [जसा] पिता, सोइऱ्यासाठीं [जसा] सोइरा, मित्रासाठीं [जसा] मित्र, [तसा] [उपासकासाठीं] यज्ञ करितो.

2. O ever youthful Agni, sit thou down our excellent Hotâ (invoker) by means of [our] meditations and divine prayer.

3. For the excellent [Hotâ Agni] sacrifices [in behalf of his worshipper] [as] a father in behalf of his son, a relation in behalf of a relation, a friend in behalf of his friend.

---

२. वरील मंत्रांत कपडे करून हा आमचा यज्ञ तूं संपाद अशी प्रार्थना केली तीच या मंत्रांत पुन: करून म्हणतो कीं, आमचा तूं श्रेष्ठ होता होऊन यज्ञसंपादन कर; आणि तूं तसें करावेंस म्हणून हा प्रार्थना आणि हें स्तवन तुला अनुलक्षून केलें आहे.

'परम तरुण' हें विशेषण पूर्वी आलें आहे, आणि त्याविषयीं त्या ठिकाणीं खुलासा केला आहे.

३. वरच्या दोन मंत्रांत अग्नीनें येऊन यज्ञ संपादावा असें प्रार्थिलें, त्याचें कारण या मंत्रांत दिलें आहे. तें असें कीं, जसा एकादा बाप आपल्या मुलाकरितां यज्ञ करितो, किंवा एकादा सगा आपल्या सग्याकरितां यज्ञ करितो, अथवा एकादा मित्र आपल्या मित्राकरितां यज्ञ करितो तसा हा अग्नि उपासकांकरितां यज्ञ करून देवांस प्रसन्न करून देतो.

या ऋचेवरून असें अनुमान काढतां येईल असें वाटतें कीं, यज्ञसंपादनासाठीं जो होता लावीत तो चांगला विद्वान्, अनुकूल आणि देवांस प्रसन्न करून देण्याविषयीं ज्याला शक्ति आहे असा मानिलेला मनुष्य लावीत. कदाचित् मुलाकरितां बाप होता होई, एका सग्याकरितां दुसरा सगा आणि मित्राकरितां मित्र होता होई असेंहि दिसतें.

या मंत्रांत 'जसा' 'तसा' या ऐवजीं उपमादर्शक अव्यय नाहीं आहे, तथापि उपमा विवक्षित आहे असें आम्हांस वाटतें. त्याच समजुतीनें आम्हीं अर्थ केला आहे. सायणाचार्य 'आयजति' याचा अर्थ येथें दुसऱ्या कोणाकरितां तरी यज्ञ करणें असा न करितां 'देणें' असा अर्थ करितात. परंतु यस्मै त्वमायजसे स साधत्यनर्वा (ऋ. १.९४.२) यांत त्यांनींच आम्हीं येथें केल्याप्रमाणें अर्थ केला आहे तो पाहा. आयज् याचा अर्थ 'मिळवून देणें' असा होतो खरा ("अग्ने महि द्रविणमायजस्व" ऋ. ३. १. २२ हें आणि "स आयजस्व नृवतीरनु क्षा स्पार्हा इषः" ऋ. १०. ३.६ हें अशीं उदाहरणें पाहा), पण तसें केल्यास कर्म लागत असतें तें प्रस्तुत मंत्रांत नाहीं, म्हणून आम्हीं 'दुसऱ्याकरितां यज्ञ करणें', असा प्रयोगान्तरावर लक्ष्य देऊन अर्थ केला आहे.

आ नो बर्हीं रिशादसो वरुणो मित्रो अर्यमा ।
सीदन्तु मनुषो यथा ॥ ४ ॥

आ । नः । बर्हिः । रिशादसः । वरुणः । मित्रः । अर्यमा ।
सीदन्तु । मनुषः । यथा ॥ ४ ॥

पूर्व्य होतरस्य नो मन्दस्व सख्यस्य च ।
इमा उ षु श्रुधी गिरः ॥ ५ ॥ २० ॥

पूर्व्य । होतः । अस्य । नः । मन्दस्व । सख्यस्य । च ।
इमाः । ऊम् इति । सु । श्रुधि । गिरः ॥ ५ ॥ २० ॥

---

## भाषायाम्.

४. नः (=अस्माकम्) आ बर्हिः (=दर्भासनोपरि) रिशादसः (=शत्रुघातका) वरुणः मित्रः अर्यमा [इत्येते], मनुष्या इव, [प्रत्यक्षं] [नि]षीदन्तु ॥

५. हे पूर्व्य (=पुरातन) होतः [अग्ने], अस्य नो [यज्ञस्य] [अस्य नः] सख्यस्य च (=प्रेम्णश्च) मन्दस्व (=हर्षं प्राप्नुहि=अनेन नो यज्ञेन प्रेम्णा च हृष्टो भव) । इमाश्च [नो] गिरः (=स्तुतीः) सु (=सम्यक्) शृणु ॥

४. दुष्टास खाऊन टाकणारे वरुण, मित्र, [आणि] अर्यमा [येऊन] मनुष्यांप्रमाणें आमच्या दर्भांवर बसोत.

५. हे पुरातन होत्या [अग्नी], आमच्या ह्या [यज्ञानें] आणि मित्रत्वानें [तूं] आनंद पाव आणि [आमच्या] ह्या स्तुती मन देऊन ऐक.

4. May Varuṇa, Mitra, [and] Aryamâ, destroyers of the wicked, [come and] sit on our *kus'a*-seat.

5. O ancient Hotâ, [Agni], be [thou] delighted with this our [sacrifice] and [our] friendship and hear well these [our] prayers.

४. मंत्रवक्ता अग्नीला होत्याचें काम पतकरण्याची विनंती करून ह्या देवास यज्ञ करावयाचा त्यास बोलावितो आणि वरुण, मित्र आणि अर्यमा हे येओत आणि हें जें आम्हीं त्यास बसावयाला कुशासन घातलें आहे त्याजवर प्रत्यक्ष मनुष्यांप्रमाणें बसोत, असा या मंत्राचा भावार्थ आहे.

'दर्भांवर बसोत.' देवास बसावयास दर्भासन कां घालीत याविषयीं सूक्त १३ मंत्र ५ यावर ९४ व्या पृष्ठावर टीप पाहा.—'अर्यमा' हा एक वैदिक देव आहे. आदित्य म्हणून जे देव पूर्वी सांगितले आहेत (सूक्त १४ मंत्र ३ यावर 'आदित्य' याविषयीं टीप, पृष्ठ १०२, पाहा) त्यांपैकीं अर्यमा हा एक होय. आणि जेव्हां जेव्हां वेदांत या अर्यमाविषयीं उल्लेख येतो तेव्हां तेव्हां तो मित्र आणि वरुण यांच्याशीं येत असतो. केव्हां केव्हां भग आणि बृहस्पति यांजबरोबरहि त्यांचें आव्हान होत असतें.—'मनुष्यांप्रमाणें बसोत.' म्हणजे जसा एकादा मानवी अतिथि येऊन बसावयास घातलेल्या आसनावर बसतो तसे हे आमच्या आसनावर प्रत्यक्ष बसोत.

प्रत्यक्ष मनुष्यांप्रमाणें बसण्याची प्रार्थना मंत्रवक्ता करितो यावरून दर्भासनावर नित्य देव येऊन प्रत्यक्ष बसतच होते अशी जी समजूत आहे तिला या मंत्रावरून अडचण येते.

५. भावार्थ:—'हे अग्नी आम्ही जो हा यज्ञ करीत आहों तो आणि आम्ही जी तुझी आमच्या मित्राप्रमाणें विनवणी करीत आहों आणि तुझ्याशीं मित्रभाव दाखवीत आहों, तो तूं मान्य करून घे आणि आमची प्रार्थना ऐक.' मित्रत्वाला मुळांत 'सख्य' असा शब्द आहे. मनुष्यांचा जो देवांविषयीं प्रेमभाव अथवा देवाचा मनुष्यांविषयीं प्रेमभाव त्याला वैदिक भाषेंत 'सख्य' असें म्हणतात अशाविषयीं उदाहरणें, ऋ. १.१५.५ "तवेद्धि सख्यमस्तृतम्"; "देवानां सख्यमुप सेदिमा वयम्" ऋ. १.८९.२; "अनु व्राताऽसस्तव सख्यमीयुः" ऋ. १.१६३.८; "त्या नु अश्विना हुवे सुदंससा गृभे कृता ययोः अस्ति प्र नः सख्यं देवेषु अध्याप्यम्" ऋ. ८.१०.२; "यदि मे सख्यमावरः इमस्य पाहि अन्धसः" ऋ. ८.१३.२१; "नू स अग्ने तव ऊतिभिः सुवीराभिस्तिरते वाजभर्मभिः

**यच्चिद्धि शश्वता तना देवंदेवं यजामहे ।**

**त्वे इद्धूयते हविः ॥ ६ ॥**

यत् । चित् । हि । शश्वता । तना । देवम्ऽदेवम् । यजामहे ।

त्वे इति । इत् । हूयते । हविः ॥ ६ ॥

**प्रियो नो अस्तु विश्पतिर्होता मन्द्रो वरेण्यः ।**

**प्रियाः स्वग्नयो वयम् ॥ ७ ॥**

प्रियः । नः । अस्तु । विश्पतिः । होता । मन्द्रः । वरेण्यः ।

प्रियाः । सुऽअग्नयः । वयम् ॥ ७ ॥

**स्वग्नयो हि वार्यं देवासो दधिरे च नः ।**

**स्वग्नयो मनामहे ॥ ८ ॥**

सुऽअग्नयः । हि । वार्यम् । देवासः । दधिरे । च । नः ।

सुऽअग्नयः । मनामहे ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

६. [ हे अग्ने ], यच्चिद्धि ( =यद्यपि ) [ वयं ] शश्वता तना ( =अप्रतिहतेन सातत्येन=नित्यमेव ) देवंदेवं ( =नानाविधान्देवान् ) यजामहे [ तदपि ] हविः त्वे इत् ( =त्वय्येव ) [ एकस्मिन् ] हूयते ( =अर्प्यते ) ॥

७. मन्द्रः (=प्रसन्नो) वरेण्यः (=श्रेष्ठो ) विश्पतिः (=विशां पतिः=राजा ) होता [ अग्निः ] नः ( =अस्माकं ] प्रियोस्तु । स्वग्नयः ( =प्रसन्नोग्निर्येषां ते ) वयम् [ अपि ] [ अग्नेः ] प्रियाः [ असाम ] ॥

८. स्वग्नयः ( =प्रसन्नाग्नियुक्ता ) देवा हि वार्यं ( =वाञ्छनीयं धनं ) नः ( =अस्मभ्यं ) दधिरे च (=ददति खलु ) । [ अतो हेतोः ] स्वग्नयः ( =प्रसन्नाग्नियुक्ताः) [ सन्तो ] [ वयं ] मनामहे (=स्तुमहे ) ॥

---

यस्य त्वं सख्यमावरः" ऋ. ८. १९. ३०; "अग्नेः सख्यं वृणीमहे" ऋ. ८. ४४. २०; "न मे इन्द्रेण सख्यम्" ऋ. १. १८. ८. इत्यादि अनेक आहेत.

अग्नीला 'पुरातन होता' असें या मंत्रांत म्हटलें आहे तिकडे लक्ष्य पुरवावें. तो फार दिवसांपासून होतृत्वाचें कामच जणुं काय करीत आहे असें ऋषीचें हृद्गत.

६. जरी [आम्ही] नित्य नित्य निरनिराळ्या देवास भजतों [तरीहि], [हे अग्नी] हवि [अर्पण करणें] तुझ्याच ठायीं अर्पण होत असतें.

७. मनुष्यांचा प्रभु, श्रेष्ठ [आणि] आनंदी होता [जो अग्नी तो] आम्हांस प्रिय होओ; [आणि अग्नीची आम्हांवर कृपा करून घेऊन आम्ही त्याला प्रिय [होऊं].

८. कारण कीं, चांगल्या अग्नीच्या योगानें देव आम्हांस इष्ट [धन] देत असतात. [तर आम्ही] चांगल्या अग्नीच्या साहाय्यानें प्रार्थना करूं.

6. Although we always sacrifice to different gods, the oblation, [Agni], is offered in thee alone.

7. May [Agni], the lord of men [and] the amiable [and] excellent Hotâ be dear to us; [and] may we, having obtained his love, be dear to Agni.

8. For through benign Agni the gods have conferred choice wealth on us. Let us [therefore] pray through benign Agni.

६. भावार्थ असा कीं, 'जरी आम्ही निरनिराळ्या देवांच्या उद्देशानें नित्य यज्ञ करीत असतां तरी हवि टाकावयाचें तें तुझ्याच भागावर टाकितों, वास्तव इतर देवांसाठीं म्हणून जरी आम्हीं सेवा केली तथापि ती तुझीच सेवा होते'. यावरून यज्ञहवि अग्नीशिवाय अर्पण होत नसे हें स्पष्ट झालें.

'जरी'='यांचाकि.'—'नित्य नित्य'='शश्वता तना.' यांत 'शश्वता' हें विशेषण आणि 'तना' हें नाम. दोनीहि तृतीया. 'तन्' म्हणजे मालिका, सरणी. आणि 'शश्वता तना' याचा अर्थ 'अप्रतिहत सरणीनें.' अर्थ 'एकामागून एक,' 'नित्य 'नित्य'.

७. हा मंत्र फार सुंदर आहे. याचा साधाच पण सुंदर भावार्थ असा आहे कीं, 'सकल जनांचा प्रभु आणि मनुष्यांचा यज्ञ सिद्धीस नेणारा आणि आनंददायक असा जो अग्नि, तो आम्हांस प्रिय होओ, म्हणजे आम्हांस तो प्रीतिपात्र होओ; आणि त्याची कृपा संपादन करून घेऊन आम्हीहि त्यास प्रिय होऊं.' यांत इतकें दिसतें कीं, [अग्नि]-देवाची प्रीति आणि मनुष्यांची [अग्नि]-देवाविषयीं प्रीति यांचा अन्योन्याश्रयच जणुं आहे. अग्नीवर आमची प्रेमभावना राहो ही सुंदर प्रार्थना या मंत्रांत जशी आहे तशीच अग्नीची प्रीति आम्हांवर होओ हीहि त्यांत आहे.

'अग्नीची आम्हांवर कृपा करून घेऊन'='स्वग्नय:'='सु-अग्नय:'. अक्षरशः अर्थ सु म्हणजे चांगला, माया करणारा अग्नि आहे ज्यास, अथवा ज्यांवर

अथा न उभयेषाममृत मर्त्यानाम् ।
मिथः सन्तु प्रशस्तयः ॥ ९ ॥

अथ । नः । उभयेषाम् । अमृत । मर्त्यानाम् ।
मिथः । सन्तु । प्रऽशस्तयः ॥ ९ ॥

विश्वेभिरग्ने अग्निभिरिमं यज्ञमिदं वचः ।
चनो धाः सहसो यहो ॥ १० ॥ २१ ॥

विश्वेभिः । अग्ने । अग्निऽभिः । इमम् । यज्ञम् । इदम् । वचः ।
चनः । धाः । सहसः । यहो इति ॥ १० ॥ २१ ॥

## भाषायाम्.

९. अथ (=अनन्तरं) हे अमर्त्य [ अग्ने ], [ अमर्त्यस्य तव च ] मर्त्यानां नः (=अस्माकं ) [च] [ इति ] उभयेषां मिथः (=परस्परं ) प्रशस्तयः (=प्रशंसारूपा वाचः ) सन्तु ॥

१०. हे सहसो यहो (=शक्तेः पुत्र ) अग्ने, विश्वैरग्निभिः इमं [नो ] यज्ञम् इदं [ च ] [ नो ] वचः चनो धाः ( =प्रेम्णा स्वीकुरु ) ॥

अग्नि कृपा करणारा आहे असे, आम्हीं.— 'मनुष्यांचा प्रभु'='विश्पतिः,' 'राजा.' हें अग्नीचें विशेषण पुष्कळ ठिकाणीं येतें.

८. मंत्रवक्त्याचा अभिप्राय असा आहे कीं, 'देव आम्हांस जी संपत्ती देतात ती कृपाळू अग्नीच्या योगानें देत असतात, यास्तव आम्हीहि या कृपाळू अग्नीच्याच द्वारें देवांची प्रार्थना करूं'. म्हणजे हा यज्ञ करण्यासाठीं अग्नीला होतृत्व स्वीकारण्यास पूर्वी प्रार्थना केली आहे, आणि अग्नीला हवी अर्पण करितां म्हणून वगैरे पूर्वीच्या कितीएक मंत्रांत सांगितलें त्याचें जें कारण तें विशेषेंकरून येथें सांगितलें आहे. कृपाळू अग्नीच्या योगें देवांचा प्रसाद आम्हांवर होतो त्या अर्थी या कृपाळू अग्नीच्याच द्वारें आम्ही देवांची आराधना करूं असा भावार्थ आहे.

या मंत्रांत 'चांगल्या' हें भाषांतर आम्हीं 'सु' याचें अक्षरशः केलें आहे, पण त्याचा भावार्थ 'कृपाळू' असा आहे. तोच अर्थ आम्हीं पूर्वीच्याहि मंत्रांत घेतला आहे.

हा मंत्रवक्ता आसपास असलेल्या मनुष्यांस म्हणत आहे, अग्नीस म्हणत नाहीं असें समजलें पाहिजे.

'प्रार्थना करूं'='मनामहे'. "इषः स्तुतौ मनामहे देवस्तुतौ मनामहे" ऋ. ५. ५०.५, "वि यज्ञांचं कीस्तासो भरन्ते शंसन्ति केचिन्निविदो मनानाः" इ० ऋ. ६. ६७. १०, हीं स्थळें पाहा.

९. आणि आतां हे अमर [अग्नी], [तुझ्या आणि] आम्हां मर्त्यांच्या मिळून उभयतांच्या प्रशंसारूप गोष्टी परस्पर होओत.

१०. हे अग्नी, हे बलपुत्रा, सकल अग्नींसह हा [आमचा] यज्ञ [आणि] हें स्तोत्र [तूं] प्रसन्न होऊन मान्य करून घे.

9. And now immortal [Agni], may there be mutually between [thee and] us mortals an interchange of praises.

10. With all Agnis accept, Agni, thou son of might, with pleasure this sacrifice [and] this hymn.

---

९. हा मंत्र थोडासा कठिण आहे. आम्हीं केलेल्या भाषांतराचा भावार्थ:—'हे अग्नी, आतां तूं ये आणि आमच्या यज्ञास मान्य करून तूं आम्हांस शाबासकी दे, आणि आम्हांवर तूं कृपा केल्याविषयीं आम्ही तुझी प्रशंसा करूं.' हा अर्थ आम्हीं शब्दशः (होईल तितका) केला आहे. सायणाचार्यहि असाच भावार्थ समजून भाष्य करितात. परंतु अग्नीनें यावें आणि भजकाबरोबर संभाषण करावें अशी प्रार्थना थोडीशी चमत्कारिक दिसते. अशीं दुसरीं उदाहरणें सांपडल्यावर वर दिलेल्या अर्थावर विशेष भरंवसा बसेल.

हा मंत्र आणि या पूर्वीचेहि या सूक्तातील मंत्र शुनःशेपानें महा संकटाच्या वेळीं म्हणजे त्याला यूपाला बांधिला होता त्यावेळीं रचले असें म्हणणें मंत्राच्या अर्थावरून पाहिलें असतां किती निराधार दिसतें हें सांगावयास नकोच.

१०. 'बलपुत्रा'='सहसो यहो.' 'सहसो यहुः' आणि 'सहसः सूनुः' हीं अग्नीचीं विशेषणें वेदांत पुष्कळ ठिकाणीं येतात. त्यांचा अर्थ 'बलाचा- अथवा शक्तीचा पुत्र.' असें म्हणण्याचें कारण घर्षण करून अग्नीला उत्पन्न करीत आणि घर्षण करण्याला शक्ती लागे वास्तव 'बलपुत्र' होय असें सांगतात.— 'सकल अग्नींसह.' जो अग्नी पेटवून यज्ञ केला त्याशिवाय जितके अग्नी असतील तितक्यांसहित असा भावार्थ दिसतो. अग्नींत हवि टाकावयाचें, मग उपासकाच्या घरीं जो अग्नि आहे त्यांतच टाकावें, दुसऱ्या मनुष्याच्या घरीं आहे त्या अग्नींत अथवा त्याच्याच घरीं दुसरे ठिकाणीं असलेल्या अग्नींत कां टाकूं नये अशी शंका आल्यामुळें 'सकल अग्नींसह' असें म्हटल्यासारिखें दिसतें.—'प्रसन्न होऊन मान्य करून घे'='चनो धाः.' 'चनो धा' हें संयोगी क्रियापद आहे आणि याचा अर्थ 'प्रसन्नतेनें मान्य करून अथवा स्वीकारून घेणें' असा होत असतो. याविषयीं पूर्वीं सूक्त ३ मंत्र ६ यावर १८ व्या पृष्ठावर दिलेली टीप पाहा.

हें सूक्त जर शुनःशेपानें आपल्या संकटकाळीं करून म्हटलें असतें तर 'हा आमचा यज्ञ मान्य करून घे' असें या मंत्रांत म्हटलें नसतें, कारण यूपास बांधिलेला शुनःशेप यज्ञ कसा करूं शकेल? आणि मला या संकटापासून सोडीव असें या मंत्रांत शेवटीं म्हटलें असतें तसें कांहींच म्हटलेलें नाहीं.

## सूक्तम् २७.

अजीगर्तपुत्रः शुनःशेप ऋषिः। देवता—१-१२ अग्निः। १३ विश्वे देवाः।
छन्दः—१-१२ गायत्री। १३ त्रिष्टुप्॥

**अश्वं न त्वा वारवन्तं वन्दध्या अग्निं नमोभिः।**
**सम्राजन्तमध्वराणाम्॥ १॥**

अश्वम्। न। त्वा। वारऽवन्तम्। वन्दध्यै। अग्निम्। नमःऽभिः।
सम्ऽराजन्तम्। अध्वराणाम्॥ १॥

**स घा नः सूनुः शवसा पृथुप्रगामा सुशेवः।**
**मीढ्वाँ अस्माकं बभूयात्॥ २॥**

सः। घ। नः। सूनुः। शवसा। पृथुऽप्रगामा। सुऽशेवः।
मीढ्वान्। अस्माकम्। बभूयात्॥ २॥

---

### भाषायाम्.

१. अध्वराणां सम्राजन्तं (=सम्राजं) त्वामग्निं, वारवन्तं (=शोभनपुच्छयुक्तम् अश्वम्) इव, नमोभिर्वन्दध्यै (=वन्दितुं प्रवृत्ताः स्मः)॥

२. स घ (=स एव) शवसः सूनुः (=शक्तेः पुत्रः) पृथुप्रगामा (=विस्तीर्णप्रगमनः) [अग्निः] नः (=अस्मभ्यं) सुशेवः (=सुसुखो) [भविष्यति]। [स एव] अस्माकं मीढ्वान् (=दाता) भविष्यति॥

## सूक्त २७.

ऋषि–पूर्ववत्. देवता– अग्नि; पण १-३ची विश्वेदेव ही देवता. वृत्त–गायत्री, परंतु १३ व्या ऋचेचें वृत्त त्रिष्टुभ्.

१. घोड्याच्या पुच्छाप्रमाणें ज्याचें पुच्छ लांब होय, [आणि जो] सकल यज्ञांचा एकटा राजा [त्या] तुला अग्नीला [आम्ही] नमस्कारांनीं भजण्यास [ आलों आहों ].

२. तो दूर फिरणारा [ अग्नि ] [आपल्या] बळाच्या योगानें आमचा उत्तम सुख देणारा [आणि] द्रव्य देणारा पुत्रच [जणुं] होओ.

## HYMN 27.

To *Agni* (but verses 1-3 are addressed to the *Vis've Devas*). Metre *Gâyatrî* (but that of verse 13 is *Trishṭubh*). Author as before.

1. [We have come] to worship with [our] adorations thee, Agni, [who art] like a horse with a long tail [and] who art the sole king of sacrifices.

2, May the long-walking [Agni] with his power be to us [as] a son giving us the highest comfort [and] procuring wealth [for us].

---

१. गेल्या सूक्ताच्या आरंभीं सांगितलेंच आहे कीं, ऐतरेय ब्राह्मणांत सांगितल्याप्रमाणें पाहूं गेलें असतां हेंहि सूक्त पूर्वोक्त संकटाच्या वेळीं म्हटलें. परंतु पुन: आम्हांस सांगणें भाग आहे कीं, तसें समजण्यास कारण नाहीं इतकेंच नव्हे, पण हें सूक्त दुसऱ्याच एकाद्या साधारण प्रसंगीं इतर अनेक सूक्तांप्रमाणें रचलेलें दिसतें. अशा समजुतीनें वाचूं लागलों तरच अर्थ चांगला समजेल. 'घोड्याच्या पुच्छाप्रमाणें ज्याचें पुच्छ लांब होय.' घोडा जसा आपल्या पुच्छानें माशा हाकून लावितो तसा अग्नि उपासकांच्या • शत्रूंस हाकून लावितो म्हणून अशी उपमा दिली आहे असें सायणाचार्य म्हणतात.–'भजण्यासाठीं [ आलों आहों ]'='वन्दध्यै.' आम्हीं सायणाप्रमाणें अर्थ केला आहे. ते 'प्रवृत्त झालों आहों' हें अध्याहृत घेतात. हा अध्याहार थोडा ओढाताणीचा खरा, पण दुसरा उपाय दिसत नाहीं.

२. 'दूर फिरणारा'='पृथुप्रगामा.' या विशेषणाचा उद्देश काय असेल तें कळत नाहीं.–'बळाच्या योगानें'='शवसा'. सायणाचार्य 'शवसा सूनु:' हीं पदें एकत्र घेऊन त्यांचा अर्थ 'शवस: सूनु:' असें असल्याप्रमाणें करितात, आणि 'शवसा' ही व्यत्ययानें 'शवस:' या षष्ठीबद्दल तृतीया आहे असा निर्वाह करितात, पण तसें करण्याचें कारण दिसत नाहीं.

स नो दूराच्चासाच्च नि मर्त्यादघायोः ।
पाहि सदमिद्विश्वायुः ॥ ३ ॥

सः । नः । दूरात् । च । आसात् । च । नि । मर्त्यात् । अघऽयोः ।
पाहि । सदम् । इत् । विश्वऽआयुः ॥ ३ ॥

इममू षु त्वमस्माकं सनिं गायत्रं नव्यांसम् ।
अग्ने देवेषु प्र वोचः ॥ ४ ॥

इमम् । ऊम् इति । सु । त्वम् । अस्माकम् । सनिम् । गायत्रम् । नव्यांसम् ।
अग्ने । देवेषु । प्र । वोचः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. [ हे अग्ने ], विश्वायुः (=विश्वेषां मित्रो विश्वव्यापी वा ) स [ त्वं ] नः (=अस्मान्) दूराच्च (=दूरवर्तिनश्च) अघायोः (=अघमपकृतिं कर्तुमिच्छतो) मर्त्यात् आसाच्च (=समीपवर्तिनश्च ) [ अघायोः ] [ मर्त्यात् ] सदमित् (=सदैव) निपाहि (=नितरां रक्ष ) ॥

४. हे अग्ने, त्वम् इमम् ( =इममपि ) अस्माकं सनिं (=हविर्दानं ) नव्यांसं ( =नवीयांसम्, अतिशयेन नूतनं ) गायत्रं (=स्तोत्रं ) [ च] देवेषु सु प्रवोचः ( =सम्यक् प्रवग्धि=प्रब्रूहि=इदं हविः एष गायत्रश्च समीचीनोस्तीति देवान्प्रति सम्यक् कथय ) ॥

३. तर [हे अग्नी], सर्वव्यापी [तूं] दूरच्या आणि तसाच जवळच्याहि दुष्ट मर्त्यापासून आम्हांस सदैव रक्ष.

४. हे अग्नी, हें आमचें हवि [आणि] [हें आमचें] गायत्रीच्छंदानें केलेलें अगदी नूतन स्तोत्र तूं उत्तम रीतीनें देवांप्रत प्रविष्ट कर.

3. Do [thou], therefore, [Agni], [who art] omnipresent, ever protect us from the wicked mortal distant and [the wicked mortal] near.

4. Recommend, O Agni, this our offering [and] [this our] newest hymn in the *gâyatrî* metre to the gods.

---

३. या मंत्रांत अग्नीची केलेली प्रार्थना ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. अग्नि म्हणजे केवळ विस्तवच असा अर्थ नेहमीं नसे. केव्हां केव्हां त्यापेक्षां अधिक अर्थ अग्नि या नामांत असे. जसे विठ्ठलभक्त अथवा खंडोबाभक्त विठोबाला अथवा खंडोबाला केव्हां केव्हां पाषाणाची मूर्ती या संबंधानें आणि केव्हां केव्हां अधिक अर्थ समजून पाचारितात, तसे आर्यलोकहि अग्नी वगैरे देवांविषयीं करीत असें हें जसें उदाहरण आहे तशीं दुसरींहि पुष्कळ आहेत. तीं पुढें येत जातील.

'तर...तूं'='स [त्वम्]'.

४. या मंत्रांत असा भावार्थ आहे कीं, 'मंत्रवक्त्यानें अर्पण केलेलें जें हवि तें आणि अगदी नूतन रचिलेलें जें गायत्रीवृत्तांतील सूक्त तें अग्नीनें कृपा करून देवांपाशीं निवेदन करावें, म्हणजे देवांपाशीं त्याणें जाऊन त्यांची शिफारस करावी म्हणजे ते तें हवि आणि स्तोत्र ग्रहण करितील.' देवांनीं अनाथ मनुष्यावर दया करावी म्हणून किती नम्रतापूर्वक प्रार्थना होत आहे ती ध्यानांत ठेवावी.

'आमचें गायत्रीच्छंदानें केलेलें अगदी नूतन स्तोत्र'='अस्माकं नव्यासं गायत्रं.' म्हणजे हें स्तोत्र जुनें म्हणत आहों असें नाहीं. आतांचे आतां नुकेंच रचून म्हणत आहों तें. नुकें नवीन रचिलेलें स्तोत्र असलें म्हणजे तें देवास जुन्या स्तोत्रापेक्षां अधिक प्राह्य आणि प्रिय होत असे अशाविषयीं पुष्कळ ठिकाणीं उदाहरणें आलीं आहेत, आणि या पूर्वींहि त्याविषयीं सांगितलें आहे. या मंत्रावरून हें सूक्त अनादि असें कसें म्हणवेल? •

५. तीन प्रकारची जी संपत्ति म्हणजे सुखाचे प्रकार त्यांचा भाग मंत्रवक्ता अग्नीपाशीं मागत आहे. सायणाचार्य म्हणतात कीं, अगदी वरचीं सुखें म्हणजे द्युलोकांत असलेलीं, मधलीं म्हणजे अंतरिक्षांत असलेलीं, आणि खालची संपत्ति म्हणजे पृथ्वीवर असलेली होय.

या मंत्रांतील दुसऱ्या चरणांत जो 'वाजेषु' शब्द आहे तो आणि तिसऱ्यांत असलेला 'वस्वः' हे एक अर्थीं येथें योजिले आहेत. केवळ वृत्तसुखासाठींच दोन शब्द घातले आहेत. वस्तुतः एकच विवक्षित दिसतो.

**आ नो भज परमेष्वा वाजेषु मध्यमेषु ।**
**शिक्षा वस्वो अन्तमस्य ॥ ५ ॥ २२ ॥**

आ । नः । भज । परमेषु । आ । वाजेषु । मध्यमेषु ।
शिक्ष । वस्वः । अन्तमस्य ॥ ५ ॥ २२ ॥

**विभक्तासि चित्रभानो सिन्धोरूर्मा उपाक आ ।**
**सद्यो दाशुषे क्षरसि ॥ ६ ॥**

विऽभक्ता । असि । चित्रभानो इति चित्रऽभानो । सिन्धोः । ऊर्मौ । उपाके । आ ।
सद्यः । दाशुषे । क्षरसि ॥ ६ ॥

**यमग्ने पृत्सु मर्त्यमवा वाजेषु यं जुनाः ।**
**स यन्ता शश्वतीरिषः ॥ ७ ॥**

यम् । अग्ने । पृत्ऽसु । मर्त्यम् । अवाः । वाजेषु । यम् । जुनाः ।
सः । यन्ता । शश्वतीः । इषः ॥ ७ ॥

---

**भाषायाम्.**

५. हे अग्ने, [ त्वं ] नः (=अस्मभ्यं ) परमेषु (=उच्चैस्तमेषु ) वाजेषु, ( =द्युलोकवर्तिनीषु संपत्सु ) आभज (=भागमर्पय ), मध्यमेषु ( =अन्तारिक्षवर्तिषु) [ वाजेषु ] [ आभज=भागमर्पय ], अन्तमस्य ( =अन्तिकतमस्य भूलोकसंबन्धिनो वस्वः ( =वसुनः=संपदः ) [ भागं ] शिक्ष ( =अर्पय, देहि ) ॥

६. हे चित्रभानो ( =सुन्दरतेजोयुक्त ) [ अग्ने ], [ त्वं हि ] सिन्धोः ( =प्रभूतस्य सोमस्य ) ऊर्मौ उपाके ( =ऊर्मेः समीपं, धारायाः समीपम् ) [ उपासकाय ] विभक्ता असि ( =धनानां दाता भवसि ), [ त्वं ] दाशुषे ( =हविर्दत्तवते उपासकाय ) सद्यः क्षरसि ( =तदानीमेव अभीष्टस्य वृष्टिं करोषि ) ॥

७. हे अग्ने, यं मर्त्यं [ त्वं ] पृत्सु ( =संग्रामेषु ) अवाः ( =अवसि=रक्षसि ), यं [ मर्त्यं ] [ च ] [ त्वं ] वाजेषु ( =युद्धेषु ) [ अ ]जुनाः (=प्रेरयसि=रक्षसि ) स [ मर्त्यः ] शश्वतीः इषः ( =नित्यानि अन्नानि) यन्ता ( =नियन्ता=निश्चयेन नियंस्यति=तासां पतिर्भविष्यति ) ॥

५. [हे अग्नी], अगदी वरच्या [सुखां]तून आम्हांस भाग दे, मधल्या सुखांतून [भाग आम्हांस दे]; [आणि] खालच्या संपत्ती-चा[हि] [भाग आम्हांस] दे.

६. हे चित्रभानू [अग्नी], [तूं] सिंधूच्या लाटेजवळच [संपत्तीतें] देणारा होस. [तूं] उपासकाकरितां एकाएकीं वर्षतोस.

७. हे अग्नी, ज्या मर्त्याला [तूं] युद्धांत संभाळितोस [आणि] समरांगणांत ज्याला साहाय्य करितोस तो शाश्वत संपत्तींचा धनी होतो.

5. Give us, [Agni], a share in the highest [enjoyments], [a share] in the middle enjoyments, give a share in the lower wealth.

6. O [Agni] of delightful splendor, [thou] art a giver [of riches] in the vicinity of the stream of the Sindhu. For [thy] sacrificer [thou] rainest immediately.

7. That mortal whom, Agni, [thou] helpest in battles [and] directest in fights becomes the master of perpetual wealth.

---

६. हा मंत्र कठिण आहे. शब्द उघड आहेत तरी एकंदर अर्थ गूढ आहे. भावार्थ नीट समजत नाहीं. 'सिंधूची लाट' (=सिन्धोरूर्मिः) म्हणजे सोमरसाचा जो प्रवाह यज्ञांत असती तो असें दिसतें. आणि त्या सिंधूच्या लाटेजवळ संपत्तीचा दाता आहेस म्हणजे तुला सोमादि हव्यद्रव्यें अर्पण केल्याबरोबर तूं प्रसन्न होतोस आणि वर्षूं लागतोस. वर्षूं लागतोस म्हणजे सायणाचार्य इच्छिलेलें जें असेल त्याचा जणुं काय पाऊस पाडितोस असें म्हणतात. तसें असूं शकेल.

सिंधुशब्दाचा अर्थ येथें सूचविल्याप्रमाणें होतो याविषयीं "समुद्रेण सिन्धवः यादमानाः इन्द्राय सोमं सुषुतं भरन्तः अंशुं दुहन्ति हस्तिनः भरित्रैः मध्वः पुनन्ति धारया पवित्रैः" ऋ. ३. ३६. ७, हें आणि "महान्तं त्वा महीः अनु आपः अर्षन्ति सिन्धवः यद्गोभिः वासयिष्यसे" ९.२.४ हीं आणि दुसरीं स्थलें आहेत.

'चित्रभानु' म्हणजे ज्याची प्रभा सुंदर आहे तो. हें अग्नीचें विशेषण पुष्कळ ठिकाणीं येत असतें आणि विशेषनामाप्रमाणेंच झालें आहे.

७. 'साहाय्य करितोस', 'जुनाः'. अक्षरशः अर्थ 'प्रेरितोस'. म्हणजे ज्याचें सारथ्य करितोस असें म्हटल्यास कदाचित् चालेल.

नकिरस्य सहन्त्य पर्येता कयस्य चित् ।
वाजो अस्ति श्रवाय्यः ॥ ८ ॥

नकिः । अस्य । सहन्त्य । परिऽएता । कयस्य । चित् ।
वाजः । अस्ति । श्रवाय्यः ॥ ८ ॥

स वाजं विश्वचर्षणिरर्वद्भिरस्तु तरुता ।
विप्रेभिरस्तु सनिता ॥ ९ ॥

सः । वाजम् । विश्वऽचर्षणिः । अर्वत्ऽभिः । अस्तु । तरुता ।
विप्रेभिः । अस्तु । सनिता ॥ ९ ॥

जराबोध तद्विविड्ढि विशेविशे यज्ञियाय ।
स्तोमं रुद्राय दृशीकम् ॥ १० ॥ २३ ॥

जराऽबोध । तत् । विविड्ढि । विशेऽविशे । यज्ञियाय ।
स्तोमम् । रुद्राय । दृशीकम् ॥ १० ॥ २३ ॥

---

## भाषायाम्.

८. हे सहन्त्य (=शत्रूणामभिभवनशील) [अग्ने], अस्य कयस्यचित् (=पूर्वोक्तस्य त्वद्भक्तस्य कस्यापि) [मर्त्यस्य] नकिः पर्येता [अस्ति] (=कोपि पर्येता आक्रमिता नास्ति) । [तस्य] वाजो (=बलं) [हि] श्रवाय्यः (=प्रख्यातः) [अस्ति] ॥

९. स विश्वचर्षणिः (=सर्वमित्रो विश्वव्यापी वा) [अग्निः] [अस्मदर्थे] अर्वद्भिः (=अस्माकमश्वैः) वाजं (=संग्रामं) तरुता (=विजेता) अस्तु, विप्रैः (=अस्माकं कविभिः=स्तोत्रकृद्द्वारा) सनिता (=अभीष्टस्य दाता) अस्तु ॥

१०. तत् (=अतः कारणात्) हे जराबोध (=स्तुत्या अग्निं बोधयन्) [कवे], [त्वं] विशेविशे (=सर्वस्मै गृहाय=सर्वेषु गृहेषु) यज्ञियाय (=यज्ञार्हाय) रुद्राय (=महते) [अग्नये] दृशीकं (=दर्शनीयं=समीचीनं) स्तोमं (=स्तोत्रं) विविड्ढि (=व्याप्नुहि=कुरु) ॥

८. हे पराक्रमी [अग्नी], असल्या कोणत्याहि [मनुष्या]चा कोणीहि पाडाव करणारा नाहीं; [कारण कीं] [त्याचें] बळ प्रसिद्ध असतें.

९. तर तो विश्वव्यापी [अग्नि] [आमच्या] घोड्यांनीं संग्राम जिंकणारा होओ, [आणि] [आमच्या] कवींच्या योगेंकरून [द्रव्या।चा] दाता होओ.

१०. तर हे स्तवनानें [अग्नीला] जागृत करणाऱ्या [कवी], [तूं] घरोघर यज्ञयोग्य [आणि] महान् [अग्नी]साठीं सुंदर स्तोत्र रचीत जा.

8. Mighty [Agni], [there exists] no conqueror of any such [man]. [For his] power is well-known.

9. May he, therefore, the omnipresent [Agni], be the winner of the battle through [our] horses [and] the giver [of wealth] through [our] poets.

10. Do thou therefore, O [singer], who wakest [Agni from his sleep] compose in every house a beautiful hymn to the adorable [and] great [Agni].

---

८. पूर्वींच्या मंत्रांत जें सांगितलें कीं, अग्नीचें साहाय्य युद्धांत ज्या मर्त्याला असतें तो संपत्तींचा धनी होतो, त्या तसल्या कोणत्याहि मनुष्याला जिंकणाराहि कोणी नसतो असें या मंत्रांत सांगतो. आणि जिंकणारा कोणी नसतो त्याचें कारण असें कीं, तो मनुष्य अग्नीच्या आश्रयाखालचा आहे अशा प्रख्यातीपासून त्याला बळ येतें. म्हणजे अशी जी प्रख्याति तेंच त्याचें बळ असा भावार्थ समजावयाचा.

९. या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'अग्नीच्या साहाय्यानें आमच्या घोड्यांस लढाईंत यश येओ, आणि अग्नि आमच्या ऋत्विज्ञांनीं केकेली स्तुती मान्य करून घेओ, आणि प्रसन्न होऊन आम्हांस धन देओ.'

१०. हा मंत्र कांहींसा दुर्बोध आहे. दुर्बोधत्व दोन गोष्टींविषयीं आहे: १ ह्या मंत्रांत कोण कोणाला बोलतो आहे? २ मंत्र कोणाविषयीं आहे? आम्हीं यास्कास अनुसरून पहिल्या प्रश्नाविषयीं असें समजतों कीं, ह्या मंत्राचा जो वक्ता तो कवीस (म्हणजे दुसऱ्या कवीस अथवा आपणच जो कवि त्याला) बोलत आहे. दुसऱ्या प्रश्नाविषयीं सायणाचार्यांस अनुसरून आम्ही म्हणतों कीं, हा मंत्र अग्नीविषयीं आहे.

'घरोघर'='विशेविशे.' अक्षरशः अर्थ 'प्रत्येक यजमानासाठीं' अथवा 'प्रत्येक घरासाठीं'='दर घराला'='घरोघर.' ऋ. १०. ४०. १ यांत "प्रातर्यावानं विभ्वं विशेविशे वस्तोर्वस्तोः वहमानं धिया शमि" या मंत्रांतील 'विशेविशे' याचा अर्थ सायणाचार्यांनींच 'सर्व मनुष्यामध्यें'='सर्व मनुष्यांच्या घरीं', (="सर्वेषु मनुष्येषु") असा केला आहे तो पाहा.

'महान् [अग्नी]साठीं'='रुद्राय

स नो॑ म॒हाँ अ॑निमा॒नो धू॒मके॑तुः पुरु॒श्च॒न्द्रः ।
धि॒ये वाजा॑य हिन्वतु ॥ ११ ॥
सः । नः॒ । म॒हान् । अ॒नि॒ऽमा॒नः । धू॒मऽके॑तुः । पु॒रु॒ऽच॒न्द्रः ।
धि॒ये । वाजा॑य । हि॒न्व॒तु ॥ ११ ॥
स रे॒वाँ इ॑व वि॒श्पति॒र्दैव्यः॑ के॒तुः शृ॑णोतु नः ।
उ॒क्थैर॒ग्निर्बृ॒हद्भा॑नुः ॥ १२ ॥
सः । रे॒वान्ऽइ॑व । वि॒श्पतिः॑ । दैव्यः॑ । के॒तुः । शृ॒णो॒तु॒ । नः॒ ।
उ॒क्थैः । अ॒ग्निः । बृ॒हत्ऽभा॑नुः ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

११. स महान् अनिमानो (=निमानवर्जितः=अपरिच्छिन्नो) धूमकेतुः (=धूमेन ज्ञाप्यमानः) पुरुश्चन्द्रः (=बहुदीप्तिः) [अग्निः] धिये (=स्तुतये=स्तुतिं कर्तुं) वाजाय [च] (=अन्नादिसंपदे=अन्नादिसंपदम् अवाप्तुं च) हिन्वतु (=हिनोतु=प्रीत्या प्रेरयतु) ॥

१२. स दैव्यः केतुः (=देवानां दूतो) बृहद्भानुः (=प्रौढप्रकाशः) अग्निः, रेवान् (=धनवान्) विश्पतिः (=विशां पतिः=राजा) इव, उक्थैः (=अस्माकं स्तोत्रैः=अस्मत्स्तोत्रद्वारा) नः (=अस्मान्) शृणोतु ॥

---

[अग्नये].' 'रुद्र' शब्दाचा अर्थ आम्हीं येथें केला आहे त्याहून कांहीं भिन्न असला तर असेल. पण तें या स्थलीं अग्नीचें विशेषण आहे यांत संशय नाहीं. यी मंत्रावरील भाष्यांत सायणाचार्यहि तें अग्नीचेंच विशेषण करितात. शिवाय ऋ. ३.२.५. "अग्निं सुम्नाय दधिरे पुरः जनाः...यतस्रुचः सुरुचं विश्वदेव्यं रुद्रम्..." यांत 'रुद्र' हें अग्नीचें विशेषण असून त्याचा अर्थ 'दुःखें पळविणारा' असा (तशी शब्दव्युत्पत्ती करून) सायणाचार्य करितात. शिवाय ऋ. ८.७२. ३ यांतहि 'रुद्र' हें अग्नीचें विशेषण आहे (येथें सायणाचार्य ऋ. ३.२.५. यांत सांगितलेला व दुसरा एक असे दोन अर्थ करून त्यांतून एक घ्यावा असें दर्शवितात).

'रचीत जा'='विविड्ढि.' याचा अर्थ आम्हीं अन्यत्र असलेल्या सायणोक्तीलाच अनुसरून केला आहे. हें 'विष्' धातूचें रूप आहे. "अस्मै वयं यत् ववान तत् विविष्मः इन्द्राय" (ऋ. ६.२३.५)='इंद्र जें जें वांछितो तें तें आम्ही करितों' यांत 'विविष्मः' याचा अर्थ सायणाचार्य 'कुर्मः'='करितों' असा करितात. शिवाय "यो भूयिष्ठं नासत्याभ्यां विवेष चनिष्ठम्" (ऋ. ५.७७.४) यांतहि सायणाचार्य 'विवेष' या 'विष्' धातूच्या रूपाचा अर्थ 'करणें', 'रचणें,' असा करितात.

या मंत्राचा अर्थ सायणाचार्यांनीं केला आहे तो असा:--

"प्रार्थना ऐकून घेणाऱ्या हे अग्नी, प्रत्येक यजमानासाठीं यज्ञसिद्धीकरितां तूं यजनांत प्रवेश कर. [यजमान] [तुज,] क्रूर [अग्नी]साठीं सुंदर स्तोत्र [गात आहे]."

११. तर तो मोठा, अपरिमित, धूम्रकेतु, [आणि] विशालतेजस्क [अग्नि] स्तोत्र [करण्या]विषयीं [आणि] अन्न [मिळविण्या]विषयीं आम्हांस प्रेरणा करो.

11. May, therefore, he, the great, the infinite, the smoke-bannered [Agni] of vast splendor inspire us to prayer [and] food.

१२. तर तो देवांचा दूत, [तो] विशालतेजस्क अग्नि, [आमच्या] स्तोत्रांच्या योगेंकरून, संपत्तिमान् राजाप्रमाणें, आमचें म्हणणें ऐको.

12. May, therefore, he the divine messenger, Agni, of vast splendor hear us through [our] hymns, like a wealthy king.

---

११. 'अपरिमित'='अनिमान:', म्हणजे ज्याला इयत्ता अथवा माप नाहीं, जो किती मोठा आहे त्याचें माप करितां येत नाहीं तो.—'धूम्रकेतु' म्हणजे धूर हीच पताका आहे ज्याची तो. हें विशेषण अग्नीस यथायोग्य लाविलें आहे यांत संशय नाहीं.—'विशालतेजस्क' हेंहि विशेषण अग्नीस यथायोग्य लाविलेलें आहे.—स्तोत्र [करण्या]विषयीं [आणि] अन्न [मिळविण्या]विषयीं'='धिये वाजाय.' या शब्दांचा अर्थ आम्हांस 'बुद्धी आणि अन्न' देओ असाहि होऊं शकेल आणि तसा केल्यास बरा दिसेल.

१२. या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'आम्ही हीं जीं स्तोत्रें म्हणत आहों तीं ऐकून अग्नि प्रसन्न होओ आणि आमची प्रार्थना ऐको.'—'देवांचा दूत'='दैव्य: केतु:.' म्हणजे देवांचा प्रसाद मनुष्यांकडेस आणणारा, आणि देवांस दिलेलें हवि देवांप्रत पोंहचविणारा. अग्नीला जसा मनुष्यांचा पुरोहित (वकील) असें म्हणत तसाच देवांचा दूत असेंहि म्हणत. मनुष्यांनीं केलेली प्रार्थना आणि अर्पण केलेलें हवि देवांप्रत प्रविष्ट करून देवांचा प्रसाद मनुष्यांवर करून देणें हें अग्नीचें मुख्य काम होय. 'देवांचा दूत' हा अर्थ येथें भाष्यकार सायणाचार्य यांसहि संमत आहे.—'आमचें म्हणणें ऐको'='न: शृणोतु.' अक्षरश: भाषांतर 'आम्हांस ऐको.' 'आमची प्रार्थना ऐको' असा भावार्थ.

नमो॑ म॒हद्भ्यो॒ नमो॑ अर्भ॒केभ्यो॒ नमो॒ युव॑भ्यो॒ नम॑ आशि॒नेभ्यः॑ ।
यजा॑म दे॒वान्यदि॑ श॒क्रवा॑म॒ मा ज्याय॑सः॒ शंस॒मा वृ॑क्षि देवाः ॥
॥ १३ ॥ २४ ॥

नमः॑ । म॒हत्ऽभ्यः॑ । नमः॑ । अ॒र्भ॒केभ्यः॑ । नमः॑ । युव॑ऽभ्यः । नमः॑ ।
आ॒शि॒नेभ्यः॑ ।
यजा॑म । दे॒वान् । यदि॑ । श॒क्रवा॑म । मा । ज्याय॑सः । शंस॑म् । आ ।
वृ॒क्षि॒ । दे॒वाः॒ ॥ १३ ॥ २४ ॥

---

## भाषायाम्.

१३. महद्भ्यो [ देवेभ्यो ] नमः ( =नमस्कारः ) [ अस्तु ], अर्भकेभ्यः ( =क्षुद्रेभ्यो ) [ देवेभ्यो ] नमः, युवभ्यः (=तरुणेभ्यो ) [ देवेभ्यो ] नमः, आशिनेभ्यो ( =वृद्धेभ्यो ) [ देवेभ्यो ] नमः । यदि ( =यस्मात्कारणाद् ) [ वयं ] शक्रवाम ( =शक्ताः स्मः ) [ तस्माद् ] देवान्यजाम ( =यजामहे=भजामहे ) । हे देवाः, [ अहं ] ज्यायसः ( =कस्यापि ज्येष्ठस्य ) [ देवस्य ] शंसं ( =स्तुतिं ) मा आवृक्षि ( =विच्छिन्नं मा कार्षं=मा विलुप्येयम् ) ॥

१३. मोठ्या [ देवां ]स नमस्कार [असो], लहान [ देवां]स नमस्कार [असो], तरुण [देवां]स नमस्कार [असो], म्हाताऱ्या [देवां]स नमस्कार [असो]. ज्यापेक्षां आम्हांस शक्ति आहे [ त्यापेक्षां ] [आम्ही] देवांस भजूया. [आणि] हे देवांनो, [कोणत्याहि] [ एखाद्या ] जुन्या [देवा]च्या स्तुतीचा अतिक्रम मजकडून होऊं देऊं नका.

13. Adoration to the great [gods] adoration to the small [gods], adoration to the young [gods], adoration to the old [gods]. Let us worship the gods since we can [do so]. May I not, O gods, pass over the praise of [ any ] elderly [god].

१३. हें भाषांतर सायणाचार्यांच्या भाष्यास अनुसरून केलें आहे, आणि आम्हांस भाष्यकारांचा हा अर्थ युक्त दिसतो. मात्र ते 'यदि' या अव्ययाचा अर्थ 'जेव्हां' असा करितात. अनेक देवांविषयीं पुरातन आर्य स्तुती करूं लागले म्हणजे, सर्व कांहीं लहान मोठे, जुने, नवे जे असतील त्या सर्व देवांचा समावेश ज्यांत होईल अशी प्रार्थना करीत,आणि कोणत्याहि देवास आपण वगळलें असें दिसूं नये याविषयीं ते फार काळजी घेत. त्याचें उदाहरण या मंत्रांत आहे. पूर्वींहि असें उदाहरण एक आलें आहे. सूक्त १४ मंत्र ८ याजवरची टीप १०७. व्या पृष्ठावर पाहा.

सायणाचार्य मात्र असें सांगतात कीं, 'अग्नीनें शुनःशेपाला विश्वेदेवांची स्तुती करावयास सांगितल्यामुळें ( २४ व्या सूक्ताच्या आरंभीं दिलेली टीप पाहा ) शुनःशेपानें ही ऋचा म्हणून विश्वेदेवांची स्तुति केली'. पण तसें समजलें पाहिजे असें नाहीं, असें ऋचेच्या शब्दांकडे आणि अर्थाकडे पाहिलें तर त्यांत यूपबद्ध शुनःशेपाच्या स्थितीस अनुलक्षून म्हटल्यासारिखी ही ऋचा अथवा हें सूक्त दिसत नाहीं.

• या मंत्रावरून इतकें दिसून येतें कीं, सगळेच देव एकसारिखे नव्हते. त्यांत लक्ष्यांत ठेवण्याजोगें इतकें आहे कीं, कितीएक जुने आणि कितीएक नवे असे होते. म्हणजे कितीएकांची भक्ती फार दिवसांपासून लोक करीत आले होते आणि कितीएक नुकेच प्रसिद्धीस येत होते असा भावार्थ दिसतो.

## सूक्तम् २८.

अजीगर्तपुत्रः शुनःशेप ऋषिः । देवता—१-४ इन्द्रः । ५-६ उलूखलम् । ७-८ उलूखलमुसले । ९ हरिश्चन्द्रः अधिषवणचर्म वा सोमो वा । छन्दः— १-६ अनुष्टुप् । ७-९ गायत्री ॥

**यत्र ग्रावा पृथुबुध्न ऊर्ध्वो भवति सोतवे ।**
**उलूखलसुतानामवेद्विन्द्र जल्गुलः ॥ १ ॥**

यत्र । ग्रावा । पृथुऽबुध्नः । ऊर्ध्वः । भवति । सोतवे ।
उलूखलऽसुतानाम् । अव । इत् । ऊम् इति । इन्द्र । जल्गुलः ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे इन्द्र, यत्र पृथुबुध्नः (=स्थूलमूलो) ग्रावा (=पाषाणः) सोतवे (=सोतुं सोमाभिषवं कर्तुम्) ऊर्ध्वः (=उन्नतः=सिद्धो) भवति [तत्र,] उलूखलसुतानाम् (=उलूखले अभिषुतानां) [सोमानां=सोमान्] अवेत् उ (=अवैव=ते सोमास्तवोदरे सत्वरं यथा गच्छेयुस्तथा) जल्गुलः (=भक्षय=पिब) ॥

## सूक्त २८.

**ऋषि—पूर्ववत्. देवता—१-४** इंद्र, ५ ६ उखळ, ७-८ उखळमुसळें म्हणजे उखळ आणि मुसळ, आणि ९ हरिश्चंद्र, अधिषवणचर्म ( म्हणजे बैलाच्या चामड्यावर सोम काढीत तें चामडें ) अथवा सोम. **वृत्त**—१-६ अनुष्टुभ्, आणि ७-९ गायत्री.

१. हे इंद्रा, जेथें मोठ्या बुडाचा पाषाण सोमरस काढण्याकरितां उंच उभा राहतो [ तेथें ] उखळाच्या योगानें काढिलेले सोमरस पिऊन टाक.

## Hymn 28.

To 1-4 *Indra*, 5-6 to *Ulûkhalam* (*i. e.* Mortar), 7-8 to *Ulûkhala-Musalau* (*i. e.* Mortar and Pounder), 9 to *Haris'chandra*, *Adhishavaṇacharma* (the cow-hide used in pressing the juice) or to *Soma*. By the author of the previous hymn. Metre *Anushṭup* but in 7-9 the *Gâyatri*.

1. Where, Indra, the wide-bottomed stone stands high that the juice may be expressed, quaff down the Somas expressed in the Mortar.

---

१. हा मंत्र चमत्कारिक आहे. यांत इंद्रास जेथें सोम सिद्ध करितात तेथें येऊन तो सोम पिण्याची प्रार्थना आहे. उखळांत सोमवल्ली घालून ( कुटून? ) सोम काढिले आहेत ते पी असें ह्या.

हें सर्व सूक्तच मोठ्या महत्त्वाचें आहे असें आम्हांस वाटतें. कारण कीं, प्राचीन काळीं सोमरस कसा काढीत त्याविषयीं या सूक्तावरून कांहीं माहिती आपणास मिळते असें वाटतें. ती अशीः— सोम कुटावयास ग्रावा म्हणून एक फत्तर असे. तो बहुतकरून वरवंट्यासारिखा अथवा बत्त्यासारिखा असावा. त्याचें नांव ग्रावा. त्याणें सोम कुटून, वाटून अथवा रगडून सोमरस काढीत असत आणि तो सोमरस उखळांत काढीत असें दिसतें ( मंत्र १ ). 'अधिषवण्य' या नांवाचे दोन दगड ( अथवा फळ्या? ) असत, पण त्यांचें काय करीत ते स्पष्ट सांगत नाहीं, मात्र त्यांस एकाला लावून मांडीत ( मंत्र २ ). सोम पाट्यावर बायका वाटीत अथवा रवीनें दहीं घुसळल्याप्रमाणें घुसळीत, त्यामुळें त्यांचे हात मागें पुढें होत ( मंत्र ३, ४ ). सर्व घरोघर सोम उखळांत काढीत ( मंत्र ५ ). ज्या उखळांत सोमरस काढीत तें लांकडाचें केलेलें असे ( मंत्र ६ ). उखळ आणि मुसळ यांच्या योगें सोम कुटून वगैरे तयार होऊं लागला म्हणजे घोडा धाटें चावीत असल्याप्रमाणें आवाज होत असे, आणि उखळ आणि मुसळ यांच्या योगानें सोम तयार होई म्हणून लोकांची त्यांजवर फार प्रीति बसलेली असे ( मंत्र ७ ). सोमरस काढण्याला उखळमुसळें लागत आणि तीं लांकडाचीं केलेलीं असत, आणि सोमरस गोड असे, आणि उखळमुसळें उंच असत ( मंत्र ८ ). सोम काढल्यावर पवित्र म्हणून जें गाळणें असे त्यांत तो घालीत आणि दोन पात्रांत भरीत आणि बैलाच्या अथवा गाईच्या चामड्यावर ठेवीत, आणि नंतर देवास

अर्पण करीत ( मंत्र ९ ).

अशा ह्या गोष्टी आपणास या सूक्तावरून समजतात. पण आलीकडेस जे यज्ञ होतात त्यांत सोमरस म्हणून जो तयार होतो तो वेगळ्याच रीतीनें तयार करितात. त्यांत ग्राव्याचा उपयोग तर असतो, पण त्याचा उपयोग खलांतील बत्त्याप्रमाणें करितात. आणि उखळ मुळींच लागत नाहीं. तो घुसळीत नाहींत व वाटीतहि नाहींत. त्यांत रवी नसते आणि दोऱ्याचेंहि कारण नाहीं, व मुसळहि लागत नसतें. व त्यांत गाईचें अथवा बैलाचें चामडें अशुद्ध मानितात आणि त्या ऐवजीं कृष्णाजिन म्हणजे काळविटाचें चामडें घेतात आणि त्याजवर कुटतात.

हल्लीं कसा सोमरस काढितात त्याविषयीं खालील टीप एका विद्वान् श्रोत्र्यानें (कीं जे महाराष्ट्रांत होत असलेल्या सर्व यज्ञांत असतातच त्यांनीं ) दिलेली आहे.

"प्रथम ब्राह्मणापासून सोमवल्ली यज्ञशाळेच्या बाहेर विकत घेऊन ती यज्ञशाळेंत न्यावी. नंतर आप्यायनादि ( म्हणजे सुकूं नये म्हणून त्याजवर पाणी शिंपडण्याचे वगैरे ) संस्कार झाल्यानंतर ती सोमवल्ली अधिषवणफलावर आंथरलेल्या कृष्णाजिनावर ठेवावी. अधिषवणफल म्हणजे ज्यावर सोम कुटावयाचा अशा दोन फळ्या. त्या ३६ अंगुळ्या लांब व १८ अंगुळ्या रुंद प्रत्येकीं असाव्या, म्हणजे दोन्ही मिळून जवळ जवळ आंथरल्यावर समचौरस प्रत्येक बाजू ३६ अंगुळ्या होते. त्याजवर कृष्णाजिन म्हणजे काळविटाचें चामडें आंथरावें. त्यावर वल्ली ठेविल्यानंतर ग्रावे म्हणजे दगडी च्यार बत्ते असतात त्यांचा वरील भाग बारीक आणि खालील जाडा असतो. त्यांनीं ती वल्ली कुटावी. कुटतांना थोडें पाणी मंत्र म्हणून घालावें लागतें, मग आधवनीय या नांवाचें एक मातीचें किंवा धातूचें अनुकूळ असेल तसें भांडें घेऊन त्यांत कुटलेली सोमवल्ली घालावी, आणि पाणी पुष्कळ ओतावें; आणि कुसकरून पाण्यांत मिश्रित करावी. मग सोमवल्लीचा रस पाण्यांत चांगला मिसळल्यानंतर चोंथा पिळून बाहेर काढावा. त्याला ऋजीष असें म्हणतात. मग अधिषवणावर रंगाऱ्याच्या घडवंचीसारिखी एक घडवंची गाळण्याकरितां ठेवून तिचेवर दशापवित्र या नांवाचें गाळणें म्हणजे गाळण्याचें वस्त्र बांधावें. आणि त्यांत पाण्यांत मिसळलेला सोम आधवनीयांतून घेऊन ओतावा. पवित्राला खालच्या आंगीं लहानसें भोंक पाडून त्यांत लोकरीचा दोरा ओंवून तो दुणून वळून बारीक धार पडे अशी दशा करावी, म्हणजे ' वरील सोम दशेवरून बारीक धारेनें खालीं गळतो. तो पात्रांत घ्यावा. पात्रें ग्रह, चमस इत्यादि नांवाचीं आहेत. मग तो सोम घेऊन वेगवेगळ्या देवतांच्या प्रीत्यर्थ अग्नीमध्यें होमून मग सदोमंडपांत होम करणाऱ्यांनीं, व वषट्कार म्हणणाऱ्यांनीं, उद्गात्यांनीं, यजमान, ब्रह्मा, सदस्य इतऱ्यांनीं अनुक्रमें भक्षण करावा.

"हा सोम म्हणजे रानशेर ज्याला म्हणतात तें झाड होय. तें पुण्याच्या नजीक चतुःशिंगीच्या डोंगरावर पुष्कळ आहे. त्याला कांटे नसतात. पानेंहि नसतात. सुमारें चार हात उंच झाड काड्या काड्यांचें असतें. काड्या हाताच्या बोटाच्या सुमारें मोठ्या असतात.

रंग हिरवा असतो. झाड तोडून आणितांना सगळें आणतात. रस किंचित् तुरट असतो. प्याल्यावर अंमल वगैरे कांहींच येत नाहीं. प्यावयास मधुर किंवा रुचिकर अथवा पिण्याविषयीं प्रीतिकर लागत नाहीं. हें सोमाचें झाड मूळ झाडाचा प्रतिनिधि आहे. मूळ सोमाचें झाड नव्हे असें शास्त्रांत आहे व समजतात. या झाडाला खरोखर पूतिक असें पुल्लिंगी नांव संस्कृतांत आहे. मूळ सोम न मिळेल तर हे पूतिक घ्यावे असें श्रौतसूत्रांतून आहे त्यावरून हे घेत असतात.*

"या सोमरसांत दूध, दहीं, सुवर्णरज, तूप देवताभेदानें घालून मग अर्पण करण्याचा विधि आणि चाल आहे." *

सोमवल्ली न मिळेल तर 'पूतिक' अथवा 'फाल्गुन' या नांवाच्या वनस्पतींचा उपयोग करावा असें "अनधिगमे पूतिकान् फाल्गुनानि" ( आश्वलायनश्रौतसूत्र ६.८.५ ) या सूत्रांत* सांगितलें आहे.

पण आम्हांस असाहि संशय आहे कीं, सोमाचें झाड मिळत नाहीं म्हणून पूतिकाचा रस काढून देवांस अर्पण करावा असें सूत्रांत जें सांगितलें तें पूतिक झाड आणि चतुर्शिंगीच्या डोंगरावरील रानशेर हीं एकच म्हणून कशावरून? पूतिक नांव नाहींसें होऊन रानशेर कसें पडेल? आणि पूतिकाविषयीं लिहिणारा शास्त्रकार कधीं व कोठें झाला? वर उतरून घेतलेल्या सूत्रावरील वृत्तिकार गार्ग्य नारायण म्हणतो कीं, "फाल्गुन ( आणि पूतिक? ) या वनस्पती अप्रसिद्ध म्हणजे बहुत करून कोणास ठाऊक नाहींत अशा आहेत, यास्तव त्या ज्यास ठाऊक असतील त्यास विचारून त्याविषयीं माहिती करून घ्यावी." तेव्हां रानशेर आणि पूतिक किंवा फाल्गुन हे एकच याविषयींची माहिती आलीकडच्या आमच्या यजमानास आणि ऋत्विजास कोणाकडून मिळाली? या गोष्टींचा विचार केल्यावर आणि सोमरस म्हणून जो अर्पण करितात त्याला माधुर्यादि आणि मादादि प्राचीन सोमाचे गुण कांहींच नसल्यामुळें आम्हांस अशी शंका येते कीं, तूर्त जे यज्ञ होत असतात त्यांत सोमाविषयीं देवांची वंचना होते, आणि गोड, मोठा अंमल आणणारा, परम सुवासिक आणि दिसण्यांत सुंदर असा सोम प्यावयास न मिळतां, त्या ऐवजीं ओंगळ एका रानटी झाडाचा, अंमलहि न आणणारा, आनंदहि न करणारा आणि पिण्याविषयीं अत्यंत कंटाळा आणणारा ओंगळ रस त्यांस अर्पण केला जातो. तर पाऊस पडावा त्या ऐवजीं अवर्षण पडतें, पुत्र न होतां बायकोच उलटी मरून जाते, आणि संकट दूर न होतां असलेला हातांतला अधिकारच नाहींसा होतो अथवा फाशीचीच शिक्षा होते यांत काय नवल!

यत्र द्वाविव जघनाधिषवण्या कृता ।
उलूखलसुतानामवेद्विन्द्र जल्गुलः ॥ २ ॥

यत्रं । द्वौऽइव । जघना । अधिऽसवन्या । कृता ।
उलूखलऽसुतानाम् । अवं । इत् । ऊम् इति । इन्द्र । जल्गुलः ॥ २ ॥

यत्र नार्यपच्यवमुपच्यवं च शिक्षते ।
उलूखलसुतानामवेद्विन्द्र जल्गुलः ॥ ३ ॥

यत्रं । नारी । अपऽच्यवम् । उपऽच्यवम् । च । शिक्षते ।
उलूखलऽसुतानाम् । अवं । इत् । ऊम् इति । इन्द्र । जल्गुलः ॥ ३ ॥

यत्र मन्थां विबध्नते रश्मीन्यमितवा इव ।
उलूखलसुतानामवेद्विन्द्र जल्गुलः ॥ ४ ॥

यत्रं । मन्थाम् । विऽबध्नते । रश्मीन् । यमितवैऽइव ।
उलूखलऽसुतानाम् । अवं । इत् । ऊम् इति । इन्द्र । जल्गुलः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

२. हे इन्द्र, यत्र द्वौ जघनौ (=जघनप्रदेशौ) इव [द्वौ] अधिषवण्यौ (=सोमाभिषवयन्त्रस्य द्वौ भागौ) कृतौ (=स्थापितौ) [वर्तेते] [तत्र] उलूखलसुतानाम् (=उलूखले अभिषुतानां) [सोमानां=सोमान्] अवेत् उ (=अवैव=ते सोमास्तवोदरे सत्वरं यथा गच्छेयुस्तथा) जल्गुलः (=भक्षय=पिब) ॥

३. हे इन्द्र, यत्र नारी (=मन्थनकर्त्री स्त्री) [सोममन्थने] अपच्यवं (=मन्थनरज्जोः अपाकर्षणं=स्वस्मात् अपचोदनम्, अपनयनम्) उपच्यवं (=मन्थनरज्जोः उपाकर्षणं=स्वसमीपम् उपाकर्षणम्, उपानयनं) च शिक्षते (=शिक्षणार्थमिव पुनः पुनः करोति) [तत्र] उलूखलसुतानाम् (=उलूखले अभिषुतानां) [सोमानां=सोमान्] अवेत् उ (=अवैव=ते सोमास्तवोदरे सत्वरं यथा गच्छेयुस्तथा) जल्गुलः (=भक्षय= पिब) ॥

४. यत्र मन्थां (=मन्थानं), [अश्वं] यमितवै (=यन्तुं=नियन्तुं) रश्मीन् (प्रग्रहान्) इव [उपासकाः] [रश्मिभिः=रज्जुभिः] विबध्नते (=विबध्नन्ति) तत्र उलूखलसुतानाम् (=उलूखले अभिषुतानां) [सोमानां=सोमान्] अवेत् उ (=अवैव =ते सोमास्तवोदरे सत्वरं यथा गच्छेयुस्तथा) जल्गुलः (= भक्षय=पिब) ॥

२. जेथें सोमरस काढण्याचे दोन्ही अधिषवण्य दोन जघनांप्रमाणें [एकावर एक लावून] ठेविलेले आहेत [तेथें], हे इंद्रा, उखळाच्या योगानें काढिलेले सोमरस पिऊन टाक.

३. जेथें नारी पुढें लोटण्यास आणि मागें ओढण्यास शिकते [तेथें], हे इंद्रा, उखळाच्या योगानें काढिलेले सोमरस पिऊन टाक.

४. जेथें [घोड्यास] आवरण्याला लंगाम [बांधावा] तशी दोरी रवीला बांधितात [तेथें], हे इंद्रा, उखळाच्या योगानें काढिलेले सोमरस पिऊन टाक.

2. Where, Indra, the two halves of the Soma-press are placed close together like the two loins, quaff down the Somas expressed in the Mortar.

3. Where, Indra, the woman learns to push and to pull, quaff down the Somas expressed in the Mortar.

4. Where, Indra, [they] tie strings to the churning-staff as the reins [to the horse] to restrain [him], quaff down the Somas expressed in the Mortar.

---

२. 'सोमरस काढण्याचे दोनी अधिषवण्य.' 'अधिषवण्य' या पदें सायणाचार्य 'अधिषवणफलक' शब्दानें भाष्य करितात. म्हणजे ज्यांवर चामडें घालून त्या चामड्यावर सोम कुटावयाचा त्या दोन फळ्या असा सायणाचार्यांचा भावार्थ दिसतो. आम्हीं भाषांतर केलें आहे तें अधिषवण्य म्हणजे सोम काढण्याचा जो चरक (किंवा पाटींवरवंटा) त्याचा खालचा (स्त्रीभाग) आणि वरचा (पुंभाग) असे जे दोन भाग ते होत असें समजून केलें आहे. ते ग्राम्यधर्माच्या वेळीं स्त्रीपुरुषांचे दोनी जघन एकमेकाला लागतात तसे जवळ जवळ चिकटून लावून एकावर एक ठेवावयाचे असा या मंत्राचा भावार्थ आहे. पण तूर्त होत असलेल्या यज्ञांत अधिषवण्य म्हणून दोन फळ्याच असतात ( वरील मंत्रावरील टीप पाहा ). तशा पुरातन म्हणजे वैदिक युगांत नसतील. आतां अधिषवण म्हणजे (अधिषवण्य आलीकडे म्हणत नाहींत) फळ्या असें समजतात आणि त्यांजवरचे सोम कुटतात, उखळांत कुटीत नाहींत. पुरातन काळीं उखळांत कुटीत असें या सूक्तावरून स्पष्ट दिसून येतें.

३. सायणाचार्यः-"जेथें म्हणजे ज्या कर्मांच्या ठायीं नारी म्हणजे पत्नी अपच्यव म्हणजे यज्ञशाळेंतून बाहेर जाणें आणि उपच्यव म्हणजे यज्ञशाळेप्रत येणें हें शिकते तेथें" इ०. परंतु सोमरस काढीत असतांना यजमानपत्नीनें शाळेबाहेर जाणें आणि पुनः आंत येणें असा विशेष विधि नाहीं. आम्हीं अर्थ शब्दशः केला आहे, त्याचा भावार्थ आम्हांस असा वाटतो कीं, सोम रवीनें घुसळतांना रवी आपल्याकडे दोरीनें ओढणें म्हणजे तो उपच्यव आणि दोरी

यच्चिद्धि त्वं गृहेगृह उलूखलक युज्यसे ।
इह द्युमत्तमं वद जयतामिव दुन्दुभिः ॥ ५ ॥ २५ ॥
यत् । चित् । हि । त्वम् । गृहेऽगृहे ।.उलूखलक । युज्यसे ।
इह । द्युमत्ऽतमम् । वद । जयताम्ऽइव । दुन्दुभिः ॥ ५ ॥ २५ ॥
उत स्म ते वनस्पते वातो वि वात्यग्रमित् ।
अथो इन्द्राय पातवे सुनु सोममुलूखल ॥ ६ ॥
उत । स्म । ते । वनस्पते । वातः । वि । वाति । अग्रम् । इत् ।
अथो इति । इन्द्राय । पातवे । सुनु । सोमम् । उलूखल ॥ ६ ॥

## भाषायाम्.

५. हे उलूखलक, यच्चिद्धि (=यद्यपि) त्वं गृहेगृहे युज्यसे (=सोमाभिषवकर्मणि प्रयुज्यसे) [तथापि] [त्वं], जयतां (=युद्धे प्राप्तजयानां) दुन्दुभिरिव, इह द्युमत्तमम् (=अतिशयेन गम्भीरं यथा स्यात्तथा) वद (=गर्जनां कुरु) ॥

६. उत (=अपि च) हे वनस्पते (=वनस्पतेः काष्ठस्य विकार उलूखल), ते (=तव) अग्रमित् (=मूर्धोपरि एव) वातो विवाति (=वात्वा गच्छति) । अथो (=अतः कारणात्) हे उलूखल, इन्द्राय पातवे (=पातुम्=इन्द्रपानाय) सोमं सुनु (=सोमाभिषवं कुरु) ॥

सोडून जाऊं दिली म्हणजे तो अपच्यव. जेथें नारी म्हणजे यजमानाची बायको गाडग्यांत दहीं घुसळल्यामुळें हात मागें पुढें करीत असते तशी सोम घुसळतांना हात मागें पुढें करिते असें तात्पर्य. सोम आतां मंथांत नसले तरी पुरातनकाळीं मंथीत असें पुढच्या ऋचेवरून स्पष्ट होतें असें आम्हांस वाटतें. अथवा नारी सोम पाटय़ावर वाटल्याप्रमाणें वाटी, त्यामुळें तिचे हात वरवंटय़ाबरोबर मागें पुढें होत असत, आणि हें जें मागें पुढें होणें त्यालाच उपच्यव आणि अपच्यव म्हणावें. आणि शेवटीं या 'उपच्यव' आणि 'अपच्यव' शब्दांच्या अर्थाविषयीं असें सांगावयाचें आहे कीं, पूर्वीच्या (म्हणजे दुसऱ्या) मंत्रांत जी दोन जघनांची (सुरतसमयीं स्त्रीपुरुषाचे शरीरमध्यभाग एकत्र होतात त्यांची) उपमा दिली आहे त्या उपमेचा संबंध घेऊन 'उपच्यव' आणि 'अपच्यव' यांचा अर्थ सुरताच्या अनुरोधानें कितीएक विद्वान लावितात तोहि चांगला संभवतो असें म्हटलें पाहिजे.

४. या मंत्राचा भावार्थ असा कीं, 'जेथें दह्याचें मंथन केल्याप्रमाणें सोमाचें मंथन रवीला दोरी बांधून करितात तेथें इंद्रानें सोमरस प्यावा.' आतां जे यज्ञ करितात त्यांत सोममंथन होत नसतें. (सोम कसा करितात त्याविषयीं वर पहिल्या मंत्रावर टीप दिली आहे ती पाहा). पण आतांच्या प्रचारास लागू नाहींत अशा जशा कितीएक गोष्टी या सूक्तांत (उखळांत सोम कुटणें इत्यादिक) आहेत, तशीच सोम घुसळणें ही असून पुरातनकाळीं प्रचारांत होती असें दिसतें.

५. हे वा उखळा, जरी तुला घरोघर कामीं लावितात [ तरीहि ] [तूं] विजयी वीरांच्या नगाऱ्याप्रमाणं येथें फार मोठा आवाज कर.

६. आणि हे वनस्पती, तुझ्या डोकीवरूनच वारा वाहात आहे, तर हे उखळा, इंद्राला पिण्याकरितां [तूं] सोमरस काढ.

5. Although, O Mortar, thou art employed in every house, do [thou] make a most roaring noise, like the drum of conquerors.

6. And, lord of the forest, the wind is blowing away over thy head; therefore, Mortar, press out the Soma for Indra to drink.

---

५. मंत्रवक्त्याचा भावार्थ असा आहे कीं, 'उखळाला घरोघरीं जरी सोम काढण्याच्या कामीं लावीत असल्यामुळें तें थकत असेल, तरी त्याणें येथें मोठा गंभीर नाद करावा, म्हणजे तो ऐकून इंद्र येऊन सोम पिईल, आणि प्रसन्न होईल. गंभीर नाद करावा तो जिंकणाऱ्या वीरांच्या दुंदुभीप्रमाणें गंभीर असावा.'—'तुला घरोघर कामीं लावितात,' 'गृहेगृहे युज्यसे.' म्हणजे सर्व उपासक सोम काढण्याच्या कामीं आपआपल्या घरीं उखळ वापरतात. ही गोष्ट आपण ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, आलीकडे जसा यज्ञ म्हणजे बहुत करून कोणी करीतच नाहीं, आणि जरी केलाच तरी पांच चार वर्षांनीं मोठ्या खर्चानें एकदा होतो तसे यज्ञ पूर्वी होत नसत. प्रत्येक दिवसीं प्रत्येक घरीं एक वेळ, दोन वेळ, तीन वेळ सुद्धां यज्ञ होत असे. आणि त्याला वेळ आणि खर्चहि फार लागत नसे. जशी आपण तूर्त पूजा करितों अथवा संध्या करितों तसा यज्ञ नित्य होत होता. आणि 'यज्ञ' शब्दाचा अर्थ तरी प्रथम पूजा असाच होता. या पूजेच्या वेळेस देवाची मूर्ति मात्र नसे. आणि फुलें, अक्षता, नैवेद्य वगैरे आधुनिक षोडशोपचारांचीहि गरज नव्हती. यज्ञ म्हणजे देवाची अथवा देवांची प्रार्थना करून, आणि केव्हां केव्हां नवीन स्तोत्रें रचून, त्याच वेळीं सोमरस काढून तो व मनुष्यांनीं नित्य खावयाचे पदार्थ ( मग ते मांसाचे अथवा धान्याचे असोत ) असे देवतेस अर्पण करीत. त्यामुळें सोम काढण्यास उखळ घरोघर कामीं लाविलें जाई असा भावार्थ आहे.

६. या मंत्रांत वनस्पति म्हणजे उखळच समजलें पाहिजे. हें सोम काढावयाचें उखळ लाकडाचें असे असें यावरून दिसतें. 'वनस्पति' या शब्दाचा अर्थ वेदांत 'मोठा वृक्ष' असा होतो, तूर्त वेल, वल्ली, असा होत असतो तसा होत नाहीं. उखळ मोठ्याशा वृक्षाचें केलें असल्यामुळें त्या उखळासच वृक्ष असें संबोधन केलें आहे.

'तुझ्या डोकीवरूनच वारा वाहात आहे'='ते....वातो विवाति अग्रमित्.' सायणाचार्यांच्या म्हणण्याप्रमाणें, मुसळाचे ठोके त्वरेनें पडत असल्यामुळें वारा सुटतो तो वारा येथें समजावयाचा.

**आयजी वाजसातमा ता ह्यु१च्चा विजर्भृतः ।**
**हरी इवान्धांसि बप्सता ॥ ७ ॥**

आयजी इत्याऽयजी । वाजऽसातमा । ता । हि । उच्चा । विऽजर्भृतः ।
हरी इवेति हरीऽइव । अन्धांसि । बप्सता ॥ ७ ॥

**ता नो अद्य वनस्पती ऋष्वावृष्वेभिः सोतृभिः ।**
**इन्द्राय मधुमत्सुतम् ॥ ८ ॥**

ता । नः । अद्य । वनस्पती इति । ऋष्वौ १ ऋष्वेभिः । सोतृऽभिः ।
इन्द्राय । मधुऽमत् । सुतम् ॥ ८ ॥

## भाषायाम्.

७. ते आयजी (=यज्ञद्वारा संपदं प्रापयती ) वाजसातमे (=अतिशयेन अन्नप्रदे ) [ उलूखलमुसले ] हि, अन्धांसि (=चणकादीनि खाद्यानि यवसकाण्डानि वा ) बप्सतौ (=भक्षयन्तौ ) हरी (=इन्द्रस्य अश्वौ ) इव, उच्चैः [ शब्दयुक्तं ] [ सोमकाण्डानि ] विजर्भृतः (=भक्षयतः ) ॥

८. हे वनस्पती (=हे वनस्पतेः काष्ठस्य विकारौ ) [ उलूखलमुसले ], तौ ऋष्वौ (=श्रेष्ठौ ) [ युवाम् ] अद्य नः (=अस्माकम् ) ऋष्वैः (=श्रेष्ठैः ) सोतृभिः (=सोमाभिषवं कुर्वद्भिर्ऋत्विग्भिः) [ सह ] इन्द्राय मधुमत् (=मधुरं सोमरूपि) [पेयं] सुनुतम् (=अभिषवेण प्रतिपादयतम् ) ॥

परंतु वारा वाहतो आहे याचा संबंध उखळानें सोम कां काढावा या गोष्टीकडे कसा असेल तो असो. आलीकडे यज्ञ होतात त्यांत उखळाचा उपयोग सोम तयार करण्याच्या कामीं होत नसतो, यास्तव आलीकडच्या प्रचारावरून या मंत्राचा अर्थ बसविण्यास मार्ग नाहीं. परंतु कदाचित् खालीं लिहिल्याप्रमाणें तात्पर्य असेल काय ?

'तूं अरण्यांत वृक्षरूपानें असतांना वावटळीचा उपद्रव तुला होत होता, आतां तुझें उखळ केलें तेव्हां तूं लहान झालास म्हणून वारा तुझ्या डोकीच्या वरचेवरूनच वाहतो, आणि तुला त्यापासून कांहीं उपद्रव होत नाहीं. याजबद्दल तूं इंद्राचे उपकार मान आणि त्यासाठीं सोमरस काढ.'

७. कारण कीं धनप्राप्ती करून देणारीं [आणि] अतिशयें करून अन्न मिळवून देणारीं. तीं [उखळमुसळें] धाटें चावणाऱ्या घोड्यांप्रमाणें [सोमवल्लीचे तुकडे] झपाट्यानें खातात.

८. तर हे वनस्पतींनो, श्रेष्ठ जे [तुम्ही] ते आज आमच्या सोम काढणाऱ्या श्रेष्ठ [ऋत्विजां]बरोबर इंद्राकरितां मधुर [सोमरस] काढा.

7. For these two [the Mortar and the Pounder], procurers of wealth through the sacrifice, [and] excellent givers of food, loudly consume [the Soma-plant] like two horses chewing [their] fodder.

8. Do ye, therefore, lords of the forest, [who are] high, extract with our high Soma-pressers the sweet Soma for Indra.

---

७. या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, '[इंद्राचे?] दोन घोडे जसे खडाखड धाटें चावून टाकितात तशीं उखळमुसळें सोमरसाचे तुकडे चावून टाकितात, म्हणजे सोमाचे तुकडे आंत घातले आणि सोमरस काढूं लागलें, म्हणजे धाटें खाणाऱ्या घोड्यांप्रमाणें आवाज होतो.'

'धन प्राप्ती करून देणारीं [आणि], अतिशयेंकरून अन्न मिळवून देणारीं'= 'आयजी वाजसातमा.' हीं दोनीं विशेषणें बहुतकरून देवांस लावण्याची चाल आहे, पण येथें उखळमुसळें ह्या देवता झाल्या म्हणून त्यांलाहि देवांस लावावयाचीं विशेषणें लाविलीं असें समजलें पाहिजे. परंतु उखळमुसळाच्या योगानें सोम तयार होतो, आणि त्या सोमानें देव तृप्त झाल्यावर ते धन, अन्न इत्यादि देतात, म्हणून उखळमुसळांस धन आणि अन्न मिळवून देणारीं असें म्हटलें असा अर्थ केला तरी चालेल.

८. ह्या मंत्रांत तरी वनस्पती म्हणजे उखळमुसळेंच समजावयाचीं. कारण कीं, तीं दोनीहि लाकडाचीं केलेलीं असतात.— सोम काढणाऱ्या ...[ऋत्विजां]बरोबर ....मधुर सोमरस काढा.' म्हणजे जे सोमरस काढणारे तेच ऋत्विज, आणि ते उखळमुसळाच्या योगानें सोमरस काढीत; त्यापेक्षां उखळमुसळांनीं ऋत्विजांबरोबर सोमरस काढल्याप्रमाणें झालेंच.

सोमरसाविषयीं पुरातन आर्यजनांची इतकी सप्रेम भक्ति असे कीं, त्यांणीं सोम काढावयाचीं जीं लाकडी उखळमुसळें त्यांस सुद्धां देव करून टाकिलें.

उच्छिष्टं चम्वोर्भर सोमं पवित्र आ सृज ।
नि धेहि गोरधि त्वचि ॥ ९ ॥ २६ ॥

उत् । शिष्टम् । चम्वोः । भर । सोमम् । पवित्रे । आ । सृज ।
नि । धेहि । गोः । अधि । त्वचि ॥ ९ ॥ २६ ॥

## भाषायाम्.

९. शिष्टं [सोमरसं] चम्वोः (=चमसयोः=सोमपात्रयोः) उद्धर (=स्थापय) । सोमं (=सोमरसं) पवित्रे आ (=दशापवित्रे) सृज (=आसृज=आवर्जय) । [तं च सोमं] गोः अधि त्वचि (=आनडुहे चर्मणि) निधेहि (=स्थापय) ॥

---

९. राहिलेला सोम दोनी पात्रांत भर, तो गाळण्यांत ओत, [ आणि ] बैलाच्या चामड्यावर ठेव.

9 Fill the remaining Soma in the two jars, pour it on the sieve and put [it] on the cow-hide.

---

९. सोमवल्लीचा कचरा उखळांतून काढून टाकिल्यानंतर जो रस राहतो तो दोन चमसांत भरावयाचा, पण तो चमसांत भरण्यापूर्वी बकऱ्याच्या लोंकरीचा एक 'पवित्र' या नांवाचा कपडा अथवा चाळण किंवा गाळणें असे त्यावर गाळण्याकरितां ओतावयाचा; तो त्या पवित्रांतून गळून चमसांत गेला म्हणजे चमस बैलाच्या चामड्यावर ठेवावयाचे असा अर्थ दिसतो.

जशा आता स्त्रिया दळतांना गीत गातात तसें हें सूक्त सोम तयार करून काढितांना म्हणावयाचें आहे असें स्पष्ट दिसतें.

सोम सिद्ध झाल्यावर ठेवावयाचा तो देवास अर्पण करण्यासाठीं बैलाच्या कातड्यावर ठेवीत असत. कारण कीं बैलाच्या कातड्याची अद्यापि अप्रतिष्ठा झाली नव्हती, आणि त्याची पवित्रता गेली नव्हती आणि ज्याला स्पर्श झाला असतां आतां सर्व सोवळें व्यर्थ होतें आणि पवित्र होण्यासाठीं स्नान करावें लागतें, त्या बैली चामड्याची योग्यता आश्वलायनाच्या वेळापर्यंत गेली नव्हती. कारण कीं आश्वलायनगृह्यसूत्र विवाहप्रकरण यांत असें सांगितलें आहे कीं, लग्न झाल्यानंतर वरात नवऱ्याच्या घरीं आल्यावर नवरी-स्त्रियेकडून (आम्ही जाणून बुजून 'स्त्रियेकडून' म्हणतों, 'नवरीमुलीकडून' म्हणत नाहीं, कारण त्यावेळीं आठ आणि दहा वर्षांच्या अर्भकांचे विवाह होत नव्हते, उपवर स्त्रियांचेच होत असत, याविषयीं तेंच गृह्यसूत्र पाहा) नवऱ्यानें होम करवावा आणि त्या होमांत हवि देतांना तिला अग्नीजवळ बैलाच्या चामड्यावर बसवावी, तें चामडें केसांसकट आणि सबंध असावें, त्याचें डोकें वगैरे काढून टाकिलेलें नसावें व शीर अमुक पाय अमुक हे भाग स्पष्ट असावे, व केस वर स्पष्ट दिसत असें आंथरावें इत्यादिः— "विवाहाग्निमुपसमाधाय पश्चादस्यानडुहं "चर्मास्तीर्य प्राग्ग्रीवमुत्तरलोम तस्मिन्नु- "पविष्टायां समन्वारब्धायाम्" आश्वलायनगृह्यसूत्र अध्याय १ खंड ८.

## सूक्तम् २९.

अजीगर्तपुत्रः शुनःशेप ऋषिः । इन्द्रो देवता । पङ्क्तिश्छन्दः ॥

**यच्चिद्धि सत्य सोमपा अनाशस्ता इव स्मसि ।**
**आ तू न इन्द्र शंसय गोष्वश्वेषु शुभ्रिषु सहस्रेषु तुवीमघ ॥ १ ॥**

यत् । चित् । हि । सत्य । सोमऽपाः । अनाशस्ताःऽइव । स्मसि ।
आ । तु । नः । इन्द्र । शंसय । गोषु । अश्वेषु । शुभ्रिषु । सहस्रेषु ।
तुविऽमघ ॥ १ ॥

**शिप्रिन् वाजानां पते शचीवस्तव दंसना ।**
**आ तू न इन्द्र शंसय गोष्वश्वेषु शुभ्रिषु सहस्रेषु तुवीमघ ॥ २ ॥**

शिप्रिन् । वाजानाम् । पते । शचीऽवः । तव । दंसना ।
आ । तु । नः । इन्द्र । शंसय । गोषु । अश्वेषु । शुभ्रिषु । सहस्रेषु ।
तुविऽमघ ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

१. हे सत्य सोमपाः (=सोमस्य पातः) [इन्द्र], यच्चिद्धि (=यद्यपि) [वयम्] अनाशस्ता इव (=अप्रशस्ता इव=अप्रसिद्धा इव) स्मः, तु (=तथापि) हे तुविमघ (=प्रभूतधनवन्) इन्द्र, नः (=अस्मान्) शुभ्रिषु (=शोभनेषु) सहस्रेषु (=सहस्रसंख्याकेषु) गोषु अश्वेषु [च] [विषयेषु] (=एतानस्मभ्यं दत्त्वा) आशंसय (=प्रख्यापय) ॥

२. हे शिप्रिन् (=शोभनहनुयुक्त=सुवदन), हे वाजानां पते (=संपदां प्रभो), हे शचीवः (=शचीयुक्त=पराक्रमकर्मयुक्त), हे तुविमघ (=प्रभूतधनवन्) इन्द्र, [त्वं] तव दंसना (=दंसनया=पराक्रमकर्मणा) नः (=अस्मान्) शुभ्रिषु (=शोभनेषु) सहस्रेषु (=सहस्रसंख्याकेषु) गोषु अश्वेषु [च] [विषयेषु] (=एतान् अस्मभ्यं दत्त्वा) आशंसय (=प्रख्यापय) ॥

## सूक्त २९.

ऋषि–पूर्ववत्. देवता–इन्द्र. वृत्त–पंक्ति.

१. हे खऱ्या [ आणि ] सोम पिणाऱ्या [ इंद्रा ], [आम्ही] जरी अप्रसिद्ध [ असल्या]प्रमाणें आहों, तथापि हे विपुलसंपत्तिमान् इंद्रा, [तूं] हजारो उत्तम गाई [ आणि ] घोडे [ आम्हांस देऊन ] त्यांविषयीं आम्हांस प्रख्यात कर.

२. हे सुवदना, हे ऋद्धिसिद्धींच्या नायका, हे पराक्रमी [इंद्रा], तुझ्या प्रताप[च्या योगा]नें [तूं] हजारो उत्तम गाई [ आणि ] घोडे [ आम्हांस देऊन ] त्यांविषयीं आम्हांस प्रख्यात कर.

## HYMN 29.

To *Indra*. By the same author as that of the last hymn. Metre *Pankti*.

1. O true and Soma-drinking [Indra], although [we]are as [it were] obscure, cause us to be renowned, Indra of plentiful wealth, about thousands of excellent cows [and] horses [by giving these unto us].

2. O handsome-faced lord of riches, O lord of exploits, by thy power cause us to be renowned, Indra of plentiful wealth, about thousands of excellent cows and horses [by giving these unto us].

---

१. पूर्वी सांगितलेल्या ( २४ व्या सूक्ताचा आरंभ पाहा ) शुन:शेपकथेस अनुलक्षून भाष्यकार म्हणतात कीं, "विश्वेदेवांनीं (२७ व्या सूक्ताच्या शेवटीं) शुन:शेपास सांगितलें कीं, आम्हां सकळ देवांत इंद्र मोठा आहे, यास्तव तूं त्याची स्तुती कर, त्यावरून शुन:शेपानें इंद्राची प्रार्थना आपली सुटका होण्यासाठीं केली, ती या (२९ व्या) सूक्तांत जे मंत्र आहेत ते आणि पुढच्या ( ३० व्या ) सूक्तांतील पहिले पंधरा मंत्र इतके मिळून केली; तें हें २९ वें सूक्त आहे." परंतु त्या पूर्वबद्ध स्थितीस अनुलक्षून जशीं पूर्वीचीं सूक्तें रचिलेलीं नसावीं तसें हें ( २९ वें ) हि रचिलेलें नसावें असें आम्हांस वाटतें. हें म्हणणें सगळें सूक्त वाचून पाहिल्यावर समजेल.

ह्या पहिल्या मंत्रांत प्रार्थना इतकीच आहे कीं, 'जरी आम्ही गरीब असल्यामुळें आमची कीर्ति कोठें पसरलेली नाहीं आहे, तरी तूं आम्हांस हजारो गुरें ढोरें आणि घोडे दे म्हणजे आम्ही श्रीमंत आहों अशी आमची कीर्ति जिकडे तिकडे पसरेल.'

• ज्याचा आशीर्वाद रंकास मिळाला तर तो राजा होतो आणि ज्याचा शाप राजास झाला तर त्याचा रंक होईल, असे हे पुरातन ऋषी होते म्हणून आमचे पुरोहित आम्हां सर्वांस सांगत असतात तसें जर खरोखर ते असते, तर आपणांसच गुरें ढोरें, खावयास अन्न, आणि घोडे मिळोत अशी प्रार्थना

**नि ष्वापया मिथूदृशा सस्तामबुध्यमाने ।**

**आ तू न इन्द्र शंसय गोष्वश्वेषु शुभ्रिषु सहस्रेषु तुवीमघ ॥ ३ ॥**

नि । स्वापय । मिथुऽदृशा । सस्ताम् । अबुध्यमाने इति ।

आ । तु । नः । इन्द्र । शंसय । गोषु । अश्वेषु । शुभ्रिषु । सहस्रेषु । तुविऽमघ ॥ ३ ॥

**ससन्तु त्या अरातयो बोधन्तु शूर रातयः ।**

**आ तू न इन्द्र शंसय गोष्वश्वेषु शुभ्रिषु सहस्रेषु तुवीमघ ॥ ४ ॥**

ससन्तु । त्याः । अरातयः । बोधन्तु । शूर । रातयः ।

आ । तु । नः । इन्द्र । शंसय । गोषु । अश्वेषु । शुभ्रिषु । सहस्रेषु । तुविऽमघ ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. [ हे इन्द्र ], मिथूदृशौ ( =परस्परं संगतत्वेन दृश्यमाने ) [ यमदूत्यौ ? ] निष्वापय ( =नितरां सुप्ते कुरु ) । [ ते ] अबुध्यमाने [ सत्यौ ] सस्तां ( =निद्रां प्राप्नुताम् ) । तु ( =तथापि ) हे तुविमघ ( =प्रभूतधनवन् ) इन्द्र, [ त्वं ] नः ( =अस्मान् ) शुभ्रिषु ( =शोभनेषु ) सहस्रिषु ( =सहस्रसंख्याकेषु ) गोषु अश्वेषु [ च ] [ विषयेषु ] ( =एतानस्मभ्यं दत्त्वा ) आशंसय ( =प्रख्यापय ) ॥

४. हे शूर [ इन्द्र ], त्याः ( =तास्ताः प्रसिद्धाः ) अरातयः ( =शत्रवः ) ससन्तु ( =निद्रां कुर्वन्तु ), रातय. ( =बन्धवो ) बोधन्तु ( =बुध्यन्तां=जागृताः सन्तु ) । तु ( =तथापि ) हे तुविमघ ( =प्रभूतधनवन् ) इन्द्र, [ त्वं ] नः ( =अस्मान् ) शुभ्रिषु ( =शोभनेषु ) सहस्रिषु ( =सहस्रसंख्याकेषु ) गोषु अश्वेषु [ च ] [ विषयेषु ] ( =एतान् अस्मभ्यं दत्त्वा ) आशंसय ( =प्रख्यापय ) ॥

---

उखळा मुसळासारिख्या क्षुल्लक देवताकडेस त्यांनीं कां केली असती बरें?

२. 'ऋद्धिसिद्धींच्या नायका'='वाजानां पते.' 'वाज' म्हणजे अन्न, शक्ति, प्रताप इ०.—'हे पराक्रमी'='शचीवः'. 'शची' म्हणजे पराक्रम, पराक्रमाचें कांहीं तरी कृत्य. इंद्र हा आपल्या उपासकांसाठीं वगैरे पराक्रम करितो म्हणून त्यास शचीवान् अथवा शचीपति असें वेदांत प्रथम म्हणत. उदाहरण:-"उत त्या तुर्वशा यदू अस्नातारा शचीपतिः इन्द्रो विद्वानपारयत्" ऋ. ४.३०.१७; "इन्द्रं कुत्सो वृत्रहणं शचीपतिं काटे निबाळ्ह: ऋषिरह्वत्" १.१०६.६ इत्यादि अनेक प्रयोग आहेत. परंतु मागाहून 'शचीपति' या शब्दाचा खरा अर्थ काय आहे तो विसरून 'शचींचा म्हणजे पराक्रमांचा प्रभु' असें न करितां 'शचीचा नवरा' असें समजूं लागले. नंतर 'शची' ही कोण असा सहजच प्रश्न निघाला. तेव्हां शची म्हणून इंद्राची बायको होती, तिचा विवाह इंद्राशीं झाला आणि त्याला मग जयंत पुत्र झाला इत्यदिक कथा उत्पन्न होऊन पुराणांतरीं अंतर्गत झाली.

३. अन्योन्यदर्शी [त्या] दोघी [बायां]स निजीव, [त्या] निजूं दे, [आणि] त्यांस जागृत होऊं देऊं नको. हे विपुलसंपत्तिमान् इंद्रा, हजारो उत्तम गाई [आणि] घोडे [हे आम्हांस देऊन] त्यांविषयीं आम्हांसि प्रख्यात कर.

४. ते शत्रू निजोत, [आणि] हे शूर [इंद्रा], मित्र जागोत. हे विपुलसंपत्तिमान् इंद्रा, हजारो उत्तम गाई [आणि] घोडे [हे आम्हांस देऊन] त्यांविषयीं आम्हांस प्रख्यात कर.

3. Send to sleep the two females that see each other, let them sleep, and not be wakeful. Cause us to be renowned, Indra of plentiful wealth, about thousands of excellent cows [and] horses [by giving these unto us].

4. May the foes sleep, [and] brave [Indra], may the friends be wakeful. Cause us to be renowned, Indra of plentiful wealth, about thousands of excellent cows [and] horses [by giving these unto us].

---

३. या मंत्रांत अन्योन्यदर्शी दोघी बाया म्हणजे कोण याविषयीं सायणाचार्य कांहीं सांगत नाहींत. मात्र त्या यमाच्या दूती होत इतकेंच म्हणतात.

४. शत्रूंचा नाश होओ आणि मित्रांचा जय होओ असें या मंत्राचें तात्पर्य आहे. 'राति' म्हणजे अक्षरशः 'जो देतो तो'='दाता,' आणि 'अराति' म्हणजे 'जो देत नाहीं तो'='कृपण.' या मंत्रांत 'ते शत्रू' असें आहे. 'ते' कोण? देवांस हवि 'न देणारे' म्हणजे आर्य नव्हेत ते अनार्य लोक, जे आर्यधर्माप्रमाणें न चालणारे, दस्यु म्हणजे भिल्ल, खोंड वगैरे, असें दिसतें. आणि हा म्हणण्यास पुढच्या मंत्रावरून बळकटी येते.

सर्मिन्द्र गर्दभं मृण नुवन्तं पापयामुया ।
आ तू न इन्द्र शंसय गोष्वश्वेषु शुभ्रिषु सहस्रेषु तुवीमघ ॥ ५ ॥
सम् । इन्द्र । गर्दभम् । मृण । नुवन्तम् । पापया । अमुया ।
आ । तु । नः । इन्द्र । शंसय । गोषु । अश्वेषु । शुभ्रिषु । सहस्रेषु ।
तुविऽमघ ॥ ५ ॥
पताति कुण्डृणाच्या दूरं वातो वनादधि ।
आ तू न इन्द्र शंसय गोष्वश्वेषु शुभ्रिषु सहस्रेषु तुवीमघ ॥ ६ ॥
पताति । कुण्डृणाच्या । दूरम् । वातः । वनात् । अधि ।
आ । तु । नः । इन्द्र । शंसय । गोषु । अश्वेषु । शुभ्रिषु । सहस्रेषु ।
तुविऽमघ ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. हे इन्द्र, अमुया पापया (=एवं निकृष्टेन प्रकारेण=अतिनिकृष्टेन प्रकारेण) [त्वां.] नुवन्तं (=स्तुवन्तं) गर्दभं (=गर्दभसमानं मनुष्यं) संमृण (=सम्यक् मारय)। तु (=तथापि) हे तुविमघ (=प्रभूतधनवन्) इन्द्र,, [त्वं] नः (=अस्मान्) शुभ्रिषु (=शोभनेषु) सहस्रिषु (=सहस्रसंख्याकेषु) गोषु अश्वेषु [च] [विषयेषु] (एतानस्मभ्यं दत्वा) आशंसय (=प्रख्यापय) ॥

६. [हे इन्द्र], वातः कुण्डृणाच्या (=कुटिलगत्या) वनादधि (=अरण्यदेशादप्यधिकं) दूरं पततु। तु (=तथापि) हे तुविमघ (=प्रभूतधनवन्) इन्द्र, [त्वं] नः (=अस्मान्) शुभ्रिषु (=शोभनेषु) सहस्रिषु (=सहस्रसंख्याकेषु) गोषु अश्वेषु [च] [विषयेषु] (=एतानस्मभ्यं दत्वा) आशंसय (=प्रख्यापय) ॥

५. हे इंद्रा, इतक्या वाईट रीतीनें स्तवन करणाऱ्या गाढवास मारून टाक. हे विपुलसंपत्तिमान् इंद्रा, हजारो उत्तम गाई [ आणि ] घोडे [ हे आम्हांस देऊन ] त्यांविषयीं आम्हांस प्रख्यात कर.

६. [ हे इंद्रा ], वादळ वांकडें वांकडें जाऊन दूर पळो आणि अरण्यापलीकडे जाओ. हे विपुलसंपत्तिमान् इंद्रा, हजारो उत्तम गाई [ आणि ] घोडे [ हे आम्हांस देऊन ] त्यांविषयीं आम्हांस प्रख्यात कर.

5. Indra, strike down the ass that praises [thee] so badly. Cause us to be renowned, Indra of plentiful wealth, about thousands of excellent cows [and] horses [by giving these unto us].

6. Indra, may the whirlwind fly far away crookedly beyond the forest. Cause us to be renowned, Indra of plentiful wealth, about thousands of excellent cows [and] horses [by giving these unto us].

---

५. या मंत्रांत 'इंद्राची स्तुती न करितां निंदा करणारा अनार्य मनुष्य गाढव होय त्याला मारून टाक' अशी मंत्रवक्त्याची प्रार्थना आहे.

'इतक्या वाईट रीतीनें'='पापया अमुया' म्हणजे फार वाईट रीतीनें असें तात्पर्य आहेसें वाटतें. 'पापया' आणि 'अमुया' हीं दोन्ही क्रियाविशेषणें होत. 'अमुया' म्हणजे 'अशा प्रकारें', 'असें', 'याप्रमाणें.' "मा मातरममुया पत्तवे कः" ऋ. ४. १८.१, "नदं न भिन्नममुया शयानम्" १. ३२. ८. आणि 'अस्' किंवा 'भू' या धातूच्या संयोगीं 'अमुया' म्हणजे 'नाहींसें होणें,' 'व्यर्थ जाणें,' 'तोंड काळें करणें'; जसें, "अप द्वेषास्यमुया भवन्तु" अथर्ववेद ५. २२. १, "मामुया भूवम्" शतपथ ब्रा. १. ६. ३.१७, "यथेदं नाभ्युयासत्" ७. ४. ५, "यद्वै रेतसो योनिमतिरिच्यतेमुया तद्भवति" ६. ३. ३. २६; १. ७ २. १३. १४; ३. ८.२. २८.

'पापया' हेंहि क्रियाविशेषण असून 'वाईट रीतीनें' अशा अर्थाचें आहे. जसें—"विजानिर्यत्र ब्राह्मणो रात्रिं वसति पापया" अ. ५. १७. ८; "यश्चेरिम पापया" ७. ६५.२.

'पापयामुया' म्हणजे 'इतक्या वाईट रीतीनें किंवा प्रकारानें' या अर्थी क्रियाविशेषण असल्याविषयीं उदाहरणें:–ऋ. १०. ८५. ३० "चरन्तं पापयामुया"; "अथ किं पापयामुया पुच्छे बिभर्ष्यर्भकम्" अ. ७. ५६. ६.

६. 'वादळ अथवा वावटळ जी वांकडी वांकडी चालत आमच्या आंगावर येते ती तशीच वांकडी वांकडी जाऊन, पळून जाओ, आणि अरण्याच्या पलीकडे नाहींशी होओ' असा भावार्थ आहे.

आपल्या आंगावर वावटळ येऊं नये

**सर्वं परिक्रोशं जहि जम्भया कृकदाश्वम् ।**
**आ तू न इन्द्र शंसय गोष्वश्वेषु शुभ्रिषु सहस्रेषु तुवीमघ ॥ ७॥**
**॥ २७ ॥**

सर्वम् । परिऽक्रोशम् । जहि । जम्भय । कृकदाश्वम् ।
आ । तु । नः । इन्द्र । शंसय । गोषु । अश्वेषु । शुभ्रिषु । सहस्रेषु ।
तुविऽमघ ॥ ७ ॥ २७ ॥

## भाषायाम्.

७. [ हे इन्द्र ], सर्वं परिक्रोशम् (=अस्मद्विषये आक्रोशकर्तारं सर्वं पुरुषं ) जहि (=मारय ), [ सर्वं ] कृकदाश्वम् (=अस्मद्विषये हिंसाप्रदं शत्रुं ) जम्भय (=मारय) । तु (=तथापि) हे तुविमघ (=प्रभूतधनवन् ) इन्द्र, [ त्वं ] नः (=अस्मान्) शुभ्रिषु (=शोभनेषु ) गोषु अश्वेषु [ च ] [ विषयेषु ] (=एतानस्मभ्यं दत्त्वा.) आशंसय (=प्रख्यापय ) ॥

अशाविषयीं इंद्राची प्रार्थना ऋषीनें केली हें योग्यच होय. कारण इंद्र हा वादळें आणणें, अथवा नाहींशीं करणें, पाऊस आणणें अथवा नाहींसा करणें याविषयींचा अधिकारी देवच आहे. म्हणून. अनाथ मनुष्यानें त्या इंद्रदेवाची प्रार्थना करणें हें जसें युक्त आहे तसें सुंदरहि आहे. पण असा प्रश्न निघतो कीं, नुसती वावटळ आंगावर येऊं नये इतक्याचसाठीं ज्यांस इंद्राची मोठी विनवणी करावी लागे, त्या पुरातन ऋषींनीं तप केलें म्हणजे इंद्रास भीति पडे आणि त्यांच्या आशीर्वादानें सूर्य उगवेल आणि शापानें जळून जाईल अशी शक्ति त्यांस होती या कथेचा काय परिणाम?

७. [ आम्हांस ] शिव्या देणारा [जो जो म्हणून असेल त्या त्या] प्रत्येकास मारून टाक, [आणि] [आमचें] वाईट करणाऱ्या प्रत्येक दुष्टाचा नाश कर. हे विपुलसंपत्तिमान् इंद्रा, हजारो उत्तम गाई [ आणि ] घोडे [ हे आम्हांस देऊन ] त्यांविषयीं आम्हांस प्रख्यात कर.

7. Strike dead every reviler [and] destroy the wicked demon. Cause us to be renowned, Indra of plentiful wealth, about thousands of excellent cows [and] horses [by giving these unto us].

७. या ऋचेंत दोन गोष्टींविषयीं मागणें आहे. १–जो शिव्या देतो म्हणजे आम्हांविषयीं वाईट बोलतो त्यास मारून टाक, आणि २–जो आम्हांविषयीं वाईट करितो त्याला मारून टाक. अनाथ मनुष्यांनीं या जगांतील साधुद्रेष्ट्यांपासून आपलें वाईट होऊं नये म्हणून इंद्रापाशीं प्रार्थना करणें हें उत्तम आहे, मग असें मागण्यापेक्षां मला शिवी देणाऱ्या आणि माझें वाईट करणाऱ्या शत्रूला क्षमा करण्याची इच्छा आणि शक्ती मला दे असें मागितलें असतें तर बरें झालें असतें हा मार्ग उत्तम आहे तरी एक वेगळा आहे. परंतु पुनः आमच्यानें विचारल्याशिवाय राहवत नाहीं (कारण या ब्रह्मप्रतापाच्या कथा आम्ही घडोघडी ऐकितों ) कीं जर या तपोराशी ऋषींला केवळ शापद्वारानें पाहिजे त्याला मारण्याची आणि पाहिजे त्याला तारण्याची शक्ति सहज होती, तर शिवी देणाऱ्यांपासूनहि त्यास आपला बचाव आपल्याच्यानेंच कां करवत नसे?

आतां हें सूक्त संपलें. विचार करून पाहतां यूपबद्ध स्थितींत हें शुनःशेपानें म्हटलें असेल असें वाटत नाहीं हें पुनः सांगावयास नकोच.

## सूक्तम् ३०.

अजीगर्तपुत्रः शुनःशेप ऋषिः । देवता—१–१६ इन्द्रः । १७–१९ अश्विनौ । २०–२२ उषाः । छन्दः—१–१०, १२–१५, १७–२२ गायत्री । ११ पादनिचृद्गायत्री । १६ त्रिष्टुप् ॥

**आ व इन्द्रं क्रिविं यथा वाजयन्तः शतक्रतुम् ।**
**मंहिष्ठं सिञ्च इन्दुभिः ॥ १ ॥**

आ । वः । इन्द्रम् । क्रिविम् । यथा । वाजऽयन्तः । शतऽक्रतुम् ।
मंहिष्ठम् । सिञ्चे । इन्दुऽभिः ॥ १ ॥

**शतं वा यः शुचीनां सहस्रं वा समाशिराम् ।**
**एदु निम्नं न रीयते ॥ २ ॥**

शतम् । वा । यः । शुचीनाम् । सहस्रम् । वा । सम्ऽआशिराम् ।
आ । इत् । ऊम् इति । निम्नम् । न । रीयते ॥ २ ॥

---

### भाषायाम्.

१. वाजयन्तः (=अन्नादिसंपदमिच्छन्तो ) [ वयं ] वः (=युष्माकं ) शतक्रतुं (=शतप्रज्ञं ) मंहिष्ठम् (=अतिशयेन प्रवृद्धम् ) इन्द्रं, क्रिविं यथा (=कूपमिव ), इन्दुभिः (=सोमैः ) आसिञ्चे (=पूरयामि=पूरयामः ) ॥

२. य [ इन्द्रः ] शुचीनां (=शुद्धानाम्=अमिश्रितानां ) [ सोमानां ] शतं [ प्रति ] वा समाशिरां (=श्रपणाख्यद्रव्येण मिश्रितानां ) [ सोमानां ] सहस्रं [ प्रति ] वा, निम्नं न (=निम्नप्रदेशम् आप इव), आ इत् उ रीयते (=आगच्छत्येव=धावत्येव ) ॥

## सूक्त ३०.

ऋषि—पूर्ववत्. देवता—१-१६ इंद्र, १७-१९ अश्वी, २०-२२ उषा. वृत्त—गायत्री, परंतु ११ ची पादनिचृत् गायत्री, आणि १६ ची त्रिष्टुभ्.

१. संपत्तीची इच्छा करणारे [असे आम्ही] शतप्रज्ञ [ आणि ] परम मोठा [जो] तुमचा इंद्र [त्या]स, कूपा[ला भरिल्या] प्रमाणें, सोमरसांनीं भरितों;

२. जो [इंद्र] शतशः शुद्ध [सोमरसां]कडे अथवा सहस्रशः दुग्धमिश्रित [सोमरसां]कडे, खोलगटांत [पाणी] [ धांवल्या]प्रमाणें धांवत असतो.

## HYMN 30.

To *Indra* (1-16), *the As'vins* (two gods mounted on horse-back) (17-19), *Ushas* (Dawn) (20-22). Author as before. Metre—*Gáyatrí*, but of 11 the *Pádanichrit Gáyatrí*, and of 16 the *Trishtup*.

1. Desirous of wealth [we] fill with Soma-juices your mightiest Indra of hundred wisdoms, like a well;

2. who runs to a hundred pure [Somas] or to a thousand [Somas] mixed with milk, as [water runs] to a low place.

---

१. ऐतरेय ब्राह्मणास अनुसरून सायणाचार्य म्हणतात कीं, हेंहि सूक्त यूपबद्ध शुनःशेपानेंच रचून म्हटलें. परंतु तसें नसावें याविषयीं आमचा अभिप्राय पूर्वीच्या सूक्ताच्या संबंधानें आम्हीं पूर्वी सांगितलाच आहे. त्याप्रमाणेंच या सूक्ताविषयींहि आहे. सूक्त तर शुनःशेपकृत असेलच, पण शुनःशेपाला जें महासंकट प्राप्त झालें होतें असें म्हणतात त्या प्रसंगीं संकटनिवृत्तीसाठीं रचिलें असा संभव नाहीं त्याचीं कारणें आम्हीं पूर्वी सांगितलीं आहेत.

या पहिल्या ऋचेंत अर्थाविषयीं थोडीशी अडचण आहे. ती ही कीं, 'संपत्तीची इच्छा करणारे', ( वाजयन्तः )हें अनेकवचनीं असून 'भरितों' या अर्थी 'आसिञ्चे' हें जें क्रियापद आहे तें एकवचनीं आहे. परंतु अशा प्रकारचे लिंगव्यत्यय वेदांत आढळतात. वस्तुतः 'वाजयन् [अहम्] आसिञ्चे' (='संपत्तीची इच्छा करणारा असा जो मी तो भरितों') असाच एकवचनीं प्रयोग विवक्षित आहे.

'तुमचा इंद्र'. तुमचा म्हणजे मंत्रवक्त्याच्या जवळ जे कोण असतील आणि इंद्राविषयीं मंत्रवक्त्यापाशीं मोठी प्रशंसा करीत असतील त्यांचा. 'ज्याविषयीं तुम्ही इतकी प्रशंसा करितां तो इंद्र' असा भावार्थ.

'कूपा[ला भरिल्या]प्रमाणें सोमरसांनीं भरितों,' म्हणजे इंद्राच्या उदरांत इतका सोम घालितों कीं, तो जणुं काय एक

**सं यन्मदा॑य शु॒ष्मिण॑ ए॒ना ह्य॑स्यो॒दरे॑ ।**
**स॒मु॒द्रो न व्यचो॑ द॒धे ॥ ३ ॥**

सम् । यत् । मदा॑य । शु॒ष्मिणे॑ । ए॒ना । हि । अ॒स्य । उ॒दरे॑ ।
स॒मु॒द्रः । न । व्यचः॑ । द॒धे ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. यत् [ सोमानां शतं वा सहस्रं वा ] शुष्मिणे मदाय (=शुष्मिणमिन्द्रं मादयितुं ), समुद्रो न (=यथा ) [व्यचो = विस्तृतत्वं ] [ संधत्ते ], एना हि (=तथैव ) अस्य [ इन्द्रस्य ] उदरे व्यचः संदधे (=विस्तृतत्वं प्राप्नोति ) ॥

कूपच बनून जाईल. 'इंद्राला पुष्कळ सोम अर्पण करितों' असें तात्पर्य.

२. मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'इंद्राला सोम फार आवडत असतो, आणि जरी एकच वेळीं शेकडो अथवा हजारो ठिकाणीं उपासक लोक सोम अर्पण करीत असले, मग तो नुस्ता असो अथवा दूध मिसळून विशेष रुचिकर केलेला असो, तथापि त्या सर्व ठिकाणीं तो तो सोम पिण्यासाठीं इंद्र इतक्या उत्सुकतेनें आणि त्वरेनें धावत जात असतो कीं, तो जणुं काय खोल प्रदेशाकडे वाहत जाणारा उदकप्रवाहच होय.'

पूर्वील मंत्रांत इंद्रास पुष्कळ सोम अर्पण करितों असें जें सांगितलें त्याचा हेतु या मंत्रांत आहे असें समजावें. सोम पिण्याविषयीं इंद्र फार उत्सुक आहे यास्तव मी त्यास पुष्कळ सोम पाजितों असें दोन्ही मंत्रांचें तात्पर्य.

३. जे [ शेकडो आणि हजारो सोमरस ] प्रचंड [ इंद्रा]ला माद उत्पन्न करण्याकरितां, समुद्र जसा [ पसरतो ], तसे त्याच्या उदरांत पसरतात.

3. which [hundreds and thousands of Somas] spread themselves in his stomach in such manner as the sea, that the mighty [Indra] may be intoxicated.

---

३. मंत्राचें तात्पर्य असें आहे कीं, 'इंद्र जे अनेक ठिकाणचे विपुल सोम पितो, ते त्याच्या पोटांत समुद्राप्रमाणें पसरतात, आणि मग महाबळी इंद्रास माद प्राप्त होतो'.

इंद्र जो सोम पितो तो फार असतो असें विवक्षित असतें तेव्हां त्याला समुद्राची उपमा वेदांत पुष्कळ ठिकाणीं दिलेली आढळते.

'प्रचंड [ इंद्रा]ला माद उत्पन्न करण्याकरितां'='मदाय शुष्मिणे.' अक्षरशः अर्थ, 'प्रचंड [ इंद्रा]ला मादाकरितां;' म्हणजे इंद्राला माद यावा म्हणून. यासारिखे दुसरे प्रयोग वेदांत पुष्कळ येतात. जसें:-"स्वादिष्ठया मदिष्ठया पवस्व सोम धारया। इन्द्राय पातवे सुतः", यांत 'इन्द्राय पातवे' हा अकर्मणि प्रयोग वरच्या सारिखाच आहे. "स्तोम उक्थं च शंस्या । इन्द्राय सोमपीतये" ऋ. १. ८. १०. इत्यादि उदाहरणें आहेत.

'समुद्र जसा पसरतो'='समुद्रो न व्यचः संदधे.' हा अर्थ सायणाचार्यास अनुसरूनच आम्हीं केला आहे. पण 'व्यचः संदधे' म्हणजे 'व्याप्ती धारण करितो'='पसरतो' असें म्हणण्यापेक्षां 'व्याप्ती आकुंचित करून धारतो'='जमा होतो', 'एकत्र होतो,' 'पुष्कळ असून थोडक्या स्थळांत मावतो' असा अर्थ शब्दावरून चांगला संभवतो.

'तसे'='एना हि.' 'एना' हें येथें तृतीयान्त क्रियाविशेषण 'याप्रकारें करून' अशा अर्थी आहे.

**अयमु ते समतसि कपोत इव गर्भधिम् ।**
**वचस्तच्चिन्न ओहसे ॥ ४ ॥**

अयम् । ऊम् इति । ते । सम् । अतसि । कपोतःऽइव । गर्भऽधिम् ।
वचः । तत् । चित् । नः । ओहसे ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

४. [ हे इन्द्र ], अयमपि [ अस्माभिरर्प्यमाणः ] [ सोमः ] ते (=तव ) [ अस्ति ] । [ तं ], कपोतो गर्भधि (=कपोतीम् ) इव, [ त्वं ] समतसि (=संगच्छसे ) । तच्चित् (=तदेव ) नो वचः [ त्वम् ] ओहसे (=मन्यसे=शृणोषि ) ॥

४. [ हे इंद्रा, ] हाहि [ सोमरस ] तुझा [ आहे ]; कपोत [ पक्षी ] [ आपल्या ] मादीजवळ [विहार करितो ] तसा [ तूं ह्या सोमाजवळ ] विहार करितोस, [ आणि ] तेव्हांच [ तूं ] आमचें वचन ऐकितोस.

4. [And] this [Soma] too,[ Indra], is thine. Thou revellest with it as [does] the pigeon with [his] mate. Then [and then] only dost thou mind our prayer.

४. वरच्या दोन तीन मंत्रांत इंद्र अनेक ठिकाणीं लोकांनीं अर्पिलेला सर्व सोम पितो असें सांगितलें. या मंत्रांत मंत्रवक्ता म्हणतो कीं, 'आम्ही जो हा येथें अर्पण करीत आहों हाहि सोम तुझाच आहे. त्याजवर तुझी इतकी प्रीति आहे कीं, जसा एकादा पारवा आपल्या मादीला मिळून मोठ्या आनंदानें रमतो तसा या सोमाशीं तूं रमतोस. आणि तसा आनंद तुला झाला म्हणजेच आमच्या प्रार्थनेकडे तूं लक्ष्य देतोस. म्हणूनच हा तुला आम्ही अर्पण करीत आहों.'

या मंत्रावरून ऋषीच्या मतें सोमावर इंद्राचें प्रेम किती आहे आणि तो अर्पण केल्याशिवाय इंद्रास आनंद होत नाहीं आणि तसा आनंद झाल्यावरच इंद्र प्रसन्न होत असतो या गोष्टी ध्यानांत ठेविल्या पाहिजेत. वेदांत सोमाचें माहात्म्य जसें आहे तसें फारकरून दुसऱ्या कशाचेंच नाहीं.

कपोताची म्हणजे पारव्याची जी उपमा येथें दिली आहे ती फार सुंदर आहे यांत संशय नाहीं. कारण कीं, पारवा कामातुर असला म्हणजे मादीजवळ कसा नाचतो तें सर्वांस ठाऊक आहेच. कुमारसंभवांत कालिदासानेंहि त्या स्थितींत असलेल्या पारव्याविषयीं फार सुंदर वर्णन केलें आहे, तें असें:—

तथाविधेऽनङ्गरसप्रसङ्गे
मुखारविन्दे मधुपः प्रियायाः ।
संभोगवेश्म प्रविशन्तमन्त-
र्ददर्श पारावतमेकमीशः ॥ १ ॥
सुकान्तकान्तामणितानुकारं
कूजन्तमाघूर्णितरक्तनेत्रम् ।
प्रस्फारितोन्नम्रविनम्रकण्ठं
मुहुर्मुहुर्न्यंचितचारुपुच्छम् ॥ २ ॥
विशृङ्खलं पक्षतियुग्ममीष-
द्दधानमामन्दगतिं मदेन ।
शुभ्राशुवर्णं जटिलाग्रपाद-
मितस्ततो मण्डलकैश्चरन्तम् ॥ ३ ॥
सर्ग ९.

'मादीजवळ'='गर्भधिम्.' हा अर्थ आम्हीं सायणास अनुसरून दिला आहे. पण 'गर्भधि' म्हणजे 'घरटें' असाहि अर्थ संभवतो. आणि तसा अर्थ केला तरी उपमेला अडचण येईल असें दिसत नाहीं. कारण कपोताचा विहार बहुतकरून त्याच्या घरट्याजवळ होत असतो.

**स्तोत्रं राधानां पते गिर्वाहो वीर यस्य ते ।**
**विभूतिरस्तु सूनृता ॥ ५ ॥ २८ ॥**

स्तोत्रम् । राधानाम् । पते । गिर्वाहः । वीर । यस्य । ते ।
विऽभूतिः । अस्तु । सूनृता ॥ ५ ॥ २८ ॥

**ऊर्ध्वस्तिष्ठा न ऊतयेऽस्मिन्वाजे शतक्रतो ।**
**समन्येषु ब्रवावहै ॥ ६ ॥**

ऊर्ध्वः । तिष्ठ । नः । ऊतये । अस्मिन् । वाजे । शतक्रतो इति शतऽक्रतो ।
सम् । अन्येषु । ब्रवावहै ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. हे राधानां पते (=धनानां स्वामिन्), हे गिर्वाहः (=स्तुतिहव्य), हे वीर [इन्द्र], यस्य ते (=तव) [अस्मत्कृतं] स्तोत्रं [विभूति=प्रभूतम् अस्ति] [तस्य तव] सूनृता (=प्रसादो) विभूतिः (=प्रभूता) अस्तु ॥

६. हे शतक्रतो (=शतप्रज्ञ) [इन्द्र], [त्वं] नः (=अस्माकम्) ऊतये (=संरक्षणाय) अस्मिन् वाजे (=संग्रामे) ऊर्ध्वस्तिष्ठ (=उत्तिष्ठ=सिद्धः पर्याप्तो भव), [येन] [आवाम्] अन्येषु [वाजेषु] संब्रवावहै (=परस्परं संभाषणं करवावहै) ॥

५. हे संपत्तींच्या प्रभू, हे स्तवनपूजिता, हे वीरा [ इंद्रा ], ज्यापेक्षां तुला अर्पण केलेलें स्तोत्र [सुंदर असतें] त्यापेक्षां [तूं] प्रसाद [देशील तोहि] सुंदर असो.

६. हे शतप्रज्ञ [इंद्रा], या संग्रामांत आमच्या संरक्षणासाठीं [तूं] उभा राहा, [कीं जेणेंकरून] आम्ही उभयतां दुसऱ्या [संग्रामां]च्या प्रसंगीं परस्पर संभाषण करूं.

5. O [Indra], lord of riches, O god whose offering consists of prayers, O hero, in as much as thy praise [is glorious], may [thy] gift be glorious.

6. Stand up, O [Indra] of hundred wisdoms, to protect us in this battle, [so that] we may both converse together in others.

५. या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'हे इंद्रा, तुझी स्तुती आम्ही करितों ती जशी सुंदर आणि विपुल असते तशी तूं आम्हांस देणगी देशील तीहि सुंदर आणि विपुल असो.'

'स्तवनपूजिता'='गिर्वाहः'=गीः वाहः यस्य. 'वाहः' म्हणजे पूजा अथवा हव्य जें देवास अर्पण करावयाचें तें, आणि 'गीः' म्हणजे स्तुति, स्तवन. वाहः म्हणजे हव्य याविषयीं उदाहरणें, "शंसावाध्वर्यो प्रति मे गृणीहि इन्द्राय वाहः कृणवाव जुष्टम्" ऋ. ३. ५३. ३; "इन्द्र...ते ...कद्वाहो अर्वागुप मा मनीषा आ त्वा शक्यामुपमं राधो अन्नैः" ऋ. १०. २९. ३. सायणाचार्य 'घोडयांनीं वाहून नेलेला' असा अर्थ करितात. पण त्याचें हृद्य समजत नाहीं.

'तुला अर्पण केलेलें स्तोत्र'='ते स्तोत्रम्.' अक्षरशः अर्थ 'तुझें स्तोत्र' असा आहे, म्हणजे तुला जें आम्ही रचून अर्पण करितों तें.

'सुंदर'. हा अर्थ आम्हीं 'विभूति' याचा केला आहे. 'विभूति' हें आरंभीं नाम होतें तरी ऋग्वेदांत त्याचा विशेषणार्थी प्रयोग आढळतो. जसें:—"रयिर्विभूतिरीयते वचस्या"='भव्य संपत्ती मागितली आहे.' (ऋ. ६. २१. १.) "महान्ता मह्ना विभ्वो विभूतयो दूरेदृशो ये०(=मरुतः)" ऋ. १. १६६. ११. "महामनूनं तवसं विभूतिं मत्सरासो जर्हृषन्त प्रसाहम्" (=इन्द्रम्) ऋ. ६. १७. ४.

'प्रसाद'='सूनृता.' सूनृता याचा मूळ अर्थ 'मधुर आणि अंतःकरणापासून बोललेलें वचन.' अर्थात् 'वर'. म्हणजे तशा वचनावरून अथवा तें बोलून कांहीं तरी देणगी द्यावयाची ती. सूनृता म्हणजे प्रसाद या अर्थाविषयीं प्रयोगांतरांचे दाखले वेदांत अनेक आहेत.

६. हा मंत्र जरी सोपा आहे तरी त्याच्या शेवटच्या चरणाचा भावार्थ स्पष्ट समजत नाहीं. 'हे इन्द्रा, तू या संग्रामांत म्हणजे युद्धांत आम्हांस रक्षण्यास तयार हो, कीं जेणेंकरून दुसऱ्या युद्धाच्या प्रसंगीं तूं आणि मी परस्पर संवाद करूं' असें म्हणावयाचें तर खरें. पण

योगेयोगे तवस्तरं वाजेवाजे हवामहे ।
सखाय इन्द्रमूतये ॥ ७ ॥
योगेऽयोगे । तवःऽतरम् । वाजेऽवाजे । हवामहे ।
सखायः । इन्द्रम् । ऊतये ॥ ७ ॥
आ घा गमद्यदि श्रवत्सहस्रिणीभिरूतिभिः ।
वाजेभिरुप नो हवम् ८ ॥
आ । घ । गमत् । यदि । श्रवत् । सहस्रिणीभिः । ऊतिऽभिः ।
वाजेभिः । उप । नः । हवम् ॥ ८ ॥

## भाषायाम्.

७. योगेयोगे (=तत्तत्कर्मणि ) वाजेवाजे (=तस्मिंस्तस्मिन्संग्रामे ) [ च ] तवस्तरम् (=अतिशयेन बलिनम् ) इन्द्रम् ऊतये (=संरक्षणार्थं ) [ तस्य ] सखायो [ वयं ] हवामहे (=आह्वयामहे ) ॥

८. यदि (=यदैव ) [ इन्द्रः ] [ अस्माकमाह्वानं ] श्रवत् (=शृणुयात्=श्रोष्यति ) [ तदैव ] सहस्रिणीभिः (=सहस्रसंख्याकाभिः ) ऊतिभिः (=साहाय्यसाधनैः ) वाजैः (=धनैश्च ) [ च ] [ सह ] नो हवमुप (=आह्वानसमीपम् ) आगमत् ह (=आगमिष्यत्येव ) ॥

तूं आणि मी परस्पर संवाद करूं म्हणजे काय? आणि या युद्धांत मंत्रवक्त्याचें संरक्षण इंद्रानें केलें तर दुसऱ्या युद्धांत संवाद करण्यांत काय विशेष आहे? परंतु असा भावार्थ दिसतो कीं, "या प्रसंगीं जर तूं आम्हांस रक्षिलें नाहींस तर आम्हीं मरून जाऊं आणि दुसऱ्या युद्धांत 'हे इंद्रा, आम्हांस वाचीव' असा धावा तुझा कोणी करणार नाहीं आणि 'हा आलों, भिऊं नका' असें आश्वासन देण्यास तुला जागा राहणार नाहीं.'

या सूक्ताचा वक्ता शुनःशेप हा ब्रह्मर्षि म्हणजे ब्राह्मणकुळांतील ऋषि होता. तरी 'आमच्या या युद्धांत तूं आमचें रक्षण कर' अशी इंद्राची स्तुती तो करितो ही लक्ष्यांत ठेवावी. कारण कीं ह्यावरून दोन गोष्टींचा निर्णय होतो. एक ही कीं, पूर्वीचे ऋषि आपल्या तपोबळानें पाहिजे तें करूं शकत अशी जी आलीकडील समजूत आहे ती निराधार आहे, नाहीं तर या ऋषीस इंद्राची स्तुति दीन होऊन करावी लागली नसती. दुसरी गोष्ट ही कीं, ब्राह्मणांनीं केवळ स्नानसंध्या जपतप करून राहावें आणि क्षत्रियांनीं लढावें असे जे धर्म आलीकडे लावून दिले आहेत असें म्हणतात त्याला वेदांत कांहीं आधार नाहीं, असता तर या सूक्ताच्या कर्त्यांचें रक्षण 'युद्धांत' करावें अशी इंद्राची प्रार्थना करावी लागली नसती. पुढचा मंत्रहि पाहा. त्यावरून पूर्वी ब्राह्मण लढत आणि निर्बळ मनुष्यांप्रमाणें दुसऱ्यांनीं ( क्षत्रियांनीं ) आमचा बचाव करावा असें म्हणून राहत नसत हें स्पष्ट होईल.

७. प्रत्येक कामीं, प्रत्येक संग्रामीं महापराक्रमी इंद्रास [त्याचे] सखे [आम्ही] [आमच्या] संरक्षणासाठीं बोलावितों.

८. [तो] जेव्हां ऐकेल तेव्हां एकदम हजारो पाठबळें घेऊन [आणि] लुटी घेऊन [तो] आमच्या हाकेसरशीं येईल.

7. In every work, in every battle we [his] friends invoke the very mighty Indra for [our] protection.

8 As soon as he shall hear he will come to our call with thousands of helps and booties.

---

७. मंत्रवक्त्याचें म्हणणें असें आहे कीं, 'कोणतेंहि साधारण काम आम्हीं हातांत घेतलें, अथवा कोणतीहि लढाई मारावयास गेलों, तरी महापराक्रमी जो इंद्र त्याला साहाय्यासाठीं आम्ही बोलावीत असतों'. हें जें आमच्या पूर्वजांचे सर्व लहानमोठ्या प्रसंगीं देवावरचें अवलंबन, पूर्वींचे ब्राह्मण युद्ध करीत, देवावर पूर्ण भरंवसा राखीत आणि आम्ही सर्वज्ञ व सर्वशक्तिमान आणि पृथ्वीवरचे देवच आहों अशी खोटी व हानिकारक आणि अश्लाघ्य विकत्थना आलीकडे करूं लागले तशी करीत नसत या सर्व गोष्टींचा विचार करण्याजोगा आहे यांत संशय नाहीं.

८. हा मंत्र किती सुंदर आणि प्रेमळ आहे पाहा. प्रत्येक लहान मोठ्या कामांत आणि युद्धप्रसंगांत आम्ही इंद्राचा धांवा करितों इतकें देवावलंबन दर्शवून ऋषि उगीच बसत नाहीं, पण आम्ही इंद्राचा धांवा करितांच तो हजारो मदती घेऊन आम्ही हाक मारीत असूं तेथें येईल आणि लढाईंत आम्हांस यश मिळवून देऊन लढाईच्या अंतीं ज्या लुटी मिळावयाच्या त्या आम्हांस प्राप्त करून देईल असा भरंवसा पूर्ण आहे असें या मंत्रांत ऋषि सांगतो. या साध्या, उघड, प्रेमभरित, भाविक आणि दृढभक्तिक श्रुतीपेक्षां सुंदर तें काय म्हणावें ?

'एकदम' हा अर्थ 'आ घ गमत्' या शब्दांपासून आणि मंत्रांतील त्यांच्या स्थलापासून गम्यमान आहे.

**अनु प्रत्नस्यौकसो हुवे तुविप्रतिं नरम् ।**
**यं ते पूर्वं पिता हुवे ॥ ९ ॥**

अनु । प्रत्नस्य । ओकसः । हुवे । तुविऽप्रतिम् । नरम् ।
यम् । ते । पूर्वम् । पिता । हुवे ॥ ९ ॥

**तं त्वा वयं विश्ववारा शास्महे पुरुहूत ।**
**सखे वसो जरितृभ्यः ॥ १० ॥ २९ ॥**

तम् । त्वा । वयम् । विश्वऽवार । आ । शास्महे । पुरुऽहूत ।
सखे । वसो इति । जरितृऽभ्यः ॥ १० ॥ २९ ॥

## भाषायाम्.

९. [ हे इन्द्र ], [ अस्माकं ] प्रत्नस्य (=पुरातनस्य ) ओकसः (=कुलस्य ) तुविप्रतिं नरं (=बहून् शत्रून् प्रति गन्तारं योद्धारं वीरं ) [ त्वां ] यं [मम] पिता पूर्वं हुवे (=जुहाव ) [तं] ते (=त्वाम् ) [ अहमपि अधुना ] अनुहुवे (=पितरमनु आह्वयामि ) ॥

१०. तं त्वा हे विश्ववार (=सकलधनयुक्त ) [ इन्द्र ], हे पुरुहूत (=बहुभिराहूत), हे जरितृणां (=स्तोतृणां) वसो (=प्रिय) सखे [ इन्द्र ], वयम् आशास्महे (=प्रार्थयामहे ) ॥

९. [हे इंद्रा], [आमच्या ह्या] पुरातन घराण्याच्या अनेक शत्रूंशीं लढणारा [जो] वीर [तूं] [आणि] ज्या तुझा धांवा पूर्वीं माझा बाप करीत असे त्या तुझा धांवा, आतां मी करितों.

१०. तर हे सर्वसंपत्तियुक्त [इंद्रा], हे पुरुहूता, हे स्तोत्यांच्या प्रियसख्या, आम्ही तुला प्रार्थीत आहों.

9. I too invoke thee, [Indra], who art the champion that didst fight many enemies of [our] ancient family, [and] whom [my] father used to invoke before.

10. We, therefore, implore thee, [Indra], O source of all good things, O thou invoked by many, O dear friend of the poets.

---

९. मंत्रवक्त्याचा भावार्थ असा आहे कीं, 'आमच्या ह्या पुरातन घराण्याच्या अनेक शत्रूंचा पाडाव शूर इंद्रानें वेळोवेळां केला आहे, व माझा बापहि प्रत्येक संकटाच्या वेळीं इंद्रास हाक मारीत असे. यास्तव जसे माझे वाडवडील आणि माझा बाप हे हाक मारीत, तसाच मीहि आजच्या प्रसंगीं हाक मारीत आहें. तर इंद्रानें येऊन मला साहाय्य करावें'. म्हणजे 'इंद्र हा आमच्या कुळाचा फार दिवसांपासून साहाय्यकर्ता मित्र आहे. यास्तव तो आम्हास या प्रसंगीं सोडणार नाहीं.' हा आजचा प्रसंग म्हणजे कोणता त्याविषयीं अशी कल्पना करावयाची कीं, कांहीं तरी मोठें संकट किंवा लढाईचा प्रसंग आला आहे, आणि त्याच्या संबंधानें ऋषि बोलत आहे.

या मंत्रात जो 'ते' शब्द आहे त्याचा साधारणतः 'तुजकरितां' किंवा 'तुझा' असा चतुर्थीचा किंवा षष्ठीचा अर्थ होतो. पण या ठिकाणीं आम्हीं सायणास अनुसरून 'तुला' असा द्वितीयेचा अर्थ केला आहे. पण त्याविषयीं आम्हास थोडासा संशय आहे. सायणाप्रमाणें 'ते' ही द्वितीया न घेतली तर खालीं लिहिल्याप्रमाणें अर्थ संभवतो:- '[हे यजमाना,] [तुझ्या ह्या] पुरातन घराण्याच्या अनेक शत्रूंशीं लढणारा [जो] वीर [इंद्र], [आणि] ज्या [इंद्रा]चा धांवा पूर्वीं तुझा बाप करीत असे त्या [इंद्रा]चा धांवा आतां [तुजकरितां] मी करितों.' परंतु असा अर्थ केला तर मंत्रवक्ता कवि दुसऱ्या एकाद्या यजमानासाठीं हें सूक्त रचून म्हणतो आहे असें समजलें पाहिजे. परंतु पुढच्या मंत्रात आरंभीं जे "तं त्वा वयम्......आशास्महे" असे शब्द इंद्राविषयीं आहेत त्यावरून प्रस्तुत मंत्रांतील "यं ते" हे दोन्ही शब्द "ज्या तुला" या अर्थीं इंद्राविषयींच समजले पाहिजेत असें आम्हास वाटतें.

१०. 'तर......आम्ही तुला प्रार्थीत आहों'= 'तं त्वा वयमाशास्महे.' म्हणजे ज्याविषयीं पूर्वीच्या मंत्रात सांगितलें त्या तुला इंद्राला; तूं आमच्या कुळाचा जुना मित्र आहेस म्हणून.

'सर्वसंपत्तियुक्त'='विश्ववार.' 'वार'

**अस्माकं शिप्रिणीनां सोमपाः सोमपाव्नाम् ।**
**सखे वज्रिन् त्सखीनाम् ॥ ११ ॥**

अस्माकम् । शिप्रिणीनाम् । सोमऽपाः । सोमऽपाव्नाम् ।
सखे । वज्रिन् । सखीनाम् ॥ ११ ॥

**तथा तदस्तु सोमपाः सखे वज्रिन् तथा कृणु ।**
**यथा त उश्मसीष्टये ॥ १२ ॥**

तथा । तत् । अस्तु । सोमऽपाः । सखे । वज्रिन् । तथा । कृणु ।
यथा । ते । उश्मसि । इष्टये ॥ १२ ॥

**रेवतीर्नः सधमाद इन्द्रे सन्तु तुविवाजाः ।**
**क्षुमन्तो याभिर्मदेम ॥ १३ ॥**

रेवतीः । नः । सधऽमादे । इन्द्रे । सन्तु । तुविऽवाजाः ।
क्षुऽमन्तः । याभिः । मदेम ॥ १३ ॥

## भाषायाम्.

११. हे सोमपाः (=सोमस्य पातः ), हे वज्रिन् (=वज्रधर ) सखे [ इन्द्र ], [ तव ] सखीनां (=सखिवद्वर्तिप्रियाणां ) सोमपाव्नां (=सोमस्य पातृणाम् ) अस्माकं शिप्रिणीनां (=दीर्घहनुयुक्तानां गवां ) [ समूहस्त्वत्प्रसादादस्तु ] ॥

१२. हे सोमपाः (=सोमस्य पातः ) हे सखे वज्रिन्, [ यत् किंचित् ] यथा [ करणाय ] ते इष्टये (=त्वां प्रेरयितुं ) [ वयम् ] उश्मसि (=उश्मः=इच्छामः ) तत् तथा अस्तु (=भवतु ), [ तत् ] [ त्वं ] तथा कुरु ॥

१३. इन्द्रे सधमादे (=अस्माभिः सह सोमं पीत्वा मदयुक्ते ) [ सति ], नः ( अस्मभ्यं ) तुविवाजाः (=प्रभूतान्नयुक्ता ) रेवतीः (=रेवत्यः=संपदः ) सन्तु । याभिः [ रेवतीभिः ] क्षुमन्तः (=अन्नयुक्ताः ) [ वयं ] मदेम (=हर्षयुक्ता भवेम ) ॥

म्हणजे अन्नादिक 'धन'. ऋ. १. १२०.

६. याजवरील सायणभाष्य पाहा.

'पुरुहूत' म्हणजे ज्याला पुष्कळ जण बोलावितात.

'स्तोत्यांच्या प्रियसख्या'='सखे वसो जरितृभ्यः'. म्हणजे जे स्तोते अथवा उपासक इंद्राची स्तुती म्हणजे स्तवनादिकेंकरून भक्ती कारतात त्यांचा तो प्रियसखा होय, म्हणजे त्यांच्याशीं तो प्रिय मित्राप्रमाणें वागतो.

११. हे सोमपान करणाऱ्या, हे सख्या, हे वज्रधरा, सोमपान करणारे जे [तुझे] सखे आम्ही, त्या आम्हांस सुंदर [गाई प्राप्त होओत ]

११. O Soma-drinking friend, wielder of the thunder-bolt, [may there come plenty] of fair cows' to us thy Soma-drinking friends!

१२. हे सोमपान करणाऱ्या सख्या, हे वज्रधरा, जें करण्याविषयीं तुला उत्तेजन देण्यास आम्ही इच्छितों तें त्याप्रमाणें होओ, तें त्याप्रमाणें कर.

12. May that come to pass, O Soma-drinking friend, wielder of the thunder-bolt, [and] cause thou it to pass in such manner as we wish to induce thee to do.

१३. इंद्र [हा] [आम्हां]सह पिऊन हर्ष पावल्यावर विपुल अन्नानें युक्त [अशा] संपत्ती आम्हांस प्राप्त होओत, [कीं] जिहींकरून अन्नानें युक्त होत्सातें [ आम्ही ] हर्ष पावूं.

13. When Indra has drank and become happy with [us], may we have [from him] riches with plenty of food, whereby delighting in [our] food we may rejoice.

११. या मंत्राचा अर्थ आम्हीं सायणाचार्यास अनुसरून केला आहे. परंतु 'गाई प्राप्त होओत' हे शब्द मूळांत नसतां अध्याहृत घ्यावे लागतात, आणि अशा प्रकारचे शब्द अध्याहृत घेणें म्हणजे कांहीं तरी निर्वाह करणें.

'सुंदर' याबद्दल 'शिप्रिणीनाम्' असें आहे. त्याचा अर्थ कितीएक विद्वानांचे मतें 'शिप्रवताम्' असा आहे आणि तो पुंलिंगी शब्द होय. तसें समजलें तर मग मंत्राचा अर्थ चांगला बसतो, तो असा:—

"शोभायमान सोमपान करणारे आणि तुझे सखे जे आम्ही, त्या आमच्या हे सोमपान करणाऱ्या सख्या वज्रधरा!" याचा संबंध खालच्या ऋचेशीं घ्यावयाचा.

या मंत्रांत 'सोमपाव्नाम्' हा शब्द महत्त्वाचा आहे. कां कीं अर्वाचीन काळीं सोम तयार करून देवांसच मात्र अर्पण करीत, आर्यजन आपण पीत नव्हते असें कोणी म्हणेल तर त्याच्या विरुद्ध याचा दाखला देतां येईल.

१२. मंत्राचा भावार्थ असा कीं, 'हे इंद्रा, जी गोष्ट ज्या रीतीनें घडवून आणण्याविषयीं तुझी प्रार्थना आम्ही करितों, ती गोष्ट तशी घडून येओ, आणि ती तूं तशी घडवून आण.' यांतील प्रार्थना कितो मनःपूर्वक आणि भाविक आहे पाहा. जर प्राचीन ऋषींस शापानें सूर्यचंद्रांस थांबविण्याची आणि आशीर्वादानें राजाचा रंक आणि रंकाचा राजा करण्याची शक्ति असती, तर ते देवांची अशी नम्र प्रार्थना करतेना.

आ घ त्वावान् त्मनाप्तस्तोतृभ्यो धृष्णवियानः ।
ऋणोरक्षं न चक्र्योः ॥ १४ ॥

आ । घ । त्वाऽवान् । त्मना । आप्तः । स्तोतृऽभ्यः । धृष्णो इति । इयानः ।
ऋणोः । अक्षम् । न । चक्र्योः ॥ १४ ॥

आ यद्दुवः शतक्रतवा कामं जरितॄणाम् ।
ऋणोरक्षं न शचीभिः ॥ १५ ॥ ३० ॥

आ । यत् । दुवः । शतक्रतो इति शतऽक्रतो । आ । कामम् । जरितॄणाम् ।
ऋणोः । अक्षम् । न । शचीभिः ॥ १५ ॥ ३० ॥

## भाषायाम्.

१४. हे धृष्णो (=धाष्टर्ययुक्त) [इन्द्र], त्वावान् (=त्वत्सदृशः) स्तोतृभ्य आप्तः (=हितकारी) [देवः], इयानः (=अस्माभिर्याच्यमानः सन्), चक्र्योः (=चक्रयोरुपरि) अक्षम् [अधिष्ठाय] इव, त्मना (=स्वयमेव) आ घ ऋणोति (=त्वरितमागच्छति) ॥

१५. हे शतक्रतो (=शतप्रज्ञ) [इन्द्र], यत् (=यदा) [त्वं] जरितॄणां (=स्तोतॄणां) दुवः (=परिचर्याम्) आ[ऋणोषि] (=आगच्छसि), [अपि च जरितॄणां] कामम् आ[ऋणोषि], [तदा] [त्वम्] अक्षं न (=चक्रयोः अक्षमिव =चक्रयोरुपरि अक्षम् अधिष्ठायेव, शचीभिः (=बलेन=त्वरितम्) [आ] ऋणोः (=आगच्छसि) ॥

*१३. भावार्थः—'इंद्र हा आम्हाबरोबर सोम पिऊन तृप्त झाला म्हणजे आम्हास अन्नादि संपत्ती देओ, आणि त्या त्याणें आम्हास दिल्या म्हणजे आम्ही सधन आणि खाऊन पिऊन चांगले आहों अशी आमची प्रख्याति होईल, व तेणें करून आम्हास आनंद होईल.'

'इंद्र हा आम्हांसह सोम पिऊन हर्ष पावल्यावर.' या शब्दांविषयीं विशेष टीका करणें अवश्य नाहीं. कारण कीं, आम्हीं सांप्रत देवास नैवेद्य दाखविला म्हणजे तो खाऊन देव तृप्त होतात असें आपण सर्व मानितों. तथापि नैवेद्य असतो तेथेंच राहतो. तर याप्रमाणें प्राचीन आर्यांचा सोम इंद्र पीत असे असें समजावयाचें. विशेष इतकेंच समजावयाचें कीं, आम्ही नैवेद्य दाखवितांना देवाबरोबर खात नाहीं, मागाहून भक्षण करितों आणि आपले पूर्वज जसा सोम अर्पण करीत तसा अर्पण करितांनाच आपणहि पीत होते तेणेंकरून इंद्राला 'सधमाद्' असें या मंत्रांत म्हटलें आहे.

इंद्रादि देव सोम पिऊन तृप्त झाल्यावर भक्तांस संपत्ती देतात, आणि त्यास लढाईत मदत करितात इत्यादि पूर्वी सांगितलेंच आहे.

१४. हे धैर्यवंता [इंद्रा], प्रार्थना होतांच तुजसारिखा स्तोत्यांस दयाळु [असलेला] देव, दोन चाकांच्या आखा[वर बसून आल्या] प्रमाणें आपणच त्वरित येत असतो.

१५. हे शतप्रज्ञ [इंद्रा], [तूं] जेव्हां स्तोत्यांची पूजा [ आणि ] मनकामना यांजकडेस [येत असतांस] [ तेव्हां ] [ तूं ] आखा[वर बसून आल्या]प्रमाणें झपाट्यानें येत असतोस

14. O brave [Indra], a [god] like thee, kind to the singers, [being] implored immediately [ comes ] of his own accord as [if] he rode an axle on a pair of wheels.

15. When, O [Indra] of hundred wisdoms, [thou] comest to the worship [and] comest to the desire of the singers, [thou] comest [as] eagerly as [if] thou rodest an axle.

---

१४. भावार्थ:–'हे इंद्रा, तूं आणि तुजसारिखे दुसरे देव आम्हांसारिख्या स्तोत्रकर्त्यांवर इतकी माया करितां कीं, आम्हीं तुमची प्रार्थना केल्याबरोबर तुम्ही एकदम आम्हांजवळ येत असतां. त्याला दृष्टांत; दोन चाकांवर नुसता आखच घातला आणि त्याजवर गाडीचा साटा वगैरे ओझें न घालतां त्याजवर बसल्यावर जसा धांवतो तद्वत्.'

असा भावार्थ आम्हांस दिसतो, त्याप्रमाणें आम्हीं भाषांतर केलें आहे. आणि तें बहुतकरून सायणभाष्यास मिळूनच आहे. 'आ ऋणोः' या क्रियापदाचा मात्र ते किंचित् भिन्न अर्थ करितात.

'आपणच एकदम येत असतो'= 'आ घ....त्मना....ऋणोः'. 'आ ऋणोः' हें क्रियापद तृतीयपुरुषीं असावें, पण त्याचा जो 'त्वावान्' (='तुजसारिखा') हा कर्ता आहे त्यांत द्वितीयपुरुषाचें अंग असल्यामुळें आणि 'तुजसारिखा देव येतो' यांत 'तूं येतोस' असें विवक्षित असल्यामुळें तें द्वितीयपुरुषीं आहे. तथापि यांतील जी उपमा आहे ती चमत्कारिक दिसते यांत संशय नाहीं.

१५. या मंत्राचा भावार्थ:–'हे इंद्रा, तूं जेव्हां तुझ्या उपासकांनीं तुला अर्पण केलेली पूजा ग्रहण करण्यास आणि त्यांच्या वांछा काय आहेत त्या पाहून पुरत्या करण्यास येत असतोस तेव्हां तूं दोन चाकांच्या आखावर बसून 'आल्याप्रमाणें मोठ्या झपाट्यानें येत असतोस'.

या मंत्रांत आणि पूर्वील मंत्रांतहि जें 'आ ऋणोः' असें क्रियापद आहे त्याचे दोन अर्थ होतात. एक 'येणें.' आणि दुसरा 'कशावर तरी (गाडीवर, रथावर इ०) बसून येणें.' यांपैकीं पूर्वींचा अर्थ प्रत्येक मंत्राच्या पूर्वार्धांत इष्ट आहे आणि शेवटचा शेवटील चरणांत इष्ट आहे. हें लक्ष्यांत ठेविलें तर मग या मंत्राचा अर्थ चांगला बसतो.

**शश्वदिन्द्रः पोप्रुथद्भिर्जिगाय नानदद्भिः शाश्वसद्भिर्धनानि ।**
**स नो हिरण्यरथं दंसनावान्त्स नः सनिता सनये स नोऽदात्**
**॥ १६ ॥**

शश्वत् । इन्द्रः । पोप्रुथत्ऽभिः । जिगाय । नानदत्ऽभिः । शाश्वसत्ऽभिः ।
धनानि ।
सः । नः । हिरण्यऽरथम् । दंसनाऽवान् । सः । नः । सनिता । सनये ।
सः । नः । अदात् ॥ १६ ॥

---

## भाषायाम्.

१६. शश्वत् (=सदा) इन्द्रः पोप्रुथद्भिः (=अतिशयेन ओष्ठशब्दं कुर्वद्भिः) नानदद्भिः (=पुनःपुनः हेषाशब्दं कुर्वद्भिः) शाश्वसद्भिः (=भृशं श्वसद्भिः) [ अश्वैः ] [ वैरिसंबन्धीनि ] धनानि जिगाय । स दंसनावान् (=कर्मवान्=पराक्रमशाली) [ इन्द्रः ] नः (=अस्मभ्यं) हिरण्यस्य रथं (=हिरण्येन कृतं हिरण्येन पूर्णं वा रथम्) [ अदात् ], स सनिता (=दाता) नः (=अस्मभ्यं) [ हिरण्यरथं ] सनये (=सनेरर्थं=दानार्थम्) [ अदात् ], स नः (=अस्मभ्यं) [ हिरण्यरथम् ] अदात् ॥

---

. 'दुवः' याचा अर्थ आम्हीं 'पूजा' असा केला आहे. 'दुवस्यति' हें क्रियापद पूजनार्थी आहे. उदाहरण, "अग्निर्हि देवाँ अमृतो दुवस्यति" (ऋ. ३. ३. १.) याजवरील सायणाचार्यांचें भाष्य पाहा.

'झपाट्यानें'='शचीभिः.' अक्षरशः अर्थ आपल्या 'सर्व शक्तींनिशीं'='आपलें सर्व बळ खर्च करून.' अर्थात् 'जोरानें', 'वेगानें,' 'झपाट्यानें.' 'शचीभिः' याचा प्रयोग येथें क्रियाविशेषणार्थी आहे. (शनैः, नीचैः, उच्चैः ह्या तृतीया अनेकवचनी असतां क्रियाविशेषणें होतात ह्याची आठवण होईलच).

१६. इंद्रानें अतिशय फुरफुरणाऱ्या, हेकाकणाऱ्या [आणि] मोठ्यानें श्वासोच्छ्वास टाकणाऱ्या घोड्यांच्या योगानें सर्वदा लुटी जिंकून आणिल्या आहेत. त्या महापराक्रमी [इंद्रा]नें आम्हांस सोन्याचा रथ [ दिला आहे ], त्या दात्यानें आम्हास [ सोन्याचा रथ] दान [ दिला आहे ], त्याणें आम्हांस [सोन्याचा रथ] दिला आहे.

16. Indra has always, with snorting, neighing [and] panting [horses], won us booties. He the performer of valorous deeds [has given us] a golden chariot, he the bounteous [has given] us [a golden chariot] as a present, he has given us [a golden chariot].

---

१६. या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'इंद्र हा लढाईत आमच्या बाजूस राहून आमचें साहाय्य करितो. आणि या पूर्वीं आम्ही जेव्हां जेव्हां लढाईस गेलों. तेव्हां तेव्हां त्यानें आमच्या शत्रूंचीं धनें आम्हांस लुटीखातर मिळवून दिलीं आहेत. आणि तो आमचें साहाय्य करितो तेव्हां घोड्यांच्या योगानें करितो, आणि ते घोडे लढाईत धांवतांना मोठ्यानें फुरफुरतात, मोठ्यानें हेकाकतात आणि मोठ्यानें श्वासोच्छ्वास टाकितात. एका प्रसंगीं तर महापराक्रमी आणि दानशाली इंद्रानें आम्हांस सोन्यानें भरलेला एक रथ शत्रूच्या लष्करांतून मिळवून दिला. असा हा इंद्र आहे.'

यांत इतकी गोष्ट घडलेली अशी म्हटली पाहिजे कीं, बोलणाऱ्यास पुष्कळ प्रसंगीं शत्रूंवर जय मिळून त्यांची लूट मिळाली होती, आणि एकदा तर सोन्यानें भरलेला (अथवा सोन्याच्या मुलाम्याचा केलेला?) रथच लुटींत मिळाला. तें सर्व इंद्राच्या पराक्रमानें झालें असें मंत्रकर्त्याचें ह्मणं.

यांत जे घोडे सांगितले ते मंत्रवक्ता जो योद्धा त्याच्याच पक्षाचे असें समजावें एक ( आणि तसें समजलों तर त्या घोड्यांच्या अंगीं जें इतकें तेज, इतका आवेश आणि वेग आणि शौर्य आलें आणि तेणेंकरून त्यास जय मिळाला तो इंद्राचा पराक्रम असा भावार्थ ); अथवा ते इंद्राचे घोडे असें समजावें ( आणि तसें समजलों तर जय आला तेव्हां तशा प्रकारचे घोडे इंद्राचे आले होते अशी मंत्रवक्ता कल्पना करीत आहे असें म्हटलें पाहिजे).

हें प्रस्तुतचेंहि सूक्त शुनःशेपकृत असल्यामुळें ऐतरेय ब्राह्मणकथेस अनुसरून सायणाचार्य म्हणतात कीं, या मंत्रांत जो हिरण्यरथ सांगितला तो इंद्राची प्रार्थना केल्यावर इंद्रानें यूपबद्ध शुनःशेपास दिला म्हणून पूर्वीं (पृष्ठ २०७ डावा समास खालून ९ वी ओळ पाहा) सांगितलें आहे तोच हा रथ. परंतु प्रश्न असा आहे कीं, प्राण वांचावा म्हणून प्रार्थना करीत असणाऱ्या शुनःशेपास

आश्विनावश्वावत्येषा यातं शवीरया ।
गोमद्दस्रा हिरण्यवत् ॥ १७ ॥

आ । अश्विना । अश्वऽवत्या । इषा । यातम् । शवीरया ।
गोऽमत् । दस्रा । हिरण्यऽवत् ॥ १७ ॥

समानयोजनो हि वां रथो दस्रावमर्त्यः ।
समुद्रे अश्विनेयते ॥ १८ ॥

समानऽयोजनः । हि । वाम् । रथः । दस्रौ । अमर्त्यः ।
समुद्रे । आश्विना । ईयते ॥ १८ ॥

न्य१घ्न्यस्य मूर्धनि चक्रं रथस्य येमथुः ।
परि द्यामन्यदीयते ॥ १९ ॥

नि । अघ्न्यस्य । मूर्धनि । चक्रम् । रथस्य । येमथुः ।
परि । द्याम् । अन्यत् । ईयते ॥ १९ ॥

---

## भाषायाम्.

१७. हे दस्रौ (=दंसनावन्तौ=पराक्रमवन्तौ) अश्विनौ, [ युवाम् ] अश्ववत्या शवीरया (=बलवत्या) इषा (=अन्नादिकसंपदा) [ सह ] गोमत् (=गोभिर्युक्तं यथा स्यात्तथा) हिरण्यवत् (=हिरण्येन युक्तं यथा स्यात्तथा) आयातम् (=आगच्छतम्) ॥

१८. हे दस्रौ (=शौर्यवन्तौ) अश्विनौ, वां (=युवयोः) समानयोजनः (=साधारणाश्वः=सामान्याश्वयुग्मः) अमर्त्यो रथः समुद्रे (=अन्तरिक्षे) ईयते (=गच्छति) हि ॥

१९. [ हे अश्विनौ ], [ युवां ] रथस्य [ एकं ] चक्रम् अघ्न्यस्य (=मेघरूपिणो गोः) मूर्धनि नियेमथुः (=नियमितवन्तौ=स्थापयथः) । अन्यत् [ चक्रं ] द्यां परीयते (=द्युलोकं पर्येति) ॥

---

हिरण्यरथ इंद्रानें कशाला दिला? दूधसाखरेनें कोठें ताहान भागते कीं काय? बस्तुतः या रथाचा, या मंत्राचा, अथवा या सर्व सूक्ताचा त्या शुनःशेपाच्या कथेशीं कांहींच संबंध नाहीं, आणि तसेंच समजून आम्हीं भाषांतर केलें आहे.

१७. हे अश्वी हो, हे पराक्रमी [देव] हो, [तुम्ही] अश्वांनीं परिपूर्ण [अशा] दृढ संपत्तीसह गाई [आणि] सुवर्ण बरोबर घेऊन या.

१८. कां कीं हे पराक्रमी अश्वी हो, तुमचा दोघांचा मिळून एकच जोडीचा अमर्त्य रथ अंतरिक्षांतून चालतो.

१९. [तुम्ही आपल्या] रथाचें [एक] चाक मेघाच्या शिरावर ठेवितां [आणि] दुसरें द्युलोकाच्या सभोंतालीं फिरतें.

17. O As'vins, performers of valorous deeds, come ye both with powerful wealth rich in horses, with cows [and] with gold.

18. For brave As'vins, your immortal chariot drawn by a common team [of horses] goes on the firmament.

19. Ye place [one] wheel of [your] chariot on the summit of the cloud, the other goes round the heaven.

---

१७. ऐतरेयब्राह्मणकथेस अनुसरून सायणाचार्य म्हणतात:—"इंद्रानें शुनः-"शेपास अश्वींची स्तुती करावयास सां-"गितली, त्यावरून हा आणि पुढचे "दोन अशा तीन मंत्रांनीं अश्वींची "स्तुती शुनःशेपानें केली ती ही." पण तसा संबंध समजण्याची आवश्यकता नाहीं हें पुनः सांगावयास नकोच.

या मंत्रांत 'गोमत्' आणि 'हिरण्यवत्' हीं 'आयातम्' या क्रियेचीं विशेषणाव्ययें आहेत.

१८. वरील मंत्रांत अश्वींस संपत्ती वगैरे घेऊन येण्याविषयीं सांगितलें. या मंत्रांत येण्याला अडचण कांहीं नाहीं असें म्हणतो. 'आकाशांतून तुमचा रथ चालतो त्यापेक्षां तुम्ही या' असा भावार्थ. दोनी अश्वींची मिळून एकच जोडी त्यांच्या रथास जोडलेली असते.

या मंत्रांत 'अंतरिक्ष' हा अर्थ 'समुद्र' शब्दाचा केला आहे. तो सायणाचार्यांस व अनेक प्रयोगांतरांस अनुसरून केला आहे. 'समुद्र' म्हणजे पाण्याचा संचय ज्यांत आहे असा प्रदेश. अंतरिक्षांत मेघरूपानें पाणी संचित असल्यामुळें त्यासहि समुद्र असें वेदांत म्हटलें आहे.

१९. या मंत्रांत अश्वींच्या रथाचें महत्त्व वर्णिलें आहे असें दिसतें. तो रथ इतका मोठा आहे कीं, त्याचें एक चाक मेघमंडलावर आणि दुसरें द्युलोकावर अशीं राहून तो चालत असतो.

यांत 'अघ्न्यस्य' याचा अर्थ आम्हीं 'मेघाचा' असा केला आहे. सायणाचार्य 'पर्वताचा' असा करितात. 'अघ्न्य' शब्दाचा मूळ अर्थ बैल असा आहे. लक्षणेनें मेघ अथवा पर्वत असा घ्यावयाचा आहे, जे शब्द मेघवाची ते पर्वतवाची संस्कृतांत होतात, असें पूर्वी सांगितलेंच आहे.

**कस्तं उषः कधप्रिये भुजे मर्तो अमर्त्ये ।**
**कं नक्षसे विभावरि ॥ २० ॥**

कः । ते । उषः । कधऽप्रिये । भुजे । मर्तः । अमर्त्ये ।
कम् । नक्षसे । विभाऽवरि ॥ २० ॥

## भाषायाम्.

२०. हे कधप्रिये (=स्तुतिप्रिये ) उषः, हे अमर्त्ये, को मर्तो, ते भुजे (=तव भोगाय ) [ योग्योस्ति ]? हे विभावरि (=प्रभावति ), [ त्वं ] कं नक्षसे (=गच्छसि ) ॥

२०. हे स्तुतिप्रिय उषे, हे अमर्त्य [देवी], कोणता मर्त्य तुझ्या भोगास योग्य आहे? हे प्रकाशवती, तूं कोणाजवळ जात असतेस?

20. What mortal, O immortal Ushas fond of praise, is fit for thy enjoyment? Fair one, to whom dost thou go?

२०. ऐतरेयब्राह्मणास अनुसरून सायणाचार्य म्हणतात कीं, अश्वींनीं शुनःशेपास उषेची स्तुती करावयास सांगितल्यावरून (पृ० २०७ डावा समास, खालून ५ पासून ३ ओळी पाहा) हा आणि पुढचे दोन असे तीन मंत्र म्हणून शुनःशेपानें जी उषेची स्तुती केली तीच ही. आणि हा मंत्र म्हटल्याबरोबर शुनःशेपाचे पाश सुटूं लागले, आणि तिसरा (त्वं न्येभिः इ० २२वा खालीं पाहा) मंत्र म्हणतांच शुनःशेप अगदी मोकळा झाला आणि हरिश्चंद्राचें उदर नीट झालें.

परंतु ह्या कथेशीं ह्या तीनहि मंत्रांचा कांहीं संबंध नाहीं. इतर ठिकाणीं उषेवर जसे मंत्र आणि जशीं सूक्तें आहेत तसेच हे तीन मंत्र आहेत, असें समजून वाचकांनीं हा भाग वाचला पाहिजे.

या तीन मंत्रांची देवता उषा आहे. उषा ही एक वेदांत महत्त्वाची देवी आहे. तिजविषयीं वेदांत कितीएक फार सुंदर मंत्र आणि सूक्तें आहेत. यास्तव ती कोण आहे व तिजविषयीं वेदांत काय काय सांगितलें आहे त्याचें थोडेंसें दिग्दर्शन खालीं लिहिल्याप्रमाणें करणें अवश्य आहे:—

उषा ह्या शब्दाचा मूळ अर्थ 'प्रकाशणारी.' त्यावरून प्रकाशणारी अशी प्रभातकाळची वेळ. तिला देवी मानून वेदांत तिजविषयीं कितीएक फार सुंदर सूक्तें रचिलेलीं आहेत. उषा ही द्यूची (आकाशाची) कन्या होय असें वर्णिलें आहे. तिला भगाची (सूर्यदेवतेची) बहीण असें म्हटलें आहे. तिला रात्रीचीहि बहीण म्हणतात. म्हणूनच रात्र आणि उषा ह्या दोन्ही बहिणींस 'नक्तोषा' 'उषानक्त' इत्यादि नांवानीं एकत्र जोडिलें आहे. सूर्यास उषेचा जार असें म्हटलें आहे. तरुण स्त्रीच्या मागून जसा एकादा तरुण पुरुष जातो तसा उषेच्या मागून सूर्य चालतो असें वर्णिलें आहे. उषा ही देवांचा डोळा (सूर्य) घेऊन येत असते, आणि पांढऱ्या घोड्यास (सूर्यास) घेऊन येत असते. तिला जगाची स्वामिनी आणि सूर्याची स्त्री असें म्हटलें आहे. एका ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, उषेपासून सूर्य, यज्ञ, आणि अग्नि हे निर्माण झाले. अग्नीला उषःकाळीं यज्ञकर्मासाठीं पेटवितात म्हणून अग्नीलाहि उषेचा जार असें म्हटलें आहे, आणि तो उषेच्या पूर्वीं अथवा उषेबरोबर येत असतो असें सांगितलें आहे. एका ठिकाणीं उषा येऊं लागली म्हणजे तिला भेटण्याकरितां अग्नि सामोरा जातो असें सांगितलें आहे. कोठकोठें अश्वी हे उषेबरोबर असतात असें सांगितलें आहे. ती त्यांची मैत्रीण होय असेंहि सांगितलें आहे.

उषा देदीप्यमान रथांत बसून येते असें वर्णिलें आहे. ती पूर्वेकडून येते. कोठकोठें ती शंभर रथांवर बसून येते असें वर्णन आहे. ती लाल घोडे आपल्या रथास जोडिते असें सांगितलें आ-

वयं हि ते अमन्मह्यान्तादा पराकात् ।
अश्वे न चित्रे अरुषि ॥ २१ ॥

वयम् । हि । ते । अमन्महि । आ । अन्तात् । आ । पराकात् ।
अश्वे । न । चित्रे । अरुषि ॥ २१ ॥

त्वं त्येभिरा गहि वाजेभिर्दुहितर्दिवः ।
अस्मे रयिं नि धारय ॥ २२ ॥ ३१ ॥ ६ ॥

त्वम् । त्येभिः । आ । गहि । वाजेभिः । दुहितः । दिवः ।
अस्मे इति । रयिम् । नि । धारय ॥ २२ ॥ ३१ ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

२१. वयं हि, हे अश्वे न (=अश्वावत्) चित्रे (=सुन्दरि) अरुषि (=अरुणवर्णे) [उषः], आ अन्तात् (=समीपात्) आ पराकात् (=दूरात्) [च] ते (=तव) अमन्महि (=मननं कुर्महे) ॥

२२. [सा] त्वं हे दिवो दुहितः [उषः], त्यैः (=तैस्तैः=सकलैः) वाजैः (=अन्नादिवैपुल्यैः) [सह] आगच्छ। [अपि च] अस्मे (=अस्मासु) रयिं (=संपदं) निधारय (=नितरां स्थापय) ॥

---

हे. एकाद्या सुंदर तरुण स्त्रीस तिची आई वस्त्रें आणि अलंकार घालून सजविते त्यासारिखी, अथवा एकाद्या पुष्कळ अलंकार घालून सजलेल्या गणिकेप्रमाणें, सुंदर वस्त्रें नेसून वगैरे एकादी तरुण स्त्री नवऱ्याजवळ येते त्याप्रमाणें, एकादी स्त्री न्हाऊनधुऊन लख होऊन न्हाणींतून बाहेर निघते तिजप्रमाणें, उषा हासत हासत आणि आपल्या सौंदर्याच्या मदानें आपली छाती लोकांपुढें उघडी करीत करीत चालते. ती अंधकारास हाकून लाविते आणि सर्व वस्तुमात्र दृष्टीस पडे असें करिते. ती सकळ प्राण्यांचा जीव होय, ती प्रत्येक घरीं येते, आणि एकादी गृहपत्नी घरांतील सर्व माणसांस उठविते तशी ती जगींतील सकळ जनांस उठविते, आणि आपापल्या कामाला पाठविते. उषेनें धार्मिक आणि भाविक लोकांस जागृत करावें पण अधार्मिक अनार्यांस मेल्याप्रमाणें निजूं द्यावें अशी प्रार्थना वेदांत आढळते. उषा नित्य जन्मते यास्तव ती तरुणच राहते. तरी ती पुरातन आहे.

इत्यादि उषेविषयीं सांगितलें आहे. उषेवरचीं सूक्तें जशीं सुंदर आहेत तशीं वेदांत दुसरीं सूक्तें सुंदर नाहींत. तिजविषयीं पुढें मंत्र आणि सूक्तें येत जातील तसतसें तिचें स्वरूप सर्व ध्यानात येईल.

२१. कारण कीं, हे घोडीप्रमाणें सुंदरे [आणि] लाल उषे, आम्ही जवळून [ आणि ] दुरून तुझें ध्यान करीत असतों.

२२. [तर] हे आकाशकन्यके [उषे], तूं सकल विपुलतांसह ये [आणि] आमचेठायीं संपत्ती स्थापन कर.

21. For we contemplate thee from near [and] from far, thou, [Ushas], beautiful [and] ruddy like a mare.

22. Come, therefore, with all plenties, thou daughter of Heaven, [and] make wealth permanent among us.

---

२१. या मंत्रांत उषेस ऋषि म्हणतो कीं, 'तूं दूर असतांना, म्हणजे तुला उगवण्यास वेळ असला तरी तेव्हां, आणि तूं जवळ असलीस तरी म्हणजे तूं उगवत आहेस अथवा उगवली असलीस तरी, आम्ही तुझें ध्यान करीत असतों.'

या मंत्रांत 'अश्वे न चित्रे' ह्या शब्दरचनेकडे लक्ष्य द्यावें. 'अश्वे' हें 'अश्वा' (=घोडी ) या शब्दाचें संबोधन आहे. वस्तुतः घोडीला संबोधन करावयाचें नाहीं. पण 'अश्वा न चित्रा अरुषी' अशी जी उषा तिचें संबोधन करावयाचें आहे. यास्तव 'चित्रे' आणि 'अरुषि' हीं संबोधनें झालीं त्याच्या आकर्षणानें 'अश्वा' हाहि शब्द संबोधनांत ओढला गेला. असे प्रयोग वेदांत दुसऱ्या विभक्तींच्या संबंधानेंहि पुष्कळ येत जातील.

२२. 'तुझें ध्यान आम्ही करितों म्हणून सांगितलें (पूर्वील मंत्रावरची टीप पाहा), त्यापेक्षां हे द्युकन्यके उषे, तूं सकल धनधान्य घेऊन ये आणि आमच्या घरीं संपत्ती स्थापन कर' असा भावार्थ.

या मंत्राविषयीं इतकेंच सांगावयाचें कीं, शुनःशेपानें हा म्हणतांच त्याचा राहिलेला शेवटचा पाश तुटला, आणि हरिश्चंद्र अगदी बरा झाला, असें ऐतरेयब्राह्मणांत सांगितलें आहे. पण शुनःशेपानें संकटाच्या वेळीं हा मंत्र म्हटला नसावा आणि सदरहू कथेशीं या मंत्राचा कांहींच संबंध नसावा असें आम्ही सांगत आलोंच आहों. २४ व्या सूक्तापासून तों ३० व्या सूक्तापावेतों कर्ता शुनःशेप आहे. या सात सूक्तांविषयीं विचार करितां चोविसाव्या सूक्ताचे पहिले दोन मंत्र आणि पुढें दुसरे एकदोन इतके मंत्र खेरीज करून या सर्व सात सूक्तांत संकटाच्या वेळीं रचिले असावे अथवा म्हटले असावे असे मंत्रच नाहींत. तशांत शुनःशेपास जें संकट प्राप्त झालें होतें असें ऐतरेयब्राह्मणकथेंत सांगितलें आहे, तशा भयंकर प्रसंगीं तर म्हणण्याजोगे अथवा म्हटले असतील असे मंत्र यांत मुळींच नाहींत. तेव्हां चोविसाव्या सूक्ताच्या आरंभीं जे पहिले दोन मंत्र आहेत ते कांहीं तरी संकटास अनुलक्षून आहेत असें वाटल्यावरून, आणि तें कोणतें संकट तें ठाऊक नसल्यामुळें आणि शुनःशेप या सात सूक्तांचा कर्ता असल्यामुळें, शुनःशेपास यूपास बांधिलें इत्यादि सगळा

## सूक्तम् ३१.

हिरण्यस्तूप आङ्गिरस ऋषिः । अग्निर्देवता । १-७, ९-१५, १७ इत्येतासु जगती च्छन्दः । ८,१६,१८ इत्येतासु त्रिष्टुप् ॥

**त्वमग्ने प्रथमो अङ्गिरा ऋषिर्देवो देवानामभवः शिवः सखा ।**
**तव व्रते कवयो विद्मनापसोऽजायन्त मरुतो भ्राजदृष्टयः ॥ १ ॥**

त्वम् । अग्ने । प्रथमः । अङ्गिराः । ऋषिः । देवः । देवानाम् । अभवः ।
शिवः । सखा ।
तव । व्रते । कवयः । विद्मनाऽअपसः । अजायन्त । मरुतः । भ्राजत्ऽ
ऋष्टयः ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे अग्ने, त्वं प्रथमोङ्गिरा ऋषिः (=अङ्गिरसामृषीणामादिपुरुषः) [अभवः], देवानां [ च ] [ प्रथमो ] देवः शिवः (=कल्याणः) सखा [ च ] अभवः । तव व्रते (=तव शासने ) [ हि ] कवयो (=मेधाविनो ) विद्मनापसः (=ज्ञानेन कर्मकर्तारः=कुशलाः ) भ्राजदृष्टयः (=दीप्यमानायुधाः) मरुतः अजायन्त ॥

---

कथाविस्तर ब्राह्मणांत वगैरे रचिला गेला असें अनुमान होतें. यास्तव या कथेवरून या सूक्तसप्तकाचा खुलासा कांहींच न होतां चोविसाव्या सूक्ताच्या आरंभींच्या दोन मंत्रांवरून या कथेचाच उलट खुलासा होतो, इतकें तात्पर्य.

## सूक्त ३१.

ऋषि–अंगिरस कुळांतील हिरण्यस्तूप या नावाचा कोणी एक पुरुष. देवता–अग्नि. वृत्त–जगती, पण ८, १६ आणि १८ या मंत्रांचें त्रिष्टुप्.

१. हे अग्नी, तूं अंगिरांचा मूळपुरुष ऋषि [होस]; तूं देवांचा [मूळ] देव [आणि] प्रियसखा होस, [ कां कीं ] तुझ्या आश्रयाखालीं मेधावी, कुशल, [ आणि ] तेजःपुंजायुधी मरुत् [देव] जन्मले.

## HYMN 31.

To *Agni*. By *Hiranyastûpa* of the family of the *Angirases*, Metre—*Jagati*, except in 8, 16 and 18, where it is *Trishtup*.

1. Thou, Agni, wast the first poet Angiras, the [first] god of the gods, a kind friend [to them]. For under thy protection were born the wise, the skilful [and] the bright-weaponed Maruts.



---

१. या सूक्तापासून पुढचीं पाच सूक्तें अंगिरस कुळांतील कोणी एक हिरण्यस्तूप या नावाच्या ऋषानें केलेलीं आहेत.

या पहिल्या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'हे अग्नी, माझे पूर्वज जे अंगिरस त्यांचा म्हणजे आमच्या कुळाचा तूं आदिपुरुष आहेस; आणि केवळ आमचाच आदिपुरुष आहेस असें नाहीं, पण सकल देवांचाहि तूं आदिदेव आहेस, आणि त्यांचा प्रियमित्र आहेस. कारण कीं, सर्वांत पुरातन जे मरुद्देव तेहि तुझ्या आश्रयाखालीं जन्मले आहेत.'

या सूक्ताचा कर्ता अंगिरस कुळांतील असल्यामुळें तो अग्नीला आपल्या वंशाचा आदिपुरुष आहेस असें म्हणतो. अग्नि अंगिरस कुळाचा आदिपुरुष कसा होईल असा प्रश्न निघाल्यास, हरिश्चंद्र, दशरथ इत्यादि लक्षावधी क्षत्रियांच्या वंशाचा आदिपुरुष सूर्य कसा? आणि पुरूरवा इत्यादिक क्षत्रियांच्या वंशाचा मूळपुरुष सोम म्हणजे चंद्र कसा झाला? हेंच त्याचें उत्तर आहे असें वाटतें. अंगिरस हे अग्नीचे उपासक पिढीनपिढी असल्यामुळें त्याजवर त्यांचें अति प्रेम बसून, त्यास त्यांणीं आपल्या कुळाचा मूळपुरुष केला यांत कांहीं नवल दिसत नाहीं.

अग्नीस देवांचा देव आणि प्रियसखा असें म्हटलें यांतहि आश्चर्य नाहीं, कारण कीं, इतर बहुत ठिकाणीं अग्नि हा फार पुरातन देव आणि तो देवांचा सखा होय, आणि त्यास हवी पोंहचवून त्यास तो संतुष्ट करितो असें सांगितलें आहे. ऋग्वेद १.६९.१ यांत अग्नीला देवांचा बाप असें म्हटलें आहे ("भुवो देवानां पिता पुत्रः सन्") ऋ. १०

त्वम॑ग्ने प्रथ॒मो अङ्गि॑रस्तमः क॒विर्दे॒वानां॒ परि॑ भूषसि व्र॒तम् ।
वि॒भुर्विश्व॑स्मै॒ भुव॑नाय॒ मेधि॑रो द्वि॒मा॒ता श॒युः क॑ति॒धा चि॑दा॒यवे॑ ॥ २ ॥

त्वम् । अ॒ग्ने॒ । प्र॒थ॒मः । अङ्गि॑रःऽतमः । क॒विः । दे॒वाना॑म् । परि॑ । भू॒ष॒सि॒ । व्र॒तम् ।
वि॒ऽभुः । विश्व॑स्मै । भुव॑नाय । मेधि॑रः । द्वि॒ऽमा॒ता । श॒युः । क॒ति॒धा । चि॒त् । आ॒यवे॑ ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. हे अग्ने, त्वं प्रथमः अङ्गिरस्तमः कविः [ सन् ] (=अङ्गिरसामृषीणामादितमः पुरुषः सन्) देवानां व्रतं (=देवानां प्रीत्यर्थं कर्तव्यं यज्ञयागादि कर्म ) परिभूषसि (=अलंकरोषि=अस्मदादिद्वारा कारयसि ) । विभुः (=बलवान् ) मेधिरो (=मेधावी ) द्विमाता (=द्वयोर्मात्रोररण्योः पुत्रः ) [ त्वं ] विश्वस्मै भुवनाय (=सर्वस्मै भूताय ) [ विश्वस्मै ] आयवे (=सर्वस्मै मनुष्याय ) [ च ] कतिधाचित् (=सर्वत्र ) शयुः (=शयानो=गुप्तो ) [ वर्तसे ] ॥

११०. ११ आणि १०. १५०. ४ यांत अग्नीस देवांचा गुरु अथवा पुरोहित असें म्हटलें आहे ( सद्यो जातो व्यमिमीत यज्ञम् अग्निर्देवानामभवत्पुरोगाः ॥ अग्निर्देवो देवानामभवत्पुरोहितः ). त्यास सर्व देवांचा राजा असें म्हटलें आहे ( सम्राजो असुरस्य इ० ऋ. ७. ६. १ ). त्याणें मित्रदेवास उत्पन्न केलें असें ऋ. १०. ८. ४ ( जनयन् मित्रं तन्वे स्वायै ) यांत सांगितलें आहे. सकल देव भिऊन त्याला शरण जातात ( विश्वे देवासः अनमृत्यन् भियाना: त्वामग्ने ऋ. ६. ९. ७ ). अग्नीला वरुण, मित्र आणि मरुत् आणि ३३३९ देव भजतात ( त्रीणि शता त्री सहस्राणि अग्निं त्रिंशच्च देवा नव चासपर्यन् ऋ. ३. ९. ९, मित्रश्च तुभ्यं वरुणः सहस्वो अग्ने विश्वे मरुतः सुम्नमर्चन् ऋ. ३. १४. ४ ).

'तेजःपुंजायुधी' म्हणजे लखलखीत आयुधें ज्यांचे हातांत असतात ते. मरुतांच्या हातांत असलीं आयुधें ( अथवा भाले ) असतात म्हणून पुष्कळ ठिकाणीं वर्णन आहे.

२. हे अग्नी, तूं अंगिरांचा अगदी मूळपुरुष ऋषि [आहेस] [आणि] देवांप्रीत्यर्थ [आम्हांकडून] [यज्ञयागादि] कर्म करवितोस. शक्तिमान् [आणि] प्रज्ञावान् [असा जो] दोन आईंचा पुत्र तूं [तो] सकल प्राणी [आणि] [सकल] मनुष्यें यांच्या हितासाठीं सर्वत्र गुप्त [राहतोस].

2. Thou, Agni, [art] the very first poet Angiras, [and] conductest the work [in honour] of the gods Mighty [and] wise thou the son of two mothers [liest] dormant everywhere for all creatures [and] for [all] men.

---

२. या मंत्रांतील सारांश असा आहे कीं, 'हे अग्नी, आमच्या ह्या अंगिरस वंशांत जे आजपर्यंत ऋषि (कवि) झाले, त्यांतून अगदी प्रथम आदिपुरुष आणि प्रथम कवि तूं आहेस; आणि तूं आमच्या वगैरे हस्तें देवांसाठीं यज्ञादि कर्में करवितोस. आणि सकल भूतें आणि सकल मनुष्यें यांच्या हितासाठीं तूं सर्वत्र म्हणजे काष्ठ, उदकें, पाषाण, प्राणिशरीरें इत्यादिकीं अंतर्हित अथवा गुप्तरूपानें राहतोस'.

'[आम्हांकडून] [यज्ञयागादि] कर्म करवितोस.' अक्षरशः अर्थ 'कर्म करितोस,' 'कर्म सिद्ध करितोस', म्हणजे 'आम्ही करावें अशी आम्हांस प्रेरणा करितोस'.

'दोन आईंचा पुत्र' हें अग्नीचें विशेषण पुष्कळ ठिकाणीं येतें. दोन 'अरणी' म्हणून जीं घर्षणानें विस्तव पाडण्याचीं उपकरणें असतात त्यांपासून अग्नि म्हणजे विस्तव उत्पन्न होतो म्हणून त्यास 'दोन आईंचा पुत्र' (द्विमाता) असें म्हणतात.

त्वम॑ग्ने प्रथ॒मो मा॑त॒रिश्व॑न आ॒विर्भ॑व सुक्र॒तूया वि॒वस्व॑ते ।
अरे॑जेतां रोद॑सी होतृ॒वूर्ये॑ऽसघ्नोर्भा॒रमय॑जो म॒हो व॑सो ॥ ३ ॥

त्वम् । अ॒ग्ने । प्र॒थ॒मः । मा॒त॒रिश्व॑ने । आ॒विः । भ॒व । सु॒क्र॒तु॒ऽया । वि॒वस्व॑ते । अरे॑जेताम् । रोद॑सी इति॑ । हो॒तृ॒ऽवूर्ये॑ । अस॑घ्नोः । भा॒रम् । अय॑जः । म॒हः । व॒सो इति॑ ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. हे अग्ने, त्वं सुक्रतुया (=शोभनकर्मेच्छया=यज्ञादिकर्म भूयादिति हेतोः) विवस्वते (=विवस्वन्नाम्नः कस्यचित् हिताय ) प्रथमः मातरिश्वने (=मातरिश्वन्नाम्ने कस्मैचिद्विवस्वतो दूताय ) आविः (=प्रकटो ) भव (?) (=भवः=अभवः ) । होतृवूर्ये (=होतृवरणे=होतृकर्मणे त्वयि वृते, नियोजिते सति ) रोदसी (=द्यावापृथिव्यौ अरेजेताम् (=अकम्पेताम्) । [त्वं पुनः] भारं (=रेजमानयो रोदस्योर्भारम्) असघ्नोः (=ऊढवानसि ) । [ अपि च ] हे वसो (=हे दयालो )॥ [ अग्ने ], [ त्वं ] महो (=महतो ) [ देवान् ] अयजः ॥

३. हे अग्नी, तूं शुभकर्मासाठीं प्रथम विवस्वताकरितां मातरिश्व्याच्या दृष्टीस पडलास. होत्याचे कामीं तुझी योजना केली तेव्हां पृथ्वी आणि आकाश थरथरां कांपलीं, [त्यांचा] भार तूं सहन केलास, [आणि] हे कृपाळू [अग्नी], मोठे [जे देव] त्यांप्रीत्यर्थ तूं यज्ञ करिता झालास.

3. Thou, Agni, first becamest manifest to Mâtaris'vâ for [the sake of] Vivasvân that auspicious works (sacrifices) might be performed. Earth and Heaven trembled at [thy] appointment as Hotâ (invoker); [but] thou didst sustain the weight [of them], [and], good [Agni], thou didst sacrifice to the great [gods].

३. ह्या मंत्राचा भावार्थ सांगितला पाहिजे. तो असा:–'हे अग्नी, तूं पूर्वीं पृथ्वीवर नव्हतास, तेव्हां यज्ञादिक सुकर्मे होत नव्हतीं, तीं घडावीं म्हणून विवस्वान् या नांवाच्या कोणी एक देवानें मातरिश्वा या नांवाचा दैविक महापुरुष आपला दूत करून तुझ्या शोधार्थ पाठविला; त्याच्या दृष्टीस तूं प्रथम पडलास, आणि त्याणें तुला पृथ्वीवर आणिलें. त्यानंतर तुला मनुष्यांनीं होता नेमिला, तेव्हां आकाश आणि पृथ्वी हीं थरथरां कांपूं लागलीं (कां?); तथापि तूं त्यांस पडूं दिलें नाहींस, त्यांचा भार सहन करून त्यांस आपआपल्या स्थळीं राखिलेंस, आणि हे गुणवान् अग्नी, मग तूं होत्याचें काम चालवून महान् जे देव त्यांस पोंहचावा म्हणून यज्ञ करिता झालास.'

वेदांत मातरिश्वा, विवस्वान् आणि अग्नि यांविषयीं जें सांगितलें आहे त्यावरून असें दिसून येतें कीं, अग्नि पूर्वीं पृथ्वीवर नव्हता, अथवा नाहींसा झाला होता. तेव्हां विवस्वताचा जो दूत मातरिश्वा त्याणें अग्नीला आकाशांतून शोधून काढिला आणि पृथ्वीवर आणून भृगु म्हणून जे ऋषि होते त्यांच्या स्वाधीन केला. "आ दूतो अग्निम् अभरद् विवस्वतो वैश्वानरं मातरिश्वा परावतः." 'विवस्वताचा दूत मातरिश्वा याणें वैश्वानर जो अग्नि त्यास दूरून आणिलें' ऋ. ६. ८. ४. आणि ऋ. १.६०.१ यांत वहि..."भरद् भृगवे मातरिश्वा,"= 'मातरिश्व्यानें भृगूसाठीं अग्नि आणिला.' ऋ.१. ९३. ६ यांतहि असेंच आहे, "आ अन्यं दिवो मातरिश्वा जभार"= 'एका अग्नीस (म्हणजे पृथ्वीवर आहे त्यास) मातरिश्व्यानें द्युलोकाहून आणिलें.' "आ यं दधे मातरिश्वा दिवि क्षयम्" (ऋ. ३.२.१३)='स्वर्गामध्यें राहणाऱ्या ज्या अग्नीस मातरिश्व्यानें धरिलें.' तसेंच ऋ. ३. ५.१०. यांत, "यदी भृगुभ्यः परि मातरिश्वा गुहा सन्तं हव्यवाहं समीधे,"='जेव्हां गुहेमध्यें लपून राहिलेल्या अग्नीस मातरिश्व्यानें आणून भृगूंसाठीं पेटविलें', असें आहे.

आतां मातरिश्वा हा कोण? आणि विवस्वत् कोण? यास्क आणि सायणाचार्य मातरिश्वा म्हणजे वायु असें म्हण-

त्वम॑ग्ने मन॑वे द्याम॑वाशयः पुरू॒रव॑से सु॒कृते॑ सु॒कृत्त॑रः ।
श्वा॒त्रेण॒ यत्पि॒त्रोर्मुच्य॑से पर्या त्वा॒ पूर्व॑मनय॒न्नाप॑रं॒ पुनः॑ ॥ ४ ॥

त्वम् । अ॒ग्ने॒ । मन॑वे । द्याम् । अ॒वा॒श॒यः॒ । पु॒रू॒रव॑से । सु॒ऽकृते॑ । सु॒कृत्ऽत॑रः ।
श्वा॒त्रेण॑ । यत् । पि॒त्रोः । मुच्य॑से । परि॑ । आ । त्वा॒ । पूर्व॑म् । अ॒न॒य॒न् । आ । अप॑रम् । पु॒नरिति॑ ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. हे अग्ने, त्वं मनवे (=मनोः मनुष्यजातेरादिपुरुषस्य अनुग्रहार्थं ) द्याम् अवाशयः (=अगर्जयः ) । [ त्वं ] सुकृते (=सुकर्म कुर्वते ) पुरूरवसे (=एतन्नामकाय राज्ञे) सुकृत्तरः [ अभवः ] । यत् (=यदा ) [ त्वं ] [ तव ] पित्रोः (=द्यावापृथिव्योः अरण्योर्वा ) श्वात्रेण (=क्षिप्रमथनेन=संघर्षणेन ) परिमुच्यसे (=निर्गतवानासि ) [ तदा ] [ ऋत्विगादयः ] त्वां पूर्वं (=वेदेः पूर्वदेशम् ) आनयन् (=आहवनीयत्वेन स्थापितवन्तः ) । पुनः (=पश्चाद् ) अपरं (=पश्चिमदेशम् ) आ-[ नयन् ] (=गार्हपत्यरूपेण स्थापितवन्तः ) ॥

तात, आणि विवस्वत् म्हणजे सूर्य. परंतु मातरिश्वा म्हणजे वायु असा अर्थ अर्वाचीन संस्कृतांत होतो, तरी वेदांत त्याचा अर्थ तसा होत नसेल असें वर उतरून घेतलेल्या वाक्यांवरून दिसून येतें, व मातरिश्वा हा कोणी दैविक पुरुष असावा असें दिसतें. आणि विवस्वान् हाहि कोणी तसाच असावा. कदाचित् सूर्य असेल.

पृथ्वी आणि आकाश कांपूं लागलीं म्हणून सांगितलें, हा कंप अग्नि आकाशामध्यें प्रगट झाला (म्हणजे विद्युद्रूपानें दृष्टीस पडला) तेव्हांचा आहे असें चांगलें जुळतें.

४. हे अग्नी, तूं मनूसाठीं आकाशाकडून गर्जना करविता झालास, तूं सुकृत्यकारी पुरूरव्यासाठीं विशेष सुकृत्यकारी [झालास]. तूं [आपल्या] आईबापांच्या घर्षणापासून जेव्हां बाहेर पडलास [तेव्हां] [उपासक] तुला प्रथम पूर्वेकडेस आणिते झाले [आणि] पुनः पश्चिमेकडेस आणिते झाले.

4. Thou, Agni, didst cause the heaven to thunder for Manu, [thou becamest] more beneficent to the beneficent Purûravas. When thou wast emitted by the friction of [thy] parents, they brought thee to the east [and then] brought thee again to the west.

---

४. या मंत्राचा भावार्थ असा दिसतो कीं, 'वीज पडण्याच्या वेळीं जी आकाशांत गर्जना होते ती प्रथम मनुष्यांचा आदिपुरूष जो मनु या नांवाचा पुरूष त्याच्या हितासाठीं अग्नीनें करविली. पुरूरवा या नांवाच्या पुण्यकृत्य करणाऱ्या राजासाठीं अग्नीनें प्रसन्न होऊन त्याला लाभ होई असें करविलें. आणि आकाश आणि पृथ्वी ह्यांच्या संघर्षणानें जेव्हां प्रथम अग्नीची उत्पत्ति झाली तेव्हां मनुष्यांनीं तो घेतला आणि प्रथम त्यास यज्ञशाळेंत पूर्वेकडे स्थापन करून मग पश्चिमेकडे स्थापिला.'

जसा मुसलमान आणि ख्रिस्ती व यहुदी लोक सर्व मनुष्यजातीचा आदिपुरूष 'आदम' या नांवाचा पुरूष होता असें मानितात, तसा मनुष्यजातीचा आदिपुरूष 'मनु' (अथवा 'मनुस्') म्हणून आपले प्राचीन आर्य पूर्वज मानीत असल्याचे उल्लेख वेदांत वारंवार येतात. त्यांपासून 'मानव' आणि 'मनुष्य' (=मनूच्या वंशांत झालेला) हे आपले दोन्ही शब्द उत्पन्न झाले आहेत. (याच सूक्ताचा १७ वा मंत्र पाहा).

आतां 'पुरूरवा' हा या ठिकाणीं कोण? उर्वशीचा नवरा जो राजा मागाहून पुराणादिकांत व नाटकांत प्रसिद्ध आहे आणि ज्याविषयीं वेदांतहि कथा सांगितली आहे तोच, किंवा दुसरा कोण समजला पाहिजे? कितीएक विद्वान् 'मनु' म्हणजे 'मनुष्य' आणि 'पुरूरवस्' म्हणजे 'विशेष घोष करणारा' असा अर्थ करितात. तसा घेतला तर पहिल्या अर्थाचें भाषांतर, 'हे अग्नी, स्तुतींचा वगैरे फार घोष करणारे आणि चांगलीं कृत्यें करणारे जे कोणीहि मनुष्य असतील, त्याला फार चांगले प्रसाद देणारा जो तूं तो आकाशास गर्जविता झालास' असें करतां येईल. परंतु 'विशेष घोष करणारा' अशा अर्थी 'पुरूरवस्' शब्दाचा प्रयोग केलेलीं दुसरीं वाक्यें जोंपर्यंत सांपडत नाहींत तोंपर्यंत 'पुरूरवस्' हें प्रसिद्ध राजाचें विशेषनाम समजणें आणि सायणास अनुसरणें हेंच चांगलें

या मंत्रांतील 'श्वात्र' शब्द कठिण आहे. याची व्युत्पत्ति सायणाचार्यांनीं सांगितलेली नाहीं तथापि त्यांनीं सांगितलेलाच अर्थ आम्हीं घेतला आहे.

**त्वम॑ग्ने वृ॒ष॒भः पु॑ष्टि॒वर्ध॑न॒ उद्य॑तस्रुचे भवसि श्र॒वाय्यः॑ ।**
**य आहु॑तिं॒ परि॒ वेदा॒ वष॑ट्कृति॒मेका॑यु॒रग्रे॒ विश॑**
**आ॒वि॒वास॑ति ॥५॥३२॥**

त्वम् । अ॒ग्ने॒ । वृ॒ष॒भः । पु॒ष्टि॒ऽवर्ध॑नः । उद्य॑तऽस्रुचे । भ॒व॒सि॒ । श्र॒वाय्यः॑ ।
यः । आ॒ऽहु॑तिम् । परि॑ । वेद॑ । वष॑ट्ऽकृतिम् । एक॑ऽआयुः । अग्रे॑ ।
विशः॑ । आ॒ऽवि॒वास॑ति ॥ ५ ॥ ३२ ॥

## भाषायाम्.

५. हे अग्ने, वृषभो (=बली) त्वम् उद्यतस्रुचे (=हविर्दानाय प्रभृतस्रुचे=प्रसृतस्रुचे=पुरःसृतस्रुचे) [ उपासकाय ] श्रवाय्यः (=कीर्तनीयः) पुष्टिवर्धनः (=संपद्वर्धको) भवसि । यः [ उपासकः ] आहुतिम् (=आह्वनं) वषट्कृतिं (=वषटशब्दस्य उच्चारणं) [ च ] परिवेद (=सम्यक् जानाति) [ सः ] एकायुः (=एकोपि मनुष्यः सन्) अग्रे (=सर्वेषामप्यग्रे=सर्वेभ्योपि प्रथमं) विशः (=अनेकजनान्) आविवासति (=प्रीणयित्वा स्वायत्तान् करोति) ॥

प्रयोगांतरास अनुलक्षून कितीएक जण येथें 'शक्तीनें' असा अर्थ समजतात.

'आईबापांच्या.' अग्नि हा द्यावापृथ्वींचा मुलगा होय असें वेदांत सांगितलें आहे. (ऋ. ३. २. २; ३. २५. १ इ० पाहा). विजेच्या महाभयंकर रूपानें जो अग्नि उत्पन्न होतो तो द्यावापृथ्वींच्या संघर्षणानें होतो म्हणणें हें साहजिक आहे.

अग्नीला पृथ्वीवर आणिल्या नंतर पूर्वेकडे आणि पश्चिमेकडे उपासक आणिते झाले याचा अर्थ सायणाचार्य वेदीच्या पूर्वभागीं आहवनीयरूपानें आणि पश्चिमभागीं गार्हपत्यरूपानें स्थापिते झाले असा सांगतात. तसाच दिसतो यांत संशय नाहीं. आहवनीय आणि गार्हपत्य असे दोन प्रकारचे अग्नि यज्ञाला लागत असतात.

५. हे अग्नी, शक्तिमान् [असा जो] तूं [तो] पळी-पुढें-करणाऱ्या [उपासका]चा प्रख्यात हितकर्ता होतोस. [आणि] जो [उपासक] आहुती देणें [आणि] वषट्कार करणें [हें] उत्तम रीतीनें जाणतो [तो] [स्वतः] एकटा मनुष्य [असला तरी] [अनेक] लोकांस सर्वांअगोदर आपलेसे करून घेतो.

5. Thou, Agni, [who art] mighty becomest the renowned giver of prosperity to him who stretches forth the [sacrificial] ladle [to thee]. [He] who fully knows [how] to sacrifice [and] to say *vashat*, best [of all] gains [to himself] [though a] single man [the good wishes of] [many] men.

५. ह्या मंत्राचें पूर्वार्ध उघड आहे, आणि त्याचें तात्पर्य 'तुला जो हवि अर्पण करतो त्या उपासकाचा तूं लाभ करून देतोस अशी तुझी प्रख्याति आहे,' असें आहे. तृतीय चरणहि उघडच दिसतो, परंतु चवथ्या चरणाविषयीं अडचण आहे. त्याचा यथाशक्ति आम्हीं अर्थ केला आहे. मुख्य अडचण ही कीं, 'आपलेसे करून घेतो' ह्याजबद्दल 'आविवांसति' असा पाठ आहे. सायणाचार्य आपल्या भाष्यांत 'आविवाससि' असा पाठ समजून अर्थ करितात आणि तें क्रियापद अग्नीकडे लावितात. तर 'आविवाससि' असा पाठ कीं, 'आविवासति' असा खरा ही एक अडचण; आणि कोणताहि पाठ घेतला तरी हें क्रियापद सर्वानुदात्त का नाहीं? ही अडचण दुसरी मोठी आहे. 'यः' हें अग्नीचें संबंधी आहे असें समजून त्याचा संबंध 'आविवासति' (आविवाससि?) या क्रियापदाकडे घेतला तर अडचण कदाचित् दूर होईल. पण मग 'परिवेद' हेंहि क्रियापद 'यः' शब्दाशीं घ्यावें लागेल, आणि तें तर द्वितीयपुरुषीं नाहीं. तेव्हां तसेंहि करितां येत नाहीं. तर अध्ययनादृष्टफलासाठीं संप्रदायाच्या संबंधानें कोणताहि पाठ इष्ट असला तरी अर्थलाभासाठीं 'आविवासति' हाच पाठ मानून 'आविवांसति' असें न वाचतां 'आविवासति' असें सर्वानुदात्त वाचावें आणि 'यः' म्हणजे 'य उपासकः' असें समजून आम्हीं केल्याप्रमाणें निर्वाह करावा असें आम्हांस वाटतें.

'आविवासति'चा जो आपलेसे करून घेतो म्हणजे प्रसन्न करून घेतो असा आम्हीं अर्थ केला आहे त्याला प्रमाण ऋ. १. ८४. ९. हा मंत्र (आणि कदाचित् त्यावरील सायणाचार्यांचें भाष्यहि) पाहा. शिवाय ऋ. ६. ६०. ११; ७. २०. ६; २. ११. १६; २. ३३. ६. इत्यादि स्थळें पाहा.

'जो....वषट्कार करणें हे उत्तम रीतीनें जाणतो.' वषट् हा एक उद्गार आहे. त्याचा उच्चार होत्यानें करावयाचा आणि तो केल्याबरोबर अध्वर्यूनें होमांत हवि टाकावे असें आहे. तर 'वषट्' असें मोठ्यानें म्हणणें यांत काय विशेष कुशलता आहे, कीं जेणे-

त्वमग्ने वृजिनवर्तनिं नरं सक्मन् पिपर्षि विदथे विचर्षणे ।
यः शूरसाता परितक्म्ये धने दभ्रेभिश्चित्समृता हंसि भूयसः ॥ ६ ॥

त्वम् । अग्ने । वृजिनऽवर्तनिम् । नरम् । सक्मन् । पिपर्षि । विदथे । विऽचर्षणे ।
यः । शूरऽसाता । परिऽतक्म्ये । धने । दभ्रेभिः । चित् । समऽऋता । हंसि । भूयसः ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. हे विचर्षणे (=विशिष्टज्ञानयुक्त) अग्ने, त्वं वृजिनवर्तनिम् (=अऋजुमार्गं=ज्ञानरहितं) नरं (=वीरं) सक्मनि (=संकीर्णे स्थले) विदथे (=युद्धे) [च] पिपर्षि (=रक्षसि)। यस् [त्वं] शूरसातौ (=संग्रामे), परितक्म्ये धने (=संकटे समराङ्गणे), समृतौ (=समरे) [च] दभ्रेश्चित् (=अल्पैरपि) भूयसः (=प्रभूतान्) हंसि (=मारयसि) ॥

करून अग्नि फार प्रसन्न होतो? परंतु 'जो आहुती देणें हें उत्तम रीतीनें जाणतो' ('य आहुतिं परिवेद') म्हणजे 'जो अध्वर्यूचें काम चांगलें जाणतो'; आणि 'जो वषट्कार करणें हें उत्तम रीतीनें जाणतो' ('यः परिवेद वषट्कृतिं') म्हणजे 'जो होत्याचें काम चांगलें जाणतो' असा भावार्थ असेल.

उत्तरार्धाचें तात्पर्य असें दिसतें कीं, 'जो यजमान वषट्कार म्हणून, आहुती देऊन, अग्नीस तृप्त कसें करावें हें जाणतो, तो स्वतः एकटा असला तरी अनेक मनुष्यांचा नायक होतो.'

परंतु खरा पाठ 'आविवासति' आहे किंवा 'आविवासाति' आहे, आणि 'आविवासति' असाच असेल तर 'आविवासति' असा आहे किंवा 'आविवासति' असा सर्वानुदात्त आहे या दोनींहि अडचणी निवारण्याचा एकच कांहींसा सोपा मार्ग आम्हास शक्य दिसतो. तो हा. 'यः आहुतिं परि वेद वषट्कृतिम् एकायुः अग्रे विशः आ विवासाति' अशीं पदें वाचून 'यो [यजमानः] आहुतिं वषट्कृतिं [च] परिवेद (=पूर्णत्वेन जानाति) [यश्च] एकायुः (=एकः आयुर्यस्य सः=एकम् अग्निमेव पूजयन्) अग्रे विशः (=स्वगृहस्य पुरोभागे) आविवासति (=अग्निं परिचरति) [तस्मै] उग्रतसुचे त्वं पुष्टिवर्धनो भवसि' असा अन्वय करून, 'ज्याला आहुती देण्याचें

६. हे सर्वदर्शी अग्नी, तूं अजाणत्या वीरास गर्दीत [आणि] युद्धांत रक्षितोस; आणि तूं समरांगणांत, आणीबाणीच्या संग्रामात [आणि] युद्धांत लहानसान [मनुष्यां]च्याहि हातून मोठ्या [शत्रू]स मारितोस.

6. Thou, all-seeing Agni, protectest the ignorant soldier in the throng [and] in the fight; and in a battle, in a decisive action, [and] in an encounter thou killest the many even by [means of] the few.

आणि वषट् असें म्हणण्याचें ज्ञान असतें असा जो उपासक तुला हवि देण्यासाठीं पळी पुढें करतो, त्याचा हे अग्नी, तं हितकर्ता होतोस' अशा अर्थानें भाषांतर करावें. परंतु 'आविवाससि' असाच पाठ असल्याविषयीं या प्रांतांतील वैदिकांचा संप्रदाय आहे; आणि 'एकायुः' याचा जो 'एकट्या अग्नीस भजणारा' असा अर्थ करणें त्याविषयीं (ऋ. १. ९६. २ आणि १. १४७.

१. यांत 'आयु' शब्दाचा अर्थ अग्नि असा होतो असें दिसतें तरी) आम्हास संशय आहे. 'आविवासति' अथवा 'आविवाससि' याच्या पाठनिश्चयाविषयीं अथवा स्वरनिश्चयाविषयीं सायणाचार्य कांहींच (छापलेल्या पुस्तकांत तर) लिहीत नाहींत. ते "एकायुर्मुख्यान्नस्त्वमग्ने(ग्ने?) प्रथमं तं यजमानं विशस्तदनुकूलाः प्रजा आविवासति। सर्वत्र प्रकाशयसि" इतकेंच लिहितात.

६. या मंत्रांत म्हणण्यासारिखें कठिण कांहीं नाहीं. पूर्वार्धांत जो 'विदथे' शब्द आहे त्याचा आम्हीं 'युद्धांत' असा अर्थ केला आहे, आणि तो या स्थलीं उचित आहे, असें इतर शब्दांच्या साहचर्यसंबंधानें सहज दिसून येईल. सायणाचार्य येथें 'विदथे' म्हणजे 'यज्ञांत' असें भाष्य करितात; परंतु आम्हीं केलेल्या अर्थाला प्रमाण ऋ. ७. १८. १३ याजवरील सायणाचें भाष्य हेंच होय. शिवाय ७. ९३.५ हा मंत्र पाहा.

या मंत्रावरून आमचे पूर्वज आर्यजन लढण्याविषयीं आणि लढाईंत इष्टदेवतांचा धांवा करण्याविषयीं कसे आतुर असत हें दिसून येतें. अर्वाचीन ब्राह्मणांसारिखे आपण स्वस्थ बसणें हा आपला धर्म, युद्ध करणें हा क्षत्रियाचा धर्म, आणि भिक्षा मागणें हा विद्वान् ब्राह्मणाचा धर्म असें समजत नसत.

देवाचें साहाय्य मिळेल तर यः श्चित् लहानसान मनुष्य मोठ्याहि शत्रूंस मारून टाकील हा आमच्या प्राचीन पूर्वजांचा जो पूर्ण भरंवसा या मंत्राच्या उत्तरार्धांत दिसून येतो, तो सांप्रतकाळीं आमच्या आंगीं आहे काय?

त्वं तम॑ग्ने अमृत॒त्व उ॑त्त॒मे मर्तं॑ दधासि॒ श्रव॑से दि॒वेदि॑वे ।
यस्ता॑तृषा॒ण उ॒भया॑य॒ जन्म॑ने॒ मयः॑ कृ॒णोषि॒ प्रय॒ आ च॑ सू॒रये॑ ॥ ७ ॥

त्वम् । तम् । अ॒ग्ने॒ । अ॒मृ॒त॒ऽत्वे । उ॒त्ऽत॒मे । मर्त॑म् । द॒धा॒सि॒ । श्रव॑से । दि॒वेऽदि॑वे ।

यः । त॒तृ॒षा॒णः । उ॒भया॑य । जन्म॑ने । मयः॑ । कृ॒णोषि॑ । प्रयः॑ । आ । च॒ । सू॒रये॑ ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. हे अग्ने, यः [ सूरिर्मर्त्यः ] उभयाय जन्मने (=उभाभ्यां जन्मभ्यां=देवानां पितॄणां चेति जातिद्वयाय ) तातृषाणः (=अतिशयेन तृष्णायुक्तः=अतिशयेन परिचर्योत्सुकः ) [ अस्ति ], तं मर्त्य [ सूरिं ] त्वं श्रवसे (=कीर्तये, कीर्तिर्भूयादिति हेतोः ) दिवेदिवे (=दिनेदिने=नित्यम् ) उत्तमे अमृतत्वे (=उत्कृष्टे मरणरहिते पदे ) दधासि (=धारयसि ), [ तस्मै ] च [ मर्त्याय ] सूरये (=यजमानाय ) मयः (=आनन्दं ) प्रयः (=सुखं ) [ च ] आकरोषि (=करोषि, ददासि ) ॥

७. हे अग्नी, जो मर्त्य उभय जनां[ची सेवा करण्या]विषयीं आतुर [असतो] त्याला तूं नित्य उत्तम अमरत्वा[च्या स्थितीं]त ठेवितोस आणि त्याची कीर्ति करवितोस, आणि [त्या] भाविक [मर्त्या]ला तूं आनंद [ आणि ] सुख प्राप्त करून देतोस.

7. Thou, Agni, always keepest that mortal in the highest immortality so that he becomes renowned, who is highly thirsty to serve both the races [the Gods and the Manes.], and thou givest to that pious [mortal] joy [and] happiness.

---

७. या मंत्राचें तात्पर्य असें आहे कीं, 'हे अग्नी, जो मर्त्य यजमान देवाप्रीत्यर्थ आणि पितरांप्रीत्यर्थ हवि देण्याविषयीं परम उत्सुक असतो, म्हणजे मोठ्या उत्सुकतेनें त्याच्या साठीं हवि देतो, त्याला तूं उत्तम अमरत्व देऊन त्याची कीर्ति सर्वत्र पसरे असें करितोस, आणि त्याला आनंद आणि सुख होई असें करितोस.'

या मंत्राविषयीं इतकें सांगणें जरूर दिसतें कीं, प्राचीन काळीं अमरत्व कशास म्हणत आणि आम्हीं कशास अमरत्व म्हणतों त्यांत भेद दिसतो. कारण एक तर मंत्रवक्ता म्हणतो 'दररोज अमरत्वांत ठेवितोस.' यावरून 'दररोज' अमरत्वामध्यें न ठेवितां कोणाला तरी दुसऱ्या रीतीनें, म्हणजे अमुक एक (दोनशें तीनशें वर्षांच्या) मुदतीपर्यंत, अमर करितां येईल अशी कल्पना दिसते. त्यावरून आमचा जो अमरत्वाविषयीं 'कधींहि न मरणारा तो अमर' असा विचार आहे तो प्राचीन काळीं नव्हता असें दिसतें. दुसरी गोष्ट अशी कीं, 'उत्तम अमरत्वांत' ठेवितोस असेंहि आहे, त्यावरून अमरत्वाचे भिरनिराळे प्रकार मंत्रवक्त्याचे मनात असावे असें दिसतें; जसें कोणी दोनशें वर्षें अमर, कोणी तीनशें, कोणी पांचशें इ०. अथवा मरण्यापूर्वींच जी उत्तम आरोग्यस्थिति, तेंच उत्तम अमरत्व येथें मंत्रवक्त्याच्या मनांत विवक्षित असेल असें चांगलें संभवतें. कारण मग 'नित्य', 'दररोज' (='दिवे दिवे') हें पद चांगलें बसतें.

'उभय जनां[ची सेवा करण्या]विषयीं'='उभयाय जन्मने'. सायणाचार्य येथें 'उभय जन' म्हणजे 'द्विपद आणि चतुष्पद' असें भाष्य करून 'द्विपद आणि चतुष्पद पशूंचा लाभ व्हावा अशी ज्यास मोठी उत्सुकता असते' असा अर्थ करितात. पण येथें तो अर्थ इष्ट नाहीं. आम्हीं केलेल्या अर्थास प्रमाण आहे याविषयीं ऋ. ७. ९. १, ऋ. २. २४ १० आणि २. ६. ७ या मंत्रांवरील सायणाचार्यांचेंच भाष्य होय.

'आणि त्याची कीर्ति करवितोस'='श्रवसे.' या चतुर्थ्यन्त नामाचा हा अर्थ थोडासा विस्तरानें करावा लागला आहे. अक्षरशः अर्थ 'कीर्तीसाठीं' असा असून त्याचा संबंध 'ठेवितोस' या क्रियापदाशीं आहे.

त्वं नो अग्ने सनये धनानां यशसं कारुं कृणुहि स्तवानः ।
ऋध्याम कर्मापसा नवेन देवैर्द्यावापृथिवी प्रावतं नः
॥ ८ ॥

त्वम् । नः । अग्ने । सनये । धनानाम् । यशसम् । कारुम् । कृणुहि । स्तवानः ।
ऋध्याम । कर्म । अपसा । नवेन । देवैः । द्यावापृथिवी इति । प्र । अवतम् । नः ॥ ८ ॥

त्वं नो अग्ने पित्रोरुपस्थ आ देवो देवेष्वनवद्य जागृविः ।
तनूकृद्बोधि प्रमतिश्च कारवे त्वं कल्याण वसु विश्वमोपिषे
॥ ९ ॥

त्वम् । नः । अग्ने । पित्रोः । उपऽस्थे । आ । देवः । देवेषु । अनवद्य । जागृविः ।
तनूऽकृत् । बोधि । प्रऽमतिः । च । कारवे । त्वम् । कल्याण । वसु । विश्वम् । आ । ऊपिषे ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

८. हे अग्ने, स्तवानः (=स्तुतः सन्) त्वं नः (=अस्मभ्यं) धनानां सनये (=धनानां दानाय, इदमेव धनानां दानमिति कृत्वा) यशसं (=यशोयुक्तं) कारुं (=कविं, कविगुणयुक्तं पुत्रं) कुरु (=देहि), [येन] नवेन अपसा (=तेन कुशलेन पुत्रेण) [वयं] कर्म (=देवयजनादिकर्म) ऋध्याम (=वर्धयाम, निष्पादयाम)। [अपि च] हे द्यावापृथिव्यौ, [युवां] नः (=अस्मान्) देवैः (=अन्यैर्देवैः सह) प्रावतं (=रक्षतम्) ॥

९. हे अनवद्य (=दोषरहित) अग्ने, पित्रोः (=तव पित्रोर्द्यावापृथिव्योः) उपस्थे (=उदरे, द्यावापृथिव्योर्मध्यस्थाने) जागृविः (=जागरूकः=दीप्यमानेन विद्युतो रूपेण वर्तमानः सन्) देवेषु देवः (=देवाधिदेवः) त्वं नः (=अस्माकं) तनूकृत् (=शरीराणां रक्षिता) बोधि (=भव), [अस्माकं] कारवे (=कवये) च प्रमतिः (=अनुग्रहकर्ता) [बोधि]। हे कल्याण [अग्ने], त्वम् [एव] विश्वं वसु (=यत् किंचित्सद् वस्तु) ओपिषे (=आवपसि तवोपासकार्थं प्रसारयसि, ददासि) ॥

८. हे अग्नी, ही तुझी [आम्हीं] स्तुति केली आहे यास्तव तूं आम्हांस धनांच्या ऐवजीं कीर्तिमान् [असा] देवगुणगायक [पुत्र] दे म्हणजे [आम्ही] [तसल्या] नव्या कवीच्या योगानें [आमचें] [यज्ञ]कर्म सिद्धीस नेऊं. [आणि] हे द्यावापृथिवींनो, [तुम्ही] [इतर] देवांसह आम्हांस संभाळा.

8. Mayest thou, Agni, being glorified [by us], give us in place of a present of riches a renowned son that shall sing of the gods, so that we may perform [our] [holy] deeds through the new poet. And do ye, Heaven and Earth, protect us with the [other] gods.

९. हे पवित्र अग्नी, देवांमध्यें देव [आणि] [आपल्या] आईबापांच्या उदरांत जागृत राहणारा [जो] तूं [तो] आमच्या जीवांचें रक्षणकर्ता हो, आणि [आमच्या] कवीचें कल्याण करणारा [हो]. हे कल्याणदायक अग्नी, सर्व [कांहीं जें] बरें [म्हणून आहे तें] तूं देत असतोस.

9. Mayest thou, stainless Agni, who art the god among the gods [and] watchful in the [united] womb of [thy] parents (the heaven and the earth), be a protector to ourselves and a patron to [our] poet. Thou [it is that] givest all that is good.

---

८. या मंत्राचा भावार्थ उघडच आहे. तो हा कीं, 'अग्नीची स्तुती मंत्रवक्त्यानें केली आहे त्यापेक्षां त्यानें प्रसन्न व्हावें, परंतु मंत्रवक्त्यास धनें न देतां त्या ऐवजीं कवि असा पुत्र द्यावा, आणि मग तो अग्नीचे गुण गाऊन आपल्या बापाचें यज्ञकर्म संपादील.' यावरून दिसून येईल कीं, प्राचीनकाळीं यज्ञ करीत तेव्हां जुनेच मंत्र म्हणून करीत असें नाहीं, नवे मंत्र म्हणून आणि नवे रचून ते म्हणून करीत असत.

'देवगुणगायक [पुत्र]'='कारुम्'. 'कारु' शब्दाचा अक्षरशः अर्थ 'कवि' असा आहे. वाक्यांतील अर्थसंदर्भावरून जो अर्थ दिसला आणि जो सायणाचार्यांनीं केला तोच आम्हीं येथें केला आहे. परंतु 'कारु' म्हणजे 'कवि' इतकाच नुसता अर्थ केला तरी चालेल, आणि मग 'कीर्तिमान् कवि धनाच्या दानाऐवजीं दे' असा अर्थ केल्यास विशेष अडचण दिसत नाहीं.

९. भावार्थः—'हे अग्नी, सकल देवांमध्यें देव म्हणजे सर्व देवांपेक्षां देदीप्यमान आणि आपल्या आईबापांच्या उदरांत जागृत राहणारा म्हणजे विजेच्या रूपानें आकाशांत प्रकाशणारा असा जो

**त्वम॑ग्ने प्रम॑तिस्त्वं पि॒तासि॑ न॒स्त्वं व॑य॒स्कृत्तव॑ जा॒मयो॑ व॒यम् ।**
**सं त्वा॒ राय॑: श॒तिन॒: सं स॑ह॒स्रिण॑: सु॒वीरं॑ यन्ति व्रत॒पाम॑दाभ्य**
**॥ १० ॥ ३३ ॥**

त्वम् । अ॒ग्ने । प्रऽम॑तिः । त्वम् । पि॒ता । अ॒सि । नः॒ । त्वम् । व॒यः॒ऽकृत् ।
तव॑ । जा॒मय॑: । व॒यम् ।
सम् । त्वा॒ । राय॑: । श॒तिन॑: । सम् । स॒ह॒स्रिण॑: । सु॒ऽवीर॑म् । य॒न्ति ।
व्र॒त॒ऽपाम् । अ॒दा॒भ्य॒ ॥ १० ॥ ३३ ॥

## भाषायाम्.

१०. हे अग्ने, त्वम् [ अस्माकं ] प्रमतिः (=अनुग्रहकर्ता ), त्वं नः (=अस्माकं ) पिता असि । त्वम् [ अस्माकं ] वयस्कृत् (=पोषणादिना आयुर्वर्धयिता ) [ असि ] । वयं तव जामयः (=संबन्धिनः ) [ स्मः ] । हे अदाभ्य (=अहिंसनीय, अप्रतारणीय ) [ अग्ने ], त्वां [ प्रति ] शतिनो रायः (=शतसंख्याकाः संपदः ) सं[यन्ति ], [ त्वां ] सुवीरं व्रतपाम् (=अतिशयेन शूरं यज्ञादिकर्मणा रक्षकं प्रति ) सहस्रिणो [ रायः ] (=सहस्रसंख्याकाः संपदः ) संयन्ति (=संगच्छन्ते ) ॥

तूं, तो आम्हां स्वताहाचें संरक्षण करणारा हो, आणि आमचा जो हा कवि आमच्याकरितां स्तोत्रें रचून आम्हांस देत आहे अथवा आमच्याकरितां स्तोत्रें म्हणत आहे, त्याच्यावर तूं प्रसन्न हो. कारण सर्व कांहीं या जगांत चांगलें म्हणून जें आहे तें तूंच देत असतोस, दुसरा कोणी देत नाहीं.'

'आईबापांच्या उदरांत जागृत राहणारा'='पित्रोरुपस्थे जागृविः'. वर 'द्यु' म्हणजे आकाश तो बाप, आणि खालीं 'पृथ्वी' ती माता; यांचा जो मध्यभाग तें अग्नीच्या आईबापांचें उदर (गर्भाशय ) असें म्हणणें या अलंकारांत मोठें सौंदर्य आहे यांत संशय नाहीं. द्यावापृथ्वींस अग्नीचीं आईबापें या ठिकाणीं म्हटलीं आहेत यांविषयीं वर चवथा मंत्र व त्यावरची टीप पाहा.

या मंत्रावरून असें समजावयाचें कीं, अग्नीचें ( अथवा दुसऱ्या कोणत्याहि देवाचें ) भजन ( म्हणजे यज्ञ ) करून सेवा करणारे जे असत त्या सर्वांस स्वताहा कविता करतां येत नसे, म्हणून ते पूर्वी तिसऱ्या कोणी तरी रचिलेली कविता म्हणजे मंत्र म्हणण्यासाठीं अथवा नवीन रचून प्रसंगाच्या वेळीं म्हणण्यासाठीं एकाद्या कवीची योजना करीत. त्याला 'कारु', 'विप्र', 'ब्राह्मण', 'ऋषि', 'कवि,' 'होता', 'स्तोता' अशी संज्ञा असे. आणि जे यज्ञ अथवा उपासना करीत त्यास 'यजमान', सुतवान्', 'दाश्वान्', 'सुन्वन्', 'सूरि' इत्यादि संज्ञा असत. म्हणूनच या मंत्रांत 'आम्हांस म्हणजे उपासकांस आणि आमच्या कवीस म्हणजे स्तोत्रें रचणारास अशा उभयतांसहि प्रसन्न हो' अशा अर्थाची प्रार्थना आहे.

१०. हे अग्नी, तूं [आमची] काळजी घेणारा, तूं आमचा पिता होस, तूं [आमचा] वाढविणारा [आहेस], आम्ही तुझे सगे [आहों]. हे अप्रतिहत [अग्नी], शुभकर्मांचा भंग न होऊं देणारा [जो] महाशूर तूं [त्या तुज]जवळ शतशः संपत्ती वाहत येतात, [त्या तुजजवळ] सहस्रशः संपत्ती वाहत येतात.

10. Thou, Agni, [art] [our] patron, thou art our father, thou [our] nourisher; we [are] thy kinsmen. To thee, uninjurable [Agni], riches flow by hundreds, to [thee] who art most valorous and the supporter of [the] ordinances, [riches] flow by thousands.

१०. या मंत्रांत कांहीं कठिण नाहीं. अग्नीवर उपासकांची भक्ति कशी आहे आणि त्याजवर ते किती भरंवसा राखीत तें मंत्र ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.

'आपली आज्ञा सर्वत्र चालविणारा'='व्रतपाम्.' म्हणजे यज्ञादिकांनीं देवांचें यजनपूजन लोकांकडून करविणारा, लोक तीं न सोडीत असें करणारा, मनुष्यें आपापलीं कर्तव्यकर्में करीत असें करणारा, सत्कर्मांचा नाश न होऊं देणारा. 'व्रतपा' हें विशेषण अग्नीस बरेच स्थळीं ऋग्वेदांत लाविलेलें आढळतें. उदाहरणार्थ, "स जायमानः परमे व्योमनि व्रतान्यग्निर्व्रतपा अरक्षत" (ऋ. ६. ८. २) ='तो कर्मांचा रक्षक अग्नि उंच आकाशांत उपजतांच कर्मांचें रक्षण करिता झाला;' "त्वमग्ने व्रतपा असि देव आ मर्त्येष्वा"='हे अग्नी, तूं देवांमध्यें आणि मनुष्यांमध्यें कर्मसंरक्षक आहेस'. (ऋ. ८. ११. १), म्हणजे कोणी मनुष्य आपआपलें कर्तव्यकर्म न सोडी असें करणारा. परंतु 'व्रतपा' म्हणजे 'आपलें शासन अथवा हुकूम लोकांकडून मानविणारा अथवा चालविणारा' असाहि अर्थ प्रस्तुत मंत्रांत आणि उतरून घेतलेल्या मंत्रांत चांगला संभवतो.

'अप्रतिहत [अग्नी]'='अदाभ्य.' म्हणजे ज्याचें वाईट करण्याविषयीं, ज्याला ठकविण्याविषयीं अथवा ज्याला उपद्रव करण्याविषयीं कोणी शक्तिमान् नाहीं असा.

त्वामग्ने प्रथममायुमायवे देवा अकृण्वन्नहुषस्य विश्पतिम् ।
इळामकृण्वन्मनुषस्य शासनीं पितुर्यत्पुत्रो ममकस्य जायते
॥ ११ ॥

त्वाम् । अग्ने । प्रथमम् । आयुम् । आयवे । देवाः । अकृण्वन् । नहुषस्य ।
विश्पतिम् ।
इळाम् । अकृण्वन् । मनुषस्य । शासनीम् । पितुः । यत् । पुत्रः ।
ममकस्य । जायते ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

११. हे अग्ने, यद् (=यदा) ममकस्य (=मदीयस्य) पितुः (=अङ्गिरसः) पुत्रो जायते [स्म] (=त्वं पुत्रः अजायथाः), [तदा] देवाः त्वाम् आयवे (=मनुष्याय, मनुष्येभ्यः, मनुष्यार्थम्) आयुं (=मनुष्यरूपिणं) नहुषस्य (=मनुष्यस्य, मनुष्याणां) प्रथमं विश्पतिं (=राजानम्) अकुर्वन्, इळाम् (=एतन्नामकां देवीं [च] मनुषस्य (=मनुष्यस्य=मनुष्याणां) शासनीं (=धर्मोपदेशकर्त्रीम्) अकुर्वन् ॥

११. हे अग्नी, जेव्हां माझ्या बापाला [तूं] पुत्र झाला[स] तेव्हां तुला देवांनीं माणसांसाठीं माणसांचा मनुष्यरूपी पहिला राजा केला, [आणि] इळेला माणसांची धर्मोपदेशकर्त्री केली.

11. Thee, Agni, the gods made the first human king of men for human beings, [and] they made Ilâ teacher of men, when [thou] was[t] born a son to my father.

११. या मंत्राचा भावार्थ असा दिसतो कीं, 'हे अग्नी, तूं माझ्या बापास (म्हणजे अंगिरा या नांवाच्या ऋषीस) पुत्र जन्मलास; तेव्हां तुला देवांनीं मनुष्यांचा राजा केला. आणि तूं जो राजा झालास तोच या पृथ्वीवर मनुष्यांचा पहिला राजा होय. आणि तूं मनुष्यरूपी राजा झालास, तुझ्या साधारण नेहमीच्या रूपानें झाला नाहींस, आणि तुला जेव्हां तुझ्या जन्मकाळीं मनुष्यांचा राजा केला, तेव्हां इळादेवीस मनुष्यांची धर्मोपदेशकर्त्री केली.'

तथापि हा मंत्र कठिण आहे असें म्हणणें भाग आहे. यांत 'नहुषस्य' हें पद आणि 'पितुर्यत् पुत्रो ममकस्य जायते' हा चवथा चरण हे कठिण आहेत. यांपैकीं 'नहुषस्य' याचा अर्थ प्रयोगान्तरास अनुसरून आणि सदरहू चवथ्या पादाचा सायणाचार्यांस अनुसरून आम्हीं केला आहे. 'इळा देवी' म्हणजे यज्ञांत जें हवि अर्पण करावयाचें तद्रूपी देवता. अथवा हवीच्या बरोबर स्तुति होत असते त्या 'स्तुतीची' देवता. इळादेवी ही अग्नीची माता होय असें कोठकोठें सांगितलें आहे, आणि तो संबंध प्रस्तुत मंत्रांतहि विवक्षित दिसतो. ऋ. ३. २९. ३. यांत 'इळायास्पुत्रो वयुनेऽजनिष्ट' असें अग्नीविषयीं लिहिलें आहे.

परंतु 'माझ्या बापाला पुत्र झाला' याचा अर्थ माझ्या बापाला म्हणजे मी, जो कवि हिरण्यस्तूप त्याचा बाप म्हणजे अंगिरा त्याचा पुत्र अग्नि झाला, असा अर्थ करावा लागतो. वास्तव हिरण्यस्तूपाच्या बापाला अग्नि हा पुत्र झाला असें इतर ठिकाणीं कोठें जोंपर्यंत आढळत नाहीं, तोंपर्यंत आम्हीं (सायणाचार्यांस अनुसरूनच) केलेला अर्थ केवळ निरुपायासाठीं ग्रहण करावयाचा आहे.

एकंदरींत हा मंत्र कठिण आहे असें म्हटलें पाहिजे.

त्वं नो अग्ने तव देव पायुभिर्मघोनो रक्ष तन्वश्च वन्द्य ।
त्राता तोकस्य तनये गवामस्यनिमेषं रक्षमाणस्तव व्रते
॥ १२ ॥

त्वम् । नः । अग्ने । तव । देव । पायुऽभिः । मघोनः । रक्ष । तन्वः । च । वन्द्य ।
त्राता । तोकस्य । तनये । गवाम् । असि । अनिऽमेषम् । रक्षमाणः । तव । व्रते ॥ १२ ॥

त्वमग्ने यज्यवे पायुरन्तरोऽनिषङ्गाय चतुरक्ष इध्यसे ।
यो रातहव्योऽवृकाय धायसे कीरेश्चिन्मन्त्रं मनसा वनोषि
तम् ॥ १३ ॥

त्वम् । अग्ने । यज्यवे । पायुः । अन्तरः । अनिषङ्गाय । चतुःऽअक्षः । इध्यसे ।
। रातऽहव्यः । अवृकाय । धायसे । कीरेः । चित् । मन्त्रम् । मनसा । वनोषि । तम् ॥ १३ ॥

---

## भाषायाम्.

१२. हे वन्द्य देव अग्ने, त्वं तव पायुभिः (=रक्षणैः) नः (=अस्माकं) मघोनः (=हविर्दत्तवतो यजमानान्) तन्वः (=तनूः=अस्मान्) च रक्ष । [त्वं हि] तोकस्य (=अपत्यानां), तनये (=तनयानाम्=अपत्यानां यानि अपत्यानि तेषां), गवां (=पशूनां) [च] अनिमिषं (=सदैव) त्राता असि तव व्रते (=कर्मणि=आज्ञानुष्ठाने) [तवोपासकान्] रक्षमाणः (=रक्षितासि) ॥

१३. हे अग्ने, त्वम् अनिषङ्गाय (=इषुधिहीनाय=रक्षणरहिताय) यज्यवे (=यजमानाय, यजमानं रक्षितुम्) अन्तरः (=प्रियः समीपतरो वा) चतुरक्षः (=चतुर्नेत्रः) पायुः (=रक्षकः) [इति कृत्वा] इध्यसे (=समिध्यसे=दीप्यसे) । यः [कीरिः=स्तोता] अवृकाय (=अनुपद्रवकारिणे=हितकारिणे) धायसे (=पोषकाय) [तुभ्यं] रातहव्यः (=हव्यं दत्तवान्) [भवति], तं कीरेश्चित् मन्त्रं (=तस्यैव कीरेः स्तोतुर्मन्त्रं स्तोत्रं) [त्वं] मनसा (=त्वदीयेन चित्तेन=प्रीत्या) वनोषि (=कामयसि) ॥

१२. हे वंद्य देवा अग्नी, तूं हवि देणाऱ्या आमच्या यजमानांस आणि स्वतः आम्हांस आपल्या रक्षणांनीं रक्ष. [का कीं] तूं आमच्या मुलांचा, नातवांचा, [आणि] गुरां[ढोरां]चा रक्षणकर्ता आहेस, आणि तूं [उपासकांस] त्वां घालून दिलेल्या मार्गांत सदैव ठेवीत असतोस.

12. Do thou, worshipful god Agni, protect our sacrificers and our own selves. [For] thou art the saviour of our children, grand-children and cattle, and ever keepest [thy worshippers] in thy ordinances.

१३. हे अग्नी, तूं रक्षणहीन उपासका[च्या हिता]साठीं प्रिय [आणि] च्यार डोळ्यांचा रक्षणकर्ता [म्हणून] पेटविला जातोस. तुला हितकारकाला [आणि] पोषणकर्त्याला जो स्तोता हवि अर्पण करितो त्याचेंच स्तोत्र तुला मनापासून आवडतें.

13. Thou, Agni, art kindled [as] a dear [and] four-eyed protector for the defenceless sacrificer. He who has given an oblation to [thee] the unharmful supporter—of that praiser only thou heartily lovest the prayer.

१२. या मंत्रांत मंत्रवक्त्याचा भावार्थ असा आहे कीं, 'हे अग्नी, हें स्तोत्र रचून म्हणणारे जे आम्हीं कवि (=म्हणजे जो मी कवि) त्याचे जे यजमान त्यांस तूं आपल्या रक्षण करण्याच्या अनेक प्रकारांनीं रक्ष, आणि आमचें स्वताहाचेंहि तसेंच रक्षण कर. आणि रक्षण करण्यास तुला कठिण नाहीं. कारण कीं, तूं मुलांबाळांचें नात्वापणत्वांचें आणि आमच्या गुरांढोरांचें रक्षण करून आम्हांस त्वां घालून दिलेल्या सन्मार्गीं नित्य रक्षण करीतच असतोस.'

या मंत्रांत 'तनये' हा शब्द जरा कठिण आहे. त्याचा अर्थ तर आम्हीं वर सायणास अनुसरून लिहिल्याप्रमाणेंच आहे. परंतु 'तनये' ही सप्तमी विभक्ती का असावी इतका प्रश्न आहे. आम्हांस वाटतें कीं 'तोकस्य' आणि 'गवाम्' या षष्ठी विभक्तींच्या मध्यें 'तनये' हें पद आहे आणि त्याचा संबंध 'त्राता' याशीं घेतला पाहिजे यास्तव वृत्तसुखार्थ 'तनयस्य' या अर्थीं सप्तमी घातली आहे.

'तन्वः' (=तनूः) या शब्दाचा अर्थ या मंत्रांत 'आम्हीं स्वताहा' असा केला आहे. 'तनु' म्हणजे 'जो बोलतो तो स्वताहा' अशा अर्थी पुष्कळ प्रयोग वेदामध्यें येतात. ऋ. १. १७. २ हा

त्वम॑ग्न उरु॒शंसा॑य वा॒घते॑ स्पा॒र्हं यद्रेक्णः॑ पर॒मं व॒नोषि॒ तत् ।
आ॒ध्रस्य॑ चि॒त्प्रम॑तिरुच्यसे पि॒ता प्र पाकं॒ शास्सि॒ प्र दिशो॑ वि॒दुष्ट॑रः ॥ १४ ॥

त्वम् । अ॒ग्ने॒ । उ॒रु॒ऽशंसा॑य । वा॒घते॑ । स्पा॒र्हम् । यत् । रेक्णः॑ । प॒रमम् । व॒नोषि॑ । तत् ।
आ॒ध्रस्य॑ । चि॒त् । प्रऽम॑तिः । उ॒च्य॒से॒ । पि॒ता । प्र । पाक॑म् । शास्सि॑ । प्र । दिशः॑ । वि॒दुःऽत॑रः ॥ १४ ॥

## भाषायाम्.

१४. हे अग्ने, उरुशंसाय (=प्रभूतस्तोत्राय=भूयः स्तोत्रं कुर्वते ) वाघते (=यजमानाय ) यद् रेक्णो (=धनं ) स्पार्हम् (=इष्टम् ) [ अस्ति ] तत् परमम् (=उत्तमं) [ रेक्णः ] त्वं [ तस्मै ] वनोषि (=ददासि ) । [ त्वम् ] आध्रस्य चित् (=दुर्बलस्यापि ) प्रमतिः पिता (=प्रकृष्टबुद्धियुक्तः पिता ) उच्यसे । विदुष्टरः (=अतिशयेन विद्वान् ) [ त्वं ] पाकम् (=अज्ञं ) दिशः (=मार्गान् ) प्रशास्सि, [ त्वं ] प्रशास्सि ] (=शिक्षयसि ) ॥

मंत्र आणि त्यावरील सायणभाष्य पाहा. त्याप्रमाणेंच ३. १. १ हा पाहा.

१३. तात्पर्य:–'जो उपासक असा असेल कीं, त्याचें रक्षण करणारा कोणी नाहीं, त्याचें रक्षण करण्याकरितां तुला पेटवितात, आणि तूं त्याचा प्रिय रक्षक होऊन च्यारी बाजूंनीं रक्षण करितोस. तूं कोणाचें वाईट करीत नसतोस आणि सर्वांचें पोषण करीत असतोस. आणि तुला जो स्तोता हवि अर्पण करितो त्याचेंच स्तोत्र तुला मनापासून आवडतें.'

'रक्षणहीन' हा अर्थ आम्हीं 'अनिषङ्ग' या शब्दाचा केला आहे. 'निषङ्ग' म्हणजे 'भत्ता', ज्यांत बाण भरून ठेवितात तो. त्यावरून 'अनिषङ्ग' म्हणजे ज्याजवळ 'भत्ता' किंवा त्यासारिखीं दुसरीं आपलें संरक्षण करण्याचीं साधनें नाहींत तो. 'निषङ्गी' म्हणजे ज्यास भत्ते आहेत ते. ( उदाहरणार्थ ऋ. ३. ३०. १५; ५.५७. २ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पाहा ). असें असतां सायणाचार्य येथें 'राक्षसांनीं ज्यास घेरलेलें नाहीं अशा यज्ञाकरितां' असा क्लिष्ट अर्थ कां करितात समजत नाहीं.

१४. हे अग्नी, पुष्कळ स्तुति करणाऱ्या हविर्दात्याला जी [ जो ] उत्कृष्ट वस्तु इष्ट [ असते ], ती [ती] तूं [ त्याला ] देत असतोस. तुला दीनाचाहि पालन करणारा पिता असें म्हणतात. महा विद्वान् तूं पामरालाहि मार्ग दाखवितोस.

14. Thou, Agni, givest that highest good to the much-praying sacrificer that [is] desired [by him]. Thou art called the supporting father of even the poor. Thou the greatest sage teachest the ignorant the ways.

---

१४. हा मंत्र स्पष्टच आहे. परंतु एक दोन शब्दांविषयीं थोडेंसें येथें लिहिलें पाहिजे. 'पुष्कळ स्तुति करणाऱ्या' हा अर्थ आम्हीं 'उरुशंसाय' या विशेषणाचा केला आहे. सायणाचार्य 'ज्याची ( यजमानाची ) पुष्कळांनीं स्तुति करावी' असा कर्मणि अर्थ करितात. आमचा अर्थ विशेष सरळ आणि सयुक्तिक आहे इतकेंच नव्हे पण त्याला सायणोक्तीचेंहि प्रमाण आहे; "शं यत् स्तोतृभ्य आपये भवात्युरुशंसाय सवितर्जरित्रे" ( ऋ. २. २९. ११ ) याजवरील त्यांचें भाष्य पाहा.

'देत असतोस'='वनोषि.' या अर्थास ऋ. ७. १५. ४; ६. १६.२८ (अग्निर्नो वनते रयिम्); १. १६२. २२ (क्षत्रं नो अश्वो वनतां हविष्मान्) इत्यादि अनेक प्रमाणें आहेत.

त्वमग्ने प्रयतदक्षिणं नरं वर्मेव स्यूतं परि पासि विश्वतः ।
स्वादुक्षद्मा यो वसतौ स्योनकृज्जीवयाजं यजते सोपमा
दिवः ॥ १५ ॥ ३४ ॥

त्वम् । अग्ने । प्रयतऽदक्षिणम् । नरम् । वर्मऽइव । स्यूतम् । परि । पासि । विश्वतः ।
स्वादुऽक्षद्मा । यः । वसतौ । स्योनऽकृत् । जीवऽयाजम् । यजते । सः । उपऽमा । दिवः ॥ १५ ॥ ३४ ॥

---

## भाषायाम्.

१५. हे अग्ने, प्रयतदक्षिणं (=येन दक्षिणा दत्तास्ति तं) नरं (=मनुष्यं), स्यूतम् (=अङ्गोपरि परिहितं सूच्यादिना दृढीकृतं च) वर्म इव (=कवचं यथा) [परिपाति] [तद्वत्] त्वं विश्वतः (=सर्वतः) परिपासि (=सम्यक्पालयसि)। यो [नरः] स्वादुक्षद्मा (=स्वाद्वन्नः) [सन्] वसतौ (=स्वगृहे) [अतिथिभ्यः] स्योनकृत् (=सुखासनदानादिना सुखकारको) [भवति], जीवयाजं (=जीवानि-र्भाद्यं यज्ञं) यजते (=अनुतिष्ठति) [च], स दिव उपमा (=द्युलोकस्य समीपतरो) [भवति] ॥

१५. हे अग्नी, जो मनुष्य दक्षिणा देतो त्याला, आंगावर घातलेलें कवच [रक्षण करितें], तसा तूं चहूंकडून रक्षितोस. जो [कोण] मिष्ट पक्वान्नानीं [आपल्या] घरीं [अतिथींस] संतुष्ट करितो [आणि] जीवंत प्राणी बळी देतो तो दिव्य लोकाच्या अतिसंनिध [राहतो].

15. Thou, Agni, protectest from all sides, like an armour that is sewed on, the man that has given largesses [in the sacrifice]. He who has in [his] house sweet dainties [and] is hospitable [and] offers a sacrifice with a live animal, [goes] nearest to the heaven

१५. हा मंत्र कठिण आहे असें नाहीं. पण त्यांत सांगितलेल्या गोष्टी ध्यानांत ठेवण्याजोग्या आहेत. मंत्रकर्ता म्हणतो, 'जो मनुष्य यज्ञांत स्तोत्यास दक्षिणा म्हणजे देणगी देतो तो अग्नीला इतका प्रिय होतो कीं, अग्नि त्याचें चहूंकडून संरक्षण करितो; आणि जो मनुष्य आपल्या घरीं गोडगोड पक्वान्नें करून आणि आसन वगैरे चांगलें देऊन अतिथींस संतोष करितो आणि जीवंत प्राणी मारून त्याचें मांस अग्नीस वगैरे अर्पण करितो तो स्वर्गाचे अगदी जवळ जातो.'

यावरून जे स्तोते म्हणजे विद्वान् कवि यज्ञ करण्याचे कामीं लावीत त्यास दक्षिणा म्हणजे मोल देऊन लावण्याची चाल प्राचीन आहे असें दिसतें. आणि मिष्ट भोजन देऊन वगैरे अतिथींची संभावना करणें हें फार स्तुत्य आहे असेंहि फार प्राचीन काळापासून आमचे पूर्वज समजत आले आहेत. तिसरी गोष्ट म्हणजे जीवंत प्राणी मारून बळी देण्याविषयींची तिजविषयीं व त्याविषयीं काय काय विचार आपल्या मनांत येतात तें उघडच आहे, त्यासंबंधी विशेष लिहावयास नको.

'दिव्य लोकाच्या अति संनिध [राहतो]'='दिव उपमा'. 'उपमा' हें येथें क्रियाविशेषण होय. या अर्थाला प्रमाणभूत एक प्रयोग ऋ. ८.६९.१३ या मंत्रांत आहे. दुसरे प्रयोग आढळत नाहींत. पण 'उपमा' म्हणजे सांनिध्य. आणि 'उपमा' ही 'उपमया' अथवा 'उपमायाम्' या अर्थी तृतीया अथवा सप्तमी वेदांत संभवते.

इमामग्ने शरणिं मीमृषो न इममध्वानं यमगाम दूरात् ।
आपिः पिता प्रमतिः सोम्यानां भृमिरस्यृषिकृन्मर्त्यानाम्
॥ १६ ॥

इमाम् । अग्ने । शरणिम् । मीमृषः । नः । इमम् । अध्वानम् । यम् । अगाम । दूरात् ।
आपिः । पिता । प्रऽमतिः । सोम्यानाम् । भृमिः । असि । ऋषिऽकृत् । मर्त्यानाम् ॥ १६ ॥

## भाषायाम्.

१६. हे अग्ने, [ वयं ] यमिममध्वानं दूराद् अगाम (=यदिमं मार्गं दूराद् गतवन्तः=यद् मार्गं परित्यज्य एवं दूराद्गतवन्तः सन्मार्गं त्यक्त्वा एवम् असन्मार्गेण गतवन्तः ) इमां (=तां मार्गादगमनरूपां ) नः (=अस्माकं) शरणिम् (=अपराधम्) [ अ]मीमृषः (=मर्षय=क्षमस्व ) । [ त्वं हि ] सोम्यानां (=सोमंमर्पयतां) मर्त्यानाम् आपिः (=बान्धवः ), पिता, प्रमतिः (=प्रकृष्टमतियुक्तो नाथः ), भृमिः (=भरणस्य पोषणस्य कर्ता ) ऋषिकृत् (=ऋषित्वदाता ) [ च ] असि ॥

१६. हे अग्नी, [आम्ही] मार्ग सोडून जे असे चाललों तो हा आमचा अपराध तूं क्षमा कर. [कारण कीं,] [तूं] सोमयाग करणाऱ्या मर्त्यांचा बांधव, पिता [आणि] नाथ आहेस [आणि] त्यांचा पोषणकर्ता [असून] त्यांस ऋषि करणारा [आहेस].

16. Agni, pardon us this our sin that we have thus gone astray from the road. [For] [thou] art the friend, the father, the supporter, the nourisher [and] the inspirer of the mortals that offer the Soma [to thee].

१६. 'मार्ग सोडून जे असे चाललों तो हा आमचा अपराध' :-'इमम् अध्वानं यम् अगाम दूरात्' अक्षरशः अर्थ, 'जो हा मार्ग आम्ही दुरून चाललों आहों.' म्हणजे, 'मार्ग सोडून असे आडमार्गानें जे आम्ही चाललों.' तो हा आमचा अपराध इ०. मार्ग म्हणजे आपलें कर्तव्य कर्म सोडून आम्ही जे अशा प्रकारें भलभलतेंच करितों तो अपराध. 'अशा प्रकारें' म्हणजे ज्या प्रसंगास अनुलक्षून मंत्रवक्ता बोलत असेल त्यांत जें आड-मार्गाचें वर्णन झालें असेल त्या रीतीनें; 'आम्हीं हें जें कांहीं पातक केलें असेल त्याची क्षमा कर'.

अग्नि क्षमा करील यांत मंत्रवक्त्या-ला संशय नाहीं. कारण बाप आपल्या मुलांचे अपराध क्षमा करीत असतो. आणि अग्नि हा या मंत्रवक्त्यासारिखे जे सोम अर्पण करणारे मर्त्य आहेत त्यांचा बाप, बांधव, काळजी घेणारा, आणि पोषण करणारा आहे, आणि तो त्यांस ऋषि करितो, म्हणजे कवि क-रितो, मंत्र रचण्याची शक्ति त्यांस देतो.

या मंत्रांत 'पोषणकर्ता' हा अर्थ आम्हीं 'भृमिः' या शब्दाचा केला आहे. 'भृमि' हा शब्द वेदांत पुष्कळ ठिकाणीं येत नाहीं. आम्हीं याचा अर्थ 'भृ'= 'भरणें', 'पोसणें' या धातूपासून 'पोषण-कर्ता' असा केला आहे. (जसा 'कृ' अथवा 'चृ'='चलन करणें' यापासून 'कृमि'–'क्रिमि' यापेक्षां 'कृमि' हें रूप शुद्ध दिसतें.–हा शब्द निघाला आहे तसा 'भृ' पासून 'भृमि'). ऋ. ४. ३२. २. यांत "भृमिश्चिद् असि तूतुजिः" असें इंद्राला म्हटलें आहे, आणि ऋ. ७. ५६. २० यांत "इमे रध्रं चिन्मरुतो जुनन्ति भृमिं चिद्यथा वसवो जुषन्त" असें मरुतांविषयीं म्हटलें आहे, या दोन्ही स्थळीं प्रस्तुत मंत्रांत आम्हीं के-लेला अर्थ जुळत नाहीं असें दिसत नाहीं. सायणाचार्य व इतर कितीएक विद्वान् या सर्वस्थळीं 'भ्रम्' यापासून व्युत्पत्ती करून 'फिरणारा,' 'भटकणारा', 'चपल' अथवा 'गरीब' इत्यादि अर्थ करितात. पण हे अर्थ ऋ. ३. ६२. १ यांत, आणि २. ३४. १ यांत हा शब्द आला आहे त्यांत जळतो तो तेथें घ्यावा. आणि आम्हीं केलेला येथें घ्या-वा असें आम्हांस वाटतें. हीं जीं वर पांच स्थळें सांगितलीं इतक्यांतच 'भृमि' शब्द आला आहे. दुसरीं अजून उप-लब्ध नाहींत.

मनुष्वदग्ने अङ्गिरस्वदङ्गिरो ययातिवत्सदने पूर्ववच्छुचे ।
अच्छ याह्या वहा दैव्यं जनमा सादय बर्हिषि यक्षि च
प्रियम् ॥ १७ ॥

मनुष्वत् । अग्ने । अङ्गिरस्वत् । अङ्गिरः । ययातिऽवत् । सदने । पूर्वऽवत् ।
शुचे ।
अच्छ । याहि । आ । वह । दैव्यम् । जनम् । आ । सादय । बर्हिषि ।
यक्षि । च । प्रियम् ॥ १७ ॥

### भाषायाम्.

१७. हे अग्ने, हे अङ्गिरः. हे शुचे (=पवित्र ) [ अग्ने ]. [ त्वं ] मनुष्वत् (=मनुषो नाम मनुष्याणामादिपुरुषस्य सदने यथा आयाः तद्वत् ), अङ्गिरस्वत् (=अङ्गिरसामृषीणां सदने यथा आयाः तद्वत् ), ययातिवत् (=ययातिनामकस्य कस्यचित् प्रख्यातस्य राज्ञः सदने यथा आयाः तद्वत् ), पूर्ववत् (=अस्माकं ये पूर्वे पूर्वपुरुषास्तेषां सदने यथा आयाः तद्वत् ) [ च ] [ अस्माकं ] सदने अच्छयाहि (=आयाहि ) । दैव्यं जनं (=देवजातिं=सकलान्देवान् ) आवह (=आनय ) । [ तान् ] आ बर्हिषि (=एतद्दर्भासनोपरि ) '[ नि ]षादय (=उपवेशय ) । प्रियं [हविः ] यक्षि च (=यजेः=यजनं कृत्वा अर्पय च ) ॥

'ऋषि करणारा [ आहेस ]'='ऋषिकृत्.' उपासकाची जी कोणी इष्ट देवता असेल ती त्याला ऋषि ( अथवा कवि ) करूं शकते आणि तिणें त्यास कवि करावें अशी प्रार्थना पूर्वी एकदा आली आहे. सूक्त १० मंत्र ११ याजवरील टीप ७३ व्या पृष्ठावर पाहा. त्यांतील प्रार्थना इंद्रास केली आहे. प्रस्तुतचें वर्णन अग्नीविषयीं आहे. ऋ. ३. ४३. ५ यांत त्या मंत्राचा कर्ता इंद्रास म्हणतो, "कुविन्मा गोपां करसे जनस्य कुविद्राजानं मघवन् ऋजीषिन् । कुविन्म ऋषिं पपिवांसं सुतस्य" इ०='हे मघवन्, तूं मला लोकावर अधिकारी करशील काय? मला राजा करशील काय? सोम पिणारा असा ऋषि मला करशील काय?' इ०.

यावरून एक गोष्ट अशी उघड होते कीं, 'ऋषित्वं' तपोबळानें येत होतें आणि ऋषींची शक्ति व अधिकार आणि योग्यता हीं देवापेक्षांहि अधिक होतीं, अशी जी पुराणादिकांवरून आमची समजूत झाली आहे ती निराधार समजली पाहिजे. बरें कोणी यःकश्चित् मंत्रकर्ता आपणास ऋषि करण्याविषयीं वेदांत प्रार्थना करीत असतो असेंहि समजूं नये. कारण कीं, 'आम्हांस आलीकडे जे ऋषींमध्यें प्रमुख ऋषि ऐकून

१७. हे अग्नी, हे अंगिरा, हे पवित्र [ अग्नी ], [ तूं ] मनूच्या [ घरीं येत होतास ] तसा, अंगिराच्या [ घरीं येत होतास ] तसा, ययातीच्या [ घरीं येत होतास ] तसा, [ आणि ] [ आमच्या ] पूर्वजांच्या [ घरीं येत होतास ] तसा [ आज ] [ आमच्या ] घरीं ये, [ आणि ] सगळ्या देवांस आण, [ आणि ] त्यांस [ या आमच्या ] दर्भासनीं बसीव [ आणि ] [त्यांला] प्रिय [ हवि ] अर्पण कर.

17. O Agni, O Angiras, O pure [one], come [thou] to [our] house as [thou camest] to [the house of] Manu, as [thou camest] to [the house of] Angiras, as [thou camest] to [the house of] Yayâti, as [thou camest] to [the house of our] ancestors; bring hither [and] seat all the gods, on the *kus'a*-[grass] [and] offer [to them] the oblation they love.

ठाऊक आहेत त्यांत 'वसिष्ठ' हा श्रेष्ठ आहे; पण तोहि मूळचा 'ऋषि' नव्हता आणि त्याला मागाहून वरुणानें ऋषि केला असें तोच आपल्या तोंडानें ऋ. ७.८८.४ या ( वसिष्ठकृत ) मंत्रांत सांगतो: "वसिष्ठं ह वरुणो नाव्याधादृषिं चकार"='वरुणानें वसिष्ठाला ( म्हणजे मला मंत्रकर्त्याला ) आपल्या नावेंत बसाविलें आणि मला ऋषि केलें.' यापेक्षाहि चांगलें दुसरें प्रमाण, 'ब्राह्मण' म्हणजे केवळ ब्राह्मणाचा मुलगा अथवा 'ऋषि' म्हणजे ऋषीचा मुलगा नव्हे, आणि ब्राह्मणाच्या कुळांत जन्म घेतल्यानें ब्राह्मण होत नाहीं आणि ऋषीच्या कुळांत जन्म घेतल्यानें ऋषि होत नाहीं याविषयीं ऋ. १०. १२५. ५ यांत आहे तें असें:—या मंत्रांत आकाशवाणी ( 'वागाम्भृणी' ) म्हणजे प्रत्यक्ष ईश्वराची वाचा बोलते आहे, आणि ती म्हणते कीं, "अहम् एव स्वयम् इदं वदामि जुष्टं देवेभिः उत मानुषेभिः । यं कामये तं तम् उग्रं कृणोमि तं ब्रह्माणं तम् ऋषिं तं सुमेधाम् ॥ "=हें माझें स्वताहाचें वचन आहे, [ आणि ] तें देवांस आणि मनुष्यांस संमत आहे, [ कीं ] जो मला आवडतो त्याला [ मी ] बलवान् करितों, जो मला आवडतो त्याला [मी] ब्राह्मण करितों, [ जो मला आवडतो] त्याला [ मी ] ऋषि [ करितों ] [ आणि जो मला आवडतो ] त्याला [मी] बुद्धिमान् [ करितों ].'

१७. 'हे अंगिरा.' अग्नीस अंगिरा असें नांव असल्याविषयीं पूर्वी ( ऋ. १. १.६ यावरची टीप पृष्ठ ४ ) सांगितलेंच आहे. या ठिकाणीं इतकेंच अधिक सांगावयाचें आहे कीं, या सूक्ताचा कर्ता जो हिरण्यस्तूप ऋषि तो अंगिरस् कुळींतलि होता आणि त्याणें या सूक्ताच्या पहिल्या मंत्रांत अग्नीस

एतेनाग्ने ब्रह्मणा वावृधस्व शक्ती वा यत्ते चकृमा विदा वा।
उत प्र णेष्यभि वस्यो अस्मान्त्सं नः सृज सुमत्या वाजवत्या
॥ १८ ॥ ३५ ॥

एतेन । अग्ने । ब्रह्मणा । ववृधस्व । शक्ती । वा । यत् । ते । चकृम । विदा । वा ।
उत । प्र । नेषि । अभि । वस्यः । अस्मान् । सम् । नः । सृज । सुऽमत्या । वाजऽवत्या ॥ १८ ॥ ३५ ॥

**भाषायाम्.**

१८. हे अग्ने, यद् एतद् ब्रह्म (=स्तोत्रं) शक्त्या वा (=अस्मदीयकवित्वशक्त्या=यथाशक्ति) विदा वा (=ज्ञानेन=यथाज्ञानं) [वयं] ते (=तुभ्यं=त्वदर्थं) चकृम (=कृतवन्तः स्मः), तेन [त्वम्] [अ]र्वावृधः (=प्रसन्नो भव्यस्व)। उत (=अपि च) अस्मान् अभि वसीयः (=उत्तमं श्रेयः प्रति) प्रणय। नः (=अस्मान्) वाजवत्या (=अन्नादिसंयुक्तया) सुमत्या (=अस्मद्विषयया तव सुप्रसन्नबुद्ध्या) संसृज (=संयोजय)॥

अंगिरस कुळाचा आदिपुरुष असें म्हटलें आहे तें व त्यावरील टीप पाहा.

'मनूच्या' '[घरीं येत होतास]तसा' ='मनुष्वत्'. 'मनु' (अथवा 'मनुस्') हें मनुष्यांचा आदिपुरुष मनु त्याचें नांव होय याविषयीं पूर्वी (चवथ्या मंत्रावरील टीपेंत) सांगितलेंच आहे. मंत्रकर्ता असें समजत आहे कीं, जसा आपण आपल्या घरीं अग्नीला प्रदीप्त करून होमहवन करीत आहें तसाच मनुष्य जातीचा आदिपुरुष मनुहि करीत होता. आम्हीं जें (होम, हवन, बळि इत्यादि) करितों तेंच आमचे पुरातन वाडवडील करीत असत असें मानण्याविषयींचीं उदाहरणें दुसऱ्या लोकांच्या धर्मग्रंथांतहि आढळतात हें सांगावयास नकोच.

'अंगिराच्या घरीं' इ० या ठिकाणीं अंगिरा म्हणजे अंगिरस् कुळाचा जो कोण खरोखर आदिपुरुष होऊन गेला असेल, आणि ज्याच्या वरून त्या कुळास नांव पडलें, तो असावा असें दिसतें. (या सूक्ताच्या पहिल्या मंत्रांत अग्नीस अंगिरस् कुळाचा आदिपुरुष म्हटलें आहे ती केवळ प्रशंसा होय.)

'ययातीच्या घरीं' इ०. हा 'ययाति' म्हणजे मागाहून भारतांतील वगैरे ज्याविषयीं कथा प्रख्यात झाल्या आहेत, तोच प्रसिद्ध राजा समजला पाहिजे. परंतु या राजाविषयीं वेदांत फार सांगितलेलें नाहीं. ऋग्वेदांत तर हें नांव दोनदाच (ऋ १०.६३.१) आलें आहे. आणि त्यांत इतकेंच आढळतें कीं, तो नहुषराजाचा पुत्र होय, आणि तो यज्ञयाग करीत असे इतकी प्रसिद्धि आहे. संहितोत्तर वैदिक ग्रंथांत त्यावि-

१८. हे अग्नी, हें जें [आम्हीं] [आमच्या] शक्तीप्रमाणें अथवा ज्ञानाप्रमाणें तुझें स्तोत्र केलें आहे तें ऐकून [तूं] प्रसन्न हो. आणि [तूं] आम्हांस उत्तम कल्याणाप्रत ने, [आणि] जिजपासून संपत्तीचा लाभ होईल अशी [तुझी] कृपा आम्हांवर कर.

18. With this hymn, Agni, which we have made [as we could] for thee by [our] ability or [our] knowledge, allow thyself to be pleased. And lead us forth towards the highest good. Show us thy favour, the source of prosperity.

षयीं लिहिलेलें आढळतेंच.

'मनुष्वत्', 'अंगिरस्वत्' आणि 'ययातिवत्' आणि 'पूर्ववत्' या पदांचा अक्षरशः अर्थ 'मनुप्रमाणें' 'अंगिरसाप्रमाणें' 'ययातीप्रमाणें' आणि 'पूर्वजांप्रमाणें', म्हणजे 'मनु आला तसा' 'अंगिरस् आला तसा' 'ययाति आला तसा' आणि 'पूर्वज आले तद्वत्' असा (कर्तरि) साधारण संस्कृतांत व्हावयाचा, परंतु वेदांत आम्हीं येथें केल्याप्रमाणेंहि होतो याविषयीं आधारः—ऋ. १. ४६.१३ "मनुष्वत् शंभू आगतम्"='हे कल्याणकारक [अश्वीं] हो, तुम्ही मनूच्या घरीं आलां तसे येथें या.' ऋ. १, १०५. १३ "स नः सत्तो मनुष्वदादेवान्यक्षि"='यास्तव तूं येथें बसून मनूच्या घरीं देवांस यजन केलेंस तसें कर'. (या ठिकाणीं 'मनुष्याप्रमाणें' असाहि अर्थ संभवेल खरा). ऋ. ४. ३७. ३. "जुह्वे मनुष्वत्...सोमम्"='मनूनें सोम अर्पण केला तसा मी करीत आहें.' ऋ. १. ४५. ३ "प्रियमेधवत् अत्रिवत् जातवेदः विरूपवत् । अङ्गिरस्वत् महिव्रत प्रस्कण्वस्य श्रुधि हवम्"='हे अग्नी, तूं प्रियमेधाची, अत्रीची, विरूपाची आणि अंगिराची हाक ऐकिलीस तशी मज प्रस्कण्वाची ऐक'. शिवाय ऋ. ६. ४९. ११; ८. ४०. १२ हेहि मंत्र पाहा.

'[त्याला] प्रिय [हवि] अर्पण कर'—'यक्षि च प्रियम्.' यांतील 'प्रियम्' हें 'दैव्यं जनं' याचें विशेषण घेतलें तरी चालेल. तसें केल्यास, 'प्रिय [असे जे] सकल देव, त्यांस आण [आणि] त्यांस [या आमच्या] दर्भासनीं बसीव [आणि] त्यांजला [हवि] अर्पण कर' असें भाषांतर करावें.

१८. हें एकतिसावें सूक्त येथें संपलें. आणि सूक्ताचा असावा तसा उपसंहार या मंत्रांत आहे. एकंदरींत हा मंत्र फार सुंदर आहे यांत संशय नाहीं. एक तर, यांत 'ब्रह्म' शब्दाचा मूळ अर्थ (स्तोत्र हा) पूर्वीं (सूक्त ३ मंत्र ५.पृष्ठ १६ येथें) सांगितला आहे तो यांत आला आहे. आणि ब्राह्मणाचें म्हणजे ब्राह्मणजातीचें आदिकारण 'ब्रह्म' (स्तोत्र) कसें तें या मंत्रांत योजिलेल्या ब्रह्मशब्दावरून दिसून येतें. दुसरें असें कीं, सूक्तवक्ता 'हें अनादि आणि अनंत वेदांतील सूक्त आम्हीं म्हटलें आहे तेणेंकरून तूं प्रसन्न हो' असें म्हणत नाहीं; तर नम्र,

## सूक्त ३२.

हिरण्यस्तूप आङ्गिरस ऋषिः । इन्द्रो देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**इन्द्रस्य नु वीर्याणि प्र वोचं यानि चकार प्रथमानि वज्री ।**
**अहन्नहिमन्वपस्ततर्द प्र वक्षणा अभिनत्पर्वतानाम् ॥ १ ॥**

इन्द्रस्य । नु । वीर्याणि । प्र । वोचम् । यानि । चकार । प्रथमानि । वज्री । अहन् । अहिम् । अनु । अपः । ततर्द । प्र । वक्षणाः । अभिनत् । पर्वतानाम् ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. नु (=इदानीम्) [अहम्] इन्द्रस्य वीर्याणि (=पराक्रमयुक्तानि कर्माणि) प्र[अ]वोचम् (=प्रब्रवाणि), यानि [वीर्याणि] वज्री [इन्द्रः] प्रथमानि चकार (=प्रथमं चकार) । [स हि] अहिं (=मेघं=वृत्रम्) अहन् (=हतवान्), [स] अपः अनुततर्द (=तदन्तरं मोचितवान्=भूमौ पातितवान्) [स च] पर्वतानां (=मेघानां) वक्षणाः (=ऊधांसि=मेघोदकात्मकदुग्धस्य आशयान्) प्राभिनत् (=भिन्नवान्) ॥

दीन, अनाथ, शक्तिहीन, आणि अज्ञानी आम्ही मर्त्यांतून जसा एकादा भाविक पुरुष आळीकडे म्हणेल तसेंच हे अग्नी, यथाशक्ति आणि यथाज्ञान हें स्तोत्र तुजप्रीत्यर्थ रचिलें आहे' असें म्हणतो. तिसरें असें कीं, उत्तरोत्तर आमची उन्नति व्हावी म्हणून आणि अग्नीची आपणावर कृपा व्हावी म्हणून कवि मोठ्या भाविकपणानें आणि नम्रपणानें प्रार्थीत आहे.

हा व अशा प्रकारचे दुसरे वेदमंत्र आम्हांस सुंदर व प्रिय कां व केव्हां लागतात? याचें उत्तर इतकेंच कीं, शक्तिमान् आणि ज्ञानमय देवापुढें शक्तिहीन् आणि अज्ञानी मनुष्य सर्वकाळीं, सर्वयुगीं, आणि सर्वस्थळीं एकसारिखाच असतो, त्याचा स्वभाव देशावरून किंवा युगावरून बदलत नाहीं असें या मंत्रांपासून दिसून येतें म्हणून ते फार सुंदर आणि प्रिय लागतात; आणि तसें जें दिसून येतें तें आग्रह सोडून आपण कबूल केलें तरच ते सुंदर आणि प्रिय लागतील. आम्हीं जसे अल्पशक्तिमान्, अल्पज्ञानी, अल्पायुषी, आणि अनाथ आहों तसेच हिरण्यस्तूपादि जे महान् ऋषि तेहि होते.

'कृपा'='सुमतिः.' सायणाचार्य या स्थळीं 'सुमति' शब्दाचा अग्नीची कृपा अथवा अनुग्रह असा आम्हीं केलेला अर्थ न करितां 'यज्ञ करावा अशी जी मंत्रवक्त्याची सुबुद्धि ती' असा करितात; पण ऋ. २. ३४. १५. यांतील "अर्वाची सा मरुतः या वा ऊतिः ओ सु वाश्रा इव सुमतिः जिगातु" या अर्धर्चावरील त्यांचेंच भाष्य पाहा. इतरहि अनेक प्रयोग आम्हांस प्रमाणभूत असे आहेत.

## सूक्त ३२.

**ऋषि**—वरील सूक्ताचा जो हिरण्यस्तूप ऋषि तोच. **देवता**—इंद्र. **वृत्त**—त्रिष्टुप्.

१. प्रथम वज्रधारी [ इंद्रा]नें जे पराक्रम केले [ते] इंद्राचे [ पराक्रम ] मी आतां वर्णितों. [तो] अहीस मारिता झाला; [आणि] [तो] उदकें मुक्त करिता झाला, [ आणि ] [ तो ] मेघांच्या कासी फोडिता झाला.

HYMN. 32.

To *Indra.* By *Hiranyastúpa*, author of the previous hymn. Metre—*Trishṭubh.*

1. I will now sing forth the victories of Indra which the wielder of the thunder-bolt achieved first: he slew the Serpent; he sent down the waters; he broke open the udders of the rain clouds.

---

१. हें सूक्त पूर्वीच्या सूक्ताच्या कर्त्याचेंच आहे. आणि तें इंद्राविषयीं आहे. ऋग्वेदांत इंद्राविषयीं जीं कितीएक सुंदर सूक्तें आहेत त्यांपैकीं हें एक आहे.

सूक्तकर्ता सूक्तीला कसा आरंभ करितो तो पाहा. जसा आलीकडील एकादा कवि आपल्या कथेच्या नायकाचें वर्णन करण्यास आरंभ करील तसाच या सूक्ताचा कर्ता 'हिरण्यस्तूप' करीत आहे, आणि इंद्राचे पराक्रम आपण वर्णन करितों अशी प्रतिज्ञा करीत आहे.

पहिल्या मंत्रांत इंद्राचे तीन पराक्रम वर्णिले आहेत. परंतु तीन्ही मिळून एकच रूपकावर अवलंबून आहेत. तें रूपक हें कीं, मेघोदकरूपी गाईस मेघरूपी जो वृत्र अवरोधून टाकितो आणि त्यास भूमीवर वाहूं देत नाहीं आणि वरचेवर आकाशांत कोंडून ठेवितो त्याजबरोबर इंद्रानें युद्ध करून त्याला मारिलें. ( ८६ व्या पृष्ठावरची टीप पाहा. ) त्याच वृत्राचें नांव या मंत्रांत 'अहि' म्हणजे सर्प असें आहे. मेघरूपी वृत्राला सर्प असें त्याच्या आकृतीवरून म्हणण्याचा प्रचार पडला असावा. वृत्रास 'अहि' अथवा सर्प म्हणण्याचा प्रचार असल्याविषयीं वेदांत पुष्कळ उदाहरणें आहेत. तर त्या वृत्रास इंद्रानें मारिलें, हा त्याचा एक पराक्रम. त्याला मारून त्याणें कोंडून ठेविलेलीं मेघोदकें भूमीवर पाडिलीं, हा दुसरा पराक्रम. आणि तीं मेघोदकें खालीं पाडण्याच्या पूर्वीं ढग ह्याच कोणी ज्या गाई त्यांच्या कासी फोडिल्या, हा तिसरा पराक्रम. वृष्टि न होऊं देणारी जी कोणी एक कल्पिलेली शक्ति तिच्याशीं लढून म्हणजे मेघगर्जना व विद्युत्प्रादुर्भाव करून मेघ फोडून जमिनीवर पावसाचें पाणी पाडिलें इतकेंच तात्पर्य.

या मंत्रांत 'वक्षणा' हा एक शब्द कठिण आहे. हा सगळ्या ऋग्वेदांत ११ ठिकाणीं आला आहे, तीं सर्व स्थळें तपासून पाहतां एक स्थळ ( ६.७२.४ )

अह॒न्नहिं॒ पर्व॑ते शिश्रिया॒णं त्वष्टा॑स्मै॒ वज्रं॑ स्व॒र्यं॑ ततक्ष ।
वा॒श्रा इ॑व धे॒नवः॒ स्यन्द॑माना॒ अञ्जः॑ समु॒द्रमव॑ जग्मु॒रापः॑ ॥ २ ॥

अह॑न् । अहि॑म् । पर्व॑ते । शि॒श्रि॒या॒णम् । त्वष्टा॑ । अ॒स्मै॒ । वज्र॑म् । स्व॒र्य॑म् ।
त॒त॒क्ष॒ ।
वा॒श्राःऽइ॑व । धे॒नवः॑ । स्यन्द॑मानाः । अञ्जः॑ । स॒मु॒द्रम् । अव॑ । ज॒ग्मुः॒ ।
आपः॑ ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. [ स ] पर्वते (=मेघे ) शिश्रियाणं (=कृताश्रयम ) अहिं (=वृत्रम् ) अहन् (=हतवान् ) । [ तस्मिन् प्रसङ्गे ] अस्मै [ इन्द्राय ] त्वष्टा स्वर्यं (=शब्दयुक्तं= गर्जत ) वज्रं ततक्ष (=निर्ममे ) । [ अनन्तरं ], वाश्राः (=वत्सान्प्रति हम्भारवोपेता ) धेनवः [ सहसा वत्सगृहं गच्छन्ति ] तद्वत्, स्यन्दमानाः (=प्रस्रवणयुक्ता ) आपः समुद्रमञ्जः (=समुद्रं प्रति शीघ्रम् ) अवजग्मुः ॥

खेरीज करून सायणाचार्य निघंटूस व यास्कास अनसरून सर्व ठिकाणीं नदी असा अर्थ करितात. परंतु या शब्दाचा अर्थ तसा बसत नाहीं. बहुतकरून कास ( गाईची वगैरे ), उदर ( मातेचें वगैरे कीं ज्यांतून जन्म होतो ) हा अर्थ संभवतो, आणि नीट बसतो. हा शब्द नित्य बहुवचनान्त आढळतो. सायणाचार्यांनींहि ६. ७२. ४ या मंत्रांत कास असा अर्थ केला आहे तोच आम्हीं येथें घेतला आहे. "गर्भं माता सुधितं वक्षणासु बिभर्ति" १०. २७. १६; "सा वः प्रजां जनयद्वक्षणाभ्यः" अ० १४. २. १४; "आ ते ददे वक्षणाभ्य आ तेऽहं हृदयाद्ददे" ७. ११४.

२. [तो] पर्वताचा आश्रय करून राहणाऱ्या अहीस मारिता झाला; [तेव्हां] त्या [इंद्रा]साठीं त्वष्टा [देव] गर्जणारें वज्र निर्माण करून देता झाला. मग उदकें खालीं गळून हंबरणाऱ्या गाईप्रमाणें समुद्राकडेस त्वरेनें वाहून गेलीं.

2. He slew the Serpent who had taken shelter in the mountain. [On that occasion] Tvashtâ fashioned for him the rumbling thunderbolt. Like milk-cows lowing [for their calves] the waters trickled down and quickly flowed to the sea.

२. वरच्या मंत्रांत जें सांगितलें तेंच या मंत्रांत आहे. विशेष इतकेंच कीं, इंद्रानें वृत्राशीं (=पाण्याला अवरोधून ठेवणाऱ्या मेघरूपी शत्रूशीं) युद्ध केलें तेव्हां त्वष्टा म्हणून जो देवांचा विश्वकर्मा म्हणजे सुतार (सूक्त १३, मंत्र१० यावरील टीप ९८ व्या पृष्ठावर पाहा) त्याणें इंद्राला वज्र करून दिलें. (तेथपासून वज्र इंद्राच्या हातीं आलें पूर्वी नव्हतें). मग इंद्र अहीशीं लढून त्याणें उदकें मोकळीं केलीं, म्हणजे पर्जन्यवृष्टी केली. तेव्हां जशा गाई आपल्या वासरांची आठवण करून हंबरडा फोडीत गोठ्याकडे धांवतात आणि त्यास पान्हा फुटून त्यांच्या कासेंतून दूध वाहूं लागतें तशीं उदकें आकाशांतून खालीं गळलीं आणि एकत्र होऊन नदीरूपानें मोठ्या झपाट्यानें समुद्राकडेस वाहून गेलीं. हा इंद्राचा विशेष पराक्रम या मंत्रांत वर्णिला आहे.

मेघोदकास हंबरणाऱ्या गाईची जी उपमा दिली आहे त्यांत आर्यलोकांची प्राचीनकाळीं राहण्याची साधी रीति दिसून येते. व त्यांच्या वार्णांत अनन्वित उपमादिक अलंकारांचें आधुनिक लोकांच्या कवितेंत असतें तसें अवडंबर मुळींच नाहीं.

'पर्वताचा आश्रय.' पर्वत म्हणजे येथें मेघच समजावयाचा. मेघाची म्हणजे ढगाची आकृति पर्वतासारिखी असते म्हणून संस्कृतांत जे पर्वतवाचक शब्द तेच मेघवाचक असतात; आणि याच गोष्टीमुळें, इंद्रानें पर्वताचे पक्ष छेदिले वगैरे पुराणांतरींच्या प्रसिद्ध कथांचें बीज वेदांत आहे, तें पुढें प्रसंग येईल तेव्हां आम्ही उघड करून सांगूं.

वृषायमाणोवृणीत सोमं त्रिकद्रुकेष्वपिबत्सुतस्य ।
आ सायकं मघवादत्त वज्रमहन्नेनं प्रथमजामहीनाम् ॥ ३ ॥

वृषऽयमाणः । अवृणीत । सोमम् । त्रिऽकद्रुकेषु । अपिबत् । सुतस्य ।
आ । सायकम् । मघऽवा । अदत्त । वज्रम् । अहन् । एनम् । प्रथमऽजाम् ।
अहीनाम् ॥ ३ ॥

यदिन्द्राहन्प्रथमजामहीनामान्मायिनाममिनाः प्रोत मायाः ।
आत्सूर्यं जनयन्द्यामुषासं तादीत्ना शत्रुं न किला विवित्से ॥ ४ ॥

यत् । इन्द्र । अहन् । प्रथमऽजाम् । अहीनाम् । आत् । मायिनाम् ।
अमिनाः । प्र । उत । मायाः ।
आत् । सूर्यम् । जनयन् । द्याम् । उषसम् । तादीत्ना । शत्रुम् । न ।
किल । विवित्से ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. वृषायमाणः (=वृष इवाचरन्=बलवान्) [इन्द्रः] सोमम् अवृणीत (=वाञ्छितवान्)। [वाञ्छित्वा च] [स] त्रिकद्रुकेषु (=ज्योतिर्गौरायुरित्येतन्नामकेषु उत्सवदिवसेषु) सुतस्य (=अभिषुतस्य सोमस्य अंशम्=अभिषुतं सोमं) [यथावाञ्छम्] अपिबत्। [पीत्वा च] मघवा (=धनवानिन्द्रः) सायकं (=मारकं) वज्रम् आदत्त। [आदाय च] अहीनां (=शत्रुरूपाणां सर्पाणां) प्रथमजां (=प्रथमोत्पन्नं=ज्येष्ठम्) एनं (=जलावरोधकं मेघरूपं सर्पम्) अहन् ॥

४. हे इन्द्र, यद् (=यदा) [त्वम्] [अहीनां] प्रथमजां (=ज्येष्ठम्) [अहिम्] अहन् आत् (=तस्मात् कालात्=अनन्तरं) [त्वं] मायिनामुत (=मायोपेतानामितरेषां शत्रूणामपि) मायाः प्रामिणाः (=प्रकर्षेण अनाशयः)। आत् (=तदनन्तरं) [त्वं] सूर्यं द्यामुषसं [च] जनयन् (=यदा जनयन्नासीः) तादीत्ना (=तदानीं) शत्रुं न किल (=नैव) विवित्से (=विविदिषे=अविन्दः) ॥

३. बलवान् [इंद्रा]स सोमाची वांछा झाली, [तेव्हां] [तो] त्रिकद्रुकांच्या वेळीं सोम पीता झाला. [आणि मग] [तो] मघवा घातक वज्र [हातांत] घेता झाला, [आणि] [सकल] अहींमध्यें वडील [जो] हा अहि त्याला मारिता झाला.

४. हे इंद्रा, प्रथम [सकल] अहींमध्यें वडील [अही]स [तूं] मारिता झालास आणि त्यानंतर [तूं] मायावींच्या माया भंगून टाकिता झालास. नंतर [तूं] सूर्यातें, द्युलोकातें [आणि] उषेतें उत्पन्न करूं लागलास तेव्हां तुला कोणी शत्रु भेटलाच नाहीं.

3. The mighty [Indra] desired Soma; He drank of the extracted juice in the *Trikadruka* [festivals]. [Indra] the lord of riches then took up the deadly thunderbolt [and] killed this [Serpent], the eldest of Serpents.

4. Indra, after [thou] hadst slain the eldest of the Serpents, [thou] didst destroy the machinations of the machinators. Thereafter [when] creating the Sun, the Heaven [and] Ushas (the Dawn) [thou] didst not then meet with an enemy indeed.

---

3. या मंत्राचा भावार्थ:—'बलवान् इंद्रास पूर्वी सोम पिण्याची वांछा झाली; तेव्हां त्रिकद्रुक म्हणून जो एक तीन दिवसांचा सण येतो, त्या सणांत लोकांनीं सोम तयार करून इंद्रास पाजला. तो सोम पिऊन इंद्रास बळ आलें, आणि त्याणें आपलें भयंकर वज्र हातांत घेतलें आणि तेणेंकरून सकल शत्रूंत ज्येष्ठ असा जो हा मेघोदकांचा अवरोधक वृत्ररूपी सर्प त्याला मारून टाकिला.'

या मंत्रांत 'त्रिकद्रुक' हा शब्द कठिण आहे. बाकी सर्व मंत्र उघड आहे. 'त्रिकद्रुक' शब्द नित्य अनेकवचनीच वेदांत येतो. आणि सायणाचार्य सर्वत्र "ज्योति, गौ, आणि आयु या नावांचे जे तीन याग म्हणजे यज्ञ करण्याचे प्रसंग अथवा दिवस त्या दिवसांत" असा अर्थ करितात (ऋ. २. २१. १७; २. १५. १; २. २२. १; ८. १३. १८; ८. ९२. २१ हीं स्थळें पाहा. या सर्व स्थळीं इंद्र त्रिकद्रुकांत सोम प्याला असें सांगितलें आहे.) आम्हांसहि फारकरून तसेंच वाटतें. 'त्रिकद्रुक' म्हणजे तीन दिवसपर्यंत चालणारा एखादा वार्षिक सण असावा, आणि त्या प्रसंगीं इंद्रास सोम अर्पण करण्याची कांहीं विशेष चाल असावी. आणि ती चाल कां पडली त्याचें कारण दाखविण्याकरितां मागाहून लोकांनीं असें सजविलें असेल कीं, इंद्रानें जो वृत्राला मारिला तो त्रिकद्रुक सणांत सोम पिऊन मारिला. त्रिकद्रुक हें नांव कशाव:

अहन्वृत्रं वृत्रतरं व्यंसमिन्द्रो वज्रेण महता वधेन ।
स्कन्धांसीव कुलिशेना विवृक्णाहिः शयत उपपृक्पृथिव्याः ॥ ५ ॥ ३६ ॥

अहन् । वृत्रम् । वृत्रऽतरम् । विऽअंसम् । इन्द्रः । वज्रेण । महता । वधेन । स्कन्धांसिऽइव । कुलिशेन । विऽवृक्णा । अहिः । शयते । उपऽपृक् । पृथिव्याः ॥ ५ ॥ ३६ ॥

## भाषायाम्.

५. इन्द्रः वृत्रतरम् (=अतिशयेन वृत्रलक्षणयुक्तं=शत्रुलक्षणयुक्तम्) [ अहिं ] कुलिशेन (=कुठारेण) स्कन्धांसि (=वृक्षस्कन्धान्) विवृक्णानि (=छिन्नानि) [ कुर्वन्ति ] तद्वत् व्यंसं (=विगतांसं=छिन्नबाहुर्यथा भवति तथा-विगतांसं कृत्वा) महता वधेन (=मारकेण) वज्रेण अहन् (=हतवान्) । [ अनन्तरम् ] अहिः पृथिव्याः उपपृक् (=भूमेः समीपं) शेते (=शिश्ये) ॥

रून पडलें तें निश्चयानें सांगवत नाहीं. कितीएक विद्वान् 'कद्रू' म्हणजे सोमपात्र असा (ऋ. ८. ४५. २६ यांत 'कद्रुवः' म्हणजे 'सोमपात्रांतून' असें–सायणाचार्यांविरुद्ध–समजून) अर्थ करितात, आणि प्रस्तुत मंत्रांत व इतर मंत्रांतहि 'त्रिकद्रुकेषु' याचा 'तीन सोमपात्रांतून' असा अर्थ समजतात. परंतु आम्हांस वाटतें सायणाचार्यांचें भाष्य अशा प्रसंगीं विशेष प्रमाणीभूत मानावें.

४. या मंत्रांत इतकेंच सांगावयाचें मंत्रकर्त्याच्या मनांत आहे कीं, 'हे इंद्रा, तूं प्रथम ह्या मोठ्या अहीस म्हणजे मेघोदकाचा अवरोध करणाऱ्या वृत्राला मारिलेंस, आणि नंतर जे लहान लहान दुसरे शत्रु म्हणजे सूर्याला उगवूं न देणारे अंधकाररूपी वगैरे शत्रु त्यांस मारून टाकिलेंस. आणि नंतर तूं सूर्याला, द्युला (म्हणजे तेजःपुंज असंख्य तारे ज्यांत आहेत अशा आकाशाला) आणि उषेला म्हणजे प्रभातरूपी जी देवी (पूर्वीं ३० व्या सूक्ताच्या २० व्या मंत्रांत सांगितली) तिला निर्माण केलेंस, तेव्हां तुला प्रतिबंध करणारा शत्रु कोणीहि नाहींसारिखाच झाला.'

पाऊस पडत नाहीं त्याचें कारण मेघोदकास अवरोधून धरणारा कोणी वृत्र म्हणून आहे त्याला इंद्रानें मारिलें (व अजून प्रत्येक पावसाळ्याच्या आरंभीं मारितो) म्हणून पाऊस पडतो, असें जसें आमचे पूर्वज आर्य समजत, त्याप्रमाणेंच सूर्याचे किरण अंधारामुळें दिसत नाहींत तेंहि तशाच एका दुसऱ्या शत्रूच्या कृत्यामुळें होत असें ते मानीत. आणि त्या शत्रूस इंद्रानें मारून टाकिलें म्हणून सूर्य चंद्रादि व उषा ह्या उगवतात अशी त्यांची समजूत होती असें वेदवाणीवरून दिसून येतें.

५. इंद्र मोठ्या [ आणि ] मारक वज्रानें [ इतर ] शत्रूंपेक्षां मोठा शत्रु [जो] [ अहि ] त्याला मारून त्याचे बाहू, कुठारीनें [ वृक्षाच्या ] डाहळ्या तोडिल्याप्रमाणें, तोडून टाकिता झाला. [ तेव्हां ] [ तो ] अहि भूमीवर पडला

5. Indra slew the enemy more hostile than other enemies, with his great [and] deadly thunderbolt, and deprived him of his arms like as [one would] cut the branches of a tree with an axe. The Serpent [then] lay prostrate on the earth.

५. वरच्या मंत्रांत अहीस इंद्रानें मारिलें म्हणून सांगितलें. मारण्याचा प्रकार या मंत्रांत सांगतो. तो हा कीं, 'अहीस मारून त्याचे हस्त छेदन टाकिले, कीं कुऱ्हाडीनें जशा एकाद्या झाडाचे खांदेच तोडावे; मग अहि हस्तरहित होतांच जमिनीवर पडला आणि त्याच्यानें उठवेनासें झालें.'

या मंत्रांत विशेष कांहीं सांगण्याजोगें नाहीं. 'त्याचे बाहू तोडून टाकिता झाला' हा अर्थ आम्हीं सायणाचार्यांस अनुसरून 'व्यंसं' या क्रियाविशेषणापासून काढिला आहे. 'व्यंसं' हें इतर बहुतेक ठिकाणीं ऋग्वेदांत एक असुराचें नांव आहे असें दिसतें, आणि त्यास इंद्रानें मारिलें असें वर्णन येत असतें. (ऋ. ४. १८. ९ यांत सायणाचार्य सुद्धां 'व्यंस' या नांवाचा असुर असा अर्थ करितात, आणि २. १४. ५ यांत विशेषनाम खचित आहे यांत संशय नाहीं ). परंतु सायणाचार्य कितीएक ठिकाणीं आणि तसेच या प्रस्तुत स्थळींहि 'व्यंसं' याचा अर्थ आम्हीं येथें केल्याप्रमाणें करितात. या ठिकाणीं तो युक्त दिसतो म्हणून आम्हीं घेतला आहे.

अयोद्धेव दुर्मद आ हि जुह्वे महावीरं तुविबाधमृजीषम् ।
नातारीदस्य समृतिं वधानां सं रुजानाः पिपिष इन्द्रशत्रुः ॥ ६ ॥

अयोद्धाऽइव । दुःऽमदः । आ । हि । जुह्वे । महाऽवीरम् । तुविऽबाधम् । ऋजीषम् ।
न । अतारीत् । अस्य । सम्ऽऋतिम् । वधानाम् । सम् । रुजानाः पिपिषे । इन्द्रऽशत्रुः ॥ ६ ॥

अपादहस्तो अपृतन्यदिन्द्रमास्य वज्रमधि सानौ जघान ।
वृष्णो वध्रिः प्रतिमानं बुभूषन्पुरुत्रा वृत्रो अशयद्व्यस्तः ॥ ७ ॥

अपात् । अहस्तः । अपृतन्यत् । इन्द्रम् । आ । अस्य । वज्रम् । अधि । सानौ । जघान ।
वृष्णः । वध्रिः । प्रतिऽमानम् । बुभूषन् । पुरुऽत्रा । वृत्रः । अशयत् । विऽअस्तः ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

६. [स वृत्रः] अयोद्धेव दुर्मदः (=निःशत्रुरिव सगर्वः) महावीरं तुविबाधं (=बहूनां हन्तारम्) ऋजीषम् (=अनिवार्यम्) [इन्द्रम्] आजुह्वे हि (=युद्धार्थमाह्वयद्धि) । अस्य (=इन्द्रस्य) वधानाम् (=अभिघातानां) समृतिं (=संगमं) [पुनः] नातारीत् (=न सोढवान्) [अपि तु] इन्द्रशत्रुः (=आत्मानम् इन्द्रशत्रुं मन्यमानः) [स] रुजानाः (=नदीः ?) संपिपिषे (=संपिष्टवान् इन्द्रस्य अभिघातात् नदीनामुपरि पतितः) ॥

७. अपात् (=छिन्नपादः) अहस्तः (=छिन्नहस्तः) [स] इन्द्रमपृतन्यत् (=अयुध्यत्) । अस्य (=तस्य) अधि सानौ (=स्कन्धोपरि=स्कन्धे) इन्द्रो वज्रं जघान । वृष्णः (=वीर्यवतः पुरुषस्य) प्रतिमानं (=सादृश्यं) बुभूषन् वध्रिः (=छिन्नमुष्कः=नपुंसकः) [इव इन्द्रस्य प्रतिमानं बुभूषन्] वृत्रो व्यस्तः (=विविधं क्षिप्तः) [सन्] पुरुत्रा (=बहुषु स्थलेषु) अशयत् (=शिश्ये=भूमौ निश्चेष्टः पतितोऽस्ति) ॥

६. कारण कीं [ जसा एकादा मनुष्य ] निःशत्रु असल्यामुळें [मदांध होतो ] तसा मदांध [ झालेला ] [ अहि ] महावीर [ आणि ] बहु[शत्रु]घातक [ आणि ] अनिवार्य इंद्रास युद्धाला बोलाविता झाला. [ परंतु ] [ तो ] इंद्राचा शत्रु इंद्राच्या घावांचा मार सहन करूं शकला नाहीं [ आणि ] [ इंद्रानें खालीं ] पाडलेल्या [ नद्यां]वर पडून आपटला.

६. For proud as [though he was] peerless he challenged the mighty hero [Indra] the killer of many [and] the impetuous. [But] he did not survive the encounter of his blows : the enemy of Indra was dashed against the rivers [below].

७. [ मग तो ] पादहीन [आणि] हस्तहीन [ झाला तरी ] इंद्राशीं लढला, [ तेव्हां ] इंद्र त्याच्या मानेवर वज्रप्रहार करिता झाला. वीर्यवंताची बरोबरी नपुंसक करूं इच्छितो तशी [ इंद्राची बरोबरी करण्याची इच्छा केल्यामुळें ] वृत्र अनेक ठिकाणीं फेकला जाऊन जमीनदोस्त झाला.

7. Footless [and] armless he [still] fought Indra. On his neck [Indra] struck the thunderbolt. Desirous of rivalling [the manly Indra], [though] [himself] unmanly, Vritra, thrown in different directions lay [low on the ground].

---

६. 'इंद्रापेक्षां अहि फार कमी बळवान असतां अहीनें इंद्रास लढाईस उभा राहा असें हटकलें; तेव्हां युद्धास आरंभ झाला आणि इंद्रानें अहीवर म्हणजे वृत्रावर घाव मारिले, परंतु ते अहीस सहन करतां आले नाहींत, आणि तो खालीं पडला आणि इंद्रानें जीं उदकें खालीं पाडलीं होतीं व नदीरूपानें समुद्राकडे वाहविलीं होतीं त्यांवर तो आपटला,' असा भावार्थ आहे.

'इंद्राचा शत्रु'='इन्द्रशत्रुः.' स्वरावरून पाहतां 'इन्द्रशत्रुः' हा येथें बहुव्रीहि आहे आणि याचा अर्थ 'इंद्र आहे शत्रु ज्याचा' असा होतो, तथापि पर्यवसानीं 'इंद्राचा शत्रु' असाच होतो.

'पाडलेल्या [नद्यां]वर'='रुजानाः.' नद्यांवर हा अर्थ येथें आम्हीं सायणाचार्यांस अनुसरून केला आहे. शब्द कठिण आहे यांत संशय नाहीं.

७. या मंत्रांत पूर्वोक्त मंत्राच्याच

नदं न भिन्नममुया शयानं मनो रुहाणा अति यन्त्यापः ।
याश्चिद्वृत्रो महिना पर्यतिष्ठत्तासामहिः पत्सुतःशीर्बभूव
॥ ८ ॥

नदम् । न । भिन्नम् । अमुया । शयानम् । मनः । रुहाणाः । अति । यन्ति । आपः ।
याः । चित् । वृत्रः । महिना । परिऽअतिष्ठत् । तासाम् । अहिः । पत्सुतःऽशीः । बभूव ॥ ८ ॥

### भाषायाम्.

८. भिन्नं (=छिन्नं) नदं (=वृषणम्=उक्षाणम्) इव (=हतश्छिन्नहस्तपादो-दिर्बलीवर्दः शेते पतति तद्वत्) अमुया (=अनेन प्रकारेण) शयानं (=पतितं) [वृत्रम्] आपो (=जलानि) अतियन्ति (=अतिक्रम्य गच्छन्ति) । [अपि च] या [अपः] अहिर्वृत्रो महिना (=महिम्ना=स्वबलेन) पर्यतिष्ठत् (=जीवन् सन् पर्यवेष्टयत्) तासां चित् (=तासामेव) [स] पत्सुतःशीः (=पादस्याधःशयानो) बभूव ॥

अर्थाचें स्फुटीकरण आहे. बाकी विशेष सांगण्याजोगें कांहीं नाहीं. इतकें मात्र ध्यानांत ठेवण्याजोगें दिसतें कीं या लढाईचें वर्णन दोन मानव लढतील आणि त्या लढाईचें कोणी वर्णन करील तसेंच केलेलें आहे. आलीकडील (म्हणजे पुराणादिक) ग्रंथांत इंद्रादिकांचें युद्ध तर राहूं द्या, पण यःकश्चित् माणसांचें युद्ध सांगावयाचें असलें तरी, वायव्यास्त्र टाकिलें तेव्हां सर्व बाणवर्षण नाहींसें झालें, मग ब्रह्मास्त्र, मग सर्पास्त्र, मग गारुडास्त्र, मग अमुक अस्त्र, मग तमुक अस्त्र टाकिलें, अशा विलक्षण विस्मयकारक कथा असतात तशा या स्वतः इंद्रवृत्रांच्या युद्धांत नाहींत. यावरून प्राचीन आर्यलोकांचा साधेपणा आणि त्यांच्या कल्पनेचा निर्मळपणा किती आहे तो दिसून येईल. खोटे अलंकार घालून भलतीच शोभा विकत आणण्यापेक्षां साहजिक आणि स्वाभाविक शोभा चांगली दिसते म्हणून सांगावयास पाहिजे असें नाहीं.

८. याप्रमाणें कापलेल्या बैला-सारिखा पडलेला [ जो वृत्र ] त्याजवरून मनो[रथ ] पूर्ण झालेलीं उदकें वाहूं लागलीं, [ आणि ] ज्या [ उदकां]स [ तो ] वृत्र अहि [ आपल्या ] बळानें आसमंतात् वेष्टून राहिला होता त्यांच्याच पायांजवळ [ तो ] पडून राहिला.

8. Over him thus lying low like a slaughtered bull, the Waters went, satisfied as to their wishes. Serpent Vritra was laid low at the feet of those very [Waters] which he had hemmed in with his might.

८. या मंत्राचा अर्थ स्पष्टच आहे. 'इंद्रानें मारण्याच्या पूर्वी वृत्र उदकांस वेष्टून त्यांस अवरोध करून राहिला होता, तेव्हां उदकें फार त्रासून गेलीं होतीं आणि या बंधनांतून आपली केव्हां सुटका होईल असें म्हणत होतीं. इंद्रानें त्यास मारतांच तो मारून हातपाय कापून जमिनीवर पाडलेल्या एकाद्या बैलाप्रमाणें जमिनीवर पडला. तेव्हां तींच उदकें पूर्णमनोरथ होऊन त्याच्या आंगावरून म्हणजे डोकीवर पाय देऊन वाहून गेलीं, आणि तो त्यांच्या पायांखालीं पडून राहिला,' असा भावार्थ आहे.

या ऋचेंत एकच शब्द कठिण आहे, तो 'नद.' हा शब्द वेदांत फार येत नसतो. साधारण संस्कृतांत याचा अर्थ मोठी नदी ( सिंधूसारिखी ) असा होतो. तोच अर्थ सायणाचार्य येथेंहि घेतात. आणि 'नदं न भिन्नं' याचा अर्थ 'बहुत ठिकाणीं ज्याचे तट पाण्यानें फुटले आहेत असा नदीसारिखा' असा करितात. परंतु तो अर्थ येथें नीट बसत नाहीं. आणि जेथें जेथें 'नद' शब्द वेदांत आढळतो ( ऋग्वेदांत साहा ठिकाणीं आला आहे ) ते सर्व मंत्र पाहतां 'वृषा' ( =सेचनसमर्थ बैल, म्हणजे खशी न केलेला बैल= पोळ अथवा कामी पुरुष ) असा अर्थ दिसतो. जसाः—"नदं वः ओदतीनां नदं यो युवतीनां पतिं वः अघ्न्यानां धेनूनाम् इषुध्यसि" ऋ. ८. ६९. २. यांत 'नद' म्हणजे पति या शब्दासारिखाच अर्थ करणें योग्य आहे. तथापि 'नद' शब्द या स्थळीं संदिग्धार्थ आहे यांत संशय नाहीं.

सायणाचार्यांप्रमाणें अर्थ केल्यास 'ज्याचे कांठ पावसाचें पाणी पुष्कळ आल्यामुळें पाण्यानें भरून जातात अशा नदावरून जशा नद्या कांठांवरून वाहत असतात तशीं पृथ्वीवर पडून राहिलेल्या वृत्रावरून मनोरथ पूर्ण झालेलीं उदकें वाहून गेलीं' असें भाषांतर करावें.

नीचावया अभवद्वृत्रपुत्रेन्द्रो अस्या अव वधर्जभार ।
उत्तरा सूरधरः पुत्र आसीद्दानुः शये सहवत्सा न धेनुः ॥ ९ ॥

नीचाऽवयाः । अभवत् । वृत्रऽपुत्रा । इन्द्रः । अस्याः । अव । वधः । जभार ।
उत्ऽतरा । सूः । अधरः । पुत्रः । आसीत् । दानुः । शये । सहऽवत्सा । न । धेनुः ॥ ९ ॥

अतिष्ठन्तीनामनिवेशनानां काष्ठानां मध्ये निहितं शरीरम् ।
वृत्रस्य निण्यं वि चरन्त्यापो दीर्घं तम आशयदिन्द्रशत्रुः ॥ १० ॥ ३७ ॥

अतिष्ठन्तीनाम् । अनिऽवेशनानाम् । काष्ठानाम् । मध्ये । निऽहितम् । शरीरम् ।
वृत्रस्य । निण्यम् । वि । चरन्ति । आपः । दीर्घम् । तमः । आ । अशयत् । इन्द्रऽशत्रुः ॥ १० ॥ ३७ ॥

---

## भाषायाम्.

९. वृत्रपुत्रा (=वृत्रः पुत्रो यस्याः सा=वृत्रमाता ) [ वृत्रं रक्षितुं ] नीचावयाः (=न्यगानीतम् आकाशात् अध आनीतं वयः भुजावयवरूपा शक्तिः यया सा तथा) बभूव । तस्याः (=तस्या उपरि ) इन्द्रो वधः (=वज्रम्) अवजभार (=प्रहृतवान् ) । [ तदानीं ] सूः (=माता ) उत्तरा (=पुत्रस्योपरि ) पुत्रश्[च] अधरः (=मातुरधः ) आसीत् (=बभूव ) । [ सा ] दानुः (=राक्षसी ) सहवत्सा धेनुरिव शेते (=मृत्वा पतिता ) ॥

१०. [ अस्य ] शरीरम् अतिष्ठन्तीनां (=सततमेव प्रवहन्तीनाम् ) अनिवेशनानाम् (=अनुपविशन्तीनां=सततं गच्छन्तीनां ) काष्ठानाम् (=उदकमार्गाणाम्=उदकप्रवाहाणां ) मध्ये निहितं (=स्थितम् ) [ अस्ति ] । [ अस्य ] वृत्रस्य निण्यम् (=अन्तर्हितं स्थानम् ) आपो विचरन्ति (=बन्धनमुक्ताः सत्यः स्वबन्धनस्य गोपनस्य च स्थानमतिक्रम्य गच्छन्ति ) । [ स ] इन्द्रशत्रुः दीर्घं तमः (=प्रकाशरहितानन्तकालपर्यन्तम् ) आशयत् (=अशेत=मृतः पतितः ) ॥

९. [ मग ] वृत्राची आई [ वृत्राला वांचविण्याकरितां ] [ आपल्या सर्व ] शक्तीनिशीं [ वृत्रा ]वर पडली. इंद्र [ आपलें ] वज्र तिजवर मारिता झाला. [ तेव्हां ] वर आई [ आणि ] पुत्र खालीं झाला, [ आणि ] वासरासहित गाय जशी [ पडते ] तशी राक्षसी मरून पडली.

९. Vritra's mother intervened with [all her] power. Indra struck [his] thunderbolt upon her. The mother lay on [the son], the son underneath [the mother]. The demoness lay dead like a cow with her calf.

१०. न थांबणारे [ आणि ] न बसणारे [ जे ] [ उदकांचे ] प्रवाह त्यांमध्यें वृत्राचें शरीर पडलें. उदकें वृत्राच्या गुप्त स्थानांतून मोकळीं [ होऊन ] वाहूं लागलीं. [ आणि ] [ तो ] इंद्राचा शत्रु अखंड अंधकारांत पडून राहिला.

10. In the midst of the [river]-courses, unceasing [and] restless, his body was laid. The Waters flowed free from Vritra's place of concealment. Indra's enemy lay [dead] through endless darkness.

---

९. 'वृत्र पडल्यावर त्याला वांचविण्याकरितां त्याच्या आईनें मधें पडून त्याच्या आंगावर घालून घेतलें. तेव्हां इंद्रानें तिजवरहि आपलें वज्र मारिलें. तेव्हां ती तेथल्या तेथेंच मेली, आणि गाईचें वासरूं खालीं आणि त्याजवर गाय पडते तशी ही राक्षसी आपल्या मुलावर मरून पडली,' असें तात्पर्य.

या मंत्रांत 'नीचावयाः' हा शब्द किंचित् कठिण आहे त्याचा अर्थ आम्हीं सायणाचार्यप्रमाणें केला आहे. या शब्दाच्या अर्थाविषयीं थोडा संशय तर खराच. पण आहे त्यांत हा अर्थ बरा दिसतो. दुसरे कितीएक विद्वान् 'निःशक्ति' असा अर्थ करून 'वृत्राची आई निर्बळ झाली' असें समजतात. 'वयस्' शब्दाचा अर्थ शक्ति असा होतो, सायणाचार्यांनीं घेतलेला बाहु असा होतो किंवा नाहीं याविषयीं संशय आहे इतकीच अडचण.

१०. तात्पर्यः—'वृत्र मरून पडला आणि त्याजवरून उदकांचे प्रवाह वाहूं लागले तेव्हां तो त्या प्रवाहांच्या मधें सांपडला. त्यानें जीं उदकें गुहेंत वगैरे लपवून ठेविलीं होतीं तीं त्या गुहेंतून निघून मुक्त होऊन त्या गुहेवरून वाहूं

**दासपत्नीरहिंगोपा अतिष्ठन्निरुद्धा आपः पणिनेव गावः ।**
**अपां बिलमपिहितं यदासीद्वृत्रं जघन्वाँ अप तद्ववार ॥ ११ ॥**

दासऽपत्नीः । अहिऽगोपाः । अतिष्ठन् । निऽरुद्धाः । आपः । पणिनाऽइव । गावः ।

अपाम् । बिलम् । अपिऽहितम् । यत् । आसीत् । वृत्रम् । जघन्वान् । अप । तत् । ववार ॥ ११ ॥

## भाषायाम्.

११. दासपत्न्यः (=दासो वृत्रासुरः पतिर्यासां ताः=वृत्रजिताः) अहिगोपाः (=अहिर्वृत्रो गोपा गोप्ता यासां ताः =वृत्रगुप्ता ) आपः, पणिना (=चोरेण अनार्येण ) [ निरुद्धा ] गाव इव, निरुद्धा अतिष्ठन् । [ तदनन्तरम् ] अपां यद् बिलं (=प्रवहणद्वारं ) [ वृत्रेण ] अपिहितं (=पिहितम् ) आसीत्, तद् [ इन्द्रो ] वृत्रं जघ्निवान् (=हतवान्=हत्वा ) अपववार (=अपवृतमकरोत् ) ॥

लागलीं. वृत्र उदकप्रवाहांच्या खालीं मरून पडल्यामुळें तो दीर्घ अंधकारांत म्हणजे अनंतकाळपर्यंत अंधारांत तसाच मरून पडला.'

'गुप्तस्थान'='निण्यम्.'सायणाचार्य या स्थळीं निण्य हें विशेषण समजून 'ज्यांचें नांव सुद्धां कोणास ठाऊक नाहीं असें' ('शरीर') असें भाष्य करितात. यास्कहि निरुक्तांत तसाच (निर्णाम) अर्थ करितात असें दिसतें. परंतु "तव त्ये सोम पवमान निण्ये विश्वे देवास्त्रय एकादशासः" (ऋ. ९. ९२. ४) यांत 'निण्य' याचा अर्थ 'अंतर्हित स्थान' म्हणजे 'गुप्त स्थळ' असा सायणाचार्यच करितात, तो आम्हीं येथें घेतला आहे.

११. [ त्या ] सर्पाकृती [वृत्र]-राक्षसानें [ आपल्या ] स्वाधीन करून घेतलेलीं [ आणि ] लपवून ठेविलेलीं उदकें, चोरानें [ कोंडून ठेविलेल्या ] गाईप्रमाणें, कोंडून राहिलीं होतीं. उदकांचें द्वार जें बंद होतें तें इंद्रानें वृत्राला मारून उघडलें.

11. The Waters, conquered [and] watched over by the Serpent-Demon, had stood confined like cows [confined] by a robber. The gate of the water that had stood closed, Indra threw open after having slain Vritra.

११. पूर्वीं जे मंत्र गेले त्यांत सांगितलेलीच गोष्ट पुनः स्पष्ट करून व रूपांतरानें येथें सांगतो. 'जसा एकादा अनार्य चोर (कोळी, गोंड, महार, भिल इत्यादि आर्यव्यतिरिक्त जातींपैकीं मनुष्य ) गाई चोरून नेऊन गुहेंत कोंडून ठेवितो तशीं वृत्रानें ('अहि'व'दास' हीं वृत्राचींच नांवें होत ) हरण करून आपल्या स्वाधीन करून घेतलेलीं आणि लपवून ठेविलेलीं उदकें त्याच्या गुहेंत कोंडून राहिलीं होतीं. आणि त्या गुहेचें द्वार वृत्रानें झांकून ठेविलें होतें. तें इंद्रानें वृत्रास मारल्यावर उघडें केलें, तेव्हां उदकें बाहेर वाहिलीं' असा भावार्थ.

'चोरानें' ='पणिना.' सायणाचार्य 'पणिनामक राक्षसानें' असा अर्थ करितात.

या ऋचेंत 'दासपत्नी' हा जो शब्द आहे त्यावरून आमच्या 'पत्नी' शब्दाची व्युत्पत्ति स्पष्ट होते. पत्नी=पतिनी=पति आहे जिला ती=लग्न झालेली स्त्री, सधवा.

अश्व्यो वारो अभवस्तदिन्द्र सृके यत्त्वा प्रत्यहन्देव एकः ।
अजयो गा अजयः शूर सोममवासृजः सर्तवे सप्त सिन्धून्
॥१२॥

अश्व्यः । वारः । अभवः । तत् । इन्द्र । सृके । यत् । त्वा । प्रतिऽअहन् ।
देवः । एकः ।

अजयः । गाः । अजयः । शूर । सोमम् । अव । असृजः । सर्तवे । सप्त ।
सिन्धून् ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

१२. हे इन्द्र यद् (=यदा) एको देवः (=असहायो दीप्यमानो) [वृत्रः] त्वां सृके (=वज्रे) प्रत्यहन् (=प्रतिप्रहृतवान्) तदा [त्वम्] अश्व्यः (=अश्वसंबन्धी) वारो (=वालः) अभवः [तव शत्रुश्च मक्षिकावद्भवत्] । [तदा] [त्वं] गा अजयः (=वृत्रेण अपहृता मेघोदकात्मिका गाः प्रतिजितवान्), [अपि च] हे शूर, [त्वं] सोममजयः, [अपि च] सर्तवे (=सर्तुं=प्रवाहरूपेण गन्तुं) सप्त सिन्धून् (=गङ्गायमुनादिनदीः?) अवासृजः (=आवर्जितवान्=वृत्रकृतं प्रवाहनिरोधं निराकृतवानसि) ॥

१२. हे इंद्रा, जेव्हां तुझ्या वज्रावर [त्या] एकट्या देदीप्यमान [शत्रू]नें उलटून मारिलें तेव्हां [तूं] अश्वपुच्छ झालास. [तेव्हां] [तूं] गाई जिंकिता झालास, [तेव्हां] हे शूरा, [तूं] सोम जिंकिता झालास [आणि] सप्त सिंधूंनीं वाहावें म्हणून त्यांस खालीं सोडून देता झालास.

12. [Thou] didst become, Indra, [as] the tail of a horse [and thy enemy became as a fly] when [he] [thy] unaided heavenly [enemy] struck thee in return on [thy] thunderbolt. [Then] didst thou conquer [back] the cows, [and] brave one, [didst conquer] the Soma, and didst pour down the seven streams that they might flow.

१२. 'इंद्राच्या वज्रावर मारण्यासाठीं जेव्हां वृत्रानें उलट प्रहार केला तेव्हां इंद्र जणुं काय अश्वपुच्छ झाला आणि वृत्राचा प्रहार आणि वृत्र ह्या माशा झाल्या. वृत्र तरी सामान्य नव्हता; तो एकटा होता तरी देदीप्यमान शक्ति ज्यास आहे असा शत्रु होता त्यामुळें त्यानें इंद्रावर प्रतिप्रहार केला. परंतु तशाचाहि इंद्रानें नाश करून त्याणें हरण केलेल्या उदकरूपी गाई पुन: जिंकून घेतल्या, सोम जिंकून घेतला, आणि सप्तनद्या जेणेंकरून वाहूं लागल्या असे उदकप्रवाह आकाशांतून खालीं पाडले,' असें या मंत्राचें तात्पर्य आहे.

या स्थळीं वृत्राला 'देव' असें म्हटलें आहे, त्याचा अर्थ सायणाचार्यांस अनुसरून आम्हीं 'देदीप्यमान' असा केला आहे. तथापि 'देव' ह्या शब्देंकरून बहुतकरून 'सुर' असा अर्थ घ्यावयाचा असतो, असें असतां तें नांव वृत्राला दिलें आहे हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. या मंत्रांत जो 'देव' शब्दाचा प्रयोग केला आहे त्यावरून बऱ्या देवांसहि देव आणि वृत्रादि वाईट देवांसहि देव म्हणण्याची चाल वैदिक युगांत होती असें दिसतें.

'सोम जिंकिता झालास.' 'सोम' हा 'पर्जन्या'पासून उत्पन्न होतो म्हणून पर्जन्य त्याचा बाप असें ( ऋ. ९. ८२. ३ ) "पर्जन्य: पिता महिषस्य पर्णिनो" यांत सांगितलें आहे, आणि वृत्रास मारून पर्जन्याचें उदक भूमीवर पडे असें इंद्रानें केलें म्हणून इंद्र 'सोम जिंकिता झाला' असें या मंत्रांत म्हटलें आहे असें दिसतें.

'सप्त सिंधू.' 'सिंधु' म्हणजे नदी. या ठिकाणीं 'सप्त सिंधु' म्हणजे सात नद्या कोणत्या हें निश्चयानें सांगवेल असें वाटत नाहीं. सायणाचार्य "इमं मे गङ्गे यमुने" इत्यादि ( ऋ. १०. ७५. ५ ) मंत्रांत दिलेल्या गङ्गा, यमुना, सरस्वती, शुतुद्री, परूष्णी, असिक्नी आणि वितस्ता या सात नद्या समजतात, पण सिंधुनदांत मिळणाऱ्या ज्या पंजाबांतील नद्या त्या सात नद्या बहुधा असतील असा संभव आहे.

नास्मै विद्युन्न तन्यतुः सिषेध न यां मिहमकिरद्ध्रादुनिं च ।
इन्द्रश्च यद्युयुधाते अहिश्चोतापरीभ्यो मघवा वि जिग्ये
॥ १३ ॥

न । अस्मै । विऽद्युत् । न । तन्यतुः । सिसेध । न । याम् । मिहम् ।
अकिरत् । ह्रादुनिम् । च ।
इन्द्रः । च । यत् । युयुधाते इति । अहिः । च । उत । अपरीभ्यः ।
मघऽवा । वि । जिग्ये ॥ १३ ॥

## भाषायाम्.

१३. अस्मै (=इन्द्राय=इन्द्रनाशार्थं ) विद्युद् (=वृत्रेण कृतो विद्युत्प्रहारः ) न सिषेध (=सिद्धिं न प्राप ), न तन्यतुः (=गर्जनम् ) [ अपि ] [ सिषेध ], यां मिहं (=वृष्टिं ) [ यां ] च ह्रादुनिम् (=अशनिम् ) [ इन्द्रमभि ] अकिरत् (=विक्षिप्तवान् ) [ सापि ] न [ सिषेध ] । इन्द्रश्च अहिश्च [ इत्युभौ ] यद् (=यस्मिन्काले ) युयुधाते [तदा] उत (=अपि च ) अपरीभ्यः (=तस्मादनन्तरं सर्वकालेपि) मघवैव विजिग्ये (=विजयी बभूव ) [ न तु वृत्रः ] ॥

१३. वीज [ आणि ] गर्जना [ वृत्रानें ] याजवर [टाकिल्या पण] त्यांपासून कांहीं झालें नाहीं. त्याणें जी वृष्टि आणि अशनिपात केला त्यांपासूनहि कांहीं झालें नाहीं. जेव्हां इंद्र आणि अहि [ वृत्र ] हे दोघे लढले, त्यावेळीं आणि त्यानंतरहि सर्वकाळपर्यंत इंद्रच जयी झाला.

13. Neither [the] lightning nor the thunder [of Vritra] availed against him (Indra), nor the shower nor the thunderbolt which [Vritra] threw. Both when Indra and the Serpent fought and ever afterwards Indra alone was victorious.

---

१३. 'इंद्राच्या आंगावर वृत्रानें वीज सोडली, त्याला भिवविण्याकरितां गर्जना केली, त्याच्या आंगावर वृष्टि केली आणि आपलें वज्रहि त्याच्या आंगावर मारिलें, पण त्यापासून इंद्रानें कांहींच झालें नाहीं; आणि युद्ध झालें तेव्हां इंद्रास जय मिळाला आणि युद्ध संपून गेल्यावर तरी मागाहूनहि सर्वकाळ इंद्रच जयी होऊन राहिला' असा भावार्थ.

'याजवर'='अस्मै.' म्हणजे 'इंद्रावर.' 'अस्मै' हें येथें आम्हीं इंद्रास लावितों तें सायणाचार्यांस अनुसरून लावितों. आम्हांस वाटतें कीं, या चतुर्थीचा या ठिकाणीं प्रयोग थोडासा चमत्कारिक आहे तरी ती इंद्रास जी सायणांनीं लाविली ती बरोबर आहे.

या मंत्रावरून असें दिसतें कीं, विद्युदाविर्भाव करणें, गर्जना करणें, वृष्टि करणें, वज्रप्रहार करणें हीं जशीं इंद्राचीं युद्धसाधनें होत, तशींच इंद्राचा शत्रु जो वृत्र त्याचींहि तींच आहेत. मात्र इंद्राची शक्ति वृत्रापेक्षां फार मोठी आहे.

'त्यापासून कांहीं झालें नाहीं'='न सिषेध.' अक्षरशः अर्थ 'सिद्धीस गेली नाहीं', 'फलद्रूप झाली नाहीं.' "यस्मादृते न सिध्यति यज्ञो विपश्चितश्चन" ( ऋ. १. १८. ७, पूर्वीं पृष्ठें १४१, १४२ पाहा ) यांत आणि "कुतः पुरुषकारैश्च सोपि दैवेन सिध्यति" या सुभाषितांत जो सिध् धातूचा अर्थ आहे तोच प्रस्तुत मंत्रांत आहे.

'त्यानंतरहि सर्वकाळपर्यंत'='अपरीभ्यः.' 'अपरी' हा स्त्रीलिंगी बहुवचनी शब्द फारकरून सप्तम्यन्त येतो त्याचा अर्थ 'भविष्यकाळीं,' 'पुढें,' असा होतो. ( ऋ. १. ११३. ११; १०. ११७. ३ हे मंत्र पाहा.) सायणाचार्य "[वृत्राच्या दुसऱ्या [माया]पासून इंद्र जय पावला' असें भाष्य करितात.

अहेर्यातारं कमपश्य इन्द्र हृदि यत्ते जघ्नुषो भीरगच्छत् ।
नव च यन्नवतिं च स्रवन्तीः श्येनो न भीतो अतरो रजांसि
॥ १४ ॥

अहेः । यातारम् । कम् । अपश्यः । इन्द्र । हृदि । यत् । ते । जघ्नुषः ।
भीः । अगच्छत् ।
नव । च । यत् । नवतिम् । च । स्रवन्तीः । श्येनः । न । भीतः ।
अतरः । रजांसि ॥ १४ ॥

इन्द्रो यातोऽवसितस्य राजा शमस्य च शृङ्गिणो वज्रबाहुः ।
सेदु राजा क्षयति चर्षणीनामरान्न नेमिः परि ता बभूव
॥ १५ ॥ ३८ ॥ २ ॥

इन्द्रः । यातः । अवऽसितस्य । राजा । शमस्य । च । शृङ्गिणः ।
वज्रऽबाहुः ।
सः । इत् । ऊम् इति । राजा । क्षयति । चर्षणीनाम् । अरान् ।
न । नेमिः । परि । ता । बभूव ॥ १५ ॥ ३८ ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

१४. हे इन्द्र, यद् (=यदा) [अहिं] जघ्नुषः (=हतवतस्) ते (=तव) हृदि भीः (=भयम्) अगच्छत् (=प्राविशत्), यत् [च] [त्वं], श्येन इव भीतः [सन्], नव च नवतिं च स्रवन्तीः (=नदीः) रजांसि [च] (अन्तरिक्षप्रदेशांश्च) अतरः (=तीर्णवानसि), [तत्=तदा] [त्वम्] अहेः (=वृत्रस्य=वृत्रहितार्थं) कं यातारं (=निर्यातयितारम्) अपश्यः ? [कमपि न] ॥

१५. वज्रबाहुरिन्द्रो यातः (=जङ्गमस्य), अवसितस्य (=स्थावरस्य), शमस्य च (=शान्तस्य=अश्वगर्दभादेश्च), शृङ्गिणः (=शृङ्गोपेतस्य) [प्राणिनश्च] राजा [बभूव]। स इत् उ (=अपि च स एव) चर्षणीनां (=मनुष्याणां) राजा [भूत्वा] क्षयति (=प्रभवति)। [स] ता (=तानि) [एतानि सर्वाणि], अरान् नेमिरिव, परिबभूव (=सर्वतः परिवेष्टयन् रक्षति) ॥

---

१४. हे इंद्रा, [वृत्राला] मारिल्यावर तुझ्या हृदयांत जें भय शिरलें तो वृत्र[मरणा]चा सूड उगविणारा [तूं] कोण पाहिलास? कीं, जो [तूं] भिऊन, ससाण्यासारिखा, नव्याण्णव नद्या [आणि] सकल अंतरिक्षप्रदेश ओलांडून गेलास?

१५. [मग] वज्रबाहु इंद्र जंगमाचा, स्थावराचा, शांत [प्राण्यां]चा आणि शिंगें असलेल्या [प्राण्यां]चा राजा [झाला]. आणि तोच मनुष्यांवर राजा [होऊन] राज्य चालवूं लागला. अरांस [वेष्टून असणाऱ्या नेमी]प्रमाणें तोच ह्या [सर्वांस] वेष्टून रक्षण करितो.

14. What pursuer [in behalf] of the Serpent didst [thou] see, Indra, that after thou hadst killed [him] fear entered thy breast [and] that frightened thou fledst like a falcon over the nine and ninety streams [and] the aerial regions?

15. Indra the bearer of the thunderbolt on his shoulder [then] [became] king of the moveable, of the immoveable, and of the harmless [and] of the horned [creatures]. And he alone reigns [as] king over men. [He] surrounds [all] these with protection even as [does] the felly [surround] the spokes.

---

१४. 'वृत्राला मारिल्यावर इंद्र भिऊन गेला आणि श्येनपक्ष्याप्रमाणें घाबरून नव्याण्णव नद्या आणि आकाशप्रदेश यांच्या पार पळून गेला. तर इतका ज्यापेक्षां इंद्र भ्याला त्यापेक्षां वृत्राचा सूड उगविणारा कोणी तरी आपला पाठलाग करील असें इंद्राला वाटलें. तर असा कोण पाठलाग करणारा दृष्टीस पडला?' असें इंद्राला या मंत्रांत ऋषि विचारीत आहे.

'वृत्र[मरणा]चा सूड उगविणारा'= 'अहेर्यातारम्.' अक्षरशः अर्थ 'अहीचा मारणारा,' 'अहीचा हल्लेकरी.' 'अहेः' ही षष्ठी चतुर्थ्यर्थ आहे असें समजून आम्हीं भाषांतर केलें आहे. सायणाचार्य ही षष्ठी कर्मणि समजून 'अहीस मारणारा' असा अर्थ करून तदनुरोधानें बाकी मंत्राचें भाष्य करितात.

'नव्याण्णव नद्या' ह्या कोणत्या? वृत्रास मारिल्यानंतर ज्या अनेक नद्या वाहूं लागल्या त्यांच्या पार इंद्र पळून गेला असें समजावें कीं काय? याविषयीं सायणाचार्य कांहीं सांगत नाहींत. 'नव्याण्णव' या शब्दापासून अमुक नद्या विवक्षित मानिल्या तर त्या कोणत्या तें समजत नाहीं; अपरिमितार्थी म्हणजे अमुक विशेष नद्या असें न मानिलें तर अपरिमितार्थी नव्याण्णव ही संख्या थोडीशी चमत्कारिक दिसते यांत संशय नाहीं. 'रजांसि' (=अंतरिक्ष प्रदेश)

## सूक्तम् ३३.

आङ्गिरसो हिरण्यस्तूप ऋषिः। इन्द्रो देवता। त्रिष्टुप् छन्दः॥

**एतायामोप गव्यन्त इन्द्रमस्माकं सु प्रमतिं वावृधाति।**
**अनामृणः कुविदादस्य रायो गवां केतं परमावर्जते नः॥ १॥**

आ। इत। अयाम। उप। गव्यन्तः। इन्द्रम्। अस्माकम्। सु। प्रऽमतिम्। ववृधाति।
अनामृणः। कुवित्। आत्। अस्य। रायः। गवाम्। केतम्। परम्। आऽवर्जते। नः॥ १॥

### भाषायाम्.

१. [हे जनाः] एत (=आगच्छत), गव्यन्तो (=गा आत्मन इच्छन्तो) [वयम्] इन्द्रम् उपायाम (=प्राप्नुयाम)। सः अस्माकम् (=अस्मद्विषयां) प्रमतिम् (=स्वस्य अनुग्रहबुद्धिं) सु (=सुष्ठु=अतीव) वावृधाति (=वर्धयेत्)। आत् (=तर्हि) अनामृणः (=अहिंसको=हितकर्ता) [सः] नो गवाम् अस्य रायः (=गोसंबन्धिसंपदः=गोरूपसंपद्विषयम् अस्माकम् इमं) केतं (=संकेतं=संकल्पं=कामम्) आवर्जते (=प्रापयेत्=साधयेत्) कुवित् (=किं) [नवा]? [प्रापयेदेव]॥

ह्याच्या पलीकडेहि गेला असें सांगितलें त्यापेक्षां, ह्या ज्या नद्या सांगितल्या त्या आकाशांतील उदकरूपी अथवा मेघोदकधारारूपी नद्याच संभवतात असें दिसतें.

श्येन अथवा ससाणा हा मोठा वेगवान् पक्षी आहे याविषयीं पुढच्या सूक्ताचा दुसरा मंत्र पाहा.

१५. ह्या मंत्रांत सूक्ताचा उपसंहार आहे. 'वर सांगितल्याप्रमाणें वृत्राचा नाश करून इंद्र सकलांचा एकटा राजा होऊन बसला आणि गाडीचे पुट्टे आणि धांव जशी अऱ्यांस वेष्टून रक्षिते तसा तो ह्या सकल प्राण्यांस संरक्षितो,' असा अभिप्राय.

'राज्य चालवूं लागलास'='क्षयति.' 'क्षि' ह्या धातूचे दोन अर्थ होतात, एक 'वास करणें' आणि दुसरा 'कशाचा तरी राजा किंवा प्रभु असणें, कशावर तरी मालकी अथवा राज्य चालविणें.' सायणाचार्य येथें पहिला अर्थ घेतात, आम्हीं दुसरा घेतला आहे त्याला सायणोक्तीचाच आधार आहे. "त्वम् अस्य क्षयसि यत् ह विश्वम्" (ऋ. ४. ५. ११) याजवरील आणि "क्षयन्तो रायः यवसस्य भूरेः" (ऋ. ७. ९३.२) याजवरील त्यांचेंच भाष्य पाहा.

## सूक्त ३३.

**ऋषि**—अंगिरस कुळांतील हिरण्यस्तूप या नांवाचा एक मनुष्य (पूर्वीच्या सूक्ताचा जो कर्ता तोच). **देवता**—इंद्र. **वृत्त**—त्रिष्टुप्.

१. [जन हो] या, गुरें मिळावीं अशी आम्हांस इच्छा आहे त्यापेक्षां आम्ही इंद्राजवळ जाऊं. तो आम्हांवर मोठा अनुग्रह करील. तर कल्याणकारक इंद्र ह्या गोसंपत्तीविषयीं आमची मोठी मनकामना पूर्ण करील कीं [नाहीं]?

## HYMN 33.

To *Indra*. By the author of the preceding hymn. Metre—*Trishtup*.

1. Come, let us, desirous of cows, approach Indra. He may greatly increase his benevolence towards us. Will then the benign [Indra] [or will he not] grant our great desire of this wealth of cows?

---

१. येथून पहिल्या अष्टकाच्या तिसऱ्या अध्यायास आरंभ होतो. सायणाचार्यांनीं आपल्या भाष्यांत सर्वानुक्रमणिकेंतून जो उतारा घेतला आहे त्यावरून आणि "गोसवविवधौ पशुकामः" ('गोसव म्हणजे गोमेध अथवा ज्यांत गोमांसहवि अर्पण करावयाचें तो यज्ञ आणि विवध म्हणून जो एकप्रकारचा याग हे दोनी याग ज्याला गुरें मिळावीं अशी इच्छा असेल त्याणें करावे' ९. ८. १२) या आश्वलायनश्रौतसूत्रावरून असें समजतें कीं, हें तेहतीसावें सूक्त "गोसवविवध" म्हणून जे याग करीत त्यांत म्हणत असत. परंतु हें रचणाऱ्यानें तशा प्रसंगीं म्हणावें म्हणून रचलेलें नाहीं. मागाहून त्याचा विनियोग तसा झाला हें लक्ष्यांत ठेवून याचा अर्थ करावा.

आम्हीं या पहिल्या मंत्राचा भावार्थ असा समजतों कीं, 'आम्हांस गुरें ढोरें हीच जी संपत्ति तिची इच्छा आहे, त्यापेक्षां हे मित्र हो, या आपण जाऊं आणि इंद्राकडेस ती मागून घेऊं. इंद्र असा आहे कीं, आम्हांविषयीं त्याची जी अनुग्रहबुद्धि म्हणजे आमचें बरें करण्याची बुद्धि (प्रमति) ती तो पाहिजे तितकी वाढवूं शकेल, म्हणजे आम्हीं पाहिजे तें मागितलें तरी तो देईल. तर मग दुसरी संपत्ति आम्हांस नको, गाई पुष्कळ मिळाव्या ही जी आमची मोठी मनकामना ती तो कल्याणकारी इंद्र पूर्ण करणार नाहीं काय?' आमच्या समजुतीप्रमाणें हें स्तोत्र ऋषि आपल्या मित्रांस किंवा आसपास असलेल्या माणसांस म्हणतो आहे.

या ऋचेंत 'कुवित्' हें पद किंचित् कठिण आहे. 'कुवित्' हें केवळ प्रश्नदर्शक अव्यय आहे, याचा दुसरा कांहीं अर्थ होत नाहीं. या प्रश्नदर्शक अव्ययाबरोबर एक नकाराची अपेक्षा या मंत्राच्या अर्थास आहे. परंतु मराठींत जसें

उपेदहं धनदामप्रतीतं जुष्टां न श्येनो वसतिं पतामि ।
इन्द्रं नमस्यन्नुपमेभिरर्कैर्यः स्तोतृभ्यो हव्यो अस्ति यामन् ॥ २ ॥

उप । इत् । अहम् । धनऽदाम् । अप्रतिऽइतम् । जुष्टाम् । न । श्येनः । वसतिम् । पतामि ।
इन्द्रम् । नमस्यन् । उपऽमेभिः । अर्कैः । यः । स्तोतृऽभ्यः । हव्यः । अस्ति । यामन् ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. अहं धनदां (=धनस्य दातारम्) अप्रतीतम् (=अप्रतिगतं=केनापि अप्रतिहतम्) [इन्द्रम्] इत् (=इन्द्रमेव), श्येनः (=एतन्नामको वेगवान्पक्षी) वसतिं (=नीडम्) इव, उपपतामि (=अत्यादरेण धावामि), उपमैः (=उत्तमैः) अर्कैः (=स्तोत्रैः) इन्द्रं नमस्यन् [तम् उपपतामि] । य [इन्द्रः] स्तोतृभिर्यामनि (=युद्धे) हव्यः (=आह्वानयोग्यः) अस्ति ॥

आपण 'तो आपणास रुपये देईल कां' म्हणजे 'तो आपणास रुपये देईलच' असें म्हणून 'कां' या प्रश्नदर्शक अव्ययाचा प्रयोग करितों तसा 'कुवित्' याचा येथें प्रयोग असेल. सायणाचार्यहि तसाच घेतात असें दिसतें.

'मनकामना'='केतम्.' "मम देवासः अनु केतम् आयन" (ऋ. ४. २६. २.) याजवर सायणाचार्य सुद्धा 'केतम्' म्हणजे 'संकल्प' असा अर्थ करितात, तो पाहा. शिवाय, "तं ते देवासः अनु केतम् आयन्" (ऋ. १०. ६. ७.) यांतहि तोच अर्थ इष्ट दिसतो.

२. ससाणा [ आपल्या ] प्रिय घरट्याकडेस [ धांव घेतो ] तसा मी धन देणाऱ्या [ आणि ] अखंडितशौर्यवान् [ इंद्रा ]कडेसच धांव घेतों,—[ मी ] उत्तम स्तोत्रांनीं इंद्राला नमन करीत करीत [ त्याजकडेसच ] [ धांव घेतों ]; ज्या [ इंद्रा]चा धांवा स्तोत्यांनीं युद्धांत करण्यास योग्य आहे.

2. To Indra alone [who is] giver of wealth, [and who is] irresistible I fly as [does] the falcon to [his] beloved home,—fly to Indra, adoring him with excellent hymns: for he deserves to be invoked in battle by [his] worshippers.

२. मंत्रकर्त्याचा भावार्थः— 'इंद्र धन देणारा म्हणजे लढाईत लूट मिळवून देणारा, आणि अखंडितशौर्यवान् म्हणजे त्याच्या समोर कोणी लढण्यास येण्याविषयीं शक्तिमान् नाहीं असा आहे, म्हणून व आम्हांसारिखे जे स्तोते अथवा कवि त्यांनीं लढाईत त्यास हाक मारण्यास योग्य आहे, म्हणजे कांहीं जड भारी पडलें तर पाठबळासाठीं त्याचा धांवा करण्यास योग्य होय. यास्तव ससाणा जसा मोठ्या वेगानें आपल्या नेहमी राहण्याच्या घरट्याजवळ मोठ्या प्रीतीनें धांव घेतो तसा मी उत्तम उत्तम स्तोत्रें म्हणून इंद्राजवळ धांव घेत आहें'.

'प्रिय'='जुष्टम्'. 'जुष्ट' म्हणजे अक्षरशः 'सेवित.' त्यावरून, जें सेवित असतें तें प्रिय म्हणजे त्याजवर प्रीति बसलेली असते, यास्तव 'प्रीत', 'प्रिय' असा अर्थ होतो. ऋ. १. ४४. ४. यांत सायणांनींच 'प्रीत' असा अर्थ केला आहे तो पाहा. प्रयोगान्तरें पुष्कळ आहेत.

'ससाणा....[ धांव घेतो ] तसा.' श्येन म्हणजे ससाणा पक्षी हा फार चपळ असल्याविषयीं पूर्वील सूक्ताचा १४ वा मंत्र यांत उपमा दिली आहे ती पाहा.

लढाईत जय मिळवून देणारा आणि अप्रतिम शूर इंद्र आहे म्हणून मी त्याची प्रार्थना करितों असें हिरण्यस्तूप ऋषि म्हणतो हें ध्यानांत ठेवावें. युद्धांत शौर्य दाखविणें आणि जय मिळविणें या गोष्टीला आमचे पूर्वज प्राचीन आर्यजन ब्राह्मण होते तरी किती चाहते होते तें पाहा.

नि सर्वसेन इषुधीँरसक्त समर्यो गा अजति यस्य वष्टि ।
चोष्कूयमाण इन्द्र भूरि वामं मा पणिर्भूरस्मदधि प्रवृद्ध
॥ ३ ॥

नि । सर्वऽसेनः । इषुऽधीन् । असक्त । सम् । अर्यः । गाः । अजति । यस्य । वष्टि ।
चोष्कूयमाणः । इन्द्र । भूरि । वामम् । मा । पणिः । भूः । अस्मत् । अधि । प्रऽवृद्ध ॥ ३ ॥

वधीर्हि दस्युं धनिनं घनेनँ एकश्चरन्नुपशाकेभिरिन्द्र ।
धनोरधि विषुणक्ते व्यायन्नयज्वानः सनकाः प्रेतिमीयुः
॥ ४ ॥

वधीः । हि । दस्युम् । धनिनम् । घनेन । एकः । चरन् । उपऽशाकेभिः । इन्द्र ।
धनोः । अधि । विषुणक् । ते । वि । आयन् । अयज्वानः । सनकाः । प्रऽइतिम् । ईयुः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

3. [इन्द्रः] सर्वसेनः (=सकलसेनाया एकोधिपतिर्) [भूत्वा] इषुधीन् न्यषक्त (=निषञ्जयति=निषक्तेषुधिः संग्रामाय सिद्धो भवति)। अर्यः (=पालयिता) [इन्द्रः] यम् [उपासकं] वष्टि (=कामयते) [तं प्रति] [तस्य शत्रोः] गाः समजति (=समानयति)।—हे प्रवृद्ध (=प्रकृष्ट) इन्द्र, [जनेभ्यो] भूरि (=प्रभूतं) वामं (=धनं) चोष्कूयमाणः (=प्रयच्छन्) [त्वम्] अस्मद् अधि (=अस्मासु=अस्माकं विषये) पणिः (=व्यवहारी=दानविमुखो) मा भूः ॥

४. हे इन्द्र, [त्वं] हि उपशाकैः (=शक्तिमद्भिस्तव सहायैः=मरुद्भिः) [सह] चरन् [अपि] धनिनं (=बहुधनोपेतं) दस्युं (=वृत्रम्=असुरं) घनेन (=वज्रेण) एकः [अ]वधीः (=हतवानसि)। [अनन्तरं] ते (=प्रसिद्धाः) अयज्वानो (=यज्वविरोधिनः=देवयजनमकुर्वन्तः) सनकाः (=एतन्नामका वृत्रस्य अनुचराः) विषुणक् (=सर्वतः) [तव] धनोरधि (=धनुष उपरि) व्यायन् (=आगच्छन्) [आगत्य च] प्रेतिं (=मरणम्) ईयुः (=प्रापुः)॥

३. [इंद्र] सकल सैन्याचा [एकटा] नायक [होऊन तो] [आपल्या] [पाठी]वर बाणभाता चढवून सिद्ध होत असतो. जो [उपासक] त्याला आवडतो [त्याजवळ] [तो] प्रीतीनें [शत्रूच्या] गाई हाकून आणितो.—हे महान् इंद्रा, [तूं] विपुलसंपत्तीचा दाता आहेस यास्तव आम्हांविषयीं [च] कृपण होऊं नकोस.

3. Leader of the whole army [Indra] ties the quivers [to his shoulder], [and] full of kindness he drives to whomsoever he loves the cows [of the enemy].—O Indra, [being] the giver of plentiful wealth, do not, great [Indra], be a miser in respect of us.

४. कारण कीं, हे इंद्रा, [तूं] [आपल्या] शक्तिमान साहाय्यकर्त्यां [मरुतां]सह चाल करून जाऊन धनसंपन्न वृत्राला वज्रानें एकटा[च] मारिता झालास. [मग] ते वृत्राचे] सनक[नांवाचे] यज्ञहीन [अनुचर] चहूंकडून [तुझ्या] धनुष्यावर येऊन पडले [आणि] मरण पावले.

4. For, Indra, [though] going forth with [thy] powerful allies (the Maruts) thou didst alone slay the rich demon with [thy] thunderbolt. Those unsacrificing Sanakas [then] fell upon [thy] bow from all sides [and] met with [their] death.

---

३. या मंत्राचेंहि तात्पर्य युद्धसंबंधीच आहे. तें असें कीं, "हे इंद्रा, ज्या उपासकावर तुझी प्रीति असते त्याच्या सर्व सेनेचा तूं एकला नायक होतोस आणि बाणभाते पाठीला बांधून त्या उपासकाच्या पक्षानें युद्धास सिद्ध होत असतोस, आणि त्याच्या शत्रूच्या गाई हाकून आणून त्याला देतोस. आणि हे महान् इंद्रा, तूं लोकांस पुष्कळ धन देतोस, यास्तव आम्हांसहि दे. आम्हांविषयींच कृपण होऊं नकोस.'

'विपुल संपत्तीचा दाता आहेस यास्तव'='चोष्कूयमाणः भूरि वामं.' परंतु 'चोष्कूयमाणः' हें रूप 'स्कू' धातूपासून आहे. "इन्द्र चोष्कूयसे वसु" (ऋ. ८. ६.४१), आणि "चोष्कूयते विशः इन्द्रः मनुष्यान्" (ऋ. ६. ४७. १६) या मंत्रांवरून पाहतां 'विपुल संपत्तीचा धनी आहेस' असा अर्थ चांगला संभवतो. पण आम्ही सायणास अनुसरलों आहों.

४. या मंत्राचें भाषांतर आम्हीं

**परा॑ चि॒च्छीर्षा॑ ववृ॒जुस्त इ॑न्द्रायज्वानो॒ यज्व॑भिः॒ स्पर्ध॑मानाः ।**
**प्र यद्दि॒वो ह॑रिवः स्थातरुग्र॒ निर॑व्र॒ताँ अ॑धमो॒ रोद॑स्योः**
**॥ ५ ॥ १ ॥**

परा॑ । चि॒त् । शी॒र्षा । व॒वृ॒जुः । ते । इ॒न्द्र॒ । अय॑ज्वानः । यज्व॑ऽभिः । स्पर्ध॑मानाः ।
प्र । यत् । दि॒वः । ह॒रि॒ऽवः॒ । स्था॒तः॒ । उ॒ग्र॒ । निः । अ॒व्र॒तान् । अ॒ध॒मः॒ । रोद॑स्योः ॥ ५ ॥ १ ॥

## भाषायाम्.

५. हे हरिवः (=हरिवन्=हरिनामाश्वयुक्त), हे स्थातः (=स्थाणो), हे उग्र (=शूर), यद् (=यदा) त्वम् अव्रतान् (=व्रतरहितान् धर्मरहितान्) [तान् वृत्रानुचरान्] दिवः (=अन्तरिक्षात्) रोदस्योः (=द्यावापृथिव्योः) [सकाशात्] [च] निष्प्राधमः (=धमनं कृत्वा निःशेषेण अस्तवानसि), [तदा] हे इन्द्र, यज्वभिः (=यागानुष्ठातृभिः [सह] स्पर्धमानाः (=द्वेषं कुर्वाणास्) ते अयज्वानः (=यागरहिता) [वृत्रानुचराः] शीर्षाणि परैव ववृजुः (=स्वमूर्ध्नः पराङ्मुखानेव कृत्वा जग्मुः) ॥

सायणाचार्यांप्रमाणें केलें आहे. अर्थ स्पष्ट आणि सुबोध आहे, पण 'वृत्राला...., मारिता झालास' याबद्दल मळांत 'द-स्यूला....मारिता झालास' असें आहे. 'दस्यु,' शब्दाचा 'वृत्र' हा अर्थ सायणांनीं केला आहे. वस्तुतः 'दस्यु' म्हणजे अमुक एक विशेष असुर (जसा 'वृत्र') असा न होता, सामान्य कोणताहि असुर असा होतो. "त्वं शतानि अव शम्बरस्य पुरः जघन्थ अप्रतीनि दस्योः" (ऋ. ६. ३१. ४) यांत 'शम्बर' या नांवाच्या असुराला दस्यु असें नांव दिलें आहे. "नि शुष्णे इन्द्र धर्णसिं वज्रं जघन्थ दस्यवि" (ऋ. ८. ६. १४) यांत 'शुष्ण' नांवाच्या असुराला 'दस्यु' म्हटलें आहे. "स्वप्नेन आभ उप्य चुमुरिं धुनिं च जघन्थ" (ऋ. २. १५. ९) यांत 'चुमुरि' आणि 'धुनि' या दोन असुरांस 'दस्यु' असें म्हटलें आहे. त्यावरून 'दस्यु' हें विशेषनाम नव्हे, असुर या अर्थी अपरपर्याय आहे. हा 'दस्यु' शब्दाचा एक अर्थ. दुसरा अर्थ 'अनार्य.' म्हणजे आर्य लोकांच्या आसपास जे कोळी, गोंड, भिल इत्यादि देवांस यज्ञादिकें-करून न भजणारे लोक त्यांस 'दस्यु' असें म्हणत. त्यांचा देवांवर भरंवसा नसे म्हणून त्यांस 'अश्रद्ध' असें म्हटलेलें आढळतें, ("नि अक्रतून् ग्रथिनः मृध्रवाचः पणीन् अश्रद्धान् अवृधान् अयज्ञान्। प्र प्र तान् दस्यून् अग्निः विवाय" ऋ. ७. ६. ३). त्यांस 'अव्रत' म्हणजे देवांची सेवा न करणारे असें म्हटलेलें आढळतें ("तूर्वन्तः दस्युम् आयवः व्रतैः सीक्षन्तः अव्रतम्" ऋ. ६. १४. ३). आमचे पूर्वज आर्य लोक आणि हे 'दस्यु' यांजमध्यें धर्माच्या व कर्माच्या संबंधानें वगैरे विरोध

५. हे हर्यश्वा, हे स्थाणू, हे महाबलवान् इंद्रा, [ तूं ] जेव्हां [ त्या ] धर्महीन [ वृत्रानुचरां]ला आकाश, स्वर्ग [आणि] पृथ्वी यांतून फुंकून बाहेर काढून टाकिलेंस, तेव्हां भक्तांचा द्वेष करणारे ते अभक्त तोंडें फिरवून नाहींसेच झाले.

5. Away went, with their faces turned back, the infidels who strove with the believers, when, O possessor of the bay horses, O firm [and] mighty Indra, [thou] blewest the unbelievers away from the sky, from heaven [and] earth.

दाखविलेला वेदांत आढळतो. ( ऋ. १. ११७. २१ पाहा ). "अहं शुष्णस्य श्नथिता वधो यमं न यः ररे आर्यं नाम दस्यवे" ( ऋ. १०. ४९. ३ ) यांत इंद्र म्हणतो कीं, 'दस्यूला मीं आर्य हें नांव दिलें नाहीं'. "स जातूभर्मा श्रद्दधान: ओज: पुर: विभिन्दन् अचरत् वि दासी: । विद्वान् वज्रिन् दस्यवे हेतिमस्य आर्यं सह: वर्धय द्युम्नम् इन्द्र" ऋ. १. १०३. ३ यांत 'प्रजांचें पालन करणारा तो [ इंद्र ] आपल्या प्रतापावर अवलंबून राहून दस्यूंचीं नगरें फोडून टाकिता झाला आणि त्याजवरून चालला.—हे वज्रधरा, [ मर्मस्थळ ] जाणणारा असा तूं दस्यूच्या अंगावर हत्यार टाक, [ आणि ] हे इंद्रा, आर्य लोकांचें बळ व यश हीं वाढीव,' असा विरोध दाखविला आहे. दस्यूंस जिंकून आर्य लोकांच्या अमलाखालीं आणण्याविषयीं देवांनीं साहाय्य करावें म्हणून देवांची प्रार्थना आमच्या आर्य पूर्वजांनीं केलेली आढळते. ( ऋ. १. ५३. ४; २. ४१. २; ५. ७. १० हे मंत्र पाहा ). हा जो दस्यूचा दुसरा अर्थ त्यापासून आलीकडचा 'चोर' हा अर्थ निघाला आहे. कारण कीं कोळी, भिल, गोंड वगैरे अनार्य जातीचे लोक आतां जसे चोरीचा धंदा करितात तसेच पूर्वीं करीत होते.

आमचा जो 'दास' म्हणजे गुलाम या अर्थाचा शब्द आहे तो दस्युशब्दाचाच संबंधी आहे. हे जे अनार्य लोक होते त्यास आर्य लोकांनीं जिंकून आपले गुलाम ( म्हणजे शूद्र ) केले त्यापासून 'दास' म्हणजे गुलाम असा अर्थ होऊं लागला. 'दास' म्हणजे प्रथम गुलाम असा अर्थ होत नसे, दस्यु अथवा दस्यूचें असा होई याविषयीं प्रमाण वर उतरून घेतलेल्या ( १. १०३. ३ ) मंत्रावरून स्पष्ट दिसून येतें. हे दस्यु जेव्हां आर्य लोकांच्या अमलाखालीं येऊन त्यांचे गुलाम झाले त्यापासून 'दास' म्हणजे गुलाम असा अर्थ होऊं लागला.

प्रस्तुत मंत्रांत 'दस्यु' म्हणजे वृत्रासुर असा अर्थ सायणांनीं केला आहे त्यास विशेष अडचण दिसत नाहीं.

'एकटा[ च ] मारिता झालास.' सायणाचार्य म्हणतात इंद्राचे साहाय्यकारी मरुत् त्याजबरोबर वृत्राला मारण्याच्या वेळीं गेले तरी ते जाऊन उभे मात्र राहिले, आणि एकट्या इंद्रानेंच वृत्रवध केला.

'सनक[नावाचे] .... [अनुचर]' हाहि अर्थ सायणांस अनुसरूनच केला आहे. पण 'सनक' म्हणजे 'जुने,' 'पुराण' असा शब्दश: अर्थ होतो.

**अयुयुत्सन्ननवद्यस्य सेनामयातयन्त क्षितयो नवग्वाः ।**
**वृषायुधो न वध्रयो निरष्टाः प्रवद्भिरिन्द्राच्चितयन्त आयन् ॥ ६ ॥**

अयुयुत्सन् । अनवद्यस्य । सेनाम् । अयातयन्त । क्षितयः । नवऽग्वाः । वृषऽयुधः । न । वध्रयः । निःऽअष्टाः । प्रवत्ऽभिः । इन्द्रात् । चितयन्तः । आयन् ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. ते [अयज्वानः] अनवद्यस्य (=दोषरहितस्य=पवित्रस्य) [इन्द्रस्य] सेनाम् अयुयुत्सन् (=योद्धुमैच्छन्) । नवग्वाः क्षितयः (=नवग्वनामानः अङ्गिरः-प्रभृतयः केचिन्नव जनाः) [इन्द्रम्] अयातयन्त (=इन्द्रो युद्धाय यथा यतेत तथा अकुर्वन्=प्रोत्साहितवन्तः) । [अनन्तरं], वृषयुधः (=वृषेण सेचनसमर्थेन पुंस्त्वयुक्तेन पुरुषेण सह, युद्धं कुर्वन्तो) वध्रयो (=नपुंसकाः) इव, ते निरष्टाः (=निरस्ताः=निराकृताः) [सन्तः] चितयन्तः (=आत्मानं ज्ञापयन्तः=स्वशक्तिहीनत्वं दर्शयन्तः) प्रवद्भिः (=पलायितुं सुशकैर्मार्गैः) इन्द्राद् आयन् (=परेयुः) ॥

५. इंद्रानें वृत्राचे अनुचर स्वर्ग, आकाश आणि पृथ्वी यांतून कसे हाकून काविले तें या मंत्रांत सांगितलें आहे.

'हर्यश्व' म्हणजे 'हरी' या नावाचे दोन पिंगट घोडे आहेत ज्याला तो. हें इंद्राचें विशेषण अनेक ठिकाणीं येत असतें त्यामुळें तें त्याच्या नावापैकींच एक नाव बनून गेलें आहे.

'स्थाणु.' म्हणजे लढाईंत खांबासारिखा स्थिर, अचल. हेंहि इंद्राचेंच विशेषण आहे.

'आकाश, स्वर्ग [आणि] पृथ्वी यांतून'='दिवः रोदस्योः.' दिवः ही पंचमी आहेच. पण 'रोदस्योः' षष्ठी किंवा सप्तमी संभवते पंचमी-नाहीं, आणि पंचमी तर इष्ट आहे. सायणाचार्य 'सकाशात्' इतकें अध्याहृत घेऊन पंचमीचा अर्थ आणितात. निर्वाहासाठीं आम्हीं तेंच घेऊन भाषांतर केलें आहे.

'तोंडें फिरवून नाहींसेच झाले'='पराचित् शीर्षा ववृजुः'. अक्षरशः अर्थ, 'डोकीं भागेंच फिरविते झाले.' म्हणजे 'तोंडें काळीं करून पळून गेले' असें म्हटल्यास चालेल.

वृत्राला मारण्याला कांहीं तरी श्रम पडले, पण वृत्राचे जे अनुचर म्हणजे त्याचे अनुयायी त्यांस नाहींसे करण्यास इंद्राला कांहींच श्रम पडले नाहींत, एक फुंक मारतांच ते स्वर्ग, आकाश आणि पृथ्वी यांतून कापसाप्रमाणें उडून जाऊन नाहींसारिखेच झाले असें तात्पर्य.

६. [त्या धर्महीन वृत्रानुचरांला] पवित्र [इंद्रा]च्या सेनेशीं युद्ध करण्याची इच्छा झाली. [त्याबरोबर] नवग्व जनांनीं [इंद्राला युद्धाविषयीं] प्रोत्साहन केलें. [मग] पुरुषत्वयुक्त मनुष्याशीं लढणारे नपुंसक जसे [पराभव पावतात] तसे [ते] [अनुचर] पराभव पावून [आपलें] वलहीनत्व दाखवीत दाखवीत इंद्रापासून दूर पळून गेले.

6. They (the unbelievers) desired to fight with the army of holy Indra. The Navagva people urged [Indra to give them fight]. Like eunuchs fighting with a hero they (the unbelievers) were dispersed, [and] exposing their backs away they went from Indra.

या मंत्राचा अर्थ आम्हीं सायणाचार्यांप्रमाणेंच केला आहे. आणि तो खरा आहे याविषयीं आम्हांस संशय नाहीं. तथापि 'अधम:' ('फुंकून टाकिता झालास') याच्याशीं 'यत्' (='जेव्हां') या संबंधी सर्वनामशब्दाचा संयोग आहे त्यापेक्षां हें क्रियापद सर्वानुदात्त नसावें, अधम: (संहितेंत निरंवतीं अधमो रोदस्योः) असें असावें, परंतु तसें कां नाहीं तें समजत नाहीं. सायणाचार्य याविषयीं कांहींच सांगत नाहींत. तेव्हां मूळचा खरा पाठ "प्र तद्दिवो‥ निरंवतीं अधमो रोदस्योः" असा अथवा "प्र यद्दिवो‥‥निरंवतीं अधमो रोदस्योः" असा असावा काय? पूर्वींचा असेल तर भाषांतर खालीं लिहिल्याप्रमाणें करावें लागेल:—'हे इंद्रा, भक्ताचा द्वेष करणारे ते अभक्त तोंडें फिरविते झाले. तेव्हां हे हर्यश्वा, हे स्थाणू, हे महाबळवान् [इंद्रा], [तूं] [त्या] धर्महीन [वृत्रानुचरां]ला आकाश, स्वर्ग आणि पृथ्वी यांतून फुंकून बाहेर काढून टाकिलेंस.' आणि हा अर्थ चांगला दिसतो, कारण कीं, तोंड फिरवितांच तूं त्यांस फुंकून टाकिलेंस असें म्हणणें हें नीट जुळतें.

६. वृत्राचे धर्महीन अनुयायी इंद्रानें एका फुंकेशीं त्रिभुवनांतून नाहींसे केले असें वर सांगितलें. ते कसे तें या मंत्रांत सांगतो.

'नवग्व जनांनीं.' नवग्व हे कोण? आणि त्यांस नवग्व संज्ञा कां पडली? सायणाचार्य म्हणतात कीं, "अंगिरस नांवाचे म्हणजे आंगिरसकुलोत्पन्न ऋषि पुष्कळ दिवस चालणारा असा यज्ञ आरंभून बसले होते त्यांतून नवजणांला नव महिन्यांनीं इष्टलाभ झाला म्हणून जे जे अंगिरस कुळांतील नव ऋषि त्यांस नवग्व म्हणतात." नांव पडण्याचें कारण कांहीं तरी असो, पण नवग्व म्हणून कोणी नवजण व्यक्तिविशेष अथवा समुदायविशेष होते यांत

त्वमेतान्रुदतो जक्षतश्चायोधयो रजस इन्द्र पारे ।
अवादहो दिव आ दस्युमुच्चा प्र सुन्वतः स्तुवतः शंसमावः ॥ ७ ॥

त्वम् । एतान् । रुदतः । जक्षतः । च । अयोधयः । रजसः । इन्द्र । पारे ।
अव । अदहः । दिवः । आ । दस्युम् । उच्चा । प्र । सुन्वतः । स्तुवतः । शंसम् । आवः ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. हे इन्द्र, त्वम् एतान् रुदतः जक्षतश्च (=हसतश्च) [धर्मरहितान्] रजसः पारे अयोधयः (=तैः सह युद्धं कृत्वा तान् रजसः अन्तरिक्षस्य परतीरे निरस्तवानसि) । त्वं दस्युं (=वृत्रं) दिव आ (=द्युलोकात्) अवादहः (=दग्ध्वा अवास्तवानसि), सुन्वतः (=त्वदर्थं सोममभिषुण्वतः) स्तुवतः (=तव स्तुतिं कुर्वतः) [उपासकस्य] शंसं (=स्तोत्रं=भक्तिम्) उच्चा (=उच्चैः) [दिवि] प्रावः (=रक्षितवानसि), (=उपासकं रक्षित्वा तं दिवि उच्चैः स्थापितवानसि) ॥

संशय नाहीं. आणि अंगिरस् ऋषि त्यापैकीं असे हेंहि निर्विवाद दिसतें. नवग्व म्हणून ऋषींचीं नव कुळें असतील; आणि अंगिरस हे त्यापैकीं असतील. हीं नवग्व कुळें म्हणजे ऋग्वेदांत जें यांविषयीं आढळतें त्यावरून तीं अतिप्राचीन आर्य लोकांचीं नव कुळें असावीं असें दिसतें. कारण कीं, इंद्राला प्रथम यज्ञ केले ते नवग्वांनीं केले, प्रथम स्तोत्रें रचिलीं तीं नवग्वांनीं रचिलीं इत्यादि त्याविषयीं सांगितलें आहे. ऋ. ५. ४६. ११. पाहा. नवग्वांस त्यावरूनच वेदमंत्रकर्ते आपले पितर म्हणजे वाडवडील अथवा पूर्वज असें म्हणतात; "तमु नः पूर्वे पितरो नवग्वाः" इ० ऋ. ६. २२. २. दुसरे कितीएक जे पूर्वज पुराणकाळचे प्रसिद्ध आहेत त्यांजबरोबर या नवग्वांविषयीं उल्लेख येतो: "अङ्गिरसो नः पितरो नवग्वा अथर्वाणो भृगवः सोम्यासः" इ० ऋ. १०. १४. ६. शिवाय ऋ. १०. ६२. ६ हाहि मंत्र पाहा.

'पुरुषत्वयुक्त मनुष्याशीं लढणारे नपुंसक जसे'='वृषयुधो न वध्रयः.' शक्तीविषयीं प्रबळाचा आणि दुर्बळाचा विरोध दाखवावयाचा असला म्हणजे येथें दिलेली उपमा वेदांत पुष्कळ ठिकाणीं येते. यावरून वैदिक युगांत वृषणच्छेद करून नपुंसक केलेले पुरुष पुष्कळ असत आणि त्यांची दुर्बळता प्रसिद्ध असे असें अनुमान निघतें. तसें करण्याचा काय उद्देश होता असेल कोण जाणे !

'बलहीनत्व दाखवीत दाखवीत.. पळून गेले.' म्हणजे; 'पळून गेले आणि त्यामुळें त्यांचें बलहीनत्व दृष्टीस पडलें.'

७. हे इंद्रा, [वृत्राचे] हे [अनुचर] रडत असतांना आणि हांसत असतांना तूं त्यांजबरोबर लढून त्यांस अंतरिक्षाच्या पलीकडेस हाकून देता झालास. [तूं] असुर[वृत्रा]ला जाळून स्वर्गांतून खालीं ढकलून देता झालास, [आणि] [तुला] सोम अर्पण करणारा [आणि] स्तवणारा [जो भक्त] त्याचें स्तोत्र [तूं] राखून उंच ठिकाणीं [स्वर्गांत] ठेविता झालास.

7. Indra, thou didst fight these [infidels] as they cried and laughed off the other end of the firmament. Down didst [thou] burn [and hurl] the demon from heaven—high [in heaven] didst [thou] protect [and place] the prayer of him who pressed the Soma [for thee] [and] sang [thy glories].



७. या मंत्राचें तात्पर्य आम्ही असें समजतों कीं, 'हे इंद्रा, असुराचे जे अनुयायी ते कितीएक रडत होते आणि कितीएक हांसत होते (कां?), त्यांजबरोबर तूं लढून लढून त्यांस अंतरिक्षाच्या बाहेर हाकून देलेंस; आणि असुराला तूं जाळून द्युलोकांतून खालीं पाडून टाकिलेंस, आणि तुझे जे भक्त त्यांची भक्ति विघ्नरहित करून त्यास द्युलोकांत उंच ठिकाणां जागा दिलीस.'

'तूं त्यांजबरोबर लढून त्यास अंतरिक्षाच्या पलीकडेस हाकून देता झालास'='एतान् रजसः पारे अयोधयः.' अक्षरशः अर्थ 'त्यांना अंतरिक्षाच्या पैलतीरीं लढविता झालास.'

या मंत्राचें भाषांतर अर्थ स्पष्ट समजण्यासाठीं आम्हीं किंचित् अक्षर सोडून केलें आहे. याच्या उत्तरार्धांत 'अव' आणि 'उच्च' हे शब्द आहेत ते परस्परविरोधी आहेत त्यामुळें, आणि 'दस्यु' आणि 'सुन्वन् स्तुवन्' याच्यामध्यें विरोध आहे म्हणून, आणि 'अदहः' आणि 'आवः' हे परस्पर विरोधी आहेत म्हणून, असुरास जाळून द्युलोकांतून खालीं टाकून दिला आणि भक्ताला रक्षून द्युलोकांत उंच ठिकाणीं स्थापित केला असा भावार्थ आम्ही समजतों तो बरोबर आहे असें आम्हास वाटतें.

'असुर[वृत्रा]ला जाळून स्वर्गांतून खालीं ढकलून देता झालास'='दस्युं दिव आ अवादहः.' अक्षरशः 'असुराला स्वर्गांतून खालीं जाळिलास.' त्याप्रमाणेंच 'तुला सोम अर्पण करणारा [आणि] स्तवणारा [जो भक्त] त्याचें स्तोत्र [तूं] राखून उंच ठिकाणीं [स्वर्गांत] ठेविता झालास' या ऐवजीं मुळांत जे 'उच्चा प्र सुन्वतः स्तुवतः शंसम् आवः' असे शब्द आहेत त्याचा अक्षरशः अर्थ 'सोम काढणाराचें [आणि] स्तवणाराचें उंच स्तोत्र

**चक्राणासः परीणहं पृथिव्या हिरण्येन मणिना शुम्भमानाः ।**
**न हिन्वानासस्तितिरुस्त इन्द्रं परि स्पशो अदधात्सूर्येण ॥ ८ ॥**

चक्राणासः । परिऽनहम् । पृथिव्याः । हिरण्येन । मणिना । शुम्भमानाः । न । हिन्वानासः । तितिरुः । ते । इन्द्रम् । परि । स्पशः । अदधात् । सूर्येण ॥ ८ ॥

**भाषायाम्.**

८. हिरण्येन (=सुवर्णमयेन) मणिना (=अलंकारेण -अलंकारैः) शुम्भमानाः (=शोभमानास्) ते [ वृत्रस्य स्पशः= प्रेष्याः ] पृथिव्याः परीणहं (=परिधिं= सर्वतो व्याप्तिं) चक्राणाः (=पुनः पुनः परिगच्छन्तः) [ अपि च ] हिन्वानाः (=वेगेन द्रवन्तः) [ अपि ] इन्द्रं न तितिरुः (=न तेरुः=जेतुं न समर्था अभूवन्) । [ इन्द्रः ] [ तान् ] स्पशः सूर्येण (=सूर्यप्रकाशेन) पर्यदधात् (=परिहितवान्) ॥

ठिकाणीं राखिता झालास' असा आहे तथापि भक्ताचें भजन निर्विघ्न करून त्याला स्वर्गी ठेविता झालास असें तात्पर्य स्पष्ट दिसतें.

८. सुवर्णमय अलंकारांनीं शोभायमान [असे] ते [ वृत्राचे ] हेर पृथ्वीच्या परिघासभोंवतालीं फिरतां फिरतां[हि] [ आणि ] आवेशानें धांवत असतां[हि] इंद्राला जिंकावयास समर्थ झाले नाहींत. [मग] [तो] [त्या] हेरांस सूर्य[प्रकाशाच्या योगा]नें आच्छादिता झाला.

8. [Though] [they] the spies [of the Demon], adorned with golden ornaments went round and round the circumference of the earth, [and] ran fast, [they] could not vanquish Indra. He covered[and dazzled] them with [the light of] the sun.

८. 'असुराचे जासूद आंगावर सोन्याचे अलंकार मिरवीत मिरवीत इंद्राच्या हातीं न सांपडावें म्हणून आणि इंद्राला थकवावें म्हणून पृथ्वीच्या सभोंतालीं पुन: पुन: फिरूं लागले आणि मोठ्या त्वरेनें धावूं लागले, पण इंद्रानें त्यांस सोडलें नाहीं आणि इंद्रच जय पावला, ते जय पावले नाहींत. ते दूर पळून गेल्यामुळें दिसेनातसे झाले तेव्हां इंद्रानें सूर्यप्रकाश त्यांच्या आंगावर टाकून त्यांचा नाश केला' असा या मंत्राचा भावार्थ दिसतो.

हे वृत्राचे अनुचर अथवा जासूद म्हणजे कोण? याविषयीं सायणाचार्य कांहींच सांगत नाहींत. चक्रासभोंवतालीं फिरल्याप्रमाणें पृथ्वीसभोंतालीं फिरत होते; त्यापेक्षां अंधकाररूपी राक्षस तर नसतील? कारण सूर्यप्रकाश त्यांच्या आंगावर टाकतांच त्यांचा नाश होतो, तेव्हां ते दुसरे कोण असणार? उदकांचा अवरोध करणारा जो, तो वृत्र असुर; मग त्याचे अनुचर म्हणजे सूर्याचा प्रकाश न होऊं देणारे जे अंधकाररूपी राक्षस ते असतील असें म्हणण्यांत विशेष ओढाताण नाहीं. आणि रात्रीच्या वेळीं यज्ञयागादि धर्मक्रिया होत नसल्यामुळें त्यांस धर्मरहित, भक्तद्वेष्टे, इत्यादि विशेषणेंहि शोभतात. आणि म्हणूनच त्यांस निशाचर असें नांव पडलें आहे असें आम्हांस वाटतें.

'आवेशानें धांवत असतां[ हि ]'= 'हिन्वाना:'. 'या मंत्रांत' 'पृथिव्या: परीणहं चक्राणास:' असे शब्द आहेत या वरून ज्यावेळीं हें सूक्त रचिलें त्यावेळीं पृथ्वीची आकृति सपाट नाहीं, पण वर्तुळ आहे असें ज्ञान आपल्या आर्य पूर्वजांस होतें असें स्पष्ट दिसून येतें. ती मागाहून पिंपळाच्या पानासारिखी कशी आणि केव्हां झाली आणि तिजवर दुधाचा, दह्याचा, मधूचा इत्यादि सप्त सागर कोठून व केव्हां आले असतील याचा शोध लावणें आमच्या आधुनिक आर्यबंधूंस किती अवश्य आहे पाहा.

'सुवर्णमय अलंकारांनीं शोभायमान'. म्हणजे "गळयांत, हातावर वगैरे जे अलंकार घालावयाचे त्यांहीं करून" असें सायणाचार्य म्हणतात. जासुदाच्या हातांत आणि पायांत तोडे असण्याची अजून चाल आहे.

परि यदिन्द्र रोदसी उभे अबुभोजीर्महिना विश्वतः सीम् ।
अमन्यमानाँ अभि मन्यमानैर्निर्ब्रह्मभिरधमो दस्युमिन्द्र ॥ ९ ॥

परि । यत् । इन्द्र । रोदसी इति । उभे इति । अबुभोजीः । महिना । विश्वतः । सीम् ।
अमन्यमानान् । अभि । मन्यमानैः । निः । ब्रह्मऽभिः । अधमः । दस्युम् । इन्द्र ॥ ९ ॥

न ये दिवः पृथिव्या अन्तमापुर्न मायाभिर्धनदां पर्यभूवन् ।
युजं वज्रं वृषभश्चक्र इन्द्रो निर्ज्योतिषा तमसो गा अदुक्षत् ॥ १० ॥ २ ॥

न । ये । दिवः । पृथिव्याः । अन्तम् । आपुः । न । मायाभिः । धनऽदाम् । परिऽअभूवन् ।
युजम् । वज्रम् । वृषभः । चक्रे । इन्द्रः । निः । ज्योतिषा । तमसः । गाः । अधुक्षत् ॥ १० ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

९. हे इन्द्र, यद् (=यदा) [ त्वं ] [ तव ] महिना (=महिम्ना) उभे रोदसी (=द्युलोकभूलोकौ समकाले) विश्वतः सीं (=सर्वत एव) पर्यबुभोजीः (=अभितस्ते आत्मानं भुक्तवानसि=ते परिवेष्टितवानसि) [ तदा ] [ त्वं ] [ त्वां ] मन्यमानैः (=स्तुवद्भिः) ब्रह्मभिः (=स्तोस्तृभिः) [ करणेन ], अमन्यमानान् (=त्वामस्तुवतः) [ वृत्रानुचरान् ] अभि[अधमः ] (=हतवानसि), दस्युम् (=असुरं) [ च ], हे इन्द्र, निरधमः (=धमनेन निःसार्य नाशितवानसि) ॥

१०. ये (=अपि च ते) [ सदस्यवः अमन्यमानाः ] दिवो (=द्युलोकस्य) पृथिव्या [ वा ] अन्तं (=पर्यन्तं=संनिधिं) न आपुः (=न प्राप्ताः), मायाभिः (=निजैर्मायाकर्मभिः) धनदां (=धनस्य दातारम्) [ इन्द्रं ] न पर्यभूवन् (=न पर्यवेष्टयन्) । वृषभो (=वीर्यवान्) इन्द्रो वज्रं युजं (=मित्रं=सहायं=स्वहस्तयुक्तं) चक्रे, ज्योतिषा (=तेजसा) [ च ] तमसः (=अन्धकाराद्) गा निरधुक्षत् (=निर्दुदोह) (=अन्धकाररूपं मेघं भित्त्वा जलं वृष्टवान्) ॥

९. हे इंद्रा, जेव्हां [तूं] [आपल्या] महिम्यानें पृथ्वी [आणि] द्यु [हे] उभय [लोक] सर्वहि बाजूंनीं वेष्टून टाकिता झालास, [तेव्हां] हे इंद्रा, [तुला] भजणाऱ्या स्तोत्यां[च्या योगा]नें, [तुला न भजणाऱ्या [जनां]स [तूं] मारून टाकिता झालास, [आणि] असुरास फुंकून बाहेर टाकिता झालास;

9. When, Indra, [thou] didst surround with [thy] greatness heaven and earth simultaneously on all sides whatsoever, [then] by [means of] [thy] worshipping singers [thou] slewest, Indra, the unworshippers [and] blewest the Demon away.

१०. आणि [त्यानंतर] ते द्युलोकाच्या [अथवा] पृथ्वीच्या जवळ आले नाहींत [आणि] [आपल्या] कपटांनीं धनदात्या इंद्रालाहि वेष्टून राहिले नाहींत. वीर्यवान् इंद्र आपल्या बरोबर वज्र घेता झाला [आणि] प्रकाशानें गाईंस अंधकारांतून [मुक्त करून] [त्यांचें] दोहन करिता झाला.

10. And never did they [again] approach the outskirts of heaven [or] earth, nor surround the wealth-giver (Indra) with [their] schemes. Manly Indra took the thunderbolt [for his] ally [and] with light milked the cows out of darkness.

---

९. मंत्राचें तात्पर्यः—'हे इंद्रा, अभक्त असे जे असुरानुचर त्यांस आणि त्यांचा प्रभु जो असुर त्यास मारून टाकण्याच्या प्रसंगीं तूं सकल भूलोक आणि द्युलोक यांस आपल्या महिम्यानें (मोठेपणानें) सर्व बाजूंनीं वेष्टून टाकिलेंस आणि मग तुझी स्तुतीनें वगैरे भक्ति करणारे जे स्तोते (भक्त) त्यांच्या योगानें म्हणजे त्यांची स्तुति ऐकून तुला स्फुरण आल्यानें त्या अभक्त अनुचरांस तूं फुंकून मारून टाकिलेंस आणि त्यांचा जो प्रभु असुर त्यास फुंकून बाहेर हाकून दिलेंस.'

'[तुला] भजणाऱ्या स्तोत्यां[च्या योगा]नें'='मन्यमानैः ब्रह्मभिः'. या पदाचा अर्थ येथें सायणाचार्य किंचित् निराळा करितात. 'ब्रह्म' म्हणजे 'स्तोता' असें न करितां 'स्तोत्र' असें समजतात. आम्हीं केलेल्या अर्थास अन्यत्र स्थळीं असलेल्या सायणोक्तीचाच आधार

अनु स्वधामक्षरन्नापो अस्यावर्धत मध्य आ नाव्यानाम् ।
सध्रीचीनेन मनसा तमिन्द्र ओजिष्ठेन हन्मनाहन्नभि द्यून् ॥ ११ ।

अनु । स्वधाम् । अक्षरन् । आपः । अस्य । अवर्धत । मध्ये । आ । नाव्यानाम् ।
सध्रीचीनेन । मनसा । तम् । इन्द्रः । ओजिष्ठेन । हन्मना । अहन् । अभि । द्यून् ॥ ११ ॥

## भाषायाम्.

११. [ तदा ] आप: अस्य (=इन्द्रस्य ) अनु स्वधां (=काममनु=मनःकामनामनुसृत्य) अक्षरन् (=अवहन् ) । नाव्यानां (=नावा तरणयोग्यानां=बह्वीनाम्=अगाधानां) [ तासाम् अपां] मध्ये आ (=मध्ये ) [ वृत्रः अमृतः सन् ] अवर्धत (=वृद्धिं प्राप्तः ) । [ तदनन्तरम् ] इन्द्रः सध्रीचीनेन मनसा (=संगतेन मनसा=समस्तेन बुद्धिचातुर्येण ) ओजिष्ठेन (=अतिबलयुक्तेन ) हन्मना (=वज्रेण ) अभि द्यून् (=केषुचिद्दिवसेषु ) तं (=वृत्रम् ) अहन् ॥

आहे. 'मन्यमान' म्हणजे 'स्तवणारा' अथवा 'भजणारा' अशाविषयीं ऋ. ५. ४. १०, ५. ६. १ आणि ५. ९. १ हे मंत्र आणि सायणाचें भाष्य पाहा. 'ब्रह्म' शब्दाविषयीं ऋ. १. १. ५ या मंत्रावर 'प्रार्थना' शब्दावरची टीप पाहा.

'मारून टाकिता झालास'='अभि [ अधमः ]'. यांत 'अधमः' हें क्रियापद नवव्या चरणांतून अपाकर्षण करून घ्यावें. 'अभ्यधमः' याचा अर्थ आम्हीं केल्याप्रमाणें होतो याविषयीं "अभि दस्युं बकुरेण धमन्ता उरु ज्योतिः चक्रथुः आर्याय" ( ऋ. १. ११७. २१ ) या मंत्रावरील सायणभाष्य पाहा.

१०. नवव्या मंत्रांत भक्तिहीन वृत्रानुचरांचा नाश केला असें सांगितलें, त्याविषयीं या मंत्रांत असें सांगतो कीं, ते पुनः पृथ्वी अथवा द्युलोक यांच्या जवळहि आले नाहींत; मग इंद्र निःसपत्न होऊन मेघरूपी अंधकारमंडल प्रकाशानें फोडून गाईस पिळता झाला तेव्हां त्यांचें दूध खालीं पडलें—म्हणजे मेघ फोडून पावसाची वृष्टि करिता झाला, असा या मंत्राचा भावार्थ आहे.

सायणाचार्य या मंत्राचें पूर्वार्ध किंचित् निराळें लावितात. ते 'ये' शब्दाचा संबंध पूर्वमंत्रगत 'अमन्यमान' शब्दाकडे न घेतां 'जलविशेष' असें पद अध्याहृत घेऊन त्याचाशीं घेतात आणि 'धनदा' म्हणजे पृथ्वी असें भाष्य करितात. परंतु दोनी मंत्रांचा संदर्भ पाहिला तर आम्हीं दिलेला अर्थ सयुक्तिक

११. [मग] त्या [इंद्रा]चे इच्छेप्रमाणें उदकें वाहिलीं [आणि] त्यांतून [जरी] नौका जाण्याजोग्या होत्या [तरी] त्यांच्या मध्यें [तो वृत्र] [न मरतां] वृद्धिंगत झाला. [मग] त्याला इंद्र [आपल्या] सगळ्या बुद्धिचातुर्यानें [आणि] अत्यंत प्रबळ वज्रानें कितीएक दिवसांनीं मारिता झाला.

11. According to his (Indra's) wish the waters flowed. [But the Demon] grew [strong] in the midst of them [though so deep as to be] navigable. Indra with his collected wisdom [and] with his most mighty thunderbolt slew him in the course of time.

दिसतो आणि त्याला अडचण कांहीच दिसत नाहीं.

'आपल्या बरोबर वज्र घेता झाला' ='युजं वज्रं चक्रे'. अक्षरशः अर्थ 'वज्राला मित्र करिता झाला', म्हणजे दुसरे कोणी सहाय बरोबर घेतले नाहींत, एक वज्र मात्र बरोबर घेतलें, 'वज्रसख' होऊन उदकरूपी गाईंची मुक्ती करावयास गेला.

या मंत्रांत 'गाई' म्हणजे 'सूर्यकिरण' असाहि अर्थ संभवतो. सूर्यकिरणरूपी गाई अंधकारांत झांकल्या होत्या त्याजवर प्रकाश पाडून इंद्रानें त्या मोकळ्या केल्या, म्हणजे अंधकार नष्ट करून सूर्याचा उद्भव होई असें केलें. कारण कीं, हेंहि रूपक वेदांत पुष्कळ ठिकाणीं आढळतें. म्हणूनच 'गो' शब्दाचा अर्थ संस्कृतांत 'गाई' असा होऊन शिवाय 'उदक' असा जसा होतो, तसाच किरण असाहि होत असतो हें कोश पाठ करणाऱ्यांस ठाऊक असेलच.

तथापि पुढच्या मंत्रावर नजर देऊन आम्हीं सायणसंमतच अर्थ 'गाः' याचा 'उदकरूपी गाई' असा केला आहे.

११. भावार्थः—'वर सांगितल्याप्रमाणें मेघमंडळ फोडून इंद्रानें जेव्हां उदकांची वृष्टि केली तेव्हां तीं उदकें त्याच्या इच्छेप्रमाणें जमिनीवर वाहिलीं. पण तीं उदकें जरी त्यांवरून नावा जाईत इतकीं खोल होतीं तरी वृत्र त्यांत बुडून मेला नाहीं इतकेंच नाहीं, परंतु त्यांच्या मध्यें राहून तो उलटा वृद्धिंगत झाला. तेव्हां इंद्रानें आपलें सर्व चातुर्य खर्चून आपल्या परम प्रबळ वज्रानें किती एक दिवसांत त्याला मारून टाकिलें.'

'त्याचे इच्छेप्रमाणें'—'अस्य स्वधाम् अनु.' अक्षरशः, 'त्याचे इच्छेला अनसरून' असा अर्थ. 'स्वधा' याचा अर्थ सायणाचार्य येथें 'अन्न' असा करितात. आणि नित्य तरी त्याचा तोच अर्थ आहे. केव्हां केव्हां 'बल', 'उदक' असाहि करितात. 'अन्न' हा अर्थ 'स्वधा' शब्दाचा वेदांत पुढें पुढें होतो खरा, पण 'अनु स्वधाम्' म्हणजे बहुत करून 'आपल्या परिपाटीप्रमाणें,' 'आपल्या चालीप्रमाणें,' 'इच्छेप्रमाणें' असा अर्थ होत असतो.

**न्यांविध्यदिलीबिशस्य दृह्ळा वि शृङ्गिणमभिनच्छुष्णमिन्द्रः ।**
**यावत्तरो मघवन्यावदोजो वज्रेण शत्रुमवधीः पृतन्युम् ॥ १२ ॥**

नि । अविध्यत् । इलीबिशस्य । दृह्ळा । वि । शृङ्गिणम् । अभिनत् । शुष्णम् । इन्द्रः ।
यावत् । तरः । मघऽवन् । यावत् । ओजः । वज्रेण । शत्रुम् । अवधीः । पृतन्युम् ॥ १२ ॥

**अभि सिध्मो अजिगादस्य शत्रून्वि तिग्मेन वृषभेणा पुरोऽभेत् ।**
**सं वज्रेणासृजद्वृत्रमिन्द्रः प्र स्वां मतिमतिरच्छाशदानः ॥ १३ ॥**

अभि । सिध्मः । अजिगात् । अस्य । शत्रून् । वि । तिग्मेन । वृषभेण । पुरः । अभेत् ।
सम् । वज्रेण । असृजत् । वृत्रम् । इन्द्रः । प्र । स्वाम् । मतिम् । अतिरत् । शाशदानः ॥ १३ ॥

## भाषायाम्.

१२. [ इन्द्रः ] इलीबिशस्य (=एतन्नामकस्य असुरस्य) दृह्ळा (=दृढा=दृढानि=दुर्गाणि) न्यविध्यत् (=विद्ध्वा निपातितवान्), इन्द्रः शृङ्गिणं शुष्णम् (=एतन्नामकम् असुरं) व्यभिनत् (=विविधं ताडितवान्) । हे मघवन् (=धनयुक्तेन्द्र), [ तव ] यावत् तरो (=यावान्वेगः) [ अस्ति ] यावद् ओजः (=बलम्) [ अस्ति ] [ तावता सर्वेण ] [ त्वं ] पृतन्युं (=योद्धुमिच्छन्तं) शत्रुम् (=इलीबिशं शुष्णं च ) वज्रेण अवधीः (=हतवानसि) ॥

१३. सिध्मो (=जयसाधको) [ वज्रः ] अस्य (=इन्द्रस्य) शत्रून् अभ्यजिगान् (=तान्प्रति गतवान्) । [ इन्द्रः ] तिग्मेन (=तीक्ष्णेन) वृषभेण (=वीर्यवता=प्रबलेन) [ वज्रेण ] [ तेषां ] पुरो (=नगराणि) व्यभेत् (=व्यभैत्सीत्=विविधं भिन्नवान्) । इन्द्रः वृत्रं वज्रेण समसृजत् (=संयोजितवान्), [ अपि च ] शाशदानः (=विजयानन्देन स्पष्टतां गच्छन्=विजयोद्भवम् आनन्दं प्रकटयन्) स्वां मतिं (=स्वं कामं=वृत्रहननेच्छां) प्रातिरत् (=प्रावर्धयन्=अपूरयत्) ॥

'सगळ्या बुद्धिचातुर्यानें'='सध्रीचीनेन मनसा.' अक्षरशः 'संगत बुद्धिचातुर्यानें'; म्हणजे 'सगळें 'बुद्धिचातुर्य वृत्रहननाकडे लावून', 'सगळें शाहाणपण तिकडेसच लावून.' ऋ. ४. २४. ६ "सध्रीचीनेन मनसा अविवेनन् तम् इन् सखायं कृणुते समत्सु" या मंत्रांतहि प्रस्तुत प्रयोगाचे जवळजवळच. अर्थ आहे. आणि सायणाचार्यहि त्याच धोरणानें भाष्य करितात.

१२. [ इंद्र ] इलीबिशाचे दुर्ग फोडून खालीं पाडिता झाला, शिंगें असलेल्या शुष्णास इंद्र तोडून टाकिता झाला. हे मघवन्, [ तुला ] जेवढें अवसान [ होतें ] [ आणि ] जेवढें बळ [ होतें ] [ तितकें सर्व खर्च करून ] [ तूं ] [ त्या ] लढखोर शत्रूला वज्रानें मारिता झालास.

12. [Indra] broke down the fortresses of Ilîbis'a, Indra split asunder the horned S'ushna.—Whatever energy, O Maghavan, whatever might [thou hadst], [thou] slewest [with it] [thy] bellicose enemy by [means of thy] thunderbolt.

१३. साधक वज्र त्या [इंद्रा]-च्या शत्रूं[चे आंगावर] धांवलें. तीक्ष्ण [ आणि ] वीर्यसंपन्न [ वज्राच्या योगा]नें इंद्र [ त्यांचीं ] नगरें विच्छेदून टाकिता झाला. इंद्रानें वृत्राची वज्राशीं गांठ पाडून दिली [ आणि ] जयानंद प्रकट करून आपली मनकामना पूर्ण कारिता झाला.

13. The unerring thunderbolt attacked his enemies. With the shar [and] manly [thunderbolt] he shattered [their] towns. Indra encountered Vritra with the thunderbolt, [and] triumphantly accomplished his own desire.

---

१२. 'इलीबिश' हें विशेषनाम आहे. जसें 'शुष्ण' हें एका असुराचें नांव तसेंच 'इलीबिश.' सायणाचार्य शब्दव्युत्पत्तीच्या योगानें 'जमिनीच्या बिळांत निजणारा' असा अर्थ करून वृत्राचें विशेषण करितात. तसेंच 'शुष्ण' म्हणजे 'जगताला शोषून टाकणारा' असा अर्थ करून हेंहि वृत्राचेंच विशेषण करितात. आणि मंत्राच्या शेवटीं 'शत्रूला' म्हणजेहि 'वृत्राला' असें म्हणतात. आम्हीं 'इलीबिश' आणि 'शुष्ण' हीं विशेषनामें घेऊन 'शत्रूला' म्हणजे 'इलीबिशाला' आणि 'शुष्णाला' असें समजून भाषांतर केलें आहे.

'शिंगें असलेला'—'शृङ्गिणम.' सायणाचार्य म्हणतात कीं, 'गाई, म्हैसी वगैरेंच्या शिंगासारिखीं आयुधें ज्याला होतीं तो.' आमचा अर्थ अक्षरशः आहे.

१३. दहाव्या मंत्रांत सांगितलें आहे कीं, इंद्र केवळ एक वज्र आपल्या बरोबर घेऊन वृत्राला मारण्यास गेला. त्याच्या संबंधानें ऋषि या मंत्रांत म्हणतो कीं, 'तें वज्र इंद्रानें सोडतांच त्याच्या शत्रूंच्या आंगावर गेलें. तीक्ष्ण आणि

**आवः कुत्समिन्द्र यस्मिञ्चाकन्प्रावो युध्यन्तं वृषभं दशद्युम्।**

**शफच्युतो रेणुर्नक्षत द्यामुच्छ्वैत्रेयो नृषाह्याय तस्थौ ॥ १४ ॥**

आवः। कुत्सम्। इन्द्र। यस्मिन्। चाकन्। प्र। आवः। युध्यन्तम्। वृषभम्। दशऽद्युम्।

शफऽच्युतः। रेणुः। नक्षत। द्याम्। उत्। श्वैत्रेयः। नृऽसह्याय। तस्थौ ॥ १४ ॥

## भाषायाम्.

१४. हे इन्द्र, यस्मिन् [कुत्से][त्वम्] [अ]चाकन् (=प्रसन्नोभवः) [तं] कुत्सं [त्वम्] आवः (=रक्षितवानसि)। [त्वं] वृषभं (=वीर्यवन्तं=शूरं) युध्यन्तं (=युद्धं कुर्वन्तं) दशद्युम् (=एतन्नामकं कंचित्पुरुषं) प्रावः (=प्ररक्षितवानसि)। श्वैत्रेयः (=श्वित्राख्यायाः पुत्रो) [यदा] [त्वद्रक्षणयुक्तः सन्] नृसह्याय (=संग्रामाय) उत्तस्थौ (=प्रतस्थौ) [तदा] शफच्युतो रेणुः (=तस्य वाजिनां खुरैरुद्धूत रजः) द्यां नक्षत (=द्याम् अनक्षत=द्युलोकं प्राप्तवान्)॥

प्रबळ जें वज्र तेणेंकरून इंद्र शत्रूंचीं नगरें फोडून विध्वंसिता झाला. इंद्र स्वताहा वृत्राबरोबर न लढता त्याणें वृत्राची आणि वज्राची गांठ घालून दिली, आणि त्याच्या योगानें वृत्राचा नाश करून विजयापासून होणारा आनंद प्रगट करीत करीत आपली [वृत्राला मारण्याविषयींची] मनकामना पूर्ण करिता झाला.'

'साधक'='सिध्मः.' म्हणजे ज्या कार्याला त्याची योजना करावयाची तें सिद्ध करणारें.

'नगरें विच्छेदून टाकिता झाला'='पुरः वि अभेत्'. हीं नगरें म्हणजे काय? वृत्रादि असुर जसे रूपकसिद्ध शत्रु होत तशींच त्यांचीं नगरें हीं रूपकसिद्ध नगरें आहेत. आकाशांत जे वेगवेगळे ढगांचे आकार नगरासारिखे अथवा किल्ल्यासारिखे भासत असतात तींच नगरें इंद्रानें फोडिलीं असें या वृत्रनगररूपकाचें बीज आहे. हीं नगरें इंद्रानें फोडिलीं अथवा विदारलीं म्हणून त्यास 'पुरंदर' (=नगरें फोडणारा) असें नांव पडलें आहे.

'जयानंद प्रगट करून आपली मनकामना पूर्ण करिता झाला'='प्र स्वां मतिम् अतिरत् शाशदानः'. या चतुर्थचरणाचा सायणाचार्य अर्थ करितात तो असाः—"[वृत्राला] मारून आपली मति [म्हणजे] आपली हर्षयुक्त बुद्धि विशेष वाढविता झाला."

या पादांत 'मति', 'प्रातिरत्' हें क्रियापद, आणि 'शाशदानः' हें विशेषण इतके तिन्ही शब्द कांहींसे कठिण आहेत. आम्हीं 'मति' शब्दाचा अर्थ 'मनकामना' असा केला आहे त्यास आधार सायणोक्तिच आहे. (ऋ: २. २४. १ "बृहस्पते. सीषधः सोत नो मतिम्" या-

१४. हे इंद्रा, [ तूं ] कुत्साला रक्षिता झालास; कारण कीं [ तूं ] त्याजवर लोभ करीत होतास. वीर्यवान् दशद्यु युद्ध करीत असतां त्याला [ तूं ] रक्षिता झालास. श्वित्रेचा पुत्र [ तुझ्या साहाय्यानें ] युद्धास निघाला [ तेव्हां ] [ त्याच्या ] घोड्यांच्या खुरांनीं उडविलेली धूळ द्युलोकापर्यंत पोंहचली.

14. [Thou] didst, Indra, protect Kutsa whom [thou] lovedst. [Thou] didst help the brave Das'adyu [when] fighting. The dust raised by [the horses] hoofs reached the heavens [when] [under thy] leadership] the son of S'vitrâ proceeded to the battle.

वरील सायणभाष्य पाहा. शिवाय ऋ. १०. १११. १ हाहि मंत्र पाहा.) 'प्रातिरत्' म्हणजे 'पुरविता झाला', 'पूर्ण करिता झाला' अशाविषयींहि सायणोक्तीचा आधार आहे. (ऋ. ३. ४०. ३. "इन्द्र प्र णो धितावानं यज्ञं विश्वेभिर्देवेभिः। तिरः स्तवान विश्पते" या मंत्रावरील भाष्य पाहा. शिवाय ऋ. ८. १०१. ८ हाहि मंत्र पाहा.) 'शाशदानः' या शब्दाविषयीं आमचा आधार ऋ. १. १२४. ६ या मंत्रावरील आणि ऋ. १. १२३. १० या मंत्रावरील भाष्यांत जें सायणाचार्य त्या शब्दाविषयीं लिहितात तितकाच आहे. या दोन्ही मंत्रांत 'तन्वा शाशदाना' असें उषेचें विशेषण आलें आहे, त्याचा अर्थ यास्कास अनुसरून सायणाचार्य, 'आपल्या शरीराच्या योगानें स्पष्टता पावणारी' असा करितात; म्हणजे आपलें शरीर प्रगटपणें दाखविणारी, शरीरसौंदर्यापासून झालेला आनंद प्रगट करणारी असा अर्थ. 'शद्'= 'शातने' या धातूपासून 'शाशदानः' हें रूप आलें नसावें, 'शद्' 'प्रकटीकरणें' अशा अर्थाचा दुसरा एकादा धातु असावा असें वाटतें. 'विशद'=निर्मळ (म्हणजे प्रगट दिसत असतें तें, हाहि शब्द त्यापासूनच असावा.

१४. 'कुत्स' 'दशद्यु' आणि 'श्वित्रा' हीं विशेषनामें आहेत. 'कुत्स' नांवाच्या मनुष्याला इंद्रानें रक्षिल्याविषयीं वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलें आहे. मंत्राचें तात्पर्य असें कीं, 'कुत्सावर तूं प्रसन्न होतास त्यामुळें त्याचें तूं संरक्षण केलेंस; दशद्यु या नांवाचा रणशूर मनुष्य लढत असतां त्याचें त्वां संरक्षण केलें. श्वित्रेचा पुत्र युद्धाला निघाला तेव्हां तुझी मदत त्याला मिळाली, त्यामुळें त्याचें सैन्य आणि त्या सैन्याचा वेग इतका वाढला कीं, घोड्यांच्या पायांनीं धूळ वर उडाली ती स्वर्गापर्यंत पोंहचली.'

'कारण कीं तूं त्याजवर लोभ करीत होतास'='यस्मिन् चाकन्'. अक्षरशः

**आवः शमं वृषभं तुग्र्यासु क्षेत्रजेषे मघवञ्छ्वित्र्यं गाम्।**
**ज्योक्चिदत्र तस्थिवांसो अक्रञ्छत्रूयतामधरा वेदनाकः**
**॥ १५ ॥ ३ ॥**

आवः। शमम्। वृषभम्। तुग्र्यासु। क्षेत्रऽजेषे। मघऽवन्। श्वित्र्यम्। गाम्।
ज्योक्। चित्। अत्र। तस्थिऽवांसः। अक्रन्। शत्रुऽयताम्। अधरा। वेदना। अकः॥ १५॥ ३॥

## भाषायाम्.

१५. हे मघवन् (=धनवन्निन्द्र), [त्वं] तुग्र्यासु गाम् (?=अप्सु कृताश्रयं?) शमं (=शान्तं) वृषभं (=वीर्यवन्तं=शूरं) [पूर्वोक्तं] श्वित्र्यं (=श्वित्रायाः पुत्रं) क्षेत्रजेषे (=क्षेत्रार्थं यद्युद्धं तस्मिन्) आवः (=रक्षितवानसि)। अत्र (=तस्मिन्युद्धे) [शत्रूयन्तः=शत्रवः] ज्योक्चित् (=चिरकालमेव) तस्थिवांसः (=अवस्थिताः सन्तः) अक्रन् (=शत्रुत्वम् अकुर्वन्=युयुधुः)। [त्वं पुनः] [तेषां] शत्रूयतां (=शत्रूणां) वेदनानि (=धनानि) अधराणि अकः (=जितवानसि)॥

अर्थ 'ज्याजवर तूं लोभ करीत होतास'. 'चाकन्' हें द्वितीयपुरुषीं प्रथमवचनीं क्रियापद आहे. ('कन्' कान्तौ या धातूपासून). पण येथें सायणाचार्य 'चाकन्' हें विनाकारण कृदंत समजतात. तथापि "वह कुत्सम् इन्द्र यस्मिन् चाकन् स्यूमन्यू" ऋ. १. १७४. ५. आणि "उक्थेषु इत् नु शूर येषु चाकन्" ऋ. २. ११. ३. या दोनी मंत्रांवरच्या भाष्यांत त्यांणींच 'चाकन्' हें द्वितीयपुरुषीं एकवचनीं क्रियापद समजून अर्थ केला आहे. याच 'कन्' धातूपासून 'कन्या' शब्द निघाला आहे.

'वीर्यवान् दशद्यु युद्ध करीत असतां त्याला [तूं] रक्षिता झालास'='प्राव: युध्यन्तं वृषभं दशद्युम्'. 'दशद्यु' हा लढत असतां त्याला इंद्रानें साहाय्य केल्याविषयीं दुसऱ्याहि एका मंत्रांत आलें आहे ("त्वं रथं प्र भरो योधम् ऋष्वम् आवः युध्यन्तं वृषभं दशद्युम्" ऋ. ६. २६. ४.)

'श्वित्रेचा पुत्र'. या श्वित्रेच्या पुत्राविषयीं कथा वगैरे कांहीं असल्याप्रमाणें दिसत नाहीं. व त्याचें नाव काय तेंहि ठाऊक नाहीं. सायणाचार्य 'श्वित्रा' या नांवाच्या बाईचा पुत्र शत्रूला भिऊन पाण्यांत बुडून राहिला होता त्याला इंद्राचें साहाय्य मिळताच

१५. हे मघवन्, शांत [ आणि ] वीर्यवान् श्वित्र्य उदकांत् गेलेला त्यास [ तूं ] शेताविषयींच्या [ युद्धां]त संरक्षिता झालास. त्या [युद्धां]त शत्रु फार वेळ उभे राहून लढले. [ परंतु ] [ तूं ] त्यांचीं धनें जिंकून हरण करिता झालास.

15. Thou didst, Maghavan, protect in the fight-for-land S'vitrâ's brave [but] peaceful son who had taken shelter in the waters. The enemies there stood long indeed [and] fought. [But] thou didst win their possessions.

---

तो शत्रूबरोबर लढण्याकरितां पाण्यांतून वर आला असें जाणवितात. या श्वैत्रेयाविषयीं पुढच्या मंत्रांतहि उच्चार आला आहे तो पाहा.

सायणाचार्य म्हणतात, या मंत्रांत 'कुत्स' सांगितला तो कौत्स गोत्राचा जो मूळपुरुष कुत्सऋषि तोच होय. आम्हांलाहि तसेंच दिसतें. विशेषु सांगावयाचें इतकेंच कीं, तो ऋषि होता म्हणून केवळ यजनयाजनादिक षट्कर्म करून ब्रह्मवर्चस्वाचाच बाणा मिरवीत नसे, तर युद्धाहि करीत असे. (या मंत्रांत जें कुत्सरक्षण सांगितलें तें युद्धप्रसंगींचेंच होय याविषयीं ऋ. १. ५१. ६ इ. अनेक प्रमाणें आहेत.)

---

१५. भावार्थः—'हे इन्द्रा, जमिनीविषयीं जी लढाई श्वित्र्य आपल्या शत्रूंशीं करीत होता तींत तूं त्याला मदत केलीस. त्या लढाईत शत्रु फार वेळ लढले तरी तूं शेवटीं जय पावलास आणि श्वित्र्याच्या शत्रूंची मालमिळकत तुला लूट मिळाली, ती तूं जिंकून हरण करिता झालास'.

असा भावार्थ दिसतो, तथापि हा मंत्र कठिण आहे. 'श्वित्र्य' म्हणजे वरील मंत्रांत जो श्वैत्रेय सांगितला आहे तो आणि हा एकच. परंतु पहिल्या अर्धांत 'तुग्र्यासु' आणि 'गाम्' हे शब्द फार संदिग्ध आहेत. त्याचा 'उदकांत गेलेला' हा अर्थ आम्हीं सायणांस अनुसरून केला आहे, पण त्याविषयीं आम्हांस संशय आहे. 'गाम्' ही 'गो' शब्दाची एकवचनी द्वितीया आहे. 'गो' याचा अर्थ 'बैल' असाहि होतो. तेव्हां 'श्वित्र्य गो' म्हणजे 'श्वित्रेचा पाडस'='श्वित्रेचा पुत्र' असा अर्थ नाहीं होणार? 'तुग्र्यासु' म्हणजे 'तुग्र नावाच्या मनुष्याची जी संतति तिजमध्यें' असें असेल, म्हणजे जमिनीविषयीं लढाई झाली ती तुग्र्य लोकांमध्यें झाली-असें समजतां येईल. अजून तरी कोंकणांत बहुत करून गांव असे असतात कीं, त्यांतील सगळे लोक 'परब' (=परबकुळांतील) तर परबच, 'पालव' तर सगळे पालवच, 'दळवी' तर सगळे दळवीच. तर अशा गांवांत झालेली लढाई 'परबांत' अथवा 'दळव्यांत' किंवा 'पालवांत' झाली असें सहज म्हणतां येईल.

## सूक्तम् ३४.

आङ्गिरसो हिरण्यस्तूप ऋषिः । अश्विनौ देवता । छन्दः—१-८. १०, ११ जगती, ९. १२ त्रिष्टुप् ॥

**त्रिश्चिन्नो अद्या भवतं नवेदसा विभुर्वां याम उत रातिरश्विना । युवोर्हि यन्त्रं हिम्येव वाससोऽभ्यायंसेन्या भवतं मनीषिभिः ॥ १ ॥**

त्रिः । चित् । नः । अद्य । भवतम् । नवेदसा । विऽभुः । वाम् । यामः । उत । रातिः । अश्विना ।
युवोः । हि । यन्त्रम् । हिम्याऽइव । वाससः । अभिऽआयंसेन्या । भवतम् । मनीषिऽभिः ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. हे नवेदसौ (=सर्वज्ञानिनौ) [अश्विनौ], [युवाम्] अद्य [दिने] त्रिश्चित् (=त्रिवारमपि) नो भवतम् (=अस्माकमेव स्यातम्) । हे अश्विनौ, वां (=युवयोः) यामो (=रथः) विभुः (=व्यापी=विस्तीर्णः) उत (=अपि च) रातिः (=दानशीलः =दातव्यवस्तुभिरूपेतो) [भवति हि] । युवयोर्हि यन्त्रं (=संबन्धः=उपासकैः सह यत्सख्यं तत्), हिम्या (=हिमवत्यां रात्रौ) वाससो (=वस्त्रस्य) [यन्त्रं=संबन्ध] इव, [सुखकारकं भवति] । [अतः कारणाद्] [युवां] मनीषिभिः (=मेधाविभिः= अस्मादृग्भिः स्तोतृभिः) अभ्यायंसेन्यौ (=नियन्तव्यौ=अनुग्रहवशात्तदधीनौ) भवतम्॥

'फार वेळ....लढले.' 'अक्रन्'याचा अर्थ 'लढले' हा येथें आम्हीं सायणाप्रमाणें केला आहे, पण आम्हांस संशय आहे. किती एक विद्वान 'क्रन्द्' धातूचें रूप समजून 'फार वेळ....गर्जते झाले' असा अर्थ सुचवितात ('क्रन्द्' धातूपासून 'अक्रन्' असें रूप होतें या विषयीं ऋ. ५. ५९. १ "प्र वः स्पट् अक्रन् सुविताय दावने" यावरील सायणभाष्य पाहा, परंतु तेथें 'अक्रन्' हें एकवचनीं आहे).

'धनें जिंकून हरण करिता झालास' ='अधरा वेदना अकः'. 'वेदनम्' म्हणजे 'धन,' 'मिळकत'. 'अधरं कृ' म्हणजे अक्षरशः अर्थ 'खालीं करणें'; 'खालीं घालणें,' 'जिंकणें,' जिंकून घेणें. उदाहरणार्थ, "असुन्वन्तं....जहि....। अस्मभ्यम् अस्य वेदनं दद्धि" (ऋ. १. १७६. ४.) 'अभक्तास मारून टाक ....आणि त्याचें धन आम्हांस दे,' या ठिकाणीं सायणाचार्यच 'वेदनम्' म्हणजे 'धन' असा अर्थ करितात. 'वेदन' हा शब्द ऋग्वेदांत पांच ठिकाणीं आला आहे. १. ३३. १५; १. १७६. ४;

## सूक्त ३४.

**ऋषि**–अंगिरस् कुळांतील हिरण्यस्तूप (पूर्वींच्या सूक्ताचा जो तोच). **देवता**–अश्वी. **वृत्त**–जगती, पण ९ आणि १२ या मंत्रांचें वृत्त त्रिष्टुभ् होय.

१. हे [सर्व]ज्ञानी अश्वी हो, आज [तुम्ही] तीनदा आमचेच व्हा. तुमचा रथ विस्तीर्ण आणि देणग्यांनीं भरलेला [आहे]. आणि तुमचा संबंध थंड रात्रीच्या वेळीं वस्त्रासारिखा [सुखकारक] होय. [तर हे अश्वींनो], [तुम्ही] भक्तांस सुलभ व्हा.

## HYMN 34.

To the *As'vins.* By *Hiranyastûpa* of the family of the *Angirases.* Metre—*Jagati,* but that of verses 9 and 12 is the *Trishtup.*

1. Three times, [ye] [omni]scient [As'vins], be ye only ours this day. Your chariot, As'vins, is extensive and filled with gifts. And your connection is [blissful] as [that] of a garment on a chilly night. As'vins, be [ye therefore] accessible to the pious.

४. ३०. १३; ७. ३२. ७; १०. ३४. ४). पण हा प्रस्तुतचा मंत्र खेरीज करून त्या सर्व ठिकाणीं सायणाचार्य 'धन' असा योग्य अर्थ करितात तो पाहा. 'अधरं कृ' याविषयीं १. १०१. ५. हा मंत्र पाहा. सायणाचार्य, 'अधरा वेदना अकः' याचा शब्दस "फार वाईट दुःख दिलेंस" असा अर्थ करितात.

या मंत्रांत आलीकडे सीमेबद्दल अथवा एकाद्या गांवांतील एकाद्या शेताबद्दल दोन गांवांतील लोक जसे लढून मरतात तशीच लढाई सांगितली आहे त्याजकडेस लक्ष्य द्यावें. अशा प्रकारचे तंटे काठेवाडांत लहानसान राजे आणि त्यांचे भाऊबंद (भायाद) यांजमध्यें अजून होत असतात, आणि सरवे होण्यापूर्वीं इंग्रजी मुलखांतहि होत होते.

---

१. हें सूक्त अश्वी म्हणून जें दोन देवांचें जोडें वेदांत प्रसिद्ध आहे आणि ज्यास मागाहून 'अश्विनीकुमार' असें पुराणें व इतिहास आणि महाकाव्यांत वगैरे म्हणूं लागले त्यांविषयीं आहे. सूक्त ३ मंत्र १ पृष्ठ १४ यावरील अश्वी शब्दावरील टीप पाहा.

भावार्थ:–'सकाळीं, मध्याह्नीं, आणि सायंकाळीं अशा तीन वेळां मनुष्यें तुम्हांस हवि अर्पण करितात, तें घेण्याकरितां आज तुम्ही आमच्याच घरीं या, दुसऱ्या उपासकाच्या घरीं जाऊं नका. कां कीं तुमचा रथ मोठा आणि धनानें भरलेला असतो. त्यांत

**त्रयः पवयो मधुवाहने रथे सोमस्य वेनामनु विश्व इद्विदुः ।**
**त्रयः स्कम्भासः स्कभितास आरभे त्रिर्नक्तं याथस्त्रिर्वश्विना दिवा ॥ २ ॥**

त्रयः । पवयः । मधुऽवाहने । रथे । सोमस्य । वेनाम् । अनु । विश्वे । इत् । विदुः ।
त्रयः । स्कम्भासः । स्कभितासः । आऽरभे । त्रिः । नक्तम् । याथः । त्रिः । ऊम् इति । अश्विना । दिवा ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. [ हे अश्विनौ ], [ युवयोः ] मधुवाहने (=मधुवाहके ) रथे त्रयः पवयः (=त्रीणि चक्राणि ) [ सन्ति ] । [युवयोः] सोमस्य [विषये] वेनां (=कामनां ) विश्व इत् (=सर्वेपि ) अनुविदुः (=जानन्ति ) । आरभे (=आरब्धुम्=अवलम्बितुं=पतनभीतिनिवृत्त्यर्थं धारयितुं ) [रथे] त्रयः स्कम्भाः (=स्तम्भाः ) स्कम्भिताः(=स्थापिताः ) [ सन्ति ] । [ युवां ] नक्तं (=रात्रौ ) त्रिर्याथः (=रथ उपविश्य त्रिवारं गच्छथः ) उ (=उत-अपि च ) हे अश्विनौ, दिवा त्रिर्[ याथः ] (=त्रिवारं गच्छथः ) ॥

धनें भरून आम्हांकडेसच या. तुमचा संबंध उपासकाला झाला तर थंड रात्रीच्या वेळीं पांघरूण आंगावर घेतलें असतां होतें तसें सुख होतें. यास्तव आम्हांसारिखे जे भक्त त्यांच्या स्वाधीन तुम्ही व्हा'.

'देणग्यांनीं भरलेला'='रातिः'. सायणाचार्य 'राति' म्हणजे 'देणगी' असा येथें अर्थ करून 'विस्तीर्ण आहे' असें म्हणतात. परंतु 'राति' हें 'दानशाली' या अर्थी विशेषणहि होत असलें. (ऋ. १. २९. ४ यावरील त्यांचेंच भाष्य पाहा).

'तुमचा संबंध थंड रात्रीच्या वेळीं वस्त्रासारिखा [सुखकारक] होय'='युवोर्यन्नं हिम्येव वाससः'. सायणाचार्य "तुमचा परस्पर संबंध दिवस रात्रीच्या संबंधासारिखा न तुटणारा आहे" असें भाष्य करितात. परंतु 'वासस्' याचा अर्थ निर्विवाद प्रयोगान्तरांवरून 'दिवस' असा सिद्ध होईल काय?

२. [ हे अश्वी हो ], [ तुमच्या ] मधुवाही रथास तीन चाकें [ आहेत ]. सोमरसाविषयीं [ तुमची ] तृष्णा सर्वहि [ लोक ] जाणतात. धरण्यासाठीं [ तुमच्या रथाला ] तीन खांब लाविलेले [ असतात ]. [ आणि ] हे अश्वी हो, [ तुम्ही ] तीनदा रात्रीचे आणि तीनदा दिवसाचे [त्या रथांत बसून] फिरत असतां.

2. Three [are] the wheels of [your] honey-bearing chariot—all know [your] thirst for Soma. Three [are] the posts fixed [in the chariot] to catch hold of. Thrice [you] drive by night and, As'vins, thrice by day.

---

२. या मंत्रात अश्वींच्या रथाविषयीं कांहीं चमत्कारिक गोष्टी सांगितलेल्या आहेत:– 'त्याला तीन चाकें आहेत; तो झपाट्यानें चालूं लागला म्हणजे आंत बसणारे पडूं नयेत म्हणून धरण्यासाठीं त्यांत तीन खांब रोविलेले आहेत. आणि या अशा रथांत बसून तीनदा रात्रीला आणि तीनदा दिवसाला अश्वी सोम पिण्यासाठीं जात असतात.' 'तीनदा आमचे व्हा' असें पहिल्या मंत्रांत जें सांगितलें त्यांतील 'तीनदा' याजवरून 'त्रिवार' 'त्रिवार' ही कल्पना या आणि पुढच्या मंत्रांत सूक्त संपे पर्यंत चालत राहिली आहे हें ध्यानांत ठेवावें. अश्वींचा रथ सगळा सोन्याचा केलेला आहे असें ऋग्वेदांत वर्णन येतें. तो रथ ऋभु म्हणून जे देवांचे कारागीर त्यांनीं करून दिला असेंहि सांगितलें आहे. अश्वींवरचीं पुढें सूक्तें येतील त्यांत त्यांच्या रथाविषयीं बरेंच वर्णन येत जाईल.

'मधुवाही रथ.' म्हणजे ज्यांत मध भरलेला असतो. ऋ ८. २६. ६ यांत अश्वींस 'मधुवर्णी' म्ह. 'मधाच्या वर्णाचे' असें विशेषण दिलें आहे. सूक्त २२ मंत्र ३ यांत अश्वींच्या चाबकास 'मधुमत्' अथवा मधूनें भरलेला असें म्हटलें आहे, तें पाहा. पुढच्या मंत्रांतहि अश्वींस मधानें यज्ञ सेचण्याविषयीं प्रार्थना आहे ती पाहा.

'सोमरसाविषयीं [ तुमची ] तृष्णा सर्वहि [लोक] जाणतात'='सोमस्य वेनाम् अनु विश्वे इत् विदुः'. याचा अर्थ सायणाचार्य, "सोमाची म्हणजे चंद्राची वेना म्हणजे सुंदर जी भार्या तिजशीं तुम्हीं विवाह केला तेव्हां तुम्ही आपल्या रथांत गोड गोड पदार्थ भरून घेऊन गेलां तें सकळ देव जाणतात" असा अर्थ ऋ. १०. ८५. ९ यास अनुलक्षून करितात.

**समाने अहन्त्रिरवद्यगोहना त्रिरद्य यज्ञं मधुना मिमिक्षतम् ।**
**त्रिर्वाजवतीरिषो अश्विना युवं दोषा अस्मभ्यमुषसश्च पिन्वतम् ॥ ३ ॥**

समाने । अहन् । त्रिः । अवद्यऽगोहना । त्रिः । अद्य । यज्ञम् । मधुना । मिमिक्षतम् ।
त्रिः । वाजऽवतीः । इषः । अश्विना । युवम् । दोषाः । अस्मभ्यम् । उषसः । च । पिन्वतम् ॥ ३ ॥

**त्रिर्वर्तिर्यातं त्रिरनुव्रते जने त्रिः सुप्राव्ये त्रेधेव शिक्षतम् ।**
**त्रिर्नान्द्यं वहतमश्विना युवं त्रिः पृक्षो अस्मे अक्षरेव पिन्वतम् ॥ ४ ॥**

त्रिः । वर्तिः । यातम् । त्रिः । अनुऽव्रते । जने । त्रिः । सुप्रऽअव्ये । त्रेधाऽइव । शिक्षतम् ।
त्रिः । नान्द्यम् । वहतम् । अश्विना । युवम् । त्रिः । पृक्षः । अस्मे इति । अक्षराऽइव । पिन्वतम् ॥ ४ ॥

## भाषायाम्.

३. हे अनवद्यगोहनौ (=दोषाणां संवरणकारिणौ ) [ अश्विनौ ], [ युवां ] समाने अहनि (=एकस्मिन्नेव दिने ) त्रिः अद्य [ एव ] त्रिः, [ नौ ] यज्ञं मिमिक्षतं (=सिञ्चतम् ) । हे अश्विनौ, दोषा उषसश्च (=रात्रीर्दिवसांश्च=रात्रिषु दिवसेषु नैरन्तर्येण ) त्रिः (=त्रिवारं) वाजवतीरिषः (=भक्ष्ययुक्तान्यन्नानि ) युवाम् अस्मभ्यं पिन्वतं (=सिञ्चतं=प्रयच्छतम् ) ॥

४. [ हे अश्विनौ ], [ युवां ] त्रिः (=त्रिवारं ] वर्तिः (=मार्गं ) यातं (=गच्छतम् ), त्रिः अनुव्रते (=युवयोरनुकूलव्यापारयुक्ते=अनुष्ठिताज्ञे अस्मादृशि ) [जने], त्रिः सुप्राव्ये (=सुष्ठु प्रकर्षेण भवद्भ्यां रक्षणीये अस्मादृशि ) [ जने ], त्रेधा (=त्रिभिः प्रकारैः ) [ शिक्षयन्ति ] इव (=तथा ), [ युवां ] शिक्षतं (=शिक्षयतम्=उपदिशतम् ) । हे अश्विनौ, युवां त्रिः नान्द्यं (=नान्दीम्=आनन्दं) वहतं (=युवाभ्यां सह आनयतम्), अस्मे (=अस्मासु=अस्मभ्यं) त्रिः अक्षराणि (=सततं गच्छन्ति जलानि) इव [विपुलाः] पृक्षः (=अन्नानि) पिन्वतं (=पूरयतं=दत्तम्) ॥

३. हे दोषगोपन करणारे [ अश्वी ] हो, [ तुम्ही ] एकाच दिवसीं तीनदा, [तुम्ही ] आजच्या दिवसीं तीनदा [आमच्या] यज्ञास मधूनें भिजवा. हे अश्वी हो, तुम्ही पुष्टिकारक अन्न प्रत्येक रात्रीं आणि प्रत्येक दिवसीं तीनदा आम्हांस देत जा.

3. Thrice on the same day, [ye] forgivers of faults, thrice this day sprinkle [our] sacrifice with sweet honey. Thrice may ye, As'vins, give us nourishing foods every night and every day.

४. [ हे अश्वी हो], [ तुम्ही ] तीनदा मार्गक्रमण करा, तीनदा आज्ञाधारक जनाला [ आणि ] तीनदा सुरक्षणीय [जनाला], तीन प्रकारांनीं [शिकविल्या]प्रमाणें शिकवा. हे अश्वी हो, तीनदा तुम्ही आनंद घेऊन या; उदकांप्रमाणें [विपुलतेनें] तीनदा [आम्हांस] [तुम्ही] अन्न द्या.

4. Thrice may ye drive your course; thrice may ye teach as [if] in three ways the obedient man, thrice [the man] who deserves to be well protected. Thrice, As'vins, may ye bring joy, thrice may ye give us food [as plentifully] as the unceasing streams of waters.

---

३. भावार्थ:–'हे अश्वी हो, एकाच दिवसीं आणि ते आजच आमचा यज्ञ तीनदा तुम्ही मधानें भिजवा, म्हणजे मध घालून त्याला माधुर्य आणा, आणि दररोज आणि दर रात्रीला पुष्टिकारक अन्न तुम्ही तीनदा आम्हांस देत जा'. म्हणजे, तुम्हांस तीनदा येण्याविषयीं पहिल्या मंत्रांत सांगितलें; तर त्या तीनहि वेळ आमचा यज्ञ तुम्हीं मधानें भिजवा, आणि दररोज आणि दर रात्रीस तीनदा आमच्या यज्ञास येऊन आम्हांस पुष्टिकारक अन्न द्या.

'दोषगोपन करणारे' म्हणजे भक्ताचे दोष बाहेर न पडूं देणारे, दोषाची क्षमा करणारे. पण या विशेषणाचें प्रयोजन नीट समजत नाहीं.

'मधूनें भिजवा'='मधुना मिमिक्षतम्.' म्हणजे यज्ञावर मध शिंपडा, कीं जेणें करून हवि गोड होऊन देवांस विशेष ग्राह्य होईल.

४. दुसऱ्या मंत्रांत सांगितलें आहे कीं, "तुम्ही तीनदा रात्रीचे आणि तीनदा दिवसाचे [त्या रथांत बसून] फिरत असतां". हें जें अश्वींचें त्रिवार फिरणें त्याला अनुलक्षून या मंत्रांत ऋषि म्हणतो कीं, 'हे अश्वी हो, तुम्ही तीनदा मार्गक्रमण करा. आणि आम्हांसारिखे जे तुमची आज्ञा पाळणारे

त्रिर्नो॑ र॒यिं व॑हतमश्विना यु॒वं त्रिर्दे॒वता॑ता त्रिरु॒ताव॑तं॒ धियः॑ ।
त्रिः सौ॑भग॒त्वं त्रिरु॒त श्रवां॑सि नस्त्रि॒ष्ठं वां॒ सूरे॑ दुहि॒तारु॑-
ह॒द्रथ॑म् ॥ ५ ॥

त्रिः । नः॒ । र॒यिम् । व॒ह॒त॒म् । अ॒श्वि॒ना॒ । यु॒वम् । त्रिः । दे॒व॒ऽता॑ता । त्रिः ।
उ॒त । अ॒व॒त॒म् । धियः॑ ।
त्रिः । सौ॒भ॒ग॒ऽत्वम् । त्रिः । उ॒त । श्रवां॑सि । नः॒ । त्रि॒ऽस्थम् । वा॒म् ।
सूरे॑ । दु॒हि॒ता । आ । रु॒ह॒त् । रथ॑म् ॥ ५ ॥

## भाषायाम्.

५. हे अश्विनौ, युवां नः (=अस्मभ्यं ) त्रिः (=त्रिवारं ) रयिं (=धनं ) वहतम् (=आवहतं=प्रापयतम् ) । [ युवां ] देवताता (=देवतातौ=देवयजनकर्मणि ) त्रिः [अवतं=प्रसन्नौ भवतम् ] । उत (=अपि च ) त्रिस् (=त्रिवारं ) धियः (=अस्माकं स्तुतीः) अवतं (=प्रतिगृह्णीतं=शृणुतम् ) । [युवां] नः (=अस्मभ्यं) त्रिः सौभगत्वं (=सौभाग्यं ) त्रिरुत (=त्रिश्च ) श्रवांसि (=अन्नादिसंपदो ) [ दत्तम् ] । वां (=युवयोस् ) त्रिष्ठं (=त्रिषु चक्रेषु स्थितं ) रथं सूरे दुहिता (=सूर्यदुहिता=सूर्यस्य दुहिता=सूर्या नाम सूर्यकन्या ) आरुहत् (=आरूढवती ) ॥

आणि तुम्हीं रक्षण करावें अशी प्रार्थना करणारे लोक त्यांस तीन प्रकारांनीं तीनदा शिकवा. तीनहि वेळ तुम्ही आपल्या बरोबर आनंद घेऊन या, आणि तीनहि वेळ आम्हांस अन्नें द्या, आणि तीं इतकीं विपुल असावीं कीं, पाण्याच्या प्रवाहाप्रमाणें तीं वाहात राहतील.'

'मार्ग'='वर्तिः'. 'वर्तिः' हा शब्द ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आला आहे आणि एक स्थळ खेरीज करून तो सर्व ठिकाणीं अश्वींच्या रथाचा जो मार्ग त्याला लाविलेला आहे. सायणाचार्य बहुतकरून 'घर' असा अर्थ करितात (प्रस्तुत स्थळीं तरी ते 'वर्तिः यातम्' याचा 'आमच्या घरीं या' असाच अर्थ सांगतात ). परंतु केव्हां केव्हां मार्ग असाहि करितात (ऋ. २. ४१. ७; ७. ६९. ५; आणि ८. ३५. ७ यांजवरील भाष्य पाहा ). तो आम्हांस या ठिकाणीं योग्य वाटल्यावरून घेतला आहे.

'तीन प्रकार' कोणते,आणि 'शिकवा' तें काय शिकवावयाचें, ह्याचा खुलासा मंत्रावरून होत नाहीं.

'आनंद'='नान्द्यम्'. 'नान्द्यम्' ही 'नान्दी' शब्दाची ('नान्दीम्' या ऐवजीं) द्वितीया आहे. नाटकाच्या आरंभीं जी 'नांदी' म्हणून येत असते तिचा मूळ अर्थ 'आनंद' होय हें या मंत्रावरून स्पष्ट होतें.

५. हे अश्वी हो, तीनदा आम्हांस तुम्ही संपत्ति वाहून आणा, तीनदा [ तुम्ही ] देवभजनाच्या वेळीं [ आम्हांवर प्रसन्न व्हा ] आणि तीनदा [ आमच्या ] प्रार्थना ग्रहण करून घ्या. तीनदा [ तुम्ही ] आम्हांस भाग्य [ द्या ] आणि तीनदा अन्नसंपत्ती [ द्या ]. तुमच्या तीनचाकी रथावर सूर्याची कन्या चढून बसली.

5. Thrice, As'vins, may ye bring wealth unto us, thrice [may ye be pleased] in [our] divine service, and thrice may [ye] accept [our] prayers. Thrice [may ye give] us prosperity and thrice affluence. Your three-wheeled car the daughter of the sun ascended.

५. 'संपत्ति वाहून आणा'-'रयिं वहतम्.' यांत 'वहतम्' याचा अक्षरशः अर्थ 'वाहून न्या', 'वाहा' इतका आहे. परंतु 'नः' ( आम्हांस ) हें पद आहे त्यावरून 'वाहून आणा' असा अर्थ होतो. 'आ' उपसर्ग नसला तरी 'वह' धातूचा अर्थ बोलणाऱ्याशीं सान्निध्य दाखविणारे जे ('नः' इत्यादिक) शब्द त्यांच्यासाहचर्यानें 'आणणें' असाहि होत असतो तें लक्ष्यात ठेवावें. 'देवभजनाच्या वेळीं'='देवतातौ'. अक्षरशः 'देवकर्मांत'; देवप्रीत्यर्थ जें आम्ही यज्ञादि कर्म करितों त्यांत.

'आम्हांवर प्रसन्न व्हा'='[अवतम्]'. हें 'अवतम्' क्रियापद 'अवतं धियः' असें जें पुढें आहे त्यांतील 'अवतं' यापासून अपाकर्षण करून घेतलें पाहिजे. ऋषीच्या मनांत प्रथम 'देवतातौ नः अवतम्' ( 'देवकर्मांत आम्हांवर प्रसन्न व्हा, आम्हांस रक्षा' ) असें म्हणावयाचें होतें, पण इतक्यांत वृत्तानुरोधामुळें वगैरे विचार फिरला आणि पुढें 'त्रिरुतावतं धियः' असें म्हटलें असें समजलें पाहिजे.

'सूर्याची कन्या चढून बसली'. सूर्याची तरुण कन्या 'सूर्या' म्हणून होती (तिला 'उर्जानी' असेंहि नांव १. ११९. २ यांत आहे), तिनें दोघांहि अश्वींस वरिलें आणि दोघांची बायको झाली असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. आणि ती त्यांजबरोबर त्यांच्या रथांत बसून फिरते असेंहि वर्णन इतर ठिकाणीं आढळतें. ( युवोः रथं दुहिता सूर्यस्य सह श्रिया नासत्या अवृणीत १. ११७. १३; आ वां रथं युवतिः तिष्ठत् अत्र जुष्ट्वी नरा दुहिता सूर्यस्य १. ११८. ५; आ यत् वां सूर्या रथं तिष्ठत् ५. ७३. ५ ).

अश्वींची स्त्री 'सूर्या' ही रथांत बसली ही गोष्ट या मंत्रांत कशाला सांगितली असें पुसल्यास, इतकेंच उत्तर आहे कीं, अश्वींविषयीं कोणतीहि गोष्ट 'त्रिवार', 'तिप्पट', 'तीन', यांच्या संबंधाची असेल ती या सूक्तांत सांगितली आहे. 'तीनदा......संपत्ती वाहून आणा', 'तीनदा......प्रसन्न व्हा', 'तीनदा....प्रार्थना ग्रहण करून घ्या' 'तीनदा....भाग्य द्या', 'तीनदा अन्न-

त्रिर्नो अश्विना दिव्यानि भेषजा त्रिः पार्थिवानि त्रिरु दत्तमद्भ्यः।
ओमानं शंयोर्ममकाय सूनवे त्रिधातु शर्म वहतं शुभस्पती
॥ ६ ॥ ४ ॥

त्रिः । नः । अश्विना । दिव्यानि । भेषजा । त्रिः । पार्थिवानि । त्रिः । ऊम् इति । दत्तम् । अत्ऽभ्यः ।
ओमानम् । शम्ऽयोः । ममकाय । सूनवे । त्रिऽधातु । शर्म । वहतम् । शुभः । पती इति ॥ ६ ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

६. हे अश्विनौ, [ युवां ] नः (=अस्मभ्यं ) त्रिर्दिव्यानि (=द्युलोकवर्तीनि), त्रिः पार्थिवानि (=पृथिव्यामुत्पन्नानि ) त्रिरु (=त्रिश्च ) अद्भ्यः (=मेघोदकप्रदेशेभ्यः (=अन्तरिक्षप्रदेशाद् ) [ यानि तानि ] भेषजानि दत्तम् । शंयोः (=शंयुनामकस्य= शंयवे अर्पितम् ) ओमानं (=सुखम् ) [अपि च] हे शुभस्पती (=कल्याणाधिपती) [ अश्विनौ ], त्रिधातु (=त्रिगुणितं ) शर्म (=सुखं ) ममकाय (=मदीयाय ) सूनवे [आ]वहतम् (=आनयतम् ) ॥

---

संपत्ति द्या' हीं जशीं त्रिवारावृत्तिदर्शक आहेत, तशीच तुमची 'सूर्या' ज्या रथांत तुमच्या बरोर लग्न होतांच बसली. तोहि रथ 'तीन' चाकांचा होता, असें म्हणण्याचा भावार्थ आहे.

'सूर्याची कन्या'='सूरे दुहिता'. आम्हीं केलेल्या अर्थाविषयीं तर शंका नाहींच. तो सायणाचार्यांप्रमाणें केला आहे. पण 'सूरस्य' ( अथवा, 'सूर्य' यापासून घेतलें तर 'सूर्यस्य') असें षष्ठीचें रूप पाहिजे. त्याऐवजीं सप्तमी कां ? सायणाचार्य "विभक्तिव्यत्यय" आहे (म्हणजे षष्ठीबद्दल सप्तमी आहे) इतकें सांगण्यापेक्षां ज्यास्ती कांहीं लिहीत नाहींत. सूचना:-'सूर्यदुहिता' असें प्रथम समस्त पद असून मग संप्रसारण होऊन सूर्-इ-अ असें झाल्यानंतर सूर्+अ+इ='सूरे' असें झालें असेल काय?

६. हे अश्वी हो, [तुम्ही] तीनदा आम्हांस द्युलोकांतील, तीनदा पृथ्वीवरील आणि तीनदा अंतरिक्षांतील औषधं द्या. शंयूला [जो] प्रसाद [दिला] तो, आणि हे कल्याणाचे अधिपती हो, [जें] तिप्पट कल्याण [तें] माझ्या पुत्राकरितां घेऊन या.

6. Thrice, As'vins, may [ye] give unto us medicaments of heaven, thrice [those] of the earth and thrice [those] of the sky. Carry [hither] for my son the favour [shown] to S'amyu [and], Lords of bliss, the three-fold blessing.

६. वेदांत तीन लोक अथवा प्रदेश सांगितले आहेत. पृथ्वी हा अगदी खालचा म्हणजे ज्याजवर आपण राहतों तो एक; दुसरा अंतरिक्ष, म्हणजे वातावरण अथवा आकाश, ज्यांत पाणी, ढग वगैरे असतात तो; आणि अंतरिक्षावर जो परम उंच प्रदेश, आणि ज्यांत सूर्यचंद्रादि तारे आणि नक्षत्रें आहेत तो तिसरा. या तृतीयप्रदेशास 'द्यु' अथवा द्युलोक किंवा आलीकडील संस्कृतांत स्वर्ग असें म्हणतात. मागाहून त्रैलोक्य अथवा त्रिलोकी किंवा त्रिभुवन असें ज्याला म्हणतात त्याचें बीज याच वैदिक समजुतीमध्यें आहे. अर्वाचीन काळीं स्वर्ग, मृत्यु, पाताळ, अथवा स्वर्ग, पृथिवी आण पाताळ असे तीन लोक समजतात.* पण वैदिक युगांतील मनुष्यास या पाताळाविषयीं कांहीं ठाऊक नव्हतें, पाताळ शब्द वेदांत येत नाही. व पाताळांतील शेषाहि कोठें आढळत नाहीं.

वर जे द्यु, अंतरिक्ष आणि पृथ्वी असे तीन लोक सांगितले त्या तिहींतून तीनतीनदा औषधें अश्वींनीं आणून द्यावीं, आणि 'शंयु' म्हणून कोणी मनुष्य (सायणाचार्य म्हणतात तो, बृहस्पतीचा पुत्र) होता, त्याला जो प्रसाद आणि जें तिप्पट सुख दिलें तें मंत्रकर्त्याच्या मुलाला आणून द्यावें असा मंत्राचा भावार्थ आहे.

'अश्वी' हे रोग्यास बरे करितात असें पूर्वी (१४ व्या पृष्ठावरील अश्वींविषयीं टीपेंत) सांगितलें आहे. तें या मंत्रावरून स्पष्ट होईल. वेदोत्तर ग्रंथांत. म्हणजे पुराणें, इतिहास, काव्यें इत्यादिकांत अश्विनीकुमार (म्हणजे अश्विदेवच) हे देवांचे वैद्य होत असें सांगितलें आहे; त्या कथेचें बीज* या मंत्रांत आहे. वेदांत अश्वी हे वैद्य, आहेत असें आढळतें खरें, पण देवांस रोग होतात आणि त्यांस औषधाची जरूर लागते आणि अश्वी हे औषध देऊन देवांस बरे करितात असें अनन्वित भाव्ड वेदांच्या वेळीं रचलेलें नव्हतें. अश्वी हे मनुष्यास औषधें देऊन बरे करितात इतकेंच त्या वेळचे लोक समजत.

'अंतरिक्षांतील'='अद्भ्यः'. अक्षरशः अर्थ 'पाण्यापासून [झालेलीं]' असा आहे. परंतु पाणी म्हणजे अंतरिक्षांत जीं मेघोदकें ढगांच्या रूपानें असतात त्यांसाहि म्हणतात. त्यावरून तीं मेघो-

**त्रिर्नो अश्विना यजता दिवेदिवे परि त्रिधातु पृथिवीमशायतम् ।**
**तिस्रो नासत्या रथ्या परावत आत्मेव वातः स्वसराणि गच्छतम् ॥ ७ ॥**

त्रिः । नः । अश्विना । यजता । दिवेऽदिवे । परि । त्रिऽधातु । पृथिवीम् । अशायतम् ।
तिस्रः । नासत्या । रथ्या । पराऽवतः । आत्माऽइव । वातः । स्वसराणि । गच्छतम् ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. हे अश्विनौ, नः (=अस्मभ्यम्=अस्माभिः) दिवेदिवे (=प्रतिदिनं) त्रिः (=त्रिवारं) यजतौ (=यष्टव्यौ) [युवां] पृथिवीं त्रिधातु (=त्रिगुणं यथा स्यात्तथा) पर्यशायतं (=परितः शयनम् अकुरुतं, नित्यमेव कुरुथः) । हे रथ्यौ (=रथस्वामिनौ) नासत्यौ (=सत्यौ) [अश्विनौ], आत्मा वातः (=प्राणवायुः) स्वसराणि (=शरीररूपाणि स्वगृहाणि) [गच्छति=व्याप्नोति] तद्वत्, [युवां] तिस्रः परावतः (=त्रीन् दूरस्थितान् लोकान्) गच्छतं (=व्याप्नुतम्) ॥

दकें अभ्ररूपानें जेथें असतात तो अंतरिक्षप्रदेश. हाच अर्थ सायणांनीं केला आहे.

'शंयु' हा कोण होता तें ठाऊक नाहीं. सायणाचार्य तो बृहस्पतिपुत्र म्हणून जें म्हणतात तें एका ब्राह्मणांतून घेतलें आहे.

'तिप्पट'='त्रिधातु'. सायणाचार्य "वात, पित्त, आणि श्लेष्मा ह्या तीन धातूंचें शमन करणारें" सुख (शर्म) असा अर्थ करितात. पण वैदिकयुगांत वैद्यकाचा हा धातुभेद केलेला असेल असें वाटत नाहीं. आम्हीं केलेल्या अर्थास ऋ. ६. ६१. १२. यावरील सायणभाष्याचाच आधार आहे. तेथें सरस्वतीस 'सप्तधातुः' असें म्हटलें आहे; त्याचा अर्थ ते "सप्त अवयव जीचे", म्हणजे सात तुकडे मिळून झालेली असें भाष्य करितात. तसेंच 'त्रिधातु' म्हणजे 'त्रिगुणित'='तिप्पट'. हे तीन प्रकार अथवा अवयव कोणते तें सांगवत नाहीं. कदाचित् द्युलोकांतील, अंतरिक्षांतील आणि पृथ्वीवरील जें कल्याण तें तिप्पट कल्याण असें असेल (ऋ. १. २७. ५. यावरील आमची टीप पाहा).

७. हे अश्वी हो, ज्यांकरितां आम्हीं प्रतिदिनीं तीनदा यज्ञ करावा असे तुम्ही पृथ्वीला तीनदुडती वळसा घालून राहत असतां. हे रथगामी नासत्य हो, प्राणवायु जसा शरीरांत [ फिरतो ] तसे [ तुम्ही ] त्रैलोक्यामध्यें फिरा.

7. Ye, O As'vins, who deserve to be sacrificed to by us thrice every day trebly surround the earth. The three distant worlds, O truthful charioteers, may ye pervade as [does] the vital breath its habitations.

७. भावार्थः—'प्रतिदिनां आम्हीं तुमची तीनदा पूजा करावी असे तुम्ही आहां, आणि तुम्ही पृथ्वीच्या सभोंवतालीं सापाप्रमाणें ( प्रतिदिनीं ) वळसा घालून राहता. तर हे रथांत बसून जाणारे सत्यरूप अश्वीहो, जसा प्राणवायु ( म्हणजे जीवरूपी जो वायु तो ) शरीरांत खेळतो तसे तुम्ही त्रैलोक्यांत खेळत राहा'.

'तीनदुडती'='त्रिधातु'. 'त्रिधातु' हें क्रियाविशेषण आहे.

'रथगामी' म्हणजे 'रथांत बसून जाणारे'. अश्वी हे रथांत बसून जात असतात म्हणून पूर्वींच सांगितलें आहे.

'त्रैलोक्यामध्यें फिरा'='तिस्रः परावतः गच्छतम्'. 'परावत्' म्हणजे दूरचा प्रदेश. 'परावतः' हा शब्द 'दूरच्या प्रदेशाहून', 'दूरून' या अर्थीं पुष्कळ ठिकाणां येतो. 'तिस्रः परावतः'(='तीन दूरचे प्रदेश') हे शब्द ऋ. ८. ५. ८; ८. ३२. २२ आणि प्रस्तुतचा मंत्र अशा तीन ठिकाणां आले आहेत. प्रस्तुतच्या मंत्रांत तर 'परावतः' या शब्दाचें सायणाचार्य ( छापील प्रतींत तर ) भाष्य करीतच नाहींत. परंतु तीनहि स्थळें ताडून पाहिलीं तर 'तिस्रः परावतः' म्हणजे 'तीन दूरचे प्रदेश' असा अर्थ सिद्ध होतो असें दिसतें. हे त्रिलोक कोणते तें निश्चयानें सांगवत नाहीं; परंतु पृथ्वी, अंतरिक्ष आणि द्यु हे असतील.

**त्रिरश्विना सिन्धुभिः सप्तमातृभिस्त्रयं आहावास्त्रेधा हविष्कृतम् ।**
**तिस्रः पृथिवीरुपरि प्रवा दिवो नाकं. रक्षेथे द्युभिरक्तुभिर्हितम्**
**॥ ८ ॥**

त्रिः । अश्विना । सिन्धुऽभिः । सप्तमातृऽभिः । त्रयः । आऽहावाः । त्रेधा । हविः । कृतम् ।
तिस्रः । पृथिवीः । उपरि । प्रवा । दिवः । नाकम् । रक्षेथे इति । द्युऽभिः । अक्तुऽभिः । हितम् ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. हे अश्विनौ, [ युवयोः कृते ] त्रय आहावाः (=द्रोणकलशाः ) सप्तमातृभिः (=सप्तसंख्याका मातरः उत्पादयित्र्यो येषां तैः ) सिन्धुभिः (=स्यन्दनस्वभावैः सोमैः ) त्रिः (=त्रिवारम्) [ आपूरिता भवन्ति] [अपि च] त्रेधा (=त्रिभिः प्रकारैः) हविः कृतं (=सिद्धं क्रियते ) । तिस्रः पृथिवीरुपरि (=पृथिव्यन्तरिक्षद्युलोकरूपिणो भवनत्रयस्योपरि ) प्रवा (=प्रवौ=प्रवन्तौ=गच्छन्तौ ) [ युवां ] दिवो नाकं (=द्युलोकस्य उच्चैस्तमं प्रदेशं=शिखरं ) द्युभिरक्तुभिः (=अहर्निशं ) हितं रक्षेथे (=स्थापितं रक्षथः= स्थिरं यथा तिष्ठेत्तथा रक्षथः) ॥

८. हे अश्वी हो, [तुम्हांसाठीं] सप्तमातृक सोमांनीं तीन कलश तीनदा भरले [ जातात ] [आणि] तीन प्रकारें करून [ सोम]हवि सिद्ध केलें [ जातें ]. तीन पृथिवींवर गमन करणार [ जे ] तुम्ही [ ते ] द्युलोकाचें शिखर प्रतिदिनीं [ आणि ] प्रतिरात्रीं संरक्षण करून अचल स्थितींत ठेवीत असतां.

8. Thrice, As'vins, [are] the three jars [filled] with the seven-mothered streams [for you] [and] in three ways is the oblation prepared. Passing above the three worlds ye keep steady the vault of heaven [all] days [and] nights.

८. 'त्रिवार' 'त्रिवार' ही आवृत्ति या मंत्रांतहि आहेच. 'हे अश्वीदेव हो, सात ज्यांच्या आया अशा सोमांनीं तीन कलश तुम्हांसाठीं तीनदा भरून तयार केले जातात. तीनदा तुम्हांसाठीं हवि तयार केलें जातें. आणि पृथ्वी, अंतरिक्ष आणि द्युलोक या तीनहि लोकांच्या वर गमन करणारे जे तुम्ही ते रात्रंदिवस द्युलोकाच्या माथ्याचें संरक्षण करून तें स्थिर राही असें करीत असतां', असा भावार्थ आहे.

सोमाच्या सात आया कोणत्या? सायणाचार्य "इमं मे गङ्गे यमुने" इत्यादि ( ऋ. १०. ७५. ५ ) 'सात नद्यांपासून उत्पन्न झालेलीं' असा 'सप्तमातृ' याचा अर्थ करून 'सिन्धु' म्हणजे 'उदकें' असें समजतात, आणि 'सात नद्यांपासून उत्पन्न झालेल्या उदकांनीं' असा अर्थ करितात.

'प्रतिदिनीं आणि प्रतिरात्रीं संरक्षण करून अचलस्थितींत ठेवीत असतां'='रक्षेथे द्युभिरक्तुभिर्हितम्'. अक्षरशः अर्थ, 'स्थापिलेला [ असा ] रात्रंदिवस रक्षीत असतां'; म्ह. अशा रीतीनें रक्षीत असतां कां, तो तेथून पडत नाहीं, तर स्थिर राहतो. सायणाचार्य 'रात्रंदिवस' याचा संबंध 'स्थापिलेला' याच्याशीं घेतात, 'रक्षीत असतां' याच्याशीं घेत नाहींत.

'द्युलोकाचें शिखर'='दिवो नाकम्'. हा जो आम्ही अर्थ करितों त्यास ऋ. १. ७३. ४ या मंत्राचा आणि त्यावरील सायणभाष्याचा आधार आहे. प्रस्तुत स्थळीं सायणाचार्य 'दिवो नाकम्' या शब्दाचा 'द्युलोकसंबंधी जो सूर्य त्याला' असा अर्थ सांगतात. परंतु येथें 'दिवो नाकं' म्हणजे 'नाक'च असा अर्थ समजावयाचा; आणि 'द्युलोकाचें शिखर' म्हणजे 'द्युलोकाचा माथा' किंवा 'स्वर्ग' असेंच समजलें पाहिजे.

या मंत्रात जो 'नाक' शब्द आला आहे त्याचा अर्थ अलीकडील संस्कृतांत स्वर्ग असा होतो, तसाच वेदांतहि होतो; परंतु हा स्वर्ग म्हणजे. द्युलोकासारिखा एक उंच प्रदेश आहे असा

**क्व१ त्री चक्रा त्रिवृतो रथस्य क्व१ त्रयो वन्धुरो ये सनीळाः।**
**कदा योगो वाजिनो रासभस्य येन यज्ञं नासत्योपयाथः ॥ ९ ॥**

क्व । त्री । चक्रा । त्रिऽवृतः । रथस्य । क्व । त्रयः । वन्धुरः । ये । सऽनीळाः ।
कदा । योगः । वाजिनः । रासभस्य । येन । यज्ञम् । नासत्या । उपऽयाथः ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. हे नासत्यौ, येन [ रथेन ] [युवां ] यज्ञम् उपयाथः ( =प्राप्नुथः ) [तस्य] [ युवयोः ] त्रिवृतः (=त्रिकोणस्य) रथस्य त्रीणि चक्राणि क्व [ सन्ति ], [तस्य रथस्य ] ये वन्धुरः (=इषाद्यर्पाण काष्ठानि ) सनीडाः (=आसनोपेताः)[ वर्तन्ते ] [ ते ] क्व [ सन्ति ], वाजिनः (=बलवतो ) रासभस्य (=गर्दभस्य), योगः (=तस्मिन्रथे नियोजनं) कदा [भविष्यति ] ?

समज दिसून येतो. आणि ज्यांत तारे वगैरे आहेत, तो प्रदेश 'नाक' होय; एकाद्या देवाच्या उंचीविषयीं अथवा मोठेपणाविषयीं सांगावयाचें झालें म्हणजे तो 'नाकाप्रत' पोंहचतो असें वर्णन (७. ५८. १ ) आढळतें.' नाक' उंच होय ( ७. ८६. १ ), तो उंच आणि विस्तीर्ण होय, तो अंतराळीं आहे आणि विष्णूनें त्याला वरचेवर धारण केला आहे ( ७. ९९. २ ). 'साध्य' या नांवाचे देव तेथें असतात (१. १६४. ५०; १०. ९०. १६ ), तो विस्तीर्ण होय आणि त्याला इंद्रानें आपल्या पराक्रमानें अंतराळीं धारण केला आहे ( १०. ११३. ४ ). जो मर्त्य यज्ञादिक करितो तो 'नाकाच्या' पाठीवर जाऊन देवांमध्यें बसतो ( १. १२५. ५ ) आणि दिवोदास या नांवाचा राजा होऊन गेला तो 'नाकाच्या' पाठीवर जाऊन उभा राहिला ( ८. १०३. २). सोम हा पक्ष्याप्रमाणें 'नाकांत' म्हणजे द्युलोकांत भ्रमण करितो (१०. १२३. ६) ; इत्यादि या 'नाका'विषयीं ऋग्वेदांत सांगितलें आहे. यावरून आपल्या आर्य पूर्वजांची अशी श्रद्धा उघड दिसून येते कीं, द्युलोकाचा जो अत्यंत उंच प्रदेश तो 'नाक' अथवा स्वर्ग होय; आणि देव तेथें वास करितात; आणि जे मर्त्य सुकृतें करितील ते तेथें जातील; व स्वर्ग अतिउंच आणि विस्तीर्ण आहे. परंतु स्वर्गांत ऐरावत म्हणून इंद्राचा बसावयाचा हत्ती आहे, अथवा नंदनवन म्हणून बाग आहे अथवा तेथें अप्सरा गायन करितात इत्यादिक ज्या पुराणांतील गोष्टी त्या ऋग्वेदांत नाहींत.

९. हे सत्यवान् [अश्वी] हो, [तुम्ही] ज्या [रथां]त [बसून] यज्ञाप्रत येत असतां [त्या] [तुमच्या] त्रिकोणी रथाचीं तीन चाकें कोठें? [त्याचा] तीन लांकडांचा जो बैठकीसकट साठा [तो] कोठें? [त्या तुमच्या रथाला] [तुम्ही आपला] बळवान गाढव केव्हां जोडाल.

9. Where [are] the three wheels of the triangular car, where the three beams with seats [on them], [and] when will you harness [your] powerful donkey [to that car], with which, O truthful As'vins, [ye] go to the sacrifice?

---

९. या मंत्रांत जे तीन प्रश्न आहेत त्याचें तात्पर्य इतकेंच कीं, 'तुम्ही ज्या रथानें आपल्या उपासकांच्या यज्ञाप्रत जात असतां तो तयार करून त्यांत बसून तुम्हीं आमच्या ह्या आजच्या यज्ञाप्रत लवकर कां येत नाहीं?'

'त्रिकोणी' हा अर्थ सायणाचार्यांसच अनुसरून केला आहे. ते म्हणतात कीं, आस आणि आसापासून जीं दोन लाकडें असतात आणि पुढच्या बाजूस जाऊन मिळतात तीं अशीं तीन मिळून अश्वींचा रथ होतो म्हणून तो त्रिकोणी होय. अजून तरी एक बैलाचे, एक घोड्याचे अथवा एक खेचराचे फार चपळ जे टांगे अथवा एक्के असतात ते अशाच प्रकारचे असतात, हें आमच्या वाचकांस सांगावयास नकोच.

'तीन चाकें'. अश्वींच्या रथास तीन चाकें असल्याविषयीं पूर्वी सांगितलेंच आहे.

'बळवान गाढव'. अश्वींच्या रथास एकच गाढव जोडलेला असतो असें वेदांत कोठकोठें आढळतें (१. ११६. २; ८. ८५. ७). घोडे जोडलेले असतात असेंहि इतर ठिकाणीं सांगितलें आहे. पुराणांतरीं जसा सारजेचा मोर, गणपतीचा उंदीर, विष्णूचा गरूड, शिवाचा नंदी तसा वेदांत अश्वींचा गाढव आहे.

'[त्याचा] तीन लाकडांचा जो बैठकीसकट साठा [तो] कोठें?'='त्रयो वन्धुरो ये सनीळाः'. आस अथवा आसावरचें आडवें समांतर लाकूड एक आणि त्यापासून पुढें जाणारीं दोन लाकडें मिळून तीन. आणि त्यांजवरच बसणाऱ्यांसाठीं बैठक आहे, असा अर्थ.

आतां अशा प्रकारच्या रथाचें तिसरें चाक कोठें असेल तें स्पष्ट सांगवत नाहीं.

**आ नासत्या गच्छतं हूयते हविर्मध्वः पिबतं मधुपेभिरासभिः ।**
**युवोर्हि पूर्वं सवितोषसो रथमृताय चित्रं घृतवन्तमिष्यति ॥ १० ॥**

आ । नासत्या । गच्छतम् । हूयते । हविः । मध्वः । पिबतम् । मधुऽपेभिः ।
आसऽभिः ।
युवोः । हि । पूर्वम् । सविता । उषसः । रथम् । ऋताय । चित्रम् ।
घृतऽवन्तम् । इष्यति ॥ १० ॥

**आ नासत्या त्रिभिरेकादशैरिह देवेभिर्यातं मधुपेयमश्विना ।**
**प्रायुस्तारिष्टं नी रपांसि मृक्षतं सेधतं द्वेषो भवतं सचाभुवा ॥ ११ ॥**

आ । नासत्या । त्रिऽभिः । एकादशैः । इह । देवेभिः । यातम् । मधुऽपेयम् ।
अश्विना ।
प्र । आयुः । तारिष्टम् । निः । रपांसि । मृक्षतम् । सेधतम् । द्वेषः ।
भवतम् । सचाऽभुवा ॥ ११ ॥

**भाषायाम्.**

१०. हे नासत्यौ, [युवाम्] आगच्छतम्, [युवाभ्याम्] [इदं] हविः हूयते (=अस्माभिरर्प्यते), [युवां] मधुपैः (=मधुरं सोमरसं पिबद्भिः) [युवयोः] आसभिः (=आस्यैः) मध्वः (=मधुनः =मधुरस्य सोमरसस्य) [भागं] पिबतम् । सविता हि युवयोश्चित्रं (=रमणीयं) घृतवन्तं (=घृतवत्तयेव सान्द्रं) [च] रथम् उषसः पूर्वम् (=उषःकालात्प्रथममेव) ऋताय (=अस्मदादीनां यज्ञार्थम्) इष्याति (=प्रेरयति=प्रेषयति) ॥

११. हे नासत्यौ अश्विनौ, [युवां] त्रिभिरेकादशैः (=त्रयस्त्रिंशद्भिः) देवैः मधुपेयं (=मधुरस्य सोमरसस्य पानं) [प्रति] इह आयातम् । [युवाम्] [अस्माकम्] आयुः प्रतारिष्टं (=प्रातारिष्टं=प्रवर्धयतम्), [अस्माकं] रपांसि (=पापानि =व्याधीन्) निर्मृक्षतं (=अस्मत्तो निर्मर्जयतम्), [अस्माकं] द्वेषः (=द्विषः =द्वेषकर्तॄन्) सेधतं (=प्रतिषेधतम्), [अस्माकं] सचाभुवौ (=साहाय्यार्थम् अस्माभिः सहावस्थितौ) भवतम् ॥

१०. हे सत्यवान् [अश्वी] हो, [तुम्ही] उभयतां या; [हें] हवि [तुम्हांला] अर्पण केलें आहे; [आपल्या] मधुर सोमरस पिणाऱ्या तोंडांनीं [हा आमचा] मधुर सोमरस [तुम्ही] प्या. कारण कीं उषेच्या पूर्वीं तुमच्या तेजःपुंज [आणि] गुळगुळीत रथाला सविता यज्ञासाठीं पाठवीत असतो.

10. Come, [ye] truthful [As'vins], the oblation is offered [unto you], drink [therefore] of the sweet Soma with [your] mouths that sip the sweet Soma. For before [the time of] Dawn Savitâ sends forth to the sacrifice your chariot resplendent [and] smooth.

११. हे सत्यवान् अश्वी हो, तिप्पट अकरा देवांसकट [तुम्ही] येथें मधुर सोमरस पिण्याकरितां या; [तुम्ही] [आमचें] आयुष्य वाढवा, [आमचें] व्याधी नाहींसे करा, [आमच्या] द्वेष्ट्यांचें निवारण करा, [आणि] [आमचे] पाठराखे व्हा.

11. Come hither, ye Truthful As'vins, with the thrice eleven gods to drink the sweet Soma. Prolong [our] lives, wipe off [our] diseases, ward off [our] enemies, [and] be our champions.

---

१०. पूर्वील मंत्रांत अश्वी लौकर का येत नाहींत अशा भावार्थानें प्रश्न पुसले. या मंत्रांत पुनः प्रार्थना करितो कीं, 'हे अश्वी, तुम्ही लवकर या, आणि हें जें हवि तुम्हांसाठीं तयार करून आम्ही अर्पण करीत आहों तें सोमरसरूपी मधुर हवि आपल्या सोमरस पिण्याची सवय असणाऱ्या तोंडांनीं तुम्ही प्या. तुम्हांस लवकर येऊन पिण्याविषयीं प्रार्थना करितों यांत नवल नाहीं, कारण कीं उषःकालापूर्वींच तुमचा तेजस्वी आणि गुळगुळीत रथ सविता यज्ञाप्रत पाठवीत असतो' असा भावार्थ.

'गुळगुळीत'='घृतवन्तम्'. अक्षरशः, 'ज्याला तूप [लाविलें] आहे'. म्हणजे, त्याजवर जणुं काय तूपच लाविलें आहे असा हाताला नरम लागणारा, आणि डोळ्याला साफ दिसणारा. सायणाचार्य म्हणतात कीं, चाकें चांगलीं चालावीं म्हणून आंसाच्या शेवटास तूप लाविलें असतें म्हणून 'घृतवन्त' असें म्हटलें आहे.

'सविता पाठवीत असतो'='सविता इष्यति.' अश्वींच्या रथास सविता कसा पाठवितो अथवा प्रेरितो व याचा खरोखर भावार्थ काय आहे तें जरी स्पष्ट सांगवत नाहीं तरी इतकें दृग्ग दिसतें

**आ नो॑ अश्विना त्रिवृता रथे॑नार्वाञ्चं॑ र॒यिं व॑हतं सु॒वीर॑म् ।**
**शृ॒ण्वन्ता॑ वा॒मव॑से जोहवीमि वृ॒धे च॑ नो भवतं॒ वाज॑सातौ ॥ १२ ॥५॥**

आ । नः॒ । अ॒श्वि॒ना॒ । त्रि॒ऽवृता॑ । रथे॑न । अ॒र्वाञ्च॑म् । र॒यिम् । व॒ह॒त॒म् । सु॒ऽवीर॑म् ।
शृ॒ण्वन्ता॑ । वा॒म् । अव॑से । जो॒ह॒वी॒मि॒ । वृ॒धे । च॒ । नः॒ । भ॒व॒त॒म् । वाज॑ऽसातौ ॥ १२ ॥ ५ ॥

## भाषायाम्.

१२. हे अश्विनौ, [ युवां ] त्रिवृता (=त्रिकोणेन ) रथेन सुवीरं (=पुत्रभृत्यादिभिः शोभनैर्वीरैरुपेतं ) रयिं (=संपदं ) नः (=अस्मभ्यम्=अस्मदर्थम् ) अर्वाञ्चम् (=अर्वाक्=अस्मदाभिमुख्येन ) आवहतम् (=आनयतम् । [अहं] शृण्वन्तौ (=अस्मदीयस्तुतिं शृण्वन्तौ ) वाम् अवसे (=अस्मद्रक्षणाय ) जोहवीमि (=पुनःपुनः आह्वयामि ) । [युवां] च वाजसातौ (=संग्रामे ) नः (=अस्माकं ) वृधे (=वृद्धये=वर्धनाय=जयाय ) भवतम् ॥

कीं, सूर्याअगोदर उषा (अथवा प्रभात) उगवत असते. आणि उषेच्या अगोदरहि अश्वी उगवतात आणि रथात बसून यज्ञाप्रत येत असतात.

११. या मंत्राचा भावार्थ स्पष्टच आहे. इतकेंच सांगणें अवश्य दिसतें कीं, दीन मनुष्यांनीं परम शक्तिमान् देवापाशीं जशी प्रार्थना करावी तशीच यांत प्रेमभावानें केलेली दृष्टीस पडते.

'तिप्पट अकरा देवासकट'='त्रिभिः एकादशैः देवैः'. म्हणजे, 'तेहतीस देवासहित'. सायणाचार्य म्हणतात, तेहतीस देव म्हणजे "ये देवासो दिवि एकादश" ऋ० (१. १३९. ११ ) मंत्रांत जे अकरा देव स्वर्गांत, अकरा पृथ्वीवर, आणि अकरा अंतरिक्षांत असतात म्हणून सांगितलें आहे ते तेहतीस देव समजावयाचे. ऋ. १. ४५. २("तान्रोहिदश्व गिर्वणः त्रयस्त्रिंशतम् आवह") यांतहि तेहतीसच देव सांगितले आहेत. तैत्तिरीय संहिता १. ४. १०. १ यांतहि पृथ्वीवर ११, अंतरिक्षांत ११, आणि स्वर्गात ११ असे तेहतीस देव सांगितले आहेत (ये देवासो दिवि एकादश स्थ पृथिव्याम् अधि एकादश स्थ । अप्सुक्षितो .... एकादश स्थ ते देवासः....). ऋ. ३. ६. ९ यांतहि तेहतीसच देव सांगितले आहेत, ('पत्नीवतस् त्रिंशतं त्रींश्च देवान्......आवह'. याप्रमाणें दुसऱ्या अनेक ठिकाणीं देव

१२. हे अश्वी हो, [तुम्ही आपल्या] त्रिकोणी रथांत .[भ-रून] सुवीरयुक्त संपत्ती आम्हांसाठीं इकडे आणा. ऐकून घेणाऱ्या तुम्हां उभयतांस [मी] पुनःपुनः साहाय्याकरितां हाका मारीत असतां. तर संग्रामांत आम्हांस जय मिळेल असें करा.

12. Carry hither unto us, As'vins, by [means of] your triangular car opulence accompanied by good heroes. Ye that hear I invoke again and again for help. Be [ye], therefore, the givers of victory to us in battle.

तेहतीस आहेत असें वेदांत सांगितलें आहे. हे जे तेहतीस देव ते कोणते तें शतपथ ब्राह्मणमध्यें (४. ५. ७. २) असें सांगितलें आहे कीं, ८ वसु, ११ रुद्र, आणि १२ आदित्य, आणि द्युलोक आणि पृथ्वी मिळून तेहतीस. परंतु संहितेमध्यें जे तेहतीस सांगितले ते शतपथ ब्राह्मणांत सांगितल्याप्रमाणें तेहतीस समजावयाचे किंवा कसें याविषयीं निश्चयानें सांगवत नाहीं. परंतु कसेंहि असलें तरी एक ऋचा (ऋ. ३. ९. ९.) खेरीज करून सर्व ठिकाणीं देव तेहतीसच आहेत असें सांगितलें आहे. ही जी तेहतिसांची संख्या तिजपासूनच अर्वाचीन काळीं पुराणांतरीं वगैरे तेहतीस कोटि देव आहेत अशी कथा निष्पन्न झाली असावी यांत संशय नाहीं. हे तेहतीस कोटि देव जर पुराणांत सांगितल्याप्रमाणें खरोखरच असते तर आर्यावर्तांत प्रत्येक मनुष्याच्या हिशाला दीड देव आला असता. (आमच्या आर्यावर्तांतील सांप्रत प्रजेची संख्या अजमासें बावीस कोटि आहे).

'नाहींसे करा' = 'निर्मृक्षतं'. हें रूप मृज् धातूपासून आहे असें समजावें. सायणाचार्य 'मृश' धातूनें निर्वचन करितात. अर्थांत भेद पडत नाहीं.

१२. या ऋचेंत विशेष टीका करण्यासारिखें नाहीं. सूक्ताचा उपसंहार यांत आहे. 'हे अश्विदेव हो, तुम्ही आपल्या त्रिकोणी रथांत घालून संपत्ती इकडे आणा आणि आम्हांस द्या. आणि ती नुसती संपत्ती नको, तिजबरोबर सुसंततीहि आम्हांस मिळे असें करा. मी पुनः पुनः तुमचा धांवा करीत असतों, तर त्या त्या प्रसंगीं माझें तुम्ही संरक्षण करा; आणि सगळ्यांच्या शेवटची प्रार्थना ही आहे कीं, युद्धांत जेव्हां जेव्हां तुमचा धांवा मी करीन तेव्हां तेव्हां मला तुम्ही साहाय्य करा आणि मला यश मिळे असें करा', असा भावार्थ.

देवापाशीं ज्या चांगल्या चांगल्या वस्तु मागावयाच्या त्यांत श्रेष्ठ ही असे कीं त्याणें युद्धांत जय होई असें करावें, असें या मंत्रावरून स्पष्ट दिसून येतें. या सूक्ताचा कर्ता ब्रह्मर्षि होता म्हणून सांगावयास नकोच. प्राचीन काळीं आमचे आर्य पूर्वज युद्धाविषयीं किती उत्सुक असत आणि त्यांत आपणास जय प्राप्त व्हावा म्हणून कशी प्रार्थना

## सूक्तम् ३५.

आङ्गिरसो हिरण्यस्तूप ऋषिः । सविता देवता । आद्यायास्तु अग्निर्मित्रावरुणौ रात्री सविता च । त्रिष्टुप् छन्दः । १. ९ इत्येतयोर्जगती ॥

**ह्वया॑म्य॒ग्निं प्र॑थ॒मं स्व॒स्तये॒ ह्वया॑मि मि॒त्रावरु॑णावि॒हाव॑से । ह्वया॑मि॒ रात्रीं॒ जग॑तो नि॒वेश॑नीं॒ ह्वया॑मि दे॒वं स॑वि॒तार॑मू॒तये॑ ॥ १ ॥**

ह्वया॑मि । अ॒ग्निम् । प्र॒थ॒मम् । स्व॒स्तये॑ । ह्वया॑मि । मि॒त्रावरु॑णौ । इ॒ह । अव॑से ।

ह्वया॑मि । रात्री॑म् । जग॑तः । नि॒ऽवेश॑नीम् । ह्वया॑मि । दे॒वम् । स॒वि॒तार॑म् । ऊ॒तये॑ ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. [अहं] प्रथम[भूत]म् अग्निं स्वस्तये (=अस्माकमविनाशाय) ह्वयामि, मित्रावरुणौ इह अवसे (=अस्मद्रक्षणाय) ह्वयामि, जगतो निवेशनीं (=निवेशयित्रीम् =उपवेशनहेतुभूतां) रात्रीं ह्वयामि, देवं सवितारम् ऊतये (=अस्मद्रक्षणार्थं) ह्वयामि ॥

---

करीत तें या मंत्रावरून समजतें, आणि शूर असे पुत्र व्हावे म्हणून त्यांची प्रार्थना कशी होती तीहि पाहा. आलीकडे तर आम्हांपैकीं एका ब्राह्मणानें माते आर्यभूमीचे शूर पुत्र एकवीस वेळा नाहींसे करून टाकिले म्हणून आम्ही ( दुःख करावें तसें न करितां उलटा ) कसा आनंद मानितों आणि डौल मारितों तो पाहा! आणि कांहीं मागावयाचें झालें तर आम्हांस चांगली भिक्षा मिळो, आणि भिक्षा मागण्याचा जो आमचा मोठा हक्क तो दुसरा कोणी हिरावून न नेओ इतकेंच मागत असतों !

'इकडे'='अर्वाञ्चम्.' 'अर्वाञ्चम्' हें व्याकरणदृष्ट्या पाहिलें तर येथें 'रयिम्' याचें विशेषण आहे, पण 'अर्वाक्'='इकडे' या अर्थासारिखा क्रियाविशेषणाप्रमाणें त्याचा अर्थ केला पाहिजे. याप्रमाणें दुसरे प्रयोग पुष्कळ आहेत. "अर्वाञ्चं त्वा सुखे रथे वहताम् इन्द्र केशिना" (ऋ. ३. ४१. ९) इत्यादि उदाहरणें आहेत.

## सूक्त ३५.

**ऋषि**–हिरण्यस्तूप, पूर्वील सूक्ताचा जो तोच. **देवता**–सविता. **वृत्त**–त्रिष्टुप्, (परंतु पहिली आणि नववी ह्याचें वृत्त जगती).

१. [सर्वांपक्षां] प्रथम [जो] अग्नि [या]ला [मी] [माझ्या] कल्याणासाठीं बोलावितों; [मी] मित्रावरुणांस येथें संरक्षणासाठीं बोलावितों; जगताला विश्रांति देणाऱ्या रात्रीला [मी] बोलावितों, [मी] सवित्या देवाला रक्षणासाठीं बोलावितों.

## Hymn 35.

To *Savitá* or the Sun-God. Author *Hiranyastúpa* as before. Metre–*Trishtup*, except in the first and the ninth, where it is *Jagatí*.

1. I invoke Agni [as] the first for blessing, I invoke Mitra and Varuna hither for help, I invoke Night the giver of rest to the creatures, I invoke divine Savitâ for protection.

---

१. 'जगताला विश्रांति देणाऱ्या रात्रीला'='रात्रीं जगतो निवेशनीम्'. म्हणजे सर्व प्राणी दिवसभर श्रम करितात आणि रात्रीच्या वेळीं विश्रांति घेतात असें तात्पर्य.

मित्र, वरुण, आणि सविता ह्या कोणत्या देवता त्याविषयीं पूर्वी सांगितलें आहे. सविता म्हणजे सूर्यरूप देवता. या सवित्याविषयीं जरी हें सूक्त मख्यत्वें करून आहे, तथापि त्याजबरोबर अग्नि, मित्र, वरुण आणि रात्री यांचाहि धांवा या मंत्रांत केला आहे. सवित्याविषयीं या सूक्तांत काय सांगितलें आहे तें लक्षांत ठेवावें.

**आ कृष्णेन रजसा वर्तमानो निवेशयन्नमृतं मर्त्यं च ।**
**हिरण्ययेन सविता रथेना देवो याति भुवनानि पश्यन् ॥ २ ॥**

आ । कृष्णेन । रजसा । वर्तमानः । निऽवेशयन् । अमृतम् । मर्त्यम् । च ।
हिरण्ययेन । सविता । रथेन । आ । देवः । याति । भुवनानि ।
पश्यन् ॥ २ ॥

**याति देवः प्रवता यात्युद्वता याति शुभ्राभ्यां यजतो हरिभ्याम् ।**
**आ देवो याति सविता परावतोप विश्वा दुरिता बाधमानः ॥ ३ ॥**

याति । देवः । प्रऽवता । याति । उत्ऽवता । याति । शुभ्राभ्याम् ।
यजतः । हरिऽभ्याम् ।
आ । देवः । याति । सविता । पराऽवतः । अप । विश्वा । दुःऽइता ।
बाधमानः ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. सविता (=सूर्यो) देवः, कृष्णेन रजसा (=कृष्णवर्णेन लोकेन=अन्धकारमयेन अन्तरिक्षमार्गेण) आवर्तमानः (=आगच्छन्), अमृतं (=मरणरहितं देवजनं) मर्त्यं च (=मनुष्यांश्च) निवेशयन् (=स्वस्वस्थाने विश्रान्त्यर्थम् अवस्थापयन्=स्वापयन्), [मार्गे च] [विविधानि] भुवनानि (=लोकान्) पश्यन् [सन्], हिरण्ययेन रथेन (=सुवर्णनिर्मितं रथमधिष्ठाय) आयाति (=अस्मत्समीपम् आगच्छति) ॥

३. [सविता] देवः [क्वचित्] प्रवता याति (=प्रवणवता मार्गेण गच्छति), [क्वचिद्] उद्वता याति (=ऊर्ध्वदेशयुक्तेन मार्गेण गच्छति); स यजतो (=यजनीयो) [देवः] [क्वचित्] शुभ्राभ्याम् [अश्वाभ्यां] [क्वचिच्च] हरिभ्यां (=पिशङ्गाभ्यामश्वाभ्यां) याति । सविता देवः, विश्वानि दुरितानि (=पापानि=संकटानि) अपबाधमानः (=अपास्यन्=विनाशयन्), परावतः (=दूरदेशाद्) आयाति ॥

२. अंधकारानें भरलेल्या आकाशप्रदेशांतून फिरत फिरत, [आणि] अमर्त्यांस आणि मर्त्यांस विश्रांति देत देत, सविता देव भुवनें पाहात पाहात सोन्याच्या रथांत बसून येत असतो.

2. Travelling hither through dark space, sending to rest the immortals and the mortals, divine Savitâ in [his] golden car comes, observing different worlds.

३. [सविता] देव [केव्हां केव्हां] सखल मार्गानें चालतो, [केव्हां केव्हां] उंच मार्गानें चालतो, [तो] पूजनीय [देव] [केव्हां केव्हां] शुभ्र [घोड्यां]-च्या जोडीनें जातो, [आणि केव्हां केव्हां] पिंवळ्या घोड्यांच्या जोडीनें जातो; सविता देव सकल संकटें नाहींशीं करीत करीत दूर अंतरावरून येत असतो.

3. The divine [Savitâ] [now] travels on a descent, [and now] he travels on an ascent; the worshipful [Savitâ] [now] goes by a pair of white [horses] [and now] a pair of tawny horses. Divine Savitâ comes hither from a distance driving forth all dangers [before him].

---

२. भावार्थः–'सविता देव म्हणजे सूर्य जो देव तो अंधकारमय अंतरिक्षांतील मार्गानें फिरत फिरत येत असतो; तो येतां येतां मार्गांत अमर्त्यांस म्हणजे देवांस आणि मर्त्यांस म्हणजे मनुष्यादिक जे प्राणी त्यांस विश्रांतीसाठीं निजवीत निजवीत येतो. म्हणजे सूर्य अंतरिक्षमार्गानें येऊं लागला म्हणजे प्रथम अंधकार असतो; मग तो पुढें येऊं लागला म्हणजे त्याच्या मागें रात्र पडते, तेव्हां सूर्य असल्यामुळें झालेला दिवस असे पर्यंत काम करून थकलेले जे अमर्त्य आणि मर्त्य ते विश्रांति घेण्यास्तव निजावयास जातात. या प्रकारें करून अनेक भुवनें पाहात पाहात हा सूर्य, देव आपल्या सोन्याच्या रथांत बसून येत असतो.'

हा आमचा अर्थ सायणाचार्यांस संमत आहे.

'अंधकारानें भरलेल्या आकाशप्रदेशांतून'='कृष्णेन रजसा.' शब्दशः अर्थ 'काळोखाच्या प्रदेशानें' अथवा 'मार्गानें.' याच सूक्ताचा नववा व नववा मंत्र पाहा. शिवाय ऋ. १. ८२ ४; ८. ४३. ६, आणि. ८. ७७. ५. हे मंत्र पाहा.

'विश्रांति देत देत'='निवेशयन्.' याच अर्थी 'निवेशनी' हा शब्द वरील मंत्रांत आला आहे. शिवाय सवित्याविषयींच ऋ. ७. ४५. १ "आ देवः यातु सविता सुरत्नः अन्तरिक्षप्राः

अभीवृतं कृशनैर्विश्वरूपं हिरण्यशम्यं यजतो बृहन्तम् ।
आस्थाद्रथं सविता चित्रभानुः कृष्णा रजांसि तविषीं दधानः
॥ ४ ॥

अभिऽवृतम् । कृशनैः । विश्वऽरूपम् । हिरण्यऽशम्यम् । यजतः । बृहन्तम् ।
आ । अस्थात् । रथम् । सविता । चित्रऽभानुः । कृष्णा । रजांसि । तविषीम् । दधानः ॥ ४ ॥

---

### भाषायाम्.

४. यजतो (=यष्टव्यः =पूजनीयश्च), चित्रभानुः (=सुन्दरतेजोयुक्तः), कृष्णानि रजांसि (=अन्धकारमयान्=अन्तरिक्षावकाशप्रदेशान्) [ अभितः ] तविषीं (=प्रतापं) दधानो (=धारयन्=प्रसारयन्) सविता कृशनैः (=मुक्ताभिः=मुक्ताहारैः) अभिवृतं (=परिवेष्टितं-तेषां परिवेष्टनेन अलंकृतं) विश्वरूपं (=नानारङ्गं) हिरण्यशम्यं (=सुवर्णकृताः अश्वानां स्कन्धेषु रथयोजनवेलायां नियन्तुं प्रक्षेप्यमाणाः शङ्कवो यस्य तं) बृहन्तं रथम् आस्थात् (=आरूढवान्भवति) ॥

---

वहमानः अश्वैः....निवेशयन् च प्रसुवन् च भूम" असा मंत्र आहे तो पाहा.

'भुवनें'='भुवनानि'. 'भुवन'शब्दाचा अर्थ प्राणी असा जरी वेदांत होतो, तरी 'लोक,' पृथ्वीसारिखीं दुसरीं भुवनें असाहि पुष्कळ मंत्रांत होतो. हा शेवटचा आम्हीं येथें घेतला आहे.

'सोन्याच्या रथांत बसून'='हिरण्ययेन रथेन.' शब्दशः 'सुवर्णमय रथानें' असा अर्थ आहे. सवित्याचें सर्वच सुवर्णमय आहे. त्याचे डोळे सुवर्णाचे आहेत (खालीं आठवा मंत्र पाहा.) त्याचे हात सोन्याचे आहेत, त्याची जीभ सोन्याची आहे ( ऋ. ६. ७१. ३ ), तो सोन्याचें कवच घालितो ( ४. ५३. २ ), त्याच्या सभोंवती सोन्याची प्रभावळ आहे ( ३. ३८. ८; ७. ३८. १ ), आणि प्रस्तुतच्या मंत्रांत सांगितल्याप्रमाणें त्याचा रथहि सोन्याचाच आहे.

३. 'सविता म्हणजे सूर्य चालत असतां' केव्हां केव्हां त्याला खोलगटांतून चालावें लागतें, केव्हां केव्हां उंचवटयांतून चालावें लागतें; त्याच्या रथास केव्हां केव्हां ( म्हणजे दोन प्रहरच्या वेळीं ) पांढरे शुभ्र घोडयांची जोडी जोडलेली असते, आणि केव्हां केव्हां ( सकाळच्या वेळीं अरुणोदयीं वगैरे ) पिवळया घोडयांची जोडी जोडलेली असते. या प्रकारें करून दूर अंतरावरून, सर्व संकटें म्हणजे

४. मोत्यां[च्या हारां]नीं वेष्टून सजविलेला, चित्रविचित्र रंगाचा, सोन्याच्या शिवळींचा [ आणि ] मोठा [असा जो] रथ [त्याज]वर पूजनीय, सुंदरतेजस्क, [आणि] [ सर्व ] अंधकारमय अंतरिक्ष[भर] [ आपल्या ] प्रतापानें प्रगट करणारा [ असा ] सविता आरूढ होतो.

4. The adorable Savitâ of beautiful splendor, manifesting [his] energy [throughout] the dark regions of space, mounts his car, friezed with [garlands of] pearls, of variegated colours, possessed of golden yokepins and of great magnitude.

रस्त्यावरच्या अडचणी वगैरे नाहींशा करीत करीत तो येत असतो.'

या मंत्रात केलेल्या सूर्यमार्गक्रमणाविषयींच्या वर्णनापेक्षां दुसरें चांगलें वर्णन आधुनिक कोणत्या कवीस करावयाला येईल ?

४. 'सविता म्हणजे सूर्य देव रथात बसून आपल्या प्रतापानें सर्व अंधकारमय अंतरिक्षावकाशप्रदेश व्यापून टाकून येत असतो' हेंच या मंत्रात सांगितलें आहे.

यांत सवित्याच्या रथाचीं जीं विशेषणें आहेत त्यांजकडेस लक्ष्य द्यावें. तो 'मोत्यां[च्या हारां]नीं वेष्टून सजविलेला' आहे. म्हणजे मोत्यांच्या झालरी त्याच्या सभोंवती बांधलेल्या आहेत. आलीकडचे तरी जे रथ असतात, अथवा किती एक गाडग्या, त्यांलाहि सुताच्या वगैरे जाळ्यांच्या झालरी लाविलेल्या आढळतात. हीं मोत्यें म्हणजे पाहाटेस जे दहिंवराचे थेंब असतात तेच कीं काय ?—शिवाय तो रथ 'चित्रविचित्र रंगाचा' आहे, आणि 'सोन्याच्या शिवळींचा' (='हिरण्यशम्य' ) आहे. हा अर्थ सायणाचार्यांप्रमाणें केला आहे. पण रथाचे इतके दुसरे प्रसिद्ध भाग असतात. त्याविषयीं न सांगतां जुकडाच्या शेवटाला ज्या बैलाच्या बाजूला खिळ्या असतात त्या 'सोन्याच्या' असतात म्हणून ऋषि कां सांगतो ? सायणाचार्याचा अर्थ खरा असेल तर, हें सूक्त रचिलें तेव्हां रथाला घोडे आतां टांग्याला जोडतात तसे मानेवर जुकड घालून जोडीत, 'हार्नेस' घालून पाठीवर जुकड ठेवीत नसत असें अनुमान केलें पाहिजे.

'मोत्यां[च्या हारां]नीं वेष्टून सजविलेला' ='अभिवृतं कृशनैः.' 'अभिवृत' हें 'अभि + वृ' चें रूप होय; सायणाचार्य 'अभि + वृत्' चें समजतात आणि 'आसपास असणारा' असा अर्थ करून, 'कृशनैः' याचा संबंध 'विश्वरूपम्' याशीं घेऊन, 'सुवर्णानें नानारूपी' असें भाष्य करितात. आम्हीं केलेल्या अर्थास युक्तीशिवाय आणि संदर्भयोग्यतेशिवाय, " इन्द्रः हर्यन्तम् अर्जुनं वज्रं शुक्रैरभीवृतम् अपावृणोत् " (ऋ. ३. ४४. ५ ) या मंत्रावरील

**वि जनाञ्छ्यावाः शितिपादो अख्यन्रथं हिरण्यप्रउगं वहन्तः ।**
**शश्वद्विशः सवितुर्दैव्यस्योपस्थे विश्वा भुवनानि तस्थुः ॥ ५ ॥**

वि । जनान् । श्यावाः । शितिऽपादः । अख्यन् । रथम् । हिरण्यऽप्रउगम् । वहन्तः ।
शश्वत् । विशः । सवितुः । दैव्यस्य । उपऽस्थे । विश्वा । भुवनानि । तस्थुः ॥ ५ ॥

## भाषायाम्.

५. शितिपादः (=श्वेतपादाः), हिरण्यप्रउगं (=सुवर्णमयम् ईषयोरग्रं युगबन्धनस्थानं यस्य तं ) रथं वहन्तः श्यावाः (=सवितुः पिङ्गाश्वाः) जनान् (=प्राणिनो ) व्यख्यन् (=व्याख्यापयन्=विशेषेण प्रकाशितवन्तः ) । दैव्यस्य सवितुः (=सवितुर्देवस्य ) उपस्थे (=उदरे ) [ हि ] शश्वन् विशः (=शश्वत्यो विशः=सकलाः प्रजाः) विश्वा[नि] भुवनानि [च] तस्थुः (=तिष्ठन्ति=आसते ) ॥

सायणोक्तीचाहि आधार आहे. दुसरेहि प्रयोग आहेत.

'[सर्व] अंधकारमय अंतरिक्ष[भर]' ='कृष्णानि रजांसि.' 'रजांसि' ही अत्यंतसंयोगी द्वितीया समजावी.

'प्रगट करणारा'='दधानः.' अक्षरशः अर्थ 'धारण करणारा.' पण वस्त्रादिक पदार्थ प्रसिद्ध रीतीनें धारण करणें म्हणजे 'प्रगट करणें' हाच अर्थ होतो.

५. ज्यांचे पाय शुभ्र होत, [आणि] [जे] सोन्याच्या आढ्यांचा रथ वाहून आणणारे [ते] [सवित्याचे] पिवळे घोडे सर्व जग प्रगट करितात. [कारण कीं] सवित्या देवाच्या उदरांत सकल प्रजा• [आणि] सकल भुवनें असतात.

5. [Savitâ's] tawny horses, with white legs, [and] drawers of the chariot that has a golden end to its pole have manifested the people. [For] all people [and] all worlds remain in the womb of divine Savitâ.

५. या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'सफेत पायांचे जे सूर्यदेवाचे पिवळे घोडे (म्हणजे किरण) ते पाहा सकळ जगाला प्रगट करीत आहेत! हें जग अरुणोदयाचे पूर्वी दिसत नव्हतें तें आतां ह्या सूर्यकिरणांच्या योगानें दिसूं लागलें आहे. तर हें दिसण्याच्या पूर्वी कोठें होतें? सूर्याचे पोटीं सर्व प्रजा आणि सर्व लोक आईच्या उदरांत मूल राहतें तसे राहतात. तेथून सूर्यानें ह्या जगाला जन्म देऊन हें जग आज आमच्या दृष्टीस पाडलें आहे.' म्हणजे रात्रीच्या वेळीं जग नाहींसें होतें; म्हणजे तें सवित्याच्या पोटीं राहतें. आणि तो जेव्हां सकाळीं उगवतो तेव्हां माता प्रसूत होऊन तिच्या पोटांतलें मूल बाहेर पडतें आणि प्रगट होतें तसें हें जग सूर्य प्रसवून प्रगट करितो. म्हणूनच त्यास 'सविता' म्हणजे 'प्रसवणारा' असें नांव पडलें आहे. उदाहरणार्थ, यास्कानें सुद्धा 'सविता' नांवाचा हाच अर्थ सांगितला आहे. शिवाय "देवो नो अत्र सविता नु अर्थं प्रासावीद् द्विपत् प्र चतुष्पद् इत्यै" (ऋ. १. १२४. १) आणि "प्रासावीद् देवः सविता जगत् पृथक्" (ऋ. १. १५७.१) इत्यादि अनेक स्थळें आहेत.

आपण अशी कल्पना केली पाहिजे कीं, सूक्तकर्ता पहाटेस उठून पूर्वेकडेस पाहत उभा राहिला आहे, आणि सूर्यकिरण नुक्तेच दिसत आहेत आणि प्रभातदर्शन होत आहे, आणि तें पाहून त्याला जो परमानंद होत आहे तो या सूक्तांत तो वर्णीत आहे.

'सोन्याच्या आढ्याचा रथ वाहून आणणारे'='रथं हिरण्यप्रउगं वहन्तः.' 'आढा' म्हणजे रथाच्या धोंड्याच्या शेवटीं जो खालीं वांकविलेला भाग असतो तो. हाच अर्थ 'प्रउग' शब्दाचा सायण सांगतात. अजून तरी गुजराथेंत (आणि कोठं कोठें खानदेशांतहि) असे रथ असतात इतकेंच नव्हे, पण हा जो 'आढा' तो पितळेच्या अथवा रुप्याच्या पत्र्यानें मढविलेला अथवा पितळेचा किंवा रुप्याचा केलेला असतो. तेव्हां सूर्याच्या रथाचा 'प्रउग' (आढा) सोन्याचा असला म्हणून नवल नाहीं. या आढ्यावरून असा विचार सुचतो कीं, आमच्या देशांत अति पुरातन काळीं अनेक

तिस्रो द्यावः सवितुर्द्वा उपस्थाँ एका यमस्य भुवने विराषाट् ।
आणिं न रथ्यममृताधि तस्थुरिह ब्रवीतु य उ तच्चिकेतत्
॥ ६ ॥ ६ ॥

तिस्रः । द्यावः । सवितुः । द्वौ । उपऽस्था । एका । यमस्य । भुवने ।
विराषाट् ।
आणिम् । न । रथ्यम् । अमृता । अधि । तस्थुः । इह । ब्रवीतु । यः ।
ऊम् इति । तत् । चिकेतत् ॥ ६ ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. द्यावः (=द्युलोकाः) तिस्रः [सन्ति] । [तासां] द्वौ [द्यावौ] सवितुः उपस्था (=उपस्थे=उदरे) [वर्तते], एका (=शिष्टा द्यौः) यमस्य (=यमदेवस्य) भुवने (=लोके) विराषाट् (=मनुष्याणां संग्रहकर्त्री=धारयित्री) [वर्तते] । अमृता (=अमृतानि) [चन्द्रनक्षत्रादीनि ज्योतींषि] [सवितारं], रथ्यं (=रथस्य) आणिं (=रथाद्बहिरक्षच्छिद्रे प्रक्षिप्तकीलं) [रथ] इव, अधितस्थुः (=अधितिष्ठन्ति=सवितारम् अधिगम्य स्थितानि) । य उ (=यस्तु) तत् (=द्यावां त्रित्वं, तासां द्वयोः सवितुरुपस्थे स्थितत्वम्, एकायाः शिष्टाया यमस्य भुवने स्थितत्वम्, अमृतानां ज्योतिषां सवितरि अधिष्ठितत्वं च) चिकेतत् (=ज्ञातवान् स्यात् [स] इह ब्रवीतु (=कथयतु) ॥

वस्तु आणि त्याचा घाट व करणी जशी होती तशीच आतां आहे, फेरफार कांहीं झालेला नाहीं. आणि हें ग्रहण केल्यावर असें अनुमान काढावें लागतें कीं, आतां ह्या कलियुगांत आम्ही आणि आमचे घोडे, रथ, गाड्या हीं जशीं (बरीं असोत अथवा वाईट असोत) आहों तशींच (बरीं वाईट) वैदिक युगांत म्हणजे कृतयुगांत होतों, यापेक्षां भिन्न अथवा चांगलीं नव्हतों, कमीच होतों. पुढचा मंत्र पाहतां त्यावरून असें दिसून येईल कीं, वैदिक युगांत जे रथ अथवा गाड्या होत्या त्या आलीकडे जे तांगे अथवा गुजराथेंत बुरख्याच्या गाड्या किंवा साधारण खेड्यापाड्यांनीं गाड्या असतात त्यापेक्षां चांगल्या नव्हत्या. कारण कीं, प्रस्तुतकाळीं संभावित अथवा प्रतिष्ठित मनुष्याची गाडी म्हटली म्हणजे तिच्या आंखास चाकाबाहेर कुन्या असणार नाहींत, विलायती किंवा देशी तरी तेल वगैरे घालण्याचा डबा असेल. चाक अडकविण्यास नुस्ता खिळा उभा घातलेला असणार नाहीं.

६. द्युलोक तीन [ आहेत ]; [ त्यांतून ] दोन सवित्याच्या उदरांत, [ आणि ] एक यमाच्या भुवनांत [ असून ] [तो] मनुष्यसंग्राहक [ होय ]. रथाच्या कुनीवर [ राहून रथ चालतो ] तशीं [ चंद्रतारादि ] अमर [ नक्षत्रें ] [ सवित्या]वर बसून चालतात. पण ज्या कोणी तें पाहिलें असेल त्याला येथें [ पुढें येऊन ] [ तसें ] बोलूं द्या.

6. [There are] three heavens, two in the womb of Savitâ [and] one in the world of Yama, which receives the men. The immortal [stars] are mounted as on the axle-pin of a car. Here let him, who has seen that, [come forward and] say so.

६. या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'द्युलोक अथवा स्वर्गलोक तीन आहेत; त्यापैकीं दोन सूर्याच्या उदरांत म्हणजे जितक्या प्रदेशावर सूर्याचा प्रकाश पडतो तितक्या प्रदेशाचे आंत आहेत, आणि तिसरा राहिला- तो यमाच्या भुवनांत म्हणजे यमलोकांत असून मनुष्यें मेल्यावर ज्या स्वर्ग लोकांत जातात तोच तो होय; आणि चन्द्रतारकादि अमर वस्तु ज्या आहेत त्या प्रथम सांगितलेल्या सूर्योदरस्थित दोन स्वर्गांत राहतात, आणि त्या सूर्यलोकावर (म्हणजे सवितृलोकावर) अशा रीतीनें सुरक्षित राहतात कीं, गाडीच्या आंखाच्या शेवटीं चाकाच्या बाहेर छिद्रांत खिळा घातला म्हणजे चाक मजबूत राहिल्यानें गाडी जशी पडत नाहीं तशीं तीं सूर्योदरांतून पडत नाहींत. या प्रकारची रचना आहे म्हणून आम्ही ऐकितों; परंतु तेथें जाऊन ह्या सर्व गोष्टी पाहून आलेला कोण आहे? जर असेल तर त्याणें पुढें येऊन तसें आम्हांस सांगावें. आम्हांस तर वाटतें कीं, त्या गोष्टी ज्याला ठाऊक आहेत असा या पृथ्वीवर कोणी नाहीं.'

'द्युलोक तीन [ आहेत ]'='तिस्रो द्यावः.' द्युलोक अथवा स्वर्ग हे तीन आहेत असें ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. आणि असेंहि सांगितलेलें आढळतें का, या तिहींतून एक द्युलोक अति उंच आहे त्याला 'उत्तम' असें नांव आहे, दुसरा त्याच्या खालचा त्याला 'मध्यम' असें नांव आहे, आणि त्याच्याहि खालचा तिसरा त्याला 'अवम' असें नांव आहे. "यत् उत्तमे मरुत: मध्यमे वा यत् वा अवमे सुभगास: दिवि स्थ अत: न:....हविष: वित्त"=हे सौभाग्यशाली मरुतांनो, तुम्ही अगदीं वरच्या द्युलोकांत अथवा मधल्या द्युलोकांत अथवा अगदीं खालच्या द्युलोकांत असलां तरी तेथून आमचें हें हवि स्वीकारून घ्या, ( ऋ. ५. ६०. ६ ). "नराशंसः....अज्ञन् तिस्रः दिवः प्रति मह्ना सुऽअर्चिः"=उत्तम-

तेजस्क अग्नि आपल्या महिम्यानें तीनहि द्युलोकांस एकामागून एक प्रगट करिता झाला. २. ३. २ "त्रिः अन्तरिक्षं सविता महित्वना त्री रजांसि परिभूः त्रीणि रोचना। तिस्रो दिवः पृथिवीः तिस्रः इन्वति...."='सविता आपल्या महिम्यानें त्रिगुणित अंतरिक्षाला, त्रिभुवनाला, त्रिलोकाला, तीन द्युलोकाला आणि तीनपृथ्वींला व्यापून राहतो,' ४. ५३. ५. "तिस्रो द्यावो निहिता अन्तरस्मिन्.... । गृत्सो राजा वरुणश्चक्रे एतं दिवि प्रेङ्खं हिरण्ययं शुभे कम्"=या वरुणाच्या पोटांत [ अगदी वरचा, मधला आणि खालचा असे ] तीन द्युलोक आहेत. स्तवनीय वरुणराजानें ह्या सवर्णमय सूर्याला झोपाळ्याप्रमाणें शोभेसाठीं द्युलोकांत ठेविलें आहे' ७. ८७. ५. शिवाय ऋ. ७. १०१. ४; २. २७. ८; ५. ६९. १ हे मंत्र पाहा. वर जे ४. ५३. ५ आणि ७. ८७. ५ हे मंत्र दिले त्यांजवरील सायणभाष्य पाहतां असें दिसून येतें कीं, हे तीन द्युलोक अथवा स्वर्ग म्हणजे वेगवेगळे लोक नव्हेत; तर एकच द्युलोक अथवा स्वर्ग असून त्याचे वरचा, मधला, आणि खालचा असे तीन जे भाग तेच तीन द्युलोक समजावयाचे. आणि वर सांगितलेल्या सर्व मंत्राचा लक्ष्यपूर्वक विचार करितां तसेंच दिसतें खरें.

'[ आणि ] एक यमाच्या भुवनांत [ असून ] मनुष्यसंग्राहक होय '= 'एका यमस्य भुवने विराषाट्.' म्हणजे तिसरा जो स्वर्ग राहिला तो यमलोकांत आहे, आणि मेलेले मनुष्य तेथें जातात त्यांचा संग्रह त्यांत होतो. तीन द्युलोक ( अथवा द्युलोकभाग ) सांगितले त्यांतून यमभुवनांतला जो तो कोणता, म्हणजे अगदी वरचा, मधला कीं खालचा, तें समजत नाहीं. सायणाचार्य तीन द्युलोक म्हणजे द्युलोक, अंतरिक्ष आणि पृथ्वी हे जे तीन लोक तेच होत असें म्हणतात, आणि अंतरिक्ष लोक तोच यमभुवनांतला द्युलोक असें म्हणतात.

'रथाच्या कण्यांवर [राहून रथ चालतो ] तशीं [ चंद्रतारकादि ] अमर [ नक्षत्रें ] [सवित्या]वर बसून चालतात '=आणि न रथ्यम अमृता अधितस्थुः.' हा अर्थ आम्हीं सायणांस अनुसरून केला आहे. पण ही उपमा आणि यांतील शब्दरचना हीं विलक्षण आहेत यांत संशय नाहीं.

'त्याला येथें [पुढें येऊन ] [तसें ] बोलूं द्या'='इह ब्रवीतु.' अशा प्रकारचाच प्रयोग दुसऱ्या एका ठिकाणीं आला आहे. 'इह ब्रवीतु य ईम अङ्ग वेद अस्य वामस्य निहितं पदं वेः'='आकाशांत चालत असतांना या प्रियकर अग्निरूपी सूर्याचें पाऊल उमटलेलें जो जाणत असेल त्याला येथें पुढें येऊन तसें बोलूं द्या,' ऋ. १. १६४. ७.

एकंदरींत हा प्रस्तुतचा मंत्र कठिण आहे. कितीएक शब्द कठिण असून, मंत्रवक्त्याच्या, मनांत खरोखर काय कल्पना आहे तें नीट समजत नाहीं, आणि एक उपमा आहे तीहि संदिग्ध आहे. 'उपस्था' ही आम्हीं सायणांप्रमाणें सप्तमी घेतली आहे , तथापि 'उपस्थ' शब्दाची 'उपस्था' ही सप्तमी होईल कीं नाहीं याविषयीं संशय आहे. पण ऋ. १. १२४. ५ यांतहि (तो मंत्र व भाष्य पाहा; त्यांत, 'उभा'='उभौ' शब्दाचा सायणांनीं केलेला निर्वाह

चांगला आहे ) 'उपस्था' शब्द आला आहे तेथें सायणाचार्य ती सप्तमीच समजतात. यावरून आणि 'उपस्था' ही प्रथमेची द्विवचनविभक्ति म्हणावी तर ऋग्वेदांत 'उपस्थ' शब्द पुष्कळ ठिकाणीं आला आहे तरी द्विवचनीं कधीं नाहीं, एकवचनींच नित्य येतो यावरून, 'द्वौ उपस्था' म्हणजे 'दोन स्वर्ग सवित्याचे उपस्थ होत' असें न करितां 'द्वौ द्यावौ उपस्थे' असें आम्हीं सायणानुसरानें केलें आहे. तथापि 'तिस्रो द्यावः' असें मंत्रारंभीं स्त्रीलिंगी आहे तेव्हां ( द्युशब्द उभयलिंगी आहे तथापि ) 'द्वे उपस्था' असें असावयाचें होतें. कारण एकच पादांत उभयलिंगी शब्दाचा झाला तरी उभयलिंगानीं प्रयोग असंभवनीय आहे. दुसरें; 'अमृता' शब्दाचा अर्थ सायण देखील निश्चयानें सांगू शकत नाहींत. "चंद्रतारकादि अमर नक्षत्रें" अथवा "उदकें" असा अर्थ ते करितात.

'यमाच्या भुवनांत.' यमदेवतेविषयीं अर्वाचीन ग्रंथांत म्हणजे पुराणादिकांत ज्या कथा आहेत त्यांत आणि वेदांत जें सांगितलें आहे त्यांत बरेंच अंतर आहे अर्वाचीन काळीं यम हा पातकी मनुष्यांस मरणानंतर दंड करितो आणि चित्रगुप्तादि त्याचे कारकून मनुष्यांचीं जीं पुण्यें आणि पातकें त्यांचा हिशोब राखतात असें सांगितलें आहे; यम म्हणजे भयंकर काळ, क्रूर, दयाहीन देव आहे अशी बहुत करून आपली समजूत आहे. पण वेदांत यमाविषयीं असें सांगितलें आहे कीं, यम आणि यमी हीं बहीणभावंडें 'गंधर्वाचीं' अथवा विवस्वताचीं ( म्हणजे आकाशाचीं अथवा सूर्याचीं ऋ. १०. १०. ४ यावरील सायणभाष्य पाहा ) मुलें होत. त्यांची आई 'अप्या अथवा 'सरण्यू' (म्हणजे उषा अथवा उषःकाल) ही होय. विवस्वताचा पुत्र म्हणून यमास वैवस्वत असें नांव आहे. त्याला पितरांचा राजा बाप (विश्पतिः पिता पुराणाम् ऋ. १०. १३५. १) असें म्हटलें आहे. जे पुण्यवंत प्राणी मरणानंतर स्वर्गीं जातात त्यांला तो तेथें जागा तयार करून ठेवितो असें ऋ. १०. १८. १३ यांत दर्शविलें आहे. मरून जे प्राणी स्वर्गांत जातात त्यांचा राजा यम आहे ( ऋ. १०. १४. ७ ). यावरून यम म्हणजे पहिला मरून स्वर्गांत गेलेला मनुष्य असावा असें वाटतें. यम याला एका मंत्रांत मृत्यु असें म्हटलें आहे असें दिसतें ( 'यस्य दूतः प्रहित एष एतत्तस्मै यमाय नमो अस्तु मृत्यवे' ऋ. १०. १६५. ४ ). याशिवाय यम क्रूर आहे अथवा तो पीडा करितो याविषयीं ऋग्वेदांत कांहीं सांगितलेलें आढळत नाहीं. मात्र इतकें आढळतें कीं, यमाचे सारमेय म्हणून दोन कुत्रे आहेत. त्यांला चार डोळे आहेत आणि त्यांच्या नाकपुड्या विक्राळ आहेत. ते मेलेल्या मनुष्यांस अडवितात आणि स्वर्गांत जाऊं देत नाहींत; आणि ते यमाचे दूत आहेत आणि मनुष्यांमध्यें ते फिरत असतात असें सांगितलें आहे. ऋ. १०. १४. १० यांत प्रेताला ( सायणाचार्य म्हणतात प्रेतप्राणाला घेऊन जाणाऱ्या अग्निला ) असें म्हटलें आहे कीं, 'हे प्रेता, यमाचे जे दोन सारमेय ( सरमा कुत्रीला झालेले ) चित्रविचित्र रंगाचे आणि चार डोळ्यांचे कुत्रे, त्यांस चुकवून तूं चांगल्या मार्गानें जा. आणि यमाबरोबर सुख

वि सुपर्णो अन्तरिक्षाण्यख्यद्गभीरवेपा असुरः सुनीथः ।
क्वे३दानीं सूर्यः कश्चिकेत कतमां द्यां रश्मिरस्या ततान ॥ ७ ॥

वि । सुऽपर्णः । अन्तरिक्षाणि । अख्यत् । गभीरऽवेपाः । असुरः । सुऽनीथः ।
क्व । इदानीम् । सूर्यः । कः । चिकेत । कतमाम् । द्याम् । रश्मिः । अस्य । आ । ततान ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. गभीरवेपाः (=गम्भीरं दूरगामि वेपः पक्षयोः कम्पनं पक्षाघातेन कृतं नीचैः-स्थितवस्तूनां कम्पनं यस्य सः) सुनीथः (=शोभनप्रापणः=मार्गप्रकाशनेन अभीष्टदेशं प्रापयन्) असुरः सुपर्णः (=देवः सवितृरूपी पक्षी) अन्तरिक्षाणि (=अन्तरिक्षप्रदेशान्) व्यख्यत् (=प्रकाशयति) । इदानीं (=रात्रौ=अपररात्रे) [स] सूर्यः क्व [वर्तते] ? [एतत्] कश्चिकेत (=को वेद)? [इदानीं] कतमां द्यां तस्य रश्मिः (=प्रकाशः) आततान (=व्याप्नोति)?

भोगणारे जे आम्हा लोकांचे सुखी वाडवडील त्यांस जाऊन मीळ' ("अति द्रव सारमेयौ श्वानौ चतुरक्षौ शबलौ साधुना पथा । अथा पितॄन्सुविदत्राँ उपेहि यमेन ये सधमादं मदन्ति"). गरुडपुराणांत यमाविषयीं, यमराज्याविषयीं, यमलोकाच्या रस्त्याविषयीं, त्या रस्त्यावरच्या नद्यांविषयीं आणि अनेक दानें दिलीं तरच त्यापलीकडे जावयास मिळतें याविषयीं वगैरे ज्या भयंकर आणि प्रचंड कथा आहेत, त्यांचा पत्ता ऋग्वेदांत नाहीं इतकेंच नव्हे, पण त्यांचें बीज सुद्धां येथें आढळत नाहीं.

७. ज्याचें चालन गंभीर [होय], [आणि] [जो] उत्तम मार्गदर्शक [होय] तो देव सुपर्ण अंतरिक्षप्रदेशांला प्रकाशानें प्रगट करीत आहे. या वेळीं [तो] सूर्य कोठें आहे? [आणि तो कोठें आहे तें] कोणास ठाऊक आहे? त्याचा प्रकाश आतां कोणत्या द्युलोकावर पसरला आहे [बरें]?

7. The great Divine Bird, the motion [of] whose [wings] is [felt] deep [below], [and] whose guidance is excellent, shines upon and makes visible the aerial regions. Where is the sun now? Who knows? What heaven is his light enlightening?

---

७. आपण अशी कल्पना केली पाहिजे कीं रात्र संपत आली आहे आणि आकाशांत नक्षत्र थोडथोडा उजेड दिसल्यासारिखें होत आहे, आणि दिशा फाकत आहेत. तेव्हां कवि आकाशाकडेस पाहून म्हणतो कीं, 'सविता देव हाच जो कोणी आकाशांतून उडत जाणारा मोठा पक्षी (सुपर्णः) तो अंतरिक्षप्रदेशास नुकताच प्रगट करीत आहे, म्हणजे अंधकारांतून बाहेर काढीत आहे. त्याचें चालन म्हणजे प्रकाशानें सर्व भूतांकडून हलन चलन करविणें हें गंभीर आहे=तो दूर पृथ्वीच्या खालीं खोल असतानांहि तेथून अथवा उंच आकाशांत असतां तेथून खालीं सर्व प्राण्यास पुनर्जीवित करितो, तो आपल्या प्रकाशानें मानवादिक प्राण्यास मार्ग दाखविणारा होय. तर असा जो सूर्य, तो यावेळीं कोठें आहे? आणि कोठें आहे तें कोणास ठाऊक आहे? वरच्या मंत्रांत जे तीन स्वर्ग सांगितले, त्यांतून तो कोणत्या स्वर्गास (द्युलोकास) आपल्या प्रकाशानें या वेळीं प्रज्वलित करीत आहे?'

'ज्याचें चालन गंभीर'='गभीरवेपाः'. म्हणजे जो क्षितिजाच्या खालीं असतांहि अथवा आकाशांत उंच असतांहि त्याचे किरण पृथ्वीवर आणि आकाशांत पसरतात आणि सकल प्राण्यादिकांस जसे काय पुनर्जीवित करितात. अक्षरशः अर्थ 'ज्याचें कांपणें किंवा हालणें खोलपर्यंत जातें.' हें विशेषण सूर्यरूपी सुपर्णाचें म्हणजे पक्ष्याचें आहे. जसा मोठा पक्षी उडूं लागला म्हणजे त्याच्या पाखांचा वारा आसपास आणि खालीं पुष्कळ अंतरावर लागतो तसा हा सूर्यरूपी सुपर्ण उडूं (=जाऊं) लागला म्हणजे त्याच्या उडण्याचा वारा लागून दूरदूरचे आणि पुष्कळ अंतरावरील खालचे वृक्षादिक पदार्थ जणुं काय हालत असतात.

'सुपर्ण.' या ठिकाणीं 'सुपर्ण' म्हणजे सूर्यरूपी जो सविता देव तोच होय. त्याला 'सुपर्ण' म्हणजे 'चांगला उड-

अष्टौ व्यख्यत्ककुभः पृथिव्यास्त्री धन्व योजना सप्त सिन्धून् ।
हिरण्याक्षः सविता देव आगाद्दधद्रत्ना दाशुषे वार्याणि ॥ ८ ॥

अष्टौ । वि । अख्यत् । ककुभः । पृथिव्याः । त्री । धन्व । योजना । सप्त । सिन्धून् ।
हिरण्यऽअक्षः । सविता । देवः । आ । अगात् । दधत् । रत्ना । दाशुषे । वार्याणि ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. [पश्य पश्य ] हिरण्याक्षः (=हिरण्यमयाक्षो ) देवः सविता पृथिव्या अष्टौ ककुभः (=दिशो ) व्यख्यत् (=प्रकाशितवान्=प्रकाशेन=दृष्टिगोचराः करोति ), [पश्य पश्य] त्रीणि योजनानि (=आ त्रियोजनेभ्यो ) धन्वानि (=भूमिप्रदेशान् ) सप्त सिन्धून् (=मेघोदकोपलक्षितान् अन्तरिक्षप्रदेशान् ) [ च ], दाशुषे (=हविर्दत्तवते=उपासकाय ) वार्याणि (=वरणीयानि=उत्तमानि ) रत्नानि (=धनानि ) दधत् (=धारयित्वा आनयन् ), [ व्यख्यत् ] ॥

णारा पक्षी' असें म्हणण्याचें कारण असें कीं, तो आकाशांतून जणुं काय पूर्वेकडून पश्चिमेकडे पक्ष्याप्रमाणें दररोज पुष्कळ उडतच जातो. सूर्याला 'दिव्य सुपर्ण' म्हणजे 'द्युलोकांतून फिरणारा पक्षी' असें ऋग्वेदांतील कितीएक मंत्रांत म्हटलें आहे, ( ऋ. १. १६४. ४६ ''इन्द्रं मित्रं वरुणम् अग्निम् आहुः अथो दिव्यः स सुपर्णो गुरुत्मान्'' ). तसाच त्याला केव्हां केव्हां 'अरुष' वर्णाचा म्हणजे 'आरक्त वर्णाचा पक्षी' असें वेदांत म्हटलें आहे (ऋ. ५. ४७. ३ ''उक्षा समुद्रो अरुषः सुपर्णः पूर्वस्य योनिं पितरा विवेश । मध्ये दिवो निहितः'' इ० ). आणि त्याला 'अरुण' ( म्हणजेहि 'आरक्तवर्णाचा पक्षी' ) असें नांव आहे. आकाशांतून पक्ष्याप्रमाणें फिरतो म्हणून सूर्यास जसें 'सुपर्ण' म्हणतात तसेंच चंद्राहि तसाच फिरतो म्हणून त्यालाहि वेदांत 'सुपर्ण' असें पुष्कळ ठिकाणीं म्हटलेलें आढळतें. जसें ''चन्द्रमा अप्सु अन्तरा सुपर्णो धावते दिवि'' (ऋ १. १०५. १) ''सुपक्षी चंद्रमा आकाशांत धांवतो.'' ऋ. १. १६४. २० हाहि मंत्र पाहा.

'देव'='असुरः'. 'असुर' शब्दाचा अर्थ 'देव' असा कसा होतो त्याविषयीं सूक्त २४ मंत्र १४ यावरील टीप पाहा.

८. तो पृथ्वीच्या आठ दिशा प्रकाशित करीत आहे [ पाहा ], [ आणि ] तीन योजनें [पर्यंत ] भूमि [ आणि ] अंतरिक्ष यांस प्रकाशित करीत आहे [ पाहा ]; हिरण्याक्ष सविता देव हविर्दात्यासाठीं उत्तम धनें घेऊन येत आहे [ पाहा ].

8. [Lo] he shines upon and makes visible the eight quarters of the globe, [and] [makes visible] the dry land and the firmament for three leagues; [lo !] the golden-eyed God Savitâ comes, bringing choice wealth for the worshipper.

---

८. नुकाच अरुणोदय होऊन दिशा फाकत आहेत, आणि पूर्वेकडील थोडासा भूमिभाग व थोडासा अंतरिक्षभाग उजळत चालला आहे असें पाहून सूर्यरूपी सोन्याच्या डोळ्यांचा देव येत आहे आणि येतांना आपणाबरोबर उपासकाकरितां उत्तम उत्तम संपत्ति आणीत आहे अशी सप्रेम स्वभावोक्ति या मंत्रांत केली आहे.

'तीन योजनें [ पर्यंत ]'='त्री योजना.' 'योजन' शब्दाचा मूळ अर्थ '[ घोड्यांची ] जोडी.' त्यापासून गाडीस घोड्यांची एक जोडी जोडून ( युज् धातूचा अर्थ 'जोडणें', 'जुंपणें' असा होतो ) जितकें अंतर जाववेल तितकें अंतर. त्यापासून चार कोस असा पुढें अर्थ होऊं लागला. प्रस्तुत मंत्रांत 'योजन' म्हणजे अशा प्रकारचेंच एक लहानसें माप घेतलें पाहिजे. अजून तरी 'वावेइतका' किंवा 'वीतभर' सूर्य उगवला होता तेव्हां मी अमुक काम केलें असें म्हणण्याची चाल गुजराथेंत आणि महाराष्ट्रांत आहे. 'त्री धन्व योजना' या शब्दाचा अर्थ सायणाचार्य "प्राण्यांकडून आपआपल्या भोग्य वस्तूंचा उपभोग घेवविणारे जे पृथिवी, अंतरिक्ष, आणि द्यु असे तीन लोक त्यांस" असा करितात. पण 'योजन' शब्द वेदांत अन्य ठिकाणीं आला आहे तेथें कोणत्याच स्थळीं 'आपल्या उपभोग्य वस्तूंचा उपभोग घेवविणारा' असा तो अर्थ करीत नाहींत.

'अंतरिक्ष'='सप्त सिन्धून्.' शब्दशः अर्थ 'सात सिंधु' असा आहे. सिंधु याचा अर्थ प्रथम नदी असा होता. नंतर सिंधु म्हणून जी मोठी नदी तिचें नांव हा दुसरा अर्थ. ( हा अर्थ ऋ. ५. ५३. ९; १०. ६४. ९; आणि ३. ३३. ३ या स्थळीं विवक्षित दिसतो ). नंतर सिंधु आणि ( तिच्या आसपासच्या ) दुसऱ्या नद्या मिळून सात नद्या यांस 'सप्त सिंधु' (=सात नद्या ) असें पुष्कळ ठिकाणीं आलेलें आढळतें. या 'सात नद्या' म्हणजे कोण कोण त्याविषयीं निश्चयानें सांगवत नाहीं. सायणाचार्य गङ्गा, यमुना 'सरस्वती' शुतुद्री परुष्णी, असिक्नी आणि वितस्ता ह्या ( ऋ. १०. ७५. ५ यांत लिहिलेल्या) सात नद्या असें म्हणतात; तें म्हणणं मान्य केलें तर सिन्धु आणि शुतुद्री या एकच असें ३. ३३. ३. यावरून दिसून येईल. पण ह्याच त्या सात नद्या

**हिरण्यपाणिः सविता विचर्षणिरुभे द्यावापृथिवी अन्तरीयते ।**
**अपामीवां बाधते वेति सूर्यमभि कृष्णेन रजसा द्यामृणोति ॥ ९ ॥**

हिरण्यऽपाणिः । सविता । विऽचर्षणिः । उभे इति । द्यावापृथिवी इति । अन्तः । ईयते ।
अप । अमीवाम् । बाधते । वेति । सूर्यम् । अभि । कृष्णेन । रजसा । द्याम् । ऋणोति ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. हिरण्यपाणिः (=सुवर्णमयहस्तो) विचर्षणिः (=विशेषेण द्रष्टा=विश्वस्य भुवनस्य द्रष्टा) सविता उभे द्यावापृथिवी अन्तः (=उभयोर्द्यावापृथिव्योर्मध्ये) ईयते (=गच्छति); [सः] अमीवा (=रोगम्) अपबाधते (=निराकरोति), [स] सूर्यं वेति (=गमयति), द्यां (=द्युलोकं) [च] कृष्णेन रजसा (=अन्धकारमयेन अन्तरिक्षमार्गेण) अभि ऋणोति (=अभिगच्छति=अभिधावति) ॥

असाव्या असें म्हणण्यास कारण हें कीं, वैदिक युगात आर्यजन यमुने गङ्गे पर्यंत आले नसतील. [illegible] सात नद्या [illegible] असल्या तरी 'सात नद्या' (=सप्त सिन्धु) असें प्रसिद्ध नदीसप्तकाविषयीं ऋग्वेदात पुष्कळ ठिकाणीं आलें आहे. जसें:—"यः ऋक्षात् अंहसः मुचत यः वा आर्यात् सप्त सिन्धुषु"='जो इंद्र सप्त सिंधूंच्या तीरीं म्हणजे सप्त सिंधु प्रदेशात राहणाऱ्या उपासकास राक्षसांनीं (=अनार्यांनीं) अथवा आर्यांनीं केलेल्या उपद्रवापासून रक्षील' (ऋ. ८. २४. २७), 'तस्य इत् इमे प्रवणे सप्त सिन्धवः वयः वर्धन्ति'='त्याच इन्द्राच्या अनुरोधानें या सात नद्या धान्य पिकावितात,' (ऋ. १०. ४३. ३). शिवाय ऋ. ९. ६६. ६, आणि ८. ९६. १ हेहि मंत्र पाहा. 'प्रसिद्ध सात नद्या' या अर्थावरून त्या प्रसिद्ध सात नद्यांतील पाणी ज्यापासून येतें तीं 'मेघोदकें' असा मागाहून अर्थ होऊं लागला, आणि तीं मेघोदकें कोट्यावधि किंबहुना असंख्य कोट्यावधि धारांनीं जरी जमिनीवर पडतात आणि तीं सर्वच 'प्रसिद्ध सात नद्यांत' न पडलीं आणि जमिनीवर पडलीं तथापि त्या मेघोदकास 'सप्तसिन्धु' असें नाव पडलें. मेघोदकास 'सप्त सिन्धु' असें ज्यात म्हटलें आहे तसे अनेक मंत्र वेदात आहेत. उदाहरणार्थः—"यः हत्वा अहिम् अरिणात् सप्त सिन्धून्"='जो इन्द्र वृत्ररूप सर्पास मारून सप्त सिन्धूंस म्हणजे मेघोदकास वाहविता झाला,' (ऋ. २. १२. ३; ४. २८. १; १०. ६७. १२.) "यः तुविष्मान्

९. हिरण्यपाणि [आणि] सर्वदर्शी सविता द्यु[लोक] [आणि] पृथ्वी [या] उभयतांमधून चालतो; [तो] रोगाला नाहींसा करितो, [आणि] सूर्याला चालवितो [आणि] अंधकारमय अंतरिक्षमार्गानें द्यु[लोका]कडे गमन करितो.

9. The golden-handed [and] far-seeing Savitâ travels between both heaven [and] earth; [he] chases away disease, [he] makes the sun to go, [he] ascends the heaven through the dark [regions of] space.

अवासृजत् सर्तवे सप्त सिन्धून्'='जो बुद्धिमान् इन्द्र सप्त सिन्धूंस म्हणजे मेघोदकांस, वाहण्यासाठीं, खालीं ओतिता झाला' (ऋ. २. १२. १२.) इत्यादि प्रयोग आहेत. यावरून ज्या प्रदेशात मघोदकें असतात त्या प्रदेशास म्हणजे अंतरिक्षास जसें 'आपः' (=उदकें) आणि 'समुद्र' (म्हणजे सागर) हें नांव आहे (ऋ. १. ९५. ३; १. १०५. १; ८. १२. २; १. ४७. ६) तसेंच 'सप्त सिन्धु' हें नांव प्रस्तुत मंत्रात अंतरिक्षास दिलें आहे, आणि यात विशेष नवल वाटण्यासारिखें नाहीं. कारण कीं जसें पांच नद्या ज्यांत वाहतात त्या भूमिप्रदेशास 'पंजाब' हें नांव आहे, तसेंच अंतरिक्षप्रदेशात 'सप्त सिन्धु' म्हणजे मेघोदकें अभ्ररूपानें असतात म्हणून त्या अंतरिक्षप्रदेशालाहि 'सप्त सिन्धु' हें नांव पडलें.

'हिरण्याक्ष'. सवित्या देवाचें म्हणजे सूर्याचें सर्वच सुवर्णमय आहे म्हणून या सूक्ताच्या आरंभीं सांगितलेंच आहे. प्रभातकाळीं क्षितिजाच्या कांठावर सूर्यबिंबाचा उदय होत असतांना ज्यांनीं कविदृष्टीनें त्याजकडेस कधीं तरीहि पाहिलें असेल त्यांस या विशेषणाविषयीं कांहीं सांगावयास नको.

९. 'सोन्याच्या हाताचा आणि विश्वदर्शी सविता द्युलोक आणि भूलोक या दोहोंच्या मधून मार्गक्रमण करितो; आणि तो जसजसा चालतो तसतसा रोगाचा नाश करीत करीत जातो. तो सूर्याला (म्हणजे आम्हांस तेजःपुंज जो सूर्यगोळ दिसतो त्याला) चालवितो, आणि तो येण्यापूर्वी ज्या अंतरिक्षप्रदेशात अंधकार भरलेला असतो त्या प्रदेशातील मार्गानें चालत चालत द्युलोकाकडेस जातो' असा कवीचा अभिप्राय आहे. या मंत्रात केवळ स्वभावोक्तीचें वर्णन आहे. त्यात विशेष इतकें आहे कीं, सविता आणि सूर्य हे निराळे मानिले आहेत. त्याचा हेतु असा कीं, सूर्य आणि सविता हे जरी वस्तुतः एकच आहेत तथापि सविता म्हणजे सूर्यावरची देवता आणि सूर्य म्हणजे जो आमच्या दृष्टीस पडतो तो तेजःपुंज गोळ असा भेद केव्हां केव्हां वेदांत दृष्टीस पडतो. बहुतकरून हा भेद राखिलेला नाहीं, तथापि क्वचित् आढळतो खरा. उदाहरणार्थः—ऋ. १. १२३. ३ यांत 'कुलहितचिंतक सविता

**हिरंण्यहस्तो असुरः सुनीथः सुमृळीकः स्ववाँ यात्वर्वाङ् ।**
**अपसेधन्रक्षसो यातुधानानस्थाद्देवः प्रतिदोषं गृणानः ॥ १० ॥**

हिरंण्यऽहस्तः । असुरः । सुऽनीथः । सुऽमृळीकः । स्वऽवान् । यातु । अर्वाङ् ।
अपऽसेधन् । रक्षसः । यातुऽधानान् । अस्थात् । देवः । प्रतिऽदोषम् । गृणानः ॥ १० ॥

## भाषायाम्.

१०. हिरण्यहस्तः (=सुवर्णमयहस्तः) सुनीथः (=सुष्ठु नेता=सुप्रापणः) सुमृळीकः (=सुष्ठु सुखयिता) स्ववान् (=धनवान्, स्ववाः=शोभनरक्षणोपेतो वा) असुरो (=देवः) [ सविता ] अर्वाङ् यातु (=आयातु) । प्रतिदोषं (=प्रतिरात्रि) गृणानः (=गीर्यमाणः=गीर्णः=स्तुतो) देवः [ सविता ] रक्षसः (=अहितकारिणो) यातुधानान् (=असुरान्=राक्षसान्) अपसेधन् (=निराकुर्वन्) अस्थात् (=तिष्ठति=आस्ते) ॥

देव हा आम्हीं सूर्याविषयीं पातक केलेलं नाहीं असें म्हणो' ("देवः नः अत्र सविता दमूनाः अनागसः वोचति सूर्याय") असें सांगितलें आहे; ऋ. ५. ८१. ४ यांत सविता देव सूर्याच्या किरणांत जाऊन मिळतो ("उत सूर्यस्य रश्मिभिः समुच्यसि") असें सांगितलें आहे; ऋ. १०. १३९. १ यांत सवित्यास 'सूर्यरश्मि' असें विशेषण दिलें आहे. हीं व दुसरीं सूर्य आणि सविता याच्या भिन्नत्वाविषयीं उदाहरणें झालीं. आतां दोघांच्या एकत्वाविषयीं तर फारच आहेत. ऋ. ४. १४. २, १०. १५८. १ इत्यादि मंत्र पाहा. प्रस्तुत मंत्रांत सायणाचार्य म्हणतात कीं, "जरी सविता आणि सूर्य हे एकच आहेत तरी मूर्तिभेदामुळें (म्हणजे रूपान्तरत्वा-मुळें.) सूर्याला सविता" चाळवितो असें म्हटलें आहे.

'सर्वदर्शी'='विचर्षणिः.' हा अर्थ आम्हीं सायणास अनुसरून केला आहे, आणि ऋग्वेदांत हा शब्द पुष्कळ स्थळीं आला आहे तीं सर्व स्थळें तपासून पाहतां आणि 'चर्षणि', 'विश्वचर्षणि' इत्यादि शब्दांचे प्रयोग वेदांत आले आहेत ते सर्व तपासून पाहतां आचार्यांचा अर्थ योग्य दिसतो. जे विद्वान् 'विचर्षणि' याचा अर्थ 'चपळ' असा करितात त्यास कांहींच योग्य आधार नाहीं असें आम्हास वाटतें. 'विचर्षणि' हें विशेषण अग्नीस, इंद्रास, सोमास, इंद्राग्नींस व सवित्यास वगैरे देवतांस लाविलेलें आढळतें; त्याचा अर्थ 'वि-

१०. हिरण्यहस्त, मार्ग दर्शविणारा, सुख देणारा, [आणि] धनवान् [ सविता ] देव इकडे येओ. ज्याचें प्रतिरात्रीं [ मनुष्यें ] स्तवन करितात तो [ सविता ] देव उपद्रवकारक राक्षसांस हाकून देत राहतो.•

10. May the golden-handed spirit [Savitâ], the excellent guide, the giver of happiness [and] possessed of riches, come hitherward; [that] god praised every night [by men] drives off the harmful sorcerers.

---

शेषेंकरून पाहणारा,' 'विश्वदर्शी' अथवा 'प्रज्ञावान्' असा होत असतो.

'सूर्याला चालवितो'='वेति सूर्यम्.' सायणाचार्य 'सूर्याप्रत जातो' असा अर्थ करितात. आम्हीं केलेल्या अर्थास ऋ. ६. १२. ६, ३. ८. ७ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य यांचा आधार आहे. शिवाय ऋ. ७. १९. ६ हाहि मंत्र पाहा. ऋ. ७. २७. ५ आणि १. १२७. ५ हे मंत्र पाहूं गेलें असतां 'वेति सूर्यम्' म्हणजे 'सूर्याला घेऊन येतो' असाहि अर्थ चांगला संभवतो.

'अंधकारमय अंतरिक्ष मार्गानें'='कृष्णेन रजसा.' याच सूक्ताचा मंत्र २ यांजवरील टीप पाहा.

---

१०. 'सूर्य मावळल्यावर अंधकारांत सर्व जग बुडून जातें आणि आम्ही निराधार मनुष्यें सवित्या देवाची रात्रीच्या वेळां प्रार्थना करीत असतों कीं, हे सवित्या, तूं गेला आहेस आणि हा सर्वव्यापी अंधकार जिकडे तिकडे पडल्यामुळें जादूकार, राक्षस, निशाचर वगैरे आम्हांस त्रास देतील, तर हे देवा सवित्या, यांस तूं हाकून लाव. तर अशी प्रतिरात्रीं आम्ही सवित्याची प्रार्थना करितों तेव्हां जो त्या सर्वांस हाकून लावितो असा सविता आतां उगवो आणि इकडे येओ' असा कवीचा भावार्थ.

'धनवान्'='स्ववान्' हा अर्थ आम्हीं सायणाचार्यांस अनुसरून केला आहे. आणि ते जो हा अर्थ करितात तो 'स्वऽवान्' असा पदांत पाठ आहे त्यावरून करितात यांत संशय नाहीं. परंतु 'स्ववान्' हा शब्द ज्या ज्या मंत्रांत आला आहे ते सगळे मंत्र वाचून पाहतां कितीएक मंत्रांत 'धनवान्' हा सायणाचार्यांनीं केलेला अर्थ जरा चालेल, तथापि 'सु+अवस्'='स्ववास्'='स्ववान्' अशी व्युत्पत्ति करून 'सुरक्षणकारक' असा अर्थ बऱ्याच मंत्रांत इष्ट दिसतो. 'स्ववसम्', 'स्ववसा' आणि 'स्ववसः' हीं रूपें जेथें आलीं आहेत (ऋ. ५. ६०, १, ५. ८. ३, १०. ३६. २, १. ९३. १, ४ ३३ ७, ६. ५१. ११. ) तेथें पदपाठांत 'सुऽअवसम्,' 'सुऽअवसा' आणि 'सुऽअवसः' असा छेद असल्यामुळें, त्या बहुत करून सर्व स्थळीं सायणाचार्य 'सुरक्षणकारक' असा अर्थ करितातच. तेव्हां 'स्ववान्' हें 'स्ववास्' याबद्दल आर्ष

ये ते पन्थाः सवितः पूर्व्यासोऽरेणवः सुकृता अन्तरिक्षे ।
तेभिर्नो अद्य पथिभिः सुगेभी रक्षा च नो अधि च ब्रूहि
देव ॥ ११ ॥ ७ ॥ ७ ॥

ये । ते । पन्थाः । सवितरिति । पूर्व्यासः । अरेणवः । सुऽकृताः ।
अन्तरिक्षे ।
तेभिः । नः । अद्य । पथिऽभिः । सुऽगेभिः । रक्ष । च । नः । अधि ।
च । ब्रूहि । देव ॥ ११ ॥ ७ ॥ ७ ॥

## भाषायाम्.

११. हे सवितः, ये तव पूर्व्याः (=पूर्वसिद्धा) अरेणवो (=धूलिरहिताः) सुकृताः (=सुष्ठु कृताः=सुसंपादिताः) पन्थानः अन्तरिक्षे [ सन्ति ], तैः सुगैः (=सुष्ठु गन्तुं शक्यैः) पथिभिः [ आगत्य ] अद्य नः (=अस्मान्) रक्ष च नश्च (=अस्मांश्च) अधिब्रूहि (=साधु साधु यूयं स्तुथेति कथय) ॥

---

रूप मानून 'सुरक्षणोपेत' असा अर्थ चांगला संभवतो व प्रसंगवशात् तसा आम्हांस पुढें करावा लागेल.

'उपद्रवकारक राक्षसांस'='रक्षसः यातुधानान्'. हा अर्थ सायणाचार्यांस अनुसरून केला आहे. या स्थळीं 'रक्षसः' हें 'यातुधानान्' याचें अथवा 'यातुधानान्' हें 'रक्षसः' याचें विशेषण आहे असें दिसतें. (ऋ. १०. ८७. २५ "यातुधानस्य रक्षसो बलं विरुज वीर्यम्" हा मंत्र पाहा). 'यातुधान' याचा अर्थ 'इंद्रजाल अथवा गारुड करणारा', 'जादु करणारा.' आमचा 'जादु' हा शब्द 'यातु' शब्दापासून निघाला आहे, आणि वेदांत तरी 'यातु' शब्दाचा अर्थ तोच होतो. यावरून जादु करणाऱ्या लोकांस आमचे पूर्वज आर्य लोक 'निशाचर,' 'राक्षस,' 'असुर' म्हणत असें दिसतें. 'जादु' शब्द किती जुना आहे पाहा!

११. हे सवित्या,* तुझे जे धूलिरहित, [ आणि ] चांगले बांधलेले पुरातनचे मार्ग अंतरिक्षांत [ आहेत ] त्या सुगम मार्गांनीं [ येऊन ] आज आमचें रक्षण कर, आणि हे [ सवित्या ] देवा, आम्हांस आश्वासन दे.

11. By those thy ancient paths, Savitâ, which [lie] dustless [and] well-made in the firmament—by those easy paths [come and] protect us to-day and, O god [Savitâ], commend us.

११. सगळ्या सूक्ताचा उपसंहार या मंत्रात आहे. सवित्याविषयीं परोक्षत्वानें (म्हणजे तृतीयपुरुषीं) स्तुति आणि वर्णन करून आता शेवटीं सवित्यास अपरोक्षत्वानें (म्हणजे द्वितीयपुरुषीं ) म्हणतो, 'हे सवित्या, या अंतरिक्षांत ज्या पुरातनच्या सुगम, सपाट, धूलिरहित मार्गांनें तूं येत असतोस, त्या मार्गांनें तूं आज ये आणि आमचें रक्षण कर, आणि, आलों हे प्रिय उपासकांनो भिऊं नका, तुमचें स्तवन ऐकून मी फार संतुष्ट झालों असें म्हणून आम्हांस आश्वासन दे'.

प्रभातकाळीं उठून भाविक मनानें सवित्यासारिख्या प्रसिद्ध आणि प्रत्यक्ष देवाची स्तुति करावयाची असली तर ह्या सूक्ताचा मासला उत्तम आहे. त्यांत किती प्रसाद आहे पाहा, प्रासयमकादि खोटे अलंकार नाहींत तरी त्यांतील स्वभावोक्तिच किती सुंदर आहे पाहा, आणि अतिशयोक्तीच्या अनन्वित कल्पना आंत नाहींत तरी ह्या स्तुतीचा व तिच्या साधेपणाच्या सौंदर्याचा ठसा मनावर कसा उमटतो पाहा ! अर्वाचीन काळच्या म्हणजे पुराणादिक ग्रंथ रचणाऱ्या एकाद्या कृतक कवीस सूर्यावर स्तोत्र करावयास सांगा, म्हणजे बहुतकरून असा आरंभ करील : 'हे राजपुतांच्या आज्यापणज्या, ब्रह्माण्डजनक कर्मकाण्डतत्पर ब्राह्मणांनीं अर्घ्य दिल्यावर उगवणाऱ्या, प्रचण्डब्रह्माण्डीं ताण्डव करणाऱ्या, दण्डायमान भैरवांच्या वरून मण्डपाकार आकाशांत ब्रह्मशापाबरोबर खण्डित होऊन महापण्डितानें जिंकलेल्या मनुष्याप्रमाणें निष्प्रभचन्द्रमण्डित आकाशांत तटस्थ राहणाऱ्या सूर्या' !

'धूलिरहित'='अरेणवः.' रस्ता चांगला असें वर्णन करावयाचें असलें म्हणजे त्याजवर 'धूळ नाहीं' असें म्हणणें अथवा तो 'चांगला बांधलेला' आणि त्याजवरून चालावयास' श्रम

## सूक्तम् ३६.

घोरपुत्रः कण्व ऋषिः । अग्निर्देवता । १३,१४ इत्येते यूपदेवताके भवत इति संप्रदायः । अयुजा बृहती च्छन्दः । युजः सतोबृहत्यः ॥

**प्र वो॑ य॒ह्वं पु॑रू॒णां वि॒शां दे॑वय॒तीना॑म् ।**
**अ॒ग्निं सू॒क्तेभि॒र्वचो॑भिरीमहे॒ यं सी॒मिद॒न्य ईळ॑ते ॥ १ ॥**

प्र । वः । य॒ह्वम् । पु॒रू॒णाम् । वि॒शाम् । दे॒व॒ऽय॒तीना॑म् ।
अ॒ग्निम् । सु॒ऽउ॒क्तेभिः॑ । वचः॑ऽभिः । ई॒म॒हे॒ । यम् । सी॒म् । इत् । अ॒न्ये ।
ईळ॑ते ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे विशः (=प्रजाः), पुरूणां (=बहूनां) देवयतीनां (=देवान्सेवितुमिच्छन्तीनां) वः (=युष्माकं) यह्वं (=महान्तम्) अग्निं सूक्तैः (=सुष्ठु गीतैः) वचोभिः (=स्तोत्रैः) प्रेमहे (=प्रयाचामहे=प्रार्थयामहे)—यम् अन्ये [ऋषयः] ईडते (=स्तुवन्ति) सीमित् (=तमेव) [अग्निं प्रेमहे] ॥

---

हाति नाहीं ('सुगम') असें म्हणणें हें स्वाभाविक आहे.

'पुरातनचे.' सवित्याच्या आकाशमार्गास हें विशेषण कसें शोभतें तें सांगावयास नकोच.

'आम्हांस आश्वासन दे'='नः अधि ब्रूहि.' सायणाचार्य "आमची शिफारस देवांकडेस कर" असा अर्थ करितात. आम्हीं केलेल्या अर्थास आधार ऋ. १०. १५. ५ (ते आगमन्तु ते इह श्रुवन्तु अधिब्रुवन्तु ते अवन्तु अस्मान्) हा मंत्र आणि त्याजवरील सायणाचार्यांचें भाष्य व इतर कितीएक मंत्र यांचा आहे.

## सूक्त ३६.

ऋषि–घोर या नांवाच्या मनुष्याचा पुत्र कण्व म्हणून कोणी एक. देवता–अग्नि; पण १३ आणि १४ यांची देवता यूप असें मानितात. ( तथापि पुढें १३ व्या ऋचेवरील आमची टीप पाहा ). वृत्त–विषम ऋचा आहेत त्यांचें बृहती, आणि ज्या सम आहेत त्यांचें वृत्त सतोबृहती.

१. देवांची सेवा करूं इच्छिणाऱ्या तुम्हां अनेक जनांचा [कैवारी ] [ असा जो ] मोठा अग्नि त्याची [ आपण ] सुंदर स्तोत्रांनीं प्रार्थना करूं–ज्याला दुसरे [ऋषि] स्तवितात, त्याचीच [आपण प्रार्थना करूं ].

## HYMN 36.

To *Agni*, but 13 and 14 are conventionally but wrongly regarded as addressed to the *Yúpa* (i.e., the post or stake to which the victim is tied before being sacrificed). By *Kanva* the son of *Ghora*. Metre–the *Brihati*, of those couplets that are unequal, and the *Satobrihati* of those that are of equal parts.

1. Let us pray to great Agni, [the helper] of you many people desirous of serving the gods, with sweet hymns—the very same [Agni] whom others praise.

---

१. या छत्तिसाव्या सूक्तापासून त्रेचाळिसाव्या सूक्तापर्यंत आठ सूक्तांचा कर्ता घोर या नांवाच्या मनुष्याचा पुत्र कोणी एक कण्व म्हणून ऋषि होता तो होय.

'हे भाविक जन हो, तुम्हां भाविक जनांतून अनेकांचा ( म्हणजे तुम्हांस साहाय्य करणारा ) जो मोठा अग्नि, आणि दुसरे कवि ज्या अग्नीची प्रार्थना करितात त्याच अग्नीची आपण प्रार्थना करूंया' असा या पहिल्या मंत्राचा भावार्थ आहे. अशी कल्पना करणें अवश्य आहे कीं, मंत्रवक्ता अग्निरक्षित पुष्कळ भाविक जनाच्या गोष्टी एकून त्यांस अनुलक्षून बोलत आहे, आणि म्हणतो आहे कीं, तुम्हांस अग्नीनें रक्षिलें असें मी ऐकितों, तर त्याच अग्नीस आणि इतर ऋषीहि ज्या अग्नीची स्तुति करितात त्याच अग्नीची मी आतां प्रार्थना करितों.

या ऋचेचें वृत्त बृहती. हिच्या तिसऱ्या पादांत आठ अक्षरें असावयाचीं त्याबद्दल बारा आहेत म्हणून ती विषम होय, आणि ज्या विषम आहेत त्यांचें वृत्त बृहती म्हणून वर सांगितलेंच आहे.

**जनासो अग्निं दधिरे सहोवृधं हविष्मन्तो विधेम ते ।**
**स त्वं नो अद्य सुमना इहाविता भवा वाजेषु सन्त्य ॥ २ ॥**

जनासः । अग्निम् । दधिरे । सहःऽवृधम् । हविष्मन्तः । विधेम । ते । सः । त्वम् । नः । अद्य । सुऽमनाः । इह । अविता । भव । वाजेषु । सन्त्य ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

२. हे अग्ने, सहोवृधं (=सहसा मथनरूपेण बलेन वर्धमानं) त्वां [वयं] हविष्मन्तः (=हविर्युक्ताः सन्तो) विधेम (=परिचरेम) [इति हेतोः] त्वां जनाः (=अनुष्ठातारो जनाः) दधिरे (=विदधिरे=समिन्धितवन्तः) । स त्वं, हे वाजेषु सन्त्य (=संग्रामेषु धनस्य प्रापयितः), अद्य इह (=अत्र स्थले) नः (=अस्माकं) सुमनाः (=शोभनमनस्कः) अविता (=रक्षिता) भव ॥

२. हे अग्नी, बलापासून वाढणारा [ असा जो तूं त्या ] तुला आम्हीं हवि देऊन भजावें [ म्हणून ] तुला [ या ] लोकांनीं सिद्ध केला आहे. तर हे संग्रामांत धन मिळवून देणाऱ्या [अग्नी], तूं आज येथें आमचा सौमनस्ययुक्त संरक्षिता हो.

2. Agni, the people have kindled thee that growest out of strength that we with libations [in our hands] may propitiate thee. Do thou, therefore, [Agni], giver [of booties] in battles, become here our benevolent protector today.

---

२. हा मंत्र समजण्यास अशी कल्पना केली पाहिजे असें आम्हास वाटतें कीं, कितीएक उपासक लोक अग्नीस पेटवून तयार राहिले आहेत, आणि कवीस ( ऋषीस ) सूक्त रचावयास सांगत आहेत; तें पाहून ऋषि म्हणतो कीं, 'हे अग्नी, आम्हीं तुला हवि अर्पण करावें म्हणून या उपासकजनांनीं तुला पेटवून तयार केला आहे; आणि आम्हीं तुला हवि अर्पण करीत आहों, करतव हे अग्नी, हे युद्धात लूट मिळवून देणाऱ्या अग्नी, तूं या यज्ञस्थळीं आम्हांवर आज प्रसन्न हो आणि आमचा संरक्षिता हो.'

'हे अग्नी,' इ० या मंत्राच्या शैलीविषयीं असें ध्यानांत ठेवावें कीं, प्रथम पादांत अग्नीविषयीं तृतीयपुरुषीं सांगून द्वितीय पादांत आणि तृतीय आणि चतुर्थ पादांत द्वितीयपुरुषीं बोलतो आहे. त्यामुळें पहिल्या आणि दुसऱ्या पादांचें अक्षरशः भाषांतर केलें तर 'जन बलापासून वाढणाऱ्या अग्नीस पेटविते झाले आहेत, कीं आम्ही हवि घेऊन [हे अग्नी], तुझी परिचर्या करावी' असें होईल.

'बलापासून वाढणारा'='सहोवृधम्.' (ऋ. ३. १०. ९. "तं त्वा विप्रा विपन्यवो जागृवांसः समिन्धते। हव्यवाहम् अमर्त्यं सहोवृधम्" हा मंत्र आणि त्याजवरील सायणभाष्य पाहा ). हातानें जोर करून मंथनानें अग्नीस उत्पन्न करीत म्हणून, त्यास 'सहसो यहुः,' 'सहसो नपात्,' 'सहसः पुत्रः,' 'सहसः सूनुः', 'सहसो युवा,' 'ऊर्जो नपात्,' 'ऊर्जः पुत्रः' असें वेदांत अनेक ठिकाणीं म्हटलें आहे, त्या सर्वांचा अर्थ 'बलाचा पुत्र' असा आहे. त्याच अर्थानें त्याला 'बलापासून वाढणारा' असें या मंत्रांत म्हटले आहे. प्रस्तुत मंत्रांत 'सहोवृध्' म्हणजे बलातें वाढविणारा असा सायणाचार्य अर्थ करितात, पण ऋ. ३. १०. ९ याजवरील त्यांचेंच भाष्य पाहा.

'संग्रामांत धन मिळवून देणाऱ्या' ='वाजेषु सन्त्य'. 'सन्त्य' हें पद वेदांत बरेच ठिकाणीं येतें, पण तें सर्वत्र संबोधनीं आणि अग्नीविषयीं आहे. त्याचा 'दाता' अथवा 'देणारा' असा अर्थ आम्हीं सायणास अनुसरून केला आहे. कितीएक विद्वान् सायणाप्रमाणें

**प्र त्वा॑ दू॒तं वृ॑णीमहे॒ होता॑रं वि॒श्ववे॑दसम् ।**
**म॒हस्ते॑ स॒तो वि च॑र॒न्त्य॒र्चयो॑ दि॒वि स्पृ॑शन्ति भा॒नवः॑ ॥ ३ ॥**

प्र । त्वा॒ । दू॒तम् । वृ॒णी॒म॒हे॒ । होता॑रम् । वि॒श्वऽवे॑दसम् ।
म॒हः । ते॒ । स॒तः । वि । च॒र॒न्ति॒ । अ॒र्चयः॑ । दि॒वि । स्पृ॒श॒न्ति॒ । भा॒नवः॑ ॥ ३ ॥

**दे॒वास॑स्त्वा॒ वरु॑णो मि॒त्रो अ॑र्य॒मा सं दू॒तं प्र॒त्नमि॑न्धते ।**
**विश्वं॒ सो अ॑ग्ने जयति॒ त्वया॒ धनं॒ यस्ते॑ द॒दाश॒ मर्त्यः॑ ॥ ४ ॥**

दे॒वासः॑ । त्वा॒ । वरु॑णः । मि॒त्रः । अ॒र्य॒मा । सम् । दू॒तम् । प्र॒त्नम् । इ॒न्ध॒ते॒ ।
विश्व॑म् । सः । अ॒ग्ने॒ । ज॒य॒ति॒ । त्वया॑ । धन॑म् । यः । ते॒ । द॒दाश॑ । मर्त्यः॑ ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. [ हे अग्ने ], विश्ववेदसं (=सर्वज्ञं) होतारम (=आह्वातारं) त्वा [वयं] दूतं प्रवृणीमहे (=अस्माभिर्देवानामर्थं अर्प्यमाणस्य हविषो वहनाय दूतं कुर्महे) । त्वं [हि] महान् असि, तव अर्चयो (=दीप्तयो) विचरन्ति (=विविधासु दिक्षु प्रचरन्ति) [तव] भानवः (=किरणाश्च) [च] दिवि (=द्युलोकं) स्पृशन्ति (=तिष्ठन्ति) ॥

४. [हे अग्ने], प्रत्नं (=पुरातनं) दूतं त्वा वरुणः, मित्रः, अर्यमा [इत्येते] देवाः समिन्धते (=सम्यग् दीपयन्ति) । हे अग्ने, यो मर्त्यः ते (=तुभ्यं) ददाश (=हविर्दत्तवान् अस्ति) स त्वया [सहायभूतेन] विश्वं धनं (=युद्धे प्राप्यं वैरिणो धनं) जयति ॥

---

'सन्' धातूपासून व्युत्पत्ति न करिता 'सत्', 'सन्त्' (=चांगला) अशा अस् धातूच्या रूपापासून अर्थ करितात, आणि तो अर्थ आम्हीं सूक्त ९५ मंत्र १२ यांत घेतला आहे. पण पुनर्विचाराअंतीं आम्हांस वाटतें कीं, त्या ठिकाणींहि सायणाचार्यांप्रमाणें 'दानशील,' 'दाता' हाच अर्थ घ्यावा.

३. [हे अग्नी,] सर्वज्ञ [असा] होता [जो तूं त्या] तुला [आम्ही] आपला दूत करून घेतों. [कारण कीं], तूं मोठा आहेस आणि तुझ्या दीप्ति सर्व बाजूंस पसरतात, [आणि] [तुझे] किरण द्युलोकास लागलेले आहेत.

3. Thee, [Agni], the omniscient invoker, we choose [as] [the conveying] messenger [of our oblation.] [for] of thee, [who] art great, the splendors extend in all directions, [and] the rays rest in heaven.

४. [हे अग्नी], तुला पुरातनकाळच्या दूताला वरुण, मित्र [आणि] अर्यमा [हे] देव प्रदीप्त करितात. हे अग्नी, जो मर्त्य तुला हवि देतो तो तुझ्या [कृपे]नें [युद्धांत] सर्व धन जिंकितो.

4. The gods Varuṇa [and] Mitra [and] Aryamâ kindle thee the ancient messenger. That mortal conquers all booty through thee, who gives, Agni, [an oblation] to thee.

---

'येथें'='इह'. म्हणजे जेथें बोलतो आहे तेथें. तेथेंच संरक्षण करावयाचें असें इष्ट दिसत नाहीं, तर तेथें अग्नीनें येऊन प्रसन्न होऊन संरक्षक व्हावें असें विवक्षित दिसतें.

३. अग्नीस ऋषि म्हणतो, 'आम्ही आज देवाला जें हवि अर्पण करणार आहों तें देवांकडेस पोंहचतें करण्यासाठीं, हे अग्नी, तुला आम्ही दूत करितों म्हणजे आमचा जासूद नेमितों. स्वर्गी राहणारे जे देव त्यांजप्रत लहानसा यज्ञशाळेंतील अग्नि हवि कसें प्रविष्ट करील अशी शंका नको, कारण अग्नि हा मोठा आहे, आणि त्याचा प्रकाश जिकडे तिकडे पसरलेला आहे आणि त्याचे किरण स्वर्गापर्यंत जाऊन तेथें लागलेले आहेत.' हा मंत्र बराच चमत्कारिक आहे. या मंत्रावरून अग्नीचें स्वरूप समजून येतें. अग्नि म्हणजे केवळ जाळणारा लौकिक अग्नि इतकाच अर्थ नव्हे, तर सूर्याचे अंगचें तेज जें सर्वत्र पसरतें आणि स्वर्गापर्यंत पोंहचतें तें अग्नीचेंच रूप आहे असा मंत्रवचनाचा भावार्थ. ऋषि बोलतो आहे तो जरी यज्ञशाळेंतील लहानशा प्रदीप्त केलेल्या अग्नीस बोलतो आहे आणि त्यांतच हवि टाकीत आहे, तथापि या त्रिभुवनांत जें सूर्यादिकांचें तेज पसरून स्वर्गाच्या पाठापर्यंत जाऊन राहिलें आहे, तो सगळा अग्नीच होय असें मनांत आणून बोलत आहे. ऋ. ४. ४९. २ यांत अग्नीविषयीं असें म्हटलें आहे कीं, 'तो धर्मपालक अग्नि उपजतांच अति उच्च आकाशांत धर्म संरक्षिता झाला; प्रज्ञावान आणि सकलहितकारक अग्नि उपजतांच अंतरिक्षभर पसरला आणि आपल्या मोठेपणानें स्वर्गास जाऊन लागला' (="स' जायमानः

मन्द्रो होता गृहपतिरग्ने दूतो विशामसि ।
त्वे विश्वा संगतानि व्रता ध्रुवा यानि देवा अकृण्वत
॥ ५ ॥ ८ ॥

मन्द्रः । होता । गृहऽपतिः । अग्ने । दूतः । विशाम् । असि ।
त्वे इति । विश्वा । समऽगतानि । व्रता । ध्रुवा । यानि । देवाः । अकृण्वत ।
॥ ५ ॥ ८ ॥

## भाषायाम्.

५. हे अग्ने, [त्वं] मन्द्रो होता (=हर्षहेतुः=प्रियो होता देवानामाह्वाता) [असि], [त्वं] [मन्द्रः=प्रियो] गृहपतिः (=गृहस्य ईशः) [असि]. [त्वं] विशां (=प्रजानां) दूतोसि । यानि ध्रुवाणि (=शाश्वतानि) व्रतानि (=कर्माणि, पृथिव्या धारणं, पर्जन्यस्य वर्षणं, सूर्यस्य प्रकाशनम् इत्येवमादीनि) [अनेकाः] [पृथिवीपर्जन्यसूर्यादयो] देवा अकृण्वत (=कृतवन्तः=कुर्वन्ति) [तानि] विश्वानि त्वे (=त्वयि) [एकस्मिन्] संगतानि (=त्वमेकस्तानि सर्वाणि करोषि) ॥

परमे व्योमनि व्रतानि अग्निः व्रतपाः अरक्षत । वि अन्तरिक्षम् अमिमीत सुक्रतुः वैश्वानरः महिना नाकम् अस्पृशत्'[४].

'सर्वज्ञ [असा] होता'='होतारं विश्ववेदसम्.' होता नेमावयाचा तो चांगला विद्वान् ज्ञानी पाहून नेमांत अशाविषयीं पूर्वी सूक्त २६, मंत्र ३ याजवर दिलेली टीप पाहा. अग्नि हा इतका चांगला होता होय कीं, त्याला कण्व ऋषि 'सर्वज्ञ' हें विशेषण देतो.

'तूं मोठा आहेस आणि तुझ्या दीप्ति सर्व बाजूंस पसरतात'='महः ते सतः विचरन्ति अर्चयः.' अक्षरशः अर्थ 'तुझ्या मोठा असणाऱ्याच्या दीप्ति सर्व बाजूंस फांकतात'. याचा अर्थ 'तूं मोठा होतोस तेव्हां तुझ्या दीप्ति इ०'असा नाहीं, परंतु 'तूं मुळचाच इतका मोठा आहेस कीं, तुझ्या दीप्ति इ०' असा आहे.

४. या मंत्राचा भावार्थ उघडच आहे. पण यांत अग्नीला 'वरुण मित्र आणि अर्यमा' हे तीन देव पोटवितात असें सांगितलें याचा अर्थ काय? आम्हांस वाटतो तो असा:—पूर्वील मंत्रांत पृथ्वीपासून तों स्वर्गापर्यंत जें तेज आहे तें अग्नीचेंच रूप होय असें ऋषीनें जाणविलें; तेव्हां ऋषीच्याच मनांत असा प्रश्न निघाला कीं, भूलोकावर अग्नीचें स्वरूप आम्हांस दिसतें तें नीटच आहे, कां कीं येथें त्याला मनुष्यें प्रज्वलित करितात; परंतु अंतरिक्ष आणि द्युलोक यांत जो सूर्यप्रकाशरूपानें, विद्युद्रूपानें आणि नक्षत्रप्रकाशरूपानें वगैरे अग्नि प्रज्वलित

५. हे अग्नी, [ तूं ] प्रिय होता [ आणि ] गृहपति [होस], [ तूं ] जनांचा दूत होस. [ हे अग्नी ], [ अनेक ] देव जीं [जीं] शाश्वत कामें करितात तीं सर्व तुझ्या [एकट्याच्या] अंगीं मिळालेलीं [ आहेत ].

5. Agni, [thou art] a dear invoker, [a dear] lord of the house, [thou] art the messenger of the people. In thee are united all the eternal works that the [many] gods perform.

असतो तो कोणी पेटविलेला असतो? या प्रश्नाला ऋषि असें उत्तर देतो कीं, तो 'वरुण, मित्र आणि अर्यमा' यांनीं पेटविलेला असतो. मित्रदेव अग्नीस पेटवितो असें म्हणण्याचें कारण हें आहे कीं, 'मित्र' म्हणजे दिवसाचा जो प्रकाश तद्रूपीच देवता होय. अर्यमा आणि वरुण ह्याहि द्युलोकातील प्रकाशाच्याच देवता आहेत, तेव्हां ह्या तीनी मिळून अग्नीस प्रदीप्त करितात असें म्हणणें हें साहजिक दिसतें. 'ऋ. १. १४१. ९ यांत अग्नीच्या योगानेंच वरुण, मित्र आणि अर्यमा यांचा महिमा वाढला आहे ("त्वया हि अग्ने वरुणो धृतव्रतो मित्रः शाशद्रे अर्यमा सुदानवः") असें सांगितलें आहे. ऋ. ३. १४. ४ यांत मित्र, वरुण आणि मरुत् हे अग्नीस पूजितात ("मित्रश्च तुभ्यं वरुणः, सहस्वो अग्ने विश्वे मरुतः सुम्नम् अर्चन्" ) असें म्हटलें आहे. अग्नीला वरुण, मित्र आणि अर्यमा "हे देव प्रदीप्त करितात असें जें प्रस्तुतच्या मंत्रांत सांगितलें, त्यांत अग्नीची सेवा केवळ मनुष्येंच करितात असें नाहीं, तर देवहि करितात असेंहि सांगण्याचा उद्देश आहे.

'पुरातन काळच्या दूताला'='प्रत्नं दूतं.' अग्नीस देवांचा आणि मनुष्यांचा दूत असें वेदांत म्हटलें आहे. देवांचा दूत म्हणण्याचें कारण हें कीं, तो देवांचा कृपा आणि प्रसाद मनुष्याला पोंहचवितो, आणि मनुष्यांचा दूत अशा करितां कीं, तो मनुष्यांनीं दिलेलें हवि आणि त्यांनीं केलेलीं स्तोत्रें देवांप्रत पोंहचवितो. ("दूतो देवानाम् असि मर्त्यानाम् अन्तर्महांश्चरसि रोचनेन"= 'हे अग्नी, तूं देवांचा आणि मर्त्यांचा दूत आहेस; मोठा असा जो तूं तो प्रकाशयुक्त प्रदेशांतून ह्या दोघांच्या मध्यें जात येत असतोस') ऋ. १०. ४. २

५. या मंत्रांत अग्नीचें अनेककर्तृत्व सांगितलें आहे. ऋषि म्हणतो, 'अग्नि हा निरनिराळ्या मनुष्यांनीं करावयाचीं कामें एकटा करितो इतकेंच नव्हे, पण निरनिराळ्या देवांनीं करावयाचीं कामेंहि तो एकटाच करितो. होत्याचें काम, यजमानाचें (गृहपतीचें ) काम, आणि दूताचें (म्हणजे यज्ञहवि देवाकडे घेऊन जाणाऱ्याचें) काम अशीं तीन कामें तीन वेगवेगळ्या मनुष्यांनीं करावयाचीं, तथापि तीं सर्व एकटा अग्नीच करितो; इतकेंच नाहीं, पण पृथ्वीदेवते-

त्वे इदग्ने सुभगे यविष्ठ्य विश्वमा हूयते हविः ।
स त्वं नो अद्य सुमना उतापरं यक्षि देवान्त्सुवीर्या ॥ ६ ॥

त्वे इति । इत् । अग्ने । सुऽभगे । यविष्ठ्य । विश्वम् । आ । हूयते । हविः ।
सः । त्वम् । नः । अद्य । सुऽमनाः । उत । अपरम् । यक्षि । देवान् ।
सुऽवीर्या ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. हे यविष्ठ्य (=युवतम) अग्ने, विश्वं हविः सुभगे (=कल्याणकारिणि) त्वे इत् (=त्वय्येव) आहूयते (=प्रक्षिप्यते । स त्वं सुमनाः (=प्रसन्नो) [भूत्वा] नः (=अस्मभ्यं) सुवीर्याणि (=सुवीर्योपेतानि पुत्रपौत्राद्यपत्यानि) [उद्दिश्य] अद्य अपरम् उत (=उत्तरं कालं च) देवान् यक्षि (=यज=हविषाभितृप्तान् कुरु)॥

नें जगाला धारण करण्याचें काम सदैव करावें, पर्जन्यदेवानें वेळावर पाऊस पाडावा, सूर्यदेवानें नित्य प्रकाशावें, उषेनें नित्य पहाटेस यावें हीं जीं अनेक देवांनीं करावयाचीं कामें, तींहि एकला अग्नीच करितो'.

'प्रिय होता'='मन्द्रो होता'. 'मन्द्र' म्हणजे ज्याला पाहिल्यामुळें आनंद होतो तो, ज्याला पाहतांच आह्लाद उत्पन्न होतो असा. या विशेषणावरून असें अनुमान काढतां येईलसें वाटतें कीं, पुरातन काळीं होत्याचें काम मोठ्या महत्त्वाचें असे इतकेंच नव्हे, पण त्याजवर लोकांची फार प्रीति असे.

'गृहपति.' हा मूळांतीलच शब्द आम्हीं भाषांतरांत ठेविला आहे. त्याचा अर्थ 'घरचा यजमान,' 'घरचा मालक,' जो होत्याकडून यज्ञ करवितो तो.

'जनांचा दूत.' लोकांनीं दिलेलें हवि देवांप्रत पोंहचवितो म्हणून. पूर्वील मंत्रावरची टीप पाहा.

या मंत्रावरून असें समजलें पाहिजे कीं, अग्नीला सर्वमनुष्यात्मक आणि सर्वदेवात्मक ईश्वराची सत्ता आहे असें ऋषि समजत आहे.

या मूळमंत्रांत जो 'व्रत' शब्द आला आहे त्याकडेस लक्ष्य द्यावें. हा शब्द वेदांत मोठ्या महत्त्वाचा असल्यामुळें त्याचा प्रयोग जेथें जेथें येईल तेथें तेथें त्याचा अर्थ काय होतो आणि हल्लीं त्याचा अर्थ काय होतो त्याचा विचार केला पाहिजे.

६. हे परम तरुण अग्नी, कल्याणकारक [ जो तूं त्या ] तुझ्याच ठायीं सकल हवि अर्पिलें जातें. तर तूं प्रसन्न [ होऊन ] आज आणि पुढेंहि देवांला, आम्हांस शूरपुत्रपौत्रादिक अपत्यें प्राप्त व्हावीं म्हणून, हवीनें तृप्त कर.

6. In thy blessed self alone, O most youthful Agni, is all oblation offered. Do thou, therefore, benevolent[ly] to-day and in future gratify the gods [with our oblation] [for] brave progeny to us.

६. ऋषीचा भावार्थ असा आहे कीं, 'कोणत्याहि देवासाठीं अथवा देवांसाठीं हवि अर्पावयाचें असलें तरी तें एकट्या अग्नीच्याच ठायीं अर्पण करितात, त्याप्रमाणें आम्हीहि. हे अग्नी, तुझ्याच ठायीं अर्पण करीत आहों; तर तूं कृपा करून आज आणि पुढेंहि नित्य आमचें हवि देवांप्रत प्रविष्ट कर, कीं जेणें करून ते तृप्त होतील आणि आम्हांस शौर्यसंपन्न अशी पुत्रपौत्रादिक संतति देतील.'

'देवांला, आम्हांस शूर पुत्रपौत्रादिक अपत्यें प्राप्त व्हावीं म्हणून, हवीनें तृप्त कर'—'यक्षि देवान् सुवीर्या.' आम्हीं 'यक्षि देवान् सुवीर्याणि [उद्दिश्य]' असा अन्वय करून अर्थ केला आहे. म्हणजे या मंत्रांत जो 'यक्षि' क्रियाशब्द आहे त्याचे दोन अर्थ करावे लागतात असें म्हटलें तरी चालेल: 'देवान् यक्षि' म्हणजे 'देवांस आमच्या हवीनें तृप्त कर' हा एक (या अर्थाविषयीं तर प्रयोगान्तरांचे दाखले द्यावयासच नको, तो वेदांत जिकडेतिकडे आढळेल); आणि 'यक्षि सुवीर्याणि' म्हणजे '[देवांपासून] आम्हांस शौर्यसंपन्न पुत्रपौत्रादि संतति मिळवून दे' हा दुसरा. हे दोन अर्थ घेतले, अथवा 'सुवीर्याणि उद्दिश्य' असा अन्वय धरिला तरी एकच. हा जो दुसरा अर्थ 'यज्' धातूचा नुक्ताच सांगितला (म्हणजे 'देवांपासून कांहीं तरी मिळवून देणें' अथवा 'कांहीं अमुक एक गोष्ट प्राप्त व्हावी म्हणून यजन करणें') याचें उदाहरण ऋ. ७. ३६. ५. या मंत्रांत व त्यावरील सायणभाष्यांत आहे. त्यांत "यजन्ते अस्य सख्यम्" याचें भाष्य 'अस्य रुद्रस्य सख्यम् उद्दिश्य यजन्ते' असें केलें आहे. शिवाय ऋ. ३. १७. ३ यांत "देवानाम् अवो यक्षि विद्वान्" असें आहे त्याचा अर्थ 'विद्वान् अग्नीनें देवांचें पाठबळ आम्हांस प्राप्त व्हावें म्हणून त्यांस हवीनें तृप्त करावें' असा आहे यांत संशय नाहीं.

'यक्षि देवान् सुवीर्या' म्हणजे 'सुवीर्यान् देवान् यक्षि' असें समजून 'शूर देवांस यज' असा अर्थ सायणाचार्य करितात. पण 'सुवीर्यान्' बद्दल 'सुवीर्या' हें रूप प्रयोगांतरावरून सिद्ध होणार नाहीं, आणि ऋग्वेदांत 'सुवीर्य' शब्द अनेक ठिकाणीं आला आहे तीं सर्व स्थळें आम्हीं शोधून पाहिलीं, परंतु कोठेंहि 'सुवीर्य' हें देवांचें विशेषण सायणांनीं सुद्धा घेतलेलें आढळत नाहीं. 'सुवीर्य' म्हणजे ते बहुतकरून 'चांगल्या वीर्यानें म्हणजे शौर्यानें परिपूर्ण' द्रव्य, किंवा संपत्ति असा अथवा 'शौर्ययुक्त

**तं घेमित्था नमस्विन उप स्वराजमासते ।**

**होत्राभिरग्निं मनुषः समिन्धते तितिर्वांसो अति स्रिधः ॥७॥**

तम् । घ । ईम् । इत्था । नमस्विनः । उप । स्वऽराजम् । आसते ।

होत्राभिः । अग्निम् । मनुषः । सम् । इन्धते । तितिर्वांसः । अति । स्रिधः ७

**घ्नन्तो वृत्रमतरन्रोदसी अप उरु क्षयाय चक्रिरे ।**

**भुवत्कण्वे वृषा द्युम्न्याहुतः क्रन्ददश्वो गविष्टिषु ॥ ८ ॥**

घ्नन्तः । वृत्रम् । अतरन् । रोदसी इति । अपः । उरु । क्षयाय । चक्रिरे ।

भुवत् । कण्वे । वृषा । द्युम्नी । आऽहुतः । क्रन्दत् । अश्वः । गोऽइष्टिषु ८

### भाषायाम्.

७. तं घ ईम् (=तं ह ईम्=तम् एनम् एव) स्वराजं (=स्वतो दीप्यमानम्) [अग्निम्] इत्था नमस्विनः (=सत्यं यथा तथा नमस्कारं कुर्वाणाः=सत्यमेव भक्तिपरायणाः सन्त उपासकाः) उपासते (=उपतिष्ठन्ते) । स्रिधः (=शत्रून्) अतितितिर्वांसः (=अतितीर्णाः=अतिपारिता) मनुषः (=मनुष्याः) होत्राभिः (=हविभिः) अग्निम् [एव] समिन्धते (=पूजयन्ति) ॥

८. [अग्नेः साहाय्येन] [इतरे देवाः] वृत्रम् (=अपाम् आवरकं मेघरूपं वृत्रासुरं) घ्नन्तः (=प्रहरन्तः) अतरन् (=तीर्णवन्तः) । [अपि च] रोदसी (=द्यावापृथिवी) अपः (=अन्तरिक्षं) [च] [सर्वेषां] क्षयाय (=निवासाय) उरु चक्रिरे (=विस्तारो यथा भवति तथा चक्रिरे=विस्तारितवन्तः) । [स] वृषा (वीर्यवान्) [अग्निः] आहुतः (=दत्तहविः=हविषा तृप्तः) [सन्] कण्वे (=कण्वविषये=कण्वाय मह्यं) द्युम्नी (=धनदाता) भुवत् (=भवतु) [अपि च] [कण्वाय मह्यं=मत्साहाय्यार्थं] गविष्टिषु (=संग्रामेषु) अश्वः (युद्धवाजी) [इव] क्रन्दत् (=शब्दयतु) ॥

पुत्रपौत्रादिक संतति' असाच अर्थ करितात. यांतून प्रथम सांगितलेली अडचण तर आम्हांस अनिवार्य दिसते.

या मंत्रांत ऋषि अग्नीपाशीं काय मागतो तें ध्यानांत ठेवावें. 'आम्हांस पुष्कळ दक्षिणा देणारा यजमान प्राप्त करून दे' अथवा 'लाडू वगैरे पक्कान्नें खावयास घालणारा एकादा भोळा मनुष्य यात्रेस येऊन आमच्या झपाट्यांत सांपडो' असें अथवा 'नवनीताप्रमाणें ज्याचे पाय, फुलाप्रमाणें ज्याचे हात आणि कापसाप्रमाणें ज्याचें डोकें अशी संतति आम्हांस देऊन तिचें संरक्षण क्षत्रिय करोत असें वरदान मागत नाहीं, तर वीर्यसंपन्न आणि शूर संतति आम्हांस दे' अशी प्रार्थना करीत आहे.

७. त्याच ह्या स्वदीप्त अग्नीला खरे प्रेमळ जन भजतात. शत्रूंपासून पार पडलेले मनुष्य हवींनीं अग्नीला[च ] पूजितात.

८. [ अग्नीच्या साहाय्यानें ] [ देव ] वृत्राला मारून तरले; [ आणि ] द्यावापृथिवी [ आणि ] अंतरिक्ष यांस [ सकल जनांच्या ] वस्तीसाठीं विस्तारिते झाले. [ यास्तव ] अग्नीला हवि अर्पण केल्यावर वीर्यवान् [ अग्नि ] कण्वाला धनदाता होओ [ आणि कण्वाकरितां ] युद्धामध्यें घोडा[च जणुं होऊन ] चौताळो.

7. That same self-resplendent Agni do sincere worshippers serve ; [ and ] [it is] Agni [that] men who have saved themselves from [ their ] enemies worship with oblations.

8. [Through Agni] [the gods] killing Vritra, triumphed,[and] made the earth, heaven [ and ] sky wide [ for all ] to inhabit. May [ therefore ] manly [Agni], on being sacrificed to, be to Kanva a giver of wealth, [and] in battles chafe [on his side] [ like ] a [ war ]-horse.

---

७. भावार्थः—' असा जो वर अग्नि सांगितला त्यासच खरे प्रेमळ उपासक भजतात आणि लढाईंत पार पडलेले मनुष्य हव्यें अर्पण करून पूजाद्वारें आभार मानणें तो अग्नीचाच मानितात.'

या मंत्रांत 'खरे प्रेमळ जन' हा अर्थ आम्हीं 'इत्था नमस्विनः' या शब्दांचा केला आहे. अक्षरशः अर्थ 'खरोखर नमस्कार करणारे [ जन ]' असा आहे; म्हणजे दांभिक भक्ति करणारे नव्हेत. मनःपूर्वक भक्ति करणारे. 'इत्था' हें विशेषणार्थी अव्यय आहे. हा त्याचा अर्थ पुष्कळ वेदमंत्रांत आला आहे इतकेंच नव्हे, पण ऋ. ६. १८. ५ ( तत् नः प्रत्नं सख्यम् अस्तु युष्मे इत्था वदद्भिः बलम् अङ्गिरोभिः) याजवर. आणि ऋ. ४. १०. ७ (कृतं चित् हि स्म सनेमि द्वेषः अग्ने इनोषि मर्तात् इत्था यजमानात् ऋतावः) याजवरील भाष्यांत सायणाचार्यांनींहि 'सत्य' असाच अर्थ केला आहे. प्रस्तुत मंत्रांत 'इत्था' म्हणजे 'या प्रकारें करून' असा ते अर्थ करितात; परंतु 'प्रेमळजन' ('नमस्विनः') कोणते ते पूर्वीं सांगितलेले नाहींत व 'हा प्रकार' तो कोणता तोहि पूर्वीं सांगितलेला नाहीं, यास्तव वर सांगितलेल्या अन्यत्र असलेल्या सायणोक्तीस अनुसरून आम्हीं 'इत्था' याचा 'खरोखर' असा अर्थ समजून भाषांतर केलें आहे.

८. ' अग्नि असा पराक्रमी आहे कीं त्याच्याच साहाय्यानें इतर देवांनीं वृत्राला मारून जय मिळविला आणि मग पृथिवी, अंतरिक्ष आणि स्वर्ग या त्रैलोक्यास विस्तीर्ण केलें, कीं जेणेंकरून सकल

**सं सीदस्व महाँ असि शोचस्व देववीतमः ।**
**वि धूममग्ने अरुषं मियेध्य सृज प्रशस्त दर्शतम् ॥ ९ ॥**

सम् । सीदस्व । महान् । असि । शोचस्व । देवऽवीतमः ।
वि । धूमम् । अग्ने । अरुषम् । मियेध्य । सृज । प्रऽशस्त । दर्शतम् ॥ ९ ॥

---

**भाषायाम्.**

९. हे [ अग्ने ], [ त्वं ] संसीदस्व ( =निषीद ), [ त्वं ] महान् असि । देववीतमः (=अतिशयेन देवानां तृप्तिं कारयन्) [ त्वं ] शोचस्व ( =दीप्यस्व ) । हे मियेध्य (=मेधार्ह ), प्रशस्त ( =उत्कृष्ट ) अग्ने, [ त्वम ] अरुषं ( =रोचमानं ) दर्शतं ( =दर्शनीयं ) धूमं विसृज ॥

---

प्राण्यांस त्यांत राहावयास मिळालें. तर असा जो हा वीर्यवान् म्हणजे पराक्रमशाली अग्नि तो मला कण्वाला धन देणारा होओ आणि युद्धांच्या प्रसंगीं माझ्या बाजूस राहून जयेच्छेच्या आवेशानें भरलेल्या वाघप्रमाणें किंकाळो; कारण कीं मी कण्व त्यास हवीनें तृप्त करीत असतों,' असें मंत्रकर्त्याचें म्ह्ण आहे.

या मंत्राच्या पूर्वार्धांत अग्नीचें माहात्म्य आणि उत्तरार्धांत प्रार्थना आहे. वृत्राला मारणारे ते कोण हें जरी या मंत्रांत प्रतिपदोक्त सांगितलेलें नाहीं तथापि 'इतर देव' असा जो सायणास अनुसरून आम्हीं अध्याहार केला आहे तो स्वाभाविक दिसतो. त्यावरून इतर देवांवर अग्नीचें वर्चस्व यांत प्रतिपादिलें आहे हें उघड दिसतें.

'अंतरिक्ष'='अपः.' 'आपः' म्हणजे मूळ अर्थ 'उदकें', 'पाणी'; परंतु अंतरिक्ष प्रदेशांत म्हणजे वातावरण प्रदेशांत तुषाररूपानें उदकें असतात आणि तीं मेघोदकरूपानें जमिनीवर वर्षतात म्हणून अंतरिक्षास 'आपः' हें नांव पडलें आहे याविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे. वैदिककाळचें त्रिभुवन अथवा तीन लोक म्हणजे पृथिवी, अंतरिक्ष आणि अंतरिक्षापेक्षांहि जो उंच प्रदेश ज्यांत सूर्यचंद्रादि राहतात तो द्युलोक अथवा स्वर्ग हे असत. आलींनिक म्हणजे पुराणें वगैरे रचिलीं गेधुत्या अर्वाचीनकाळीं तीन लोक म्हणजे स्वर्ग, भूमि, आणि पाताळ हे समजण्यांत येतात. यांतून पहिल्या दोहोंविषयीं विशेष सांगावयास नकोच; पण तिसरा म्हणजे पाताळ हा लोक कोठून आला ? या प्रश्नाचें उत्तर अंतरिक्ष प्रदेशास वेदांत 'आपः' असें जें नांव आहे त्यांत सांपडेल. कारण कीं उदकमय पाताळ पूर्वींच्याकाळीं पृथ्वीच्या वर होतें तें अर्वाचीन काळीं खालीं गेलें आहे इतकाच काय तो भेद. तें खालीं जाण्याचें कारण, आणि तेथें नागलोकांची वस्ति कोठून आणि त्यांत शेषशायी

९. [हे अग्नी], [तूं दर्भां-वर] बैस, [तूं] मोठा आहेस. देवांला अतिशयेंकरून संतुष्ट करणारा [जो तूं तो] प्रदीप्त हो. हे अग्नी, हे पवित्र, हे उत्तम [अग्नी], [तूं] आरक्त [आणि] सुंदर धूम [वर] टाक.

9. [Agni,] sit [thou] down, [thou] art great. The greatest satisfier of the gods, shine [thou] forth. Sacred [and] excellent Agni, send forth [thy] reddish [and] beautiful smoke.

नागाधिपतीवर कां निजतात याचीं कारणें पुढें येत जातील यांत संशय नाहीं.

'चीताळो' = 'क्रन्दत्.' 'क्रन्दत्' हें आम्हीं लेट् काळाचें रूप घेतलें आहे. सायणाचार्य वर्तमानकाळचें कृदन्त समजतात. परंतु ऋ १. १७३. ३ पहा. 'क्रन्द्' धातूचें वर्तमानकाळीचें कृदन्त 'क्रन्दन्' असें होतें आणि तें ऋग्वेदांत बरेच ठिकाणीं आलें आहे.

'युद्धामध्यें' याबद्दल मुळांत 'गविष्टिषु' असें पद आहे. 'गविष्टि' याचा शब्दशः अर्थ 'गाईची वांछा ज्यांत आहे तें.' त्यावरून 'गाईची इच्छा करून जें युद्ध तें' असा अर्थ होतो. शेवटीं साधारण कोणतेंहि युद्ध असा अर्थ होऊं लागला. वैदिक युगासारिख्या अतिपुरातन काळीं कोणत्याहि देशांत पाहूं गेलें तरी लढाई होत त्या स्वातंत्र्यासाठीं वगैरे थोड्याच पण शत्रूच्या गाई वळवून आणाव्या, धन लुटून आणावें, धान्य हरण करून आणावें याच हेतूनें होत असत हें ध्यानांत ठेवणें अवश्य आहे.

९. या मंत्रांत 'तूं देवांस हवि पोंहचवून तृप्त करणारा अग्नि प्रथम तुझा सुंदर आणि अरुणासारिखा आरक्त वर्णाचा धूर वर सोडून प्रदीप्त हो,' अशी अग्नीची प्रार्थना आहे.

'[तूं] मोठा आहेस.' 'मोठा' कसा याविषयीं पूर्वी याच सूक्ताच्या तिसऱ्या ऋचेवर दिलेली टीप पहा.

'आरक्त'='अरुषम्.' म्हणजे ज्यांत किंचित् काळिमा, किंचित् रक्तिमा आहे अशा रंगाचा. हें पेटत्या अग्नीच्या धूमास चांगलें विशेषण शोभतें. सायणाचार्य प्रस्तुत स्थळीं 'अरुष' याचा अर्थ 'जागारा' असा करितात; पण आमचा अर्थ विशेष योग्य आहे आणि ऋ. ५. १. ५; १०. १. ६; ३. १५. ३; ६. ३. ६; ६. ४८. ६ इत्यादि अनेक मंत्रांवरील सायणाचार्यांच्याच भाष्याच्या आधारावर केलेला आहे.

या मंत्रांत '[तूं] आरक्त [आणि]

**यं त्वा देवासो मनवे दधुरिह यजिष्ठं हव्यवाहन ।**
**यं कण्वो मेध्यातिथिर्धनस्पृतं यं वृषा यमुपस्तुतः ॥ १० ॥ ९ ॥**

यम् । त्वा । देवासः । मनवे । दधुः । इह । यजिष्ठम् । हव्यऽवाहन । यम् । कण्वः । मेध्यऽअतिथिः । धनऽस्पृतम् । यम् । वृषा । यम् । उपऽस्तुतः ॥ १० ॥ ९ ॥

## भाषायाम्.

१०. यं त्वां हे हव्यवाहन ( =हविषो वाहक अग्ने ), देवाः यजिष्ठं ( =यष्टृतमम् =उत्कृष्टो यष्टासीति कृत्वा ) मनवे ( =मनोरनुग्रहाय=मनुष्याणाम् अनुग्रहाय) इह (=यजनदेशे ) दधुः ( =स्थापयामासुः ) । यं [ त्वां ] कण्वो मेध्यातिथिः ( =कण्वकुलोत्पन्नो मेध्यातिथिर्नाम कश्चिदृषिः ), यं [ त्वां ] वृषा ( =एतन्नामा कश्चिदृषिः), यं [त्वाम्] उपस्तुतः ( =एतन्नामकः कश्चिदृषिश् )[ च ] धनस्पृतं ( =धनेन प्रीणयितारं =धनस्य संपादयितारं =धनसंपादकोसीति कृत्वा ) [ दधे =स्थापितवान् ] ॥

सुंदर धन [ वर ] टाक' अशी जी अग्नीची प्रार्थना केली तिजवरून असें दिसतें कीं, अग्नि हा देव होय आणि पराक्रमी आहे आणि तो सकल देवांहून मोठा आहे इत्यादि जरी ऋषिजन समजत, तरी त्याचें मूळचें खरें स्वरूप ( म्हणजे जाळतो जो तो लौकिक अग्नि अथवा आग किंवा विस्तव तोच अग्नि हें ) विसरत नसत. आरशाप्रमाणें एक बाजूनें मंत्रद्रष्ट्यांच्या मनांतील कल्पनातरंग त्याजवर उमटत तेव्हां तो देव, आणि दुसऱ्या बाजूनें निर्जीव लांकडाच्या फळीप्रमाणें तो विस्तव तो विस्तवच, असें या अग्नीचें द्विविध स्वरूप वेदांत आढळतें.

१०. ज्या तुला उत्तम यजकाला, हे हव्यवाहना [ अग्नि ], देवांनीं मानवांसाठीं येथें स्थापिलें आहे; [ आणि ] ज्या तुला धनसंपादकाला कण्वकुळांतील मेध्यातिथीनें, ज्या [ तु]ला वृषानें, [ आणि ] ज्या [ तु]ला उपस्तुतानें स्थापिलें आहे.

10. Thou, whom, O bearer of the oblation, the gods have established here [as] the best sacrificer for [the benefit of] man; [and] whom Kaṇva Medhyâtithi, whom Vṛishâ [and] whom Upastuta [have established] [as] the [best] procurer of wealth.

---

१०. 'अग्नीला पृथ्वीवर यज्ञशाळेंत देवांनीं एका कारणासाठीं आणि मानवांनीं दुसऱ्या कारणासाठीं स्थापिला आहे: देवांनीं स्थापिला तो यज्ञ चांगला संपादितो म्हणजे मनुष्यांनीं दिलेले हवि देवांकडेस उत्कृष्ट रीतीनें पोंहचवितो म्हणून स्थापिला, आणि मनुष्यांनीं जो स्थापिला, तो मनुष्यांसाठीं देवाकडून धन संपादन करून आणून देतो म्हणून स्थापिला; अतएव हे अग्नी, तूं येथें प्रदीप्त होऊन आमचें हवि ग्रहण करणें हें देवांस आणि तसेंच आम्हां मनुष्यांसहि इष्ट आहे' असा कवीचा भावार्थ.

'हव्यवाहना.' हें अग्नीचें विशेषण आहे. अर्थ 'हवि वाहून [देवांकडेस] नेतो तो.'—'तुला उत्तम यजकाला' म्हणजे 'तूं उत्तम यजक ( यज्ञकर्ता ) आहेस असें समजून.'—'मानवांसाठीं' ='मनवे.' अक्षरशः अर्थ 'मनूसाठीं' इतकाच आहे. 'मनु' हें प्रथमतः एका परमपुरातन आद्यऋषीचें नांव होतें असें आढळतें ( ऋ.१.१३९. ९ यांजवरील सायणभाष्य पहा ); नंतर सकल मनुष्यांचा आद्य पुरुष म्हणजे प्रजापति असा अर्थ आढळतो ( ऋ.४.२६,१;१. ८०.१६;२.३३.१३ यांजवरील सायणभाष्य पहा ); नंतर साधारण कोणताहि मनुष्य अथवा सर्व मनुष्यें अशा अर्थी प्रयोग आढळतो, तेव्हां जात्येकवचनीं प्रयोग असतो (ऋ. १. १३०. ८; १. १६६. १३; १. १८९. ७ यांजवरील सायणभाष्य पहा ). आम्हीं जो प्रस्तुतस्थळीं अर्थ केला आहे तो हा शेवटचा होय.

'ज्या तुला धनसंपादकाला...... स्थापिलें.' म्हणजे 'तूं धनसंपादक आहेस म्हणून तुला......स्थापिलें', 'तूं धन प्राप्त करून देतोस म्हणून तुला स्थापिलें.'

'मेध्यातिथि,' 'वृषा' आणि 'उपस्तुत' हीं विशेषनामें होत. ( ऋ. ८. १. ३० इ० आणि ६. १६. १५ हे मंत्र आणि त्यांजवरील भाष्य पहा, शिवाय याच सूक्ताची १७ वी ऋचा आणि १. ११२. १५ इत्यादि स्थळें पुष्कळ आहेत).

यमग्निं मेध्यातिथिः कण्व ईध ऋतादधि ।
तस्य प्रेषो दीदियुस्तमिमा ऋचस्तमग्निं वर्धयामसि ॥ ११ ॥

यम् । अग्निम् । मेध्यऽअतिथिः । कण्वः । ईधे । ऋतात् । अधि । तस्य । प्र । इषः । दीदियुः । तम् । इमाः । ऋचः । तम् । अग्निम् । वर्धयामसि ॥ ११ ॥

रायस्पूर्धि स्वधावोऽस्ति हि तेऽग्ने देवेष्वाप्यम् ।
त्वं वाजस्य श्रुत्यस्य राजसि स नो मृळ महाँ असि ॥ १२ ॥

रायः । पूर्धि । स्वधाऽवः । अस्ति । हि । ते । अग्ने । देवेषु । आप्यम् । त्वम् । वाजस्य । श्रुत्यस्य । राजसि । सः । नः । मृळ । महान् । असि ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

११. यम् अग्निं कण्वः (=कण्वकुलोत्पन्नो) मेध्यातिथिः ऋताद् अधि (=सत्यधर्मकर्म अधिकृत्य = यज्ञकरणार्थं) [पूर्वं] समीधे (=दीप्तवान्), तस्य [अग्नेः] = (तस्मै अग्नये) [इमा] इषः (=एतानि अर्पिष्यमाणानि अन्नानि) प्रदीदियुः (=प्रकर्षेण दीप्यन्ते = शोभन्ते), तम् [एव अग्निम्] इमा [अस्माकम्] ऋचः [वर्धयन्ति = सेवन्ते], तम् [एव] अग्निम् [अधुना] [वयं] वर्धयामः (=सेवामहे) ॥

१२. हे स्वधावः (=स्वधावन् = स्वतःसिद्धिमन् = स्वतःशक्तिमन् = बलवन्) [अग्ने], [त्वम् अस्मभ्यं] रायः (= संपदः) पूर्धि (= पूरय = देहि) । ते (= तव) हि हे अग्ने, देवेषु आप्यं (=सख्यम्) अस्ति । त्वं [च] श्रुत्यस्य (=श्रवणीयस्य = कीर्तनीयस्य = प्रशस्तस्य) वाजस्य (=संपदो) राजसि (=ईश्वरो भवसि) । स [त्वं] नः (=अस्मभ्यं) मृळ (=प्रसन्नो भव), [त्वं हि] महान् असि ॥

११. ज्या अग्नीला कण्वकुळांतील मेध्यातिथि [पूर्वी] धर्मकृत्याकरितां प्रदीप्त करीत असे, त्या [अग्नी]करितां [हें] अन्न शोभत आहे, त्या [अग्नी]ला ह्या [आमच्या] ऋचा भजत आहेत, त्या[च] अग्नीला [आम्ही] भजत आहों.

१२. हे बलवान् [अग्नी], [तूं आम्हांस] संपत्ति दे, कां कीं हे अग्नी, तुझें आणि देवांचें सख्य आहे. जिची कीर्ति ऐकण्यास योग्य अशा संपत्तीचा तूं राजा आहेस. तर [तूं] आम्हांस प्रसन्न हो, [तूं] मोठा आहेस.

11. [For that] Agni whom Kanva Medhyátithi [formerly] kindled for religious work,–for that [Agni] these libations are shining brightly, that [Agni] these [our] prayers are serving, that Agni [we] [now] are serving.

12. Fill [us with] wealth, O mighty [Agni.] For Agni, thou hast intimacy with the gods. Thou art master of wealth that deserves to be renowned. Do [thou,] therefore, favour us, [for] thou art great.

---

११. 'अग्नि हा फार प्राचीन देव आहे आणि त्याला प्राचीन काळापासून आमचे मेध्यातिथि वगैरे जे वाडवडील ते भजत आले आहेत, आणि त्याच अग्नीला आम्ही आतां हविरन्न आणि स्तोत्रें अर्पण करून भजत आहों, या प्रकारेंकरून पुरातन कालापासून हा अग्नि आमचा कुलमित्र आहे' असें कवीनें म्हटलें आहे.

'धर्मकृत्याकरितां'='ऋतात् अधि' या शब्दांचा अर्थ सायणाचार्य 'आदित्यापासून' असा करितात. 'ऋतात् अधि' असें ऋ. १. १३९. २ आणि १०. ७३. ५ यांतहि आलें आहे. यांतून प्रथम मंत्रांतहि सायणाचार्य 'आदित्यापासून' असाच अर्थ करितात.

'हें अन्न शोभत आहे'='प्र इषः दीदियुः' सायणाचार्य येथें 'इषः' म्हणजे 'किरण' असा अर्थ करितात; परंतु त्या शब्दाचा प्रसिद्ध अर्थ सोडून देण्याला येथें पुरतें कारण नाहीं. 'प्रदीदियुः' याचा अर्थ 'शोभणें' असा होतो तो केला म्हणजे निर्वाह चांगला होतो.

१२. या मंत्राचें तात्पर्य उघडच आहे: 'हे अग्नी, पाहिजे तें करण्यास तुला (स्वताहाची) शक्ति आहे; आणि

ऊर्ध्व ऊ षु णं ऊतये तिष्ठा देवो न सविता ।
ऊर्ध्वो वाजस्य सनिता यदञ्जिभिर्वाघद्भिर्विह्वयामहे ॥ १३ ॥

ऊर्ध्वः । ऊम् इति । सु । नः । ऊतये । तिष्ठ । देवः । न । सविता । ऊर्ध्वः । वाजस्य । सनिता । यत् । अञ्जिऽभिः । वाघत्ऽभिः । विऽह्वयामहे ॥ १३ ॥

## भाषायाम्.

१३. उ (=उत = अपि च) [हे अग्ने,] [त्वं] नः (=अस्माकम्) ऊतये (=रक्षणाय = संरक्षणं कर्तुं) देवः सविता न (=देवः सवितेव) सु ऊर्ध्वः तिष्ठ (=सम्यगुद्युक्तो भव) । ऊर्ध्वः (=उद्युक्तः) [सन्], यद् (=यस्माद्) [वयम्] अञ्जिभिः (=आज्येन त्वाम् अञ्जद्भिः) वाघद्भिः (=ऋत्विग्भिः) [सह] [त्वां] विह्वयामहे (=विशेषेण आह्वयामः) [तस्मात्] [हे अग्ने,] [त्वं] वाजस्य सनिता (=अन्नादिसंपदो दाता) [तिष्ठ = भव] ॥

शिवाय देवांशीं तुझें सख्य आहे; आणि उत्कृष्ट संपत्ति तर तुझ्या जणुं दासी आहेत; आणि तूं मोठा आहेस : अतएव हे अग्नी, तूं आम्हांवर कृपा कर आणि आम्हांस संपत्तींनीं भरून टाक.'

'बलवान्' ='स्वधावान्.' सायणाचार्य या शब्दाचा अर्थ या ठिकाणीं 'अन्नवान्' असा करितात. पण हा शब्द वेदांत पुष्कळ ठिकाणीं आला आहे. तीं सर्व स्थळें तपासून पाहतां, जरी कितीएक बरेच ठिकाणीं ते 'अन्नवान्' असा अर्थ करितात तथापि त्यांणींच पुष्कळ ठिकाणीं 'बलवान्' आणि 'तेजस्वी' असे अर्थ केले आहेत (ऋ. १. ६३ ६; ६. २१. ३; २. २०. ६; ७. २०. १; १०. ४२. ९; १०. ३१. ८; ८. ४४. २०; ७. ३७. २; ५. ३२. १० आणि ७. ८६. ४; ४. १२. ३.). तो अर्थ बहुतकरून सर्वत्र नीट बसतो आणि 'स्वधा'शब्दाच्या मूळ अर्थाशीं चांगला जुळतो, यास्तव तोच आम्हीं या मंत्रांत घेतला आहे आणि बहुत करून पुढेंहि घेत जाऊं.

'[तूं] मोठा आहेस.' याच सूक्ताचा मंत्र ३ रा याजवरची टीप पहा.

१३. आणि [ हे अग्नी,] तूं सवित्या देवाप्रमाणें आमच्या संरक्षणार्थ सुसिद्ध हो; [आणि तूं] सिद्ध [ होऊन ], अनुलेपक ऋत्विजां[च्या योगा]नें [तुला] ज्यापेक्षां [ आम्ही ] बोलावितों [ त्यापेक्षां ] [ आम्हांप्रत ] संपत्तीचा दाता [ हो ].

13. And be [thou] well ready for protecting us, like the God Savitâ; [ and ] [being] ready, [be thou] a giver of wealth [unto us,] as [we] invoke thee through [our] anointing priests.

---

१३. 'ऋत्विजांस बरोबर घेऊन तुला घृताच्या आहुत्या देऊन सर्वजण मिळून आम्ही मोठ्या आघोषानें तुझा धांवा करीत आहोंत, त्यापेक्षां हे अग्नी, तूं आमचें संरक्षण करण्यास तयार हो; आणि संरक्षण करण्यास तयार हो इतकेंच नव्हे, पण आम्हांस धनधान्यसंपत्ति देणारा हो' असें कवीचें मनोगत आहे.

'सुसिद्ध हो'—'ऊर्ध्वः सु तिष्ठ.' सायणाचार्य हा मंत्र यूपाकडेस लावून 'ऊर्ध्वः सु तिष्ठ' म्हणजे 'उभा राहा' असा अर्थ करितात. परंतु या मंत्राची देवता 'यूप' (म्हणजे बळि बांधण्याचा खांब) असें सर्वानुक्रमणिकेंत सांगितलें आहे तरी, खरोखर ही आणि पुढची सुद्धां ऋचा अग्नीलाच लाविली पाहिजे. सायणाचार्यांनीं सुद्धां 'यूप अथवा यूपांत असलेला अग्नि' असें पक्षांतर अर्थामध्यें स्वीकारिलें आहेत. या तेराव्या ऋचेंत 'ऊर्ध्व' शब्द आहे त्याचा अर्थ 'उंच उभा' असा साधारण होतो तोच येथें आहे अशा समजुतीवरून आणि 'अञ्जिभिः' या विशेषणावरून ह्याची आणि पुढच्या मंत्राची देवता यूप आहे असें पूर्वीच्या लोकांस वाटल्यामुळें सर्वानुक्रमणिकेंत तसें लिहिलें आहेसें दिसतें. वस्तुतः या दोनोंहि मंत्रांत यूपाविषयीं उल्लेख नाहीं, आणि 'ऊर्ध्व' म्हणजे 'सिद्ध' 'तयार' 'उद्युक्त' असा अर्थ होतो याविषयीं ऋ. ६. २४. ९ आणि ८. १२. १० हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा. मराठींत तरी 'उभा राहणें' याचा अर्थ 'तयार असणें' असा होतो; जसें, इकडे तरीं कोण लढाईला उभा राहिला आहे ?

'अनुलेपक'='अञ्जिभिः.' म्हणजे 'तूप लावणाऱ्या,' 'तुपाचें अनुलेपन करणाऱ्या' असा अर्थ; 'तुपाच्या आहुत्या देणाऱ्या.'

ऊर्ध्वो नः पाह्यंहसो नि केतुना विश्वं समत्रिणं दह ।
कृधी न ऊर्ध्वान् चरथाय जीवसे विदा देवेषु नो दुवः॥१४॥

ऊर्ध्वः । नः । पाहि । अंहसः । नि । केतुना । विश्वम् । सम् । अत्रिणम् । दह ।

कृधि । नः । ऊर्ध्वान् । चरथाय । जीवसे । विदाः । देवेषु । नः । दुवः ॥ १४ ॥

पाहि नो अग्ने रक्षसः पाहि धूर्तेरराव्णः ।
पाहि रीषत उत वा जिघांसतो बृहद्भानो यविष्ठ्य ॥१५॥१०

पाहि । नः । अग्ने । रक्षसः । पाहि । धूर्तेः । अराव्णः ।
पाहि । रिषतः । उत । वा । जिघांसतः । बृहद्भानो इति बृहत्ऽभानो । यविष्ठ्य ॥ १५ ॥ १० ॥

---

## भाषायाम्.

१४. [ हे अग्ने ], ऊर्ध्वः (=उन्नतस्) [ त्वं ] नः (=अस्मान्) अंहसः (=दुरितात्) पाहि ( = पालय ), विश्वम् अत्रिणं ( = राक्षसं ) केतुना (=तव तेजसा) नि (=नितरां) संदह (=सम्यग्भस्मीकुरु ) । [ अपि च ] नः (=अस्मान्), जीवसे (=जीवितुं=जीवनाय ) चरथाय (=चरितुं=लोके चरणाय ) [ च ], ऊर्ध्वान् (=उन्नतान्=बलवतः) कृधि(=कुरु) । [अपि च] [हे अग्ने], नो दुवः (=अस्माकं परिचर्यां) देवेषु विदाः ( =निवेदय= लम्भय ) ॥

१५. हे अग्ने, नः ( =अस्मान् ) रक्षसः ( =राक्षसात् ) पाहि ( =रक्ष ), अराव्णः (=शत्रोर्) धूर्तेः ( =हिंसायाः ) पाहि (=रक्ष), रिषतः ( =हिंसकात् ) उत वा ( =अपि च ) हे बृहद्भानो ( =प्रभूततेजोयुक्त ) यविष्ठ्य (=परमतरुण) [अग्ने], जिघांसतः ( =हन्तुमिच्छतः शत्रोः ) [ पाहि =रक्ष ] ॥

१४. [हे अग्नी], उच्चस्थानापन्न [असा जो तूं तो] आम्हांस संकटापासून तार, [तूं] [आपल्या] तेजानें सर्व राक्षसांस एकदम जाळून भस्म कर. [तूं] आम्हांस जीवंत राहण्याला [आणि इकडे तिकडे] फिरण्याला शक्तिमान कर. [तूं] आमचें हवि देवांप्रत पोंहचीव.

14. Stationed high [do thou Agni,] protect us from danger, burn down all demons at once. Make us strong that we may live [and] move, [and] take [thou] our offering among the gods.

१५. हे अग्नी, [तूं] आम्हांस राक्षसापासून तार, [तूं] शत्रूच्या उपद्रवापासून तार, [तूं] नाशकापासून, आणि हे तेजःपुंज परमतरुण [अग्नी], मारूं इच्छिणाऱ्यापासून तार.

15. Save us, Agni, from the demon, save [us] from the harm of the enemy. Save [us] from the wicked and, O resplendent [and] most youthful Agni, from him who desires to kill.

---

१४. 'उच्चस्थानापन्न.' अग्नि 'उच्चस्थानापन्न' कसा त्याविषयीं सायणाचार्य लिहीत नाहींत, पण यात सूक्ताच्या तिसऱ्या मंत्रांत जें अग्नीचें स्वरूप वर्णिलें आहे त्यांत आणि ९ व्या व १२ व्या मंत्रांत अग्नीस 'मोठा' असें म्हटलें आहे तोच 'उच्चस्थानापन्न' शब्दाचा अर्थ आहे असें दिसतें. ३ ऱ्या मंत्रावरील टीप पहा.

'आमचें हवि देवांप्रत पोंहचीव' = 'विदा देवेषु नो दुवः' म्हणजे आम्ही जें हें हवि अर्पण करीत आहों तें तूं घेऊन जा आणि देवांप्रत निवेदन कर. 'दुवः' याचा अर्थ 'परिचरण,' 'सेवा' 'पूजा' असा आहे; पण प्रस्तुत स्थळीं सायणाचार्यास अनुसरून 'हवि' असा केला आहे त्यास अडचण दिसत नाहीं.

१५. या मंत्रांतील प्रार्थना स्पष्टच आहे. तींत कपट अथवा कृत्रिमत्व किंवा तपोबळाच्या बाण्याचें वारें सुद्धा नाहीं. केवळ अनाथ आणि दीन मानवांनीं अति प्रबळ देवाची जशी अनन्यभावें प्रार्थना करावी तशीच आहे.

'शत्रूच्या उपद्रवापासून'='अराव्णो धूर्तेः'. सायणाचार्य 'धनादि न देणाऱ्या हिंसकापासून' असा अर्थ करितात. पण

घनेव विष्वग्वि जह्यराव्णस्तपुर्जम्भ यो अस्मध्रुक् ।
यो मर्त्यः शिशीते अत्यक्तुभिर्मा नः स रिपुरीशत ॥१६॥

घनाऽइव । विष्वक् । वि । जहि । अराव्णः । तपुःऽजम्भ । यः । अस्मऽध्रुक् ।
यः । मर्त्यः । शिशीते । अति । अक्तुऽभिः । मा । नः । सः । रिपुः । ईशत ॥ १६ ॥

## भाषायाम्.

१६. हे तपुर्जम्भ (=ज्वालादंष्ट्र) [अग्ने], [त्वम्] अराव्णः (=शत्रून्) घनेव (=घनेनेव=पाषाणभेदकेन लोहमयेन कठिनेन आयुधेनेव) विष्वक् विजहि (=सर्वतो विशेषेण नाशय=मृन्मयभाण्डादिवद् भङ्क्त्वा तेषां भङ्गान् अभितः पातय)। [अपि च] यो [मर्त्यः] अस्मध्रुक् (=अस्मद्विषयद्रोहकारी), यश् [च] मर्त्यः अक्तुभिः (=रात्रौ) [अस्मभ्यम्] अतिशिशीते (=आयुधानि अतिशयेन तीक्ष्णीकरोति=अस्मान् प्रहरति), स [मर्त्यो] रिपुः नः (=अस्माकं) मा ईशत (=ईश्वरो मा भूत्)॥

'रावन्' याचा मूळ अर्थ जरी 'न देणारा' असा होतो तथापि त्याचा साधारण अर्थ 'शत्रु' असा होतो याविषयीं ऋ. ७. ५६. १५ याजवरील (आणि याच सूक्ताच्या पुढच्या मंत्रावरील) सायणभाष्य, आणि 'धूर्ति' याचा अर्थ 'उपद्रव' असा होतो याविषयी ऋ. ७. ९४. ८ या मंत्रावरील त्यांचेंच भाष्य पहा.

अग्नीस 'परम तरुण' म्हणण्याचें कारण पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, तो अनादिकाळापासून पृथ्वीवर आहे तथापि जसा पूर्वीं प्रखर होता तसाच आतां आहे आणि नित्य तसाच राहील म्हणून.

१६. हे ज्वालादंष्ट्र [अग्नी,] [तूं] [आमच्या] शत्रूंस घणानें [फोडिल्या] प्रमाणें फोडून त्यांचे तुकडे कर. जो [मर्त्य] आमचा द्वेष करितो [आणि] जो मर्त्य रात्रीच्या वेळीं [आम्हांस] मारितो तो शत्रु आम्हांवर अधिकारी न होओ.

16. As with a hammer, smash the enemies to pieces, O Agni of glaring jaws. And [that mortal] who hates us, [and that] mortal who kills us at night—may not such an enemy govern us.

---

१६ 'ज्वालादंष्ट्र'= 'तपुर्जम्भ.' म्हणजे ज्याच्या दाढा ज्वालारूपी आहेत, ज्वाला हाच ज्याच्या दाढा तो. हें विशेषण ऋग्वेदांत तीन ठिकाणीं आलें आहे आणि तें अग्नीसच लाविलेलें आहे. 'शत्रूंस घणानें [फोडिल्या] प्रमाणें फोडून त्यांचे तुकडे कर'='अराव्णः घना इव विष्वक् विजहि.' म्हणजे जसा, एकादा मातीचा गोळा, किंवा दगड अथवा लांकूड असावें आणि एकादा लोखंडाचा जड घण घेऊन त्याच्या डोकीवर मारावा म्हणजे त्याचे तुकडे तुकडे होऊन जिकडे तिकडे (विष्वक्) उडतात त्याप्रमाणें तूं आमच्या शत्रूंस मार म्हणजे त्यांचे तुकडे तुकडे होऊन जिकडे तिकडे उडतील.

'रात्रीच्या वेळीं आम्हांस मारितो'= 'शिशीते अति अक्तुभिः' शब्दशः अर्थ 'रात्रीच्या वेळीं [आपलें] [हत्यार] पाजळतो' म्हणजे आम्हांस रात्रीच्या वेळीं मारावयास टपतो, म्हणजे जो विश्वासघातक आहे, जो समोरासमोर येऊन आम्हांबरोबर न लढतां आम्हांस न कळत रात्रीं येऊन आम्हावर हल्ला करितो तो.

'रात्रीच्या वेळीं'='अक्तुभिः.' ऋ. १. ३४. ८; १. ४६. १४ इत्यादि मंत्रांवरील सायणभाष्य पहा.

या मंत्रांत शेवटीं केलेली प्रार्थना ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. 'तो शत्रु आम्हांवर अधिकारी न होओ' म्हणजे आम्हांस तो दास न करो असा नाही, तर आम्हांवर अंमल न चालवो, आम्हांवर राजा न होओ, असा अर्थ आहे.

**अग्निर्वव्रे सुवीर्यमग्निः कण्वाय सौभगम् ।**
**अग्निः प्रावन्मित्रोत मेध्यातिथिमग्निः साता उपस्तुतम् ॥ १७॥**

अग्निः । वव्रे । सुऽवीर्यम् । अग्निः । कण्वाय । सौभगम् ।
अग्निः । प्र । आवत् । मित्रा । उत । मेध्यऽअतिथिम् । अग्निः ।
साता । उपऽस्तुतम् ॥ १७ ॥

## भाषायाम्.

१७. अग्निः [ कण्वाय ] सुवीर्यं ( =शोभनवीर्योपेतां पुत्रपौत्रादिसंततिं ) वव्रे ( =ददौ ), अग्निः कण्वाय सौभगं ( =शोभनधनादिरूपं भाग्यं ) [ वव्रे =ददौ ]। अग्निर्मित्राणि ( =मित्रभूतान् स्वोपासकान् ) प्रावत् ( =प्रकर्षेण रक्षितवान् ), उत ( =अपि च ) मेध्यातिथिम् ( =एतन्नामकं कण्वकुलोत्पन्नं कंचिद् ऋषिं ) [प्रावत्], अग्निः उपस्तुतम् ( =एतन्नामकम् ऋषिं ) सातौ ( =धनादिसंपदः प्राप्तौ ) [प्रावत्= रक्षितवान् ] ॥

१७. अग्नि [कण्वाला] वीर्यसंपन्न संतति, अग्नि कण्वाला वैभव देता झाला; अग्नि [आपल्या] मित्रांस साहाय्य करिता झाला आणि मेध्यातिथीस [साहाय्य करिता झाला], अग्नि धनप्राप्तीसाठीं उपस्तुतास [साहाय्य करिता झाला].

17. Agni conferred brave progeny, Agni [conferred] prosperity upon Kaṇva. Agni helped [his] friends, and [helped] Medhyâtithi, Agni [helped] Upastut in the acquisition of wealth.

१७. पूर्वी अग्नीनें कोणाकोणाचें कल्याण केलें त्याचें वर्णन या मंत्रांत केलें आहे. मंत्रवक्ता म्हणतो, 'आमचा मूळ वंशपुरुष जो कण्व त्याला अग्नीनें सुसंतति आणि सुसंपत्ति दिली. आणि अग्नीनें दुसऱ्याहि आपल्या अनेक मित्रांस साहाय्य केलें, जसें उदाहरणार्थ आमच्याच कुळांतील जो मेध्यातिथि म्हणून महापुरुष होऊन गेला त्याला साहाय्य केलें. आणि उपस्तुत् ऋषीला साहाय्य करून धनसंपत्ति मिळवून दिली.'

'वीर्यसंपन्न संतति'='सुवीर्यम्.' अक्षरशः अर्थ 'सुवीर' ज्यांत आहेत असें वैभव; त्यावरून 'सुवीररूपी वैभव,' 'सुशीर्यानें युक्त अशीं पुत्रपौत्रादिक अपत्यें.' याच सूक्ताच्या ६ व्या मंत्रावरील टीप पहा. जसें 'सुवीर्य' म्हणजे 'चांगलें शौर्य असलेल्या अपत्यांनीं भरलेलें वैभव' अथवा 'सुवीर्ययुक्त पुत्रपौत्रादिरूप वैभव' असें होतें, तसेंच 'स्वश्व्यम्' म्हणजे 'चांगल्या अश्वांनीं युक्त असें वैभव' अथवा 'चांगले जे अश्व तद्रूपी वैभव' असें होत असतें त्याविषयीं ऋ. १. ४०. २; १. ९३. २ इत्यादि अनेक प्रमाणं आहेत.

'देता झाला'='वव्रे.' सायणाचार्य 'प्रार्थिला गेला' असा कर्मणि अर्थ करून 'प्रायच्छत्' या क्रियेचा अध्याहार करून 'सौभगम्' पदाचा निर्वाह करितात. पण तसें करणें अवश्य नाहीं. 'वव्रे' यांतील 'वन्' धातूचा अर्थ 'देणें' असा होतो याविषयीं ऋ. ७. १५. ४; ६. १६. २८ आणि १. १६९. २ या मंत्रांवरील सायणांचेंच भाष्य पहा. शिवाय ३१ व्या सूक्ताच्या १४ व्या मंत्रानें आमचें भाषांतर पहा.

'धनप्राप्तीसाठीं......साहाय्य करिता झाला' म्हणजे (युद्धांत अथवा दुसऱ्या कांहीं एका प्रयत्नांत) साहाय्य अथवा रक्षण करून धनप्राप्ति करून देता झाला' असा भावार्थ.

'मेध्यातिथि' आणि 'उपस्तुत्' हीं विशेषनामें आहेत. याच सूक्ताचा ११ वा मंत्र पहा.

'[आपल्या] मित्रांस'='मित्रा[णि]' म्हणजे अग्नीची सेवा करून अग्नीवर प्रीति करणारे जे उपासक लोक त्यांस. २६ व्या सूक्ताच्या पांचव्या मंत्रावरील 'तरव्य' शब्दाविषयींची टीप पहा.

अग्निना तुर्वशं यदुं परावत उग्रादेवं हवामहे।
अग्निर्नयन्नववास्त्वं बृहद्रथं तुर्वीतिं दस्यवे सहः ॥१८॥

अग्निना । तुर्वशम् । यदुम् । पराऽवतः । उग्रऽदेवम् । हवामहे ।
अग्निः । नयत् । नवऽवास्त्वम् । बृहत्ऽरथम् । तुर्वीतिम् । दस्यवे ।
सहः ॥ १८ ॥

---

## भाषायाम्.

१८. [ वयम् ] अग्निना ( =अग्निद्वारा ) तुर्वशं यदुम् उग्रदेवम् ( =एतन्नामकान् पुरातनकालपरेतान् त्रीन् महापुरुषान् ) हवामहे ( =आह्वयामः ) । दस्यवे सहः ( =दस्युहननाय अस्माकं बलवत्सहायभूतः ) अग्निः नववास्त्वं बृहद्रथं तुर्वीतिम् (=एतन्नामकान् पुरातनकालपरेतान् त्रीन् महापुरुषान्) [ आ]नयत् (=आनयत्) ॥

१८. अग्नीच्या द्वारें [आम्ही] तुर्वशाला, यदूला [आणि] उग्रदेवाला दूर प्रदेशाहून [येथें] बोलावितों. राक्षसांविरुद्ध [आमचा] सारथि [असा] अग्नि नववास्त्व, बृहद्रथ [आणि] तुर्वीति यांजला [येथें] आणो.

18. Through Agni we invoke Turvas'a, Yadu [and] Ugradeva from afar. May Agni, [who is our] strength against the demons bring Navavâstya, Brihadratha [and] Turvîti.

१८. या मंत्रांत सहा महापुरुषांस घेऊन येण्याविषयीं अग्नीची प्रार्थना केली आहे; तुर्वश, यदु, उग्रदेव, नववास्त्व, बृहद्रथ, आणि तुर्वीति हे पुरातन काळचे राजर्षि म्हणजे वेदांत सांगितलेले राजे होत. परंतु कण्व, अंगिरा, मधुच्छंद, विश्वामित्र, वामदेव इत्यादि प्रसिद्ध महर्षि जसे होऊन गेले तसे हे वेदमंत्रांचे द्रष्टे आणि प्रसिद्ध नव्हते. सायणाचार्याच्या म्हणण्याप्रमाणें तुर्वश, यदु, उग्रदेव, नववास्त्व, बृहद्रथ, आणि तुर्वीति हे सर्व राजर्षि होते.

हा मंत्र ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. कारण कीं आजपर्यंत ज्या मंत्रांचें भाषांतर झालें त्यांत अग्नीच्या द्वारें इतर देवांचेंच अथवा खुद्द अग्नीचेंच आह्वान झालें. परंतु यांत पूर्वी मरून गेलेले जे प्रसिद्ध महापुरुष अथवा भक्त त्यांचें आह्वान केलें आहे. यावरून मेलेल्या मनुष्यांचा धांवा करणें, 'ग्यानबा तुकाराम', 'नामदेव तुकाराम', 'दत्तात्रय अवधूता जनार्दन स्वामी एकनाथा!' 'स्वामी नारायण, स्वामी नारायण!' 'जय संतराम, संतराम बावानो जय' असें भजन करणें अथवा जप करणें, हें केवळ आधुनिक आहे असें नाहीं. मेलेल्या मनुष्यांस देवांप्रमाणें मानून त्यांचें आह्वान करणें, आणि त्यांस पूजणें हे प्रकार वैदिक युगांतहि असत.

'तुर्वश' आणि 'यदु' हीं दोनीं नांवें ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलीं आहेत, आणि चार पांच मंत्र सेरीज करून नित्य एकत्र येत असतात. ऋग्वेदांत ज्या ज्या मंत्रांत आलीं आहेत त्यावरून असें समजतें कीं, इंद्रानें तुर्वशाला आणि यदूला (संकटाच्या किंवा पाण्याच्या?) पार पाडलें (ऋ. ६. २०. १२; १. १७४. ९; ५. ३८. ८); इंद्रानें तुर्वशाला आणि यदूला रक्षिलें (ऋ. १. ५४. ६; ८. ४. ७; ८. ७. १८); इंद्र हा तुर्वशाच्या आणि यदूच्या घरीं पूजा स्वीकारितो आणि सोम पीतो (ऋ. ८. ४. १; ८. ४५. २७). तुर्वशवंशांतील आणि यदुवंशांतील मनुष्यांचे घरीं सोम पिण्याला इंद्र गुंतलेला असतो (ऋ. १. १०८. ८); तुर्वश आणि यदु हे शत्रूंच्या हातीं सांपडले होते त्यांस इंद्रानें सोडवून आणिलें (ऋ. ६. ४५. १). कोठकोठें असें लिहिलें आहे कीं तुर्वश आणि यदु हे राजे दिवोदास राजाचे शत्रु असत त्यांस इंद्रानें दिवोदासाकरितां

नि त्वा॒म॑ग्ने॒ मनु॑र्द॒धे ज्योति॒र्जना॑य॒ शश्व॑ते ।
दी॒देथ॒ कण्व॑ ऋ॒तजा॑त उक्षि॒तो यं न॑म॒स्यन्ति॑ कृ॒ष्टय॑: ॥१९॥

नि । त्वाम् । अ॒ग्ने । मनु॑: । द॒धे । ज्योति॑: । जना॑य । शश्व॑ते ।
दी॒देथ॑ । कण्वे॑ । ऋ॒तऽजा॑तः । उ॒क्षि॒तः । यम् । न॒म॒स्यन्ति॑ ।
कृ॒ष्टय॑: ॥ १९ ॥

## भाषायाम्.

१९. हे अग्ने, त्वां मनुः (=मनुष्पिता=सकलप्रजानां पिता मनुरिति प्रसिद्धः) शश्वते जनाय (=बहुविधाय जनाय) ज्योतिः (=प्रकाशो) [भूया इति कृत्वा] निदधे (=अत्र यजनदेशे स्थापितवान्)। [अपि च] [त्वम्] ऋतजातः (ऋतेन जातः=यज्ञेन निष्पादितः) [ऋतेन=यज्ञेन] उक्षितः (प्रवर्धितश्)[च] [सन्], कण्वे (=अस्माकम् आदिपुरूषस्य कण्वनामकस्य महर्षेर्गृहे) दीदेथ (=दीप्तवान् असि)। [अपि च] [तस्मादेव कारणात्] त्वां कृष्टयः (=सर्वाः प्रजाः=मनुष्याः) नमस्यन्ति (=नमस्कुर्वन्ति=भजन्ते) ॥

वश केलें (ऋ. ९. ६१. २; ८. ४९. ८; ७. १९. ८)· एका ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, इंद्रानें तुर्वशाची आणि यदूची पूजा म्हण करून 'अह्नवाय्य' म्हणून त्यांचा शत्रु होता त्याला वश करून त्यांच्या स्वाधीन केलें (ऋ. ८. ४५. २७); ऋ. ६. २७. ७ यांत असें सांगितलें आहे कीं इंद्रानें तुर्वश राजाला वश करून सृंज राजाच्या हस्तगत केलें. तुर्वश आणि यदु यांच्या येथील सोम पिण्यास अश्वी देव गुंतून राहतात तेथून त्यांस येण्याविषयीं दुसरे उपासकांनीं प्रार्थना केलेली आढळते (ऋ. १. ४७. ७; ८. ९. १४; ८. ३०. ५). पण याशिवाय विशेष माहिती या दोन राजांविषयीं मिळत नाहीं; म्हणजे ते कोठले आणि त्यांचा महिमा कशानें वाढला, त्यांणीं काय केलें वगैरे कांहींच वेदावरून समजत नाहीं.

'उग्रदेव' (अथवा उग्रादेव) याविषयीं कांहींच अवगत नाहीं. याच मंत्रांत हें विशेषनाम आढळतें. ऋग्वेदांत अथवा दुसऱ्या वेदांत कोठें आलेलें आढळत नाहीं.

'नववास्त्व' याविषयीं सुद्धां कांहीं इतिहास वेदांत आढळत नाहीं. मात्र ऋग्वेदांत तीन वेळ याचा उल्लेख आला आहे. ऋ. ६. २०. ११ यांत इंद्रानें नववास्त्वास त्याच्या बापाच्या स्वाधीन केला, आणि ऋ. १०. ४९. ६. यांत वृत्राप्रमाणें नववास्त्वास मीच निर्दाळिता झालों असें एका प्रमुख देवानें सांगितलें आहे. याशिवाय नववास्त्वाविषयीं कांहीं ठाऊक नाहीं.

'बृहद्रथ' हा कोण होता याविषयीं कांहीं ठाऊक नाहीं. ऋ. १०. ४९. ६ या मंत्रांत मात्र हें नांव आणखी एकदा आलें आहे.

१९. हे अग्नी, तुला मनु नानाविध जनास प्रकाश [ मिळावा म्हणून ] [ येथें ] स्थापिता झाला. [ हे अग्नी ], [ तूं ] यजनाच्या योगानें जन्मून आणि वाढून [ पूर्वीपासून ] कण्वाच्या घरीं प्रकाशत आला आहेस, आणि [ यास्तवच ] तुला सकल मनुष्यें भजतात.

19. Manu established thee [here] O Agni, a light for all people. Born [and] grown of sacrifice [ thou ] hast shone in [the house of] Kaṇva; and [so] men adore thee.

---

' तुर्वीति ' याविषयीं तरी इतिहास कांहीं ठाऊक नाहीं. मात्र ऋ. १. ५४. ६ यांत इंद्रानें त्याला रक्षिलें असें सांगितलें आहे. ऋ. १. ११२. २३ यांत त्याचें रक्षण अश्विदेवांनीं केलें असें सांगितलें आहे. ऋ. १. ६१. ११ यांत इंद्रानें पाण्यांत बुडालेल्या तुर्वीतीसाठीं कोरडी जमीन केली असें सांगितलें आहे. आणि दुसऱ्या दोन मंत्रांतहि तुर्वीतीला पाण्याच्या पार पाडला असें सांगितलें आहे. ( ऋ. २. १४. १२; ४. १९. ६.)

' राक्षसांविरुद्ध आमचा सारथि असा अग्नि......येथें आणो '=' दूरये महः ......नयत्.' हा अर्थ आम्हीं सायणांस अनुसरून केला आहे, आणि तो आम्हांस योग्य वाटतो. ' नयत् ' हें लेट्चें तृतीयपुरुषीं एकवचनी रूप आहे. कितीएकजण ' अग्नि ( राक्षसांविरुद्ध साहाय्यासाठीं )...नेता झाला ' असा अर्थ करितात; परंतु 'नववास्त्व, बृहद्रथ आणि तुर्वीति, हे अग्नीनें आपल्या मदतीसाठीं नेले असें कोठेंच आढळत नाहीं. शिवाय पूर्वार्धातील अर्थसंदर्भावरून ('अग्निना......हवामहे' या शब्दांवरून)प्र[illegible] अग्नि..आणो' हा सायणाचार्यांनीं केलेलाच अर्थ पाहिजे असें खचीत वाटतें.

---

१९. भावार्थः–' हे अग्नी,' सकल मानवांचा आदिपुरुष म्हणजे प्रजापति जो मनु त्याणें तुला या भूमीवर यज्ञशाळेंत प्रथम स्थापिला; आणि आमच्या कुळाचा जो आदिपुरुष कण्व ऋषि त्याच्या घरीं तूं यज्ञापासून जन्मून आणि यज्ञापासून मोठा होऊन आजपर्यंत प्रकाशला आहेस. आणि त्यामुळेंच म्हणजे अनादिकाळापासून मनूनें तुला स्थापिलें आणि कण्वानें पूजिलें म्हणून तुला आतां सकल लोक भजतात.' या सूक्ताचा कर्ता जो प्रस्कण्व तो कण्वकुळांतील होय हें ध्यानांत ठेविलें म्हणजे मंत्राचा उत्तरार्ध सहज समजेल.

' मनु ' कोण याविषयीं याच सूक्ताच्या दहाव्या मंत्रावरील आमची टीप पहा.

' यजनाच्या योगानें जन्मून आणि वाढून'=' ऋतेन जातः उक्षितश् [च].' म्हणजे यज्ञ अथवा यजनरूपी पूजा क-

त्वेषासो॑ अ॒ग्नेरम॑वन्तो अ॒र्चयो॑ भी॒मासो॒ न प्रती॑तये ।
र॒क्ष॒स्विनः॒ सद॒मिद्या॑तु॒माव॑तो॒ विश्वं॒ सम॒त्रिणं॑ दह ॥२०॥११॥

त्वे॒षासः॑ । अ॒ग्नेः । अम॑ऽवन्तः । अ॒र्चयः॑ । भी॒मासः॑ । न । प्रति॑ऽइतये ।
र॒क्ष॒स्विनः॑ । सद॑म् । इत् । या॒तु॒ऽमाव॑तः । विश्व॑म् । सम् । अ॒त्रिण॑म् । द॒ह ।
॥ २० ॥ ११ ॥

## भाषायाम्.

२०. अग्नेः अर्चयः ( =ज्वालास् ) त्वेषाः ( =दीप्ता ), अमवन्तः ( =बलवन्तो ), भीमाः ( =भयंकराश् ) [ च ] [ सन्ति ], प्रतीतये [ च ] न ( =प्रतिबन्धाय न सन्ति = केनापि प्रत्येतुं प्रतिबन्धितुं न शक्यन्ते ) । [ अतो हे अग्ने, ] [ त्वं ] रक्षस्विनो यातुमावतः ( =बलवतो यातुधानान् = प्रचण्डान् असुरान् ) विश्वम् अत्रिणं [ च ] (=सकलमपि भक्षकं शत्रुं च ) सदम इत् ( =सदा एव ) संदह ( =सम्यग् भस्मीकुरु ) ॥

---

रण्यासाठीं उत्पन्न केलेला आणि यज्ञ म्हणजे हवि अर्पण करून वाढविलेला. जसा एकादा मुलगा जन्मतो आणि त्यास खाण्यापिण्यास घालून घरीं मोठ्या प्रीतीनें वाढवितात तसा अग्नि हा कण्वाच्या घरीं वाढविलेला आहे असा व्यंग्यार्थ आहे.

'आणि [वास्तवच] तुला'=' यम्.' संबंधी सर्वनामाचा अर्थ अशा प्रकारें केव्हां केव्हां करावा लागतो याविषयीं विशेष लिहावयास नकोच.

'मनुष्यें' = 'कृष्टयः' 'कृष्टि' शब्दाचा अर्थ 'मनुष्य' असा कसा होतो हें सांगितलें पाहिजे. 'कृष्टि' म्हणजे मूळ अर्थ 'नांगरणारा;' त्यावरून 'खेती करणारा;' आणि प्राचीन काळीं सर्वच मनुष्यें कृष्टि अथवा खेती करून राहत म्हणून साधारण कोणताहि 'मनुष्य' असा अर्थ आहे. प्रस्तुत मंत्रांत मंत्रवक्ता प्रस्कण्व ऋषि स्वतः आपणास वगळून इतर लोकांस 'कृष्टयः' असें म्हणत नाहीं. 'कृष्टयः' म्हणजे 'जन,' 'प्रजा,' 'लोक' असा अर्थ वेदांत अनेक ठिकाणीं होतो. आणि ऋ. ३. ४९. १ यांत इंद्राविषयीं असें म्हटलें आहे कीं 'हे ऋत्विजांनो, मोठ्या इंद्राला तुम्हीं स्तवा, कारण कीं ज्या 'कृष्टि' (प्रजा, लोक, यजमान) इंद्रास सोम अर्पण करून आपण सोम पितात त्यांची इच्छा पूर्ण होत असते' ('शंस महाम् इन्द्रं यस्मिन् विश्वाः आ कृष्टयः सोमपाः काममव्यन्'). ऋ. ५. १९. ३ यांत 'कृष्टि' याचा अर्थ सायणांनीं 'ऋत्विज्' असा केला आहे. ( शिवाय ऋ. ८. ७५. १०; ८. १०३. ३; ९. ८६. ३७; ३. ५९. १ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा ). यावरून

२०. अग्नीच्या ज्वाळा विक्राळ, प्रतापी, [आणि] भयंकर [आहेत] [आणि] त्यांचा प्रतिबंध कोणीहि करूं शकत नाहीं.— [तर हे अग्नी,] [तूं] प्रचंड राक्षसांला, [आणि] [आम्हांस] खाणाऱ्या सर्व शत्रूंला एकदम जाळून भस्म कर.

20. The flames of Agni are glaring, powerful [and] awe-inspiring, [and are] not to be opposed.—Do [thou], [therefore, Agni], at once burn down the powerful demons [and] all [our] consuming enemies.

---

उघड दिसून येतें कीं प्राचीन ऋषि आपणास 'कृष्टि' म्हणजे 'कृषि करणारे' अथवा 'कुणबावा करणारे' अथवा 'कुणबी' असें म्हणविण्यास कांहींच अनमान करीत नसत. आणि कृषि करून उत्पन्न केलेलें धान्य त्यांच्या उपयोगीं पडत नसे असेंहि नसे. 'ऋषिपंचमीच्या' दिवसीं ज्या ऋषींस कर्षानें उत्पन्न केलेलें धान्य चालत नाहीं ते ऋषि आमच्या पौराणिकांनीं आणि भटजींनीं आलीकडेस उत्पन्न केलेले आहेत.

'कण्वाच्या घरीं'='कण्वे.' शब्दशः 'कण्वाच्या ठायीं', 'कण्वाच्या येथें' असा अर्थ आहे. ही सप्तमी ध्यानांत ठेवावी.

---

२०. 'हे अग्नी, तुझ्या ज्वाळा, म्हणजे तुझें सर्वत्र पडणारें तेज प्रखर, प्रचंड, आणि भयंकर आहे आणि त्याचा उपमर्द कोणीहि करूं शकणार नाहीं. तर हे अग्नी, आम्हांस उपद्रव करण्याचें बळ ज्यांस आहे अशा असुरांस आणि आम्हांस खातात अथवा बाधा करितात अशा सर्व शत्रूंस तूं एकदम जाळून नाहींसे करून टाक' असें कवीचें हृत, आणि हा या सूक्ताचा उपसंहार आहे. उत्तरार्धांत जी प्रार्थना आहे, ती पूर्ण करण्यास अग्नीला सामर्थ्य आहे असें पूर्वार्धांत सांगितलें आहे.

'प्रचंड राक्षसांला'='रक्षस्विनः यातुमावतः.' या शब्दांचा अर्थ कितीएक विद्वान 'राक्षस आणि जादु करणारे' असा करितात. पण 'रक्षस्विन' शब्द ज्या ज्या मंत्रांत आला आहे ते सर्व मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पाहतां, 'बलवान्' म्हणजे प्रचंड असाच अर्थ सायणाचार्य निरंतर देतात आणि तोच खरोखर सर्वत्र बसतो व योग्य आहे. (विशेषेंकरून ऋ. ८. २२. १८ आणि ८. ६०. ८ हे मंत्र आणि भाष्य पहा).

'[आम्हांस] खाणाऱ्या सर्व शत्रूंस'='विश्वम् अत्रिणम्.' 'अत्री' याचा अर्थ 'खाणारा' असा आहे. हा शब्द ऋग्वेदांत पंधरा मंत्रांत आला आहे. ते सर्व पहातां आणि त्यांजवरील भाष्य वाचतां 'खाणारे,' 'खाऊन टाकणारे,' हाच अर्थ सायणांनीं दिला आहे. आणि सर्व ठिकाणीं 'खाऊन टाकणाऱ्याचा-

## सूक्तम् ३७.

घोरपुत्रः कण्व ऋषिः । मरुतो देवता । गायत्री छन्दः ।

**क्रीळं वः शर्धो मारुतमनर्वाणं रथेशुभम् ।**
**कण्वा अभि प्र गायत ॥ १ ॥**

क्रीळम् । वः । शर्धः । मारुतम् । अनर्वाणम् । रथेऽशुभम् ।
कण्वाः । अभि । प्र । गायत ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. हे कण्वाः ( =कण्वकुलोत्पन्ना जनाः ), वः ( =युष्माकं=पुरातनकालात्प्रभृति युष्माभिः पूजितं ) क्रीळं ( =क्रीडं - विहरणशीलम् ) अनर्वाणं ( =शत्रुहीनम्=अजातशत्रुं ) रथेशुभं ( =स्वकीये रथेवस्थाय शोभमानं ) मारुतं शर्धः ( =मरुतां शर्धः =मारुतं बलं = मरुतां गणम् ) अभिप्रगायत ( =अभितः प्रकर्षेण स्तुध्वम् ) ।

सून आम्हांस रक्ष' अशीच प्रार्थना कोणत्याना कोणत्यातरी देवाची केलेली असते. तीन ठिकाणीं तर 'खाऊन टाकणाऱ्या राक्षसांपासून आमचें रक्षण कर' असें स्पष्ट विशेषण लावून म्हटलें आहे (ऋ.६.५१.१४; ९. १०४. ६; ९. ८६.७ ) यावरून 'हे खाऊन टाकणारे' कोण ? असा प्रश्न निघतो. आर्य लोकांच्या आसपास राहत होते ते अनार्यजन (कोळी, घोंड इ०) पूर्वी माणसें खात आणि डंकणी (=डस्यूणी= दस्युनो, म्हणजे कोळणी, भिल्लिणी इ०.) माणसाचें काळीज काढून खातात अशी अजून ख्याति आहे. तर हेच लोक असतील असें संभवतें. आस्त्रेलिया सारिख्या रानटी लोकांनीं भरलेल्या प्रदेशांत सुधारलेले इंग्रज लोक गेले आणि आसपासचे रानटी लोक माणसांस मारून खातात आणि केव्हां केव्हां रात्रीच्या वेळीं आपल्या घरावर हल्ला करून आपणासहि खातात असें पाहून 'हे परमेश्वरा, या खाऊन टाकणाऱ्या शत्रूंपासून आम्हांस रक्ष' अशी प्रार्थना त्यांणीं केली तर ती किती अवश्य होईल तें आमच्या ध्यानांत सहज येतें. या आर्यावर्तांत आमचे पूर्वज प्रथम वस्तीसाठीं आले तेव्हां येथें अगोदर राहणारे रानटी लोक पुष्कळ होते इतकेंच नाहीं, पण ते फार प्रबळ होते; आणि त्या अनार्य ('दस्यु', 'दास', 'अव्रत,' 'अश्रद्ध' 'अयज्ञ,' 'अयज्यु,' 'अकर्मा,' 'अन्यव्रत'=भिन्नधर्माचे, 'कृष्णयोनि'=काळ्या जातीपासून झालेले,) अशा लोकांपासून आमचें संरक्षण करावें आणि त्यांच्या वर आमचा अमल बसे असें करावें अशी प्रार्थना देवांस केलेली वेदांत पुष्कळ ठिकाणीं आली आहे.

## सूक्त ३७.

ऋषि–पूर्वीच्या सूक्ताचा कर्ता जो घोराचा पुत्र कण्व तोच. देवता–मरुत्. वृत्त–गायत्री.

१. हे कण्वांनो, चंचळ, निःशत्रु, [आणि] रथारूढ [असा जो] तुमचा मरुद्गण त्याजप्रत [तुम्ही] गा.

## HYMN 37.

To the *Maruts or the Storm-Gods.*
By the same author as that of the previous hymn. Metre—*Gâyatrî.*

1. Sing forth, ye Kaṇvas, the praises of your host of Maruts, playful, free from enemies, [and] shining in [their] car;

१. हें सूक्त मरुतांविषयीं आहे. आणि मंत्रवक्ता म्हणतो, ' हे कण्वांनो, चंचळ मुलाप्रमाणें जिकडे तिकडे धांवणारा, अजातशत्रु म्हणजे ज्याला जिकणारा कोणी नाहीं, आणि रथारूढ होऊन जाणारा असा जो तुमच्या मरुतांचा गण त्याची तुम्ही स्तुति गा.'

सूक्तकर्ता कण्वकुळांतील प्रस्कण्व म्हणून मनुष्य आहे; आणि ' हे कण्वांनो, तुम्ही आपल्या मरुद्गणाला गा' असें म्हणतो, 'आम्ही आपल्या मरुद्गणाला गाऊंया' असें म्हणत नाहीं, यावरून काय समजावयाचें? दोहोंतून एक उत्तर असावें: ' तुमच्या मरुद्गणास गा' म्हणजे तुम्ही आणि मी प्रस्कण्व असे कण्वकुळांतील मनुष्य आमच्या मरुद्गणास गाऊंया असा अर्थ असेल एक; किंवा या सूक्ताचा कर्ता अथवा द्रष्टा प्रस्कण्व असें संप्रदायावरून मानण्याची चाल पडली आहे तथापि खरोखर कर्ता कोणीतरी दुसरा कवि असून त्याला कण्वकुळांतील मनुष्यांनीं मरुद्गणाविषयीं स्तोत्र रचण्याच्या कामीं योजिल्यावरून तो कण्वांस म्हणतो ' तुम्ही आपल्या मरुद्गणास गा; ' आणि हें स्तोत्र दुसऱ्यानें रचिलें तरी कण्वकुळांतील लोक फार दिवस आपल्या घरीं भजनाप्रमाणें म्हणत असत त्यामुळें वेगवेगळ्या ब्रह्मकुळांतील सूक्तें घेऊन वेदव्यासानें जेव्हां ' ऋग्वेद संहिता ' म्हणजे ' गाथा ' केली तेव्हां कण्वकुळांतून मिळविलेलीं सूक्तें तीं कण्वकुलोत्पन्न प्रसिद्ध (ऋ. ८. ३. ९; १. ४४. ६; १. ४५. ३) अशा प्रस्कण्वाचीं अशी समजूत सहज झाली असेल. ह्या उत्तरपक्षाचा विचार करण्यासारिखा आहे असें आम्हांस वाटतें. कारण तो खरा ठरला तर पुष्कळ सूक्तांस तो लागू होईल आणि या मंत्रासारिख्या दुसऱ्या मंत्रांवरीलहि अडचण नाहींशी होईल.

' मरुद्गण '–' मारुतं शर्धः.' ' शर्ध ' शब्द अकारान्त पुंल्लिंगीहि आहे आणि सकारान्त नपुंसकहि आहे. या ठिकाणीं 'क्रीळं' आणि 'मारुतं' या विशेषणांच्या संबंधानें सकारान्त नपुंसकलिंगी 'शर्धस्' शब्दाचा प्रयोग आणि 'अनर्वाणम्' व 'रथेशुभम्' या विशेषणांच्या संबंधानें अकारान्त पुंल्लिंगी 'शर्ध' शब्दाचा प्रयोग आहे असें समजावें. "मरुद्गण '

**ये पृषतीभिर्ऋष्टिभिः साकं वाशीभिरञ्जिभिः ।**
**अजायन्त स्वभानवः ॥ २ ॥**

ये । पृषतीभिः । ऋष्टिऽभिः । साकम् । वाशीभिः । अञ्जिऽभिः ।
अजायन्त । स्वऽभानवः ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. ये स्वभानवः (=स्वकीयदीप्तियुक्ता) [मरुतः] [निज]पृषतीभिः (=स्वस्ववाहनभूता या बिन्दुयुक्ता मृग्यस्ताभिः) [साकं], [निज]ऋष्टिभिः (=अंसेषु धृतैरायुधविशेषैः) [साकं], [निज]वाशीभिः (=आरारव्यैर्निजायुधैः) [साकं], [निजैः] अञ्जिभिः (=आभरणैश्) [च] साकम[एव] अजायन्त ॥

आजन्मैव पृषत्यादिभिर्युक्ताः सन्तीति भावः ।

असें म्हणण्याचें कारण हें कीं मरुत् हे पुष्कळ आहेत. पण ते किती आहेत त्याची परिगणना निश्चयानें कोठें सांगितलेली नाहीं. तथापि ऋ. ८. ९६. ८ यांत 'मरुत्' एकशें ऐशीं आहेत (त्रिः षष्टिः त्वा मरुतः ववृधानाः उस्राः इव इ०) आणि ऋ. १. १३३. ६ यांत ते नुस्ते सत्तावीस आहेत असें सांगितलें आहे.

'रथारूढ'='रथेशुभ्'. मरुद्देवहि इतर देवांप्रमाणें रथांत बसून जातात असें वेदांत सांगितलें आहे. "अंसेषु वः ऋष्टयः पत्सु खादयः......मरुतः रथेशुभः" ते सोन्याच्या रथांत बसून जातात आणि त्या रथांस सोन्याचीं चाकें आहेत असें सांगितलें आहे. (ऋ. ५. ५७. १; १. ६४. ११; १. ८८. ५; १. ८८. १, २.) त्यांच्या रथांस टिपक्याटिपक्याच्या हरिणी जोडलेल्या असतात असें सांगितलें आहे (पुढचा मंत्र पहा; शिवाय ऋ. ८. ७. २८ पहा). मरुतांच्या रथांविषयीं वेदांत पुष्कळ ठिकाणीं उल्लेख आला आहे. 'मरुत्' म्हणजे वादळें अथवा वारे तेच देव असें आहे त्यापेक्षां त्यांच्या रथांस हरिणी जोडल्या असतात हें म्हणणें अगदी योग्य आहे. हरणें मैदानांत धांवत असतांना ज्याणें पाहिलीं असतील त्याला हरणांपेक्षां दुसरें कोणतें जनावर वाऱ्याचा रथ ओढण्यास अधिक योग्य आहे असें वाटेल ?

मरुतांविषयीं सूक्त ६. मं. ५ याजवरची टीप ४० व्या पृष्ठावर पहा.

२. जे स्वतेजस्क [ मरुत् ] [आपल्या] हरिणी, [आपले] भाले, [आपले] कुठार, [आणि आपले] अलंकार यांसहितच जन्मले.

2. The self-luminous Maruts who were born with [their] does, [their] spears, [their] axes [and their] ornaments.

२. वेदांत पुष्कळ ठिकाणीं मरुतांविषयीं जें वर्णन येतें त्यांत असें सांगितलें आहे कीं, मरुतांच्या रथास हरिणी जोडलेल्या असतात, बैल अथवा घोडे जोडलेले नसतात, त्यांच्या खांद्यावर भाले असतात; त्यांजवळ कुठार अथवा परशु हीं आयुधें असतात आणि त्यांच्या आंगावर अलंकार घातलेले असतात. ह्या वर्णनास अनुलक्षून मंत्रवक्ता म्हणतो कीं, ' मरुतांस ह्या वस्तु मागाहून मिळालेल्या नाहींत. ते जेव्हां प्रथम उत्पन्न झाले तेव्हांच ते आपल्या हरिणींसकट, आपल्या भाल्यांसकट, आपल्या कुऱ्हाडींसकट, आणि आपल्या आभरणांसकटच उत्पन्न झाले.' असें जे मरुत् "त्यांजप्रत तुम्ही गा" असा पूर्व मंत्राशीं संबंध आहे.

' हरिणी ' = ' पृषती.' ऋ.१. ६४.८ याजवर सायणाचार्य म्हणतात कीं, "पृषती म्हणजे मरुतांच्या ज्या वाहनभूत "पांढऱ्या टिपक्यांच्या हरिणी त्यांचें नांव "होय असें इतिहासकर्त्यांचें म्हणणें आहे "आणि अनेकवर्णांच्या ज्या ढगांच्या मा"लिका त्याच पृषती होत असें निरुक्तका"रांचें मत होय." आम्हांस वाटतें दोघांचेंहि म्हणणें खरें आहे. वायुरूपी ज्या देवता तेच मरुत्; आणि वायु फार वेगानें धांवतात; तेव्हां आकाशमार्गानें धांवणाऱ्या मरुतांस ( म्हणजे वाऱ्यांस अथवा वावटळींस) आकाशांत फिरणाऱ्या ज्या अनेक मेघमालिका त्यांजवर बसून हे वावटळींचे देव जातात असें म्हणणें यांत कांहीं ओढाताण नाहीं; आणि हरिणीप्रमाणें चपल वाहन दुसरें नाहीं त्यापेक्षां चित्रविचित्र रंगाचे जे ढग त्याच कोणी एक चित्रविचित्र टिपक्याच्या हरिणी त्यांस आपल्या रथास जोडून वावटळी ज्या तेच कोणी (मरुत्) देव फार वेगानें धांवतात असें रूपक करणें हें केवळ स्वाभाविक आहे. 'पृषती' याचा अर्थ सायणाचार्य आम्हीं केल्याप्रमाणेंच बहुतकरून करितात.ऋ.१ ३६. २ यांत ते ' वडवा ' म्हणजे ' घोड्या ' असा अर्थ करितात; परंतु तेथें त्यांचा अर्थ हरिणीरूपी घोड्या असा समजावयाचा. कितेक विद्वान्. 'पृषती' म्हणजे घोड्या असाच सर्वत्र अर्थ समजतात, पण आम्हांस वाटतें तें बरोबर नाहीं. मेघमालिकेवर जाणें म्हणजे त्वरित जाणें याविषयीं कालिदासविक्रमोर्वशी अंक ४ यांत " अचिरप्रभाविलसितैः पताकिना । सुरकार्मुकाभिनवचित्रशोभिना । गमितेन खेलगमने विमानतां । नय मां नवेन वसतिं पयोमुचा" असें आहे तें पहा.

' भाले ' = ' ऋष्टयः.' ' भाले' हा अर्थ सायणांनीं केलेला नाहीं. ते आयुधविशेष इतकेंच म्हणतात. परंतु ऋ. १.

इहेव शृण्व एषां कशा हस्तेषु यद्वदान् ।
नि यामञ्चित्रमृञ्जते ॥ ३ ॥

इह्ऽइंव । शृण्वे । एषाम् । कशाः । हस्तेषु । यत् । वदान् ।
नि । यामन् । चित्रम् । ऋञ्जते ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. एषां (=मरुतां) कशाः (=प्रतोदाः स्वस्ववाहनताडनहेतवो) [दूरा अपि] यद् हस्तेषु वदान् (=ध्वनिं कुर्वन्ति) [तद्] [अहम्] इहेव शृण्वे (=शृणोमि)। [पश्य पश्य] [ताः कशा] यामन् (=यामनि=मार्गे) [एनान्मरुतः] चित्रं (=सुन्दरं यथा भवति तथा) ऋञ्जते (=प्रसाधयन्ति=अलंकुर्वन्ति)॥

६४. ७; ५. ४१. ११ आणि ५. ५७. ६ या तीन मंत्रांत हीं आयुधें मरुत् खांद्यावर घेतात असें आहे आणि ऋ. ५. ५२. ६ यांत 'उंच ऋष्टि' (ऋष्वाः ऋष्टीः असृक्षत) मेघ फोडण्यासाठीं मरुतांनीं फेकल्या असें आहे आणि ऋ. १. १६६. ४ यांत ऋष्टि 'पुढें सारिल्या' (प्रयतासु ऋष्टिषु) असें आहे त्यापेक्षां या 'ऋष्टि' म्हणजे 'भाले' होत असें अनुमान चांगलें होतें.

'कुठार' = 'वाशी.' सायणाचार्य येथें किंकाळी अथवा शत्रूच्या सेनेला भिवविण्याकरितां ठोकलेली आरोळी असें म्हणतात. पण तो अर्थ येथें संभवत नाहीं. वास्तव ऋ. १. ८८. ३ याजवरील 'अधि तनुषु वाशीः' या पदांवर त्यांचें "शत्रूणाम् आक्रोशकम् आराख्यम् आयुधम्" शत्रूला रडविणारें आर नांवाचें शस्त्र) असें भाष्य आहे, आणि ऋ. ५. ५३. ४ यांतील 'वाशीषु' याजवर त्यांचें भाष्य "वाशीषु आयुधेषु" असें आहे आणि ऋ. ५. ५७. २ यांतील 'वाशीमन्तः' याचा अर्थ त्यांणीं "वाशीति तक्षणसाधनमायुधम् । तद्वन्तः" (=वाशी म्हणजे तोडण्याचें एक हत्यार तें आहे ज्यांस ते) असा केला आहे त्या सर्वांवर नजर ठेवून आम्हीं 'कुठार' असा अर्थ केला आहे.

'स्वतेजस्क' = 'स्वभानवः.' 'स्वभानु' हें विशेषण जसें अग्नीला लाविलेलें आढळतें तसेंच मरुतांसहि पुष्कळ ठिकाणीं लाविलेलें आहे. (ऋ. ५. ५३. ४; ५. ५४. १; ६. ४८. १२ आणि ८. २०. ४ पहा).

३. [त्यांचे] चाबूक त्यांच्या हातांत वाजतात ते येथें [च] जणुं मला ऐकूं येत आहेत. [मरुद्देव] मार्गीं [येतां येतां] त्यांस त्यांचे चाबूक सुंदर शोभवीत आहेत [ते पहा].

3. I hear as if close at hand their whips as [they] resound in their hands. [Lo, the whips] adorn [them] beautifully on [their] way.

---

३. ऋषि म्हणतो कीं, ' मरुत् देव रथांत बसून आपल्या हरिणींस चाबकांनीं मारीत मारीत येत आहेत, आणि ते दूर आहेत तरी त्या त्यांच्या चाबकांचा आवाज मला येथेंच जणुं ऐकूं येत आहे. ते जसजसे आकाशमार्गानें येत आहेत ततसें त्यांचे चाबूक त्यांस किती सुंदर रीतीनें शोभवीत आहेत पहा !' मरुत् रथांत बसून जातात म्हणून पूर्वीं सांगितलेंच आहे. त्यांच्या रथास हरिणी जोडलेल्या असल्यामुळें ते मोठ्या झपाट्यानें जात आहेत आणि त्यांनीं हातांत चाबूक घेतले आहेत ते जणुं काय फार सुंदर प्रत्यक्षच दृष्टीस पडत आहेत, आणि त्यांचा आवाज जणुं काय प्रत्यक्षच ऐकूं येत आहे, अशी ऋषि कल्पना करीत आहे.

या मंत्राचा तृतीय म्हणजे अंत्य चरण जरा कठिण आहे. ' नियामन् चित्रम् ऋञ्जते ' याचा अर्थ सायणाचार्य " चाबकांचा ध्वनि यामन् म्हणजे संग्रामांत चित्रं म्हणजे नानाविध [शौर्य] "निऋञ्जते म्हणजे विशेषेंकरून शोभवितात" असा करितात. आतां ' यामन् ' म्हणजे युद्ध अथवा संग्राम हा अर्थ जरी (ऋ.४. २७.४ आणि ४. २८. २ यांजवरील भाष्यावरून) सिद्ध होतो, तथापि येथें तो चांगला संभवत नाहीं. आणि 'यामन्' म्हणजे मरुतांचा जो मार्ग तो असा अर्थ पुष्कळ ठिकाणीं वेदांत आलेला आहे. शिवाय 'चित्रम्' या विशेषणाच्या निर्वाहासाठीं 'शौर्य' याचा अध्याहार करावा लागतो, आणि तो ओढाताणीनेंहि करितां येत नाहीं. आम्ही 'चित्रम्' म्हणजे 'सुंदर' ( 'सुंदर रीतीनें' ) असा अर्थ केला आहे त्यास प्रमाण ऋ. [illegible]. ५. याजवरील सायणभाष्य होय.

आतां 'निऋञ्जते' याचा अर्थ 'वश करितात', 'जिंकितात' असा होतो असें ( ऋ. ८. ९०. ४ त्वं हि सत्यः मघवन् अनानतः वृत्रा भूरि निऋञ्जसे, आणि १०. १४०. २ विश्वा भुवना निऋञ्जसे यांवरून ) दिसतें तथापि प्रस्तुत मंत्रांत 'यामन् निऋञ्जते' याचा अर्थ 'संग्रामांत मरुत् जिंकितात' असा करूं गेलें तर 'शत्रून्' या अनपेक्षित पदाचा अध्याहार करावा लागेल आणि

प्र वः शर्धाय घृष्वये त्वेषद्युम्नाय शुष्मिणे ।
देवत्तं ब्रह्म गायत ॥ ४ ॥

प्र । वः । शर्धाय । घृष्वये । त्वेषऽद्युम्नाय । शुष्मिणे ।
देवत्तम् । ब्रह्म । गायत ॥ ४ ॥

प्र शंसा गोष्वघ्न्यं क्रीळं यच्छर्धो मारुतम् ।
जम्भे रसस्य वावृधे ॥ ५ ॥ १२ ॥

प्र । शंस । गोषु । अघ्न्यम् । क्रीळम् । यत् । शर्धः । मारुतम् ।
जम्भे । रसस्य । ववृधे ॥ ५ ॥ १२ ॥

## भाषायाम्.

४. [ हे कण्वाः ], [ यूयं ] वः ( =युष्माकं संबन्धिने ) घृष्वये ( =शत्रुधर्षकाय =प्रतापिने ), त्वेषद्युम्नाय ( =दीप्यमानयशसे ), शुष्मिणे ( =बलवते ) [ मारुताय ] शर्धाय (=मरुत्समूहरूपाय बलाय=मरुतां गणाय ) देवत्तं ( =देवदत्तं= देवप्रसादाल्लब्धं ) ब्रह्म ( =स्तोत्रं ) प्रगायत ( =प्रकर्षेण गायत ) ॥

५. यत् मारुतं शर्धः ( =मरुतां शर्धः=मरुद्गणः ) गोषु अघ्न्यं ( गोषु वृषभं= गोषु वृषभ इव ) क्रीळं ( =विहारोपेतम् ) [ अस्ति ] [ तत् ] प्रशंस ( = प्रकर्षेण स्तुहि ) । [ तत् शर्धः ] रसस्य जम्भे ( =पयोरसस्य भक्षणे=पयोरसभक्षणेन ) वावृधे ( =वृद्धमरित ) ॥

'चित्रम्' याचा चांगला निर्वाह लागणार नाहीं. तथापि 'ते (मरुत्) युद्धांत सुंदर रीतीनें जिंकितात' असें, अथवा 'सुंदर मरुद्गण (=चित्रं मारुतं शर्धः) युद्धांत [ शत्रूंस ] जिंकून टाकितो' असें भाषांतर होऊं शकेल; मात्र मग पूर्वार्धाचा भावार्थ 'मरुत् लढाईत लढतांना आपल्या हरिणींस चाबकांनीं मारिताहेत त्या चाबकांचा आवाज मला जणुं येथें ऐकूं येत आहे' असा करावा लागेल.

४. [हे कण्वांनो], [तुम्ही] आपल्या प्रतापी, महातेजस्क आणि बलवान् [मरुद्]गणासाठीं देवांनीं दिलेलें स्तोत्र गा.

५. गाईंमध्यें [जसा] गोहरा [खेळाडू असतो तसा] खेळाडू जो मरुतांचा गण त्याची स्तुति गा. [दुग्ध]रस पिऊन [पिऊन] [तो] पुष्ट झाला आहे.

4. Sing forth, [ye Kaṇvas], the god-given hymn in honor of your victorious, splendidly glorious [and] mighty Host [of Maruts].

5. Praise the Host of the Maruts that [is] [as] a frolicsome bull among the cows. [It] has grown fat by drinking the essence [of the milk].

---

४ हा मंत्र उघड आहे. तीन चार शब्दांविषयीं मात्र थोडेंसें सांगितलें पाहिजे. '[तुम्ही] आपल्या' = 'वः.' या मंत्राचा कर्ता कण्वांस (म्हणजे कण्वकुलांत उत्पन्न झालेल्या उपासकांस) म्हणतो आहे; आणि कण्वकुळांत मरुद्गणाची भक्ति फार दिवसांनीं चालत आली आहे आणि त्या देवांविषयीं स्तोत्र गाण्यास कण्वांनीं स्तोत्रवक्त्या ऋषीस सांगितल्यावरून 'तुमच्या मरुद्गणास' असें म्हणतो. याच सूक्ताच्या पहिल्या मंत्रावरची टीप पहा.

'प्रतापी'='घृष्वये'. अक्षरशः अर्थ 'रगडणारा' (="शत्रूणां घर्षकम्," सायणाचार्य). ऋग्वेदांत 'घृष्वि' शब्द ज्यांत आला आहे असे पुष्कळ मंत्र आहेत, त्या सर्वांवरील सायणभाष्य पाहून हा त्यांणीं येथें केलेला अर्थ आम्हीं कायम ठेविला आहे.

'[मरुद्गणासाठीं]'= '[मारुताय] शर्धाय'. या ठिकाणीं 'शर्ध' शब्दाचा अर्थ सायणाचार्य 'बळ' असा करितात. पण ऋ. १. १२७. ६; २. १. ६ आणि २. ३. ३ या मंत्रांवरील त्यांचेंच भाष्य पहा.

'देवांनीं दिलेलें स्तोत्र गा'='प...... देवत्तं ब्रह्म गायत.' ऋ. ८. ३२. २७ यांत "प्र व उग्राय निष्टुरे अषाळ्हाय प्रसक्षिणे। देवत्तं ब्रह्म गायत" (="पराक्रमी, शत्रूंस जमीनदोस्त करणारा, अपराजित आणि विजयशाली जो तुमचा इंद्र त्यासाठीं तुम्हीं देवांनीं दिलेलें स्तोत्र गा") असें इंद्राविषयीं म्हटलें आहे. 'देवांनीं दिलेलें स्तोत्र' म्हणजे काय? आम्हांस असें वाटतें कीं मंत्रवक्ता ऋषि आपलें स्तोत्र देवप्रेरित अथवा देवप्रणीत आहे, आपण मनुष्यानें रचिलेलें नव्हे असें मानून बोलत आहे. या कारणासाठीं प्रस्तुत मंत्र मोठ्या महत्त्वाचा आहे असें समजलें पाहिजे.

५ 'गाईंमध्यें जसा एखादा तरुण गोहरा बोकळतो तसा आकाशांतील अभ्रमालिकारूप गाईंत बोकळणारा जो मरुद्गण त्याची स्तुति करा. तो मरुद्गण त्या गाईंचा दुग्धरस पिऊन पिऊन पुष्ट झालेला आहे' असा आमच्या भाषांतराचा

**को वो वर्षिष्ठ आ नरो दिवश्च ग्मश्च धूतयः ।**
**यत्सीमन्तं न धूनुथ ॥ ६ ॥**

कः । वः । वर्षिष्ठः । आ । नरः । दिवः । च । ग्मः । च । धूतयः ।
यत् । सीम् । अन्तम् । न । धूनुथ ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. हे नरः ( =शूरा ) [ मरुतः ], हे दिवश्च ग्मश्च धूतयः ( =द्यावापृथिव्योः कम्पनकारिणः), वः (=युष्माकं मध्ये) वर्षिष्ठ आ (=आसमन्ताद् वृद्धतमः=उच्छ्रिततमः ) कः ? यद् ( =यस्माद् ) [ यूयं ] सीम् (=एते=द्यावापृथिवी), अन्तं न ( =वृक्षाग्रमिव ), धूनुथ ( =चालयथ ) ॥

भावार्थ आहे. यांतून पहिलें वाक्य तर उघडच आहे. परंतु 'जम्भे रसस्य वावृधे' "[ दुग्ध]रस पिऊन [ पिऊन ] [ तो ] पुष्ट झाला आहे" हा शेवटला चरण फार कठिण आहे. त्यांतील 'जम्भ' शब्दाचा अर्थ नीट समजत नाहीं. 'जम्भ' हा शब्द ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आला आहे. पण त्याचा अर्थ 'दांत,' 'दाढ,' अग्नीची 'ज्वालारूपी दाढ' असा होतो आणि बहुत करून नित्य अनेकवचनीच आढळतो. एकवचनी प्रयोग प्रस्तुत मंत्रांत आला आहे तितकाच दिसतो. 'जम्भ्' या धातूचीं रूपें आलीं आहेत तीं 'नाश करणें' या अर्थीं आलीं आहेत. 'जम्भे रसस्य वावृधे' याचा शब्दशः अर्थ ' रसाच्या दांतांत वाढला' इतकाच होतो. 'जम्भ' म्हणजे दांत असा अर्थ होतो त्यापेक्षां 'जम्भ्' धातूचा मूळ अर्थ 'चावणें', 'खाणें', 'भक्षण करणें' असा असावा अशी अटकळ करून 'जम्भे रसस्य' याचा अर्थ कदाचित् 'रसाचे भक्षणी' असा होऊं शकेल असें समजून आम्ही '[दुग्ध]रस पिऊन [पिऊन ] [ तो ] पुष्ट झाला आहे' असें भाषांतर केलें आहे; पण तें केवळ निर्वाहासाठींच असें म्हणणें भाग आहे.

• सायणाचार्य सगळ्या मंत्राचा अर्थ करितात तो असाः—"गाईमध्यें म्हणजे मरु- "तांची माता जी पृश्नि गाय ती आणि दु- "सऱ्या गाईमध्यें स्थित आणि अहननीय "आणि विहारयुक्त असें जें मरुतांचें तेज "त्याची स्तुति कर. गोक्षीररूपी रसाचें "जें तें तेज तें जंभांत म्हणजे मुखांत "अथवा उदरांत वाढलें." परंतु 'शर्धः' याचा अर्थ मूळचा जरी 'तेज' अथवा 'शक्ति', 'बल' असा होतो तरी 'मारुतं शर्धः' म्हणजे 'मरुतांचा गण' असा अर्थ होतो, मरुतांचें तेज असा नाहीं याविषयीं पूर्वीच्या मंत्रावरील टीप पहा.

६. हे शूर [मरुत्] हो, हे स्वर्गातें आणि पृथ्वीतें कांपविणारे हो, तुम्हांतून सगळ्यांत उंच कोण [आहे]? कारण कीं [तुम्ही] त्या [द्यावापृथ्वीं]स [वृक्षाच्या] शेंड्याप्रमाणें घुसळीत असतां.

6. Which of you, O brave [Maruts], O shakers of the heaven and of the earth, [is] the highest? since you shake them like the top [of a tree.]

जर 'रस' हें राक्षसाचें किंवा कांहीं घातक आणि बाधक वस्तूचें विशेष नांव असेल, तर '[मरुद्गण] रसाचा नाश करण्यासाठीं वाढलेला आहे' (रसं जम्भितुं नाशयितुं वावृधे) असा अर्थ चांगला संभवेल. पण 'रस' हें तशा प्रकारचें विशेषनाम आहे कीं नाहीं हें शोधून काढण्यास जितकीं ब्राह्मणादिक ग्रंथांचीं साधनें पाहिजेत तितकीं अजून उपलब्ध नाहींत. एकंदरींत इतकें म्हणणें अवश्य आहे कीं ऋग्वेदांत दुर्गासारिखे कितीएक अगम्य मंत्र आणि मंत्रांचे भाग आहेत त्यांतील ह्या मंत्राचा तृतीय चरण होय, पुढें केव्हां याच्या खऱ्या अर्थाचा शोध लागेल तेव्हां लागेल असें म्हणून सांप्रत संतोष मानावा.

६. ऋषीचें ह्यः— 'हे शूर आणि द्यावापृथिवींस हालवून टाकणारे मरुतांनो, तुम्ही पृथ्वीस आणि स्वर्गास एकादें लहानसें झाड असावें आणि तें बुंधापासून शेंड्यापर्यंत सहज हालवावें तसें हालवितां, तर इतका उंच तुम्हांत जो आहे तो कोण?'

'सगळ्यांत उंच'='वर्षिष्ठः.' वैय्याकरण म्हणतात कीं 'वृद्ध' शब्दापासून तमार्थ 'इष्ठ' प्रत्यय लागून हें विशेषण झालें आहे. हें खरें असेल तर हा 'वृद्ध' शब्द उंच या अर्थी समजला पाहिजे. वस्तुतः ज्या धातूपासून 'वर्ष्म' (उंची) हें नाम निघालें आहे त्यापासून 'वर्ष्मिन्' अथवा 'वर्षिन्' असें एकादें विशेषण पूर्वी असावें आणि त्याला 'इष्ठ' प्रत्यय लागून 'वर्षिष्ठ' (परम उंच) हा शब्द झालेला आहे. ऋ. ४. ३१. १५; ६. ४५. ३१; आणि ९. ३१. ५. या मंत्रांवरचें सायणभाष्य पहा. तेथें ते 'उंच' असा अर्थ करितात.

'त्या [द्यावापृथिवीं]स'=' सीम्.' 'सीम्' हें जरी रूपानें अव्ययासारिखें आहे तरी तें वस्तुतः पुरुषवाचक सर्वनाम असून सर्वलिंगी, सर्वपुरुषी, आणि सर्ववचनी आहे. म्हणून त्याचा अर्थ 'त्याला', 'तिला', 'त्यांजला' 'त्यां [उभयतां]ला' असा होतो. ऋ. १. ६१. ११; १. ९५. २; आणि ३. ५४. ६. हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य

नि वो यामाय मानुषो दध्र उग्राय मन्यवे ।
जिहीत पर्वतो गिरिः ॥ ७ ॥

नि । वः । यामाय । मानुषः । दध्रे । उग्राय । मन्यवे ।
जिहीत । पर्वतः । गिरिः ॥ ७ ॥

येषामज्मेषु पृथिवी जुजुर्वाँ इव विश्पतिः ।
भिया यामेषु रेजते ॥ ८ ॥

येषाम् । अज्मेषु । पृथिवी । जुजुर्वान्ऽइव । विश्पतिः ।
भिया । यामेषु । रेजते ॥ ८ ॥

## भाषायाम्.

७. [हे मरुतः], वो (=युष्माकं) यामाय (=यातु=गमनार्थं=गमनसमये) मानुष. (=मनुष्यो) निदध्रे (=आत्मानं न्यक् स्थापयति), उग्राय मन्यवे (=तीव्राय क्रोधाय= तीव्रक्रोधसमये) [निदध्रे=आत्मानं न्यक् स्थापयति] । [वो यामसमये उग्रमन्युसमये च] पर्वतो गिरिः (=बहुविधपर्वयुक्तः शिखरी) [अपि] जिहीत (=युष्माकं मार्गं विसृज्य गच्छेत्) ॥

८. येषां [मरुताम्] अज्मेषु (=गमनेषु) यामेषु (=मार्गक्रमणेषु) [च] पृथ्वी, जुजुर्वान् विश्पतिरिव (=जीर्णो गृहीव =वयोहानिरोगादिना शिथिलः कश्चिद् वृद्धमनुष्य इव) भिया रेजते (=कम्पते) ॥

पहा. प्रस्तुत मंत्रांत 'सीम्' याचा अर्थ 'द्यावापृथिवी' (द्यौश्च ग्मा च) यांजकडे न घेतां 'सर्व बाजूंनीं' असा सायणाचार्य करितात तो त्यांच्याच आधारावरून चिंत्य समजला पाहिजे.

'घुसळीत असतां'='धूनुथ.' मरुत् म्हणजे 'वारे', 'पवन', 'वावटळी' तेच देव अथवा त्यांच्या अधिदेवता होत त्यापेक्षां ते सकळ द्युलोकास व भूलोकास कसे हालवितात तें वादळें पाहिलेल्या मनुष्यास सांगावयास नको.

७. [हे मरुतांनो], तुमच्या दवडीसरशीं मनुष्य [दबून खालीं बसतो]; [तुमच्या] प्रबळ झपाट्या-सरशीं [मनुष्य] दबून खालीं बसतो, गांठाळ पर्वतालाहि चलन करावें लागतें.

7. Down does man bend himself at your march, down, [Maruts], at [your] mighty violence; the knotty mountain[itself] shall yield.

८. ज्या [मरुतां]च्या गमनांच्या वेळीं [आणि] दवडींच्या वेळीं [ही] पृथ्वी वृद्ध मनुष्याप्रमाणें भयानें कांपत असते.

8. Maruts—under whose courses [and] marches the earth trembles with fear like an old sire.

---

७. 'दवडीसरशीं'= 'यामाय.' म्हणजे तुम्ही चालूं लागलां म्हणजे, तुम्हीं जाऊं लागलां म्हणजे.—'प्रबळ झपाट्यासरशीं'='उग्राय मन्यवे.' म्हणजे तुम्ही मोठ्या झपाट्यानें जाऊं लागलां म्हणजे.—'दबून खालीं बसतो'='निदध्रे.' अक्षरशः अर्थ, 'खालीं धरिला जातो.' सायणाचार्य अर्थ जरा निराळा करितात. पण ऋ. ९. ३५. ६; १. ४८. ३ आणि १०. १२. ७ या मंत्रांवरील भाष्यांत तेच 'धृ' धातूचा 'आत्मानं स्थापय्' म्हणजे 'राहणें' असा अर्थ करितात तो पहा.—'गांठाळ पर्वत'= 'पर्वतो गिरिः'. 'पर्वत' हें या मंत्रांत विशेषण होय. आणि 'गांठाळ पर्वत' म्हणजे जरी साधारण पर्वत असं म्हटल्यास संभवेल तथापि 'गांठी गांठी असलेला अभ्ररूपी पर्वत' असा अर्थ इष्ट दिसतो.. अभ्रवाचक जे शब्द ते पर्वतवाचक वेदांत होतात असें पूर्वी सांगितलेंच आहे.

८ 'मरुत् चालूं लागले म्हणजे इतक्या झपाट्यानें चालतात आणि त्यांचा भार अशा प्रकारचा असतो कीं, त्या वेळीं त्यांच्या खालीं असलेली पृथिवी एखाद्या म्हाताऱ्या बोवाप्रमाणें भयानें थरथरां कांपते,' असा भावार्थ आहे.

'गमनांच्या वेळीं [आणि] दवडींच्या वेळीं'='अज्मेषु यामेषु.' 'अज्म' आणि 'याम' हे दोनी शब्द समानार्थकच आहेत; परंतु केवळ आदरार्थ एकच अर्थाच्या दोन शब्दांचा प्रयोग केला आहे. जसें आपण मराठींत 'ध्यानीं मनीं,' 'मुलें बाळें', 'वनीं काननीं,' 'रानोमाळ,' 'कुटुंब कलत्र' असे प्रयोग करितों तसा हा समजला पाहिजे. 'अज्म' म्हणजे 'गमन' याविषयीं खालीं १० व्या मंत्रावरचें आणि ऋ. ५. ८७. ७ याजवरचें सायणभाष्य पाहा.

**स्थिरं हि जानमेषां वयो मातुर्निरेतवे ।**
**यत्सीमनु द्विता शवः ॥ ९ ॥**

स्थिरम् । हि । जानम् । एषाम् । वयः । मातुः । निःऽएतवे ।
यत् । सीम् । अनु । द्विता । शवः ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. एषां वीनां ( =मरुद्रूपाणां पक्षिणां ) जानं (=जन्मस्थानं) मातुः (=मातुरुद-रात्=जानात्=आकाशात्) निरेतवे (=निरेतुम् एषां निर्गमनाय) स्थिरं हि । यद् (=यस्मात्) शवः (=एषां मातुर्बलं ) सीम् अनु ( =एतान्मरुतानुद्दिश्य= एतेषां बलापेक्षया ) द्विता ( =द्वित्वेन=द्विगुणं ) [ वर्तते ] ॥

मरुद्भ्यो मरुतां मातुर्बलीयस्त्वात् मरुतो यथासुखं जन्मस्थानान्निर्गच्छेयुस्तथा तज्जन्मस्थानं मातुर्योनिः । आकाशमिति यावत् । स्थिरमचलं वर्तत इति भावः ॥

'वृद्ध मनुष्याप्रमाणें'= 'जुजुर्वान् इव विश्पतिः.' म्हणजे, वादळ मोठ्या झपाट्यानें चालूं लागलें म्हणजे मुलेंबाळें होऊन क्षीण झालेला एखादा म्हातारा मनुष्य वाऱ्याचा झपाटा सोसण्यास शक्ति नसल्यामुळें जसा कांपतो तशी बिचारी पृथिवी कांपते असा या उपमेचा अर्थ आहे. 'विश्पति ' याचा जो आम्हीं अर्थ केला आहे त्याला ऋ. ७. ५५. ५. या मंत्रावरील सायणभाष्याचा आधार आहे.

९. आणि यांचें जन्मस्थान तर अचल [होय] [आणि] [हे मरुद्रूपी महा]पक्षी [आपल्या] आई[च्या उदरां]तून [सहज] निघत इतकें [तें अचल आहे]; कारण कीं [तिला] यांच्यापेक्षां बळ दुप्पट [आहे].

9. [As for] their birth-place [it] is indeed [strong] –strong for [them] the birds to issue forth from [their] mother['s womb]; since [her] strength [is] twice [as great] as [that of] these.

९. वरच्या मंत्रांत सांगितलें कीं, मरुत् इतके प्रचंड आहेत आणि ते जाऊं लागले म्हणजे इतक्या झपाट्यानें जातात कीं एवढी मोठी पृथिवीहि त्यांच्या पायाखालीं एकाद्या म्हाताऱ्या मनुष्यासारिखी कांपते. त्यावर अशी आकांक्षा निघते कीं असे प्रचंड मरुत् ज्या स्थानापासून (म्हणजे आईच्या उदरापासून) निघाले तें यांच्या जन्मकाळीं नष्ट होत असेल आणि अशा बलाढ्य पुत्रांस जन्म देण्यास त्यांच्या आईस शक्ति नसेल त्यामुळें ती प्रसवसमयीं मरत असेल. तर या शंकेच्या निवारणार्थ ऋषि म्हणतो कीं, 'तसें कांहीं होत नाहीं; यांचें जन्मस्थान स्थिर म्हणजे अचल आहे आणि तें इतकें मजबूत आहे कीं हे मरुद्रूपी पक्षी आपल्या आईच्या पोटांतून सहज बाहेर पडतात; कारण कीं यांच्या बलापेक्षां दुप्पट बळ यांच्या आईस आहे.'

'अचल' = 'स्थिरम्.' म्हणजे भारानें अथवा भीतीनें पृथ्वीसारिखें वांकणारें (.६ वा आणि ८ वा मंत्र पहा) नव्हे. (ऋ. ८. १४. ९ यांत 'रोचनानि दिवः' यांस 'स्थिर' हें विशेषण लाविलें आहे तें पहा; शिवाय खालीं ३९ व्या सूक्तांतील २ ऱ्या मंत्रांत 'स्थिरा वः सन्तु आयुधा' = 'तुमचीं आयुधें स्थिर म्हणजे न वांकणारीं अशीं राहोत' असें आहे तें पहा.)

'[मरुद्रूपी महा] पक्षी' = 'वयः' मरुतांस पक्षी असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं म्हटलें आहे. त्याचें कारण असें कीं ते पक्ष्यांप्रमाणें अंतराळीं फिरतात म्हणून. या मंत्रांत 'वयः' म्हणजे 'शक्ति' असा अर्थ कितेक विद्वान् घेतात आणि 'आईच्या उदरांतून बाहेर पडण्यास मरुतांस शक्ति आहे' असें 'वयो मातुर्निरेतवे' याचें भाषांतर करितात. पण तसें करण्यास अडचण इतकी आहे कीं, या मंत्रांत मरुतांस शक्ति अथवा बल आहे हें प्रतिपादित करण्याचा उद्देश नाहीं, मरुतांचे आईच्या बळाविषयीं सांगणें आहे.

'आई[च्या उदरां]तून' = 'मातुः.' माता म्हणजे 'आकाश' असें सायणाचार्य म्हणतात. मरुतांस 'दिवस्पुत्राः'

**उदु त्ये सूनवो गिरः काष्ठा अज्मेष्वत्नत ।**
**वाश्रा अभिज्ञु यातवे ॥ १० ॥ १३ ॥**

उत् । ऊम् इति । त्ये । सूनवः । गिरः । काष्ठाः । अज्मेषु । अत्नत ।
वाश्राः । अभिऽज्ञु । यातवे ॥ १० ॥ १३ ॥

**त्यं चिद्घा दीर्घं पृथुं मिहो नपातममृध्रम् ।**
**प्र च्यावयन्ति यामभिः ॥ ११ ॥**

त्यम् । चित् । घ । दीर्घम् । पृथुम् । मिहः । नपातम् । अमृध्रम् ।
प्र । च्यवयन्ति । यामऽभिः ॥ ११ ॥

## भाषायाम्.

१०. उ (=उत=अपि च) त्ये गिरः सूनवः (=वाचः पुत्रा ये मरुतस्ते) अज्मेषु (=स्वकीयेषु गमनेषु) काष्ठाः (=उदकानि=मेघजलानि), वाश्राः (=हम्बारवोपेता गा इव) [सतीः], अभिज्ञु (=जानुगभीरं यथा स्यात्तथा) यातवे (=यातुं=वहनार्थम्) उदत्नत (=उदतनिषत=उत्सृज्य विस्तारयन्ति) ॥

मरुतः स्वकीयगमनसमयेषु मेघोदकान्युत्सृज्य इतस्ततो विस्तारयन्ति । ततस्तानि नदीरूपेण आजानु गभीरं सगर्जनानि वहन्तीत्यर्थः ॥

११. [मरुतः] त्यं (=तं प्रसिद्धं) दीर्घम् (=आयामोपेतं) पृथुं (=तिर्यग्विस्तृतम्) अमृध्रं (=केनाप्यहिंस्यं) मिहो नपातं चित् (=वृष्टेः पुत्रं=वृष्टेरावरकं मेघं नामासुरमपि) यामभिः (=स्वकीयगमनैः) प्रच्यावयन्ति ह (=प्रकर्षेण गमयन्ति खलु) ॥

म्हणजे गूचे अथवा देदीप्यमान आकाशप्रदेशाचे पुत्र, आणि केव्हां केव्हां 'सिन्धुमातरः'='अंतरिक्षाचे पुत्र' असेंहि म्हटलेलें आहे. मरुतांस आकाशरूप आईचे पुत्र म्हणणें हें त्यांची आकाशांत उत्पत्ति होत असल्यामुळें साहजिक होय. 'पृश्निमातरः' असें जें त्यांस म्हणतात त्याचा तरी अर्थ 'चित्रविचित्र रंगाची जी आकाशरूपी गाई तिचे पुत्र' असाच दिसतो.

'कारण कीं [तिला] यांच्यापेक्षां बळ दुप्पट [आहे]'='यत् सीम् अनु द्विता शवः.' आणि हें खरेंच आहे, कारण वाऱ्यानें आणि महाप्रचंड वादळानें पृथ्वीस अथवा पृथ्वीवरच्या पदार्थांस उपद्रव होतो, पण आकाश तेणेंकरून फाटलें अथवा दुखावलें असें कधीं होत नाहीं.

१०. आणि हे जे वाणीचे पुत्र [मरुत्] ते [जाऊं लागले ह्मणजे][ आपल्या] मार्गी [मेघ]-जलांस पसरितात, कीं जेणेंकरून तीं [ मेघजलें ] गर्जना करीत करीत गुडघ्याइतकीं वाहूं लागतात.

10. And those [Maruts the] sons of voice spread out the [ rain ]-waters on their courses, that roaring these may flow knee-deep.

११. लांब, रुंद [ आणि ] मारला जाण्यास कठिण [ असा जो ] तो मेघासुर त्यालाहि [ हे मरुत्] [ आपल्या ] गमनांनीं हाकून लावितात.

11. They drive away in [their] courses even that vast, broad, [and] invulnerable son of the shower.

---

१०. 'मरुत् जाऊं लागले म्हणजे जिकडे जातील तिकडे पावसाचें पाणी सोडून सर्व जलमय करितात; मग तीं मेघोदकें एकत्र होऊन नदीरूपानें वाहतात, आणि गुडघाभर खोल असून गर्जना करीत करीत वाहत असतात.'

'वाणीचे पुत्र'= 'सूनवो गिरः.' हें इतकें कठिण आहे. पण आम्हीं केवळ शब्दार्थ दिला आहे. खरोखर या विशेषणाचा भावार्थ काय तें समजत नाहीं. मरुतांस वाणीचे पुत्र असें अन्यत्र म्हटलेलें आढळत नाहीं. सायणाचार्य केवळ निर्वाहासाटीं "वाणीचे उत्पादक (कारण "कीं वायु तोंडांत, टाळवेंत, ओटांत वगैरे "संचार करून वाचा उत्पन्न करितात)" असें म्हणतात. पण 'सूनु' म्हणजे 'उत्पन्न करणारा' असा अर्थ निर्विवाद प्रयोगान्तरांवरून सिद्ध होईल काय ?

'[मेघ]जलांस पसरितात'= 'उत्... काष्ठाः......अव्रत.' या शब्दांचा अर्थ कितेक विद्वान् वेगळा करितात. पण आम्हीं सायणास अनुसरलों आहों. कारण 'काष्ठा' शब्दाचा अर्थ उदक असा खरोखर कसा होतो हें सांगतां न आलें तरी ऋ. १. ३२. १०; १. ५९. ६ आणि प्रस्तुतचा मंत्र यांत उदक असा अर्थ सायणांनीं केला आहे तो आम्हांस योग्य दिसतो. प्रस्तुत मंत्रांत 'मर्यादा' असा अर्थ कितेक करितात तो संभवत नाहीं.

'कीं जेणेंकरून तीं [मेघजलें] गर्जना करीत करीत गुडघ्याइतकीं वाहूं लागतात'=' वाश्रा अभिज्ञु यातवे.' शब्दशः अर्थ '[त्या] गर्जना करणाऱ्यांस गुडघाभर जाण्यासाटीं.' मरुत् जातां जातां मेघवृष्टि करितात याविषयीं पुढच्या सूक्ताचा ९ वा मंत्र आणि ऋ. ५. ५५. ५ हा मंत्र पहा. ज्येष्ठ आणि आषाढ आणि केव्हां मार्च एप्रिल महिन्यांत मोटीं वादळें प्रथम सुटून लागलीच वृष्टि होते हें सर्वांस टाऊक आहेच.

११. 'मरुत् हे केवळ उदकें खालीं पाडतात आणि नदीरूपानें वाहवितात इतकेंच नव्हे पण अतिविस्तीर्ण, अति-

**मरुतो यद्ध वो बलं जनाँ अचुच्यवीतन ।**
**गिरीँरचुच्यवीतन ॥ १२ ॥**

मरुतः । यत् । ह । वः । बलम् । जनान् । अचुच्यवीतन ।
गिरीन् । अचुच्यवीतन ॥ १२ ॥

**यद्ध यान्ति मरुतः सं ह ब्रुवतेऽध्वन्ना ।**
**शृणोति कश्चिदेषाम् ॥ १३ ॥**

यत् । ह । यान्ति । मरुतः । सम् । ह । ब्रुवते । अध्वन् ।
आ । शृणोति । कः । चित् । एषाम् ॥ १३ ॥

## भाषायाम्.

१२. हे मरुतः, यद्ध वः ( = युष्माकं ) बलम् [ अस्ति ] [ तस्मादेव कारणात् ] [ यूयं ] जनान् (=लोकान्) अचुच्यवीतन (=अचुच्यवीत=अच्यावयत=चालयथ ), [ तस्मादेव कारणात् यूयं ] गिरीन् अचुच्यवीतन ( =चालयथ ) ॥

१३. यद्ध ( =यदा खलु ) मरुतो यान्ति ( =गच्छन्ति ) [ तदा ] ह [ते] अध्वन्ना ( =अध्वनि आ=अध्वनि=मार्गे ) संब्रुवते ( =परस्परं ब्रुवते=संभाषन्ते ) । [ तद् ] एषां [ संभाषणं ] कश्चित् ( =कोपि ) शृणोति ( = सर्वेपि श्रोतुं शक्नुवन्ति)॥

दीर्घ आणि कोणाच्यानेंहि ज्याला मारवत नाहीं असा जो जगत्प्रख्यात मेघासुर ( वृत्रासुर ) त्यालाहि आपल्या दवडींच्या झपाट्यानें हाकून लावितात' असें तात्पर्य.

' मेघासुर '= ' मिहो नपातम्.' अक्षरशः अर्थ ' वृष्टीचा पुत्र.' यापासून ' मेघासुर ' हा अर्थ कसा झाला असला तरी या मंत्रांत ' मेघासुर ' असा जो सायणांनीं अर्थ केला आहे तो योग्य आहे यांत संशय नाहीं. ' मिहो नपात् ' असें पद आणखी एकदाच ऋग्वेदांत ( ५. ३२. ४. ) आलें आहे.

' मारला जाण्यास कठिण' = ' अमृध्रम्.' '.अमृध्र 'शब्दाचा अर्थ सायणाचार्य सर्वत्र हाच करितात यास्तव आम्हींहि तोच कायम ठेविला आहे.

'हाकून लावितात' ='प्रच्यावयन्ति.' वादळापुढें मेघ पळून जातात या कल्पनेंत विशेष ओढाताण नाहीं हें सांगावयास नकोच.

१२. हे मरुतांनो, तुम्हांस बळ [आहे] म्हणूनच [तुम्ही] जनांला हालवून टाकीत असतां, [म्हणूनच तुम्ही] पर्वतांला हालवून टाकीत असतां.

12. Maruts, it is because [ye] have power that [ye] shake the people, [that] [ye] shake the mountains.

१३. [हे] मरुत् जेव्हां जात असतात [तेव्हां ते] मार्गी परस्परांशीं बोलत पण असतात; [तें] त्यांचें [संभाषण] पाहिजे त्याला ऐकूं येतें.

13. And when the Maruts go, [they] even talk to each other on the way. Any one can hear their [talk].

---

१२. 'हे मरुतांनो, तुम्ही महाबली नाहीं असें कोण म्हणूं शकेल? कारण कीं तुम्हांस मोठें बळ आहे म्हणूनच तुम्ही जाऊं लागलां म्हणजे सर्व लोक कांपतात, आणि मोठमोठे पर्वतहि कांपत असतात.' असा भावार्थ.

'हालवून टाकीत असतां' = 'अचुच्यवीतन.' अक्षरशः अर्थ 'हालवीत आलां आहां,' आजपर्यंत 'हालवीत आलां,' अर्थात् 'हालवीत असतां,' 'हालवून टाकीत असतां.' सायणाचार्य या स्थलीं 'आपआपल्या कामीं प्रेरितां' असा अर्थ करितात. परंतु मरुत् जाऊं लागले म्हणजे सर्वांस हालवून टाकितात याविषयीं आणि 'च्यु' धातूच्या अर्थाविषयीं ऋ. १.१६८. ४ या मंत्रावरील सायणभाष्यच पाहा.

'पर्वतांला'='गिरीन्.' येथें 'गिरि' म्हणजे 'मेघ' असें सायण म्हणतात. तसा अर्थ तर होईलच. परंतु 'पर्वतांस'-हि हालवून टाकितात असें म्हणण्यांत मरुतांविषयीं योग्य गौरव अधिक आहे.

१३. 'आणि हे मरुत् देव मार्गानें जाऊं लागले म्हणजे एकमेकांशीं बोलत असतात. आणि जें बोलतात तें हळु अथवा कोणास न ऐकूं येई अशा रीतीनें बोलतात असें नाहीं, तर तें पाहिजे त्याला ऐकूं येई अशा रीतीनें बोलतात.' आणि हें खरेंच आहे. कारण कीं वाऱ्याचा झपाटा कोणास ऐकूं येत नाहीं?

'परस्परांशीं बोलत असतात'='सं ब्रुवते.' हा अर्थ आम्हीं धात्वर्थास अनुसरून आणि साधारण प्रयोगांस अनुसरून अक्षरशः केला आहे. सायणाचार्य 'एकत्र ध्वनि करितात' असें भाष्य लिहितात.

'मार्गी'='अध्वन् आ'='अध्वनि आ.' 'आ' या उपसर्गाचा प्रयोग येथें केलेला ध्यानांत ठेवावा. लाटीन भाषेंत जशी सप्तमी विभक्ति लागून त्याशिवाय

**प्र यात शीभमाशुभिः सन्ति कण्वेषु वो दुवः ।**
**तत्रो षु मादयाध्वै ॥ १४ ॥**

प्र । यात । शीभम् । आशुऽभिः । सन्ति । कण्वेषु । वः । दुवः ।
तत्रो इति । सु । मादयाध्वै ॥ १४ ॥

**अस्ति हि ष्मा मदाय वः स्मसि ष्मा वयमेषाम् ।**
**विश्वं चिदायुर्जीवसे ॥ १५ ॥ १४ ॥**

अस्ति । हि । स्म । मदाय । वः । स्मसि । स्म । वयम् । एषाम् ।
विश्वम् । चित् । आयुः । जीवसे ॥ १५ ॥ १४ ॥

## भाषायाम्.

१४. [ हे मरुतः ], [ यूयम् ] आशुभिः ( =वेगवद्भिरश्वैः ) शीभं ( =शीघ्रं ) प्रयात ( =आयातुं प्रतिष्ठत ) । कण्वेषु ( =कण्वकुलोत्पन्नेषु अस्मासु=कण्वकुलोत्पन्नानामस्माकं गृहे ) वो ( =युष्मदर्थं ) दुवः ( =दुवांसि=परिचरणानि=परिचर्याकाले दातव्यानि हविरादीनां दानानि ) सन्ति ( =सिद्धानि कृतानि वर्तन्ते ) । तत्रो षु ( अत एव तत्रैव ) [ यूयं ] मादयाध्वै ( =माद्यध्वं=तृप्ता भवत ) ॥

१५. [ हे मरुतः ], वो मदाय ( =युष्माकं तृप्तये ) [हविरादि] अस्ति हि स्म ( =यस्माद् वर्तते खलु ) वयं स्म ( =तस्माद् वयम् ) एषां ( =युष्माकं ) स्मसि ( =स्मः ), विश्वं चिद् ( =सकलमपि) आयुः ( =आयुरवधिं जीवसे ) ( =जीवितुं =जीवेमेति हेतोः) ॥

यस्मात्कारणाद् वयं युष्मान् हविरादिना मादयामः तस्माद् वयं युष्माकं लब्धानुग्रहा भूत्वा सर्वमपि आयुर्जीविष्याम इति भावः ॥

उपसर्ग अथवा शब्दयोगी अव्यय निराळें लागतें, तसें वेदांत होत असतें. म्हणूनच 'अध्वनि आ' म्हणजे 'अध्वनि' इतकाच अर्थ समजावयाचा. यास्तवच सायणाचार्य तरी नुसता 'मार्गे' इतकाच शब्द लिहितात. पूर्वी २५ व्या सूक्तांत १५ व्या मंत्रांत 'मानुषेषु आ' आणि 'उदरेषु आ' असें आलें आहे तें पहा. ऋ. १. ५८. ६ हाहि मंत्र पहा. अशा रीतीनें योजिलेला जो 'आ' अथवा दुसरा एकादा उपसर्ग त्याला सायणाचार्य 'सप्तमीद्योतक' अथवा 'सप्तम्यनुवादक' असें म्हणत असतात.

१४. [हे मरुतांनो], तुम्ही आपल्या वेगवान् वाहनांनीं लवकर या, चला; कण्वांच्या येथें तुम्हांसाठीं आहुति [सिद्ध] आहेत. तर येथेंच [तुम्ही] तृप्त व्हा.

१५. कां कीं [हे मरुतांनो], [जसें] तुम्हांस तृप्ति होण्यासाठीं हवि आहे, [तसे] आम्ही तुमचे आहों आणि पूर्णायुषी होऊं.

14. Maruts, come forth quickly on [your] swift horses. There are offerings for you among the Kaṇvas. Hare only be ye gratified.

15. For [Maruts], as there is oblation for your gratification, so we are yours and shall live the whole life.

---

१४. मंत्रकर्ता म्हणतो, 'हे मरुतांनो, आम्हां कण्वांच्या घरीं तुम्हांसाठीं हविरन्न, सोमाहुति इत्यादि सिद्ध करून ठेविलें आहे, तर तुम्ही लवकर आपल्या वाहनांवर बसून या, आणि येथेंच आम्हीं दिलेलें अन्न आणि पेय घेऊन तृप्त व्हा, दुसऱ्या स्थळीं जाऊं नका.'

'कण्वांच्या येथें'='कण्वेषु.' या सूक्ताचा कर्ता जो ऋषि तो कण्व म्हणजे कण्वकुलोत्पन्न आहे हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

'मादयाध्वै' हें लेट्काळाचें रूप आहे, याचा अर्थ आज्ञार्थ आहे.

'आहुति'='दुवः.' 'दुवः' हें येथें 'दुवांसि' या अनेकवचनार्थी आहे. अक्षरशः अर्थ 'दान' अथवा 'सेवा' असा आहे. त्यावरून देवसेवेच्या वेळीं सोमादिकांच्या ज्या आहुति द्यावयाच्या त्या असा अर्थ येथें समजला पाहिजे.

१५. 'हे मरुतांनो, ज्यापेक्षां आम्ही मोठ्या प्रेमानें तुम्हांस हवि आणि सोम अर्पण करून सदैव सुखी करितों, त्यापेक्षां आम्हीं तुमचेच होऊं आणि सर्व आयुष्य जितकें आहे तें संपेपर्यंत आम्ही जगूं, अपमृत्यूनें मरणार नाहीं असा आमचा भरंवसा आहे' असें ह्या चमत्कारिक मंत्रांतील हृद्ग आहे.

या मंत्रावरून दोन गोष्टी उघड होतात. एक ही कीं, ज्यापेक्षां आम्हीं मर्त्य जन देवांची सेवा करितों त्या अर्थी ते अमर्त्य आम्हांस टाकणार नाहींत असा आपल्या पूर्वजांचा भरंवसा होता; आणि दुसरी ही कीं, देवांची कृपा होईल तर आम्ही सर्व आयुष्यभर जगूं, नाहीं तर कदाचित् अगोदरच मरूं असें ते मानीत. पाहिजे तितकीं वर्षें ब्रह्माण्डीं प्राण ठेवून हजारो वर्षेंपर्यंत जगतां येईल अशी समजूत होती असें दिसत नाही.

या मंत्राची शब्दरचना फार चमत्का-

## सूक्तम् ३८.

घोरपुत्रः कण्व ऋषिः । मरुतो देवता । गायत्री च्छन्दः ।

**कद्ध नूनं कधप्रियः पिता पुत्रं न हस्तयोः ।**
**दधिध्वे वृक्तबर्हिषः ॥ १ ॥**

कत् । ह । नूनम् । कधऽप्रियः । पिता । पुत्रम् । न । हस्तयोः ।
दधिध्वे । वृक्तऽबर्हिषः ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. हे कधप्रियो वृक्तबर्हिषो [ मरुतः ] ( =स्तुतिप्रीता यज्ञिया मरुद्देवाः ) पिता पुत्रं [ हस्तयोर्धत्ते ] तथा [ यूयम् ] [ अस्मान् ] [ स्व]हस्तयोः कद्ध नूनं (=कदा खलु ) दधिध्वे ( =धारयथ=धारयिष्यथ )?

रिक आहे. अक्षरशः अर्थ म्हटला म्हणजे,'कारण कीं तुमच्या तृप्तीसाठीं[हव्यादि] आहेच, [आणि आम्हीं] सगळें आयुष्य जगण्यास्तव यांचे(=तुमचे)आहोंच.'पूर्वार्धांत 'वः' (=तुमच्या ) आणि 'एषाम्' (=यांचा) या दोन पदांना पुरुषव्यतिरेक ध्यानांत ठेवावा. वृत्तसुखार्थ असे व्यतिरेक वेदांत केव्हां केव्हां येतात.

'आणि पूर्णायुषी होऊं' ='विश्वं चिद् आयुर्जीवसे.' अक्षरशः अर्थ 'सगळ्याहि आयुष्य[भर] जगण्याकरितां.' म्हणजे मानवांची जी शंभर वर्षांची आयुर्मर्यादा आहे ती येईपर्यंत जीवंत राहूं. वेदांत मनुष्याचें आयुष्य शंभरच वर्षे सांगितलें आहे, सहस्रावधि, दशसहस्रावधि सांगितलेलें नाहीं.

## सूक्त ३८.

ऋषि–घोराचा पुत्र कण्व (जो पूर्वीच्या सूक्ताचा तोच). देवता–मरुत्. वृत्त–गायत्री.

१. हे स्तवनानें संतोष पावणारे [आणि] पूज्य [मरुत्] हो, पिता पुत्राला [आपल्या हातांवर धरितो] तसे, [तुम्ही] [आम्हांस] [तुमच्या] हातांवर केव्हां धराल बरें ?

## Hymn 38.

To the *Maruts*. By *Kaṇva* the son of *Ghora*. Metre-*Gâyatrî*.

1. When [will you], O Maruts, fond of praise [and] worshipful, hold [us] in [your] arms as [does] the father [his] son ?

---

१. या सुंदर मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'हे स्तुत्य आणि पूज्य मरुतांनो, बाप आपल्या मुलाला हातावर घेऊन लाड करितो तसे आम्हांस तुम्ही आपल्या हातावर घेऊन केव्हां लाड कराल बरें?' या प्रश्नांत मंत्रवक्त्याचें प्रेम उपासनीय देवतेविषयीं किती मोठें आहे पहा. आमचे आर्य पूर्वज आपल्या देवांस भीत होते, त्यांस स्तवीत होते आणि मोठे समजत असत इतकेंच नाहीं, पण जसा मुलगा आपल्या बापावर प्रेम ठेवितो आणि बापाची प्रीति आपणावर व्हावी म्हणून इच्छा करितो तसे ते त्यांजवर प्रेम ठेवीत आणि त्यांच्या मायेची वांछा करीत.

'स्तवनानें संतोष पावणारे' = 'कधप्रियः' म्हणजे 'ज्यांस स्तवन आवडतें,' जे 'स्तवनानें प्रसन्न होतात,' 'स्तवनीय.' आमचा अर्थ सायणानुसारी आहे. हा अर्थ अगदी निर्विवाद आहे असें आमच्यानें म्हणवत नाहीं, पण 'कोणावर प्रीति करणारे' असा जो किती एक विद्वान अर्थ करितात त्यांतील तर्कापेक्षां हा बरा आहे.

'पूज्य' = 'वृक्तबर्हिषः.' अक्षरशः अर्थ, 'ज्यांच्या साठीं लोक दर्भासन घालीत असतात, म्हणजे ज्यांची लोक पूजा करीत असतात,' 'ज्यांचें लोक यजन करितात;' अर्थात् 'पूजनीय,' 'यजनीय.'

'[आम्हांस]' हें पद अध्याहृत आहे. आम्हांस असें वाटतें कीं तृतीय चरण 'दधिध्वे वृक्तबर्हिषः' असा समजून 'हे स्तवनप्रिय मरुतांनो, पिता पुत्राला आपल्या हातांवर धरितो तसे तुम्ही तुमच्या सेवकांस तुमच्या हातांत केव्हां धरीत असतां?' असा अर्थ केल्यास बरें होईल. मग 'अस्मान्'पदाचा अध्याहार करावयास नको. आणि पुढच्या मंत्राशींहि अर्थ चांगला जुळेल. 'वृक्तबर्हिः'

क्व नूनं कद्वो अर्थं गन्ता दिवो न पृथिव्याः ।
क्व वो गावो न रण्यन्ति ॥ २ ॥

क्व । नूनम् । कत् । वः । अर्थम् । गन्त । दिवः । न । पृथिव्याः ।
क्व । वः । गावः । न । रण्यन्ति ॥ २ ॥

क्व वः सुम्ना नव्यांसि मरुतः क्व सुविता ।
क्वो३ विश्वानि सौभगा ॥ ३ ॥

क्व । वः । सुम्ना । नव्यांसि । मरुतः । क्व । सुविता ।
क्वो ३ इति । विश्वानि । सौभगा ॥ ३ ॥

## भाषायाम्.

२. [ हे मरुतः ], नूनम् ( =इदानीं ) [ यूयं ] क्व [ स्थ ] ? वो ( =युष्माकम् ) अर्थं (=गमनीयं स्थानं ) कत् ( =किम् ) [ अस्ति ] ? [ यूयं ] दिवो (=द्युलोकाद् ) गन्त ( =प्रतिष्ठत ), पृथिव्या न ( =भूलोकान्मा ) [ गन्त=गच्छत ] । वो ( =युष्मदर्थं ) [ हि ] [ भूलोके ] गावो ( =गव्यमिश्रिता इन्दवः=सोमाः ) क्व ( =कस्मिन्यजनदेशे ) न रण्यन्ति ( =न रमन्ते )?

अत्र पृथिव्यां सर्वत्र युष्मदर्थं सोमा अर्प्यन्ते तस्मात् पृथिव्याः सकाशाद् गमनं नोचितम् दिवः प्रस्थाय अत्रैवागमनम् अत्र च स्थितिरित्येतदेवोचितमित्यर्थः ॥

३. हे मरुतः, वो ( =युष्माकं ) नव्यांसि ( =नवीयांसि=नवतराणि ) सुम्नानि (=प्रजापशुरूपाणि धनानि) क्व [ सन्ति ]? [ वः ] सुवितानि ( =मणिमाणिक्यादिरूपाः प्रसादाः ) क्व [वर्तन्ते] ? [अपि च वो] विश्वानि सौभगानि (=सौभाग्यरूपाणि गजाश्वादीनि) क्व [ सन्ति ] ?

एतानि सर्वाणि गृहीत्वा यूयं कस्माच्छीघ्रं नायाथेत्यर्थः ॥

---

याचा ' जो पूजा करितो तो,' ' सेवक ' हा अर्थ वेदांत प्रसिद्ध आहेच.

' धराल ' = ' दधिध्वे.' ' दधिध्वे' हें येथें वर्तमानकाळीं क्रियापद आहे. ' क्व गच्छामि ' यांतील 'गच्छामि' याचा अर्थ 'जातों' असा न होतां जसा 'जाऊं' असा होतो, तसा ' दधिध्वे ' याचा अर्थ ' धराल ' असा होतो.

२. [हे मरुतांनो], या वेळीं [तुम्ही] कोठें [आहां]? तुमचें गमन कुणीकडे [होत आहे]? [हे मरुतांनो,] [तुम्ही] स्वर्गाहून निघा, पृथ्वीवरून [निघून जाऊं] नका. [कारण कीं] तुम्हांसाठीं गोरस[युक्त सोम] कोठें लकलकत नसतात ?

2. Maruts, where [are ye] now ? What is you goal ? Depart [ye] from heaven, not from earth. [For] where do not the Somas sparkle for ye ?

३. हे मरुतांनो, तुमचीं अगदी नवीं धनें कोठें [आहेत]? [तुमचे] प्रसाद कोठें [आहेत]? आणि तुमचीं सकल वैभवें कोठें [आहेत]?

3. Where [are] your newest blessings ? Where, Maruts, your favours ? And where [are] all [your] prosperities ?

---

२. 'हे मरुतांनो, तुम्हीं या वेळीं कोठें असाल बरें ? अथवा कोठें जात असाल बरें ? कोठेंहि असलां तरी तुम्ही स्वर्गाहून पृथिवीवर यावें, ही आमची पृथ्वी आणि आम्हांस सोडून स्वर्गीं जाऊं नये. कारण कीं येथें सर्वत्र तुम्हांस लोक सोम अर्पण करीत असतात,' असा अर्थ. द्युलोक सोडून तुम्ही आपल्या उपासकांजवळ या, उपासकांस सोडून आपल्या स्थानीं स्वर्गीं जाऊं नका अशा प्रार्थना या मंत्रांत केली आहे.

'तुमचें गमन कुणीकडे [होत आहे]?' ='कत् वः अर्थम्.' अक्षरशः अर्थ 'तुमचें जाण्याचें ठिकाण कोणतें ?' 'अर्थ' हा शब्द वेदांत बहुतकरून नपुंसकलिंगी आहे, पुंल्लिंगी नाहीं, आणि त्याचा अर्थ 'ज्या स्थळीं जावयाचें आहे तें स्थळ.' 'गमनीयस्थान' असा होत असतो.

'गोरस[युक्त सोम]' ='गावः.' 'गावः' शब्दाचा हा अर्थ खरा आहे याविषयीं ऋ. ९. २८. २ हा मंत्र आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

'लकलकत असतात' = 'रण्यन्ति' = 'रमन्ते.' अक्षरशः अर्थ 'खेळत असतात.' ऋ. ८. १६. २, 'यंस्मिन्नुक्थानि रण्यन्ति' याजवरील भाष्य पहा. 'रमणें' म्हणजे 'खेळणें,' 'प्रसन्न होणें,' 'प्रसन्नमुदित असणें' या अर्थावरून सोमास 'लकलकणें' हें क्रियापद स्वाभाविक दिसतें.

३. 'हे मरुतांनो, तुम्ही आपल्या उपासकांस अगदी नवीं नवीं धनें देत असतां, पुत्रपौत्रादि सुखें देत असतां आणि गाई, घोडे इत्यादि वैभवें देत असतां अशी प्रसिद्धि आहे; आणि आम्हांस तर यांतून अजून कांहींच मिळालेलें नाहीं. तर हीं सर्व कोठें आहेत ?

यद्यूयं पृश्निमातरो मर्तासः स्यातन ।
स्तोता वो अमृतः स्यात् ॥ ४ ॥

यत् । यूयम् । पृश्निऽमातरः । मर्तासः । स्यातन ।
स्तोता । वः । अमृतः । स्यात् ॥ ४ ॥

मा वो मृगो न यवसे जरिता भूदजोष्यः ।
पथा यमस्य गादुप ॥ ५ ॥ १९ ॥

मा । वः । मृगः । न । यवसे । जरिता । भूत् । अजोष्यः ।
पथा । यमस्य । गात् । उप ॥ ५ ॥ १९ ॥

## भाषायाम्.

४. हे पृश्निमातरः (=पृश्नेः पुत्राः =मरुतः), यद् (=यदि) यूयं मर्ताः (=अस्मादृशो मरणधर्माणः) स्यातन (=स्यात=अभविष्यथ) [तर्हि] वो (=युष्माकं) स्तोता अमृतः स्यात् (=मरणरहितः कृतोऽभविष्यत्) ॥

अस्मादृशो मर्त्या अपि यद् दद्युस्तदपि यूयं न दित्सथेत्याश्चर्यमित्यर्थः ॥

५. [हे मरुतः,] वो (=युष्माकं) जरिता (=स्तोता), यवसे मृगो न (=घासयुक्तस्थले पशुरिव=घासयुक्तस्थले पशुर्यथा अजोष्यः असेव्यो न भवति तद्वद्) [युष्मभ्यम्] अजोष्यः (=असेवनीयः=अप्रियो) मा भूत् । [स] [यमस्य पथा] [मा] उपगात् (=मा गच्छतु) ॥

पशुर्यथा तृणपूर्णस्थले तृणभक्षणाय गतवान् तेन स्थलेन प्रतिहतो न भवति तथा युष्माकं स्तोतापि युष्माभिः प्रतिहतो मा भूत् अपि तु यूयं तस्य स्तुतिं शृणुत । तस्य च मरणं मा भूदित्यर्थः ॥

आणि तीं घेऊन तुम्ही कां आम्हांप्रत येत नाहीं?' असा भावार्थ आहे.

या जगांत सर्व कांहीं जें चांगलें म्हणून आहे तें सर्व देवांकडून आपणास मिळालें आहे (तपोबळानें वगैरे उत्पन्न झालेलें नाहीं, अथवा आपण पूर्वींच्या जन्मीं दान दिलें होतें त्यानें फळ आपणास प्राप्त होतें असें नाहीं) अशी आपल्या आर्य पूर्वजांची समजूत असे असें जसें या मंत्रावरून दिसून येतें तसेंच इतर मंत्रांवरूनहि उघड होतें.

'आणि......कोठें?'='क्को.' 'क्व'+'उ' (= 'उत'=आणि') याप्रमाणें 'क्को' शब्द झाला आहे.

४. हे पृश्निपुत्रांनो, तुम्ही जर मर्त्य असतां [तर] तुमचा स्तोता अमर झाला असता.

५. [हे मरुतांनो,] जनावर जसें कुरणास [नावडतें नसतें] तसा तुमचा स्तोता तुम्हांला नावडता नसो. तो यमाच्या मार्गानें न जाओ.

4. Sons of Pris'ni, if ye had been mortals, your praiser would have become immortal.

5. May your worshipper never be unwelcome [to ye] like as the animal [is never unwelcome] in the pasture; [and] may he [never] go by the path of Yama.

---

४. हा मंत्र फार चमत्कारिक आहे. वरच्या मंत्रांत सांगितलें कीं तुम्ही जे प्रसाद तुमच्या उपासकांवर करीत असतां ते आम्हांवर कां करीत नाहीं? या मंत्रांत त्याच विचारतरंगाला अनुसरून म्हणतो कीं, 'तुम्ही असावें तसे उदार कां नाहीं बरें? आम्ही तुमची विनवणी करीत आहों तशी जर आम्हांसारख्या मर्त्यांची कोणी स्तोत्यानें केली असती, आणि प्रसाद करण्याची शक्ति तुम्हांस जशी आहे तशी आम्हांस असती, तर आम्ही आमच्या स्तोत्यास अमर्त्यच करून दिला असता.' हें वचन प्रेमरोषाचें आणि प्रेमाक्षेपाचें आहे, द्वेषाचें नाहीं.

'पृश्निपुत्र'='पृश्निमातरः'. पृश्नि ही मरुतांची आई, आणि ती खरोखर कोण, व तिजविषयीं रूपकार्थ काय आहे तें पूर्वी सांगितलेंच आहे. (सूक्त २३ मंत्र १० पहा).

५. भावार्थः— 'पशु गवताच्या वांछेनें रानांत गेल्यास त्याला तें रान नको म्हणून सांगत नाहीं परंतु आंत येऊं देतें आणि गवत खाऊं देतें. त्याप्रमाणेंच तुमचा सेवक तुम्हांस अग्राह्य न होओ. आणि तो न मरो.' म्हणजे, संपत्ति विपुल द्या आणि तो न मरे असें करा.

**मो षु णः परापरा निर्ऋतिर्दुर्हणा वधीत् ।**
**पदीष्ट तृष्णया सह ॥ ६ ॥**

मो इति । सु । नः । पराऽपरा । निःऽऋतिः । दुःऽहना । वधीत् ।
पदीष्ट । तृष्णया । सह ॥ ६ ॥

**सत्यं त्वेषा अमवन्तो धन्वंश्चिदा रुद्रियासः ।**
**मिहं कृण्वन्त्यवाताम् ॥ ७ ॥**

सत्यम् । त्वेषाः । अमऽवन्तः । धन्वन् । चित् । आ । रुद्रियासः ।
मिहम् । कृण्वन्ति । अवाताम् ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

६. अपि च [हे मरुतः,] परापरा (=अतिबला) दुर्हणा (=केनापि हन्तुं दुःशक्या) निर्ऋतिः (=रक्षोजातिदेवता) नः (=अस्मान्) मा सु वधीत् (=मैव वधं कार्षीत्)। [सा च] तृष्णया सह (=अस्माकं दुष्टवासनया सह) पदीष्ट (=विनश्यतु) ॥

७. त्वेषा (=दीप्तिमन्तः) अमवन्तः (=बलवन्तो) रुद्रिया (=रुद्रपुत्रा मरुतः) अवातां मिहं (=वातरहितां वृष्टिम्=अनपेक्षितां विपुलां च मेघवृष्टिं) धन्वन् चित् आ (=धन्वनि आ अपि=मरुदेशेपि) कृण्वन्ति (=कुर्वन्ति) [इति यत् तत्] सत्यम् ॥

६. आणि [हे मरुतांनो,] अतिप्रबळ [आणि] मारावयास कठिण [अशी जी] निर्ऋति [ती] आम्हांस कधींहि न मारून टाको; ती [आमच्या] [दुष्ट] वासनेसहित नष्ट होओ.

६. And may the overwhelming [and] indestructible Nirṛiti never kill us, may she perish with [our] [evil] desire.

७. खरोखरच [हे] रुद्राचे दीप्तिमंत [आणि] बलवंत पुत्र वातरहित वृष्टि मरुदेशांतहि करितात.

7. Truly the effulgent [and] mighty sons of Rudra make a windless shower even in a rainless country.

६. पूर्वील मंत्राच्या शेवटीं यमाची बाधा न होओ अशी प्रार्थना केली; या मंत्रांत निर्ऋतीची बाधा न होओ आणि आमच्या सर्व दुष्टवासना नाश पावोत अशी प्रार्थना आहे.

'निर्ऋति' ही पाप करण्याची इच्छा जिजपासून होते अशी एक दुष्ट देवता. इजविषयीं सूक्त २४ मंत्र ९ याजवरील पूर्वी दिलेली टीप पहा.

'मारावयास कठिण'='दुर्हणा.' हा अर्थ सायणानुसारी आहे. कितीएक विद्वान् 'दुर्हणा' हें नाम समजून 'अनिष्ट' अथवा 'पातक' असा अर्थ करितात. पण त्यास विश्वसनीय आधार दिसत नाहीं. 'मारावयास कठिण' हें विशेषण दुष्टवासनाभिमानिनी देवी जी निर्ऋति तिजला फार योग्य आहे हें सांगावयास नकोच. कारण दुर्वासना आमच्या मनाविरुद्ध सुद्धा उत्पन्न होतात, आणि त्या आम्हांमधून काढून टाकण्याचा प्रयत्न केला तरी त्या जात नाहींत आणि त्या मारल्या जात नाहींत हें सर्वांस ठाऊक आहेच.

'[दुष्ट] वासनेसहित नष्ट होओ.' म्हणजे ज्या दुष्ट वासनेची प्रेरणा निर्ऋतीपासून होते ती दुष्ट वासना आणि तिची प्रेरणाकर्त्री निर्ऋति या दोन्ही मरून जाओत. निर्ऋति देवतेचें काम दुष्टवासना उत्पन्नकरणें हें होय त्यापेक्षां तिचा नाश दुष्टवासनेसहित होओ अशी प्रार्थना करणें साहजिक आहे. यांत इतकेंच लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे कीं, आमच्या आंगांतील दुष्टवासना जाण्यास देवांची कृपा पाहिजे, (तपोबळानें जाणार नाहींत) अशी समजूत आमच्या पूर्वजांची होती असें यावरून दिसून येतें.

या मंत्राच्या आरंभीं जें 'आणि' हें अव्यय आहे तें 'मो' यांत जो 'उ' शब्द (उत=अपि च) या अर्थी आहे त्याचें भाषांतर होय.

७. मरुतांचा पराक्रम इतका आहे कीं, 'ते पाऊस पडण्याची परिपाटी ज्या देशांत आहे तेथेंच वृष्टि करितात असें नाहीं, पण जेथें कधीं पाऊस पडत नसतो अशा रुक्ष मरुदेशांतहि वादळ

**वाश्रेव विद्युन्मिमाति वत्सं न माता सिषक्ति ।**
**यदेषां वृष्टिरसर्जि ॥ ८ ॥**

वाश्राऽइव । विऽद्युत् । मिमाति । वत्सम् । न । माता । सिसक्ति ।
यत् । एषाम् । वृष्टिः । असर्जि ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. यद् (=यदा) एषां [मरुताम्] (=एतैः कृता) वृष्टिः (=मेघवृष्टिः) असर्जि (=आसृज्यते=वृष्टा भवति) [तदा] विद्युत्, वाश्रा (=प्रस्नुतस्तनवती धेनुः) इव, मिमाति (=शब्दं करोति) [अपि च], वत्सं मातेव (=वत्सं माता यथा सेवते तथा), सिषक्ति (=सेवते=तान् रक्षति) ॥

वगैरे कांहीं नसतां एकाएकीं विपुळ मेघवृष्टि पाडितात,' असा भावार्थ.

'रुद्राचे पुत्र'='रुद्रियाः.' सायणाचार्य या स्थळीं रुद्रानें पाळलेले म्हणून 'रुद्रिय' असा अर्थ करितात. परंतु ऋ. १. ८५. १ यांत मरुतांस 'रुद्राचे सूनु' आणि ऋ. १. २१४. ६ आणि २. ३३. १ यांत रुद्रास 'मरुतांचा पिता' असें म्हटलें आहे, आणि २. ३४. २ यांत 'तूं मरुतांस जन्मविलेंस' असें रुद्रास म्हटलें आहे, व इतर ठिकाणींहि मरुतांचा बाप रुद्र ही गोष्ट वेदांत प्रख्यात आहे. शिवाय पुढच्या (३९ व्या) सूक्तांतील ४ थ्या मंत्रावरील सायणाचेंच भाष्य पहा.

'वातरहित वृष्टि'='अवातां मिहम्.' हा अर्थ आम्हीं सायणास अनुसरून केला आहे. कितीएक विद्वान् 'अवाताम्' याचा अर्थ 'न सुकणारी,' 'न वाळून जाणारी' असा करितात, पण त्याला पुरता आधार नाहीं असें आम्हांस वाटतें. शिवाय 'वातरहित' हा अर्थ चांगला जुळतो. साधारण पाऊस पडतांना वारा वाहतो तेणेकरून वृष्टीची सूचना अगोदर होते पण वायूची सूचना कांहीं नसतांना एकाएकीं मेघवृष्टि करितात असें सांगण्याचें तात्पर्य आहे.

'मरुदेशांतहि'='धन्वन् चित् आ.' 'आ' हा उपसर्ग 'धन्वनि' या समीशीं अधिकरणदर्शक असून संबद्ध आहे. 'मरुदेश' म्हणजे मारवाडासारिखे जे वृष्टिहीन प्रदेश ते होत. देशविशेष विवक्षित नाहीं. मरुत् जेथें जेथें जातात तेथें तेथें वृष्टि करितात असें पूर्वी एक ठिकाणीं सांगितलेंच आहे.

८. जेव्हां यांची [मेघ]वृष्टि पडते [तेव्हां] विद्युत् पान्हा फुटलेल्या गाईप्रमाणें हंबरते, [आणि] माता वत्साला [संभाळिते] तशी संभाळिते.

8. Like a cow with a full udder the lightning lows; she follows [them] as a dam [follows her] calf, when their shower pours.

८. 'मरुत् हे भयंकर वृष्टि करितात तेव्हां विद्युत् सुद्धा घाबरून जाते आणि तिला मरुतांचीच काळजी लागते, आणि एकादें साहसी मुल कांहीं विलक्षण पराक्रम करूं लागलें म्हणजे त्याची आई मोठ्या काळजीनें त्याजकडेस ओरडत धांवते आणि त्याला संभाळावयास जाते तशी ती या मरुतांस सांभाळावयास ओरडत जाते' असें तात्पर्य दिसतें.

येथें विजेचें ओरडणें म्हणजे वृष्टीच्या वेळीं जी मेघगर्जना होते ती हें तर, सायणाचार्यांनीं सांगितल्याप्रमाणें, स्पष्टच आहे. पण विजेला येथें मरुतांची आई कल्पिली हें मात्र थोडेंसें चमत्कारिक दिसतें. त्यांची आई 'पृश्नि' असें प्रसिद्ध आहे आणि 'पृश्नि' म्हणजे चित्रविचित्र ढग असें समजावयाचें. विजा हीं मरुतांचीं शस्त्रें होत असें बहुत करून वेदांत सांगितलें आहे. आमचा अर्थ सायणांस अनुसरून केलेला आहे.

'जेव्हां'=' यत्.' सायणाचार्य 'ज्यापेक्षां' असें म्हणतात.

'पान्हा फुटलेल्या गाईप्रमाणें'='वाश्रेव.' म्हणजे, 'गाईस पान्हा फुटल्यावर जी वासरासाठीं ओरडते तशी गाय.' 'वाश्रा' याचा अक्षरशः अर्थ 'ओरडणारी,' 'हंबरणारी' असा आहे.

'संभाळिते'=' सिषक्ति,' अक्षरशः 'मागाहून जाते', 'सेविते', 'जपते.'

**दिवा चित्तमः कृण्वन्ति पर्जन्येनोदवाहेन ।**
**यत्पृथिवीं व्युन्दन्ति ॥ ९ ॥**

दिवा । चित् । तमः । कृण्वन्ति । पर्जन्येन । उदऽवाहेन ।
यत् । पृथिवीम् । विऽउन्दन्ति ॥ ९ ॥

**अध स्वनान्मरुतां विश्वमा सद्म पार्थिवम् ।**
**अरेजन्त प्र मानुषाः ॥ १० ॥ १६ ॥**

अध । स्वनात् । मरुताम् । विश्वम् । आ । सद्म । पार्थिवम् ।
अरेजन्त । प्र । मानुषाः ॥ १० ॥ १६ ॥

## भाषायाम्.

९. यद् (=यदा) [मरुतः] पृथिवीं [वृष्टिना] व्युन्दन्ति (=विशेषेण क्लेदयन्ति) [तदा] [ते] उदवाहेन (=जलधारिणा) पर्जन्येन (=मेघेन) दिवा चित् (=दिवसेपि) तमः कृण्वन्ति (=अन्धकारं कुर्वन्ति) ॥

मेघवृष्टिना पृथिवीम् अतिमात्रं क्लेदयित्वा मेघततिना सूर्यम् आच्छाद्य प्रकाशं नाशयन्तीत्यर्थः ॥

१०. अध (=अथ=अनन्तरं) मरुतां स्वनाद् (=गर्जनहेतोः) विश्वम् आ (=सर्वमपि) पार्थिवं सद्म (=भूमौ स्थितं गृहं) [प्र अरेजत=प्ररेजते=सर्वाण्यपि पार्थिवानि गृहाणि प्रकम्पन्ते], [तथा] मानुषा (=मनुष्या) [अपि] प्र अरेजन्त (=प्रकर्षेण रेजन्ते=कम्पन्ते) ॥

९. [हे मरुत्] जेव्हां पृथ्वीला [वृष्टीनें] भिजवून टाकितात [तेव्हां] [ते] उदकधारी मेघाच्या योगेंकरून दिवसाहि अंधकार करितात.

१०. नंतर मरुतांच्या गर्जनेमुळें पृथ्वीवरील सर्वेहि घरें [आणि] मनुष्यें थरथर कांपूं लागतात.

9. Even in the day they create darkness with the water-bearing cloud, when they drench the earth.

10. Then at the roaring of the Maruts all houses whatever on earth [and] men greatly tremble.

९. मरुत् प्रचंड वृष्टि करितात तेव्हां काय काय होत असतें तें सांगतो. 'वृष्टि फार पडल्यामुळें पृथ्वी सर्व भिजून जाते, आणि दिवसालाहि काळोख पडतो, कारण कीं उदकानें भरलेलें जें मेघमंडळ तें सूर्याचे आड येतें.'

या मंत्रांत जो 'पर्जन्येन' असा शब्द आला आहे त्याच्या अर्थाकडे लक्ष्य द्यावें. साधारण संस्कृतांत आणि मराठींत 'पर्जन्य' म्हणजे 'पाऊस' असा अर्थ होतो. पण येथें 'मेघ' 'ढग' असा अर्थ आहे, 'वृष्टि' असा नाहीं. या 'पर्जन्या' वर मागाहून देवत्वाचा आरोप करून त्याला कितीएक मंत्रांची व सूक्तांची देवता केली आहे तें पुढें योग्य प्रसंगीं स्पष्ट होईल.

'भिजवून टाकितात' ='व्युन्दन्ति.' यांतील 'वि' चा अर्थ बरोबर होण्यासाठीं आम्हीं नुस्तें 'भिजवितात' असें न म्हणतां 'भिजवून टाकितात' असें म्हटलें आहे. 'भिजवून चिप्प करितात,' 'जिकडे तिकडे गार करून टाकितात.'

१०. मरुत् मेघवृष्टि करितात तेव्हां काय काय होत असतें तें पुढें सांगतो. 'मग मरुत् गर्जना करितात' म्हणजे 'भयंकर मेघगर्जना होते तेणेंकरून सर्व घरें आणि मनुष्यें थरथरां कांपूं लागतात.' पाऊस पडतो तो मरुत् पाडितात हें जसें रूपक आहे तसेंच मेघगर्जना होते ती मरुतांची गर्जना असें रूपक आहे.

'नंतर' = 'अध.' 'अथ' याचें रूप वेदांत पुष्कळ ठिकाणीं 'अध' असें येत असतें.

'गर्जनेमुळें' = 'स्वनात्.' म्हणजे 'गर्जनेली भिऊन' 'गर्जना ऐकून.'

'सर्वहि' = 'विश्वम् आ.' येथें 'आ' शब्दाचा 'निश्चयानें' असा अर्थ आहे. दुसऱ्या ठिकाणींहि 'आ'चा प्रयोग असाच आलेला आहे. जसें 'समान्यावृतया विश्वम् आ रजः' (ऋ. ५. ४८. २); येथें सायणाचार्य तरी 'विश्वम् आ' याचा 'सर्वमपि' असाच अर्थ करितात. शिवाय ऋ. ९. ६८. ९ यांत 'इयं दिवः इयर्ति विश्वम् आ रजः' असें आलें

मरुतो वीळुपाणिभिश्चित्रा रोधस्वतीरनु ।
यातेमखिद्रयामभिः ॥ ११ ॥

मरुतः । वीळुपाणिऽभिः । चित्राः । रोधस्वतीः । अनु ।
यात । ईम् । अखिद्रयामऽभिः ॥ ११ ॥

स्थिरा वः सन्तु नेमयो रथा अश्वास एषाम् ।
सुसंस्कृता अभीशवः ॥ १२ ॥

स्थिराः । वः । सन्तु । नेमयः । रथाः । अश्वासः । एषाम् ।
सुऽसंस्कृताः । अभीशवः ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

११. हे मरुतः, [ यूयं ] चित्रा रोधस्वतीरनु ( =सुन्दरा नदीः अनुलक्ष्य=सुन्दरीणां नदीनां तीराण्यनुलक्ष्य ) वीळुपाणिभिः ( =दृढपादैः) अखिद्रयामभिः (=अच्छिन्नगमनैश् )[च] [अश्वैः] यात ईम् ( =गच्छतैव ) ॥

आकाशे स्थितानां विचित्राणां मेघमालारूपाणां नदीनां तीराण्यनुलक्ष्य नित्यं यथा गच्छथ तथा गच्छतेदानीमित्यर्थः ॥

१२. [ हे मरुतः,] वो ( =युष्माकं ) नेमयो (= रथचक्रवलयाः) स्थिरा (=दृढाः) सन्तु,—एषां (= मरुतां ) रथा अश्वाश् [च] [ स्थिराः सन्तु ] । [ एषाम् ] अभीशवो ( =बन्धनरज्जवः=प्रग्रहाः) सुसंस्कृताः ( =सुष्ठु तैलादिना संस्कृताः ) [सन्तु] ॥

नदीनां रोधांस्यनुलक्ष्य यदा गमिष्यथ तदा युष्माकं रथाश्वादयः रथप्रग्रहाश्च सुदृढाः सन्तु येन गमने विघ्नो मा भूदित्यर्थः ॥

---

आहे. 'विश्व' या बाहुल्यवाचकापुढें जसा 'आ' हा 'अपि' या अर्थी येतो तसाच 'असामि' ( =सगळें ) 'उभय' (=दोघे ) 'ईवत्' ( =एवढें ) इत्यादि साकल्य अथवा बाहुल्य अथवा संख्या दर्शविणाऱ्या वाचकांपुढें वेदांत आलेला आहे.

११. हे मरुतांनो, चालतांना न थकणाऱ्या [आणि] सुदृढ पायांच्या [घोड्यां] वर [बसून] [तुम्ही] सुंदर नद्यांच्या कांठांनीं जा.

१२. [हे मरुतांनो,] तुम[च्या रथचक्रां]चे पाटे बळकट असोत,— यांचे रथ [आणि यांचे] घोडे [बळकट असोत], [यांच्या] वाद्या नीट कमाविलेल्या [असोत].

11. Maruts, go [ye] along the banks of the variegated rivers on strong-footed horses of unbroken speed.

12. [Maruts,] let your fellies be strong,—[let] the chariots [and] horses of these (Maruts) [be strong,] [let their] reins [be] well-prepared.

---

११. 'हे मरुतांनो, तुम्ही आकाशांतील ज्या सुंदर टिपक्याटिपक्यांच्या मेघमालारूपी नद्या त्यांच्या तीरावरून तुमच्या घोड्यांवर बसून नेहमीं फिरत असतां तसे फिरा.'

'चालतांना न थकणाऱ्या' = 'अखिद्रयामभिः.' हा अर्थ सायणाचार्यांनीं जी प्रक्रिया आपल्या भाष्यांत दिली आहे तिजवरून घेतला आहे. भाष्यांत 'अच्छिन्नगमनैः'(=अप्रतिहत गमन ज्यांचें, 'अश्वैः'शब्द छापील प्रतींत नजरचुकीनें वगळला कीं काय नकळे) असें लिहितात.

'सुदृढ पायांच्या' = 'वीळुपाणिभिः.' या ठिकाणीं सायणाचार्य बहुव्रीहि न समजतां तत्पुरुष घेतात, आणि 'दृढ हस्तांनीं युक्त' असे जे तुम्ही असें भाष्य करितात. पण तसें करण्याचें कारण हा शब्द उत्तरपदोदात्त आहे इतकेंच दिसतें. परंतु व्यत्ययस्वर समजावा एक, किंवा अर्थलाभासाठीं 'वीळुपाणिभिः' असें पद समजावें म्हणजे अडचण दूर होते. 'वीळुपाणिभिः' याचा जो आम्हीं येथें अर्थ केला आहे त्यास आधार ऋ. ७. ७३. ४ यावरील सायणाचार्यांच्या पाक्षिक भाष्याचा आहे. 'वीळुपाणि' शब्द वेदांत केवळ तीन ठिकाणीं आला आहे. आणि प्रस्तुत स्थळ खेरीज करून दुसऱ्या दोनी ठिकाणीं घोड्यांस लाविलेला आढळतो.

या मंत्रांत 'ईम्' हें पद पादपूरण आहे असें दिसतें. फार करून त्याचा अर्थ 'त्याला,' 'तिला,' 'तें,' असा द्वितीयार्थी होत असतो. पण तो येथें जुळत नाहीं. सायणाचार्य निश्चयार्थी अव्यय आहे म्हणतात.

१२. नद्यांच्या कांठांनीं जा असें वर सांगितलें. तर जातांना विघ्न होऊं नये म्हणून, 'हे मरुतांनो, तुमचे रथ, तुमचे घोडे, घोड्यांच्या लगामाच्या अनीनी आणि रथांचे पाटे हे सर्व मजबूत आणि बळकट असोत' असें या मंत्रांत सांगितलें आ-

**अच्छा॑ वदा॒ तना॑ गि॒रा ज॒रायै॒ ब्रह्म॑ण॒स्पति॑म् ।**
**अ॒ग्निं मि॒त्रं न द॑र्श॒तम् ॥ १३ ॥**

अच्छ॑ । व॒द॒ । तना॑ । गि॒रा । ज॒रायै॑ । ब्रह्म॑णः । पति॑म् ।
अ॒ग्निम् । मि॒त्रम् । न । द॒र्श॒तम् ॥ १३ ॥

## भाषायाम्.

१३. [हे ऋत्विक्समूह,] ब्रह्मणस्पतिम् (=एतन्नामानं देवम्) अग्निं, दर्शतं (=दर्शनीयं) मित्रं न (=एतन्नामानं देवं च) जरायै (=जरितुं=स्तोतुं) तना गिरा (=विस्तृतया गिरा) अच्छवद (=आभिमुख्येन ब्रूहि) ॥

अस्खलितया वाचा ब्रह्मणस्पतिम् अग्निं मित्रं च स्तुहीत्यर्थः ॥

हे. जसा कोणी गाडींत बसून जाऊं लागला म्हणजे त्याचे इष्ट मित्र त्याला सांगतात की, 'घोडे संभाळून हाका, लगाम चांगली पाहून लावा आणि पाटा नीट पहा बरें,' तसें मंत्रवक्ता ऋषि या ठिकाणीं आपल्या उपास्य मरुद्देवांस सांगत आहे.

या मंत्रावरून इतकें दिसून येतें कीं वैदिक युगांत ज्या गाड्या होत्या त्यांस घोडे जोडीत, पण गाडीची वाट निघून जाण्याचें जसें आतां रस्त्यावर नेहमीं भय असतें तसेंच तेव्हांहि असे, घोडे बुजून गाडी उलथण्याचें भय आतां आहे तसेंच तेव्हांहि होतें, आणि लगामाच्या वाद्या चांगल्या नरम कमाविलेल्या कातड्याच्या नसतील तर त्याहि तुटण्याचें आतांसारिखेंच तेव्हांहि भय असे.

'यांचे रथ.' प्रथम मरुतांस द्वितीयपुरुषीं संबोधन करून लागलाच त्यांविषयीं तृतीयपुरुषीं निर्देश करितो हा पुरुषव्यतिरेक ध्यानांत ठेवावा. पूर्वसूक्ताच्या १५ व्या मंत्रावरील टीप पहा.

'[यांच्या] वाद्या नीट कमाविलेल्या [असोत]' = 'सुसंस्कृता अभीशवः.' सायणाचार्य "आंगळ्या [लगाम धरण्यासाठीं] सावध असोत" असा अर्थ करितात. पण रथ, घोडे, पाटे यांच्या साहचर्यसंबंधानें 'अभीशवः' म्हणजे 'लगाम' अथवा 'वाद्या' हाच अर्थ येथें इष्ट दिसतो. शिवाय ऋ. ५. ६१. २ यांत खुद्द सायणाचार्य सुद्धा आम्हीं येथें केलेलाच अर्थ करितात तो पहा.

१३. [हे ऋत्विजांनो,] ब्रह्मणस्पति, अग्नि आणि सुंदर मित्र यांला स्तवण्यासाठीं [तुम्हीं] अस्खलित वाणीनें गा.

13. Sing forth in uninterrupted speech in order to glorify Brahmaṇaspati, Agni as well as the handsome Mitra.

१३. हा तेरावा मंत्र जरी मरुतांच्या सूक्तांत आला आहे तरी ब्रह्मणस्पति, अग्नि आणि मित्र या देवांविषयीं यांत प्रतिपादन आहे. ऋषि म्हणतो, 'ह्या तिनी देवांची कीर्ति वर्णण्यासाठीं अव्याहत वाणीनें गा, थांबूं नका.' सायणाचार्य म्हणतात, ह्या मंत्रांत जें गायन करावयास सांगितलें आहे तें ऋत्विग्गणास सांगितलें आहे. तसेंच समजून आम्हीं भाषांतर केलें आहे.

सायणाचार्य 'ब्रह्मणस्पति' म्हणजे या मंत्रांत "मंत्राचा अथवा अन्नाचा पालक जो तो मरुद्गण" असा अर्थ करितात. परंतु 'ब्रह्मणस्पति' हें मरुद्गणास दुसऱ्या ठिकाणीं निर्विवाद लाविलेलें आढळणें नाहीं, आणि सायणाचार्य 'मरुद्गण' असा अर्थ करितात तो केवळ हा मंत्र मरुद्गणाच्या सूक्तांत आला आहे व सूक्ताची देवता मरुद्गण आहे यास्तव या मंत्राचा संबंध कसा तरी करून मरुद्गणाकडेस लाविला पाहिजे अशा समजुतीनें करितात यांत संशय नाहीं.

'आणि'='न.' हा अर्थ आम्हीं सायणांस अनुसरून केला आहे, आणि आम्हांस वाटतें कीं तो योग्य आहे. कितीएक विद्वान् 'अग्निं मित्रं न दर्शतं' याचा 'सूर्यासारिख्या सुंदर अग्नीस' असा अर्थ करितात. पण 'न' याचा नेहमीचा 'सारिखा' हा अर्थ येथें जुळत नाहीं.

'अस्खलित वाणीनें'='तना गिरा.' या ठिकाणीं सायणाचार्य भिन्न अर्थ (आम्हांस वाटतें विनाकारण) करितात. पण 'अग्निं यजध्वं हविषा तना गिरा' (ऋ. २. २. १) याजवरील भाष्यांत आम्हीं येथें केलेला अर्थ सायणच करितात तो पहा.

**मिमीहि श्लोकमास्ये पर्जन्य इव ततनः ।**
**गाय गायत्रमुक्थ्यम् ॥ १४ ॥**

मिमीहि । श्लोकम् । आस्ये । पर्जन्यःऽइव । ततनः ।
गार्य । गायत्रम् । उक्थ्यम् ॥ १४ ॥

**वन्दस्व मारुतं गणं त्वेषं पनस्युमर्किणम् ।**
**अस्मे वृद्धा असन्निह ॥ १५ ॥ १७ ॥**

वन्दस्व । मारुतम् । गणम् । त्वेषम् । पनस्युम् । अर्किणम् ।
अस्मे इति । वृद्धाः । असन् । इह ॥ १५ ॥ १७ ॥

## भाषायाम्.

१४. [हे ऋत्विक्समूह,] आस्ये (=स्वकीयमुखे) श्लोकं (=स्तोत्रं) मिमीहि (=निर्मिमीहि=निर्मितं कुरु), [तेन च] पर्जन्य इव (=मेघ इव) ततनः (=स्तनय=गम्भीरगर्जनां कुरु)। उक्थ्यं (=गेयं) गायत्रं (= स्तोत्रं) गाय ॥

१५. [हे ऋत्विक्समूह,] [त्वं] त्वेषं (=दीप्तिमन्तं) पनस्युं (=स्तुत्यम्) अर्किणं (=तेजस्विनं) मारुतं गणं (=मरुतां गणं) वन्दस्व (=नमस्कुरु)। [ते] इह (=अस्माकम् अस्मिन् कर्मणि) अस्मे (=अस्मासु) वृद्धा असन् (=प्रसन्ना भवन्तु)॥

१४. [हे ऋत्विजांनो,][तुम्ही] मनांत स्तोत्र रचा [आणि] [मग] मेघासारिखे [ त्याची ] गर्जना करा. [ आणि ] मधुर गान गा.

१५. [ हे ऋत्विजांनो,] [तुम्हीं] देदीप्यमान, स्तवनीय [आणि] तेजःपुंज मरुद्गणाला नमस्कार करा. [ ते ] या [ आमच्या ] कर्माच्या ठायीं आम्हांवर प्रसन्न होओत.

14. Compose a song in [your] mouth [and] [then] rumble [with it] like a thunder. Sing the sweet song.

15. Adore the host of the Maruts, [that is] effulgent, praiseworthy [and] resplendent. May [they] in this [our worship] be pleased with us.

१४. वरच्या मंत्रांत ‘ अस्खलित वाणीनें ’ गा म्हणून सांगितलें तेंच विचारतरंग मनांत ठेवून म्हणतो कीं, ‘ हे ऋत्विजांनो. तुम्हीं स्तोत्र मनांतल्या मनांत प्रथम रचा आणि मग, जसा मेघ मोठ्यानें गर्जना करितो तशा मोठ्या गर्जनेनें, तें गा.’

आमच्या भाषांतरांत आम्हीं ‘रचा’ आणि ‘ गर्जना करा ’ असे अनेकवचनी प्रयोग केले आहेत. पण मुळांत एकवचनी क्रियापदें आहेत. ‘ऋत्विक्समूह’ हें संबोधन अध्याहृत आहे.

‘मनांत’=‘आस्ये.’ अक्षरशः ‘तोंडांत,’ म्हणजे ‘ आंतल्या आंत,’ ‘ तोंडाबाहेर नव्हे ’ ‘ उच्चार न करितां’; अर्थात् ‘ मनांत.’

‘[ त्याची ] गर्जना करा’=‘ततनः.’ सायणाचार्य ‘पसरा’ असा अर्थ करितात. पण तो येथें जुळत नाहीं. ‘तन्’ पसरणें, विस्तारकरणें या धातुशिवाय ‘ तन् ’ हा एक दुसरा धातु ‘स्तन्’ यांतील आद्य स् जाऊन उत्पन्न झालेला ‘गर्जना करणें’ या अर्थी वेदांत आढळतो. ऋ. ६. ३८. २ ‘घोषाद् इन्द्रस्य तन्यति ब्रुवाणः’ या स्थलीं सायणाचार्यहि ‘तन्यति’ याचा अर्थ ‘शब्दं करोति’ ( गर्जना करितो ) असा करितात.

या मंत्रांत ‘श्लोक’ शब्दाचा अर्थ पद्य अथवा च्यार चरणांची कविता असा आतां होतो तसा न होतां स्तोत्र इतकाच होतो तें ध्यानांत ठेवावें.

१५. हा या सूक्ताचा उपसंहार आहे. ‘देदीप्यमान, आणि ज्याची स्तुति लोकांनीं करण्यासारिखी आहे, आणि जो तेजःपुंज होय असा जो मरुद्गण त्याजप्रत नमस्कार करा, म्हणजे मग ते मरुत् या आमच्या कर्मामध्यें आम्हांवर प्रसन्न होतील.’

या मंत्राच्या पहिल्या भागांत मरुद्गण याविषयीं एकवचनी निर्देश असून शेव-

## सूक्तम् ३९.

घोरपुत्रः कण्व ऋषिः । मरुतो देवता । युजः सतोबृहत्यः । अयुजो बृहत्यः ।

**प्र यदि॒त्था प॑रा॒वतः॑ शो॒चिर्न मान॒मस्य॑थ ।**

**कस्य॒ क्रत्वा॑ मरुतः॒ कस्य॒ वर्प॑सा॒ कं या॑थ॒ कं ह॑ धूतयः ॥ १ ॥**

प्र । यत् । इ॒त्था । प॒रा॒ऽवतः॑ । शो॒चिः । न । मान॑म् । अस्य॑थ ।

कस्य॑ । क्रत्वा॑ । म॒रु॒तः॒ । कस्य॑ । वर्प॑सा । कम् । या॒थ॒ । कम् । ह॒ । धू॒त॒यः॒ ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. हे मरुतः, यद् ( = यस्माद् ) [ यूयं ], [ सूर्यः ] शोचिः ( =स्वप्रकाशस्य किरणम् ) [ अस्यति ] तथा, परावतो ( = दूराद् ) इत्था ( =इत्थं=बहुलं ) मानम् अस्यथ ( =मातुम् इव पदं प्रक्षिपथ=त्वरितं गच्छथ ), [तत्] कस्य क्रत्वा ( =कस्य यजमानस्य कर्मणा ) [अथवा ] कस्य वर्पसा ( =कस्य यजमानस्य स्तोत्ररूपक्रियया ) [ अस्यथ ] ? हे धूतयः ( =कम्पकारिणो) [मरुतः], [यूयं ] कं [यजमानं] याथ ? कं ह ( =कं खलु यजमानं ) [ याथ ] ?

टील चरणांत मरुत् प्रसन्न होओत असा अनेकवचनी निर्देश आहे. मरुतांविषयीं जीं स्तोत्रें वेदांत आहेत त्यांत असें पुष्कळ वेळ होत असतें.

'तेजःपुंज'='आर्किणम्.' अर्क या शब्दाचा अर्थ 'किरण' अथवा 'प्रकाश' हा एक आणि 'गायन' हा दुसरा. या ठिकाणीं 'गायन करणारा' असा 'आर्किणम्' याचा अर्थ कितीएक करितात पण तसें करणें अवश्य आणि युक्त दिसत नाहीं. 'अर्क' म्हणजे 'प्रकाश' अथवा 'तेज' असा अर्थ होतो याविषयीं ऋ. ३. ६१. ६ "ऋतावरी दिवो अर्कैरबोध्या" याजवरील सायणभाष्य पहा. आणि 'अर्क' म्हणजे 'स्तोत्र' अथवा 'गायन' हा तर अर्थ स्पष्टच आहे. यास्तव प्रस्तुतस्थळीं 'ज्याचें स्तोत्र जन गातात' असाहि अर्थ संभवेल. परंतु 'गाणारा' असा कितीएक विद्वानांनीं केलेला अर्थ चिंत्य दिसतो. जरी प्रसंगवशात् मरुत् गातात असें कोठकोठें जाणविलेलें आढळतें तथापि 'गाणारे' असें त्यांस नांव देण्याइतकी त्यांची गायनप्रसिद्धि नाहीं असें आम्हांस वाटतें.

'प्रसन्न होओत'=' वृद्धा असन्.' सायणाचार्य 'प्रवृद्ध होओत' असा अर्थ करितात. तसा घेतल्यास '[तें] या [आमच्या] कर्माच्या ठायीं आम्हांकडून प्रवृद्ध होओत' असें भाषांतर करावें; म्हणजे, आम्हांकडून वाढलेले होओत, आमच्या हातून त्यांची सेवा घडली असें होओ.

'या [आमच्या] कर्माच्या ठायीं'= 'इह.' म्हणजे, असें समजलें पाहिजे कीं कण्वजन कांहीं कर्म (देवयजन) करीत होते आणि त्या प्रसंगीं हें सूक्त रचून म्हटलेलें आहे. तें कर्म सफळ होओ अशी प्रार्थना या उपसंहाराच्या अंतीं आहे.

## सूक्त ३९.

**ऋषि—घोराचा पुत्र कण्व** ( पूर्वील सूक्ताचा जो वक्ता तोच ). **देवता—मरुत्.** वृत्त—सम ज्या ऋचा आहेत ( म्हणजे २ री, ४ थी, ६ वी, ८ वी आणि १० वी ) त्यांचें **सतोबृहती**, आणि विषम (म्हणजे १ ली, ३ री, ५ वी, ७ वी आणि ९ वी ) आहेत त्यांचें **बृहती.**

१. हे कंपकारी मरुतांनो, [तुम्ही ] जे [ सूर्यानें ] किरण [टाकिल्या ] प्रमाणें पावलें टाकून इतक्या दुरून त्वरित जात आहां [ते] कोणाच्या कृतीमुळें,[अथवा] कोणाच्या क्रियेमुळें [जात आहां ]? [ तुम्ही ] कोणाकडे जात आहां, कोणाकडे बरें [ जात आहां ] ?

## HYMN 39

To the *Maruts*. By *Kaṇva* the son of *Ghora* ( same as the author of the previous hymn.) Metre—that of the even verses (i.e. 2, 4, 6, 8 and 10) the *satobṛihatî*, and that of the odd verses ( i.e., 1, 3, 5, 7, and 9 ) the *Bṛihatî*.

1. Through whose work, O Maruts, through whose artifice [is it] that [you] are throwing [your] strides so quickly from afar like as [the sun throws] [his] ray ? To whom, tell us, to whom O shakers, are [you] going?

---

१. आपण येथें अशी कल्पना केली पाहिजे कीं मंत्रवक्ता मरुतांस दुरून मोठ्या त्वरेनें जातांना पाहत आहे ( म्हणजे पाहतो आहे असें त्याला वाटत आहे ); आणि त्यांला विचारितो आहे कीं, ' हे मरुतांनो, तुम्ही जे इतक्या त्वरेनें दुरून मोठ्या त्वरेनें जात आहां ते कोणा धन्य यजमानाचें यज्ञकर्म पाहून जात आहां, अथवा कोणा भाग्यशाली यजमानाचें स्तोत्र ऐकून जात आहां बरें ? तुम्ही कोणत्या यजमानाकडे अथवा स्तोत्याकडे जात आहां सांगा बरें ? '

' कंपकारी मरुत् ' = ' धूतयो मरुतः. ' मरुत् हे सकळ प्राण्यांला आणि सकळ पदार्थांला आणि पृथ्वीला आणि स्वर्गालाहि हालवून टाकितात असें वेदांत सांगितलें आहे याविषयीं पूर्वी लिहिलेंच आहे.

'[ सूर्यानें ] किरण टाकिल्याप्रमाणें.' ही उपमा खचित ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. सूर्य उगवतांच जे किरण पृथ्वीवर फेकतो ते किती लवकर येऊन पृथ्वीवर

**स्थिरा वः सन्त्वायुधा पराणुदे वीळू उत प्रतिष्कभे ।**
**युष्माकमस्तु तविषी पनीयसी मा मर्त्यस्य मायिनः ॥ २ ॥**

स्थिरा । वः । सन्तु । आयुधा । पराऽनुदे । वीळु । उत । प्रतिऽस्कभे ।
युष्माकम् । अस्तु । तविषी । पनीयसी । मा । मर्त्यस्य । मायिनः ॥२॥

## भाषायाम्.

३, [ हे मरुतः,] वो ( =युष्माकम् ) आयुधानि स्थिराणि ( =अविच्छिन्नानि ) सन्तु, [तानि च] परानुदे ( =परानोत्तुं= शत्रूणाम् अपनोदनाय ) उत ( =अपि च ) प्रतिस्कभे ( =शत्रून् प्रतिस्कम्भितुं=शत्रूणां प्रतिबन्धाय ) वीळू (=वीळूनि=सुदृढानि) [ सन्तु ] । [ अपि च ] पनीयसी ( =अतिशयेन स्तोतव्या=उत्कृष्टतरा ) तविषी ( =बलं ) युष्माकम् [एव] अस्तु, मायिनः ( =छद्मचारिणो ) मर्त्यस्य (=मनुष्यस्य) मा [ अस्तु ] ॥

पोंहचतात याविषयीं सुद्धा आपल्या पूर्वजांनीं विचार केलेला या मंत्रावरून दिसून येतो.

‘ पावलें टाकून जात आहां ’ = ‘ मानम् अस्यथ. ’ अक्षरशः अर्थ ‘ माप टाकितां:’ जमीन मोजण्याचा अगदी आद्य प्रकार म्हटला म्हणजे पावलांनीं असे. काठ्या, सांखळ्या, फीत वगैरे प्रकार पूर्वी नव्हते. व जमीन मापण्याकरितां जीं पावलें टाकितात तीं लांब लांब टाकणें हें साहजिक आहे; आणि लांब लांब पावलें टाकणें म्हणजे ‘ लवकर चालणें. ’ त्यावरून ‘ पावलें टाकून त्वरित जात आहां ’ असा अर्थ निघतो. ऋ. ५. ८५. ५ याजवर सायणाचार्यहि ‘ मान ’ शब्दाचा अर्थ ‘ जमीन मोजण्याचा दंड’ असा करितात. आमचा अर्थ त्यापासून विशेष भिन्न नाहीं.

‘ कृतीमुळें ’ = ‘क्रत्वा.’ ‘क्रियेमुळें’= ‘ वर्पसा. ’ ‘ कृति ’ म्हणजे येथें देवप्रीत्यर्थ केलेलें कर्म ( यज्ञादिक ) आणि ‘ क्रिया’ म्हणजे ‘ स्तोत्र ’ असा अर्थ समजावा.

२. [हे मरुतांनो,] तुमचीं आयुधें बळकट असोत, [तुमचीं आयुधें] [शत्रूला] निवारण्यास आणि प्रतिबंध करण्यास सुदृढ असोत. अत्युत्तम बळ तुम्हांलाच असो, कपटी मर्त्याला नसो.

2. May your weapons be steady, [may they be] strong to drive away and to resist [the enemy.] May excellent might be yours [and] not of the wily mortal.

२. जसा एकादा बापावर प्रेम ठेवणारा मुलगा बापाचें चांगलें होओ असें प्रार्थितो तसा ऋषि उपास्य देव मरुतांचें चांगलें होओ म्हणून या मंत्रांत प्रार्थितो कीं 'हे मरुतांनो. तुमचीं जीं आयुधें तीं बळकट राहोत, आणि शत्रूंवर हल्ला करून त्यांस हांकून देण्याची आणि शत्रु तुमच्या आंगावर चालून आले तर त्यांस मागें हटविण्याची शक्ति राही इतकीं तीं सुदृढ राहोत. आणि ज्या सामर्थ्याची सर्वांनीं वाहवा करावी असें सर्वोत्कृष्ट सामर्थ्य तुम्हांमच असो, कपटानें भरलेल्या मर्त्यास नसो.'

या मंत्रांत जे 'असोत,' 'असो' आणि 'नसो' हे प्रयोग आले आहेत त्यावरून मंत्रवक्ता ऋषि मरुतांस आशीर्वाद देत आहे असें समजूं नये, तर त्यांवरून अमुक गोष्टी घडोत आणि अमुक न घडोत अशी बोलणाऱ्याची इच्छा मात्र उघड होते असें समजावें.

'निवारण्यास' आणि 'प्रतिबंध करण्यास' या ऐवजीं जीं 'परानुदे' आणि 'प्रतिस्कभे' हीं रूपें आहेत तीं तुमर्थ अव्ययाप्रमाणें योजिलेलीं आहेत.

'कपटी' = 'मायिनः.' वेदांत 'माया' शब्दाचा अर्थ असाच होतो. संसारसंबंधी जी 'माया' मागाहून शास्त्रांत प्रसिद्ध झाली ती माया वेदांत समजावयाची नाहीं.

परा ह यत्स्थिरं हथ नरो वर्तयथा गुरु ।
वि याथन वनिनः पृथिव्या व्याशाः पर्वतानाम् ॥ ३ ॥

परा । ह । यत् । स्थिरम् । हथ । नरः । वर्तयथ । गुरु ।
वि । याथन । वनिनः । पृथिव्याः । वि । आशाः । पर्वतानाम् ॥३॥

नहि वः शत्रुर्विविदे अधि द्यवि न भूम्यां रिशादसः ।
युष्माकमस्तु तविषी तना युजा रुद्रासो नू चिदाधृषे ॥ ४ ॥

नहि । वः । शत्रुः । विविदे । अधि । द्यवि । न । भूम्याम् । रिशादसः ।
युष्माकम् । अस्तु । तविषी । तना । युजा । रुद्रासः । नु । चित् ।
आऽधृषे ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. हे नरः ( =शूरा मरुतः ), यद् ( =यथा ) [ यूयं ] स्थिरं ( =स्थिरजातम्= अचलवस्तूनि ) पराहथ ( =भग्नं कुरुथ ) [ यथा च ] गुरु ( =गुरुजातं पाषाणादीनि गुरुत्वोपेतानि वस्तूनि ) वर्तयथ ( =प्रेरयथ=चालयथ ) [ तथैव ] पृथिव्या वनिनः (=पृथिव्युपरिस्थितान् महावृक्षान् ) वियाथन (=वियाथ=तान् वियुज्य मध्ये गच्छथ) [ अपि च ] पर्वतानाम् आशाः ( =पर्वतानां प्रदेशान् ) वि[याथन ] (=ता वियुज्य मध्ये गच्छथ ) ॥

यदा मरुतो गच्छन्ति तदा मार्गे स्थितान् अचलपदार्थान् भग्नान् कृत्वा, जडपदार्थांश्चालयित्वा, पार्थिवान् वृक्षान् भित्त्वा, पर्वतप्रदेशांश्च भित्त्वा अप्रतिहताः सन्तो गच्छन्तीत्यर्थः ॥

४. [ हे मरुतः ] वो ( =युष्माकम् ) अधि द्यवि (=द्युलोकस्योपरि ) शत्रुर्नहि विविदे ( नास्ते ), [ तथा ] हे रिशादसः ( =शत्रुहिंसकाः ), भूम्याम् [ अपि ] न [ विविदे ] । हे रुद्राः (=रुद्रपुत्राः), युष्माकं तविषी ( =बलं ) तना युजा (=विस्तृतेन सातत्येन=सततमेव ) नूचिद् आधृषे अस्तु ( =अनाधर्षणीयास्तु=केनापि अनभिभाव्यास्तु ) ॥

३. हे शूरांनो, [तुम्ही] जसे अचळ [पदार्थां]स उलथून टाकितां [आणि] भारी [पदार्थां]स हालवितां [तसे] पृथिवीवरील महावृक्षांला भेदून जात असतां [आणि] पर्वतांच्या प्रदेशांला भेदून जातां.

४. तुम्हांला स्वर्गांत शत्रु नाहीं [आणि] हे दुष्टनाशकांनो, पृथ्वीवर [हि तुम्हांला शत्रु] नाहीं. हे रुद्रपुत्रांनो, तुमचें बल सदैव अतिरस्करणीय असो.

3. As often as, O heroes, [ye] subvert [what is] steady [and] overturn [what is] heavy, [ye] penetrate through the trees of the earth [and] through the regions of the mountains.

4. To you there exists no enemy in heaven nor, O destroyers of the wicked, on earth. May your might be for ever, O sons of Rudra, such as shall not be despised.

---

३. या मंत्रांचें तात्पर्य असें आहे कीं 'मरुतांचा आवेश, वेग आणि झपाटा इतका असतो कीं ते जाऊं लागले असतां रस्त्यांत मोठमोठीं घरें आलीं तर त्यांस ते वांकवितात किंवा मोडून टाकितात, मोठमोठाले पर्वत आले तर त्यांस ते ढकलून बाजूस टाकून देतात, मोठमोठे वृक्ष आले तर त्यांस भेदून आणि डोंगऱ्या आल्या तर त्यांसहि भेदून अप्रतिहत होत्साते पुढें चालून जात असतात.'

हें मरुतांचें म्हणजे वायुरूपी देवांचें स्वभाववर्णन चांगलें आहे. विशेषेकरून वादळाच्या तडाक्यांत सांपडलेल्या मनुष्यास यांत कांहींच अतिशयोक्ति वाटणार नाहीं.

'जसें' = 'यत्.' सायणाचार्य 'जेव्हां' असा अर्थ करितात. तात्पर्य एकच आहे.

'हालवितां' = 'वर्तयथ.' अक्षरशः अर्थ 'फिरवितां.' 'वृत्' धातूचा खरा मूळचा जो अर्थ तो येथें आला आहे. कारण 'वृत्' धातूचा मूळ अर्थ असणें अथवा वर्तणें असा नाहीं 'फिरणें' असा आहे; त्यावरूनच 'निवर्तते' म्हणजे मागें फिरतो, 'आवर्तते' म्हणजे इकडे किंवा पुनः फिरतो इत्यादि प्रसिद्ध अर्थ होत असतात.

'पर्वतांच्या प्रदेशांला' = 'आशाः पर्वतानाम्'. येथें 'आशा' शब्दाचाहि 'बाजूचा प्रदेश' हा मूळ अर्थ आला आहे. त्यापासूनच मागाहून 'दिशा' हा अर्थ झाला.

४. 'मरुतांस स्वर्ग आणि पृथिवी या दोनी लोकीं शत्रु नाहींत; तर असे जे मरुत् त्यांची शक्ति सदैव अशी असो कीं तिचा तिरस्कार अथवा धिक्कार करण्याचें सामर्थ्य कोणासहि असूं नये' असें या ऋचेचें तात्पर्य आहे.

'नाहीं' = 'नहि विविदे.' अक्षरशः अर्थ 'जाणलेला नाहीं' 'जाणून टाकूक नाहीं.'

'स्वर्गांत' = 'अधि द्यवि.' 'अधि'

**प्र वेपयन्ति पर्वतान्वि विश्चन्ति वनस्पतीन् ।**
**प्रो आरत मरुतो दुर्मदा इव देवासः सर्वया विशा ॥५॥१८॥**

प्र । वेपयन्ति । पर्वतान् । वि । विश्चन्ति । वनस्पतीन् ।
प्रो इति । आरत । मरुतः । दुर्मदाःऽइव । देवासः । सर्वया । विशा ।
॥ ५ ॥ १८ ॥

---

## भाषायाम्.

५. [ते मरुतः] पर्वतान् प्रवेपयन्ति (=प्रकर्षेण कम्पयन्ति) [तथा] वनस्पतीन् (=वटाश्वत्थादीन् महावृक्षान्) विविश्चन्ति (=विदारयन्ति)। – हे देवा मरुतः, [यूयं], दुर्मदा इव (=मदोन्मत्ता इव), सर्वया विशा (=युष्माकं सकलया प्रजया) [सहिताः] प्रो आरत (=प्रकर्षेण सर्वत्र गच्छथ)॥

---

याचा अर्थ 'वर' 'आंत.' हें शब्दयोगी अव्यय आहे, आणि याचा संबंध 'त्रवि' शब्दाशीं आहे. ३८ व्या सूक्ताच्या ७ व्या मंत्रावरील 'आ' या शब्दयोगी अव्ययाविषयीं लिहिलेली टीप पहा.

'रुद्रपुत्रांनो'='रुद्राः.' रुद्र हा मरुतांचा बाप होय याविषयीं पूर्वी लिहिलेंच आहे. सू. ३८ मंत्र ७ याजवरील टीप पहा. प्रस्तुत मंत्रांत सायणाचार्यहि 'रुद्रपुत्र' असाच अर्थ करितात.

'तुमचें बळ सदैव अतिरस्करणीय असो'='युष्माकं तविषी तना युजा नू-चित् आधृषे अस्तु.' 'नू चित् आधृषे' याचा पदशः अर्थ 'कधींहि धिक्कारण्यास न' असा आहे. 'आधृषे' हें 'आधृष्' चें तुमर्थी चतुर्थ्यन्त अव्यय आहे. आणि 'नू चित्' म्हणजे 'नाहींच' असा अर्थ होतो (४१ व्या सूक्ताच्या १ ल्या मंत्रावरील टीप पहा). त्यावरून 'नू चित् आधृषे' म्हणजे 'आधर्षण करण्यास अयोग्य,' 'तुच्छ मानतां कामा नये असें', 'शत्रूंनीं ज्यास भ्यावें असें' असा अर्थ निष्पन्न होतो. ऋ. १. १३६. १; ५. ८. ५; ५. ८७. २ हे मंत्र पाहा. त्यांतहि 'आधृषे' याचा असाच प्रयोग असून निषेधदर्शक अव्ययाशीं ('न' याशीं) योजिलेला आहे.

'सदैव'='तना युजा' यांत 'तना' हें नाम समजून 'युजा' हें विशेषणासारिखें समजावें. 'तना युजा' हे शब्द ऋग्वेदांत दुसरे ठिकाणीं एकत्र आलेले आढळत नाहींत, पण त्यासारिखेच 'शश्वता तना' असे दोन स्थळीं (ऋ. १. २६. ६ आणि ९. १. ६ यांत) आले आहेत. त्यांचा आणि यांचा अर्थ एकसारिखाच आहे.

५. [ हे ] पर्वतांस फार कांपवून टाकितात [ आणि ] अरण्यांतील महावृक्षांस चिरून टाकितात.—हे मरुतांनो, हे देवांनो, [तुम्ही] मदोन्मत्तांसारिखे [आपल्या] सर्व जनांसहित धांवत असतां.

5. [They] (the Maruts) shake the mountains violently, [they] slit asunder the forest trees.—Divine Maruts, [ye] press forward like mad men with all [your] people.

---

५. वर तिसऱ्या मंत्रांत सांगितलेलेंच पुनः प्रस्फुट करून सांगतो कीं, 'हे मरुत् जाऊं लागले म्हणजे रस्त्यांत मोठमोठे पर्वत जरी आले तरी त्यांस कांपवून टाकितात, मग महावृक्षांस उभेच चिरून टाकितात म्हणून सांगावयास नकोच. आणि हे मरुतांनो, तुम्ही सर्व आपले जन बरोबर घेऊन, जसे मदोन्मत्त मनुष्य जिकडे तिकडे धांवतात आणि जें हाताला सांपडेल त्याचा जातां जातां नाश करून टाकितात, तसे जिकडे तिकडे नाश करीतच जात असतां.'

'महावृक्षांस चिरून टाकितात '= 'वि विञ्चन्ति वनस्पतीन्.' ज्या रानांवरून मोठें वादळ गेलेलें कोणी पाहिलें असेल त्याला यांत खचित कांहींच अतिशयोक्ति वाटणार नाहीं. आणि वादळांचे योगानें 'खडकांचीं खडकें कशीं हालून जातात' तेंहि त्यांणीं पाहिलें असेल.

'मदोन्मत्तांसारिखे '=' दुर्मदा इव.' हा अर्थ सायणानुसारच आहे. वेड्याच्या हातीं कोलीत ! यांत पुष्कळ अर्थ आहे.

'[ आपल्या ] सर्व जनांसहित '= 'सर्वया विशा.' या ठिकाणीं 'सर्व जन' म्हणजे कोण समजावयाचे? मरुतांच्या बरोबर असतात असे मानलेले अनुचर असावेत असें दिसतें.

'धांवत असतां '=' प्रो आरत.' अक्षरशः अर्थ, 'धांवत आलां आहां'; म्हणजे 'आजपर्यंत धांवत आलां आहां'; अर्थात् नेहमी धांवत असतां. 'धांवत असतां.' या मंत्रांत पहिल्या अर्थात तृतीय पुरुषीं निर्देश असून पुढें लागलाच द्वितीयपुरुषनिर्देश करून पुरुषव्यतिरेक केला आहे तो ध्यानांत ठेवावा.

**उपो रथेषु पृषतीरयुग्ध्वं प्रष्टिर्वहति रोहितः ।**
**आ वो यामाय पृथिवी चिदश्रोदबीभयन्त मानुषाः ॥ ६ ॥**

उपो इति । रथेषु । पृषतीः । अयुग्ध्वम् । प्रष्टिः । वहति । रोहितः ।
आ । वः । यामाय । पृथिवी । चित् । अश्रोत् । अबीभयन्त । मानुषाः
॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. अपि च [ हे मरुतः,] [ यूयं ] [ स्व]रथेषु पृषतीः (=बिन्दुयुक्ता मृगीः) उपो अयुग्ध्वं ( =सामीप्येन अयुग्ध्वम्=परस्परं समीपं यथा भवेयुस्तथा ता युङ्क्थ ), रोहितः ( =मृगावान्तरजातिर्लोहितवर्णः ) प्रष्टिर्वहति ( =पृषतीमध्यवर्ती सन् रथं वहति ) । वो यामाय ( =गमनाय=गमनसमये मार्गदानाय ) पृथिवी चित् ( =पृथिव्यपि ) आ अश्रोत् ( =भयवशान्मार्गादपेत्य तूष्णीं भूत्वा भवतां गर्जनां शृणोति ) [ अपि च ] मानुषाः ( =मनुष्याः ) अबीभयन्त ( =भाययिता भवन्ति=बिभ्यति ) ॥

६. आणि [हे मरुतांनो,] [तुम्ही आपल्या] रथांला टिंपक्या-टिपक्यांच्या हरिणी जोडीत असतां, [आणि] तांबडा हरिण मध्यें ओढीत असतो. तुम्ही येऊं लागलां म्हणजे पृथिवी सुद्धां थक्क होऊन ऐकत असते, [आणि] मनुष्यें घाबरून जातात.

6. And on the sides [ye] yoke the spotted deer to [your] chariots, the red antelope draws in the middle. At your march even the earth [stands] aside [and] hears; men tremble through fear.

---

६. 'मरुतांच्या रथास मध्यें एक लाल हरिण जोडलेला असतो आणि बाजूंला चित्रविचित्र टिपक्यांच्या हरिणी जोडलेल्या असतात. अशा चपल वाहनांनीं ओढलेले रथ जेव्हां मोठ्या झपाट्यानें जाऊं लागतात तेव्हां खुद्द पृथ्वी भयाभीत होऊन थक्क होते आणि रथांची गर्जना ऐकत राहते. आणि बापडीं मनुष्यें तर भयानें थरथर कांपतात,' असें या मंत्राचें तात्पर्य आहे.

मरुतांच्या रथांस हरिणी जोडतात असें म्हणणें हें अगदीं योग्य आहे, कारण कीं, हरिणीसारिखें चपळ जनावर दुसरें नाहीं. आणि ज्यापेक्षां हरणांच्या कळपांत एक काळविट अथवा नर असतो आणि पळतांना त्या कळपाच्या पुढें नेहमी असतो, त्यापेक्षां मरुतांच्या रथांस जोडलेल्या हरिणींच्या मध्यभागीं पण पुढें ओढणारा असा नर असतो असें म्हणणें साहजिक आहे. म्हणजे ज्यांपुढें नर धांवत आहे अशा हरिणींच्या कळपांचा कळपच मरुतांच्या रथांस जोडलेला असतो अशी कल्पना आहे.

या मंत्राच्या भाषांतराच्या आरंभीं जो 'आणि' शब्द आहे तो 'उपो' यामधील 'उप+उ (=उत=अपि च)' या 'उ' शब्दाचा अर्थ करण्यासाठीं घातला आहे.

'तांबडा हरिण पुढें ओढित असतो'= 'प्रष्टिर्वहति रोहितः'. अक्षरशः 'तांबडा हरिण प्रष्टि होऊन ओढतो.' 'प्रष्टि' म्हणजे मध्यें जोडलेला. प्रत्येक बाजूस एक अथवा अधिक घोडे जुंपून मध्यें एक मोठासा जोडला म्हणजे त्याचें नांव 'प्रष्टि' असें आहे. हा अर्थ आम्हीं सायणाचार्यांप्रमाणें केला आहे.

'तुम्ही येऊं लागलां म्हणजे'='वो यामाय.' अक्षरशः 'तुमच्या गमनासाठीं,' 'तुम्हांस मार्ग देण्यासाठीं.' मोटी गाडी फार झपाट्यानें जाऊं लागली म्हणजे समोर येणारें मनुष्य भिऊन बाजूला होतें आणि थक्क होऊन पाहात उभें राहतें

आ वो॑ म॒क्षू तना॑य॒ कं रुद्रा॒ अवो॑ वृणीमहे ।
गन्ता॒ नूनं नोऽव॑सा॒ यथा॑ पु॒रेत्था कण्वा॑य बि॒भ्युषे॑ ॥ ७ ॥

आ । व॒ः । म॒क्षु । तना॑य । कम् । रु॒द्राः॑ । अवः॑ । वृ॒णी॒म॒हे॒ ।
गन्त॑ । नू॒नम् । न॒ः । अव॑सा । यथा॑ । पु॒रा । इ॒त्था । कण्वा॑य । बि॒भ्युषे॑ ॥ ७ ॥

यु॒ष्मेषि॑तो मरुतो॒ मर्त्ये॑षित॒ आ यो नो॒ अभ्व॒ ईष॑ते ।
वि तं यु॑योत॒ शव॑सा॒ व्योज॑सा॒ वि यु॒ष्माका॑भिरू॒तिभि॑ः ॥ ८ ॥

यु॒ष्माऽइ॑षितः । म॒रु॒तः॒ । मर्त्य॑ऽइषितः । आ । यः । न॒ः । अभ्व॑ः । ईष॑ते ।
वि । तम् । यु॒यो॒त॒ । शव॑सा । वि । ओज॑सा । वि । यु॒ष्माका॑भिः ।
ऊ॒तिऽभि॑ः ॥ ८ ॥

## भाषायाम्.

७. हे रुद्राः (=रुद्रपुत्राः), [वयं] मक्षु (=क्षिप्रं) वो (=युष्माकम्) अवः (=रक्षणं=युष्मत्कर्तृकं रक्षणं) तनाय कं (=तनयाय=अस्माकं पुत्रार्थम् एव) आ-वृणीमहे (=गृहीत्वा आगच्छतेति प्रार्थयामः)। [तस्माद्] यथा [यूयं] पुरा बिभ्युषे (=संकटाद्भीतवते) कण्वाय इत्था (सत्यं कण्वाय-कण्वायैव=सूक्तकर्तारं मां प्रत्येव) [आगतवन्तः] [तथा] नूनं (=सांप्रतं) नः (=अस्मभ्यं=अस्मान्प्रति=सूक्तकर्तारं मां कण्वं प्रति) अवसा (=युष्मत्कर्तृकेण रक्षणेन सह) गन्त (=आगच्छत)॥

८. हे मरुतः, यः अभ्वः (=अनिष्टकारी=शत्रुः) युष्मेषितः (=युष्मदिषितः=युष्माभिः प्रेरितः) मर्त्येषितः (=मर्त्यैः प्रेरितो) [वा] [सन्] नः (=अस्मान्) ऐषते (=आभिमुख्येन प्राप्नोति=अभिपतति=आक्रमति) तं शवसा (=बलेन) वियुयोत (=वियुत=विभक्तम् अपेतं कुरुत), ओजसा वि[युयोत] (तेजोहीनान् कुरुत), [अपि च] युष्माकाभिः ऊतिभिः (=युष्मत्संबन्धिभी रक्षणैः) वि[युयोत] (=अपेतं कुरुत)॥

तशी पूर्वीची अवस्था होते असें रूप आहे.

'धावरून जातात'='अबीभयन्त.' हें क्रियापद जरी प्रयोज्यधातूचें रूप आहे तथापि आत्मनेपद असल्यामुळें 'आपआपास भिवविले जाऊं देतात'='भिऊन अथवा धावरून जातात' असा अर्थ होतो.

७. हे रुद्रपुत्रांनो, [ आम्ही आमच्या ] मुलांबाळांकरितां त्वरित तुमची कृपा भाकितों आहों. [तर] [ तुम्ही ] जसे पूर्वी भयभीत कण्वाप्रत निःसंशय [ प्राप्त झालेले आहां ] तसे आतां [ आपल्या ] कृपेसहित आम्हांस प्राप्त व्हा.

८. हे मरुतांनो, जो [कोणी] शत्रु तुमच्या सूचनेवरून [अथवा] मर्त्यांच्या सूचनेवरून आमच्या आंगावर चालून येईल त्याला तुम्ही बलहीन करा, [ त्याला] तेजोहीन [करा] [आणि] [ त्याला] तुमच्या प्रसादांस मुकवा.

7. Quickly for our progeny, O sons of Rudra, we entreat your protection. Come now to us with your protection even as ye unfailingly did before to the terrified Kaṇva

8. Whatever wicked man, O Maruts, [whether] under your inspiration [or] under the inspiration of mortals, attacks us, deprive him of strength, of power [and] of your protection.

७. असे समजलें पाहिजे कीं, कांहीं प्रसंग पडल्यामुळें सूक्तकर्ता कण्व ऋषि आपल्या मुलांबाळांवर मरुतांनीं कृपा करावी म्हणून प्रार्थना करीत आहे, आणि म्हणत आहे कीं, ' हे मरुतांनो, या काळापूर्वी मला कण्वाला कांहीं संकटापासून भीति प्राप्त झाली म्हणजे मी तुमचा धांवा करितांच तुम्ही कोठें असलां तरी मजकडेस धांवून आलेले आहांत. तर आज जो हा तुमचा धांवा मी करीत आहें तो ऐकून पूर्वीप्रमाणें धांवून या, विलंब करूं नका.'

' मुलांबाळांकरितां'=' तनाय कम्.' ' कम् ' हे पादपूरण आहे, आणि ' तनाय ' याचा अक्षरशः ' मुलाला ' असा अर्थ आहे. तथापि मुलांबाळांकरितां असें जें आम्हीं भाषांतर केलें आहे त्यावरून दोनी शब्दांचा अर्थ बरोबर भरून येतो. ' कम् ' हें पादपूरण फारकरून या मंत्रांत आलें आहे तसें चतुर्थीच्या संयोगानें येत असतें.

' जसे पूर्वी भयभीत कण्वाप्रत निःसंशय [ प्राप्त झालेले आहां ]'.' म्हणजे मला प्राप्त झालेले आहां. या सूक्ताचा कर्ता कण्व नांवाचा ऋषि होय हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

' निःसंशय '=' इत्था.' म्हणजे तुम्हां मरुतांस हाक मारितांच तुम्ही कधींहि आल्याशिवाय राहिलां नाहीं. हा जो ' इत्था ' याचा ' निःसंशय ' म्हणजे ' बिनचूक ' ' खरोखर ' असा येथें अर्थ केला आहे त्याला प्रमाण ऋ. ६. ६८. ११ याजवरील भाष्य पहा. ' इत्था ' म्हणजे ' सत्यम् ' या अर्थाविषयीं प्रतिपादन पूर्वी केलेंच आहे.

८. ' हे मरुतांनो, तुमचें ' पाठबळ

**असामि हि प्रयज्यवः कण्वं दद प्रचेतसः ।**
**असामिभिर्मरुत आ न ऊतिभिर्गन्ता वृष्टिं न विद्युतः ॥ ९ ॥**

असामि । हि । प्रऽयज्यवः । कण्वम् । दद । प्रऽचेतसः ।
असामिऽभिः । मरुतः । आ । नः । ऊतिऽभिः । गन्त । वृष्टिम् । न ।
विऽद्युतः ॥ ९ ॥

**असाम्योजो बिभृथा सुदानवोऽसामि धूतयः शवः ।**
**ऋषिद्विषे मरुतः परिमन्यव इषुं न सृजत द्विषम् ॥१०॥१९॥**

असामि । ओजः । बिभृथ । सुऽदानवः । असामि । धूतयः । शवः ।
ऋषिऽद्विषे । मरुतः । परिऽमन्यवे । इषुम् । न । सृजत । द्विषम् ।
॥ १० ॥ १९ ॥

## भाषायाम्.

९. हि (=यस्मात्) हे प्रयज्यवः (=प्रकर्षेण यष्टव्याः) प्रचेतसः (=प्रकृष्टज्ञानयुक्ता) मरुतः, [यूयं] कण्वम् (=एतन्नामकम् ऋषिम्) असामि (=संपूर्णमेव यथा भवति तथा) दद (=धारितवन्तः) [तस्माद्] असामिभिरूतिभिः (=संपूर्णैर्युष्मत्संबन्धिभिः संरक्षणैः) नः (=अस्मान् प्रति), विद्युतो वृष्टिं न (=यथा विद्युतो मेघवृष्टिं गच्छन्ति तद्वद्), आगन्त (आगच्छत) ॥

१०. हे सुदानवः (=शोभनदानोपेता) [मरुतः], [यूयम्] असामि (=संपूर्णम्) ओजः (=शक्तिं) विभृथ (=धारयथ=युष्मासु परिपूर्णा शक्तिर्वर्तते)। हे धूतयः (=कम्पनकारिणो) [मरुतः], [यूयम्] असामि शवः (=संपूर्णं बलं) [विभृथ=युष्मासु परिपूर्णं बलं वर्तते]। [तर्हि] हे मरुतः, परिमन्यवे (=कोपपरिवृताय=क्रुद्धाय) ऋषिद्विषे (=ऋषेर्मम द्वेषं कुर्वते) [तन्नाशार्थम्] इषुं न (बाणमिव) द्विषं (=द्वेषकारिणं हन्तारं) सृजत (=प्रेषयत) ॥

मिळाल्यानें अथवा कोणा एकाद्या बलवान् मर्त्याचें पाठबळ मिळाल्यानें जर कोणी दुष्ट मनुष्य आमच्यावर हल्ला करील तर तुम्ही त्याची सर्व शक्ति आणि सर्व तेज हरण करा. आणि त्याचें संरक्षण करण्याचें तुम्ही सोडून द्या,' असें या मंत्राचें तात्पर्य आहे. यांत इतकें ध्यानांत ठेवणें अवश्य दिसतें कीं मरुतांसारिखे प्रचंड देव जसे एक मनुष्याकडून दुसरे मनुष्यास उपद्रव करवितात तसेंच ते स्तुति केल्यावर तो उपद्रव बंद करितील अशी सूक्तकर्त्याची श्रद्धा दिसते.

'तुमच्या सूचनेवरून' ='युष्मेषितः'.

९. हे अतिपूज्य [आणि] प्रज्ञावंत मरुतांनो, [ज्यापेक्षां] [तुम्ही] कण्वाला पूर्णपणें रक्षीत आलां आहां त्यापेक्षां [तुम्ही आपल्या] पूर्ण प्रसादांसहित, विद्युल्लता [मेघ] वृष्टीप्रत [ येतात ] तसे, आम्हांप्रत या.

१०. हे महादानशील [आणि] हे कंपविणारे [ मरुत् ] हो, तुमच्या अंगीं परिपूर्ण तेज [आणि] परिपूर्ण बल आहे. [यास्तव] हे मरुत् हो, [जो कोणी] क्रोधाविष्ट मनुष्य [मज] ऋषीचा द्वेष्टा [असेल] त्याच्या नाशासाठीं, [तुम्ही] बाण [धाडल्या]प्रमाणें द्वेष्टा धाडा.

9. Ye have, O most worshipful [and] wise Maruts, entirely supported Kaṇva; come ye, therefore, unto us with [ your ] entire protections even as the flashes of lightning [come] to the shower.

10. O most liberal givers, O agitators, ye possess perfect puisance [and] perfect power. Send [therefore] against the angry enemy of the poet an enemy like a shaft [ for his destruction].

अक्षरशः अर्थ ‘ तुम्हीं प्रेरिलेला असा होत्साता,’ म्हणजे, तुम्हीं ज्याला उत्तेजन दिलें आहे असा.

‘आमच्या अंगावर चालून येईल ’– ‘आ ईषते.’ हा अर्थ फार अक्षरशः आहे. ‘आम्हांस उपद्रव करील ’ असें तात्पर्य.

९. तात्पर्य: ‘ हे मरुतांनो, जसें तुम्हीं कण्वाचें संरक्षण पूर्णपणें पूर्वी केलें तसेंच आमचें संरक्षण पूर्णपणें करा, आणि जशी मेघवृष्टीबरोबर वीज चिकटून राहते तसेच तुम्ही आमचें पाठबळ करण्यासाठीं आम्हांबरोबर राहा.’ अथवा ज्या कण्वाचें संरक्षण मरुतांनीं आजपर्यंत केलें तो कण्व आणि या सूक्ताचा जो कर्ता कण्व हे एकच असल्यास, ‘ हे मरुतांनो, तुम्ही आजपर्यंत आमचें म्हणजे मज कण्वाचें ज्यापेक्षां पूर्णपणें प्रतिपालन केलें आहे त्यापेक्षां आतांहि तसेंच करा ’ असा भावार्थ समजावा.

‘विद्युल्लता इ० ’ ही उपमा ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. विद्युल्लता आणि मेघवृष्टि यांचा संयोग कधीं तुटण्याजोगा नसतो म्हणून उपमेंत विशेष गौरव आहे.

१०. या मंत्रांत सगळ्या सूक्ताचा उपसंहार असल्यामुळें ऋषीच्या मनांत जें वरप्रदान मागावयाचें तें यांत मागितलें आहे. तो म्हणतो, ‘ हे मरुतांनो, तुमच्या अंगीं संपूर्ण तेज आणि संपूर्ण बल

## सूक्तम् ४०.

घोरपुत्रः कण्व ऋषिः । ब्रह्मणस्पतिर्देवता । बृहती च्छन्दः ।

**उत्तिष्ठ ब्रह्मणस्पते देवयन्तस्त्वेमहे ।**

**उप प्र यन्तु मरुतः सुदानव इन्द्र प्राशूर्भवा सचा ॥ १ ॥**

उत् । तिष्ठ । ब्रह्मणः । पते । देवऽयन्तः । त्वा । ईमहे ।

उप । प्र । यन्तु । मरुतः । सुऽदानवः । इन्द्र । प्राशूः । भव । सचा ॥ १

### भाषायाम्.

१. हे ब्रह्मणस्पते (=एतन्नामक देव), [त्वम्] उत्तिष्ठ (=सोमप्राशनार्थम् अस्मद्गृहम् आगन्तुं त्वदीयनिवासस्थानादुत्थानं कुरु) । [वयं हि] देवयन्तः (=देवान् त्वादृशान् कामयमानाः सन्तः = भक्तिभावयुक्ताः सन्तः) त्वाम् ईमहे (=प्रार्थयामः) । [अपि च] सुदानवः (=शोभनदानोपेता) मरुतः [अपि] उपप्रयन्तु (=प्रस्थाय अत्र आगच्छन्तु) । [तथा] हे इन्द्र, [त्वमपि] [आगत्य] सचा (=तैः सह) प्राशूर्भव (=अस्माभिर्दत्तसोमस्य प्राशको भव) ॥

आहे; यास्तव मज ऋषीचा द्वेष करणारा जो कोणी शत्रु असेल आणि मजविषयीं ज्याच्या मनांत क्रोध असेल त्याजकारणें तुम्ही एक शत्रु निष्पन्न करा, कीं जो लागलाच बाणाप्रमाणें त्याजवर जाईल आणि त्याचा नाश करील.' सूक्ताच्या शेवटील मंत्रांत जो उपसंहार असतो त्यांत यजमानाचें अथवा सूक्त करणाऱ्या ऋषीचें म्हणजे कवीचें कांहींतरी बरें व्हावें अथवा संकट निवारण व्हावें अशी प्रार्थना असते. प्रस्तुत मंत्रांत सूक्त रचणाऱ्या कवीचें कल्याण व्हावें असें वरप्रदान मागितलें आहे तें ध्यानांत ठेवावें.

'महादानशील'= 'सुदानवः'. ज्याजकडून कांहीं तरी मागून घ्यावयाचें असतें त्याला हें अथवा असलें विशेषण लावणें हें साहजिक आहे. मरुतांस तर 'सुदानु' हें विशेषण वेदांत अनेक ठिकाणीं लाविलेलें आढळतें. ऋ. १. २३. ९; १. ४०. १; १. ४४. १४ इत्यादि मंत्र पहा. ते आकाशांतून पुष्कळ मेघवृष्टि करितात म्हणून त्यांस 'सुदानु' असें म्हणतात असेंहि दिसतें.

'कंपविणारे'='धूतयः.' हें मरुतांचें अनेक ठिकाणीं येणारें विशेषनामासारिखें झालेलें विशेषण आहे. ते जाऊं लागले म्हणजे सर्व वस्तुमात्रास हालवून टाकितात म्हणून त्यांस 'कंपविणारे' हें विशेषण लावितात. वर ३ रा व ५ वा मंत्र पाहा.

या मंत्राच्या शेवटीं जी प्रार्थना आहे तिजवरून असें सूचतें कीं, हाल्लीं समजत असल्याप्रमाणें पुरातन ऋषींस आपल्या शापानें पाहिजे तें करण्याची जर शक्ति खरोखर असती, तर आपल्या मर्त्य शत्रूपासून आपलें संरक्षण करण्याविषयीं या सूक्त करणाऱ्या ऋषीनें मरुतांची अशी साधारण यःकश्चित् बलहीन मर्त्याप्रमाणें विनवणी कां केली असती?

## सूक्त ४०.

ऋषि—घोराचा पुत्र कण्व (पूर्वींच्या सूक्ताचा जो तोच). देवता—ब्रह्मणस्पति. वृत्त—सम ऋचा आहेत त्यांचें सतोबृहती; विषम आहेत त्यांचें वृत्त बृहती.

१. हे ब्रह्मणस्पती, [तूं ऊठ], [आम्ही] भाविक बुद्धीनें तुला प्रार्थीत आहों. महादानशील मरुत्[हि] येओत, [आणि] हे इंद्रा, [तूंहि] [त्यांज]बरोबर [येऊन] [सोम] प्राशन कर.

## Hymn 40.

To *Brahmanaspati*. By *Kaṇva*, son of *Ghora*, the same as the author of the previous hymn. Metre—the *Satobṛihatî* of those that are even (2, 4, 6, 8,) and the *Bṛihatî* of the uneven ones (1,3,5,7).

1. Rise, Brahmanaspati, we pray thee with pious minds. May the liberal Maruts [also] come up [with thee]; and be thou, too, Indra, a guest along with [them].

---

१. हेंहि सूक्त कण्वानेंच केलेलें आहे. याची देवता ब्रह्मणस्पति म्हणून देव आहे. या देवाविषयीं पूर्वीं १४ व्या सूक्ताच्या ३ ऱ्या मंत्रावरील टीपेत दिग्दर्शन केलें आहे तें पाहा. ब्रह्मणस्पति हा देव वेदांत मोठ्या महत्त्वाचा आहे.

या पहिल्या मंत्राचा भावार्थ इतकाच आहे कीं, 'हे ब्रह्मणस्पती, आम्ही भाविक बुद्धीनें सोम तयार केला आहे आणि येऊन तो पिण्याविषयीं तुला प्रार्थीत आहों, तर तूं ऊठ, आणि लौकर येऊन तो पी; आणि तुजबरोबर मरुत् देव आणि इंद्र हेहि येऊन आमचा सोम पिओत.'

'भाविक बुद्धीनें'='देवयन्तः.' अक्षरशः अर्थ 'देवांविषयीं उत्सुक,' 'देवांची सेवा करून त्यांस प्रसन्न करून घेण्याविषयीं उत्सुक' असा आहे; म्हणजे आम्ही तुमची निंदा करणारे आणि दांभिक नव्हेत, प्रांजल आहोंत. जे मनुष्य देवांची सेवा अथवा भक्ति न करणारे म्हणजे धर्मरहित होत त्यांस वेदांत 'अदेवयन्तः' अथवा 'अदेवयु' असें म्हटलें आहे (ऋ. २. २६. १; ८. ९७. ३; ७. ९३. ५. इत्यादि मंत्र पहा).

'[सोम] प्राशन कर' 'प्राशूर्भव.' अक्षरशः अर्थ 'प्राशन करणारा हो,' म्हणजे 'आमचा पाहुणा हो.'

त्वामिद्धि संहसस्पुत्र मर्त्यं उपब्रूते धने हिते ।
सुवीर्यं मरुत आ स्वश्व्यं दधीत यो व आचके ॥ २ ॥

त्वाम् । इत् । हि । सहसः । पुत्र । मर्त्यः । उपऽब्रूते । धने । हिते ।
सुऽवीर्यम् । मरुतः । आ । सुऽअश्व्यम् । दधीत । यः । वः । आऽचके ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. हि ( यस्मात् ) हे सहसस्पुत्र (=बलस्य सूनो ) [ ब्रह्मणस्पते], धने हिते (=धननिमित्ते संग्रामे प्राप्ते सति ) मर्त्यः त्वामित् (=त्वामेव) उपब्रूते (=समीपं प्राप्य स्तौति) । [ तथा ] हे मरुतः, यो [मर्त्यो] वो (=युष्मान् ) आचके (=प्रार्थयते) [स] सुवीर्यं (=शौर्योपेतपुत्रवत्त्वं ) सुअश्व्यं (=शोभनाश्वयुक्तत्वं) [ च ] आदधीत (=धारयेत्= निःसंशयं प्राप्नुयात् ) ॥

ब्रह्मणस्पतेरग्निना सह एकभूतत्वात् तस्य सहस्पुत्रत्वमित्यनुसंधेयम् । अथवा आग्नेयीयम् ॥

२. कारण कीं हे बलपुत्रा [ ब्रह्मणस्पती ], युद्धप्रसंग पडला म्हणजे मर्त्य तुझाच धांवा करित असतो. [आणि] हे मरुतांनो, जो [कोण] तुम्हांस प्रार्थील तो शौर्यवान् पुत्र [ आणि ] बलवान् घोडे यांहींयुक्त अशा संपत्तीप्रत पावेल.

2. O [ Brahmaṇaspati], son of might, to thee alone the mortal resorts when a battle is imminent. [And] O Maruts, [he] who prays to you shall obtain brave sons [and] strong horses.

२. ब्रह्मणस्पतीला आणि मरुतांला सोमपानार्थ पूर्वील मंत्रांत आमंत्रण केलें त्याचें कारण या मंत्रांत दिलें आहे. तें हें कीं, 'युद्धप्रसंग पडला म्हणजे बलहीन आणि दीन मानव धांवा करितात तो ब्रह्मणस्पतीचाच करितात; आणि मरुतांचा तर पराक्रम असा आहे कीं जो मर्त्य त्यांची प्रार्थना करितो त्याला युद्धप्रसंगीं उपयोगी असे शूर पुत्र आणि बळकट घोडे प्राप्त होत असतात.' यास्तवच यांस आम्ही सोम अर्पण करून तो प्यावयास या असें प्रार्थीत आहों हा भावार्थ आहे.

'बलपुत्रा [ब्रह्मणस्पती]'= 'सहसस्पुत्र.' 'सहसस्पुत्र' हें विशेषण वेदांत अग्नीला लाविलेलें आढळतें ( बळानें लांकडावर लांकूड घांसून अग्नि प्रदीप्त करीत असत म्हणून ), इतर देवांस लाविलेलें आढळत नाहीं. परंतु या ठिकाणीं ब्रह्मणस्पतीस लाविलें आहे त्याचें कारण इतकेंच कीं अग्नि आणि ब्रह्मणस्पति हे एकच आहेत असें कितीएक मंत्रांवरून दिसून येतें. अथवा निर्वाह करण्याची दुसरी अशी रीति दिसते कीं हा मंत्र अग्निदेवतेविषयींच आहे असें मानावें म्हणजे झालें.

'युद्धप्रसंग पडला म्हणजे'= 'धने हिते.' याच अर्थी 'धने हिते' हे शब्द वेदांत अन्य ठिकाणींहि सात आठ वेळ आले आहेत ( ऋ. १. ११६. १५; १. १३२. ५; ६. ४५. ११, १३ इत्यादि ). सायणाचार्यांचाहि भावार्थ आमच्या अर्थाप्रमाणें आहे.

'प्रार्थील'= 'आचके'. अक्षरशः 'प्रार्थितो,' 'स्तवितो.' 'कै' शब्दे, या धातूचें रूप आहे.

'शौर्यवान् पुत्र [आणि] बलवान् घोडे यांहीं युक्त अशा संपत्तीप्रत'= 'सुवीर्यं सुअश्व्यम्.' म्हणजे जींत सुवीर अशा पुत्रांची आणि बळकट अशा घोड्यांची विपुळता आहे अशी स्थिति. देवांपासून जे पदार्थ मिळतील अथवा मिळणें इष्ट आहे असें आमचे पूर्वज समजत त्यांत आणि आतां आम्ही मागतों त्यांत किती अंतर आहे पहा! लढावयास शूरपुत्र आणि बसावयास बळकट घोडे देवानें आपणास द्यावे असा वर मागणारे ब्राह्मण आतां कितीसे निघतील बरें?

प्रैतु ब्रह्मणस्पतिः प्र देव्येतु सूनृता ।
अच्छा वीरं नर्यं पङ्क्तिराधसं देवा यज्ञं नयन्तु नः ॥ ३ ॥

प्र । एतु । ब्रह्मणः । पतिः । प्र । देवी । एतु । सूनृता ।
अच्छ । वीरम् । नर्यम् । पङ्क्तिऽराधसम् । देवाः । यज्ञम् । नयन्तु । नः
॥ ३ ॥

---

**भाषायाम्.**

३. ब्रह्मणस्पतिः प्रैतु (=अस्मान् प्राप्नोतु), सूनृता देवी (=प्रियसत्यरूपा वाग्देवी, सरस्वती?) प्रैतु (=अस्मान् प्राप्नोतु) । [ तथा ] देवाः (=इतरे मित्रावरुणादयो) नर्यं वीरं (=नृभ्यो हितं शूरम् =इन्द्रं ) नः (=अस्माकं ) पङ्क्तिराधसं (=हविष्पञ्चकसमृद्धं =पञ्चोपलक्षितबहुभिर्हविर्भिर्युक्तं ) यज्ञं [ प्रति ] अच्छनयन्तु (=प्रापयन्तु= आनयन्तु ) ॥

ब्रह्मणस्पतिरागच्छतु । तथा सरस्वत्यागच्छतु । अपि च अस्माकं यज्ञे प्रापितनानाविधहविःप्राशनाय इन्द्रं गृहीत्वा इतरे देवा अपि आगच्छन्त्विति भावः ॥

३. येओ [तो] ब्रह्मणस्पति, येओ ती देवी सरस्वती; [आणि] मनुष्यांस हितकारी [ असा जो ] शूर [इंद्र] त्याला देव आमच्या पंचान्नयुक्त यज्ञाप्रत घेऊन येओत.

3. May Brahmaṇaspati come unto [us]; may the gentle goddess [of speech] come unto [us]; may the gods bring to our five-oblationed sacrifice the hero ( Indra ) who is kind to men.

---

३. ‘ ब्रह्मणस्पति येओ, सरस्वती येओ, आणि इंद्रास घेऊन इतर देवहि येओत आणि अनेक हविरन्नांनी युक्त जो हा आमचा यज्ञ त्याचा उपभोग घेओत’ असा भावार्थ.

‘येओ [ ती ] देवी सरस्वती ’= ‘ प्र देव्येतु सूनृता.’ अक्षरशः अर्थ. ‘ मधुरवचनी देवी येओ.’ म्हणजे येथें सरस्वतीच विवक्षित आहे यांत संशय नाहीं. ऋ. १. ३. १०, ११; २. ३. ८ आणि ६. ६१. ४ यावरून ‘ मधुरवचनी ’ सूक्ताची प्रेरणा ती करिते असें सिद्ध होतें. आणि प्रार्थनाभिमानी जो ब्रह्मणस्पति देव त्याजबरोबर तिचें आह्वान होणें हें स्वाभाविक आहे. सायणाचार्य तरी ‘वाग्देवता ’ असें म्हणतात तें, कितेक विद्वानांचें मत विरुद्ध आढळतें तरी, आम्हांस योग्य दिसतें.

‘ मनुष्यांस हितकारी [ असा जो ] शूर [ इन्द्र ] त्याला ’= ‘‘ वीरं नर्यम्.’ यांत ‘ इन्द्र ’ हें आम्हीं अर्थावरून अध्याहृत घेतलें आहे. इंद्राला ‘ नर्य ’ असें पुष्कळ ठिकाणीं वेदांत म्हटलें आहे (ऋ. १. ६३. ३; १. १२१. १२; ४. २९. २; ७ २०. १; १०. २९. १ हे मंत्र पहा). शिवाय ‘ तनुरिर्वीरो नर्यो विचेताः श्रोता हवं गृणतः ’ (ऋ. ६. २४. २). असा मंत्र आहे त्यांत ‘इंद्र’ असें पद नसतांहि ‘ वीरो नर्यः ’ म्हणजे ‘ इंद्र ’ असा अर्थ सायणांनीच केला आहे तो पहा.

‘ पंचान्नयुक्त यज्ञाप्रत ’= ‘ पङ्क्तिराधसं यज्ञम्.’ पांच अन्नें कोणतीं? आलीकडे पंचपक्वान्नें म्हणतात तीं कदाचित् नसतील; परंतु ‘ पांच ’ हें उपलक्षण समजून ‘ अनेक हविरन्नांनी युक्त ’ असा अर्थ दिसतो. ‘ पङ्क्तिराधसम् ’ हें ‘ अनेक वरप्रदानें देणारा ’ या अर्थी ‘ वीरम् ’ (=इंद्र) याचें विशेषणहि चांगलें संभवतें. ऋ. ७. २३. ५ यांत इंद्रास आणि ऋ. ५. ५८. २ यांत मरूतांस ‘ तुविराधस्,’ म्हणजे पुष्कळ वरप्रदानें देणारे असें म्हटलें आहे.

‘ घेऊन येओत ’= ‘ अच्छ नयन्तु.’ ‘ °प्रत प्राप्त करोत,’ ‘ आणोत. ’ ‘ अच्छ ’ याचा अर्थ वेदांत ‘ आ ’ या उपसर्गाप्रमाणें होतो. उदाहरणार्थः– ‘ स तु नो अग्निर्नयतु प्रजानन्नच्छ रत्नम् ’ (ऋ. ४. १. १०. )= ‘ तो बुद्धिमान्

यो वाघते ददाति सूनरं वसु स धत्ते अक्षिति श्रवः ।
तस्मा इळां सुवीरामा यजामहे सुप्रतूर्तिमनेहसम् ॥ ४ ॥

यः । वाघते । ददाति । सूनरम् । वसु । सः । धत्ते । अक्षिति । श्रवः ।
तस्मै । इळाम् । सुवीराम् । आ । यजामहे । सुऽप्रतूर्तिम् । अनेहसम् ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. यो [ यजमानो ] वाघते ( =ऋत्विजे ) सूनरं वसु ( =सुन्दरं धनं) ददाति सः अक्षिति श्रवः (=क्षयरहिताम् अखण्डितां संपदं ) धत्ते (=प्राप्नोति ) । तस्मै (=एतादृशे अस्माकं यजमानाय) [ वयं ] सुवीरां (=शोभनवीरोपेतां=सुवीराणां दात्रीं ) सुप्रतूर्तिं (=सुष्ठु प्रकर्षेण हिंसाकारिणीं=शत्रूणामभिभवित्रीम्) अनेहसं ( =केनाप्यहिंस्याम् ) इळाम् (=एतन्नामधेयां देवीम्) आयजामहे (=यजनेन प्रसादयामः)॥

अग्नि आम्हांला संपत्ति आणो, ( किंवा संपत्तीप्रत आम्हांस प्राप्त करो );' ' अच्छा न नः सुम्नं नेषि ' (ऋ. ८. १६. १२)= ' आम्हांस सुखाप्रत प्राप्त करा, आम्हांस सुख प्राप्त करून द्या.' द्वितीयार्धाचा, 'देव आमचा.यज्ञ इंद्राकडेस घेऊन जाओत' असा कितीएक विद्वान् अर्थ करितात, पण इंद्राला यज्ञाप्रत आणणें ही प्रार्थना देवांला केलेली वेदांत आढळते, देवांनीं यज्ञाप्रत हवि इंद्राकडेस घेऊन जावें अशी बहुत करून आढळत नाहीं असें आम्हांस वाटतें.

४. जो [ यजमान ] स्तोत्रकर्त्याला सुंदर धन देतो तो अखण्ड संपत्तीप्रत पावतो. तर या [ आमच्या ] यजमानासाठीं [आम्ही] सुवीरयुक्त [आणि] शत्रुपराजय करणारी [परंतु दुसऱ्यांकडून] पराजय न पावणारी [जी] इळा [ देवी ] तिची उपासना करितों.

4. He who gives handsome largesses to the priest receives endless wealth. For such a one, therefore, we propitiate Ilâ, possessed of heroes, [ and ] overpowering, [but herself] un-overpowered.

---

४. भावार्थः—'आम्हांसारिख्या ऋत्विजांला जो यजमान चांगलें धन देतो त्याला अखण्डित लक्ष्मी प्राप्त होते. म्हणून हा जो आमचा यजमान त्याच्या हितासाठीं आम्ही इळा देवीला आपल्या ऋत्विजपणानें प्रसन्न करीत आहों, जी इळा देवी शूरपुत्र देणारी, शत्रूंतें नष्ट करणारी आणि शत्रूपासून नाश न होऊं देणारी अशी आहे. तर या यजमानानें आम्हांस धन दिलें म्हणजे त्यालाहि अखण्डित लक्ष्मी प्राप्त होईल.'

'इळा [देवी]' ही कोण आहे याजविषयीं पूर्वीं १३ वे सूक्ताच्या ९ व्या मंत्रावर दिलेली टीप पहा. वरच्या मंत्रांत सरस्वतीला उद्देशून सांगितलें, यांत इळेविषयीं सांगत आहे. जे कितीएक विद्वान् 'इळा' म्हणजे या मंत्रांत इळा देवी न समजतां 'अन्न' असें समजतात ते निराधार आहेत असें आम्हांस दिसतें. आम्हांस सायणाचार्यांचा अर्थ बरोबर दिसल्यामुळें तो आम्हीं घेतला आहे.

ह्या मंत्राविषयीं असें सांगणें अवश्य दिसतें कीं हा जरी कण्वकृत सूक्तांत आहे तरी तो खुद्द कण्वानेंच रचिला असेल असें समजलें पाहिजे असें नाहीं. जेव्हां वेदव्यासानें सूक्तें एकत्र करून संहितारूपानें गाथा बांधला तेव्हां हें सूक्त इतर सूक्तांबरोबर कण्व कुळांतून घेतलें इतकेंच निश्चयानें सांगतां येईल. म्हणून हें सूक्त कण्वांकरितां त्यांच्या पुरोहितानें अथवा दुसऱ्या कोणत्याहि ऋत्विजानें रचिलें असावें. असें मनांत आणिलें तर हा मंत्र समजण्यास कांहीं कठिण नाहीं.

दुसरी ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट अशी कीं, या मंत्राचा कर्ता ( अथवा पाहिजे असल्यास द्रष्टा ) कोणीहि ऋषि असला तरी वेदांचे द्रष्टे ऋषि तपःसिद्ध सर्व ऋद्धिसिद्धींचे स्वामी असत अशी जी आलीकडे आमची समजूत झाली आहे ती निराधार दिसते. वस्तुतः ते

प्र नूनं ब्रह्मणस्पतिर्मन्त्रं वदत्युक्थ्यम् ।
यस्मिन्निन्द्रो वरुणो मित्रो अर्यमा देवा ओकांसि चक्रिरे ॥५॥
॥ २० ॥

प्र । नूनम् । ब्रह्मणः । पतिः । मन्त्रम् । वदति । उक्थ्यम् ।
यस्मिन् । इन्द्रः । वरुणः । मित्रः । अर्यमा । देवाः । ओकांसि । चक्रिरे
॥ ५ ॥ २० ॥

तमिद्वोचेमा विदथेषु शंभुवं मन्त्रं देवा अनेहसम् ।
इमां च वाचं प्रतिहर्यथा नरो विश्वेद्वामा वो अश्नवत् ॥ ६ ॥

तम् । इत् । वोचेम । विदथेषु । शंऽभुवम् । मन्त्रम् । देवाः। अनेहसम् ।
इमाम् । च । वाचम् । प्रतिऽहर्यथ । नरः । विश्वा । इत् । वामा । वः।
अश्नवत् ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. नूनम् (=इदानीं) ब्रह्मणस्पतिः उक्थ्यं (=शंसनीयं=स्तुत्यं) मन्त्रं प्रवदति (=होतृमुखे स्थितः सन् प्रकर्षेण वदिष्यति) । यस्मिन् [मन्त्रे] इन्द्रः, वरुणः, मित्रः, अर्यमा [इत्येते] देवाः ओकांसि चक्रिरे (=सेव्यत्वेन स्थानानि कुर्वन्ति=आनन्देन रमन्ते) ॥

६. हे देवाः (=इन्द्रप्रभृतयः), तम् इत् (=तमेव पूर्वमन्त्रोक्तं) शंभुवं (=सुखकारकम्) अनेहसं (=दोषरहितं) मन्त्रं [वयं] [युष्मत्प्रीत्यर्थं] वोचेम (=ब्रवाम=प्रवदिष्यामः) । [ताम्] इमां वाचं (=तं मन्त्रं) [यूयं] प्रतिहर्यथ च (=कामयध्वे चेत्=प्रतिगृह्णीथ चेत्) [सा मन्त्ररूपा वाग्] वः (=युष्माकं=युष्माभिः स्तोतृभ्यो दातव्यानि) विश्वानि वामानि इत् (=सर्वाण्यपि धनानि) अश्नवत् (प्राप्नुयात्=निःसंशयं प्राप्स्यति) ॥

---

आम्हां पाप्यांपेक्षां फार प्रेमळ, देवांविषयीं प्रांजळ आणि धर्मवासनांनीं परिपूत होते. परंतु मनुष्यांवर, सृष्टपदार्थांवर अथवा देवांवर आम्हांपेक्षां त्यांस अधिक शक्ति होती अथवा आम्हांस ज्या लोभादिक वासना बाधा करितात त्यांपासून ते मुक्त होते असें दिसत नाहीं. कारण की तसें असतें तर यजमानासाठीं सूक्तें रचून त्यांच्या द्वारें देवांची आराधना करावी आणि त्या कामाबद्दल दक्षिणा घ्यावी असें आचरण त्यांनीं केलें नसतें.

५. आतां ब्रह्मणस्पति प्रशंसनीय मंत्र म्हणेल; ज्या [मंत्रां]त इंद्र, वरुण, मित्र, [आणि] अर्यमा [हे] देव रत होत असतात.

६. आणि हे देव हो, तोच आनंदकारक [आणि] निर्दोष मंत्र [आम्ही] यज्ञांत म्हणणार आहोंत; [आणि] हे शूर [ देवांनो ], तें स्तोत्र तुम्हांस आवडलें म्हणजे त्याच्या योगानें तुम्हांकडून संपूर्ण संपत्ति आ[म्हांस] मिळेल यांत संशय नाहीं.

5. Now [ now ] Brahmaṇaspati will sing forth a praiseworthy prayer in which the gods Indra, Varuṇa, Mitra [and] Aryamâ are accustomed to pause with delight.

6. That same delightful [ and ] faultless prayer we will sing, O gods, in our sacrifices. [And], O brave ones, if you accept that prayer, [ it ] shall [ certainly ] obtain all the wealth whatsoever that you can bestow.

---

५. भावार्थः– 'ब्रह्मणस्पति आमचें आह्वान ऐकून आला आहे; तो आतां सुंदर मंत्र गाईल, म्हणजे होत्याच्या मुखानें गावचील; कीं जो मंत्र ऐकल्याबरोबर इंद्र, वरुण, मित्र आणि अर्यमा यांस इतका आनंद होईल कीं ते त्या मंत्राला सोडून जाणार नाहींत; जेथें तो मंत्र तेथेंच जणुं ते घर करून राहतील.'

ब्रह्मणस्पति म्हणजे स्तोत्राची देवता. तेव्हां ब्रह्मणस्पति आतां आम्हांकरितां मंत्र म्हणेल या रूपकांत विशेष ओढाताण नाहीं हें सांगावयास नकोच. ब्रह्मणस्पति सुंदर मंत्र रचण्याविषयींची प्रेरणा आणि शक्ति आम्हांस आतां देईल आणि इंद्र, मित्र, वरुण आणि अर्यमा, या महान् देवांस फार आवडे असा मंत्र आतां आम्ही रचूं असें बोलण्याचें तात्पर्य आहे.

'म्हणेल'=' प्रवदति.' अक्षरशः अर्थ, 'म्हणतो;' 'हा पहा म्हणण्यास तयार होत आहे'.

मित्र आणि अर्यमा व वरुण या देवांविषयीं पूर्वी सांगितलेंच आहे. ( सूक्त २६, मं. ४ इत्यादि स्थलें पहा).

'रत होत असतात' = 'ओकांसि चक्रिरे.' अक्षरशः अर्थ 'घर करिते झाले आहेत'; म्हणजे जो ऐकून ते या पूर्वी त्यांत जणुं काय घर करूनच राहिले आहेत. यापूर्वी ब्रह्मणस्पति जेव्हां जेव्हां चांगला मंत्र गाई तेव्हां तेव्हां तो मंत्र त्यांस आवडत असे. पूर्णवर्तमानकाळाचा अर्थ वेदांत रीतिवर्तमानकाळाप्रमाणें करावा लागतो याविषयीं पूर्वी सांगितलेंच आहे व उदाहरणेंहि आलीं आहेत. 'ओकः' या शब्दाचा जो या मंत्रांत प्रयोग आहे त्याजवर ऋ.२.१९.१ हा मंत्र आणि त्यावरील सायणभाष्य पहा.

६. 'आम्हांकरितां जो उत्कृष्ट मंत्र

**को देवयन्तमश्नवज्जनं को वृक्तबर्हिषम् ।**
**प्रप्र दाश्वान्पस्त्याभिरस्थितान्तर्वावत्क्षयं दधे ॥ ७ ॥**

कः । देवऽयन्तम् । अश्नवत् । जनम् । कः । वृक्तऽबर्हिषम् ।
प्रऽप्र । दाश्वान् । पस्त्याभिः । अस्थित । अन्तःऽवावत् । क्षयम् । दधे ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. देवयन्तं (=देवान् कामयमानं=देवार्चनं कुर्वन्तं ) [ मानवं ] कोश्नवत् (=को नाम प्राप्नुयात्=कस्तस्य सदृशो भवितुं शक्नुयात्)? वृक्तबर्हिषं जनम् (=अनुष्ठानाय च्छिन्नबर्हिषं यजमानं) कः [ अश्नवत् ] (=तस्य सदृशो भवितुं कः शक्नुयात् )? दाश्वान् (=हविर्दत्तवान् ) [ जनो हि] पस्त्याभिः प्रप्रास्थित (= अनेकैर्गृहैः = परिस्थीयते=परिवेष्ट्यते) [ तथा सः] अन्तर्वावत् क्षयं (=पस्त्यानाम् अन्तः स्वनिवासस्थानं =हर्म्यं ) दधे (=धारयति ) ॥

ब्रह्मणस्पति रचील म्हणून वरील मंत्रांत सांगितलें तोच मंत्र, हे देव हो, आम्ही यज्ञांत तुम्हांसाठीं म्हणणार आहों. आणि तो मंत्र तुम्हांस आवडून त्याचा तुम्ही स्वीकार मात्र केला पाहिजे, म्हणजे मग तुम्हांकडून जी जी म्हणून संपत्ति उपासकांस मिळत असते ती सर्वहि आम्हांस त्या मंत्राच्या द्वारें मिळेल' असा भावार्थ आहे.

'शूर [देवांनो]'= 'नरः.' या विशेषणांत कांहीं विशेष हेतु आहे असें नाहीं. केवळ गौरवासाठीं योजिलें आहे असें दिसतें.

' तें स्तोत्र तुम्हांस आवडलें ' इ०. या उत्तरार्धाचा अर्थ आम्ही स्पष्टपणासाठीं किंचित् अक्षर सोडून केला आहे. अक्षरशः अर्थ ' हे शूरांनो, ती वाणी तुम्हांस आवडली म्हणजे [ ती ] तुमचीं (= तुम्हां देत असतां तीं ) सर्वहि धनें प्राप्त करून घेईल', असा होईल. सायणाचार्य या उत्तरार्धाचा अर्थ किंचित् निराळा करितात. तो असाः— "हे नर ( नायक ) देव हो, जर ही मंत्ररूप वाणी " तुम्हांस आवडेल तर सर्वहि सुंदर वा- "र्णी तुम्हांस व्यापील," म्हणजे हें स्तोत्र जर तुम्ही स्वीकारून घ्याल तर आम्हांस जीं जीं म्हणून सुंदर स्तोत्रें रचतां येतील तीं रचून तुम्हांसच अर्पण करूं असा त्यांचा भावार्थ दिसतो. परंतु त्यांच्या अर्थाला ' वाक् ' (=वाणी) हें पद अध्याहृत घेण्याची अपेक्षा आहे. शिवाय ' विश्वा वामा ' ( अथवा ' विश्वानि वामानि') हे शब्द ' सर्व धनें ' या अर्थी अनेक वेळां ऋग्वेदांत आले आहेत, आणि

७. देवभक्ताची बरोबरी कोण करूं शकेल? देवार्चन करणाऱ्या जनाची [बरोबरी] कोण [करूं शकेल]? [कारण कीं] [देवांचा] उपासक [अनेक] गृहांनीं परिवेष्टित असतो [आणि] त्याला [स्वताहाला] राहण्यासाठीं आंत मध्यें वाडा असतो.

7. Who can equal the worshipper of the gods? Who [can equal] the man who has feasted the gods? He is surrounded by house after house around him; he possesses a palace in the interior.

त्या सर्व ठिकाणीं सायणाचार्येन 'सर्व धनें' असा अर्थ करितात. 'अनागसो अदितये देवस्य सवितुः सवे। विश्वा वामानि धीमहि' ऋ. ५. ८२. ६; 'अस्मिन् आ वाम आयाने वाजिनीवसू। विश्वा वामानि धीमहि' ८. २२. १८; 'त्वे देवत्रा सदा पुरूवसो विश्वा वामानि धीमहि' ८. १०३. ५; 'यः आहुतिं परिवेद नमोभिः विश्वा इत् सः वामा दधते त्वोतः' ६. १. ९; 'त्वे ह यत् पितरः चित् नः इन्द्र विश्वा वामा जरितारः असन्वन्' ऋ. ७. १८. १ हीं स्थलें आणि यांजवरील सायणभाष्य पहा. धनप्राप्तीविषयीं अश् धातूचा प्रयोग होतो याविषयीं पूर्वीं सूक्त १ मंत्र ३ यांत आलेली 'रयिम् अश्नवत्' ही रचना पहा.

'यांत संशय नाहीं.' हे शब्द 'अश्नवत्' या लेट्च्या रूपापासून गम्यमान आहेत.

७. या मंत्रांत देवभक्तानें माहात्म्य वर्णिलें आहे. मंत्रवक्ता म्हणतो, 'जो मनुष्य देवांची सेवा करण्याची इच्छा करितो, त्यांस आपल्या घरी आह्वान करून त्यांचें दर्भासन वगैरे देऊन आदरातिथ्य करितो आणि त्यांस सोम, चरू, इत्यादिकांचें हवि देतो तो मोठा संपत्तिमान् होतो; त्याच्या आसपास अनेक घरें असतात आणि त्या सर्व घरांच्या आंत त्याला स्वताहाला राहण्यास वाडा मिळतो. तर अशा देवोपासकाची बरोबरी कोण करूं शकेल?'

'बरोबरी कोण करूं शकेल'?—'कः अश्नवत्.' हा जो 'अश्' धातूचा अर्थ आहे त्याविषयीं प्रयोगान्तरांबद्दल ऋ. १. ८४. ६ 'नकिः त्वा अनु मज्मना नकिः सुअश्वः आनशे'; 'न त्वा देवासः आशत न मर्त्यासः अद्रिवः विश्वा जातानि शवसा अभिभूः असि। न त्वा देवासः आशत' ऋ. ८. ९७. ९ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा.

'देवार्चन करणाऱ्या'='वृक्तबर्हिषम्.' अक्षरशः अर्थ 'ज्याने देवांस बसण्या-

**उप॑ क्ष॒त्रं पृ॑ञ्ची॒त हन्ति॒ राज॑भिर्भ॒ये चि॑त्सुक्षि॒तिं द॑धे ।**
**नास्य॑ व॒र्ता न त॑रु॒ता म॑हाध॒ने नार्भे॑ अस्ति व॒ज्रिणः॑ ॥८॥२१॥**

उप॑ । क्ष॒त्रम् । पृ॒ञ्ची॒त । हन्ति॑ । राज॑ऽभिः । भ॒ये । चि॒त् । सु॒ऽक्षि॒तिम् । द॒धे ।
न । अ॒स्य॒ । व॒र्ता । न । त॒रु॒ता । म॒हा॒ऽध॒ने । न । अर्भे॑ । अ॒स्ति॒ । व॒ज्रिणः॑ ॥ ८ ॥ २१ ॥

## भाषायाम्.

८. [ब्रह्मणस्पतिः] क्षत्रं (=स्वबलं) [स्वात्मनि] उपपृञ्चीत (=संपृक्तं कुर्यात्) । [स] राजभिः (=मित्रावरुणादिभिर्देवैः सह=तैः सहायभूतैः) हन्ति=देवोपासकानां (शत्रून् मारयति)। [स] भये चित् (=भीतिहेतौ युद्धेपि) सुक्षितिं दधे (=सुष्ठु निवासस्थैर्यं धारयति)। वज्रिणोऽस्य (=वज्रधारिणो ब्रह्मणस्पतेः) महाधने (=महायुद्धे) अर्भे (=अल्पे) [युद्धे] वा न वर्ता (=निवारयिता=परावर्तयिता) अस्ति, न तरुता (=न पराजेता) [वास्ति] ॥

---

साठीं दर्भ तोडून आंथरले आहेत' असा आहे; म्हणजे ज्यानें देवाचें आदरातिथ्य केलें आहे.

'[देवांचा] उपासक = 'दाश्वान्.' अक्षरशः अर्थ 'ज्यानें [देवांस हवि] अर्पण केलें आहे तो'.

'गृहांनीं परिवेष्टित असतो'='पस्त्याभिः प्रप्रास्थित.' 'पस्त्य' शब्दाचा अर्थ घर हा वेदांत प्रसिद्धच आहे. 'पस्त्याभिः प्रप्रास्थित' हे 'तं पस्त्याः प्रतिष्ठन्ते'='तस्य पुरः पस्त्यास्तिष्ठन्ति' या अर्थीं आहे असें आम्ही समजतो. वेदांत कर्मणि अर्थ दर्शवावयाचा असला म्हणजे नुस्तें आत्मनेपद घालण्याची चाल पुष्कळ आहे.

'आंतमध्यें वाडा असतो.' 'अन्तर्वावत्' याचा अर्थ 'आंत', 'आंतमध्यें', 'कशाच्यातरी आड', 'बाहेर कांहीं तरी घालून आंत झांकून राही अशा रीतीनें' याविषयीं ऋ. ६. ८. ३ हा मंत्र पहा.

८. [ ब्रह्मणस्पति ] [आपलें सर्व] बळ एकत्र करूं शकतो [आणि] राजे [मित्रावरुणादि देव] यांच्या साहाय्यानें [शत्रूंस] मारितो; [तो] संकट प्राप्त झालें तरी [आपलें] स्थान चांगल्या रीतीनें धरून राहतो. त्या वज्रधारी [ब्रह्मणस्पती]ला महायुद्धांत [अथवा] अल्प[युद्धां]त [मागें] फिरविणारा [अथवा] जिंकणारा [कोणीहि] नाहीं.

8. He can collect his might: he kills [the enemy] with [the help of] the Kings [Mitra-Varuna and other gods]. Even in danger he firmly holds his ground. In battle great [or] in [battle] small there exists neither his router nor [his] defeater.

८. ब्रह्मणस्पतीचा पराक्रम या मंत्रांत सांगितला आहे. 'प्रसंग पडला म्हणजे ब्रह्मणस्पति आपलें सगळें बळ गोळा करितो आणि राजे मित्रावरुणादि जे देव त्यांच्या साहाय्यानें देवोपासकांच्या शत्रूंस मारून टाकितो; आणि दारुण प्रसंग आला तरी तो आपली जागा घट्ट धरून राहतो, पळून जात नाहीं. युद्ध मोठें असो अथवा लहान असो, त्यांत ब्रह्मणस्पतीला मागें फिरविणारा म्हणजे त्यास पळावयास लावणारा अथवा त्याला जिंकणारा म्हणून कोणी नाहीं' असें हृद्ग आहे.

ब्रह्मणस्पति म्हणजे स्तोत्राभिमानिनी देवता रूपकसिद्ध असल्यामुळें या मंत्राचा साधा अर्थ इतकाच आहे कीं, जीं माणसें देवभजनांत तत्पर असतात, तीं प्रसंग आला असतां घाबरत नाहींत, त्यांचा धैर्य सोडीत नाहीं; त्यांनीं इंद्रादि देवांनें स्तोत्र केल्याबरोबर ते देव त्यांस पावतात आणि त्यांच्या शत्रूंचा नाश करितात; देवभजनपर लोक संकटींहि धैर्य सोडीत नाहींत; त्यांला लहानमोठ्या युद्धाचा प्रसंग आला तरी त्यांस देवभजनाच्या योगानें इतकी शक्ति येते कीं त्यांचा पराभव अथवा पराजय करण्याला कोणासच सामर्थ्य होत नसतें.

'वज्रधारी [ब्रह्मणस्पती]ला.' ब्रह्मणस्पतीला 'वज्रधारी' म्हणण्याचें कारण असें आहे कीं इंद्र जे जे पराक्रम करितो ते करण्यास ब्रह्मणस्पति समर्थ आहे असें वेदांत सांगितलें आहे.

'[मागें] फिरविणारा' = 'वर्ता.' अक्षरशः अर्थ 'निवारण करणारा' ऋ. ४. २०. ७; ५. २९. १४ आणि ८. १४. ४ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा.

## सूक्तम् ४१.

घोरपुत्रः कण्व ऋषिः । १–३, ७–९ इत्याद्यन्तयोस्तृचयोर्वरुणमित्रार्यमणः । ४–६ इति मध्यस्य तृचस्य आदित्या देवता । गायत्री च्छन्दः ।

**यं रक्षन्ति प्रचेतसो वरुणो मित्रो अर्यमा ।**
**नू चित्स दभ्यते जनः ॥ १ ॥**

यम् । रक्षन्ति । प्रऽचेतसः । वरुणः । मित्रः । अर्यमा ।
नु । चित् । सः । दभ्यते । जनः ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. प्रचेतसः (=प्रकृष्टज्ञानयुक्ताः) वरुणः, मित्रः, अर्यमा [इत्येते देवा] यं रक्षन्ति स जनः [केनापि] नू चित् दभ्यते (=नैव हिंसते) ॥

'जिकणारा' = 'तरुता.' ऋ. ६. ६६. ८ आणि ८. १. २१ हीं स्थळें आणि त्यांजवरील भाष्य पहा. प्रस्तुत मंत्रांत सायण 'वर्ता' आणि 'तरुता' यांचा (आम्हांस वाटतें विनाकारण) निराळा अर्थ करितात.

हा मंत्र कितीएक विद्वान् ब्रह्मणस्पतीचा उच्चार नसल्यामुळें ब्रह्मणस्पतिपर न घेतां 'वज्रिणः' यावरून इंद्रपर समजतात. पण आम्हांस वाटतें कीं सायणाचार्यांनीं ब्रह्मणस्पतिपर लाविला आहे तो बरोबर आहे, आणि तसा अर्थहि चांगला बसतो.

## सूक्त ४१.

ऋषि–घोराचा पुत्र **कण्व** (मागच्या सूक्ताचा जो तोच). देवता– १-३ आणि ७-९ **वरुण, मित्र,** आणि **अर्यमा**; ४–६ **आदित्य.** वृत्त–**गायत्री.**

१. ज्याला प्रज्ञावंत [असे जे] वरुण, मित्र [आणि] अर्यमा [हे] रक्षितात तो जन कधींहि नाश पावत नाहीं.

## HYMN 41.

To *Varuna, Mitra* and *Aryamâ* jointly (verses 1-3 and 7-9) and the *Âdityas* (verses 4-6) By *Kaṇva* son of *Ghora* (author of the previous hymn). Metre - *Gâyatrî*.

1. That person whom wise Varuṇa, Mitra [and] Aryamâ protect is never injured.

---

१. ह्या मंत्रांत मित्र, वरुण आणि अर्यमा हे जे महाप्रज्ञायुक्त देव त्यांच्या भक्ताचें भाग्य वर्णिलें आहे. तें हें कीं, 'ते देव ज्या मनुष्याला आपला आश्रय देतात त्याची हानि करण्यास कोणाहि मनुष्यास सामर्थ्य होत नाहीं.'

या मंत्रावरून देवांचा आश्रय आपणास असेल तर आपणास कळिकाळाचेंहि भय नाहीं असा आपल्या आर्य पूर्वजांचा पूर्ण भरंवसा उघड दिसून येतो.

'कधींहि नाश पावत नाहीं' = 'नू चित् दभ्यते.' म्हणजे त्याला 'कोणीहि उपद्रव करूं शकत नाहीं. या शब्दांचा सायणाचार्य या स्थळीं "[शत्रूंस] लवकरच मारून टाकितो" असा अर्थ करितात. त्यांत 'शत्रूंस' हें अध्याहृत घ्यावें लागतें, आणि 'दभ्यते' या स्पष्ट कर्मणि रूपाचा कर्तरि अर्थ करावा लागतो. ह्या दोन गोष्टी असल्यामुळें तो अर्थ चिंतनीय होय. 'नू चित्' याचा जो 'कधींहि नाहीं' (म्हणजे 'नाहींच') असा आम्हीं अर्थ केला आहे त्यास खालीं लिहिलेले मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्याचा आधार आहेः– 'नू चिद् यथा नः सख्या वियोषद् असन्नः उग्रोऽविता तनूपाः' ऋ. ४. १६. १०; 'याहि सूनो सहसो यस्य नू चिद् अदेव ईशे पुरुहूत योतोः' ६. १८. ११; 'नू चित् स भ्रेषते जनो न रेषन्मनो यो अस्य घोरम् आविवासात्' ७: २०. ६; 'श्रवत् श्रुत्कर्णः ईयते वसूनां नू चित् नः मर्धिषत् गिरः' ७. ३२. ५; 'मक्षू रायः सुवीर्यस्य दात नू चिद् यम् अन्यः आदभद् अरावा' ७. ५६. १५. शिवाय ऋ. ७. ९३. ६ आणि ८. २४ ११ हीहि स्थळें पहा. या सर्व ठिकाणीं सायणाचार्य 'नू चित्' याचा अर्थ 'नैव' ('नाहींच') असा करितात आणि तो बरोबर आहे. शिवाय पूर्वी सूक्त ३९ मंत्र ४ याजवर आमची 'नू चिद्' याविषयींची टीप पहा.

यं बाहुतेव पिप्रति पान्ति मर्त्यं रिषः ।
अरिष्टः सर्व एधते ॥ २ ॥

यम् । बाहुताऽइव । पिप्रति । पान्ति । मर्त्यम् । रिषः ।
अरिष्टः । सर्वः । एधते ॥ २ ॥

वि दुर्गा वि द्विषः पुरो घ्नन्ति राजान एषाम् ।
नयन्ति दुरिता तिरः ॥ ३ ॥

वि । दुःऽगा । वि । द्विषः । पुरः । घ्नन्ति । राजानः । एषाम् ।
नयन्ति । दुःऽइता । तिरः ॥ ३ ॥

## भाषायाम्.

२. यं [यं] मर्त्य [पूर्वमन्त्रोक्ता देवा] बाहुता इव (बाहुतेव= बाह्वोरिव) पिप्रति (पालयन्ति) [तथा] रिषो (=हिंसकात्) पान्ति (=रक्षन्ति) [स], सर्वः अरिष्टः (=केनाप्यहिंसितः सन्), एधते (=वर्धते=अभिवृद्धिं प्राप्नोति)॥

३. राजानो (=वरुणादयः पूर्वोक्ता देवा) एषां (=स्वकीययजमानानां) द्विषः (=शत्रोः) दुर्गाणि (=नगराणि) विघ्नन्ति (=विनाशयन्ति), पुरः (=प्राकारान्) [विघ्नन्ति] (=विनाशयन्ति) [च]। [तथा ते] [तान्] दुरितानि तिरो नयन्ति (=भयानि अतिगमयन्ति=भयेभ्यो मोचयन्ति)॥

२. ज्या [ज्या] मर्त्याला ते वेंगेंत [धरून] जणुं संभाळितात [आणि] दुष्टापासून तारितात [तो] प्रत्येक [मर्त्य] उपद्रवरहित [होऊन] उत्कर्षाप्रत पावतो.

३. हे राजे [वरुण, मित्र, आणि अर्यमा] भक्तांच्या शत्रूचीं नगरें फोडून टाकितात [आणि] कोट[हि] फोडून टाकितात. ते [भक्तांस] संकटाच्या पार पाडितात.

2. Every mortal whom they defend as though in [their] arms [and] protect from the wicked thrives uninjured.

3. [These] Kings (Varuna Mitra and Aryamâ) destroy the towns [and] destroy the forts of the enemy of these (their worshippers). They carry [them] through dangers.

२. वरच्या मंत्रांत सांगितलेलीच गोष्ट पुनः थोडासा विस्तर करून सांगतो, कीं 'ज्या मर्त्याचें रक्षण वरुण, मित्र, आणि अर्यमा हे देव करितात तो 'प्रत्येक' मर्त्य उपद्रवापासून मुक्त होऊन भरभराटीस पोंहचतो.'

'वेंगेंत'=' बाहुता.' अक्षरशः अर्थ '[आपल्या दोनी] बाहूंच्या आंत.' म्हणजे 'आलिंगन देऊन,' 'मिठी मारून.' हा अधिकरणीं अर्थ 'बाहुता' यांतील 'ता' प्रत्ययाचा होतो. जसा 'देवता' म्हणजे 'देवांत' (ऋ. १०. ४९. २ आणि त्यावरील भाष्य पहा) तसें 'बाहुता' म्हणजे 'बाहूंत,' 'वेंगेंत.'

'संभाळितात'=' पिप्रति.' 'पृ' धातूचा 'संभाळणें,' 'वचावणें' असा अर्थ होतो याविषयीं 'स त्वा वर्मणो महिमा पिपर्तु' (ऋ. ६. ७५. १) इत्यादि अनेक प्रयोग आहेत.

वरच्या आणि या मंत्रांवरून दीन मर्त्यांस दैविक साहाय्याचा मोठा आसा आहे, त्यांतच त्यांचें बल आहे दुसरें शरणस्थल नाहीं असा आपल्या पूर्वजांचा खरा भरवसा उघड दिसून येतो. तप (मग तें देवांच्या इच्छेविरुद्ध आणि त्यांस भीति प्राप्त होई अशा रीतीनें केलें तरी चिंता नाहीं) आचरल्यानें पाहिजे ती शक्ति येते, आणि तिच्या योगानें देवांचे पाषाण आणि पाषाणांचे देव करितां येतात ही पौराणिक समजून या आणि दुसऱ्या अनेक वेदवाक्यांस विरुद्ध आहे, या गोष्टीकडेस आधुनिक आर्यांनीं दिलें तितकें लक्ष्य थोडें आहे.

३. याहि मंत्रांत मित्रावरुण आणि अर्यमा हे जे, देवराजे त्यांच्या आश्रयापासून त्यांच्या भक्तांचा कसा लाभ होतो तें सांगितलें आहे.

'शत्रूचीं'='द्विषः.' षष्ठी.'

**सुगः पन्था अनृक्षर आदित्यास ऋतं यते ।**
**नात्रावखादो अस्ति वः ॥ ४ ॥**

सुऽगः । पन्थाः । अनृक्षरः । आदित्यासः । ऋतम् । यते ।
न । अत्र । अवऽखादः । अस्ति । वः ॥ ४ ॥

**यं यज्ञं नयथा नर आदित्या ऋजुना पथा ।**
**प्र वः स धीतये नशत् ॥ ५ ॥ २२ ॥**

यम् । यज्ञम् । नयथ । नरः । आदित्याः । ऋजुना । पथा ।
प्र । वः । सः । धीतये । नशत् ॥ ५ ॥ २२ ॥

## भाषायाम्.

४. हे आदित्याः, ऋतं यते (=यज्ञं प्रति प्राप्नुवते) [ भवत्समूहाय ] पन्थाः सुगः (=सुष्ठु गन्तुं शक्यः ) अनृक्षरः (=कण्टकरहितश् ) [ न ] [ वर्तते ] । [ तस्माद्यूयम् आगच्छत] । अत्र (=अस्मिन् यज्ञे ) [ हि ] वो (=युष्माकम् ) अवखादः (=अवमन्तव्यः खादः जुगुप्सितहविर्विशेषः ) नास्ति ॥

५. हे नरः (=शूरा ) आदित्याः, यं यज्ञम् ऋजुना पथा (=अविकलेन मार्गेण ) [ यूयं ] नयथ (=चालयथ ) स [ यज्ञो ] वो (=युष्मान् ) धीतये (=सोमस्य पानाय) प्रणशत् (=प्राप्नुयात्—प्राप्स्यति) ॥

यत्र यज्ञे यूयं साहाय्यं कुरुथ तत्रैव यजमानस्य सोमपानार्थं युष्माकं प्राप्तिरिति भावः॥

'कोट[हि] फोडून टाकितात'='वि... पुरः घ्नन्ति.' या आम्हीं केलेल्या अर्थाविषयीं येथें थोडेंसें प्रतिपादन केलें पाहिजे. त्याच्या शुद्धतेविषयीं तर आम्हांस संशय वाटत नाहीं. परंतु 'कोट' याबद्दल मुळांत 'पुरः' असा अन्तोदात्त शब्द आहे.

आतां 'कोट', अशा अर्थाचा जो 'पुरः' शब्द तो 'पुरः' असा आद्युदात्त असला पाहिजे (ऋ. ७. १५. १४; ५. १९. २ इ० मंत्र पुष्कळ आहेत). 'पुरः' ह्या अन्तोदात्त पदाचा अर्थ 'पुढें' असा होतो. परंतु आम्ही अदृष्ट फलासाठीं 'वि द्विषः पुरः' असाच पाठ वाचून अर्थलाभासाठीं 'वि द्विषः पुरः' असा पाठ समजून अर्थ केला आहे.

'पूः' शब्दाचा अर्थ साधारण संस्कृतांत होतो तसा वेदांतहि नगर असा होतो, तथापि त्याचा जो मूळ अर्थ गांवकूस, कोट, किल्ल्याची अथवा नगराची भिंत हा आहे तोहि वेदांत सांपडतो त्याविषयीं वर लिहिलेले मंत्र व इतर

४. हे आदित्य हो, यज्ञाला तुम्ही याल तर तुमचा मार्ग सुगम [आणि] अकंटक आहे. येथें तुम्हांस उपास पडणार नाहीं.

५. हे शूर आदित्यांनो, ज्या यज्ञाला तुम्ही सरळ मार्गानें चालवाल त्याला [सोम]पानासाठीं तुमची प्राप्ति होईल.

4. Easy [and] thornless is your path, O Âdityas. Here there shall be no mean offering for you.

5. That sacrifice, O brave Âdityas, which ye lead by a straight path shall attain ye to drink [the Soma].

प्रमाणें आहेत. 'पूः' (अथवा 'पूर्,' 'पुर') शब्दाचा हा आद्य अर्थ खानदेशांत अजून चालू आहे. तेथें गांवकुसास अजून 'गांवपूळ' अथवा 'गांवपूय' (म्हणजे ग्रामपूर=गांवाची भिंत) असें म्हणत असतात.

'भक्तांच्या'='एषाम्.' म्हणजे ज्या मनुष्यांविषयीं पूर्वीच्या दोन मंत्रांत सांगितलें आहे अशा लोकांच्या; अर्थात् वरुण, मित्र आणि अर्यमा यांच्या भक्तांच्या.

'संकटांच्या पार पाडितात'='नयन्ति दुरिता तिरः' अक्षरशः अर्थ 'संकटांच्या मधून घेऊन जातात,' 'संकटांच्या मध्यें सोडीत नाहींत.' 'तिरः' हें शब्दयोगी अव्यय आहे. ऋ. ५. ५४. १४ वगैरे अनेक उदाहरणें आहेत.

या मंत्राचा सायणाचार्य किंचित् वेगळा अर्थ करितात; तो असाः—"राजे "[वरुणादिक जे देव ते] यांच्या म्हण- "जे आपल्या यजमानांच्या पुढें दुर्ग "म्हणजे शत्रूंचीं नगरें फोडून टाकिता- "त, आणि शत्रूंसहि विनष्ट करितात. "त्याप्रमाणेंच यजमानांचीं संकटें विना- "शाप्रत नेतात."

४. हा मंत्र आदित्यगणाविषयीं आहे. आदित्यगण म्हणजे कोण याजवर सूक्त १४ मंत्र ३ पृष्ठ १०२ येथें दिलेली टीप पहा.

भावार्थ इतकाच आहे कीं, 'हे आदित्य हो, या आमच्या यज्ञांत हविर्भाग घेण्यासाठीं तुम्ही या; तुम्हांस मार्गी क्लेश अथवा कांट्यांचा उपद्रव होणार नाहीं; आणि येथें येऊन तुम्ही पोंहचल्यावर तुम्हांस वाईटसाईट अन्न आम्ही अर्पण करणार नाहीं. यास्तव तुम्ही या.'

'यज्ञाला तुम्ही याल तर तुमचा मार्ग सुगम'='ऋतं यते.' अक्षरशः अर्थ 'यज्ञाप्रत जाणाऱ्याला' असा आहे. 'यते' हें जें एकवचन आहे तें आदित्यसमूह या एकवचनाला अनुलक्षून योजिलेलें आहे. मरुतांवरचीं सूक्तें ज्यांनीं लक्षपूर्वक वाचलीं असतील त्यांस या वचनव्यत्ययाविषयीं कांहीं सांगावयास नको.

**स रत्नं मर्त्यो वसु विश्वं तोकमुत त्मना ।**
**अच्छा गच्छत्यस्तृतः ॥ ६ ॥**

सः । रत्नम् । मर्त्यः । वसु । विश्वम् । तोकम् । उत । त्मना ।
अच्छ । गच्छति । अस्तृतः ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. स मर्त्यः ( =पूर्वोक्तयज्ञस्य यः कर्ता स मनुष्यः) विश्वं रत्नं वसु (=सकलं रमणीयं धनम् ) उत त्मना (=अपि च ) तोकम् अच्छ (=अपत्यं प्रति ), अस्तृतः ( अहिंसितः सन् ). गच्छति (=प्राप्नोति )

' उत त्मना ' इति 'अपि च' इत्येतदर्थे निपातद्वयम् इत्यनुसंधेयम् ॥

' उपास पडणार नाहीं =' अवस्वादो न.' हा आमचा अर्थ भावगत आहे. सायणाचार्य " तुच्छ असा हवीचा भागविशेष " असें भाष्य करितात. दुसऱ्या ठिकाणीं हा शब्द आलेला आढळत नाहीं.

कितीएक विद्वान, " हे आदित्य " हो, चांगल्या रीतीनें चालणाऱ्याचा मार्ग " सुगम आणि निष्कण्टक असतो; त्या " मार्गावर तुम्हीं पाठविलेला नाशक को-"णी नसतो" असा करितात; परंतु 'अवस्वादः' याचा अर्थ 'नाशक' हा निराधार असल्यामुळें चिन्त्य आहे. आणि ' वः अवस्वादः' म्हणजे " तुम्ही पाठविलेला नाशक " असें नीट संभवत नाहीं.

५. या मंत्राचा असा भावार्थ दिसतो कीं, ' हे शूर आदित्यांनो, ज्या यज्ञाला शेवटपर्यंत तुमचें साहाय्य असतें तोच सिद्धीला पावतो आणि तेथंच तुमचे येणें होऊन तुम्ही सोम पिणें• हा जो मोठा प्रसाद तो यजमानास प्राप्त होतो. केवळ यजमान म्हणेल कीं, मी यज्ञ करीन आणि आदित्यांस सोम पाजीन, आणि तो यज्ञ सिद्धीस नेणें हें तुमच्या मनांत नसेल, तर केवळ यजमानाच्या इच्छेवरून आणि करणीवरून यज्ञ सिद्धीस जाणार नाहीं आणि तुम्ही तेथें जाऊन सोम पिणार नाहीं.'

हा भावार्थ आम्हीं सायणांस अनुसरून दिला आहे. परंतु '[सोम ]पानासाठीं ' हें आम्ही 'धीतये' शब्दाचें त्यांच्या भाष्यानुसार भाषांतर केलें आहे, तथापि ' धीति ' म्हणजे ' पिणें,' 'पान' असा अर्थ होईल कीं नाहीं याविषयीं आम्हांस मोठाच संशय आहे. त्या अर्थाचीं प्रयोगान्तरें मिळत नाहींत. आणि ऋग्वेदांत 'धीति' शब्द पुष्कळ ठिकाणीं आला आहे तेथें फारकरून 'कर्म' ' स्तुति,' अथवा ' बुद्धि ' असा अर्थ आहे. ' प्र वः स धीतये नशत् ' याचा अर्थ ' तो प्रसादाकरितां तुम्हांस पावेल ' म्हणजे ' तो तुम्हांस पावेल, आणि तुमचा प्रसाद यज्ञ करणाऱ्यास 'होईल' असा कदाचित् होईल तर कोण जाणे. परंतु 'धीति' म्हणजे ' प्रसाद' असा अर्थ होतो कीं नाहीं याविषयीं

६. [आणि तसा यज्ञ कर-णारा जो] मर्त्य तो सकल सुंदर संपत्तीला आणि संततीलाहि उप-द्रवाविरहित पावतो.

6. And that mortal [who is the performer of such a sacrifice] attains without obstacle to all excellent wealth as well as progeny.

संशय आहे. एकंदरींत हा तृतीयपाद 'धीतये' या शब्दामुळें कठिण आहे असें आम्हांस वाटतें.

पण कसेंहि असलें तरी मंत्राचें इतकें तात्पर्य निर्विवाद दिसतें कीं ज्या ज्ञा-ला आदित्यांचें साहाय्य असतें तोच सिद्धीस जातो, इतर जात नाहीं. इतर यज्ञास कांहीं तरी विघ्न येऊन अथवा दोष घडून येऊन निष्फल होतो. आदि-त्यांनी साहाय्य केलें म्हणजे त्या विघ्नां-चें व दोषांचें निवारण होतें. या अर्थामु-ळें 'शूर' हें संबोधन हेतुगर्भ आहे असें समजलें पाहिजे.

६. 'वरच्या मंत्रात जो यज्ञ सांगि-तला—म्हणजे जो यज्ञ आदित्य सिद्धीस नेतात—त्या यज्ञाचा जो कर्ता असेल तो सर्व उपद्रवापासून मुक्त होतो आणि स-कल सुंदर संपत्ति आणि संतति यांज-प्रत पावतो,' असें तात्पर्य होय.

'आणि संततीलाहि'—'तोकम् उत त्मना.' 'उत त्मना' या अव्ययद्वयाचा अर्थ 'आणि' 'आणि—हि' असा समुच्च-यदर्शक आहे. 'त्मना' ही जरी 'त्मन्'-(=आत्मन्)ची तृतीया आहे तरी त्याचा अर्थ ('उत' या अव्ययाशीं संबंध असला म्हणजे) आम्हीं येथें दिल्याप्र-माणें होतो. 'उत' याचा जो 'आणि' हा अर्थ आहे त्यास जोर देणें याहून 'त्मना' पदाचें दुसरें प्रयोजन येथें कांहीं नाहीं. 'इव त्मना' म्हणजे जसें 'प्रमा-णेच' तसें 'उत त्मना' म्हणजे 'आणि... हि.' दोनी प्रकारचे प्रयोग वेदांत आढ-ळतात. हा अर्थ जरी सायणाचार्य देत नाहींत तरी ऋग्वेदांतील मंत्रांवरून पाहतां तो योग्य दिसतो. ते 'त्मना' याचा अक्षरशः 'आत्मना=स्वयमेव' (म्हणजे स्वता, खुद) असा अर्थ करि-तात. तथापि 'स्वता' आणि 'खुद' यां-चाहि मराठींत त्यासारिखाच प्रयोग केव्हां केव्हां होतो. जसें, 'ही विहीर खुद तासबावडीसारिखी आहे'=ही वि-हीर तासबावडीसारिखीच आहे; 'हें पाणी स्वता कृष्णाबाईच्या पाण्यासारिखें आहे'=हें पाणी कृष्णाबाईच्या पाण्यासा-रिखेंच आहे.

**कथा राधाम सखायः स्तोमं मित्रस्यार्यम्णः ।**
**महि प्सरो वरुणस्य ॥ ७ ॥**

कथा । राधाम । सखायः । स्तोमम् । मित्रस्य । अर्यम्णः ।
महि । प्सरः । वरुणस्य ॥ ७ ॥

**मा वो घ्नन्तं मा शपन्तं प्रति वोचे देवयन्तम् ।**
**सुम्नैरिद्व आ विवासे ॥ ८ ॥**

मा । वः । घ्नन्तम् । मा । शपन्तम् । प्रति । वोचे । देवऽयन्तम् ।
सुम्नैः । इत् । वः । आ । विवासे ॥ ८ ॥

## भाषायाम्.

७. हे सखायः (=सखिभूता ऋत्विजः), मित्रस्य (= एतन्नामकस्य देवस्य ) अर्यम्णश् [ च ] स्तोमं (=स्तोत्रं ) कथा (=कथं=केन प्रियकारिणा प्रकारेण ) राधामः (=साधयामः )? [ तथा ] वरुणस्य महि प्सरः (=महद् भक्षणं भक्षणीयं महदन्नं) [ कथं साधयामः ]?

देवत्रयस्य यथास्माकं स्तोमो महद् हविरन्नं च प्रतिग्राह्यं स्यात् तथा केन प्रकारेण स्तोमम् अन्नं च सिद्धं करवामेत्यर्थः ॥

८. [ हे देवाः ], [ अहं ] घ्नन्तम् (=अस्मादृशान् मारयन्तं=नाशकं नरं ) वो (=युष्मभ्यं) मा प्रवोचे (=मा प्रवदेयं= नाशकः कोस्तीति न कथयामि), शपन्तं मा [ प्रवोचे ] (=शप्ता निन्दकः कोस्तीति न कथयामि), देवयन्तं [ मा प्रवोचे ] (=देवयन् देवान् कामयमानो देवभजकः कोस्तीति न कथयामि ) । सुम्नैरित् (=सुम्नैः सुखकरैः स्तोत्रैरेव ) वः (= युष्मान् ) आविवासे (=परिचरामि ) ॥

को दुर्जनः को निन्दकः को देवभजकश्चेति दुरुक्तकथनभीत्या आत्मश्लाघाकरणभीत्या च न कथयामि युष्माभिरेव तद् विवेचनीयम् अहं केवलं स्तोत्रैर्युष्मान् परिचरामीति भावगतम् ।

७. हे सख्यांनो, मित्रासाठी [आणि] अर्यमासाठीं स्तोत्र कसें रचिलें पाहिजे [बरें]? [आणि] वरुणासाठी महाखाद्य [कसें सिद्ध केलें पाहिजे बरें]?

7. How, O Friends, shall we prepare a hymn for Mitra [and] for Aryamâ? [and how] the great oblation for Varuṇa?

८. [हे देव हो,] घातकी [कोण,] निंदक [कोण], [आणि] देवभक्त [कोण हें] मी तुम्हांस सांगणार नाहीं; केवळ स्तोत्रांनीं तुम्हांस भजतों.

8. Let me not, O gods, name to you the wicked man nor the reviler nor the servant of the gods. I only serve you with hymns.

७. मंत्रवक्ता आपल्याजवळ असलेल्या लोकांस म्हणतो कीं, 'हे मित्रांनो, मित्र देव, अर्यमा देव आणि वरुण देव यांस आवडे असें स्तोत्र आणि महान्न आपण कशा रीतीनें सिद्ध केलें पाहिजे हें तुम्हांस ठाऊक आहे काय?' म्हणजे, कोणत्या प्रकारें स्तोत्र गाइल्यानें आणि महान्न अर्पण केल्यानें त्या देवांची प्रसन्नता आपणावर होईल हे तुम्हांस ठाऊक आहे काय?

अशा प्रकारचेच संशय तुकारामादिक महाकवींच्या अभंगांत अनेक ठिकाणीं आढळतात.

'महाखाद्य'='महि प्सरः'. हें महाखाद्य म्हणजे काय होतें तें खात्रीनें सांगवत नाहीं. वर केलेल्या अर्थाविषयीं तर संशय नाहींच. ऋ. १. २. २; १. ७४. ३; १. ९६. ३ आणि ९. ९७. २७ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा. या सर्व स्थळीं 'मह' हें विशेषण प्रस्तुत मंत्राप्रमाणें योजिलेलें आहे. ह्या गोष्टीचा विचार केला तर हें 'महाखाद्य' म्हणजे कांहीं खाद्यविशेष (पंचामृत इत्यादि आधुनिक खाद्यांप्रमाणें) होतें असें दिसतें.

८. 'हे मित्रादिदेव हो, ह्या जगांत दुर्जन कोण, निंदक कोण, आणि देवभक्त कोण हें जरी माझ्यानें कदाचित् सांगवेल तरी तें मी सांगत नाहीं; कारण कीं त्यापासून परनिंदा आणि आत्मस्तुति केल्याचा आरोप मजवर येईल; यास्तव मी स्तोत्रें गाऊन माझ्या शक्तीप्रमाणें तुमची सेवा मात्र करितों. भक्त आणि अभक्त यांतला भेद पाहून त्याप्रमाणें बरें वाईट करण्यास तुम्ही समर्थ आहांच' असा भावार्थ.

हा मंत्र फार सुंदर आहे. यांत नम्रता, विनय, आणि देवाच्या न्यायीपणाविषयीं पूर्ण श्रद्धा हीं उघड दिसून ये-

**चतुरश्चिद्ददमानाद्बिभीयादा निधातोः ।**
**न दुरुक्ताय स्पृहयेत् ॥ ९ ॥ २३ ॥**

चतुरः । चित् । ददमानात् । बिभीयात् । आ । निऽधातोः ।
न । दुःऽउक्ताय । स्पृहयेत् ॥ ९ ॥ २३ ॥

## भाषायाम्.

९. चतुरश्चित् (=चतुरपि) [कपर्दकान्] ददमानाद् (=हस्ते धारयतः =अक्षद्यूतं कुर्वतोरुभयोर्मध्ये यः पुमान् चतुरपि कपर्दकान् हस्ते धारयति तस्मात् पुरुषाद्) आ निधातोः (=कपर्दकानां भूमौ प्रक्षेपणपर्यन्तं) बिभीयाद् (=अस्य जयो भविष्यति न भविष्यतीत्यन्यो भीतिं प्राप्नुयात्-भविष्यति जये सत्यपि न भविष्यतीति वचनोच्चारणे जाते सति तद्वक्तुर्गरीयान् पराभवः स्यादिति भीतिर्वर्तते)। [तस्मात् कपर्दकपतनपर्यन्तं] न दुरुक्ताय स्पृहयेत् (=दुर्वचनं न कामयेत् दुर्वचनं न वदेत्) ॥

यथा अक्षद्यूतं कुर्वतोरुभयोर्मध्ये चतुरपि कपर्दकान् धारयत एकनरस्य जयो भविष्यति न भविष्यतीति कपर्दकपतनपर्यन्तं निश्चयेनान्यो न वक्तुं शक्नोति. न भविष्यत्येव तव जयो ममैव जयो भविष्यति त्वं जेष्यस इति परुषवचने चोक्ते सति पश्चात् वक्तुः पराजये जायमाने महद् दुःखं जायेत, तथा अन्ये पुरुषाः पापा अहमेव पुण्यवान्, अन्ये पुरुषा देवघातिनः अहमेव देवभजकः अन्ये पुरुषा देवनिन्दका. अहमेव देवस्तोत्रकृत् अन्ये धोरगतिं प्राप्स्यन्ति अहमेव देवप्रियो मोक्षं प्राप्स्यामीति परुषवचनं न कोपि ब्रूयात् । मनुष्यकर्मणां सदसन्निर्णयशक्त्यभावेन्यथापरिणामसंभवादिति भावः ॥

तात. आपण कितीहि सुकृत्यें केलीं तरीहि ईश्वर जें उत्तम सुकृत्य समजतो तें आपल्या हातून घडत असेल किंवा नसेल याविषयीं संशयग्रस्त असणें; दुसऱ्याचीं जीं कृत्यें आपण वाईट अशीं समजतों तीं ईश्वराच्या दृष्टीनें कदाचित् सुकृत्येंच असतील असें मानणें; दुसऱ्यानें निंदा केली असतांहि त्याविषयीं विषाद न मानणें; आणि दुसऱ्यानें कितीहि उपद्रव अथवा निंदा केली तथापि आपण करीत असलेलीं सुकृत्यें ईश्वरावर श्रद्धा ठेवून करितच रहाणें हे जे उत्तम गुण ते या मंत्रांत जाणविले आहेत.

'स्तोत्रांनीं'='सुम्नैः'. ऋ. १. १०६. ४ आणि त्याजवरील सायणभाष्य पाहा.

'सांगणार नाहीं'='मा प्रवोचं'. अक्षरशः अर्थ 'मी सांगेन असें होऊं देऊं नको', 'माझ्याकडून सांगवूं नको', 'न सांगण्याची मला वासना दे'.

९. च्यारहि [कवड्या] ज्याच्या हातांत आहेत त्याला, त्या खालीं पडेपर्यंत, भ्यावें. दुर्वचनाची इच्छा करूं नये.

9. A man shall fear him who has all the four dice [in his hand], until they are thrown. Let no one desire evil speech.

९. पूर्वीच्या मंत्रांत जें सांगितलें की दुसऱ्याचीं कुकर्में असलीं तरी त्यांविषयीं बोलूं नये आणि त्यांजबद्दल त्यांस शिक्षा होईल असें म्हणूं नये. त्यालाच अनुसरून या मंत्रांत ऋषि म्हणतो की, 'दोन मनुष्य द्यूत खेळूं लागले म्हणजे ज्याच्या हातांतील फांसे अजून खालीं पडलेच नाहींत त्याचा जय होईल कीं नाहीं असें तें फांसे पडेपर्यंत म्हणतां येणार नाहीं, आणि तुझा जय होणार नाहीं माझाच होईल असें दुसऱ्या मनुष्याला जसें म्हणतां येणार नाहीं, तसेंच दुसऱ्या मनुष्याचीं जीं कर्में आपण वाईट अशीं समजतों त्यांचा परिणाम वाईट होईल आणि ईश्वर त्यांजबद्दल शिक्षा करील आणि आम्ही करितों तीं कर्में चांगलीं होत आणि त्यांजवरून आपणास मुक्ति मिळेल असें परुषवचन आपण करूं नये. कारण खरोखर पाप कोणतें आणि पुण्य कोणतें तें देवासच ठाऊक आहे, आणि तो त्या गोष्टीचा निर्णय करीपर्यंत आपण कांहीं बोलूं नये.'

जरी हा मंत्र केवळ पूर्वमंत्राच्या पुष्ट्यर्थ आहे तथापि यांत सांगितलेल्या गोष्टी चमत्कारिक आहेत. यांतील मजकूर म्हणजे एक म्हण आहे असें दिसतें. शिवाय महाभारतांत सांगितलेल्या कथांवरून द्वापरयुगांत द्यूत म्हणजे जुगार खेळण्याची चाल फार होती असें जसें समजतें तशीच वैदिक युगांत म्हणजे कृतयुगांतहि होती असें ऋग्वेदांत असलेल्या अनेक मंत्रांवरून सिद्ध होतें. आणि जुगार खेळणें हा दुर्गुण आहे असें समजूनहि लोक तो खेळण्याचें सोडून देत नसत. ऋ. १०. ३४ हें सूक्त पहा.

' [कवड्या].' हा शब्द सायणानुसार आम्हीं अध्याहृत घेतला आहे. तो घेणें जर बरोबर असेल तर कवड्यांनी खेळण्याची चाल फार जुनी आहे असें समजलें पाहिजे. परंतु इतर सूक्तांत लांकडाचे फांसे असत असें सांगितलें आहे.

## सूक्तम् ४२.

घोरपुत्रः कण्व ऋषिः । पूषा देवता । गायत्री छन्दः ।

**सं पूषन्नध्वनस्तिर व्यंहो विमुचो नपात् ।**
**सक्ष्वा देव प्र णस्पुरः ॥ १ ॥**

सम् । पूषन् । अध्वनः । तिर । वि । अंहः । वि॒ऽमुचः । नपात् ।
सक्ष्व । देव । प्र । नः । पुरः ॥ १ ॥

## भाषायाम्.

१. हे पूषन् (=पोषणवतीपृथिव्यभिमानिन् देव), [ त्वं ] [ नः ] अध्वनः (=मार्गान् ) संतिर ( =अस्माभिः सह आगम्य अभीष्टस्थानं प्रापय ) हे विमुचो नपात् ( =जलविमोचनहेतोर्मेघस्य पुत्र ) [ पूषन ] [ त्वं ] [ नः ] अंहो (=विघ्नं ) वि[तिर] ( =पारय ) । हे देव [ पूषन ], [ त्वं ] नः पुरः (=अस्माकं पुरतः) प्रसक्ष्व (=प्रसक्तो भव=पुरतो गच्छ ) ॥

## सूक्त ४२.

ऋषि—घोराचा पुत्र कण्व (पूर्व सूक्ताचा जो कर्ता तोच). देवता—पूषा. वृत्त—गायत्री.

१. हे पूषा, हे मेघपुत्रा [पूषा], [तूं] [आम्हांस] मार्गानीं सुखरूपपणें ने, [तूं] [आम्हांस] संकटापासून पार पाड; हे देवा [पूषा], तूं आम्हांबरोबर पुढें चल.

## HYMN 42.

To *Pûshâ* (or God of earth or the the God of Light). By *Kaṇva* the son of *Ghora* author of the previous hymn. Metre-*Gâyatrî*.

1. O Pûshâ, lead [us] over the roads [and] son of the cloud, over danger. Guide us O God, in [our] front.

---

१. हें सूक्त पूषा या नांवाच्या देवाविषयीं आहे. पूषा कोण आहे याविषयीं सूक्त १४ मंत्र ३ याजवर दिलेली टीप पाहा. पूषा म्हणजे पृथ्वीरूपी देवता असें सायणाचार्य येथें म्हणतात. या देवाविषयीं ऋग्वेदांत वरींच सूक्तें आलीं आहेत. त्यांवरून ती पोषणाची आणि अभिवृद्धीची देवता होय असें दिसतें. पृथिवीपासून पोषण होतें म्हणून त्याला सायणाचार्य पृथिवीची अधिदेवता असें म्हणत असतील. कितीएकांचें म्हणणें ती प्रकाशाची देवता होय आणि म्हणूनच तिला उजेड दाखवून रस्त्याच्या पार पाडण्याविषयीं, आणि संकटाच्या पार पाडण्याविषयीं प्रार्थना केलेली आढळते, असें आहे. या देवाचें खरें स्वरूप काय आहे, म्हणजे ती कशाची देवता होय हें जाणण्यासाटीं तीजवरील सर्व सूक्तें, आणि मंत्र हे लक्ष देऊन वाचणें याशिवाय दुसरा उपाय दिसत नाहीं.

'हे मेघपुत्रा [पूषा],'= विमुचो नपात्.' हा अर्थ आम्हीं सायणाप्रमाणें केला आहे. पूषा म्हणजे सूर्याचा जो भूमीवर उजेड पडतो तद्रूपी देवता होय असें मानिलें तर 'विमुचो नपात्' या विशेषणाची उपपत्ति चांगली बसते. कारण कीं सूर्यप्रकाश अंतरिक्षामधून मेघमंडल भेदून येत असतो, म्हणून सूर्यप्रकाशरूपी पूषाला मेघमंडलाचा पुत्र म्हणणें यांत, मेघोदकांस गाई म्हणणें यापेक्षां, विशेष ओढाताण नाहीं.

ज्यांची प्रार्थना अथवा पूजा आणि अनेक प्रकारची उपासना वैदिक युगांत लोकांकडून मोठ्या थाटमाटानें आणि उत्साहानें होत होती पण आलीकडे होण्याची बंद झाली आहे अशा ज्या उषा, मरुत्, अर्यमा इत्यादि देवता त्यांजपैकीं पूषा होय. आणि पूषा म्हणजे सूर्यप्रकाशरूप देव असल्यामुळें सूर्यरूपच तो होय असें मानून उत्तरोत्तर त्याचें व्यक्तित्व नाहींसें

**यो नः॑ पूषन्नघो वृको॑ दुःशेव॑ आदिदे॑शति ।**
**अप॑ स्म तं प॒थो ज॑हि ॥ २ ॥**

यः । नः । पूषन् । अघः । वृकः॑ । दुःऽशेवः॑ । आऽदिदे॑शति ।
अप॑ । स्म । तम् । पथः । जहि ॥ २ ॥

**अप॒ त्यं प॑रिप॒न्थिनं॑ मुषीवाणं॑ हुर॒श्चितम् ।**
**दू॒रमधि॑ स्रुतेर॑ज ॥ ३ ॥**

अप॑ । त्यम् । परि॒ऽप॒न्थिनम् । मु॒षीवाणम् । हु॒रः॒ऽचितम् ।
दूरम् । अधि॑ । स्रु॒तेः । अज ॥ ३ ॥

## भाषायाम्.

२. हे पूषन्, यः अघो (=दुर्जातो) दुःशेवः (=दुःसेव्यः मत्सरयुक्तो) वृकः (=अस्माकं धनस्य अपहर्ता=चौरो) नः (=अस्मान्) आदिदेशति (=बाधायाद्येत्=जिघांसति) तं पथो (=मार्गाद्) अपजहि स्म (हत्वा अवश्यमपाकुरु) ॥

३. त्यं (=तं) [पूर्वोक्तं] परिपन्थिनं (=मार्गप्रतिबन्धकं) हुरश्चितं (=कौटिल्यानां चिन्तकं) मुषीवाणं (=तस्करं) स्रुतेरधि (=मार्गाद्) दूरं (=दूरप्रदेशं प्रति) अपाज (=अपगमय) ॥

होऊन आतां पूषा हें एक सूर्याचें नांव मात्र होऊन राहिलें आहे.

'मार्गांनीं......ने.' पूषा म्हणजे सूर्यप्रकाशाची देवता आहे त्यापेक्षां अंधकारमग्न लोकांनीं 'हे पूषा, आम्हांस मार्गास लाव,' अशी प्रार्थना करणें हें स्वाभाविक आहे.

'[तूं] आम्हांस संकटापासून पार पाड; तूं आम्हांबरोबर पुढें चाल.' या दोन्ही गोष्टी प्रकाशरूपी देवतेला अनुलक्षून म्हटल्या आहेत तेव्हां त्यांचा अर्थ उघडच आहे. कारण रात्रीशीं संकटाचा आणि भीतीचा संबंध सर्वकाळीं सर्व देशीं आहे. अमुक रस्त्यावरून चालण्यास रात्रीच्या वेळीं भीति आहे; अमुक झाडावर कांहीं आहे त्यामुळें त्याच्या खालून जाण्यास रात्रीच्या वेळीं भय वाटतें. आणि उजाडलें म्हणजे त्याच ठिकाणीं जाण्यास मनुष्यें भीत नाहींत हीच मानवी मनाची अवस्था वैदिक युगांत होती.

'तूं आम्हांबरोबर पुढें चाल' म्हणजे 'आम्हांबरोबर ऐस आणि आमचें संरक्षण करण्यासाठीं आणि आम्हांस वाट दाखविण्यास आमचा वाटाड्या हो.'

२. हे पूषा, जो दुष्ट [आणि] विघ्नसंतोषी चोर आम्हांस मारावयास येईल त्याला मार्गांत न येऊं देतां मारून टाक.

३. त्या रस्ता मारणाऱ्या अहितचिंतक चोराला मार्गापासून दूर हाकून दे.

2. O Pûshâ, that wicked [and] covetous robber who shall attack us,–strike him off from the road.

3. Drive off far from the road that way-laying [and] evil-contemplating robber.

२. या मंत्रांत 'रस्तेलूट करणाऱ्या दुष्ट आणि मत्सरी चोरापासून उपद्रव न होऊं देण्याविषयीं आणि तशा चोराला मारून टाकून रस्ता सुरक्षित करण्याविषयीं' पूषा या देवाला प्रार्थना आहे. हीहि प्रार्थना पूषा देवतेचें स्वरूप प्रकाशमय मानिलें तर त्याला अनुरोधून आहे. कारण चोर फारकरून रस्तेलूट करून लोकांस मारून टाकितात ते रात्रीचेच मारून टाकितात.

'आम्हांस मारावयास येईल' – 'आदिदेशति' (लेट्). येथें सायणाचार्य 'आदिदेशति' या क्रियापदाचा अर्थ 'अमुक मार्गानें जा असा हुकूम करील' म्हणजे 'अडवील' असा करितात. परंतु ऋ. १०. १३४. २ हा मंत्र आणि त्याजवरील त्यांचें भाष्य पहा. शिवाय ऋ. ९. ५२. ४ हाहि मंत्र आणि त्याजवरील भाष्य पहा.

'मार्गांत न येऊं देतां मारून टाक' = 'अप पथो जहि.' अक्षरशः 'मार्गापासून दूर मार.' म्हणजे मार. आणि मार्गावर येऊं देऊं नको. यावरून रस्त्यावर वाटसराचें रक्षण करणें हें पूषादेवाचें काम होय असें अनुमान केलें पाहिजे.

३. दुसऱ्या ऋचेंत सांगितलेल्या चोरास आणखी एक दोन विशेषणें लावून, त्याला मार्गांतून हाकून देण्याविषयीं आणि मार्ग सुरक्षित करण्याविषयीं प्रार्थना ऋषि या मंत्रांत करीत आहे.

या मंत्रावरून तरी रस्त्यावरून माणसें जाऊं लागली म्हणजे त्यांस चोरातस्कराचें भय नसावें असें करणें हें पूषादेवाचें काम होय असें दिसून येतें.

**त्वं तस्य॑ द्वयाविनो॑ऽघशंसस्य॒ कस्य॑ चित् ।**
**प॒दाभि ति॑ष्ठ तर्पुषिम् ॥ ४ ॥**

त्वम् । तस्य॑ । द्वयाविनः॑ । अघऽशंसस्य । कस्य॑ । चित् ।
प॒दा । अ॒भि । ति॒ष्ठ । तपु॑षिम् ॥ ४ ॥

**आ तत्ते॑ दस्र मन्तुमः पूषन्नवो॑ वृणीमहे ।**
**येन॑ पि॒तॄनचो॑दयः ॥ ५ ॥ २४ ॥**

आ । तत् । ते॒ । दस्र॒ । मन्तु॒ऽमः । पूष॑न् । अवः॑ । वृ॒णीम॒हे॒ ।
येन॑ । पि॒तॄन् । अचो॑दयः ॥ ५ ॥ २४ ॥

---

## भाषायाम्.

४. [ हे पूषन्, ] तस्य कस्य चित् ( =सर्वस्यापि तस्य ) द्वयाविनः ( =मनस्यन्यत् क्रियायां चान्यदित्येतद् द्वयमस्यास्तीति तस्य=वञ्चकस्य ) अघशंसस्य ( =तस्करस्य ) तपुषिम् अभि ( =शरीरोपरि ) त्वं पदा ( =त्वत्पादेन ) [ आक्रम्य ] तिष्ठ ॥

५. हे दस्र ( =वैर्युपक्षयकारिन् ), मन्तुमः ( =ज्ञानवन् ) पूषन्, येन [ अवसा ] [ त्वं ] पितॄन् ( =अस्माकं पूर्वान् ) अचोदयः. ( =प्रेरितवानसि=वर्धितवानसि ) तत् ते ( =तव ) अवः ( =रक्षणम् ) आवृणीमहे ( =प्रार्थयामहे ) ॥

४. [हे पूषा,] तो जो द्वंनक चोर—मग तो कोणीहि असो—त्याच्या शरीरावर तूं पाय देऊन उभा राहा.

५. हे पराक्रमशाली, हे प्रज्ञावान पूषा, ज्या कृपेनें तूं आमच्या वाडवडिलांस पूर्वीं उत्कर्षाप्रत नेलेंस तीच कृपा आतां आम्हीं तुजजवळ भाकित आहों.

4. Upon the body of that deceitful thief, whoever he is, trample thou, [Pûshâ], with thy foot.

5. That protection, O victorious and wise Pûshâ, with which thou didst advance our ancestors, we implore of thee.

४. तिसऱ्या ऋचेचेंच पुष्टीकरण या मंत्रांत आहे. 'पूर्वी जो चोर सांगितला तो कोणीहि असो, त्याच्या मानेवर तूं पाय देऊन उभा राहा आणि त्याला चिरडून टाक; कारण कीं तो कपटी असतो' असा भावार्थ.

'द्वंनक'='द्वयावी.' अक्षरशः अर्थ 'दोन ज्याला आहेत तो.' अशा अर्थावरून "पाठीमागेंहि चोरी करणारा आणि प्रत्यक्षहि चोरी करणारा अशा प्रकारची द्विविध वर्तणूक करणारा" म्हणून 'द्वयावी' असें सायणाचार्य म्हणतात. परंतु ऋ. २.२३.५ याजवर जो त्यांणीं अर्थ केला आहे तो बरा असें समजून आम्हीं वर लिहिल्याप्रमाणें भाषांतर केलें आहे.

'शरीरावर'=' तपुषिम्.' हा अर्थ आम्हीं येथें सायणांस अनुसरून केला आहे; पण आम्हांस संशय आहे. प्रयोगान्तर मिळत नाहीं आणि दोन दुसरे मंत्र आहेत. त्यांत 'तपुषि' हें 'हेति' (= शस्त्र) याचें विशेषण आहे त्यावरून येथेंहि कितीएक विद्वान् "शरीरावर उभा राहा" असा अर्थ न करितां 'शस्त्रावर उभा राहा' असें समजतात. पण त्याला तरी शास्त्रीलायक प्रमाण नाहींच असें वाटतें. मग सायणास कां अनुसरूं नये ?

५. सूक्तवक्ता जो ऋषि म्हणजे कवि त्याच्या वाडवडिलांस पूषा देवानें आजपर्यंत रक्षिलें असें त्याणें ऐकिलें आहे त्याप्रमाणेंच पुढें आपलेंहि रक्षण करण्याविषयीं तो त्या देवाला या मंत्रांत स्तवीत आहे.

कोंकणांत अथवा देशावर राहणाऱ्या लोकांच्या ज्या शांतादुर्गा (गोमंतक), गणपति (पुळें, रत्नागिरी), भवानी (तुळजापूर), खंडोबा (जेजुरी) इत्यादि कुलदेवता असतात त्यांची प्रार्थना ते ते लोक संकटसमयीं अथवा नवस फेडावयाच्या प्रसंगीं करूं लागले म्हणजे अशा रीतीनेच करीत असतात.

**अधा नो विश्वसौभग हिरण्यवाशीमत्तम ।**
**धनानि सुषणा कृधि ॥ ६ ॥**

अध । नः । विश्वऽसौभग । हिरण्यवाशीमत्ऽतम ।
धनानि । सुऽसना । कृधि ॥ ६ ॥

**अति नः सश्चतो नय सुगा नः सुपथा कृणु ।**
**पूषन्निह क्रतुं विदः ॥ ७ ॥**

अति । नः । सश्चतः । नय । सुऽगा । नः । सुऽपथा । कृणु ।
पूषन् । इह । क्रतुम् । विदः ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

६. अध (=अथ=अपि च) हे विश्वसौभग (=कृत्स्नधनयुक्त) हिरण्यवाशीमत्तम (=अतिशयेन सुवर्णमयायुधविशेषवन्) [पूषन्], [त्वं] नः (=अस्मभ्य) धनानि सुषणानि (=सुलभानि) कृधि (=कुरु) ॥

७. सश्चतः (=अस्मद्बाधनाय प्राप्नुवतः=शत्रून्) नः (=अस्मान्) अति नय (=अतिक्रम्य गमय), नः (=अस्मभ्यं) सुगानि (=सुष्ठु गम्यानि) सुपथानि (=सुमार्गान्) कृणु (=कुरु) । हे पूषन्, इह (=शत्रुपरिहारविषये सुमार्गक्रमणविषये च) [अस्मभ्यं] क्रतुं (=प्रज्ञानं) विदः (=लम्भय) ॥

६. आणि हे सकलसंपत्तिमान् पूषा, हे सौवर्णशस्त्र [पूषा], तूं आम्हांस धनसंपत्ति सुगम कर.

७. [हे पूषा], शत्रूस आम्हांपासून दूर घेऊन जा, आमचे मार्ग सुगम [आणि] चांगले कर. हे पूषा, याविषयीं [ आम्हांस ] बुद्धि दे.

6. And, O Pûshâ, possessed of wealth [and] possessed of an entirely golden spear, make riches accessible to us.

7. Lead the enemies away from us; make the paths good [and] safe for us. Give [us], Pûshâ, wisdom in this.

---

६. या मंत्रात पूषा देवाला. द्रव्यलाभासाठीं प्रार्थना केली आहे. कारण कीं आंधारांत पडलेल्या माणसांस उजेडांत आणणें. मार्ग चुकलेल्यांस मार्ग दाखविणें आणि मार्गांत कोणतेंहि संकट प्राप्त न होऊं देणें हीं जशीं कार्यें पूषा करितो तसेंच अभिवृद्धि करणें आणि धनसंपत्ति देणें हेंहि काम तो करीत असतो.

' सौवर्णशस्त्र '=' हिरण्यवाशीमत्तम.' अक्षरशः अर्थ, ' ज्याची वाशी अगदीं सुवर्णाची आहे.' म्हणजे केवळ वर सोन्याचा मुलामा केला आहे अशी नव्हे पण सगळीच सोन्याची केलेली आहे. ' वाशी ' ह्या शब्दाचा अर्थ सायणाचार्य आयुध असा करितात. एका ठिकाणीं ( ऋ १. ८८. ३ ) ते ' वाशी ' म्हणजे ' आर ' नांवाचें हत्यार असें म्हणतात. हत्यार हा अर्थ तर निर्विवाद आहेच, पण कोणतें हत्यार; म्हणजे साधारण कोणतेंहि हत्यार, किंवा कांहीं एक विशेष हत्याराचें नांव आहे, इतकें पाहणें आहे. ऋ. १. ८८. ३ यांत लिहिलें आहे कीं ' श्रिये कं वो अधि तनूषु वाशीर्मेधा वना न कृणवन्त ऊर्ध्वा ' (=' हे मरुतांनो, तुमच्या खांद्यावर वाशी आहेत त्या यज्ञस्तंभासारख्या उंच असतात'). यावरून ' वाशी ' म्हणजे भाल्यासारिखें लांब हत्यार असून खांद्यावर घ्यावयाचें असलें पाहिजे. आणि आम्हांस वाटतें कीं गुजराथेंत जी ' वाशी ' असते ती आणि वेदांतील ' वाशी ' एकच असावी. ती ( गुजराथेंतील वाशी ) भाल्याइतकी लांब असते आणि तिच्या एका टोकास लोखंडाची कोयती ( ' दांतडूं ' ) तीक्ष्ण धारेची घट्ट जोडलेली असते. बहुतकरून धनगर, मेंढपाळ, गुराखी हे लोक ती जवळ बाळगितात आणि उंच उंच झाडाचा पाला खालीं उभे राहून तोडून मेंढरांस व गुरांस घालितात. प्रसंग आला तर मनुष्यासहि तिणेंच मारितात आणि या 'वाशी' नें खून झालेले आम्हांस ठाऊक आहेत. यासाठीं (जर वंश=वांसा स्त्रीलिं. वांशी=वाशी अशी उत्पत्ति नसेल तर ) वेदांतील ' वाशी ' म्हणजे गुजराथी वाशीच असेल आणि त्यासारिखेंच एक हत्यार होतें असें समजलें पाहिजे.

७. ' शत्रूंस आम्हांपासून दूर घेऊन जा'=' सश्चतः अति नः नय.' अक्षरशः

**अभि सूयवसं नय न नवज्वारो अध्वने ।**
**पूषन्निह क्रतुं विदः ॥ ८ ॥**

अभि । सुऽयवसम् । नय । न । नवऽज्वारः । अध्वने ।
पूषन् । इह । क्रतुम् । विदः ॥ ८ ॥

**शग्धि पूर्धि प्र यंसि च शिशीहि प्रास्युदरम् ।**
**पूषन्निह क्रतुं विदः ॥ ९ ॥**

शग्धि । पूर्धि । प्र । यंसि । च । शिशीहि । प्रासि । उदरम् ।
पूषन् । इह । क्रतुम् । विदः ॥ ९ ॥

## भाषायाम्.

८. [ हे पूषन्, ] [ अस्मान् ] अभि सूयवसं ( =शोभनतृणयुक्तं देशं प्रति ) नय । अध्वने ( =मार्गाय=मार्गक्रमणाय =मार्गक्रमणे ) नवज्वारः ( =नूतनः संतापो ) न [ भवतु ] । हे पूषन्, इह ( शोभनतृणयुक्तप्रदेशं प्रति गमनविषये मार्गे च नूतनसंतापपरिहारविषये ) [ अस्मभ्यं ] क्रतुं ( =प्रज्ञानं ) विदः ( =लम्भय ) ॥

९. [ हे पूषन् ], [ त्वं ] शग्धि ( =शक्नुहि अस्मभ्यं धनादिकं देहि ), पूर्धि ( =पूरय=अस्मान्धनादिना पूरय ) प्रयंसि ( अन्यदपेक्षितं वस्तु प्रयच्छ ) च । [अपि च ] [ अस्मान् ] शिशीहि ( =तीक्ष्णीकुरु=समृद्धान् कुरु ) उदरं प्रासि (=अस्मदीयमुदरं पूरय ) [ च ] । हे पूषन्, इह ( संपदामर्जने तथा उदरभरणे) [अस्मभ्यं ] क्रतुं ( =प्रज्ञानं ) विदः ( =लम्भय ) ॥

अर्थ, 'बरोबर येणारांस आम्हांपलीकडे घेऊन जा.' म्हणजे, आम्हांस ठकविण्याकरितां जे ठग म्हणजे रस्तेचोर आम्हांबरोबर येतील आणि आम्हांशीं गोड गोड बोलून शेवटीं आमचा घात करण्याचा बेत करितील त्यांणीं आम्हांबरोबर चालण्याचें सोडून द्यावें आणि पुढें चालतें व्हावें असें कर.

'याविषयीं आम्हांस बुद्धि दे'=' इह क्रतुं विदः'. 'विद्' धातूचा अर्थ 'देणें' अथवा 'प्राप्त करणें' असा होतो याविषयीं 'यया ज्योतिर्विदासि नः' ऋ. ९. ३५. १. आणि 'विदद् गातुं तनयाय' ऋ. १. ९६. ४. हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य यांचें आणि दुसऱ्या पुष्कळ मंत्रांचें प्रमाण आहे. 'याविषयीं' म्हणजे आम्हांस ठकविण्यास जे दुष्ट चोर आम्हांबरोबर रस्त्यानें जातील ते ठग आहेत असें समजण्याविषयीं आणि त्यांच्या फांशांत न पडण्याविषयीं, आणि

८. जिकडे गवत चांगलें आहे तिकडे [आम्हांस] घेऊन जा. मार्गीं नवीन त्रास [होऊं देऊं] नको. हे पूषा, ह्याविषयीं [आम्हांस] बुद्धि दे.

8. Lead us to where there is good grass, [let there be] no new distress on the road. Give [ us ], Pûshâ, wisdom in this.

९. [आम्हांस] [धनसंपत्ति] दे, [आम्हांस] भरून टाक, आणि [आम्हांस पाहिजेल तें] दान कर; [आम्हांस] समृद्ध कर, [आणि] [आमचें] पोट भर. हे पूषा, ह्याविषयीं [आम्हांस] बुद्धि दे.

9. Give [unto us], make [us] full, and be liberal [to us]; make [ us ] affluent, [and] fill [our] belly. Give [ us ], Pûshâ, wisdom in this.

वाईट रस्ता सोडून चांगल्या रस्त्यानें जावें अशाविषयीं.

या मंत्रांत पूषा देवाला अशी प्रार्थना आहे कीं, त्याणें वाटसरांस रस्तेचोरापासून उपद्रव होऊं देऊं नये. आणि सुरक्षित अशा मार्गांना जाण्याविषयीं बुद्धि द्यावी.

रस्त्यावर संरक्षण करणें हा जो पूषा देवाचा धर्म तो या मंत्रांत उघड आला आहे. आणखीहि याचें स्वरूप काय आहे तें दाखविणारे मंत्र दुसरे पुढें लवकरच येतील.

८. हा मंत्र फार चमत्कारिक आहे. यांत पूषा देवास अशी प्रार्थना आहे कीं. 'जेथें गवत चांगलें असेल तेथें आम्हांस व आमच्या गुराढोरांस घेऊन जा. आणि आम्ही तेथें जाऊं लागलों म्हणजे मार्गांत आम्हांस नवीनच कांहीं तरी संकट प्राप्त होईल तर तें न होई असें कर; आणि चांगलें गवत असलेल्या ठिकाणीं जाण्याविषयीं आणि मार्गांत नवीन त्रास टाळण्याविषयीं आम्हांस बुद्धि दे.'

चांगलें गवत असलेल्या स्थळीं घेऊन जाण्याविषयीं पूषा देवास प्रार्थना आहे त्यापेक्षां पूषा देव हा आर्यलोकांना गुरें चांगल्या चाऱ्याच्या ठिकाणीं नेण्याची स्फूर्ति देणारा 'गवळदेव' होय असें अनुमान होतें. आणि इतर ठिकाणीं पूषा देवाविषयीं जें काय सांगितलें आहे त्यावरूनहि तो गवळदेवाप्रमाणें एक देव आहे असें दिसून येतें. ऋ. ६. ५३. ९ यांत त्याच्या हातीं गुरांस वळविण्याचा परोणा (आरा) असतो असें सांगितलें आहे. ऋ. ६. ५८. २ यांत त्याला 'पशुपा' म्हणजे 'मेंढपाळ' आणि 'अजाश्व' म्हणजे बकऱ्यावर बसून जाणारा असें म्हटलें

**न पूषणं मेथामसि सूक्तैरभि गृणीमसि ।**
**वसूनि दस्ममीमहे ॥ १० ॥ २९ ॥**

न । पूषणम् । मेथामसि । सुऽउक्तैः । अभि । गृणीमसि ।
वसूनि । दस्मम् । ईमहे ॥ १० ॥ २९ ॥

## भाषायाम्.

१०. पूषणं न मेथामसि ( =न मेथामः=वयं न निन्दामः) [ अपि तु ] [ तं ] सूक्तैः ( =सुष्टूक्तैर्गीतिरेतादृशैः ) अभि गृणीमसि ( =अभिगृणीमः=अभिस्तुमः ) । दस्मं ( =शत्रूणामुपक्षपयितारं ) [ तं ] [ वयं ] वसूनि ( =धनानि ) ईमहे ( =प्रार्थयामहे ) ॥

आहे. परंतु इतक्यावरून तो केवळ गवळदेवासारिखा एकादा मोठ्याशा झाडाखालीं प्रस्तररूपानें वसून राहणारा निरर्थक देव होय असें नव्हे. पूषा म्हणजे वस्तुतः सूर्यप्रकाशरूपी देवता असल्यामुळें, ज्यापेक्षां सूर्यकिरणांस गाई असें वेदांत म्हटलें आहे त्यापेक्षां त्या गाईंचा पाळणारा जो देव तो सूर्यरूपी मेंढपाळ होय असें रूपक आहे.

९. या मंत्रांत संपत्ति व धनधान्य जें इष्ट असेल तें मिळावें आणि पोट भरावें असें करण्याविषयीं पूषा देवाला प्रार्थना केलेली आहे; आणि संपत्ति मिळवून घेण्याविषयीं आणि पोट भरण्याविषयीं पूषा देवानें बुद्धि द्यावी असें शेवटीं सांगितलें आहे. या ऋचेवरून पूषा देवाचा जो समृद्धि करण्याचा धर्म तो प्रगट होतो.

' ' दे ' इतक्या एकाच अर्थाचे अनेक शब्द यांत आहेत, त्या एकमेकांत कांहीं भेद विवक्षून त्यांची योजना केली आहे असें नाहीं. परंतु वेगवेगळ्या शब्दांनीं एकच अर्थाचें पुष्टीकरण केलें आहे.

१०. पूषाला आम्ही निंदीत नाहीं [त्याला आम्ही], स्तोत्रांनीं गातों. पराक्रमशाली पूषापाशीं [आम्ही] धनसंपत्ति याचितों.

10. We do not reproach Púshâ, we praise him with [our] hymns. We ask wealth of him.

१०. हा सूक्ताचा उपसंहार आहे. आणि ऋषि म्हणतो कीं, 'पूर्वीच्या सर्व मंत्रांत जें आम्हीं पूषा देवाला म्हटलें तें त्याला दोष देण्याच्या हेतूनें अथवा आक्षेपबुद्धीनें म्हटलें आहे असें नाहीं, परंतु आम्हीं जें त्याला म्हटलें आहे तें स्तोत्रपर आहे, आणि आम्ही विनयबुद्धीनें त्याजवळ धनसंपत्तीतें मागून घेत आहों.'

'पराक्रमशाली' =' दस्मम्.' या अर्थाला ऋ. १. ६२. ५. या मंत्रावरील सायणभाष्य व इतर दुसरीं अनेक प्रमाणं आहेत. 'शत्रूंचा नाश करून पराक्रम दाखविणारा' असा या विशेषणाचा आशय आहे.

## सूक्तम् ४३..

घोरपुत्रः कण्व ऋषिः । रुद्रो देवता । तृतीया तु रुद्रदेवताका मैत्रावरुणी च ।
७–९. इत्येतस्यान्त्यस्य तृचस्य सोमो देवता । गायत्री च्छन्दः । अन्त्यानुष्टुप् ॥

**कद्रुद्राय प्रचेतसे मीळ्हुष्टमाय तव्यसे ।**
**वोचेम शंतमं हृदे ॥ १ ॥**

कत् । रुद्राय । प्रऽचेतसे । मीळ्हुःऽतमाय । तव्यसे ।
वोचेम । शंऽतमम् । हृदे ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. प्रचेतसे ( =प्रकृष्टज्ञानवते ) मीळ्हुष्टमाय ( =अतिशयेन अभीष्टकामवर्षकाय) तव्यसे ( =तवीयसे=अतिशयेन प्रवृद्धाय=बलवत्तमाय ) रुद्राय कत् ( =किं=कीदृशं ) हृदे ( =मनसे ) शंतमं ( =सुखतमं ) [ स्तोत्रं ] वोचेम ( =गायेम ) ? ॥

कीदृशं स्तोत्रं गायेम येन रुद्रस्य मनः सुखिततमं भवेदिति काकुः ॥

## सूक्त ४३.

ऋषि—घोराचा पुत्र कण्व या नांवाचा (पूर्व सूक्ताचा जो कर्ता तोच). देवता—रुद्र. परंतु ३ री ऋचा मित्रावरुणौ ह्या देवांविषयींहि आहे, आणि ७—९ ह्या तीन ऋचा सोम या देवाविषयीं आहेत. वृत्त —गायत्री; परंतु ९ व्या मंत्राचें अनुष्टुप्.

१. महाज्ञानी, महोदार [आणि] महाबल रुद्राला [आपण] कोणतें [स्तोत्र] गाऊंया [कीं जें] [त्याच्या] मनाला अत्यंत सुख देईल ?

## HYMN 43.

To *Rudra* (or the God of Storm and Father of the *Maruts*). By *Kaṇva* son of *Ghora;* but verse 3 is also addressed to *Mitrâ-Varuṇau*, and verses 7-9 are addressed to *Soma*. Metre—*Gâyatrî*, but of 9 the *Anushṭup*.

1. What [hymn] shall we sing to all-wise, all-liberal [and] all-powerful Rudra, that shall be most agreeable to [his] heart ?

---

१. हें सूक्त रुद्राविषयीं आहे. आधुनिक काळीं रुद्र आणि शिव एकच समजतात. परंतु शिवानें स्वरूप जं आधुनिक ग्रंथांत व प्रचारांत आढळतें त्यांत आणि वैदिक युगांतील रुद्राच्या स्वरूपांत फार अंतर आहे. रुद्र हा वेदकाळीं वातरूपी देवता होय असें लोक समजत असें वेदमंत्रांवरून अनुमान काढतां येईल असें दिसून येतें. वायुरूपी जे मरुत् म्हणून देवविशेष वेदांत प्रसिद्ध आहेत त्यांचा बाप रुद्र होय असें (ऋ. १. ११४. ६ इ०) सांगितलें आहे. तो 'वज्रबाहु' होय, म्हणजे त्याच्या खांद्यावर वज्र असतें (ऋ. २. ३३. ३.). तो 'स्थिरधन्वा' होय, म्हणजे त्याचें धनुष्य बळकट आहे आणि त्यावरून तो चपळ बाण मारणारा ('क्षिप्रेषु') होय (ऋ. ७. ४६. १). तो विद्युद्रूपी बाण आकाशांतून सोडित असतो (ऋ ७. ४६. ३), आणि तो बाण दुष्टांवर मारीत असतो पण सज्जनांवर मारीत नसतो (ऋ. ६. २८. ७). रुद्र सज्जनांला औषधें देऊन आरोग्य करितो. रुद्र आरोग्य करितो आणि उत्तम औषधें तो देतो, आणि तो उत्तम वैद्य होय असें अनेक ठिकाणीं सांगितलें आहे ('भेषजेभिः भिषक्तमं त्वा भिषजां शृणोमि' ऋ. २. ३३. ४.). तो सकल मनुष्यांस औषधें देऊन जगवितो म्हणून म्हणा, अथवा पाहिजे त्या दुसऱ्या कारणामुळें म्हणा, पण रुद्राला 'जगाचा पिता' (='भुवनस्य पिता') असें वेदांत म्हटलेलें आढळतें (ऋ. ६. ४९. १०, 'भुवनस्य ईशानः' ऋ. २. ३३. ९). आणि त्या-

**यथा॑ नो॒ अदि॑तिः कर॒त्पश्वे॒ नृभ्यो॒ यथा॒ गवे॑ ।**
**यथा॑ तो॒काय॑ रु॒द्रिय॑म् ॥ २ ॥**

यथा॑ । नः॒ । अदि॑तिः । कर॑त् । पश्वे॑ । नृऽभ्यः॑ । यथा॑ । गवे॑ ।
यथा॑ । तो॒काय॑ । रु॒द्रिय॑म् । ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. यथा ( =येन प्रकारेण ) अदितिः ( =भूमिः ? ) नः ( =अस्मभ्यं ), पश्वे ( =पशवे=अस्मदीयपशुभ्यः ) नृभ्यः ( =अस्मदीयपुरुषेभ्यः ), यथा (=येन प्रकारेण ) गवे ( =अस्माकं गोजातये ), यथा ( =येन प्रकारेण) तोकाय ( =अस्मदीयापत्याय ) रुद्रियं ( =रुद्रसंबन्धि भेषजं ) करत् ( =कुर्यात्=दद्यात् ),

ह्याच मनुष्यांचा राजा ( 'क्षयद्वीर ') असेंहि म्हटलें आहे. त्याचा वर्ण आरक्त ('अरुष ') होय. त्याच्या डोक्यावर जटा आहेत (' जटिल ' ऋ. १. ११४. १ ). असें रुद्राचें रूप ऋग्वेदांत वर्णिलेलें आहे.

याशिवाय रुद्राच्या गळ्यांत रुंडमाळा असल्याविषयीं, आणि तो आंगाला विभूति लावितो याविषयीं; अथवा तो श्मशानवासी आहे, त्याचे अनेक गण आहेत, तो नित्य तप करितो, त्याचे शिरावर गंगा आहे, मांडीवर पार्वती आहे, त्याचे कुमार आणि गणपति असे दोघे पुत्र आहेत, तो जगाचा संहार करितो, तो सत्त्व पाहण्याकरितां दीन मनुष्यांस महाभयंकर संकटात घालितो इत्यादि जें शिवाचें विशेष स्वरूप त्याचा उल्लेख ऋग्वेदांत आढळत नाहीं; आणि नंदीवर बसून जाणें याविषयींहि कोठें सांगितलेलें आढळत नाहीं. आणि 'शिव' हें देवाचें नांव या अर्थी ऋग्वेदांत मुळींच आलेलें नाहीं. ' शिव ' हा शब्द तर पुष्कळ ठिकाणीं आलेला आहे. पण तें नेहमी विशेषण असून ' कल्याणकारक,' ' सुखकर ' असा त्याचा अर्थ होत असतो. मात्र ' शिव ' हें विशेषण ऋग्वेदांत अग्नि, इंद्र, द्यावापृथिवी इत्यादि देवांस जसें लाविलेलें आढळतें तसेंच रुद्र देवासहि केव्हां केव्हां लाविलेलें आढळतें (ऋ. १०. ९२. ९). मग शिवाचें (महादेवाचें ) लिंग, कीं ज्याविषयीं लिंगपुराणादिक ग्रंथ आतां प्रसिद्ध आहेत, आणि जें सर्व आर्यावर्तात पूजा ग्रहण करीत आहे, त्याविषयीं तर कांहींच सांगितलेलें नाहीं इतकेंच नव्हे, पण ' लिङ्ग' हा शब्द देखील ऋग्वेदांत आलेला नाहीं. आणि रुद्रैकभूत जो शिव ( महादेव ) तो भूतांचा पति आहे, आणि भूतें त्याला वश आहेत इत्यादि ज्या साधारण लोकांत कथा आम्ही तुर्त ऐकितों, त्याविषयींहि येथें कांहीं उल्लेख आढळत नाहीं. त्याप्रमाणेंच शिवैकभूत रुद्राला सोमवार प्रिय होत इतर वारांविषयीं तो उदासीन आहे; बिल्वपत्रें त्यास प्रिय होत इतर वनस्पतींविषयीं तो उदासीन होय; त्याला तीन नेत्र आहेत, आणि तो शीघ्रकोपी

२. जेणेंकरून अदिति आम्हांला, [आमच्या] पशूंला, माणसांला, जेणेंकरून [आमच्या] गाईंला [आणि] जेणेंकरून [आमच्या] मुलांबाळांला रुद्राचें औषध मिळवून देईल,

2. That Aditi may obtain for us, for [our] cattle, for [our] men, that [she may obtain] for [our] cows, [and] that [she may obtain] for [our] children, the medicament of Rudra;

असून क्रोधाविष्ट झाला म्हणजे ललाटस्थ मध्य नेत्र उघडितो; आणि तसा त्याला एकदा क्रोधप्रसंग आल्यामुळें त्याणं सर्वजगत्प्रिय अनंगास जाळून भस्म केलें; ह्या ज्या कथा त्यांविषयीं ह्या महावेदांत कांहीं सांगितलेलें आढळत नाहीं. परंतु रुद्र हा महापराक्रमी, महादानशील, महाकृपाळु, दुर्जनाचा नाशक, सज्जनाचा पालक, सर्वांस आरोग्यदायक होय असें त्याचें सौम्य आणि प्रीतिपात्र स्वरूप वर्णिलेलें आहे.

'कोणतें'=' कत्.' 'यः' याचें नपुंसक रूप जसें 'यत्,' 'सः' याचें जसें 'तत्' (त=स) तसें 'कः' याचें 'कत्' हें आर्ष रूप आहे. आमच्या अर्थास ऋ. ४. ३. ५ 'कत् नः आगः' (=आमचें पाप कोणतें?) याजवरील सायणभाष्याचें प्रमाण आहे. शिवाय 'कथा महे रुद्रियाय ब्रवाम कद् राये चिकितुषे भगाय' (=रुद्रपुत्र जे मरुत् त्यांच्या गणासाठीं आपण कशी स्तुति करूंया? द्रव्यलाभासाठीं प्रज्ञानवंत भगाला कोणतें स्तोत्र गाऊंया?) ऋ.५.४१.११ याजवरील सायणभाष्य पहा. आणि ऋ. ८.३.११; ८. ६६. ९; १०. ९९. १ हेहि मंत्र पहा.

'[कीं जें] [त्याच्या] मनाला अत्यंत सुख देईल.'=' शंतमं हृदे.' अक्षरशः अर्थ ' मनाला अत्यंत सुखद [असें].'

ह्या सगळ्या सूक्ताचा (१ पासून ९ वे ऋचेपर्यंत) गर्भाधानाच्या वेळीं 'दुष्टरजःशांति' म्हणून जें कर्म करितात त्यांत जप करितात. परंतु रजोदर्शनांत जर कांहीं दुष्ट असेल, आणि त्यानिमित्त कांहीं शांति करणें असेल, तर ती हें सूक्त जपल्यानें कशी होईल त्याचा विचार हें सूक्त वाचून वाचून आणि त्याच्या अर्थाकडे नीट लक्ष्य देऊन देऊन करावा.

या सूक्ताच्या पहिल्या साहा ऋचा ग्रहयज्ञांत म्हणत असतात. म्हणजे राहु, केतु, इत्यादिक जे नव ग्रह त्यांची कृपा व्हावी आणि नित्य कर्माच्या संबंधानें, नैमित्तिक कर्माच्या संबंधानें अथवा कांहीं इष्ट कामना पूर्ण करून घेण्याच्या संबंधानें त्यांनीं उपद्रव करूं नये म्हणून जे कर्म करितात त्यांत रुद्राला आहुति देतात त्या वेळीं ह्या पहिल्या साहा ऋचा म्हणतात. पण ग्रहयज्ञांत रुद्राचें काय काम आहे हा प्रश्न ह्या सूक्ताचा अर्थ व वैदिक रुद्राचें स्वरूप मनांत आणिल्यावर सूचतो, पण उत्तर मिळत नाहीं.

२–४. दुसऱ्यापासून चवथ्या मंत्रापर्यंत कुलक आहे, म्हणजे वाक्यसंबंध एकच आहे. म्हणून तिहीं मंत्रांवरच्या टीपा एकत्रच लिहितों.

**यथा नो मित्रो वरुणो यथा रुद्रश्चिकेतति ।**
**यथा विश्वे सजोषसः ॥ ३ ॥**

यथा । नः । मित्रः । वरुणः । यथा । रुद्रः । चिकेतति ।
यथा । विश्वे । सऽजोषसः ॥ ३ ॥

**गाथपतिं मेधपतिं रुद्रं जलाषभेषजम् ।**
**तच्छंयोः सुम्नमीमहे ॥ ४ ॥**

गाथऽपतिम् । मेधऽपतिम् । रुद्रम् । जलाषऽभेषजम् ।
तत् । शंऽयोः । सुम्नम् । ईमहे ॥ ४ ॥

## भाषायाम्.

३. यथा ( =येन प्रकारेण ) मित्रः, वरुणश् [च], यथा रुद्रश् [च ] नः (=अस्मान् ) चिकेतति ( =अनुग्राह्यत्वेन जानीयात् ) यथा [ च ] सजोषसः (=समानप्रीतयः=समस्ताः) विश्वे [ देवा] [नश्चिकेतन्ति=अनुग्राह्यत्वेन जानीयुः],

४. तत् ( =तथा=तेन प्रकारेण ) [ वयं ] गाथपतिं ( स्तुतिपतिं=स्तोत्राधिपतिं ) मेधपतिं ( =यज्ञाधिपतिं ) जलाषभेषजं ( =सुखरूपौषधोपेतं ) रुद्रं शंयोः ( =शंयुनामकाय कस्मैचित्पुरुषाय दत्तपूर्वं ) सुम्नं ( =प्रसादम् ) ईमहे ( =प्रार्थयामहे ) ॥

पहिल्या मंत्रांत रुद्राची स्तुति कशी करूंया म्हणून कवींनें आपल्याआपणासच प्रश्न केला. आतां तो म्हणतो की 'जेणेंकरून अदिति देवी आम्हांवर कृपा करील आणि आमच्या गुरामाणसांस आणि मुलांबाळांस बरें करील ( २ ), जेणेंकरून मित्र. वरुण, आणि स्वतः रुद्र आणि विश्वेदेव हे आम्हांवर कृपा करितील ( ३ ), असा जो रुद्राचा प्रसाद पूर्वी शंयुनामक पुरुषास झाला, तो प्रसाद आम्हीं रुद्रापाशीं मागून घेऊंया; म्हणजे तो प्रसाद जेणेंकरून होईल असें स्तोत्र रचून गाऊंया ( ४ )'. म्हणजे तात्पर्य असें कीं, आपण असें स्तोत्र गाऊं कीं जेणेंकरून रुद्र आम्हांवर प्रसन्न होईल, आणि तो प्रसन्न झाला म्हणजे अदिति ( पृथिवी), मित्र ( दिवसरूपी देव), वरुण ( रात्रिरूपी देव ) आणि इतर देव हेहि आम्हांवर प्रसन्न होतील.

दुसऱ्या मंत्रांत ' अदिति ' म्हणजे पृथ्वीरूपी देवी असें सायणाचार्यच म्हणतात तें योग्य दिसतें. कारण अदिति प्रसन्न झाली तर ( म्हणजे जमीन पिकली तर ) गुरांढोरांस आणि मुलांबाळांस सुख होईल, आणि रोगराई नाहींशी होईल, हें सांप्रतकाळीं जो दक्षिणेंत दुष्का-

३. जेणेंकरून मित्र [आणि] वरुण, जेणेंकरून रुद्र, [आणि] जेणेंकरून समस्त विश्वे[देव] आम्हांला कृपादृष्टीनें पाहतील,

४. अशा रीतीनें आम्ही स्तवनपति, यज्ञपति, [आणि] सुखरूपौषधसंपन्न [जो] रुद्र त्याचा [जो] शंयूस दिला होता तो प्रसाद प्रार्थितों.

3. That Mitra [and] Varuna, that Rudra, [and] that All the Gods combined may look upon us with favour;

4. So we pray to Rudra the lord of prayer, the lord of sacrifice [and] possessed of healing medicaments for the favour [shown by him] to S'aṁyu [before];

---

ळाचा भयंकर प्रसंग पडला आहे त्याच्या कारणाचा विचार केला असतां सहज ध्यानांत येईल.

तिसरे मंत्रांत जो 'सजोषसः' (- 'समस्त') हा शब्द आहे त्याचा अर्थ अक्षरशः 'एकत्र खाण्याजेवण्याचें सुख भोगणारे' असा आहे. 'विश्वेदेवांस' यज्ञहवि खाण्याकरितां वेगवेगळे न बोलावितां एकत्रच आह्वान करितात यास्तव त्यांस तसें विशेषण दिलें आहे.

चवथ्या मंत्रांत 'स्तवनपति' शब्द आहे त्याचें तात्पर्य असें कीं, जो कोणीहि स्तवन करितो तें रुद्राचेंच करितो, आणि जो कोण यज्ञ करितो तो रुद्रासाठींच करितो ('यज्ञपति') असं कवीचे मनांत म्हणावयाचें आहे.—'सुखरूपौषधिसंपन्न'='जलाषभेषजम्.' रुद्र हा मोठा वैद्य होय असें पूर्वीं सांगितलेंच आहे.—'जो शंयूस दिला होता तो'='शंयोः.' अक्षरशः, 'शंयूचा.' हा अर्थ आम्हीं सायणानुसरानें घेतला आहे. सूक्त ३४ मंत्र ६ यावर दिलेली 'शंयु' शब्दावरची टीप पहा. कितीएक विद्वान् 'शंयोः' हें प्रस्तुत मंत्रांत षष्ठीपद समजून 'सुखकारक' असा (ऋ. १०. १४३. ६ यास अनुसरून) अर्थ घेऊन तें 'रुद्रस्य' अशा अध्याहृत पदाचें विशेषण घेतात. बरें आहे, कारण 'शंयु' हा कोण होता (जर कोण असेल तर) याविषयीं खरोखर कांहींच टाऊक नाहीं. आणि १. ३४. ६; १०. १४३. ६ आणि हा मं[illegible] ह्या तीन स्थलांशिवाय आणखी दुसरीं प्रयोगान्तरें नाहींत.

यः शुक्र इव सूर्यो हिरण्यमिव रोचते ।
श्रेष्ठो देवानां वसुः ॥ ५ ॥ २६ ॥

यः । शुक्रःऽइव । सूर्यः । हिरण्यम्ऽइव । रोचते ।
श्रेष्ठः । देवानाम् । वसुः ॥ ५ ॥ २६ ॥

शं नः करत्यर्वते सुगं मेषाय मेष्ये ।
नृभ्यो नारिभ्यो गवे ॥ ६ ॥

शम् । नः । करति । अर्वते । सुऽगम् । मेषाय । मेष्ये ।
नृऽभ्यः । नारिऽभ्यः । गवे ॥ ६ ॥

## भाषायाम्.

५. यो [ रुद्रः ] शुक्रः सूर्यइव ( =दीप्तिमान् सूर्यो यथा ) हिरण्यमिव ( =सुवर्णमिव ) [ च ] रोचते( =शोभते ) । [ यो ] देवानां [ मध्ये ] श्रेष्ठो वसुः ( =उत्तमश् ) [ च ] [ सन् रोचते ] ॥

६. [ स रुद्रः ] नः ( =अस्माकम् ) अर्वते ( =अश्वाय=अश्वजाताय ) शं ( =सुखं ) करति ( =करोति ), [ अस्माकम् ] मेषाय मेष्ये [ च ] ( =मेषजाताय मेषीजाताय च ) सुगं ( =कल्याणं ) [ करति=करोति ], [ अपि च ] नृभ्यः नारिभ्यश् [ च ] [ अस्माकं ] गवे ( =गोजाताय ) [ च ] [ शं करोति ] ॥

५. जो [रुद्र] तेजःपुंज सूर्या-प्रमाणें [ आणि ] सुवर्णाप्रमाणें शोभतो. [आणि जो] [सकल] देवांमध्यें श्रेष्ठ [ आणि ] उत्तम [होय].

5. Who shines like the effulgent sun, [shines] like gold: the highest and the best of the gods.

६. [तो रुद्र] आमच्या घोड्यांचा संभाळ करितो. आमच्या मेंढ्याचें [आणि] मेंढीचें बरें [करितो]. आमच्या पुरुषांचें [आणि] स्त्रियांचें [आणि] गुरांचें कल्याण करितो.

6. He does good to our horses, [causes] comfort to [our] rams [and] ewes, [comfort] to [our] men, women [and] to [our] cows.

५. या मंत्राचा भावार्थ स्पष्टच आहे. वर नवव्या मंत्रांत रुद्राजवळ प्रसाद याचितों असें सांगितलें, तो रुद्र कसा आहे तें या मंत्रांत विशेषविधीनें सांगितलें आहे.

६. या मंत्राचा भावार्थ स्पष्टच आहे. रुद्र आमचें, आमच्या गुरांढोरांचें आणि आमच्या नोकरानोकरींचें कल्याण करित असतो असें ऋषीचें विवक्षित आहे.

यांत चमत्कारिक इतकेंच आहे कीं, ऋषि आपल्या मेंढरांचें रुद्रदेव कल्याण करितो असें म्हणतो. हा ऋषि सूक्तकर्ता आहे त्यापेक्षां त्याच्या शुचिर्भूतत्वाविषयीं शंकाच नाहीं. असें असतां त्याच्या घरीं घोडे, गाई वगैरे गुरें असत इतकेंच नव्हे पण मेंढरें सुद्धां असत. या कलियुगांत महादेव आमच्या मेंढरांचें संरक्षण करो असें म्हणणारा ब्राह्मण मिळणार नाहीं. आणि मेंढरें राखणें हें ब्राह्मणांस फार अनुचित असें आपण मानीत असल्यामुळें बिचारे मेंढपाळ जे धनगर त्यांस अतिनीचत्व आलें आहे. तेव्हां खरोखरच कृतयुगांत आणि या आमच्या शुचिर्भूत कलियुगांत अंतर नाहीं असें कोण म्हणेल?

'घोड्यांचा'=' अर्वते.' हें चतुर्थीचें एकवचन अनेकवचनार्थी आहे. याप्रमाणेंच 'मेषाय' (=मेंढ्याचें) आणि 'मेष्ये' (=मेंढीचें) आणि 'गवे' हींहि अनेकवचनार्थी एकवचनें आहेत.

'पुरुषांचें [आणि] स्त्रियांचें' हे पुरुष आणि स्त्रिया म्हणजे नोकर आणि कुणबिणी समजल्या पाहिजेत असें दिसतें. हा कण्वऋषि घोडे, गुरें, मेंढरें आणि

**अस्मे सोम श्रियमधि नि धेहि शतस्य नृणाम् ।**
**महि श्रवस्तुविनृम्णम् ॥ ७ ॥**

अस्मे इति । सोम । श्रियम् । अधि । नि । धेहि । शतस्य । नृणाम् ।
महि । श्रवः । तुविऽनृम्णम् ॥ ७ ॥

**मा नः सोमपरिबाधो मारातयो जुहुरन्त ।**
**आ न इन्दो वाजे भज ॥ ८ ॥**

मा । नः । सोमऽपरिबाधः । मा । अरातयः । जुहुरन्त ।
आ । नः । इन्दो इति । वाजे । भज ॥ ८ ॥

## भाषायाम्.

७. हे सोम, [ त्वम् ] अस्मे अधि ( =अस्मासु ) शतस्य नृणां ( =शतपुरुषाणां ) श्रियम् ( =आधिपत्यं ) निधेहि ( =स्थापय=अस्मभ्यं शतपुरुषाणामाधिपत्यं देहि), तुविनृम्णं ( =प्रभूतबलयुक्तं ) महि ( =महत् ) श्रवः ( =अन्नादि धनं ) [ निधेहि=देहि ] ॥

८. सोमपरिबाधः (=सोमदेवस्य परितो बाधका=यागरहिता) नः (=अस्मान्) मा [जुहुरन्त =मा हिंसन्तु ]. [ तथा ] अरातयः ( =शत्रवो ) [नो] मा जुहुरन्त (=मा हिंसन्तु) । [ अपि च ] हे इन्दो ( =सोम ), [ तव परिबाधकानाम् अरातीनां च हिंसापरिहारार्थं ] [ त्वं ] नः ( =अस्मान् ) वाजे ( =तव बले ) आभज ( =भागोपेतान् कुरु=तव बलस्य भागम् अस्मभ्यं देहि ) ॥

चाकरलोक व कुणबिणी अशा संपत्तीनें संपन्न आहे त्यापेक्षां प्राचीन ऋषि म्हणजे सर्वच केवळ निरिच्छ आणि अरण्यांत गुहेगुंफेमध्यें एकटे राहाणारे तपस्वी असत, अशी जी समजूत आहे तिला पुरता आधार नाहीं असें समजलें पाहिजे.

७. हे सोमा, [ज्यामध्यें], शतशः मनुष्यांचें आधिपत्य [आहे असें वैभव तूं] आम्हांला दे; जीजमध्यें पुष्कळ बळ भरलें आहे अशी मोठी संपत्ति [तूं] [आम्हांस दे].

७. O Soma, give unto us the mastery of a hundred men, [give unto us] great wealth combined with great power.

८. सोमाची निंदा करणारे [अधार्मिक लोक] आम्हांस [उपद्रव] न [करोत], शत्रु[जन] [आम्हांस] उपद्रव न करोत. हे सोमा, [तूं] आम्हांस बळ दे.

8. [May] the revilers of Soma never [hurt] us, may enemies never hurt [us]. Give us, O Soma, a share in [thy] strength.

७. ही ऋचा 'सोमा' विषयीं आहे. सोमदेवाविषयीं सूक्त ४ मं. २ यावर दिलेली टीप पहा.

रुद्राविषयीं हें सूक्त असतां मध्येंच सोमदेव कसा येतो असा प्रश्न निघतो; ऋ. ६. ७४ या सूक्तांतहि रुद्र आणि सोम या उभयतांस एकत्र आह्वान केलें आहे, आणि मनुष्यांचें आणि पशु, गाई इत्यादिकांचें कल्याण करण्याविषयीं प्रार्थना केली आहे. हे दोघेहि औषधें देऊन कल्याण करणारे देव आहेत असें त्यांचें स्वरूप असल्यामुळें दोघांचेंहि एकत्र आह्वान होत असतें असें दिसून येतें.

८. या मंत्राचा भावार्थः–'हे सोमा, तुझ्या उपासनेला विघ्न करणारे आणि तुझा द्वेष करणारे व अधार्मिक जे लोक त्यांपासून आम्हांस उपद्रव न होई असें कर; आणि त्या लोकांपासून आम्हांस उपद्रव न होऊं देण्याची शक्ति तूं आम्हांस दे.'

'हे सोमा'='इन्दो.' इन्दु हें सोमाचें एक नांव आहे. 'इन्दु' शब्दाचा मूळ अर्थ थेंब. सूक्त २ मंत्र ४, सू. १५ मंत्र १, सू. १६ मं. ६ इत्यादि पहा. नंतर 'इन्दु' शब्दाचा अर्थ 'सोमरस असा होऊं लागला. आणि नंतर सोमरसाची अधिदेवता जी सोमरूपिणी देवता तिचेंहि तें नांव झालें, आणि प्रस्तुत मंत्रांतल्या शेवटल्याच अर्थी 'इन्दु' शब्दाचा प्रयोग आहे.

**यास्ते प्रजा अमृतस्य परस्मिन्धामन्नृतस्य ।**
**मूर्द्धा नाभा सोम वेन आभूषन्तीः सोम वेदः ॥९॥२७॥८॥**

याः । ते । प्रऽजाः । अमृतस्य । परस्मिन् । धामन् । ऋतस्य ।
मूर्द्धा । नाभा । सोम । वेनः । आऽभूषन्तीः । सोम । वेदः ॥९॥२७॥८॥

## भाषायाम्.

९. हे सोम, ऋतस्य परस्मिन् धामनि ( =यज्ञरूपस्य सत्यस्य उत्तुङ्गे धामनि=उत्तुङ्गे यज्ञगृहे ) या अमृतस्य ते ( =मरणरहितस्य तव ) प्रजा [ भवन्ति ] [ तासां ] [ त्वं ] मूर्द्धा ( =शिरःस्थानीयो राजा ) [ भवन् ] [ ता ] वेनः ( =कामयस्व=ताभ्यः प्रसन्नो भव ). [ तस्मिन् धामनि ] नाभा ( =नाभौ=नाभिभूते वेद्याख्ये स्थाने ) [ त्वाम् ] आभूषन्तीः ( =अलंकुर्वन्तीः=परिचरन्तीः ) [ ता ] वेदः ( =जानीहि=अनुग्राह्यत्वेन जानीहि ) ॥

ये जनास्त्वामुत्तुङ्गे यज्ञगृहे तव प्रजा भूत्वा यजन्ते वेद्यां च त्वां राजानमिव परिभूषयन्ति तासां त्वं राजा भूत्वा ताः कामयमानस्ता अनुगृहाणेत्यर्थः ॥

९. हे सोमा, जे लोक उंच यज्ञमंडपांत तुज मरणमुक्ताच्या प्रजा [होतात] [त्यांचा तूं] राजा [होऊन] [त्यांजवर तूं] दया कर. हे सोमा, [यज्ञ]वेदीच्या ठायीं [तुझी] सेवा करणाऱ्या [ ज्या त्या प्रजा] त्यांजला [तूं ] कृपादृष्टीनें पाहा.

9. [ Those ], O immortal Soma, who [ become ] thy subjects in the highest house of sacrifice,—love [them] [as] [their] king, listen to them as they worship [thee] at the altar.

९. भावार्थः—हे 'अमर सोमा, या जगांत सर्वच मनुष्यें तुझी सेवा करितात असें नाहीं; तर जीं मनुष्यें तुला राजा करून तुझ्या प्रजा होतात आणि मोठा उंच यज्ञमंडप घालून त्यांत वेदी स्थापन करून त्याजवर हव्य वगैरे देऊन तुझी सेवा करितात तशांवर तूं राजाप्रमाणें प्रसन्न हो आणि त्यांच्या मनकामना पूर्ण कर.'

'यज्ञमंडपांत '='ऋतस्य धामन्.' ऋ. ७. ३६. ५ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

'राजा '=' मूर्धा.' अक्षरशः अर्थ, 'डोकें,' 'माथा,' 'शिर.' ऋ. ८. ७५. ४ पहा.

'कृपादृष्टीनें पहा '=' वेदः.' अक्षरशः अर्थ ' जाण ' असा आहे. म्हणजे 'दुर्लक्ष्य करूं नको,' ते काय करितात तें पाहिलें न पाहिलेंसें करूं नको. अर्थात्-'कृपा कर,' ' कृपावलोकन कर.'

## सूक्तम् ४४.

कण्वपुत्रः प्रस्कण्व ऋषिः । १, २ इत्येतयोरग्निरश्विनावुषाः ३–१४ इत्यासाम् अग्निः । द्वितीयाचतुर्थ्याद्या युजः सतोबृहत्यः । प्रथमातृतीयाद्या अयुजो बृहत्यः ।

**अग्ने विवस्वदुषसश्चित्रं राधो अमर्त्य ।**
**आ दाशुषे जातवेदो वहा त्वमद्या देवाँ उषर्बुधः ॥ १ ॥**

अग्ने । विवस्वत् । उषसः । चित्रम् । राधः । अमर्त्य ।
आ । दाशुषे । जातऽवेदः । वह । त्वम् । अद्य । देवान् । उषःऽबुधः ॥ १ ॥

## भाषायाम्.

१. हे अमर्त्य ( =मरणरहित ) अग्ने, अद्य त्वं दाशुषे ( =हविर्दानवते यजमानाय ) उषसः ( =उषोदेवताया=उषःसंबन्धि ) विवस्वत् ( =तेजोयुक्तं ) चित्रं (=सुन्दरं ) [ च ] राधः ( =दानं=धनं ) (=तेजोयुक्तं चित्रं च दानं या ददाति तामुषसं) [ तथा ] हे जातवेदः ( =जातानां वेदितर् ) [ अग्ने ], उषर्बुधः ( =उषःकाले प्रबुद्धान् ) देवान् आवह ( =आनय ) ॥

## सूक्त ४४.

**ऋषि**—कण्वाचा पुत्र **प्रस्कण्व** या नांवाचा कोणीएक. देवता—**अग्नि**; परंतु १ ली आणि २ री ह्या ऋचा अश्वी देव आणि **उषा** आणि **अग्नि** या देवांविषयीं मिळून आहेत. वृत्त—दुसरी, चौथी इत्यादि ज्या सम आहेत त्यांचें **सतोबृहती**; आणि १ ली, ३ री वगैरे ज्या विषम आहेत त्यांचें **बृहती**.

१. हे मरणरहित अग्नी, [तूं] उषेचा सोज्वळ [आणि] सुंदर प्रसाद [घेऊन ये]; हे जातवेदा, उषःकाळीं जागृत होणारे [जे] देव [आहेत] त्यांस आज तूं यजमानासाठीं घेऊन ये.

## HYMN 44.

To *Agni;* but verses 1 and 2 are about *Agni, Ushas* and the *As'vins* conjointly. By *Praskaṇva* the son of *Kaṇva*. Metre, of those that are even (2,4,6, &c.) the *Satobṛihatî* and of those that are uneven, the *Bṛihatî.*

1. O immortal Agni, [bring thou hither] the brilliant [and] beautiful gift of Ushas, bring thou hither to the sacrificer today, O Jâtavedas, the gods that awake in the morning.

१. हें सूक्त अग्नीविषयीं आहे. पहिल्या व दुसऱ्या मंत्रांची देवता अग्नि, उषा आणि अश्वी ह्या होत असें अनुक्रमणिकेवरून आम्हीं लिहिलें आहे, तथापि त्या दोन मंत्रांत उषेचा व देवांचा निर्देश आहे इतक्यावरूनच सर्वानुक्रमणिकेंत तसें लिहिलें आहे. पण वस्तुतः सर्व सूक्त अग्नीविषयींच आहे.

'उषेचा सोज्वळ [आणि] सुंदर प्रसाद '=' विवस्वत् उषसः चित्रं राधः'. आम्हीं केलेला अर्थ अक्षरशः आहे. वास्तविक म्हटलें म्हणजे, प्रसाद, (म्हणजे संपत्ति) देणारी जी सोज्वळ आणि सुंदर उषा तिला आण असेंच वक्त्याचें हृद्र आहे. उषा म्हणजे प्रभातकालरूपी देवी इजविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे. (सूक्त ६ मंत्र ३ पहा).

'जातवेदा.' हें अग्नीचें विशेषण आहे. परंतु नित्य त्याचेंच विशेषण असतें त्यामुळें तें त्याचे विशेषनामासारिखें झालें आहे. त्याचा अर्थ यास्कांनीं अनेक प्रकारांनी सांगितलेला आहे. अमुकच एक होतो असें निश्चयानें सांगितलेलें नाहीं. तथापि त्यांपैकीं जो पहिला आणि जो सायणांनीं मान्य केला आहे ("जातानां वेदितः" सा०,

जुष्टो हि दूतो असि हव्यवाहनोऽग्ने रथीरध्वराणाम् ।
सजूरश्विभ्यामुषसा सुवीर्यमस्मे धेहि श्रवो बृहत् ॥ २ ॥
जुष्टः । हि । दूतः । असि । हव्यऽवाहनः । अग्ने । रथीः । अध्वराणाम् ।
सऽजूः । अश्विऽभ्याम् । उषसा । सुऽवीर्यम् । अस्मे इति । धेहि ।
श्रवः । बृहत् ॥ २ ॥
अद्या दूतं वृणीमहे वसुमग्निं पुरुप्रियम् ।
धूमकेतुं भाऋजीकं व्युष्टिषु यज्ञानामध्वरश्रियम् ॥ ३ ॥
अद्य । दूतम् । वृणीमहे । वसुम् । अग्निम् । पुरुऽप्रियम् ।
धूमऽकेतुम् । भाःऽऋजीकम् । विऽउष्टिषु । यज्ञानाम् । अध्वरऽश्रियम् ॥ ३ ॥

## भाषायाम्.

२. हि (=यस्मात् कारणात्) हे अग्ने, [ त्वं ] हव्यवाहनः (=हविषो वोढा) अध्वराणां रथीः (=यज्ञानां रथस्थानीयः) [ एतादृशो ] जुष्टः (=प्रियो) दूतो (=देवमनुष्याणां वार्ताहरः) असि । [ अतस्त्वम् ] अश्विभ्याम् उषसा [च] सजूः (=सुहितो) [ भूत्वा ] सुवीर्यं (=शोभनवीर्योपेतं=शौर्ययुक्तसंततियुतं) बृहत् (=प्रभूतं) श्रवः (=संपत्तिम्) अस्मे निधेहि (=अस्मासु निधेहि=अस्मभ्यं देहि) ॥

३. अद्य [ वयं ] वसुम् (=उत्तमं) पुरुप्रियं (=बहूनां प्रियं) धूमकेतुं (=धूमरूपध्वजयुक्तं) भाऋजीकं (=प्रसिद्धभासं) व्युष्टिषु (=उषःकालेषु) यज्ञानाम् अध्वरश्रियं (=यज्ञसेविनम्) [ एतादृशम् ] अग्निं दूतं वृणीमहे (=हव्यवाहनार्थं दूतं प्रार्थयामहे) ॥

"जातानि वेद" या०) तो ' सकळ प्राण्यांला जाणणारा असा ' हाच आम्हांस योग्य दिसतो.

' उषःकाळीं जागृत होणारे '=' उषर्बुधः'. म्हणजे (बहुवचन आहे तरी), अश्वी देव विवक्षित आहेत असें दिसतें. कारण अश्वी हे मोठ्या पहांटेस उठतात आणि रथांत बसून जातात असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं ( सूक्त २२ मं. १, ऋ. १. १८४. १ इत्यादि ) सांगितलें आहे. आणि या पहिल्या ऋचेंत अश्वींचा प्रतिपदोक्त निर्देश नसतांहि अश्वी देवहि याची देवता आहे असें अनुक्रमणिकाकारांनीं सांगितलें त्याचें हेंच कारण आहे.

हें सूक्त ऋषि मोठ्या पहांटेस उठून अग्नि प्रदीप्त करीत करीत म्हणत आहे अशी कल्पना आपण केली पाहिजे.

उषेला आणि अश्वींला आणण्याविषयीं सांगण्याचें कारण इतकेंच कीं अग्नि जसा मोठ्या पहांटेस उठणारा (म्हणजे ज्याला सर्व लोक मोठ्या पाहांटेस प्रदीप्त करितात), असा आहे, तशीच उषा आणि तसेच अश्वीहि पहांटेस उठणारे देव होत.

२. कारण कीं हे अग्नीं, तूं हव्य वाहून नेणारा [आणि] अध्वरांचा वाहक [असा] [देवांचा] प्रिय दूत होस. [यास्तव] [तूं] अश्वी [आणि] उषा यांसहित [येऊन] उत्तम वीरांनीं भरलेली [अशी] मोठी संपत्ति आम्हांला दे.

३. उत्तम, बहुतांस आवडणारा, धूमध्वज, तेजःप्रसिद्ध [आणि] उषःकालीं यज्ञांला येणारा [जो] अग्नि त्याला [आम्ही] आज [आमचा] दूत [होण्याविषयीं] प्रार्थितों.

2. For [thou] art, Agni, the dear messenger conveying the oblations [and] carrying the sacrifices. Give unto us [thou], [therefore], accompanied by the As'vins [and] by Ushas, great wealth with brave progeny.

3. We choose to-day [as our] messenger Agni the good, the beloved of many, the smoke-bannered, who shines with his brightness, [and] who repairs to the sacrifices in the early dawn.

२. उषेला आणि अश्वींला आणण्याविषयीं पूर्वींच्या मंत्रांत सांगितलें त्याचें कारण या मंत्रांत सांगतो; 'तूं उषेला आणि अश्वींला सहज आणिशील, कारण कीं तूं देवांचा आणि मनुष्यांचा दूत म्हणजे जासूद आहेस. यास्तव तूं त्या तीनी देवांस घेऊन ये आणि आम्हांस शूर संतति आणि विपुळ संपत्ति दे.'

'हव्य वाहून नेणारा'=' हव्यवाहनः'. म्हणजे मनुष्यांनीं अर्पण केलेलें हवि देवांकडेस पोंहचविणारा.

'अध्वरांचा वाहक'=' रथीः अध्वराणाम्.' म्हणजे यज्ञांत दिलेलीं हविरन्नें देवांकडेस पोंहचविणारा रथीच जणुं काय.

'उत्तम वीरांनीं भरलेली मोठी संपत्ति.' हा जो वर ऋषि मागतो त्याकडेस लक्ष्य पुरवावें. आतांचे आमचे. ऋषि (पुरोहित, कवि, भिक्षुक, पुराणिक, वैदिक) काय मागतील त्याचा विचार करावा.

३. या मंत्रांत अग्नीला आज आम्ही हवि देवांकडेस नेऊन जाण्यासाठीं आमचा दूत नेमिलों असें ऋषि म्हणत आहे. आपण असें मनांत आणिलें पाहिजे कीं सूक्तकर्ता कवि पहांटेस उठून अग्नि प्रदीप्त करून त्यांत देवांप्रीत्यर्थ हवि अर्पण करित आहे. आणि म्हणतो कीं, हें हवि देवांकडेस पोंहचविण्याकरितां अग्नीने आमचें दूतत्वें करावें अशी आमची प्रार्थना आहे.

श्रेष्ठं यविष्ठमतिथिं स्वाहुतं जुष्टं जनाय दाशुषे ।
देवाँ अच्छा यातवे जातवेदसमग्निमीळे व्युष्टिषु ॥ ४ ॥

श्रेष्ठम् । यविष्ठम् । अतिथिम् । सुऽआहुतम् । जुष्टम् । जनाय । दाशुषे ।
देवान् । अच्छ । यातवे । जातऽवेदसम् । अग्निम् । ईळे । विऽउष्टिषु॥४

स्तविष्यामि त्वामहं विश्वस्यामृत भोजन ।
अग्ने त्रातारममृतं मियेध्य यजिष्ठं हव्यवाहन ॥ ५ ॥ १८ ॥

स्तविष्यामि । त्वाम् । अहम् । विश्वस्य । अमृत । भोजन ।
अग्ने । त्रातारम् । अमृतम् । मियेध्य । यजिष्ठम् । हव्यऽवाहन॥५॥१८

## भाषायाम्.

४. देवान् अच्छ यातवे (=देवा अत्र आगच्छेयुरिति हेतोः) [अहं] व्युष्टिषु (=उषःकालेषु) श्रेष्ठं (=सर्वोत्तमं) यविष्ठं (=युवतमं) स्वाहुतं (=सुष्ठु आहुतम्=आनन्देन आहुतं) दाशुषे जनाय (=हविर्दत्तवते लोकाय=हविर्दत्तवद्भ्यो) जुष्टम् अतिथिं (=प्रियं प्राघुर्णिकं) जातवेदसम् अग्निं (=जातानां वेदितारम् अग्निं देवम्) ईळे (=स्तौमि) ॥

५. हे अमृत (=मरणरहित) विश्वस्य (=सकलस्यापि) भोजन (=पालक), हे अग्ने, हे मियेध्य (=मेध्य=पूजनीय), हे हव्यवाहन (=हविषां वाहक), अहम् अमृतं त्रातारं (=मरणरहितं रक्षितारं) यजिष्ठम् (=अतिशयेन यष्टारं) त्वां स्तविष्यामि (=स्तोष्यामि) ॥

---

'तेजःप्रसिद्ध'='भाऋजीकम्.' म्हणजे जो आविर्भूत होतांच त्याचें तेज दृष्टिगोचर होऊं लागतें.

'यज्ञांला येणारा'='यज्ञानाम् अध्वरश्रियम्.' म्हणजे जेथें जेथें पहांटेस ऋषिजन यज्ञ करितात तेथें तेथें जाणारा.

'यज्ञानाम् अध्वरश्रियम्' यांत 'यज्ञानाम्' हें अथवा 'अध्वर०' हें पुनरुक्त आहे. परंतु असे प्रयोग साधारण संस्कृतांत सुद्धा (विदर्भानां विशांपतिः इत्यादि) विरळा येतात असें नाहीं.

४. श्रेष्ठ, परमतरुण, आनंदानें निमंत्रिलेला, [आणि] यजमानलोकांचा आवडता अतिथि असा जो जातवेद अग्नि त्याला, देवांनीं येथें यावें म्हणून, मी प्रातःकाळीं प्रार्थीत आहें.

५. हे मरणरहित विश्वपालका, हे पूज्य हव्यवाहका अग्नी, रक्षण करणारा, अमर [आणि] यज्ञकर्मांत परमकुशल [जो तूं त्या] तुला मी स्तवीन.

4. I praise in the early dawn Jâtavedas Agni, the best, the most youthful [and] the gladly-invited [and] dear guest of sacrificers, that the gods may come hitherward.

5. I will praise, O immortal protector of the universe, O Agni, O holy carrier of the oblation, thee the immortal protector, [thee] the best of sacrificers

४. 'अग्नीनें देवांस ऋषीजवळ हव्यग्रहणासाठीं आणावें म्हणून अग्नीची स्तुति आज मी मोठ्या पहांटेस उठून करित आहें; यास्तव अग्नीनें इतर सर्व देवांस आज येथें आणावें' अशी ऋषीची प्रार्थना आहे.

'परमतरुण '=' यविष्ठम्.' म्हणजे पहांटेस प्रदीप्त झाल्यामुळें ताजा दिसणारा, आणि नित्य पेटविला जात असतांहि तशाच्या तसाच शक्तिमान् आणि ताजा राहणारा.

'आनंदानें निमंत्रिलेला '=' सु आहुतः' म्हणजे ज्याला यजमान लोक मोठ्या आनंदानें आपल्या घरीं भोजनास बोलावितात. हें विशेषण अग्नीला फार योग्य आहे, कारण कीं सर्व लोक मोठ्या उत्सुकतेनें आणि प्रीतीनें त्यास दरदिवस आपल्या घरीं बोलावीत असतात. या मंत्रावरून अग्निदेवावर आर्यजनांचें केवढें प्रेम असे तें दिसून येतें.

५. अग्नीला प्रदीप्त करून ऋषि म्हणतो आहे की, 'हे अग्नी, मी तुला आतां स्तवीन, मी तुला आतां स्तवितों, तें स्तोत्र तूं कृपाकरून ऐक.'

'यज्ञकर्मांत परम कुशल '=' यजिष्ठम्.' म्हणजे 'परम उत्कृष्ट होता.' अग्नि हा उत्तम होता म्हणजे यज्ञसंपादक होय याविषयीं वेदांत अनेक ठिकाणीं सांगितलें आहे.

हा मंत्र नांदीश्राद्धांत जेवायाला बसतांना म्हणत असतात. परंतु हा मंत्र त्या वेळीं कां म्हणतात असा जर प्रश्न केला तर काय उत्तर येतें तें पहा. 'अमृत भोजन ' हे शब्द यांत आहेत! परंतु त्यांचा अर्थ काय होतो तो (सायणाप्रमाणें) आम्हीं वर दिलाच आहे. तेव्हां ज्या

**सुशंसो बोधि गृणते यविष्ठ्य मधुजिह्वः स्वाहुतः ।**
**प्रस्कण्वस्य प्रतिरन्नायुर्जीवसे नमस्या दैव्यं जनम् ॥ ६ ॥**

सुऽशंसः । बोधि । गृणते । यविष्ठ्य । मधुऽजिह्वः । सुऽआहुतः ।
प्रस्कण्वस्य । प्रऽतिरन् । आयुः । जीवसे । नमस्य । दैव्यम् । जनम् ॥६॥

**होतारं विश्ववेदसं सं हि त्वा विश इन्धते ।**
**स आ वह पुरुहूत प्रचेतसोऽग्ने देवाँ इह द्रवत् ॥ ७ ॥**

होतारम् । विश्वऽवेदसम् । सम् । हि । त्वा । विशः । इन्धते ।
सः । आ । वह । पुरुऽहूत । प्रऽचेतसः । अग्ने । देवान् । इह ।
द्रवत् ॥ ७ ॥

## भाषायाम्.

६. हे यविष्ठ्य (=युवतम), [अग्ने], मधुजिह्वः (=मधुरवचनः) स्वाहुतः (=सुष्ठु आहुतः=आनन्देन निमन्त्रितः) [त्वं] गृणते (=स्तुवते=मह्यं प्रस्कण्वाय) सुशंसः (=सुवचनः=दयार्द्रवचनो) बोधि (=भव)। [त्वं] प्रस्कण्वस्य [मम] आयुः जीवसे (=जीवनार्थ=प्रस्कण्वोहं चिरं जीवेयमिति हेतोः) प्रतिरन् (=प्रकर्षेण वर्धयन्=प्रकर्षेण वर्धयितुमिच्छन्) दैव्यं जनं (=देवजनं देवान्) नमस्य (=पूजय) ॥

अत्रेदमुक्तं भवति। हे अग्ने, त्वं मम प्रसन्नमुखः प्रसन्नवचनश्च भव। अपि च देवान् स्तोत्रं कुर्वते मह्यं (मदर्थ) पूजय येन ते प्रस्कण्वस्य ममायुर्वर्धयिष्यन्ति अहं च तदनन्तरं चिरं जीविष्यामीति ॥

७. विश्ववेदसं (=सर्वज्ञं) होतारं (=देवानामाह्वातारं) त्वा (=त्वां) विशः (=प्रजाः) समिन्धते हि (=सम्यग्दीपनेन पूजयन्ति खलु)। स [त्वं] हे पुरुहूत (=बहुभिराहूत) अग्ने, प्रचेतसः (=प्रकृष्टज्ञानयुक्तान्) देवान् द्रवत् (=शीघ्रम्) इहावह (=अत्रानय) ॥

त्वं देवान् आनयसीति कृत्वा सर्वाः प्रजास्त्वां भजन्ते। वयमपि तेनैव हेतुना त्वां संदीपनेन भजामहे। अतस्त्वमत्र देवानानयेति भावः ॥

प्रयोगांच्या आचरणात आम्हीं इतका खर्च करितों ते निरर्थक आहेत कीं सार्थक आहेत त्याचा विचार या मंत्रावरून सुचतो.

६. हे परमतरुण [अग्नी], मधुरवचन [आणि] आनंदानें निमंत्रिलेला [असा] तूं [मज] स्तोत्रकर्त्याला प्रसन्न हो; [आणि] प्रस्कण्वानें [चिरकाल] जगावें म्हणून, [तूं] देवांस पूज, आणि [तेणेंकरून] त्याचें आयुष्य वृद्धिंगत कर.

6. O most youthful [Agni], be thou, [who art] the sweet-tongued and welcomed [guest], kind to the praiser; worship the celestial tribe [and] [thereby] prolong Praskaṇva's life that he may live [long].

७. सर्वज्ञ होता [जो तूं त्या] तुला लोक प्रदीप्त करून भजतात; तर हे अग्नी, हे अनेकाहूत [अग्नी], महाज्ञानी देवांस तूं लवकर इकडे घेऊन ये.

7. The people kindle thee the all-knowing invoker; bring thou hither, therefore, O Agni, invoked by many, the wise gods quickly.

६. या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'हे अग्नी, तूं मज स्तोत्याला प्रसन्न हो आणि मजकरितां आज देव पूज कीं जेणेंकरून ते माझें आयुष्य वाढवितील आणि मला फार दिवसपर्यंत जीवंत राखितील.'

'प्रसन्न हो' = 'सुशंसो बोधि.' 'सुशंस' शब्दाचा अक्षरशः अर्थ 'चांगलें बोलणारा.' जसा बाप मुलाला प्रीतीनें प्रेमार्द्रशब्दांनीं बोलतो तसा बोलणारा. 'बोधि' याचा अर्थ वेदांत 'हो' असा सायणाचार्यच पुष्कळ ठिकाणीं करितात. ऋ. ४. १७. १८; ७. ३२. ११; ७. ३२. २५ याजवरील सायणभाष्य पहा.

'प्रस्कण्वानें [चिरकाळ] जगावें म्हणून इ०.' या उत्तरार्धाचा अर्थ स्पष्ट समजावा म्हणून आम्हीं किंचित् विस्तारानें केला आहे. अक्षरशः 'जगण्याकरितां प्रस्कण्वाचें आयुष्य वाढविणारा होत्साता [तूं] दिव्य जनास पूज.'

हा मंत्र ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. यांत जी प्रस्कण्व ऋषि प्रार्थना करितो तिजवरून पूर्वींचे ऋषि पाहिजे तितका वेळ आपल्या तपोबळाच्या योगानें जगत अशी जी आपली समजूत आहे ती कित्येक ऋषींविषयीं तरी निराधार म्हटली पाहिजे. साधार असती तर आपण जगावें म्हणून आपलें आयुष्य वाढविण्याविषयीं या ऋषीनें विनंती केली नसती. आणि वैदिक युगांतील महर्षि सुद्धा आमच्या सारिखेच अल्पायु होते आणि त्यांस जर शंभर वर्षेपर्यंत जगावयास मिळालें तर देवांची मोठी कृपा झाली असें ते समजत. ऋ. १. ६४ १४; १. ८९. ९ इत्यादि अनेक स्थळीं ऋषिलोक शंभर वर्षे आम्हांस जीवंत ठेवा अशी प्रार्थना करित असत तीं पहा. कृतयुगांत जें (सहस्रावधि) दी-

सवितारमुषसमश्विना भगमग्निं व्युष्टिषु क्षपः ।
कण्वासस्त्वा सुतसोमास इन्धते हव्यवाहं स्वध्वर ॥ ८ ॥

सवितारम् । उषसम् । अश्विना । भगम् । अग्निम् । विऽउष्टिषु । क्षपः ।
कण्वासः । त्वा । सुतऽसोमासः । इन्धते । हव्यऽवाहम् । सुऽअध्वर ॥८॥

## भाषायाम्.

८. हे स्वध्वर ( =शोभनयागयुक्त=यज्ञकर्मकुशल ) अग्ने, [ एते ] सुतसोमासः ( =सुतसोमाः=अभिषुतसोमाः=सोमम् अभिषुतवन्तः ) कण्वासः ( =कण्वाः कण्वकुलोत्पन्नाः पुरुषा मदादयो ) व्युष्टिषु क्षपश् [ च ] ( =प्रातःकालेषु रात्रिसमये च ) सवितारम् ( =एतन्नामकं देवम् ), उषसम् ( = उषोदेवीम् ), अश्विना ( =अश्विनौ देवौ ), भगम् ( =एतन्नामकं देवं ) हव्यवाहं ( =हविषः प्रापकं ) त्वाम् [ अग्निं ] [ च ] इन्धते ( = त्वत्समिन्धनेन भजन्ते ) ॥

र्घायु नव्हतें असें वेदवाक्यावरून सिद्ध होतें तं ( पुराणादिक वेदकालोत्तर ग्रंथांत सांगितलेलें ) मागाहून कोठून येईल? तेव्हां खरें कोणतें ते सांगावयासच नको.

७. 'तूं देवांस घेऊन येण्याविषयीं फार कुशल आहेस असें समजून सर्व लोक तुला प्रदीप्त करून भजतात, त्याप्रमाणें आम्हीहि तुला पेटवून भजत आहोंत; यास्तव येथें आमच्या घरीं देवांस घेऊन ये ' असा भावार्थ.

' होता '=' होतारम्.' म्हणजे देवांस बोलावून आणणारा.

' लोक '=' विशः.' या शब्दामुळें हा मंत्र मोठ्याच महत्त्वाचा आहे. कारण 'विश्' शब्दापासूनच आपला ' वैश्य ' शब्द झाला आहे. आणि त्याचा अर्थ ' विश् ' चा मुलगा. ' विश् ' कुळांत झालेला. ' विश् ' म्हणजे प्रजा, लोक, जे राजे नव्हेत ते सर्व लोक. ' विश् ' शब्दांत ब्राह्मणांचा सुद्धा समावेश होतो. ' विश् ' शब्दाचा जो हा अर्थ तो ' विशांपतिः ' ( लोकांचा अथवा प्रजांचा प्रभु=राजा ) या शब्दांत आहे. त्यावरून ' वैश्य ' शब्दाचा मूळ अर्थ ' साधारण प्रजालोकांपैकीं ' असा आहे. जसा ' राजन्य ' म्हणजे राजकुळांत झालेला तसा ' वैश्य ' म्हणजे साधारण प्रजालोकांपैकीं मनुष्य. याप्रमाणें ' वैश्य ' म्हणजे मूळ अर्थ एक जातीचा मनुष्य असा नाहीं, ' प्रजा ' असा अर्थ. आणि शेतकरी, उदमी, व्यापारी, आणि कर देणारे लोक, कीं ज्यांवर राजे राज्य करितात ते सर्व वैश्य, शूद्र नव्हेत, ' शूद्र' हा शब्द (तेवढें एक

८. हे सुयज्ञ अग्नी, कण्वजन सोमरस काढून प्रातःकाळीं [आणि] रात्रीच्या [वेळीं] सविता, उषा, अश्वी [आणि] भग यांला [आणि] तुला हव्यवाहकाला भजत असतात.

8. O Agni, excellent sacrificer, the Kaṇvas, having pressed the Soma, worship at night [and] in the early dawn Savitâ, Ushas, the As'vins, Bhaga, [and] thee the carrier of the oblation.

पुरुषसूक्त खेरीज करून) ऋग्वेदांत मुळींच येत नाहीं, आणि आतां ज्यांस आपण शूद्र असें समजून नीच मानितों असे जे शेतकरी, उदमी, कुणबी वगैरे लोक, ते वेदाप्रमाणें 'वैश्य' होत, शूद्र नव्हेत.

'अनेकाहूत' = 'पुरुहूत.' म्हणजे ज्याला अनेक लोक आपल्या घरीं बोलावितात असा.

'समिन्धते' याचा अर्थ आम्हीं 'भजतात' असा केला आहे त्याविषयीं पुढचा मंत्र पाहा.

८. 'कण्वकुळांतील मी प्रस्कण्व आणि माझ्या बरोबरचे दुसरे लोक मिळून हे अग्नी तुला, आणि सवित्याला, उषेला, अश्वांला, आणि भगाला सोम अर्पण करून रात्रीला आणि मोठ्या पहांटेला भजत असतों' असा या मंत्राचा भावार्थ आहे.

'सुयज्ञ' म्हणजे चांगला यज्ञ करणारा, जो यज्ञ करून देवांस आणण्याच्या कामीं आणि त्यांस प्रसन्न करण्याच्या कामीं कुशल होय. या कामीं अग्नीचें कौशल्य वेदांत प्रसिद्धच आहे.

'रात्रीच्या [वेळीं]'='क्षपः.' षष्ठीचें एकवचन अथवा द्वितीयेचें अनेकवचन आहे.

मोक्षमूलरप्रकाशित भाष्याच्या प्रतींत 'क्षपः' शब्दाचा अर्थ न करितां 'श्रवः' शब्दाचा अर्थ (अन्नम् आहुतिरूपम् अभिलक्ष्य=आहुतिरूप अन्नास अभिलक्षून असा) केला आहे; त्यावरून 'क्षपः' याऐवजीं सायणांचा पाठ 'श्रवः' (भर्गमग्निं व्युष्टिषु श्रवः) असा होता असें समजावयाचें कीं काय? वैदिकांचा पाठ तर 'क्षपः' असाच आहे. 'क्षपः' याचा जो आम्हीं अर्थ केला आहे त्याविषयीं ऋ.१. २.'२ इत्यादि स्थळें प्रमाणीभूत आहेत.

'भग' हा देव किंस्वरूप आहे तें पूर्वी (सू.१४ मं. ३ याजवरील टीपेंत) सांगितलें आहे तें पहा.

'भजत असतात'='इन्धते'. अक्षरशः अर्थ 'पेटवितात.' वस्तुतः अग्नीला भजणें म्हणजे त्याला पेटविणें, त्याला खाण्यास लांकडें हवि वगैरे देणें. आणि अग्नीच्या साहचर्यानें या मंत्रांत सविता वगैरे जे दुसरे देव त्यांसहि 'भजणें' या अर्थी याच क्रियापदाचा प्रयोग झाला आहे.

पतिर्ह्यध्वराणामग्ने दूतो विशामसि ।
उषर्बुध आ वह सोमपीतये देवाँ अद्य स्वर्दृशः ॥ ९ ॥
पतिः । हि । अध्वराणाम् । अग्ने । दूतः । विशाम् । असि ।
उषःऽबुधः । आ । वह । सोमऽपीतये । देवान् । अद्य । स्वःऽदृशः ॥९॥
अग्ने पूर्वा अनूषसो विभावसो दीदेथ विश्वदर्शतः ।
असि ग्रामेष्वविता पुरोहितोऽसि यज्ञेषु मानुषः ॥ १० ॥ २९ ॥
अग्ने । पूर्वाः । अनु । उषसः । विभाऽवसो इति विभाऽवसो । दीदेथ ।
विश्वऽदर्शतः ।
असि । ग्रामेषु । अविता । पुरःऽहितः । असि । यज्ञेषु । मानुषः ।
॥ १० ॥ २९ ॥

---

## भाषायाम्.

९. हे अग्ने, [ त्वम् ] अध्वराणां ( =यज्ञानां ) पतिः ( =प्रभुः ) [ सन् ] विशां ( =प्रजानां=लोकानां ) दूतो ( =वार्त्ताहरः ) असि हि ( =भवसि खलु ) । [ अतः कारणाद् ] अद्य [ त्वम् ] उषर्बुधः ( =उषःकाले प्रबुद्धान् ) स्वर्दृशः (=सूर्यदर्शिनः= सूर्यवद् दृश्यमानान् ) देवान् सोमपीतये ( =सोमपानार्थम् ) आवह ( =आनय ) ॥

१०. हे अग्ने, हे विभावसो ( =विशिष्टप्रकाशवन् ), विश्वदर्शतः ( =सर्वैर्दर्शनीयस् ) [ त्वम् ] अनु पूर्वा उषसः ( =अतीतान् उषःकालान् अनुलक्ष्य=नित्यम् उषःकालमनु ) दीदेथ ( =दीप्तवानसि=प्रकाशसे ) । [ त्वं ] ग्रामेषु ( =जननिवासस्थानेषु ) मानुषः ( =मनुष्येभ्यो हितः ) अविता ( =रक्षक ) [इति कृत्वा] पुरोहितोसि ( =पुरः स्थापितोसि ), यज्ञेषु [ मानुषोऽवितेति कृत्वा ] [ पुरोहितः=पुरः स्थापितः ] असि ॥

९. हे अग्नी, [तूं] यज्ञांचा प्रभु [आणि] लोकांचा दूत अहिस; यास्तव [ तूं ] प्रातःकाळीं जागृत होणाऱ्या सूर्यसदृश देवांस सोम पिण्यासाठीं आज येथें घेऊन ये.

१०. हे अग्नी, हे तेजःपुंज [अग्नी], विश्वदर्शनीय तूं नित्य उषेच्या मागोमाग प्रकाशत असतोस. तुला मनुष्यांचा हितकर्ता संरक्षक [मानून] ग्रामांच्या ठायीं पुढें स्थापीत असतात आणि यज्ञांच्या ठायीं [पुढें स्थापीत] असतात.

9. In as much, Agni, as [thou] art lord of sacrifices [and] messenger of the people, bring [thou] hither to-day the sun-like gods that awake in the morning, to drink the Soma.

10. O Agni, O resplendent [Agni], thou who art to be seen by all, hast always shone after Ushas. In villages [and] in sacrifices [thou] art placed in front as a protector beneficent to men.

९. 'हे अग्नी, लोक यज्ञ करितात ते तुलाच अभिलक्षून करून तुझ्याच आंगावर हवि टाकितात, आणि तूं लोकांचा दूत आहेस, म्हणजे देवांकडेस मनुष्यांनीं केलेली स्तुति पोंहचविणें, त्यांस मनुष्यांहीं अर्पण केलेलं हवि आणि सोम इत्यादि ग्रहण करण्यासाठीं पृथ्वीवर उपासकांच्या घरीं आणणें हें काम तूं करीत असतोस; यास्तव आज आमच्या घरीं आमचा सोम पिण्यासाठीं देवांस इकडे घेऊन ये,' असें तात्पर्य.

'प्रातःकाळीं जागृत होणाऱ्या '=' उषर्बुधः.' हे प्रातःकाळीं जागृत होणारे देव म्हणजे सविता, उषा, अश्वी, भग हे जे पूर्वमंत्रगत देव ते समजावयाचे.

'सूर्यसदृश '=' स्वर्दृशः.', म्हणजे सूर्यावरोबर 'अथवा सूर्योदयाच्या काळीं अथवा त्या अजमासास उगवणारे, असें दिसतें. अथवा 'सूर्याप्रमाणें तेजस्वी' असाहि अर्थ होईल. सायणाचार्य केवळ 'सूर्यदर्शी' इतकेंच म्हणतात, विशेष फोड करून सांगत नाहींत.

१०. 'हे अग्नी, तूं प्रतिदिनीं उषःकाळच्या पाठोपाठ प्रकाशतोस आणि सर्वांच्या दृष्टीस पडत असतोस. तूं मनुष्यांचें कल्याण करणारा असा संरक्षक होस असें समजून तुला गांवांत आणि यज्ञांत सर्व लोक पुढें ठेवीत असतात.'

'तूं नित्य उषेच्या मागोमाग प्रकाशत असतोस '=' पूर्वा उषसः अनु.' म्हणजे उषःकाल होतांच लोक तुला प्रदीप्त करीत असतात? अक्षरशः अर्थ 'आजपर्यंत ज्या उषा म्हणजे जे उषःकाल प्रकाशून गेले त्यांच्या मागाहून.'.

नि त्वा यज्ञस्य साधनमग्ने होतारमृत्विजम् ।
मनुष्वद्देव धीमहि प्रचेतसं जीरं दूतममर्त्यम् ॥ ११ ॥

नि । त्वा । यज्ञस्य । साधनम् । अग्ने । होतारम् । ऋत्विजम् ।
मनुष्वत् । देव । धीमहि । प्रऽचेतसम् । जीरम् । दूतम् । अमर्त्यम् ॥ ११ ॥

यद्देवानां मित्रमहः पुरोहितोऽन्तरो यासि दूत्यम् ।
सिन्धोरिव प्रस्वनितास ऊर्मयोऽग्नेर्भ्राजन्ते अर्चयः ॥ १२ ॥

यत् । देवानाम् । मित्रऽमहः । पुरःऽहितः । अन्तरः । यासि । दूत्यम् ।
सिन्धोःऽइव । प्रऽस्वनितासः । ऊर्मयः । अग्नेः । भ्राजन्ते । अर्चयः ॥ १२ ॥

## भाषायाम्.

११. हे देव अग्ने, मनुष्वत् (=यथा मनुर्मनुष्याणामाधिपिता निहितवान् तथा) [वयं] प्रचेतसं (=प्रकृष्टज्ञानं) जीरं (=क्षिप्रकारिणम्) अमर्त्यं (=मरणरहितं) दूतं त्वा (=त्वां) यज्ञस्य साधनं (=यज्ञसंपादकं=यज्ञसिद्धये) होतारम् (=आह्वातारम्) ऋत्विजं [कृत्वा] निधीमहि (=निदधीमहि=स्थापयामः) ॥

१२. हे मित्रमहः (=अनुकूलदीप्तिमन्) [अग्ने], यद् (=यदा) पुरोहितः (=पुरः स्थापितः) अन्तरः (=यज्ञशालायां स्थितत्वात्समीपतरं वर्तमानस्) [त्वं] देवानां दूत्यं (=दूतत्वं) यासि (=प्राप्नोषि), [तदानीम्] अग्नेः (=हे अग्ने तव) अर्चयो (=ज्वालाः), सिन्धोः (=समुद्रस्य) प्रस्वनितासः (=प्रस्वनिताः=प्रकृष्टध्वनियुक्ता) ऊर्मय इव (=कल्लोला इव), भ्राजन्ते (=दीप्यन्ते) ॥

'यज्ञाच्या ठायीं पुढें स्थापीत असतात'=' यज्ञेषु पुरोहितोसि.' याचा अर्थ उघड आहे. पण 'ग्रामाच्या ठायीं पुढें स्थापीत असतात' (='ग्रामेषु पुरोहितोसि') याचें तात्पर्य काय आहे कळत नाहीं. उत्तरार्धाचा अर्थ सायणाचार्य, "तूं गांवांत रक्षक आहेस आणि यज्ञांत "वेदीच्या पुढें पूर्वदिशेस स्थापिलेला "असा होत्साता मनुष्यहितकारक रक्षक "आहेस" असा करितात. तथापिहि गांवांत रक्षक आहेस म्हणजे काय? रात्रीच्या वेळीं संकटाचा प्रसंग आल्यास उपयोग व्हावा म्हणून गांवांत अग्नि पेटवीत असत असें समजावयाचें कीं काय?

११. हे देवा अग्नी, महाप्रज्ञावान् वेगवान् [आणि] मरणरहित दूत [ असा जो तूं त्या ] तुला, मनु [ नेमीत असे ] तसा, [आम्ही] [ आमचा ] यज्ञसंपादक होता [आणि] ऋत्विज नेमितों.

११. O god Agni, like Manus we appoint thee, who art the wise, quick [and] immortal messenger, [as our] invoker [and] priest accomplishing the sacrifice.

१२. हे अनुकूलतेजोमय अग्नी, जेव्हां तूं यज्ञशाळेंत पुढें स्थापिला [जाऊन] देवांचें दूतत्व पावतोस, [ तेव्हां ] तुझ्या ज्वाळा समुद्राच्या कल्लोळकारी लाटांप्रमाणें लखलखतात.

12. When, O Agni of friendly splendor, thou, placed before the altar inside the sacrificial hall, art installed as the messenger of the gods, thy flames sparkle like the roaring surges of the sea.

११. 'हे अग्नी, तूं परम बुद्धिमान, फार लवकर काम करणारा, आणि मरणाच्या भीतीपासून मुक्त झालेला असा दूत आहेस, म्हणून मनुष्यांचा आदिपुरुष जो मनु तो तुला आपल्या यज्ञांत यज्ञसिद्धीसाठीं होत्याचें आणि ऋत्विजाचें काम करण्यासाठीं नेमीत असे, तसा आम्हीहि आज आमचा यज्ञ सिद्धीस जावा म्हणून तुला आमचा होता आणि ऋत्विज नेमीत आहों' असें तात्पर्य. सर्व मनुष्यांचा पिता जो मनु तो जशी तुझी उपासना करीत असे तशीच प्रेमभावानें आणि अनन्याश्रयानें आम्हीहि करीत आहों, नवीन मार्ग काढून अथवा कमी भक्तीनें करीत आहों असें नाहीं, असें मंत्रकर्त्याचें हृद्ग आहे.

'वेगवान्'='जीरम्.' ऋ. ३. ३. ६ आणि ऋ. ७. ९२. ? या मंत्रांवरील सायणभाष्य पहा.

'मनु.' सू. ३१. मं. ४ यावरील टीप पहा. ऋ. ८. ६३. १; १. ८०. १६; १. ११४. २ हेहि मंत्र पहा.

'नेमितों'='निधीमहि.' अक्षरशः 'स्थापितों.' ऋ. ७. १५. ७ आणि ऋ. ३. २९. ४ यांजवरील सायणभाष्य पहा.

१२. 'हे अग्नी, तुला आम्हीं यज्ञशाळेंत स्थापिला आणि देवांचें दूतत्व तूं करूं लागलास ( म्हणजे आम्हीं उपासकांनीं दिलेलें हवि देवांकडेस पोंहचवूं लागलास.) म्हणजे तुझ्या ज्वाळा समुद्राच्या मोठ्या कल्लोळांप्रमाणें एकामागून एक उठून चमकत असतात,' असें तात्पर्य.

'अनुकूलतेजोमय'='मित्रमहः.' म्हणजे ज्याचें तेज प्रखर असतांहि उपासकांस जाळीत नाहीं. ऋ. १.५८.८ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा. इतर प्रयोग व सायणोक्तीचीं प्रत्यंतरें पुष्कळ आहेत. कितीएक पाश्चिमात्य विद्वान् 'मित्रमहः' म्हणजे 'मित्रांचें वैपुल्य ज्यास आहे तो' म्हणजे ज्याला पुष्कळ मित्र आहेत.तो असा

श्रुधि श्रुत्कर्ण वह्निभिर्देवैरग्ने सयावभिः ।
आ सीदन्तु बर्हिषि मित्रो अर्यमा प्रातर्यावाणो अध्वरम् ॥१३॥
श्रुधि । श्रुत्ऽकर्ण । वह्निऽभिः । देवैः । अग्ने । सयावऽभिः ।
आ । सीदन्तु । बर्हिषि । मित्रः । अर्यमा । प्रातःऽयावानः । अध्वरम् ॥१३॥
शृण्वन्तु स्तोमं मरुतः सुदानवोऽग्निजिह्वा ऋतावृधः ।
पिबन्तु सोमं वरुणो धृतव्रतोऽश्विभ्यामुषसा सजूः ॥१४॥३०॥
शृण्वन्तु । स्तोमम् । मरुतः । सुऽदानवः । अग्निऽजिह्वाः । ऋतऽवृधः ।
पिबन्तु । सोमम् । वरुणः । धृतऽव्रतः । अश्विऽभ्याम् । उषसा ।
सऽजूः ॥ १४ ॥ ३० ॥

## भाषायाम्.

१३. हे श्रुत्कर्ण ( =शृण्वत्कर्ण=अवहितकर्ण ) अग्ने, वह्निभिः ( =स्वस्वहविर्भागवाहकैः ) सयावभिः ( =सहचारिभिः ) देवैः [ सह ] श्रुधि ( =अस्माकम् आह्वानं शृणु ) । मित्रः, अर्यमा [ इतरे च तत्सदृशाः उषअश्व्यादयः ] प्रातर्यावाणः ( =प्रातःकाल आरूढरथा भूत्वा गच्छन्तो ) [ देवा ] अध्वरं ( =यज्ञम् ) आ[गत्य] बर्हिषि ( =कुशासने ) सीदन्तु ( =निषीदन्तु ) ॥

१४. सुदानवः ( =शोभनदानोपेताः ) अग्निजिह्वाः (=जिह्वासदृशया अग्निज्वालया हविर्भागं गृह्णन्तः=अग्निमुखाः ) ऋतावृधः ( =ऋतेन यज्ञरूपेण सत्येन प्रवृद्धाः ) मरुतः स्तोमम् ( =इदम् अस्माकं स्तोत्रं ) शृण्वन्तु । धृतव्रतः ( =धृतम् अनुरुद्धं व्रतं मेघवर्षणादिमर्यादारूपं यस्य देवमनुष्यैः स ) वरुणः अश्विभ्याम् उषसा [ च ] सजूः ( =सहितः सन् ) [ अस्माभिरर्पितं ] सोमं पिबतु ( =प्राश्नातु ) ॥

अर्थ करितात तो आम्हांस खरा दिसत नाहीं. 'मित्रमहस्' म्हणजे मित्रवैपुल्य (=पुष्कळ मित्र) असा अर्थ होईल असें या शब्दांवरून दिसतच नाहीं. शिवाय सायणाचार्य आम्हीं केलेलाच अर्थ बहुत करून करितात; आणि तो सोडून दुसरी कल्पना करण्याचें कारण दिसत नाहीं.

'यज्ञशाळेत पुढें स्थापिला जाऊन'= 'पुरोहितः अन्तरः.' हे शब्द कांहींसे कठिण आहेत. आम्ही सायणास अनुसरलों आहों. परंतु 'प्रिय पुरोहित' असा कितीएक विद्वान् अर्थ करितात तो वाईट दिसत नाहीं. 'अन्तर' म्हणजे 'समीप असलेला,' 'जवळचा;' अर्थात् 'प्रिय.' सू. १० मंत्र ९ यावरील 'युजश्चिदन्तरम्' याजविषयींची टीप पहा.

'समुद्राच्या कल्लोळकारी लाटांप्रमाणें'='सिन्धोरिव प्रस्वनितासः ऊ-

१३. हे अवहितकर्ण अग्नी, [आपआपला] [हविर्भाग] वाहून नेणारे [आणि] सहचारी जे देव त्यांसहित तूं [आमचें आव्हान] ऐक. मित्र, अर्यमा, [आणि] दुसरे प्रातर्गामी देव यज्ञाला येऊन [आमच्या] दर्भांवर बसोत.

१४. दानशाली [आणि] अग्नीच्या तोंडानें खाणारे [आणि] [यज्ञरूपी] खऱ्या धर्मापासून सुख पावणारे मरुत् [आमचें] [हें] स्तवन ऐकोत. ज्याची आज्ञा [सर्व लोक] धारण करितात [तो] वरुण अश्वींसहित आणि उषेसहित [आमचा] सोम पिओ.

13. O Agni, whose ears can hear, hear [our invocation], with the gods that carry [their oblation] [and] that move to-gether. May Mitra, Aryamâ [and] the others that go forth in the morning [come] to [our] sacrifice [and] sit on the kus'a-grass.

14. May the liberal Maruts that drink through Agni [and] who are made happy through the true religion, hear [our hymn]. May Varuna whose law is obeyed drink [our] Soma in company with the As'vins [and] Ushas.

---

मेघ·'. या मंत्रावरून स्पष्ट होतें कीं प्राचीन वैदिकयुगांतील आर्य मध्य एशिया खंडांत अथवा समुद्रापासून फार दूर असलेल्या प्रदेशांत राहत होते त्यामुळें त्यांस समुद्राविषयीं ज्ञान नव्हतें असें जें कितीएकांनें म्हणणें आहे तें निराधार आहे. 'सिन्धु' शब्दाचा अर्थ या ठिकाणीं दुसरा कांहीं केला तर उपमा जुळणारच नाहीं.

---

१३. भावार्थ·— 'हे अग्नी, तुझे कान आम्हीं मारलेली हाक ऐकणारे असे आहेत, यास्तव एकमेकाबरोबर मिळून चालणारे जे मित्र, अश्वी, उषा, अर्यमा इत्यादि देव त्यांसहित मिळून आमची हाक तूं ऐक, आणि तूं आहेस येथें आमच्या यज्ञाप्रत येऊन मित्र, अर्यमा, आणि त्यांसारिखे जे पहांटेस जागृत होऊन रथारूढ होऊन चालणारे अश्वी, उषा, सविता इत्यादि देव त्यांणीं आमच्या कुशासनावर बसावें असें कर.'

'अवहितकर्ण'=' श्रुत्कर्ण'. अक्षरशः 'ऐकणारे कान आहेत ज्याला तो, जो कान असतांहि ऐकूं शकत नाहीं असा मूर्तिरूप मृत्तिकेचा. धातूचा, अथवा पाषाणाचा तुकडा नव्हे तो.'

'सहचारी'=' सयावभिः'. मित्र, अर्यमा, उषा, सविता. अश्वी हे देव पहांटेस जागृत होऊन ('उषर्बुधः') फारकरून एकमेकाच्या मागोमाग जात असतात म्हणून पूर्वी सांगितलेंच आहे.

१४. या मंत्रांत मरुतांस आणि वरु-

## सूक्तम् ४५.

कण्वपुत्रः प्रस्कण्व ऋषिः । अग्निर्देवता । अयं सोम इत्यर्धर्चो ( दशमोत्तरार्धो ) देवदेवताकः । अनुष्टुप् छन्दः ।

**त्वमग्ने वसूँरिह रुद्राँ आदित्याँ उत ।**
**यजा स्वध्वरं जनं मनुजातं घृतप्रुषम् ॥ १ ॥**

त्वम् । अग्ने । वसून् । इह । रुद्रान् । आदित्यान् । उत ।
यज । सुऽअध्वरम् । जनम् । मनुऽजातम् । घृतऽप्रुषम् ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. हे अग्ने, त्वं वसून् ( =एतन्नामकान् देवान् ), रुद्रान् ( =एतन्नामकान् देवान् ) उत (=अपि च ) आदित्यान् (=एतन्नामकान् देवान् ) [ अपि च ] स्वध्वरं ( =सुष्टुयज्ञोपेतं=शोभनयज्ञा यदर्थं क्रियन्ते तादृशं ) घृतप्रुषं ( =घृतसदृशस्य मेघजलस्य वर्षणं कर्तारं ) मनुजातं ( =मनुना प्रजापतिनोत्पादितम् ? ) [अन्यं ?] [ दैव्यं] जनम् ( =पितृगणम् ?) इह ( =अस्माकं कर्मणि ) यज ( =आराधय ) ॥

णास'प्रार्थना आहे कीं त्यांणीं येऊन हें स्तोत्र ऐकावें आणि त्यांस अर्पण केलेला सोम प्यावा.

' दानशाली '=' सुदानवः '. हें विशेषण मरुतांस पुष्कळ वेळ लाविलेलें पूर्वी आलेंच आहे.

' अग्नीच्या तोंडानें खाणारे '=' अग्निजिह्वाः '. अक्षरशः ' अग्निच जिह्वा ज्यांची, ' ' अग्निरूपी जिह्वेनें खाणारे '. ऋ. १. ८९. ७; ६. ५२. १३; ७. ६६. १०; आणि १०. ६५. ७ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा. ' अग्निजिह्वाः ' आहे त्याबद्दल ' अग्निमुखाः ' असें असावयाचें होतें अशी अपेक्षा होते पण अग्नीची ज्वाळा जी दृष्टीला पडते ती तोंडासारिखी दिसत नाहीं, जीभेसारिखी दिसते म्हणून ' अग्निजिह्वाः ' असें विशेषण दिलें आहेसें दिसतें.

' खऱ्या धर्मापासून सुख पावणारे '= ' ऋतावृधः '. ' ऋतावृध् ' हा शब्द ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आला आहे. सायणाचार्य फारकरून ' सत्यातें अथवा सत्यरूप यज्ञातें वाढविणार ' ( सत्यस्य सत्यरूपस्य यज्ञस्य वा वर्धयितृ ) असा अर्थ करितात. परंतु अर्थसंदर्भाकडे पाहूं गेलें असतां ' सत्यरूप जो यज्ञ त्यापासून प्रवृद्ध म्हणजे वाढणारे म्हणजे सुख पावणारे ' असा अर्थ इष्ट दिसतो. आणि हाच अर्थ सायणाचार्यांनीं ऋ. १०. ६६. ११; १०. ६६. १ आणि १०. ६५. ३ या मंत्रांवरील भाष्यांत दिला आहे, आणि ऋ. ७. ६६. १३ यांतहि सायणाचार्यांनीं केलेला नाहीं तरी फारच इष्ट दिसतो. यास्तव आम्हीं तो ग्रहण केला आहे. प्राचीन आपले आर्य पूर्वज देवांची यज्ञांत हवि वगैरे देऊन

## सूक्त ४५.

ऋषि– कण्वाचा पुत्र प्रस्कण्व ( मागच्या सूक्ताचा जो कर्ता तोच ). देवता–अग्नि परंतु १० व्या ऋचेचा उत्तरार्ध देवांविषयीं आहे. वृत्त– अनुष्टुप्.

१. हे अग्नी, तूं वसूंस, रुद्रांस, आणि आदित्यांस [आणि] सुयज्ञांनीं समृद्ध [आणि] घृताची वृष्टि करणारे जे मनूपासून निष्पन्न झालेले [देव]जन त्यांस येथें [आण आणि] [आम्हांकरितां] आराध.

## HYMN 45.

To *Agni*; but the second half of verse 10 is addressed to the Devas i. e. the gods which Agni is asked to bring. By *Praskaṇva* son of *Kaṇva* (author of the previous hymn). Metre—*Anushṭup*.

1. [Bring] thou hither [and] worship, O Agni, the Vasus, the Rudras and the Âdityas, [and] the Manu-begotten beings, rich in sacrifices [and] sprinkling showers of ghee.

---

उपासना करणें हा खरा धर्म आणि जे अनार्य लोक देवांची उपासना करीत नसत ते अनृतानुयायी म्हणजे अनृत (खोटें) आचरणारे असें समजत. आणि देवांस 'ऋतावृध्' म्हणजे आपण जें यज्ञरूपी सत्य आचरीत त्यापासून आनंद पावणारे, प्रसन्न होणारे असें विशेषण देत.

'ज्याची आज्ञा सर्व लोक धारण करितात '=' धृतव्रतः '. ज्याचें कर्म, किंवा ज्याणें घालून दिलेलें कर्मानुष्ठान लोक पाळितात. 'धृ' धातूचा अर्थ 'पाळणें' असा 'व्रत धरणें,' 'नेम धरणें' इत्यादि वाक्यांत मराटींत सुद्धा होत असतो. शिवाय, 'यस्या देवा उपस्थे व्रता विश्वे धारयन्ते' (ऋ. ८. ९४. २) याजवरील सायणभाष्य पहा. आणि ऋ. १. १०३. १ यांत सुद्धा 'धृ' धातूचा तोच अर्थ इष्ट दिसतो. आणि ऋ. १. १४१. ९ व ऋ. १. १९२. ४ हे मंत्र व त्यांजवरील सायणभाष्य पहा.

---

१. या मंत्रांत सांगितलेल्या देवांस अग्नीनें आणून त्यांची आराधना करावी अशी अग्नीची प्रार्थना केली आहे. अग्नीनें आराधना करावी म्हणजे अग्नींत जें हवि उपासक टाकीत आहे तें त्याणें त्या त्या देवांस तेथें आणून त्यांजकडून तें भक्षण करवावें.

आतां कोणकोणत्या देवांची आराधना करावयास सांगतो त्याचा विचार करणें आहे. तो येणेंप्रमाणें:–

'वसु,' 'रुद्र' आणि 'आदित्य' हे तीन गण पूर्वार्धांत सांगितले आहेत. 'वसु' म्हणजे कोण, 'रुद्र' म्हणजे कोण आणि 'आदित्य' म्हणजे कोण हें सायणाचार्य येथें सांगत नाहींत. परंतु इतर स्थळीं त्यांनीं त्याची फोड करून सांगितली आहे. 'आदित्य' हे कोण आणि किती आहेत त्याविषयीं आम्हीं पूर्वी सू. १४ मं. ३ याजवर दिलेली टीप पहा. 'वसु,' 'रुद्र' आणि 'आदित्य' हे देवाचे पृथक् पृथक् गण आहेत. बहुतकरून त्यांविषयीं उल्लेख तिघांचा मिळून एकत्र येत असतो. म्हणजे वसूंविषयीं प्रार्थना वगैरे केलेली असली तर तीतच रुद्र आणि आदित्य यांचें नांव आल्याशिवाय रहात नाहीं. तीनहि गणांचें आह्वान एकत्रच येतें. तिघांविषयींहि प्रशंसा एकत्रच येते. याविषयीं ऋ. ३. ८. ८; ३. २०. ५; १०. ६६. ४, १२; ७. ३५. १४; १०. १२५. १; १० १२८. ९; २. ३१. १; ८. ३५. १; १०. १५०. १; ३. १०. ८; ७. ३५. ६; १०. ६६. ३; ८. १०१. १५. इत्यादि प्रमाणें आहेत. ऋ. ३. ८. ८. (आदित्या रुद्रा वसवः सुनीथाः इ०) याजवर सायणाचार्य १२ आदित्य, ११ रुद्र आणि ८ वसु असें म्हणतात; तसेंच ऋ. ३. २०. ५. (वसून् रुद्रान् आदित्यान् इह हुवे) याजवर अष्ट वसु, एकादश रुद्र, आणि द्वादश आदित्य असें ते म्हणतात. ऋ. ७. ३५. १४. (आदित्या रुद्रा वसवो जुषन्त) याजवर सायणाचार्य म्हणतात कीं "आदित्य म्हणजे द्युलोकसंबंधी देव, रुद्र म्हणजे अंतरिक्षांतील देव, आणि वसु म्हणजे पृथिवीवरील देव होत." ऋ. १०. १२५. १ (अहं रुद्रेभिः वसुभिः चरामि अहम् आदित्यैः उत विश्वदेवैः) याजवरहि सायणाचार्य रुद्र ११ असें म्हणतात. ऋ. २. ३१. १ (अस्माकं मित्रावरुणा अवत रथम आदित्यैः रुद्रैः वसुभिः सचा भुवा) याजवर सायणाचार्य म्हणतात कीं "आदित्य म्हणजे धाता, अर्यमा इत्यादि १२; रुद्र ११; आणि वसु म्हणजे धर, ध्रुव इत्यादि ८. येणेंप्रमाणें देवांचे तीन गण."

हे जे तीन गण सांगितले त्या प्रत्येकाचा एक एक स्वामी म्हणजे मुख्य देव आहे असेंहि आढळतें. ऋ. ७. १०. ४ (इन्द्रं नः अग्ने वसुभिः सजोषाः रुद्रं रुद्रेभिः आवह बृहन्तम् । आदित्येभिः अदितिं विश्वजन्याम्) यांत वसूंसहित इन्द्राला, रुद्रांसहित रुद्राला आणि आदित्यांसहित अदितीला आणण्याविषयीं अग्नीला प्रार्थना केली आहे. ऋ. १०. ६६. ३ (इन्द्रो वसुभिः परिपातु नो गयम् आदित्यैर्नो अदितिः शर्म यच्छतु । रुद्रो रुद्रेभिर्देवो मृळयाति नः) यांत 'वसूंसहित इन्द्र आमचें घर संरक्षो, आदित्यांसहित अदिति आम्हांस सुख देओ, आणि रुद्रांसहित रुद्र देव आम्हांस सुखी करो' अशी प्रार्थना

केली आहे. या ठिकाणीं 'रुद्रांसहित रुद्र' याचा अर्थ सायणाचार्य रुद्रपुत्र म्हणजे जे मरुत् त्यांसहित रुद्र देव असा करितात. ऋ. ७. ३५. ६ (शं नः इन्द्रः वसुभिः देवः अस्तु शम् आदित्येभिः वरुणः सुशंसः । शं नः रुद्रो रुद्रेभिः जलाषः) यांत वसूंसहित इन्द्रदेव आम्हांस शान्तिकर होओ, आदित्यांसहित सुस्तुत वरुण आम्हांस शांतिकर होओ, आणि रुद्रांसहित आरोग्यदायक रुद्र देव आम्हांस शांतिदायक होओ, अशी प्रार्थना केली आहे. तेव्हां या तीनहि मंत्रांवरून असें उघड होतें कीं वसुनामक देवगणाचा नायक इन्द्र होय, रुद्रनामक देवगणाचा नायक रुद्र होय, आणि आदित्यनामक देवगणाची नायिका अदिति अथवा त्यांचा नायक वरुण होय. आणि अदिति ही आदित्यांची आई असावी आणि रुद्रगण म्हणजे रुद्राचे पुत्र जे मरुत् ते असावे. इन्द्राला मात्र वसूंचें नायकत्व कसें आलें तें समजत नाहीं.

'वसुगण,' 'रुद्रगण' आणि 'आदित्यगण' ह्यांविषयीं जो एकत्र निर्देश आढळतो त्यावरून त्यांचा परस्पर कांहीं तरी संबंध असावा असें अनुमान होतें. आणि तें ऋ. ८. १०१. १५ या मंत्रावरून सिद्ध होतें. तो मंत्र असाः— 'माता रुद्राणां दुहिता वसूनां स्वसा आदित्यानाम् अमृतस्य नाभिः । प्र नु वोचं चिकितुषे जनाय मा गाम् अनागाम् अदितिं वधिष्ट' =' रुद्रांची आई, वसूंची कन्या, आणि आदित्यांची बहीण आणि उदकरूपी दुधाचें मुख्यस्थान अशी जी निरपराधी अदिति हीच कोणीएक गाय तिला तुम्ही मारूं नका असें मी सज्जनांस सांगतों.' या ठिकाणीं तरी रुद्रगण म्हणजे रुद्राचे पुत्र जे मरुत् ते होत असें सायणाचार्य म्हणतात.

'सुयज्ञांनीं समृद्ध' = 'स्वध्वरम्.' म्हणजे ज्याप्रीत्यर्थ चांगले चांगले यज्ञ केले जातात ते.

'घृताची वृष्टि करणारे' ='घृतप्रुषम्.' म्हणजे उदकरूपी तुपाची वृष्टि करणारे असें सायणाचार्य समजतात.

'मनूपासून निष्पन्न झालेले [देव]-जन' ='मनुजातं जनं.' हा अर्थ आम्हीं सायणांस अनुसरून केला आहे; परंतु मनु म्हणजे सर्व मनुष्यांचा उत्पादक जो (आदमासारिखा) पहिला पुरुष अथवा प्रजापति त्यापासून उत्पन्न झालेले देव ते कोण हें सायणाचार्य सांगत नाहींत; परंतु ते वसुगण, आदित्यगण, आणि रुद्रगण या तिहींपासून भिन्न असें त्यांचें म्हणणें आहे. कितीएक विद्वान् वसुगण, रुद्रगण, आणि आदित्यगण हेच मनूपासून निष्पन्न झालेले देव असें समजतात; परंतु ते गण मनूपासून निष्पन्न झालेले म्हणजे काय तें समजत नाहीं. 'मनूपासून उत्पन्न झालेले [देव]जन' म्हणजे पितृगण असतील काय ?

**श्रुष्टीवानो हि दाशुषे देवा अग्ने विचेतसः ।**
**तान्रोहिदश्व गिर्वणस्त्रयस्त्रिंशतमा वह ॥ २ ॥**

श्रुष्टीऽवानः । हि । दाशुषे । देवाः । अग्ने । विऽचेतसः ।
तान् । रोहित्ऽअश्व । गिर्वणः । त्रयःऽत्रिंशतम् । आ । वह ॥ २ ॥

**प्रियमेधवदत्रिवज्जातवेदो विरूपवत् ।**
**अङ्गिरस्वन्महिव्रत प्रस्कण्वस्य श्रुधी हवम् ॥ ३ ॥**

प्रियमेधऽवत् । अत्रिऽवत् । जातऽवेदः । विरूपऽवत् ।
अङ्गिरस्वत् । महिऽव्रत । प्रस्कण्वस्य । श्रुधि । हवम् ॥ ३ ॥

## भाषायाम्.

२. हि (=यस्मात् कारणात्) हे अग्ने, विचेतसः (=विशिष्टज्ञानयुक्ता) देवा दाशुषे (=हविर्दत्तवत उपासकाय) श्रुष्टीवानः (=श्रुष्टीवन्तः श्रवणवन्तः=प्रार्थितफलस्य दातारः) [सन्ति]। तान् त्रयस्त्रिंशतं (=त्रयस्त्रिंशत्संख्याकान्) [देवान्]. हे रोहिदश्व (=रोहिन्नामकैस्ताम्रार्थैः ज्वालारूपैरूपेत) हे गिर्वणः (=स्तुतिकाम) [अग्ने], आवह (=अत्रानय) ॥

३. प्रियमेधवत् (=प्रियमेधस्य हवं यथा) अत्रिवत् (=अत्रेर्हवं यथा), [अपि च], हे जातवेदः (=जातानां वेदितरग्ने), विरूपवत् (=विरूपस्य हवं यथा), [अपि च] हे महिव्रत (=महाकर्मन्) अङ्गिरस्वत् (=अङ्गिरसां हवं यथा) [तथा] प्रस्कण्वस्य (=सूक्तस्य कर्तुर्मम) हवम् (=आह्वानं) श्रुधि (=श्रुहि=शृणु) ॥

२. कारण कीं हे अग्नी, महाप्रज्ञ [असे जे] देव [ते] हवि देणाऱ्या [उपासका]ला प्रसन्न होत [असतात]. [तर ] हे रोहिदश्वा, हे स्तुतिप्रिया [अग्नी], त्या तेहतिसांला [तूं] इकडे घेऊन ये.

2. For the all-wise gods, O Agni, [are] granters o a hearing to the giver [of an oblation]. Bring [thou therefore], O prayer-loving possessor of red horses, the thirty-three [gods] hither.

३. हे महाकर्मकारी [अग्नी ], [ तूं ] प्रियमेधा[ची हाक ऐकत होतास ] तशी, अत्री[ची ऐकत होतास ] तशी, [ आणि ] हे जातवेदा [ अग्नी], विरूपा[ची ऐकत होतास] तशी, [आणि] अंगिरसा[ची ऐकत होतास] तशी [ माझी ] प्रस्कण्वाची हाक ऐक.

3. As of Priyamedha, as of Atri, [and], O Jâtavedas, as of Virûpa, [and], O performer of works, as of Angiras, hear [thou] the call of Praskanva.

---

२. पूर्वील मंत्रांत वसुगणादि देवगणांस आराधण्याविषयीं सूक्तकर्त्यानें अग्नीची प्रार्थना केली. आतां या मंत्रांत म्हणतो कीं, 'देवांची आराधना केल्यास ती फुकट जाणार नाहीं; ते प्रार्थना फलद्रूप करितील, कारण, कीं आम्ही जरी मनुष्यें अज्ञान आहोंत, तथापि ते महाज्ञानी होत. आणि त्यामुळें आम्हीं प्रार्थिलेल्या वस्तूंपैकीं कोणती वस्तु द्यावी, कोणती देऊं नये, आणि द्यावी ती कशी द्यावी, हें त्यांस ठाऊक आहे. तर हे अग्नी, तेहतीसहि देवांस तूं इकडे घेऊन ये.'

'प्रसन्न होत असतात' =' श्रुष्टीवानः [सन्ति]'. अक्षरशः अर्थ, 'ऐकणें आहे ज्यांस ते,' 'जे ऐकतात ते,' 'ऐकणारे', 'श्रवण करून घेणारे असे आहेत जे.'

'रोहिदश्व.' हें अग्नीचें नांव आहे. अग्नीचे घोडे लाल आहेत. म्हणजे त्याच्या ज्वाळा तांबड्या आहेत असें तात्पर्य.

'स्तुतिप्रिय '=' गिर्वणः.' म्हणजे ज्याला स्तुति आवडते तो. सूक्त १० मंत्र १२ याजवरील आमची टीप पहा.

'त्या तेहतीसांला.' म्हणजे तेहतीस देवांला. देव तेहतीस आहेत असें वेदांत सांगितलें आहे, याविषयीं सूक्त ३४ मंत्र ११ याजवरील आमची टीप पहा. हे जे तेहतीस देव या मंत्रांत सांगितले तेच पूर्वमंत्रांत विवक्षित आहेत असें अर्थसंदर्भावरून दिसतें. आणि वसु म्हणजे ८ देवांचा एक गण. रुद्र म्हणजे ११ देवांचा एक गण. आणि आदित्य १२ देवांचा एक गण असें जें सायणाचार्यें

**महिकेरव ऊतये प्रियमेधा अहूषत ।**
**राजन्तमध्वराणामग्निं शुक्रेण शोचिषा ॥ ४ ॥**

महिऽकेरवः । ऊतये । प्रियऽमेधाः । अहूषत ।
राजन्तम् । अध्वराणाम् । अग्निम् । शुक्रेण । शोचिषा ॥ ४ ॥

**घृताहवन सन्त्येमा उ षु श्रुधी गिरः ।**
**याभिः कण्वस्य सूनवो हवन्तेऽवसे त्वा ॥ ५ ॥ ३१ ॥**

घृतऽआहवन । सन्त्य । इमाः । ऊम् इति । सु । श्रुधि । गिरः ।
याभिः । कण्वस्य । सूनवः । हवन्ते । अवसे । त्वा ॥ ५ ॥ ३१ ॥

## भाषायाम्.

४. महिकेरवः (=महाकर्माणः=स्तोत्ररूपं महत् कर्म कृतवन्तः) प्रियमेधाः (=प्रियमेधस्य कुल उत्पन्ना उपासका) ऊतये (=निजरक्षणाय), शुक्रेण शोचिषा (=शुद्धेन प्रकाशेन) [युक्तम्] अध्वराणां राजन्तं (=यज्ञानाम् ईशम्) अग्निम् अहूषत (=आहूतवन्तः) ॥

५. हे घृताहवन (=घृतेनाहूयमान) सन्त्य (=फलप्रद) [अग्ने], इमा उ (=इमा अपि अस्माभिः क्रियमाणा अपि)' गिरः (=स्तोत्ररूपा वाचः) [त्वं] श्रुधि (=शृणु), याभिः [गीर्भिः] [अस्मदात्मानः] कण्वस्य सूनवः (=कण्ववंशे पुत्राः) अवसे (=रक्षणाय) त्वा (=त्वां) हवन्ते (=आह्वयन्ति) ॥

अत्रेदमुक्तं भवति । प्रियमेधानां गिरो यथा त्वमशृणोस्तथा कण्वानाम् (=अस्माकं) गिरोपि त्वं शृणुहीति ॥

म्हणतात (पूर्व मंत्रावरील टीप पहा) तें बरोबर असेल. कारण कीं त्यांत द्यावापृथिवी ह्या दोन मिळविल्या म्हणजे तेहतीस देव झाले.

३. या मंत्रांत प्रियमेधादि जे ऋषि सांगितले त्यांणीं पूर्वीच्या काळीं अग्नीस मारिलेली हाक जशी अग्नि ऐकत असे, तशी मंत्रकर्ता प्रस्कण्व आतां हाक मारितो तोहि अग्नीनें ऐकावी अशी प्रार्थना आहे.

'महाकर्मकारी'=' महिव्रत.' म्हणजे मनुष्यांनीं देवांस अर्पण केलेलें हवि देवांजवळ पोंहचविणें, देवांस मनुष्यांच्या यज्ञमंडपांत घेऊन येणें, सज्जनाचा प्रतिपाळ, आणि दुर्जनाचा नाश करणें इत्यादि जीं मोठमोठीं कामें अग्नि करितो तीं करणारा.

'प्रियमेध,' 'अत्रि,' 'विरूप,' 'अंगिरस.' हीं पूर्वी होऊन गेलेल्या मोठ्या ऋषींचीं नांवें आहेत.

४. महाकर्मे [ जे ] प्रियमेध [ ते ] शुद्धप्रकाशयुक्त यज्ञप्रभू अ-ग्नीचें [ आपल्या ] संरक्षणासाठीं आह्वान करीत असत.

५. [ तर ] हे घृताहवना, हे दानशाली [ अग्नी ], हींहि स्तोत्रें [ तूं ] लक्ष्य लावून ऐक; [ कीं ] ज्यांहीं करून कण्वाचे पुत्र तुला रक्षणासाठीं बोलावीत आहेत.

4. The Priyamedhas for [their] protection used to invoke, with great hymns, Agni of brilliant splendor, the king of sacrifices.

5. O generous Agni, invoked with *ghee*, hear [thou] favourably these prayers too, through which the sons of Kanva are invoking thee for [their] protection.

---

पूर्वी होऊन गेलेल्या देवभक्तांवर तूं प्रसन्न झालास तसाच आपणावरहि प्र-सन्न व्हावास अशी ऋषीची विनवणी ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. कारण की तो असें म्हणत नाहीं कीं 'हे अग्नी, माझें तपोबळ मोठें आहे, माझ्या हाकेसरशीं तूं धांवत ये, आणि न येशील तर अमुक अमुक ऋषींनीं तुला शाप दिला तसा मी शाप देईन.' जर प्राचीन ऋषि आम्ही समजतों तसे असते तर, प्रस्कण्वानें विनवणी न करितां याप्रमाणें भीति खचीत घातली असती.

---

४. ऋषि म्हणतो कीं, 'मी जशी आतां हाक मारीत आहें तशीच पूर्वी प्रि-यमेधकुळांतील मनुष्यें मारीत असत; आणि ती अग्नि ऐकत असे; तशीच मा-झी हाक अग्नि आतां ऐको.'

'महाकर्मे' = 'महिकेरवः' म्हणजे स्तुतिरूप मोठें कर्म करून.

'शुद्धप्रकाशयुक्त.' हा अर्थ आम्ही 'शुक्रेण शोचिषा' ही सहार्थी तृतीया समजून केला आहे. दुसरा योग्य मार्ग कांहीं दिसत नाहीं.

'यज्ञप्रभु '=' राजन्तम् अध्वराणाम्.' सू.१ मंत्र ८ याजवरील आमची टीप पहा.

'आह्वान करीत असत' = 'अहू-षत.' अक्षरशः अर्थ 'बोलावीत असत,' 'हाक मारीत असत.''

५. ऋषि म्हणतोः—'प्रियमेध जीं पूर्वी स्तवनें करीत तीं तूं ऐकून घेत हो-तास तशीं आज आम्हीं कण्वपुत्र करीत आहों तींहि तूं ऐक.'

'घृताहवना,' म्हणजे ज्यानें आह्वान ( बोलाविणें ) तुपानें होत असतें. हें ख-रेंच आहे, कीं तूप विस्तवावर टाकतांच अग्नीचा आविर्भाव होतो.

'दानशाली' =' सन्त्य.' सू. ३६ मंत्र २ याजवरील आमची टीप पहा.

त्वां चित्रश्रवस्तम हवन्ते विक्षु जन्तवः ।
शोचिष्केशं पुरुप्रियाग्ने हव्याय वोळ्हवे ॥ ६ ॥

त्वाम् । चित्रश्रवःऽतम । हवन्ते । विक्षु । जन्तवः ।
शोचिःऽकेशम् । पुरुऽप्रिय । अग्ने । हव्याय । वोळ्हवे ॥ ६ ॥

नि त्वा होतारमृत्विजं दधिरे वसुवित्तमम् ।
श्रुत्कर्णं सप्रथस्तमं विप्रा अग्ने दिविष्टिषु ॥ ७ ॥

नि । त्वा । होतारम् । ऋत्विजम् । दधिरे । वसुवित्ऽतमम् ।
श्रुत्ऽकर्णम् । सप्रथःऽतमम् । विप्राः । अग्ने । दिविष्टिषु ॥ ७ ॥

## भाषायाम्.

६. हे चित्रश्रवस्तम ( =अतिशयेन चायनीयकीर्तिमन्=अत्युत्तमकीर्तिमन् ) विक्षु ( =लोकेषु जगत्यस्मिन् ) जन्तवः ( =मनुष्याः ) त्वां हवन्ते ( =आह्वयन्ति ), हे पुरुप्रिय ( =बहूनां प्रीतिकर ) अग्ने, शोचिष्केशं ( =ज्वालारूपकेशवन्तं ) [ त्वां ] हव्याय वोळ्हवे ( =हव्याय वोढव्याय=हव्यं देवान् प्रति वोढुं ) [ हवन्ते ] ॥

न केवलं प्रियमेधास्त्वां हव्यवहनाय ह्वयन्ति अपि तु एतस्मिन् जगति सर्वेपि लोका आह्वयन्तीत्यर्थः ॥

७. हे अग्ने, विप्राः ( =मेधाविनः ) वसुवित्तमम् (= अतिशयेन धनस्य लम्भयितारं ) श्रुत्कर्णं ( =श्रवणयोग्यकर्णोपेतं ) सप्रथस्तमम् ( =अतिशयेन प्रख्यातं ) त्वां दिविष्टिषु ( = स्वर्गेषणेषु=स्वर्गेषणनिमित्तेषु यागेषु ) होतारम् ( =आह्वातारम् ) ऋत्विजं [ च ] [ कृत्वा ] निदधिरे ( =स्थापयन्ति ) ॥

'हीहि '=' इमा उ.' म्हणजे प्रियमेधांचीं तर स्तोत्रें तूं ऐकतच होतास. आतां आमचींहि ऐक.

' कण्वाचे पुत्र.' म्हणजे आम्ही स्तोत्र गाणारे. सूक्तकर्ता जरी एकलाच प्रस्कण्व आहे तथापि कण्वकुळांतील सर्व मिळून उपासना करीत आहेत यास्तव अनेकवचनाचा प्रयोग केला आहे, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. प्राचीन काळीं कुटुंबांतील सर्व माणसें मिळून एकत्र उपासना करीत, असें अनुमान संभवतें याविषयीं पूर्वी लिहिलेंच आहे.

६. हे अत्युत्तमकीर्तिमान् [ अग्नी ], हे बहुतांस आवडणाऱ्या अग्नी, हवि नेऊन जाण्यासाठीं तुला ज्वालाशिखाला, [ या ] लोकीं मनुष्यें बोलावितात.

७. हे अग्नी, अतिशयेंकरून धनप्राप्ति करून देणारा, ज्या कानांनीं ऐकूं येतें असे कान ज्याला आहेत असा, [ आणि ] अतिप्रख्यात [ असा जो तूं त्या ] तुला विद्वान् [लोक] यज्ञांत होता [ आणि ] ऋत्विज [करून] स्थापीत असतात.

6. Thee, O [Agni], of most excellent renown, men in [ this ] world invoke, [thee] the flame-haired, O Agni, beloved to many, [they invoke] for conveying the oblation.

7. Thee, Agni, [who art] the best securer of blessings, the possessor of ears that can hear, [ and who art ] most renowned, the wise appoint in their heaven-ward yearnings [ as their ] invoker [and] priest.

६. चवथ्या मंत्रांत सूक्तकर्त्यानें प्रियमेधकुलोत्पन्न मनुष्यें अग्नीचें आह्वान करितात असें सांगितलें; पांचव्यांत आम्हीं कण्वाचे पुत्र आह्वान करितों असें सांगितलें; आतां या मंत्रांत म्हणतो कीं, ‘ प्रियमेध, आणि कण्व इतकेच आह्वान करितात असें नाहीं, तर या विस्तीर्ण जगतांत सर्वच मनुष्यें अग्नीचें आह्वान करितात. असा अग्नीचा प्रसिद्ध महिमा आहे.’

‘ अत्युत्तमकीर्तिमान् ’ = ‘ चित्रश्रवस्तम.’ ऋ. ८. ९२. १७ आणि ३. ५९. ६ हे मंत्र व त्यांजवरील सायणभाष्य पहा.

‘ हवि नेऊन जाण्यासाठीं ’= ‘ हव्याय वोळ्हवे.’ ही शब्दरचना ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. ‘ वोढवे ’ हें ‘वोढुम्’ याचें चतुर्थ्यन्त रूप आहे. ‘ वोढुम् ’ याला आपण तुमन्त अव्यय म्हणत असतां, परंतु वस्तुतः तें ‘ वोढु ’ या उकारान्त भाववाचक नामाचें द्वितीयान्त रूप आहे. आणि त्याच उकारान्त भाववाचक नामाचें ‘ वोढवे ’ हें चतुर्थ्यन्त रूप आहे. अर्थात तर कांहीं भेद नाहीं. मात्र ‘ वोढुम् ’ असा प्रयोग असता तर ‘ हव्यम् ’ अशी द्वितीया घातली असती. ‘वोढवे’ या चतुर्थ्यन्त रूपाच्या साहचर्याकर्षणानें ‘ हव्य ’ शब्दाचाहि चतुर्थ्यन्त प्रयोग झाला. वस्तुतः ‘ हव्यं वोढवे ’ असें विवक्षित असतां ‘ वोढवे ’ या चतुर्थीनें ‘ हव्य ’ शब्दास आपणाकडेस आकर्षिलें, आणि त्यालाहि आपल्यासारिखेंच केलें. अशा तऱ्हेचे प्रयोग वेदांत पुष्कळ येतात.

‘ ज्वालाशिखाला ’= ‘ शोचिष्केशं. ’ म्हणजे ज्वाला हेच ज्याचे केश होत. हें विशेषण अग्नीस साजतें म्हणून सांगावयास नकोच.

७. वरच्या मंत्रांत सर्व लोक अग्नीचें

**आ त्वा विप्रा अचुच्यवुः सुतसोमा अभि प्रयः ।**
**बृहद्भा बिभ्रतो हविरग्ने मर्ताय दाशुषे ॥ ८ ॥**

आ । त्वा । विप्राः । अचुच्यवुः । सुतऽसोमाः । अभि । प्रयः ।
बृहत् । भाः । बिभ्रतः । हविः । अग्ने । मर्ताय । दाशुषे ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. हे अग्ने, विप्राः ( =स्तोत्रकृतः ) सुतसोमाः ( =अभिषुतसोमाः ) [ सन्तः ] [ तथा ] हविर्बिभ्रतः ( =हविर्हस्ते धारयन्तः ) [ सन्तः ] त्वा ( =त्वां ) मर्ताय दाशुषे ( =मर्त्याय हविःप्रदाय उपासकाय ) अभि प्रयः ( =हविरन्नं प्रति ) अचुच्यवुः ( =आगमयन्ति ) ॥

आह्वान करितात असें सांगितलें. आतां या मंत्रांत म्हणतो कीं, 'नुसतें आह्वान करितात इतकेंच नव्हे, परंतु देवोपासक जन सर्व उत्तम यज्ञांच्या प्रसंगीं तुला आपला होता, आणि ऋत्विज नेमितात. कारणं कीं तूं चिंतिलेलें कल्याण करून देणारा, केलेली प्रार्थना ऐकून घेणारा, आणि चांगलेपणाविषयीं महाप्रख्यात असा आहेस.'

'अतिशयेंकरून धनप्राप्ति करून देणारा'='वसुवित्तमम्.' या सुंदर मंत्राच्या अर्थसंदर्भाकडे पाहातां हें धन म्हणजे केवळ नाशवंत द्रव्यच नव्हे, पण देवांचा प्रसाद आणि अमरत्व यांचा सुद्धा यांत समावेश होईल असें दिसतें.

'ज्या कानांनीं ऐकूं येतें असे कान ज्याला आहेत तो'='श्रुत्कर्णम्.' सूक्त ४४ मंत्र १३ याजवरील टीप पहा.

'यज्ञांत'='दिविष्टिषु.' 'दिविष्टि' शब्दाचा मूळ अर्थ 'स्वर्गाविषयी इच्छा' असा आहे. त्यावरून 'स्वर्गाविषयींची इच्छा करून जो केलेला यज्ञ तो', असा अर्थ मागाहून झाला. यावरून पाहातां यज्ञ म्हणजे केवळ गुरें ढोरें मिळण्यासाठींच करीत असें नाहीं, परंतु स्वर्गप्राप्त्यादि जे मर्त्यांस अतिवांछनीय पदार्थ त्यांसाठींहि करीत असें दिसतें.

८. हे अग्नी, मेधावी [ जन ] सोमरस काढून [ आणि ] आहुति हातांत घेऊन, तुला महातेजो[रू-पा]ला मर्त्य यजमानासाठीं हविरन्नाकडेस वळवीत असतात.

8. Thee, O Agni, the singers, having extracted the Soma, [and] bearing the oblation [ in their hands ], induce [ thee ] the great splendor--to the sacrificial food for the benefit of the mortal worshipper.

८. ह्या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'हे अग्नी, स्तोत्रें रचून म्हणणारे आणि यज्ञ संपादणारे जे विद्वान् लोक यज्ञ संपादण्याच्या कामीं योजिलेले असतात, ते सोम काढून आणि हातांत आहुत्या घेऊन महातेजोरूपी जो तूं त्या तुला मर्त्य यजमानाकरितां होमान्नाकडे आळवून आळवून ओढीत असतात.'

'तुला महातेजो[रूपा]ला' = 'त्वा बृहद् भाः.' म्हणजे महातेज असा जो तूं त्या तुला. 'भास्' हें ( नपुंसकलिंगी ) नाम 'अग्निरूप तेज' अथवा अग्नीचें जें 'तेज' या अर्थीं वेदांत पुष्कळ ठिकाणीं आढळतें. ऋ. ४. ५. १; ४. ७. ९; २. ८.५. इत्यादि अनेक मंत्र प्रमाणीभूत आहेत. आणि बहुतकरून प्रस्तुत मंत्रांत असल्याप्रमाणें 'बृहद् भाः' असे दोनी शब्द एकत्र असतात. ऋ. ७. ८. ४; ८. २३. ४ इ०. 'भास्' शब्द नाम आहे अशाविषयीं ऋ. ६. १. ११; ७. ५. ४; ८. २३. ५; ६. १०. ४ इत्यादि मंत्र पहा.

'मर्त्य यजमानासाठीं' = 'मर्ताय दाशुषे.' म्हणजे, अग्नीनें घेऊन उपासकाचें जें अन्न, सोम, इत्यादि यज्ञसंपादकांनीं अर्पण केलें असेल तें ग्रहण करून त्याचें कल्याण करावें या हेतूनें. अशी विवक्षा आहे.

या मंत्रावरून इतकें उघड होतें कीं पुरातनकाळीं यज्ञ संपादण्यासाठीं विद्वान् लोकांची ( विप्रांची ) योजना करीत; आणि यज्ञ करणाऱ्याला त्या यज्ञाचें श्रेय यावें म्हणून ते विद्वान लोक उपास्य देवतेला अर्पण करावयाचा सोम आपण तयार करीत; स्तोत्रें रचीत आणि त्या देवतेची विनवणी करीत. केव्हां केव्हां असेंहि आढळतें कीं त्या स्तोत्रांत केवळ यजमानाचीच अभिवृद्धि व्हावी अशी प्रार्थना करीत नसत, तर आपली ( स्तोत्रकर्त्यांची ) सुद्धा अभिवृद्धि व्हावी असें प्रार्थीत. या इतक्या संबंधानें मात्र प्राचीन पुरोहितांत आणि अर्वाचीन पुरोहितांत मोठा भेद आहे. कारण आलीकडचे पुरोहित यजमानाचें कल्याण व्हावें इतकाच मात्र आशीर्वाद देतात, आपणा

**प्रातर्याव्णः सहस्कृत सोमपेयाय सन्त्य ।**
**इहाद्य दैव्यं जनं बर्हिरा सादया वसो ॥ ९ ॥**

प्रातःऽयाव्नः । सहःऽकृत । सोमऽपेयाय । सन्त्य ।
इह । अद्य । दैव्यम् । जनम् । बर्हिः । आ । सादय । वसो इति॥९॥

**अर्वाञ्चं दैव्यं जनमग्ने यक्ष्व सहूतिभिः ।**
**अयं सोमः सुदानवस्तं पात तिरोअह्न्यम् ॥ १० ॥ ३२ ॥**

अर्वाञ्चम् । दैव्यम् । जनम् । अग्ने । यक्ष्व । सहूतिऽभिः ।
अयम् । सोमः । सुऽदानवः । तम् । पात । तिरःऽअह्न्यम्॥१०॥३२॥

## भाषायाम्.

९. हे सहस्कृत (=बलेन अरणिभ्यां मथित) सन्त्य (=फलप्रद) वसो (=निवासक=दयालो) [अग्ने], अद्य [त्वं] प्रातर्याव्णः (=प्रातश्चरान) [देवान् सवितृषआदीन्] सोमपेयाय (=सोमपानार्थम्) आ[नय], [तं] दैव्यं जनं (=तान् देवान्) बर्हिः (=बर्हिरुपरि) सादय (=निषादय) [च] ॥

१०. हे अग्ने, [त्वं] सहूतिभिः (=समानाह्वानैः) दैव्यं जनं (=देवजनं=देवान्) अर्वाञ्चं यक्ष्व (=यष्ट्वा अर्वाञ्चं कुरु=यष्ट्वात्रानय) ।—[अपि च] हे सुदानवः (=सुष्टुफलदातारो) [देवाः], सोमो [युष्मदर्थम्] अयम् (=अत्र स्थितोऽस्ति) तं तिरोअह्न्यं (=ह्यः अभिषुतं) [सोमं] [यूयं] पात (=पिबत) ॥

---

स्वताहाविषयीं प्रार्थनेचा एक शब्द सुद्धा म्हणत नाहींत! जणुं काय, सर्व ऋद्धि सिद्धि त्यांच्या तर घरीं दासीप्रमाणें वागतच आहेत.

९. हे बलोत्पन्ना, हे दानशीला, हे सुखकरा [अग्नी], [तूं] प्रातश्चर [देवांला] सोमपानार्थ आ[ण], आणि त्या दिव्यजनाला आज येथें दर्भासनावर बसीव.

9. [Bring] to drink the Soma, O Force-generated, generous, [and] kind Agni, those that go forth in the morning [and] seat the celestial beings here on the Kus'a-[grass] to-day.

१०. हे अग्नी, [तूं] सहाव्हानें करून देवजनाला यजून इकडे घेऊन ये.—[आणि] हे दानशील [देवांनो] [तुम्हास] हा [येथें] सोम [अर्पण केला] [आहे], तो काल काढिलेला [सोम] [तुम्ही] प्या.

10. Agni, worship and bring hither, through simultaneous invocations the celestial beings.—[And] O ye generous [Gods], here [is] Soma [for ye], drink it, [which was] expressed yesterday.

९. यांत अग्नीला अशी प्रार्थना आहे कीं, 'हे अग्नी, प्रातःकाळीं रथांत बसून संचार करणारे जे सविता, उषा, अश्वी इत्यादि देव, त्या देवजनाला तूं आज घेऊन ये, आणि या आमच्या दर्भासनावर बसीव.'

'बलोत्पन्न' = 'सहस्कृत.' म्हणजे जोर करून मंथनानें अरणींतून उत्पन्न केलेला. सू. २६ मं. १० याजवरील टीप पहा.

'सुखकरा' = 'वसो.' 'वसु' हें विशेषण वेदांत पुष्कळ देवांस लाविलेलें आढळतें. त्याचा अर्थ सायणाचार्य बहुतकरून निवासक, अथवा वासयिता, म्हणजे 'राहण्यास स्थळ देणारा,' 'आश्रय देणारा' असा करितात. हा धात्वर्थ आहे आणि अशा प्रकारचा मूळचा अर्थ कांहीं असला तथापि प्रसिद्ध अर्थ 'चांगला,' 'बरें करणारा,' 'सुखकारी,' 'कल्याणकारी' असा होत असतो. हें विशेषण इंद्र, अग्नि, पूषा, सोम, रुद्र, आदित्य, मरुत्, उषा, इत्यादि देवांस लाविलेलें आढळतें. यावरून आमच्या आर्यपूर्वजांचे देव आमच्या आधुनिक वेताळ, महामारी, शितळा, खोडियार, छिनाळ मारुति, सोट्या म्हसोबा, रक्ताशिनी कालिका इत्यादि भयंकर देवतांप्रमाणें वाईट करणारे आहेत असें ते समजत नसत; तर देव म्हणजे स्वभावतः चांगले, व बरें करणारे होत आणि त्यांचा पराक्रम निरपराध्यांस पीडण्याचा नव्हता, सर्वांचें चांगलें करण्याचा होता असें समजत, आणि दुष्टाचें पारिपत्य करणें याहून दुसरें भयंकर कृत्य करणें त्यांस आवडतें असें ते समजत नसत.

'प्रातश्चर' = 'प्रातर्यावणः.' म्हणजे 'प्रातर्गामी,' 'प्रातःकाळीं उठून (उषर्बुधः) संचार करणारे.' सू. ४४ मं. १३ याजवरील टीप पहा.

१०. भावार्थः—'हे अग्नी, तूं सकल देवांचें एकच काली आह्वान करून त्यांस हवि देऊन, इकडे घेऊन ये.—आणि हे दे-

## सूक्तम् ४६.

कण्वपुत्रः प्रस्कण्व ऋषिः । अश्विनौ देवता । गायत्री छन्दः ।

**एषो उषा अपूर्व्या व्युच्छति प्रिया दिवः ।**

**स्तुषे वामश्विना बृहत् ॥ १ ॥**

एषो इति । उषाः । अपूर्व्या । वि । उच्छति । प्रिया । दिवः ।

स्तुषे । वाम् । अश्विना । बृहत् ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. एषो (=एषैव) दिवः प्रिया (=द्युलोकस्य प्रियदुहिता) अपूर्व्या (=नूतना) उषा व्युच्छति (=तमो वर्जयितुमारभते) । [अतः कारणात्] हे अश्विना (=अश्विनौ), वां (=युवाम्) [अहं] बृहत् (=प्रभूतं यथा स्यात्तथा) स्तुषे (=स्तवानि) ॥

अत्रेदमुक्तं भवति । पश्य पश्य एषा दिवः प्रियदुहिता नूतनोषाः प्रकाशितुमारब्धा । तदहं, हे अश्विनौ, युवां भूयः स्तवानीति ॥

वांनो, हे दाते हो, तुम्हांसाठीं हा सोम येथें अर्पण केला आहे, आणि तो काल काढिलेला आहे, यास्तव तो तुम्ही प्या.'

'सहाह्वानेंकरून' = 'सहूतिभिः.' म्हणजे एकामागून एकास हाक मारून बोलावूं नकोस, सर्वांस एकदमच हाक मार आणि बोलाव. ऋ. ७. २७. ४ हा मंत्र आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

'देवजनाला यजून इकडे घेऊन ये' = 'दैव्यं जनम् अर्वाञ्चं यक्ष्व.' म्हणजे देवांस यज (हवि अर्पण कर) कीं जेणेंकरून ते इकडे येतील. 'अर्वाञ्चम्' हें विशेषण या स्थळीं 'आ' या उपसर्गाच्या अर्थीं योजिलेलें आहे.

या मंत्राचा पूर्वार्ध अग्नीला म्हटलेला आहे आणि उत्तरार्ध देवांस म्हटला आहे. पूर्वार्धांत ज्या देवांस आणण्याविषयीं अग्नीची प्रार्थना केली, ते देव आले असें लागलेंच समजून त्यांस म्हणतो की, हे देवांनो, हा सोम तुम्हास अर्पण केला आहे तो तुम्ही प्या.

'काल काढिलेला' = 'तिरो अह्न्यम्.' सोमाचें हें प्रशंसार्थी विशेषण आहे. यावरून काल काढिलेला सोम आज अर्पण केला म्हणजे तो देवांस ग्राह्य होतो अशी समजूत उघड दिसून येते. जसें कालच्या लोण्याचें तूप ('हैयंगवीनम् आदाय घोषवृद्धान् उपस्थितान् । नामधेयानि पृच्छन्तौ वन्यानां मार्गशाखिनाम्॥ रघुवंश स. १ श्लोक ४५.) आपल्या लोणकढ्या तुपाप्रमाणें उत्तम मानीत तसा काल काढिलेला सोमरस गोडीविषयां वगैरे उत्तम असे असें दिसतें. फार दिवसांचा असल्यास वाईट लागे असें वाटतें.

## सूक्त ४६.

ऋषि—कण्वाचा पुत्र प्रस्कण्व (पूर्वीच्या सूक्ताचा जो कर्ता तोच). देवता—अश्वी देव. वृत्त—गायत्री.

१. ही पहा द्यूची प्रिय [कन्या] नूतन उषा फांकूं लागली आहे! [तर] हे अश्वींनो, तुमची मला पुष्कळशी स्तुति करूंद्या.

## HYMN 46.

To the *As'vins.* By *Praskanva* the son of *Kanva* (author of the previous hymn). Metre, *Gâyatrî.*

1. This here shines the new Ushas, the dear daughter of heaven. Let me, O As'vins, praise you highly;

---

१. अशी कल्पना करा कीं सूक्तकर्ता ऋषि मोठ्या पहांटेस उठून आकाशाकडेस पाहतो आहे, आणि उषेचा कोमल आणि मनोहर प्रकाश नुकताच पडत आहे असें पाहून म्हणतो कीं, 'ही पहा सुंदर उषा नुकीच प्रकाशूं लागली आहे. तर आपण अश्वींची पुष्कळशी स्तुति करूंया.'

'द्यूची प्रिय [कन्या]'='दिवः प्रिया [कन्या].' उषेला म्हणजे प्रभातकालरूपी जी देवता तिला द्यूची म्हणजे निरभ्र आणि स्वच्छ प्रकाशानें भरलेला जो अपरिमित, अमर्याद, आणि अनंत भूमीवरील अत्युच्च आकाशप्रदेश तद्रूपी देवाची दुहिता अथवा कन्या असें वेदामध्यें पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. ऋ. १. ४८. ८; १. ९२. ५, ७; १. ११३. ७ वगैरे पाहा.

'नूतन'='अपूर्व्या.' म्हणजे जिला प्रकाशावयास आरंभ होऊन कांहींएक घडी अर्धी घडीचा अवकाश होऊन गेला आहे असें नव्हे, पण जी नुकीच प्रकाशूं लागली आहे अशी.

'तर हे अश्वींनो'. उषेच्या प्रथम प्रकाशाशीं अश्वींच्या स्तुतीचा संबंध असा आहे कीं, उषा ही त्यांची बहीण होय असें ऋ. १. १८०. २ यांत सांगितलें आहे. आणि उषा जशी प्रातर्धरी आहे तसेच अश्वी देव सुद्धा प्रातर्धर होत. सूक्त ३ मंत्र १ याजवरील टीप पाहा. तेव्हां उषा दिसूं लागल्याबरोबर अश्वींचें आगमन झालें असें अनुमान सहज होतें म्हणून कवि म्हणतो कीं, आतां मला त्यांची स्तुति करूं द्या, कारण कीं त्यांचा उदय झाला.

या मंत्राची योजना 'ग्रहयज्ञ' म्हणून जो अनिष्टग्रहनिवारणासाठीं संस्कार करितात त्यांत 'आवाहन'कालीं म्हणजे देवांस आमंत्रण करण्याच्या हेतूनें जें कर्म करितात त्यांत अश्वींचें आह्वान म्हणजे बोलाविणें याजकडे आणि हवनाच्या वेळीं म्हणजे देवांच्या नांवें आहु-

या दुस्रा सिन्धुमातरा मनोतरा रयीणाम् ।
धिया देवा वसुविदा ॥ २ ॥

या । दस्रा । सिन्धुऽमातरा । मनोतरा । रयीणाम् ।
धिया । देवा । वसुऽविदा ॥ २ ॥

वच्यन्ते वां ककुहासो जूर्णायामधि विष्टपि ।
यद्वां रथो विभिष्पतात् ॥ ३ ॥

वच्यन्ते । वाम् । ककुहासः । जूर्णायाम् । अधि । विष्टपि ।
यत् । वाम् । रथः । विऽभिः । पतात् ॥ ३ ॥

---

**भाषायाम्.**

२. या (=यौ) [युवां] दस्रा (=दस्रौ=महाकर्मकारिणौ) सिन्धुमातरा (सिन्धुमातरौ=समुद्रमातृकौ=अन्तरिक्षरूपात्समुद्रादुत्पन्नौ) रयीणां मनोतरा (=रयीणां मनोतरौ=धनानां दातारौ) [तथा] धिया (=कर्मणा) वसुविदा (=वसुविदौ=संपदां लम्भयितारौ) [एतादृशौ] देवा (=देवौ) [स्थः] ॥

३. हे अश्विनौ, यद् (=यदा) वां (=युवयो) रथः विभिः (=विसदृशैः पक्षिवत् शीघ्रैः अश्वैः) पतात् (=पतति उत्पतति). [तदा] वां (=युवयोः) [ते] ककुभासः (=ककुभा=उच्छ्रिता) [अश्वाः] अधि जूर्णायां विष्टपि (=जीर्णे स्वर्लोके=जीर्णवत् पतनोन्मुखे स्वर्गलोकस्य सानौ) वच्यन्ते (=गच्छन्ति) ॥

अत्रेदमुक्तं भवति । हे अश्विनौ, यदा युवयो रथः पक्षिवद् आशुभिः उच्चैश्च युवयोरश्वैः उह्यमानः पक्षिवत् शीघ्रम् उत्पतति तदा युवयोस्तेश्वा अत्युच्छ्रितस्वर्लोके गच्छन्ति, न तु मनुष्यैः प्रयुक्ता अश्वा इव भूम्यां गच्छन्ति । अपि च युवयोस्तेश्वा यस्यात्युच्छ्रिततमस्य स्वर्लोकस्योपरि गच्छन्ति स तेषां भारेण वेगेन च जीर्णस्य हर्म्यस्य तलमिव पतनोन्मुखो विभाति ॥

---

त्या अग्नींत शक्तिते समयीं अश्वींच्या नांवें हवन करितात त्याजकडे; आणि अश्वींच्या नांवानें दीपा सकट उडीद आणि भात यांना वलि देतात त्याजकडेस केलेली आहे.

परंतु नवग्रहयज्ञांत अश्वींचा संबंध स्वाभाविक नसतां ओढाताणीनें आणिला आहे, इतकेंच नव्हे परंतु अश्वींनें आह्वान अथवा आहुतिप्रदान अथवा बलिप्रदान. यांशीं या मंत्राचा कांहींच संबंध नाहीं. मात्र या मंत्रांत अश्वी शब्द आला आहे, इतकेंच.

२. जे [तुम्ही] पराक्रमी, [आणि] संपत्तींचे दाते [असे] सिंधुपुत्र, [आणि] यजनकर्माच्या द्वारें द्रव्य संपादून देणारे [असे] देव [आहांत].

३. हे अश्वी [देव हो], जेव्हां तुमचा रथ [तुमच्या] पक्षिसम घोड्यांच्या योगानें [पक्ष्यांप्रमाणें] उडतो, [तेव्हां] तुमचे [ते] महान् [अश्व] जीर्ण झालेल्या स्वर्लोकावरून [जणुं] जात असतात.

2. Who [are] brave, sons of the ocean, givers of wealth, [and] gods who grant blessings [as the reward] of the sacrifice.

3. When your chariot flies by [means of] [your] [horses as swift as] birds, [those] proud steeds] gallop on the ancient top of the highest heaven.

२. या मंत्रांत अश्वींचीं साधारण विशेषणें दिलीं आहेत.

'पराक्रमी' = 'दस्रा.' म्हणजे सज्जन उपासकांचें कल्याण करणें, दुर्जनांचें पारिपत्य करणें इत्यादि पराक्रम करणारे. सूक्त ४२ मंत्र ५ याजवरील सायणभाष्य पाहा.

'संपत्तींचे दाते' = 'मनोतरा रयीणाम्'. ऋ. ८. ८. १२ आणि त्यावरील सायणभाष्य पाहा.

'सिंधुपुत्र' = 'सिन्धुमातरा'. म्हणजे अंतरिक्षरूपी सिंधूंत उगवणारे. (सूक्त ३. मंत्र १ यावरील टीप पाहा). अंतरिक्षांत मेघरूपानें उदक भरलेलें असतें म्हणून त्याला समुद्र अथवा 'सिन्धु' असें वेदांत नांव आहे.

'द्रव्य संपादून देणारे' = 'वसुविदा.' सू. १८ मंत्र २ याजवरील सायणभाष्य पाहा.

३. ह्या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'हे अश्वी देव हो, जेव्हां तुमचे पक्ष्याप्रमाणें चपळ पण आकारानें महान असे अश्व तुमचा रथ ओढितात, तेव्हां तो रथ जणुं काय एकाद्या पक्ष्याप्रमाणें आकाशांत मोठ्या झपाट्यानें उडतोसा दिसतो, आणि ते घोडे तरी साधारण घोड्यांप्रमाणें भूमीवर चालतात असें नाहीं. तर द्युलोकाचा जो अत्युच्च भाग त्यावरून जातात आणि त्यांचा भार आणि वेग इतका मोठा असतो कीं, ते द्युलोकाच्या ज्या पाठीवरून चालतात ती एकाद्या जीर्ण वाड्याच्या डळमळीत झालेल्या गच्चीप्रमाणें हालूं लागते.'

'पक्षिसम घोड्यांच्या योगानें' = 'विभिः'. अक्षरशः अर्थ, 'पक्ष्यांच्या योगानें' असा आहे. म्हणजे अश्वींचे घोडे इतके चपळ आहेत कीं ते जणुं काय पक्षीच होत.

'[पक्ष्याप्रमाणें] उडतो' = 'पतात्.' 'पतात्' हें 'पत्' धातूचें लेट्चें रूप

हविषा जारो अपां पिपर्ति पपुरिर्नरा ।
पिता कुटस्य चर्षणिः ॥ ४ ॥

हविषा । जारः । अपाम् । पिपर्ति । पपुरिः । नरा ।
पिता । कुटस्य । चर्षणिः ॥ ४ ॥

## भाषायाम्.

८. हे नरा (=नरौ=शूरौ) [अश्विनौ], पपुरिः (=पोषकः) अपां जारः (=अब्देवीनां जारः) कुटस्य (=कर्मणः=यज्ञकर्मणश्च) [च] चर्षणिः (=द्रष्टा=ज्ञाता) पतिः (=पालकः) [सूर्यः] हविषा (=अस्माभिर्दत्तेन हविर्गणेन) पिपर्ति (=देवान् पूरयति) ॥

आहे. 'यत्' शब्दाच्या योगानें वर्तमानकालार्थी लेट् झाला आहे असें दिसतें. असे प्रयोग साधारण संस्कृतांत अथवा मराठींत येत नाहींत. पण लाटीन भाषा ज्यांस येते त्यांस अशा प्रयोगांची ओळख एकदम पटेल. 'पत्' म्हणजे [पक्ष्याप्रमाणें] उडणें याजपासून 'पत्र' अथवा 'पतत्र' (पंख) आणि 'पतत्री' (पक्षी) हे शब्द निघाले आहेत. 'रथ उडतो' असा जो प्रयोग केला आहे त्याचें तात्पर्य असें कीं तो इतक्या झपाट्यानें जातो कीं त्याला 'चालतो' हें क्रियापद लावणें ऋषीस योग्य वाटलें नाहीं, आणि त्याचें तें गमन आकाशांत होत असतें जमिनीवर नाहीं हें मुख्य कारण होय.

'महान्' ='ककुहासः'. ऋ. १. १८१. ५; ५. ७३. १; ५. ७५. ४ आणि विशेषेंकरून ४. ४४. २ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पाहा.

'जीर्ण झालेल्या' ='जूर्णायाम्.' ऋ. १. १८०. ५; १. १८८. ३; आणि ९. ८६. ४८ ह्यांजवरील सायणभाष्य पाहा.

'जात असतात' ='वच्यन्ते.' 'वच्' हा धातु 'जाणें,' 'धांवणें,' 'पळणें' या अर्थी वेदांत बराच प्रसिद्ध आहे. ऋ. ९. २. २; ९. १०८. १०; ९. ९७. २ हे मंत्र आणि त्याजवरील सायणभाष्य पाहा. प्रस्तुतच्या मंत्रांत 'वच्यते' याचा अर्थ सायणाचार्य 'उच्यते' (='म्हटलें जातें') असा करून निर्वाह करितात; परंतु 'ककुह' शब्दाचा स्तुति असा ते अर्थ करितात त्याचा इतर ठिकाणीं त्यांणींच महान, मोठा, असा विशेषणवत् अर्थ केला असून स्तुति अशा अर्थी प्रयोगान्तर सांपडत नाहीं; आणि या मंत्रांत 'वच्यते' आणि 'ककुह' यांचे नेहमींचे अर्थ सोडून देण्याची आवश्यकताहि कांहीं दिसत नाहीं.

या मंत्राचा अर्थ सायणाचार्य करितात तो असा:—"हे अश्वींनो, तुमचा रथ

४. हे शूर [अश्वी देव] हो, आपो [देवीं]चा पोषक जार [आणि] कर्मांचा ज्ञानी पालक [जो सूर्य तो] हवी[च्या योगा]नें [तुमची] तृप्ति करितो.

4. O brave [As'vins], [the sun] the nourishing lover of the Waters, and the wise protector of the [holy] work, nourishes [ye].

"अनेक शस्त्रांनीं स्तविलेल्या स्वर्लोकीं "जेव्हां अश्वांच्या योगानें जातो तेव्हां "तुमच्या स्तुति आम्हांकडून गाइल्या "जातात."

४. हा मंत्र फार कठिण आहे. शब्द तर सोपे आहेत, पण त्यांतून एका पदाचा अर्थ समजत नाहीं आणि सर्व मंत्राचें पर्यवसान वस्तुतः कोणीकडे आहे हें समजत नाहीं. आम्हीं अक्षरशः अर्थ (बहुतकरून सायणांसच अनुसरून) केला आहे. त्याचें तात्पर्य येणेंप्रमाणें:– 'हे अश्वीनो, आपोदेवी म्हणजे उदकरूप ज्या देवी त्यांचा जार म्हणजे पति आणि कर्मांचा जो महाज्ञानी पालक असा सूर्य तो तुम्हांस व इतर सर्वांस पोषितो, म्हणजे सूर्य उगवतांच आम्हीं तुम्हांस हवि देतों तेणेंकरून तुमचें पोषण होतें.'

या मंत्रांत 'कुट' शब्दाचा अर्थ सायणांस अनुसरून 'कर्म' असा आम्हीं केला आहे पण त्याला प्रयोगान्तरें मिळत नाहींत. शिवाय 'तृप्ति करितो' (='पिपर्ति') याचें कर्म सांगितलेलें नाहीं. तेव्हां तीहि एक अडचण आहे. आणि 'आपो देवींचा' जार तसा 'कुटाचा' पालक म्हणण्यापेक्षां पिता म्हटल्यास खरा अर्थ मिळण्याचा संभव अधिक दिसतो; पण 'कुट' म्हणजे काय. अथवा कोण ? शिवाय 'सूर्य तृप्ति करितो' असें म्हणण्यापेक्षां 'अग्नि' तृप्ति करितो हें अधिक संभवतें. पण मग 'आपो देवींचा जार' हें अग्नीस कसें लागेल ? सूर्य उदकरूप देवींस आपल्या किरणांनीं ओढून घेतो म्हणून त्यास तें नांव शोभतें. एकंदरींत हा मंत्र कठिण आहे.

पुढचा मंत्र सोमाविषयीं आहे. आणि सोमाला उदकरूप देवींचा जार म्हणजे पेय पदार्थांचा स्वामी असें म्हणणें साहजिक आहे. तेव्हां हाहि मंत्र सोमाविषयीं असेल काय ? पण 'कुट' च्या ऐवजीं 'कूट' (=माया, कपट) असा पाठ घेतल्याशिवाय विशेष लाभ नाहीं.

**आदारो वां मतीनां नासत्या मतवचसा ।**
**पातं सोमस्य धृष्णुया ॥ ५ ॥ ३३ ॥**

आऽदारः । वाम् । मतीनाम् । नासत्या । मतऽवचसा ।
पातम् । सोमस्य । धृष्णुऽया ॥ ५ ॥ ३३ ॥

---

## भाषायाम्.

५. हे नासत्या (=नासत्यौ=सत्यवन्तौ) मतवचसा (=मतवचसौ=अभिमतस्तोत्रौ) [अश्विनौ], [सोमो] वां (=युवयोः) मतीनां (=सुमतीनाम् अस्मदाद्युपासकानां विषये याः प्रसन्ना बुद्धयस्तासाम्) आदारः (=आभिमुख्येन अपवर्ता उद्घाटयिता) [भवति]। [तस्माद्] [युवां] धृष्णुया (=धर्षणशीलस्य=मदकरत्वेन तीव्रस्य) सोमस्य (=अस्माभिरर्पितस्यैतस्य सोमरसस्य=तादृशं सोमं) पातं (=पिबतम्) ॥

धृष्णुयेति पदम् अव्ययप्रतिरूपकं सर्वास्वपि विभक्तिषु समानरूपं विशेषणमिति द्रष्टव्यम् ॥

५. हे नासत्यांनो, हे स्तुति-श्रावक [अश्वींनो], [सोम हा] तुमच्या प्रसादांचा प्रेरक [होय]. [तर तुम्ही] [हा] बळकट सोम प्या.

5. O truthful [As'vins], lovers of prayer, [the Soma] throws your favours open. Drink, [therefore], [this] strong Soma.

५. भावार्थः– 'हे अश्वी देवहो, सोम तुम्हांस अर्पण केला म्हणजे तुमच्या ज्या प्रसन्न बुद्धि त्या एकदम उघडून अर्पण करणाऱ्याकडेस धांवतात; यास्तव हा बळकट सोम तुम्हांस अर्पण केला आहे तरी हा तुम्ही प्या.'

'नासत्यांनो' = 'नासत्या=नासत्यौ.' नासत्य हें अश्वींचें नांव आहे. त्याचा अर्थ 'असत्य नव्हेत ते' = 'सत्यरूप' असा करण्याचा संप्रदाय आहे आणि यास कांहीं बाध दिसत नाहीं. अश्वी हे दोन देव वेदांत फार प्रसिद्ध आहेत आणि त्यांजविषयीं वेदांत पुष्कळ सूक्तें आहेत. असें असतांहि आणि साधारण लोकांच्या उपासनेचे ते पात्रभूत असतांहि, त्यांचें 'नासत्य' म्हणजे 'सत्यरूप' हें नांव वेदांत महाख्यात आहे. यावरून दोन गोष्टी उघड होतात. १ ली, आपल्या आर्य पूर्वजांची देवांविषयीं कल्पना आमच्या कल्पनेहून अगदी भिन्न असे; ते आपल्या देवांस चोरी करण्यांत कुशल, लबाडी सांगून ठकविण्यांत हुशार, आणि आपलीच भक्ति करणाऱ्या स्त्रियांविषयीं अवाच्य संबंध ठेवण्याविषयीं आणि त्यांस रमविण्याविषयीं तत्पर होत असें मानीत नसत. २ री, स्वताहा त्यांचा अभिनिवेश सत्याविषयीं मोठा असावा. कारण जे गुण उत्तम उत्तम असें आपण समजतों तेच देवाच्या अथवा देवांच्या आंगीं आहेत असें आपण मानितों हा नियम सर्वत्र लागू आहे.

'स्तुतिश्रावक' = 'मतवचसौ.' म्हणजे स्तुति केलेली ऐकून घेणारे. अक्षरशः अर्थ, स्तुति केलेली ज्यांस मान्य होते, अमान्य होत नाहीं असे.

'प्रेरक' = 'आदारः.' अक्षरशः अर्थ, 'उघडणारा,' 'उघडून सामोरे करणारा.' अर्थात् 'आमच्याकडे प्रवृत्ति होई असें करणारा,' 'प्रेरणारा.'

'बळकट' = 'धृष्णुया.' म्हणजे जो प्याल्यावर मोठा अमल येऊन आंगांत सामर्थ्य आल्यासारिखें भासतें. 'धृष्णुया' या रूपाविषयीं थोडासा वाद आहे तो असा. ऋग्वेदांत हा शब्द चवदा पंधरा मंत्रांत आला आहे; त्या सर्व ठिकाणीं सायणाचार्य 'धर्षक,' 'धर्षणशील' (म्ह० शत्रूचें अतिक्रमण किंवा पराभव करण्याविषयीं शक्ति आहे ज्यास तो) असा विशेषणार्थी अर्थ करितात. परंतु 'धृष्णुया' हें तृतीयेसा-

या नः पीपरदश्विना ज्योतिष्मती तमस्तिरः ।
तामस्मे रासाथामिषम् ॥ ६ ॥

या । नः । पीपरत् । अश्विना । ज्योतिष्मती । तमः । तिरः ।
ताम् । अस्मे इति । रासाथाम् । इषम् ॥ ६ ॥

आ नो नावा मतीनां यातं पाराय गन्तवे ।
युञ्जाथामश्विना रथम् ॥ ७ ॥

आ । नः । नावा । मतीनाम् । यातम् । पाराय । गन्तवे ।
युञ्जाथाम् । अश्विना । रथम् ॥ ७ ॥

## भाषायाम्.

६. हे अश्विना (=अश्विनौ), या ज्योतिष्मती (=वैपुल्यरूपप्रकाशवती) [इट्= अन्नादिसंपद्] नः (=अस्मान्) तमस्तिरः (=दारिद्र्यरूपम् अन्धकारम् अति) पीपरत् (=पारयेत्) तां (=तादृशीम्) इषम् (=अन्नादिसंपदं) [युवाम्] अस्मे (=अस्मासु=अस्मभ्यं) रासाथां (=रातं=दत्तम्) ॥

७. [हे अश्विनौ], मतीनां नावा (=युवयोर्या अस्मद्विषयाः सुबुद्धयस्तद्रूपया नावा) पाराय गन्तवे (=पारं गन्तुं=वयं दारिद्र्यस्य पारं गच्छेमेति हेतोः) [युवां] नः (=अस्मान् प्रति) आयातम् (=आगच्छतम्)। हे अश्विनौ, रथं (=युवयो रथम्) [अत्रागन्तुं] युञ्जाथां (=साश्वं कुरुतम्)॥

रिखें रूप दिसतें यास्तव तें क्रियाविशेषण मानून 'जोरानें,' 'बळकट रीतीनें' असा कितीएक पाश्चिमात्य विद्वान् अर्थ करितात. पण सर्व स्थळें लक्ष्यपूर्वक शोधून पाहतां विशेषणवत् सायणांनीं केलेला अर्थ आम्हांस योग्य दिसतो. यास्तव जरी अव्ययप्रतिरूपक आहे तरी अर्थ नेहमी विशेषणासारिखा करावा हेंच योग्य दिसतें. याप्रमाणेंच 'साधुया' शब्द 'साधु' (=चांगला) असा विशेषणार्थी योजिलेला आढळतो. पुढें ११ व्या मंत्रावरील 'चांगला' याविषयींची टीप पाहा.

६. हे अश्वी हो, जी लकलकीत [धनधान्यसंपत्ति] आम्हांस [दारिद्र्यरूप] अंधकाराच्या पार पाडील अशी धनधान्यसंपत्ति [तुम्ही] आम्हांस द्या.

७. [हे अश्वींनो], तुमच्या प्रसादरूप नावे[च्या योगा]नें [आम्ही] [दारिद्र्याच्या] पार जावें म्हणून [तुम्ही] आम्हांकडे या. हे अश्वींनो, तुम्ही [आपला] रथ जोडा.

6. As'vins, give us that brilliant affluence of food that shall place us beyond the darkness [of poverty].

7. Come unto us that we may go to the other end [of poverty] in the boat of [your] favours. Harness [your] car, O As'vins.

---

६. सोमपान करून अश्वी प्रसन्न होतात असें पूर्वीच्या मंत्रांत जाणविलें. आतां कोणता प्रसाद आपणास पाहिजे तें ऋषि सांगतो:– 'ज्या धनधान्याच्या विपुलतेनें आमचें सर्व दारिद्र्य नाहींसें होईल आणि आमची प्रख्याति होईल आणि दुःखाची भीति निघून जाईल अशी धनधान्यसंपत्ति आम्हांस तुम्ही द्या.'

'लकलकीत' = 'ज्योतिष्मती.' हें हेतुगर्भ विशेषण आहे. 'लकलकीत' नसेल तर 'अंधकारा'च्या पार पाडूं शकणार नाहीं.

'अंधकाराच्या पार पाडील' = 'पीपरत् तमः तिरः'. 'तिरः' हें येथें संयोगी अव्यय आहे, 'पीपरत्', आणि 'तमः' यांच्यामधील संबंध दाखविणारें.

७. 'वरच्या मंत्रांत जो दारिद्र्यरूप अंधकार सांगितला त्याच्या पार आम्हीं तुमच्या कृपेच्या नावेंत बसून जावें म्हणून हे अश्वींनो, तुम्ही आम्हांप्रत या. आणि निघा, आपला रथ जोडून इकडे या,' असें तात्पर्य.

'तुमच्या प्रसादरूप नावेच्या योगानें' = 'नावा मतीनाम्.' या ठिकाणीं 'मति' शब्दाचा प्रयोग 'सुमति' या शब्दाच्या अर्थी झालेला आहे.

या मंत्राच्या पूर्व दोन चरणांचा अर्थ सायणाचार्य, "हे अश्वींनो, मतींच्या "म्हणजे स्तुतींच्या पार जाण्यासाठीं तु- "म्ही नावेंतून येथें आम्हांजवळ समुद्रां- "तून या" असा करितात, आणि असें जाणवितात कीं, अश्वींनीं समुद्रांतून तीरापर्यंत नावेंतून यावें आणि मग रथांत बसून जमिनीवरून यावें, अशी ऋषीची प्रार्थना आहे. पण इतकी खटपट करण्याची आवश्यकता दिसत नाहीं. 'नावा

अरित्रं वां दिवस्पृथु तीर्थे सिन्धूनां रथः ।
धिया युयुज्र इन्दवः ॥ ८ ॥

अरित्रम् । वाम् । दिवः । पृथु । तीर्थे । सिन्धूनाम् । रथः ।
धिया । युयुज्रे । इन्दवः ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

८. [ हे अश्विनौ ], वां ( =युवयोः ) पृथु ( =विस्तीर्णम् ) अरित्रं (=रथवक्त्रं) दिवः ( =द्युलोकस्य ) [ तीर्थे ] (=अवतरणप्रदेशे ) [तिष्ठति ], [ वां ] रथः सिन्धूनां ( =स्यन्दनशीलानां मेघोदकानां=मेघोदकस्थलरूपस्य अन्तरिक्षस्य ) [ तीर्थे ] ( =अवतरणप्रदेशे=सीम्नि ) [तिष्ठति], [ अपि च ] धिया ( =अस्मत्कर्तृकेण अनेन यज्ञकर्मणा ) इन्दवः युयुज्रे ( =युयुजिरे=अश्ववत् तस्मिन् रथे प्रयुक्ताः सन्ति ) ॥

अत्र अश्विनो रथस्य महिमा वर्ण्यते । स खलु दिव आरभ्य अन्तरिक्षपर्यन्तम् अन्तरिक्षादारभ्य पृथिवीपर्यन्तं च व्यापकोस्तीति, तथा एतादृशे रथे सोमरूपा अश्वा अस्माभिर्युक्ताः सन्ति, अतः कारणाद् हे अश्विनौ युवां शीघ्रम् आगच्छतमिति भावार्थः ॥

---

मतीनां ' याचा अन्वय एकत्र केला म्हणजे सगळी अडचण दूर झाली. शिवाय अश्वींची प्रख्याति रथांत बसून जातात अशी आहे, नावेंत बसून जातात अशी नाहीं, आणि ते समुद्राच्या मध्यभागीं राहतात अशीहि त्यांची प्रख्याति नाहीं.

' पार जावें म्हणून' =' पाराय गन्तवे. ' अक्षरशः अर्थ ' पैलतीराला जाण्यासाठीं.' ' पाराय ' ही जी चतुर्थी ' पारं ' या द्वितीयेबद्दल येथें योजिली आहे, तिजविषयीं सू. ४५, मं. ६ याजवर दिलेली टीप पहा.

हा जो ' पार ' शब्द येथें वेदांत आढळतो तो फारकरून त्याच अर्थी अजूनहि साधारण मराठी भाषेंत योजितात. वेदांत ' पैलतीर ' असा अर्थ आणि साधारण मराठींत ' जेथें पैलतीरास पायांनीं जावयास उतार असतो अशी नदीमधली वाट ' असा अर्थ आहे, विशेष भेद नाहीं. शब्द कधीं मरत नाहींत असा जो सिद्धांत आहे त्याचें हें एक उदाहरण होय. आपले माळी साळी, कुणबी कोळी जेव्हां मराठी बोलतात तेव्हां प्राचीन ऋषि वेदमंत्र रचून ज्या पवित्र शब्दांनीं अपरिमित सामर्थ्यवान् देवांची स्तुति गात, त्याच शब्दांनीं आपण आपली वेडीवांकडी प्राकृत भाषा बोलत आहों असें कितीजणांस वाटत असेल बरें ?

८. [हे अश्वींनो], तुमचें विस्तीर्ण अरित्र द्युलोकाच्या [कांठावर] [आणि] [तुमचा] रथ अंतरिक्षाच्या कांठावर [आहे]; [आणि या] [आमच्या] यजनकर्मा[च्या योगा]नें [त्या रथास] [घोड्याऐवजीं] [आम्ही] सोमरस जोडिले आहेत.

8. Your vast *aritra* is on the border of Heaven, [and] [your] chariot [on that] of the firmament. Through [our] sacrifice the Somas are yoked [as horses] thereto.

८. हा मंत्र कठिण आहे. आम्हीं वर केलेल्या भाषांतराचा भावार्थ असा आहे कीं, 'हे अश्वींनो, तुमचा रथ इतका मोठा आहे कीं, त्याचा मागचा भाग द्युलोकावर आहे, मधला भाग अंतरिक्षांत, आणि घोडे ज्या भागाला जोडितात तो भाग पृथ्वीवर आहे; आणि आमचे जे सोमरस हेच जणुं घोडे तुमच्या रथास आम्हीं जोडिले आहेत; तर अशा मोठ्या रथांत बसून तुम्हीं लवकर या.'

'विस्तीर्ण अरित्र'= 'पृथु अरित्रम्.' 'अरित्र' याचा मूळचा अर्थ 'वला' (यैः काष्ठैः पार्श्वतो बद्धैर्जलालोडने सति नौः शीघ्रं गच्छति तान्यरित्राणि=जीं लांकडें नावेच्या बाजूला बांधलेलीं असतात आणि जीं पाण्यांत हालविल्यानें नाव लवकर जाते त्यांचें नांव अरित्रें, सायणाचार्य ऋ. १. ११६. ५., शिवाय ऋ. १०.६३. १० पहा). पण रथाच्या कोणत्या भागास 'अरित्र' म्हणतात तें समजत नाहीं. मागच्या बाजूचा कांहीं भाग असावासें दिसतें. सायणाचार्य (ऋ. २. १८. १ याजवर) त्याचा अर्थ 'वक्त्र' असा करितात. तेथें रथास 'दशारित्र' (दहा अरित्रें, ज्यास आहेत तो) असें विशेषण दिलें आहे तें पाहा. पण 'वक्त्र' म्हणजे रथाचा कोणता भाग समजावयाचा हें निश्चयानें सांगवत नाहीं.

'अंतरिक्षाच्या कांठावर' = 'तीर्थे सिन्धूनाम्.' या ठिकाणीं तीर्थ शब्दाचा जो मूळचा अर्थ, 'उतरण्याची जागा,' 'किनारा' असा आहे तो आला आहे. या अर्थावरूनच 'घांट,' न्हाण्याची जी नदीच्या तीरावरील जागा ती, असा आमचा आलीकडचा अर्थ निघाला आहे. 'सिन्धु'शब्दाचा 'अंतरिक्ष' असा अर्थ केला त्याविषयीं सू. ३५. मं. ८ याजवरील 'अंतरिक्ष' याविषयींची टीप पहा.

'[या आमच्या] यजन कर्माच्या योगानें......सोमरस [घोड्याऐवजीं] आम्हीं जोडिले आहेत'=' धिया युयुज्रे इन्दवः.' म्हणजे आम्ही स्तोत्रें म्हणून

दिवस्कण्वास इन्दवो वसु सिन्धूनां पदे ।
स्वं वव्रिं कुह धित्सथः ॥ ९ ॥

दिवः । कण्वासः । इन्दवः । वसु । सिन्धूनाम् । पदे ।
स्वम् । वव्रिम् । कुह । धित्सथः ॥ ९ ॥

---

**भाषायाम्.**

९. हे कण्वाः (=कण्वपुत्राः), इन्दवः (=सोमाः) दिवः [पदे] (=द्युलोकस्य स्थाने) वसु (=संपद्) [च] सिन्धूनां (=मेघोदकरूपाणां नदीनाम्=अन्तरिक्षस्य) पदे (=स्थाने) [वर्तते] । [एवं सति] [हे अश्विनौ], स्वं वव्रि (=युष्माकं शरीरं) कुह (=कुत्र) धित्सथः (=धातुं स्थापयितुम् इच्छथः) ?

---

सोमरस अर्पण करीत आहों ते पाहून तुम्ही धांवत या, जसे काय हे सोमरस तुमच्या रथास जोडलेले घोडेच होत. हें केवळ आलंकारिक बोलणें आहे, हें सांगावयास नकोच. पण ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट इतकी आहे कीं, प्राचीन ऋषि सर्व कार्यें मंत्रानें सिद्ध करीत, ते मंत्र म्हणत आणि ते म्हटल्याबरोबर मंत्रसामर्थ्याच्या योगानें घोडे जोडले जात, रथ नसतां एकदम प्रगट होत, देव एकदम धांवून येत वगैरे ज्या कथा पुराणादिक ग्रंथांत प्रसिद्ध आहेत, आणि ज्या खऱ्या होत असें सगळे लोक आतां मानितात, त्या सर्व या मंत्रांत उक्त असलेल्या आलंकारिक भाषणावरून वाढल्या आहेत. पुराणादिकांत सांगितलेल्या अतिशयोक्ति जरी वेदांत नाहींत तथापि वेदांचा साधेपणा, सरळपणा, त्यांची प्रसन्न वाणी आणि त्यांचा स्वाभाविक भाषणालंकार हे अद्वितीय होत.

ह्या मंत्रानें वृत्त गायत्री आहे. म्हणजे पहिले दोन चरण अनुष्टुप् वृत्ताप्रमाणें; तिसरा चरण मुळींच नाहीं, आणि अनुष्टुपाचा जो चवथा चरण तो ह्याचा तिसरा अथवा शेवटचा चरण होय. आणि बरोबर म्हणतां येण्यासाठीं 'सिन्धूनां' पद आहे तें 'सिन्धूनआं' असें वाचलें पाहिजे, म्हणजे

अरित्रं वां दिवस्पृथु ।
तीर्थे **सिन्धूनआं** रथः ॥
।
धिया युयुज्र इन्दवः ॥

अशा प्रकारची वृत्तरचना वेदांत पुष्कळ येते.

९. हे कण्वांनो, सोमरस द्युलोकाच्या ठायीं [ आणि ] संपत्ति अंतरिक्षाच्या ठायीं [ भरली ] आहे.– [तर] [हे अश्वींनो], [तुम्ही] आपलें शरीर कोठें ठेवूं इच्छितां?

9. The Somas, O Kaṇvas, [ are ] [ in the space ] of Heaven [ and ] wealth in the space of the watery skies.—Where [O As'vins], do you wish to place [your] own persons?

९. ह्याहि मंत्र सोपा नाहीं. यांत पहिल्या अर्धांत कण्वांस ( म्हणजे कवीचे जे आप्त ऋषीबरोबर अश्वींच्या पूजेंत गुंतले आहेत त्यांस ) संबोधन करून बोलणें आहे, आणि त्या बोलण्याचा अतिनिकटसंबंध पुढच्या वाक्याशीं असतां तें वाक्य अश्वींला संबोधून म्हटलें आहे. पण असे परोक्षापरोक्षव्यत्यय वेदांत बरेच असतात. पण ही गोष्ट एकीकडे ठेविली तरी ऋचेचा सगळा अर्थ नीट लागत नाहीं. परंतु जो लागतो त्याचें तात्पर्य असें कीं, 'हे अश्वींनो, सगळें आकाश आणि त्याजवरील द्युलोक सगळा भरून गेला आहे, तर तुम्ही आपलें शरीर कोठें ठेवाल ? द्युलोक सोमांनीं भरला आहे, आणि आकाश ( अंतरिक्ष ) संपत्तीनें भरलें आहे. त्यांत तुमच्या शरीराला जागा नाहीं.'

आतां काठिन्य इतकेंच कीं, द्युलोकांत सोम आहेत आणि अंतरिक्षांत संपत्ति आहे आणि तीं त्या प्रदेशांस भरून टाकिताहेत म्हणजे काय? 'इन्दवः' आणि 'वसु' या शब्दांचा अर्थ अनुक्रमेंकरून 'सोम' आणि 'धन' असा होतो याविषयीं तर शंकाच नाहीं.

सायणाचार्यः– "हे कण्वपुत्रांनो, " [ अश्वींस असें पुसा कीं ] ' द्युलोका- " पासून सूर्यकिरण [ प्रादुर्भूत झाले ], " अंतरिक्षीं उषेचा प्रकाश [ प्रादुर्भूत " झाला"] [ तर अशा समयीं ] तुम्ही " आपलें शरीर कोठें ठेवूं इच्छितां?' "

प्रत्यक्षाप्रत्यक्षव्यत्ययाविषयीं समाधान वस्तुतः असें आहे कीं कवीच्या मनांत प्रथम 'दिवः कण्वास इन्दवो वसु सिन्धूनां पदे । स्वं वव्रिम् अश्विना कुह धित्सतः ? ( = हे कण्वांनो, सोमरस द्युलोकाच्या ठायीं आणि संपत्ति अंतरिक्षाच्या ठायीं भरली आहे, तर आतां अश्वी देव आपलें शरीर कोठें ठेवूं इच्छितात ? )' असें म्हणावयाचें होतें. परंतु शेवटच्या चरणांत 'अश्विना' हें कर्तृपद तर पाहिजे असतांहि वृत्ताला तितकीं अक्षरें जास्ती होऊं लागलीं,

अभूदु भा उ अंशवे हिरण्यं प्रति सूर्यः ।
व्यख्यज्जिह्वयासितः ॥ १० ॥ ३४ ॥

अभूत् । ऊम् इति । भाः । ऊम् इति । अंशवे । हिरण्यम् । प्रति । सूर्यः ।
वि । अख्यत् । जिह्वया । असितः ॥ १० ॥ ३४ ॥

अभूदु पारमेतवे पन्था ऋतस्य साधुया ।
अदर्शि वि स्रुतिर्दिवः ॥ ११ ॥

अभूत् । ऊम् इति । पारम् । एतवे । पन्थाः । ऋतस्य । साधुऽया ।
अदर्शि । वि । स्रुतिः । दिवः ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

१०. भाः (=उषसः प्रकाशः) अंशवे (=सोमाय=सोमपानार्थम्) अभूत् उ (=आविर्भूत एव), सूर्यः (=सूर्यो देवः) [अंशवे=सोमपानार्थं] हिरण्यं प्रति (=हिरण्यसदृशः) [अभूत् उ=आविर्भूत एव], [तथा] असितः (=कृष्णवर्त्मा अग्निः) जिह्वया (=स्वकीयज्वालारूपया) [अंशवे=सोमपानार्थं] व्यख्यत् (=प्रकाशितवान्) ॥

पश्य पश्य सोमपानार्थम् उषा देवी जातोद्यास्ति, पश्य पश्य हिरण्यप्रभो बालसूर्यः सोमपानार्थं जातोदयोस्ति, पश्य पश्य कृष्णवर्त्मा देवोग्निरपि सोमपानार्थं स्वकीयज्वालारूपया जिह्वया प्रकाशितोस्तीति भावः ॥

११. पारम् एतवे (=दुःखस्य पारं गन्तुं) साधुया (=साधुभूतः) ऋतस्य पन्थाः (=सत्यभूतस्य यज्ञस्य मार्गः=सत्यभूतयज्ञरूपो मार्गः) अभूत् उ (=प्रादुर्भूत एव), दिवः स्रुतिः (=द्युलोकस्य मार्गः=द्युलोकाय गन्तुं योग्यो मार्गः) वि अदर्शि (=विशेषेण दृष्टा) ॥

पश्य पश्य यज्ञरूपं सत्यधर्मं प्रवर्तयिता तेन च प्रवर्तनेन द्युलोकं प्रति नेता उषःसवित्रग्नीनाम् उदयरूपो मार्गः आविर्भूतोस्तीति भावगतम् ॥

---

यास्तव द्वितीय पुरुषीं 'धित्सथः' असा प्रयोग घातला.

पूर्वील मंत्राप्रमाणें यांतहि वृत्तनियमांस अनुरोधून 'सिन्धूनां पदे' असें आहे तेथें 'सिन्धूनआं पदे' असें समजून वाचलें पाहिजे.

१०. हा पहा सोम[पाना]साठीं [उष:]प्रकाश झाला, [हा पहा] सुवर्णासारिखा सूर्य [उगवला], [हा पहा] कृष्ण[मार्ग] [अग्नि] [आपल्या] जिभे[सहित] प्रगट झाला आहे.

११. [दु:खाच्या] पैल तिरीं जाण्यासाठीं [हा] सत्यधर्माचा चांगला मार्ग [प्रगट] झाला आहे पहा. [ही] स्वर्गलोकाची वाट दिसूं लागली आहे पहा.

10. Lo! the light [of Ushas] has appeared for the Soma, [lo] the gold-like Sûrya (the sun) [has manifested himself], the black-[path] [Agni] has risen!

11. Lo the good road of the true religion for crossing over [misery] has manifested itself: [lo] the path to heaven has become visible.

---

१०. 'सोम[पाना]साठीं'= 'अंशवे.' ऋ. ५. ३६. १; ६. १७. ११ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा. इतरहि प्रमाणें पुष्कळ आहेत. 'सोम[पाना]साठीं' उषा उगवली असें सांगण्याचें तात्पर्य असें कीं, उष:प्रभात होतांच नित्य सोमरस अर्पण केला जातो, म्हणून ऋषि असें कल्पितो कीं उषा उगवली आहे ती सोमरस पिण्याकरितांच उगवली आहे.

'कृष्ण[मार्ग] [अग्नि]'='असित:.' 'असित' शब्दानें अग्निच विवक्षित आहे असें सायणाचार्यच म्हणतात. तो आपल्या जिह्वेसहित प्रगट झाला, म्हणजे आपल्या ज्वालारूप जिह्वेनें सोम पिण्याकरितां प्रज्वलित झाला असें समजावयाचें.

वृत्तसुखार्थ हा मंत्र, "अभूदु भा उ अंशवे हिरण्यं प्रति **सूरिअ:।विअख्यत्** जिह्वयासित:" असा वाचावा.

११. भावार्थ:- 'उषेचा, आणि बालसूर्याचा उदय आणि अग्नीचें प्रज्वलन हीं झालीं आहेत पाहा. हा जो उदय तो यज्ञरूप सत्कर्माचा प्रवर्तक आणि तोच स्वर्गलोकीं आम्हांस घेऊन जाणारा मार्गच जणुं प्रगट झाला आहे.'

'वाट'='स्रुति:.' ऋ. १०. ३२. ७; १. ४२. ३; ८. ९१. १; १०. ८८. १५; ६. २४. ४; ९. ७८. २; ९. १३. १२ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा. या सर्व ठिकाणीं 'स्रुति'शब्दाचा प्रसिद्ध अर्थ 'मार्ग' हाच सायणाचार्यांनीं दिला आहे. असें असतां या प्रस्तुत स्थळीं मात्र 'प्रकाश'

**तत्तादिदश्विनोरवो जरिता प्रति भूषति ।**
**मदे सोमस्य पिप्रतोः ॥ १२ ॥**

तत्ऽतत् । इत् । अश्विनोः । अवः । जरिता । प्रति । भूषति ।
मदे । सोमस्य । पिप्रतोः ॥ १२ ॥

**वावसाना विवस्वति सोमस्य पीत्या गिरा ।**
**मनुष्वच्छंभू आगतम् ॥ १३ ॥**

ववसाना । विवस्वति । सोमस्य । पीत्या । गिरा ।
मनुष्वत् । शंऽभू इति शंऽभू । आ । गतम् ॥ १३ ॥

## भाषायाम्.

१२. जरिता (=स्तोता) तत् तत् (=पुनःपुनः कृतं) सोमस्य मदे (=सोमपानस्य हर्षे जाते सति) पिप्रतोः (=उपासकान् धनदानादिना पूरयतोः) अश्विनोः इत् (=अश्विदेवयोरेव) अवः (=अस्मदादिविषयकं रक्षणं) प्रतिभूषति (=प्रत्येकम् अलंकरोति=तदा तदा प्रशंसति) ॥

१३. हे शंभू (=कल्याणकारिणौ) [अश्विनौ] विवस्वति (=परिचरणवति यजमाने=परिचरणवत उपासकस्य गृहे) वावसाना (=वावसानौ=चिरवासकारिणौ= उपासकस्य गृहे चिरकालपर्यन्तं निवासं कर्तुम् इच्छन्तौ) [युवां] मनुष्वत् (=मनौ प्रजापतौ=प्रजापतेर्मनोर्गृहे पूर्वम् आगतवन्तौ तद्वत्) सोमस्य पीत्या (=सोमपानेन निमित्तेन=सोमपानार्थं) गिरा (=स्तुतिश्रवणार्थं च) आगतम् (=अत्र आगच्छतम्)॥

---

असा अर्थ करून 'तेजस्वी सूर्याचा प्रकाश प्रगट झाला' असें ते शेवटच्या चरणाचें भाष्य करितात.

या मंत्रावरून असें उघड होतें कीं, आपले पूर्वज आर्य प्रभातकाळीं उठून देवांची स्तोत्रानें आणि हवीनें वगैरे उपासना करीत, आणि ती उपासना हा स्वर्गलोकीं जाण्याचा उत्तम मार्ग होय असें मानीत.

'चांगला'= 'साधुया.' पूर्वी पांचव्या मंत्रावरील टीपेंत 'बळकट' या शब्दावर दिलेली टीप पाहा.

'सत्यधर्माचा......मार्ग'= 'ऋतस्य पन्थाः.' ऋ. १. १२८. २; ७. ४४. ५ आणि ८. १२. ३ हे मंत्र आणि त्यांजवरील भाष्य पाहा. शिवाय दुसरीं प्रमाणें पुष्कळ आहेत.

१२. अश्वींनीं अनेक वेळां केलेलें जें रक्षण तेंच कवि[जन] वाखाणीत असतात : जे अश्वी सोमाच्या हर्षांत [उपासक लोकांचें] कल्याण करीत असतात.

12. The singer glorifies the oft-repeated protection by the As'vins, who in the exhilaration of the Soma do good [to their worshippers].

१३. हे कल्याणकारक [अश्वी देव] हो, यजमानाच्या घरीं वास करणारे [असे जे तुम्ही ते] सोम प्यावयाला [आणि] स्तोत्र [ऐकावया]ला मनूच्या येथें [येत होतां] तसे येथें या.

13. Loving to tarry with the worshipper come hither, ye beneficent [As'vins], as [you did of yore] to [the house of Manu, to drink [our] Soma [and] to [hear] [our] prayer.

---

१२. भावार्थः– 'अश्वींचें माहात्म्य इतकें आहे कीं कविजन इतर देवांविषयींहि उदासीन होऊन त्यांनीं (अश्वींनीं) जें अनेक वेळीं अनेक मनुष्यांचें संरक्षण केलें त्याविषयींचीच कीर्ति गात असतात; आणि हे अश्वीदेव सोम पिऊन प्रसन्न झाले म्हणजे ते आपल्या भक्तांस धनधान्य देऊन समृद्ध करितात.'

'अनेकवेळां केलेलें जें संरक्षण तें'= 'तत् तत् अवः'. अक्षरशः अर्थ 'तें तें संरक्षण'; म्हणजे जें जें अश्वींनीं केलें अशी प्रसिद्धि आहे तें तें.

'जे कल्याण करित असतात'='पिप्रतोः'. अक्षरशः अर्थ 'भरण करित असतात,' पोषण करित असतात. सोम पिऊन देव प्रसन्न होतात आणि सोमपानापासून झालेला जो हर्ष अथवा अम्मल त्याच्या योगानें उपासकांस इष्ट वस्तूंचा लाभ करून देतात असें वेदांत जिकडे तिकडे सांगितलें आहे.

१३. भावार्थः– 'हे कल्याणकारक अश्वींनो, उपासकांच्या घरीं येऊन सोमपानाचें आणि स्तुतिश्रवणाचें सुख भोगित राहणें हें तुम्हांस आवडत असतें. तर तुम्ही पूर्वीं सर्वां मनुष्यांचा आदि पुरुष म्हणजे प्रजापति जो मनु त्याच्या येथें सोमपानार्थ आणि स्तुतिश्रवणार्थ जसे येत होतां तसे आज आमचे घरीं या.'

'कल्याणकारक'='शंभू'. हें विशेषण लक्षांत ठेवावें. आपले पूर्वज आर्य आपल्या देवांस क्रूर, अनिष्टकारक, घातकी अथवा पट्कीनें वगैरे जीव घेणारे असे मानीत नव्हते, तर कल्याण करणारे असे समजत याविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे.

'यजमानाच्या घरीं'= 'विवस्वति'.

**युवोरुषा अनु श्रियं परिज्मनोरुपाचरत् ।**
**ऋतावनथो अक्तुभिः ॥ १४ ॥**

युवोः । उषाः । अनु । श्रियम् । परिऽज्मनोः । उपऽआचरत् ।
ऋता । वनथः । अक्तुऽभिः ॥ १४ ॥

**उभा पिबतमश्विनोभा नः शर्म यच्छतम् ।**
**अविद्रियाभिरूतिभिः ॥ १५ ॥ ३९ ॥ ३ ॥**

उभा । पिबतम् । अश्विना । उभा । नः । शर्म । यच्छतम् ।
अविद्रियाभिः । ऊतिऽभिः ॥ १५ ॥ ३९ ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

१४. [हे अश्विनौ,] परिज्मनोः (=परितो गन्त्रोः=सूर्याचन्द्रमसाविव विश्वं प्रदक्षिणीकुर्वतोः) युवोः (=युवयोः) श्रियम् अनु (=आगमनरूपं प्रकाशम् अनु= युवयोः प्रकाशमानाद् उदयाद् अनन्तरम्) उषाः उपाचरत् (=आगच्छति)। [युवां, हि] अक्तुभिः (=रात्री) [अर्पितानि] ऋता (=ऋतानि यज्ञगतानि हवींषि) वनथः (=कामयेथे) ॥

अत्रेदमुक्तं भवति । हे अश्विनौ, यद्यपि उषाः पूर्वस्मिन्नेव प्रातःकाले उदेति तथापि युवां तावत् तस्या अपि पूर्वमेव सति रात्र्या महत्यवशेषे उदिथः । युवां हि रात्रावर्पितं हविः कामयेथे नतूदितात् सूर्यादनन्तरम् अर्पितम् इति ॥

१५. हे अश्विनौ, उभा (=उभौ) [युवां] पिबतम् (=अस्माभिः अर्पितं सोमं पिबतम्), उभा (=उभावपि) नः (=अस्मभ्यम्) अविद्रियाभिः ऊतिभिः (=अनिन्दितैः संरक्षणैः सह) शर्म (=सुखं) यच्छतं (=प्रयच्छतं=दत्तम्) ॥

---

अक्षरशः अर्थ 'यजमानाच्या येथें.' जसा एकाद्या पाहुण्याचा सत्कार झाल्यानें वगैरे तो पाहुणा प्रसन्न होतो, आणि यजमानाच्या घरीं फार दिवस राहूं इच्छितो. तसे अश्वीदेव हे राहूं इच्छितात असें तात्पर्य आहे.

'मनूच्या येथें' ='मनुष्वत्.' सू. ४४ मं. ११ याजवरील टीप पहा. 'मनुष्वत्' म्हणजें 'मनुष्याप्रमाणें' (या) असाहि अर्थ संभवेल. पण आम्ही सायणांस अनुसरलों आहों.

१४. [विश्व]प्रदक्षिणा करणारे [असे जे] तुम्ही [ते] प्रकाशल्यानंतर उषा [देवी] येत असते. तुम्हांस रात्रीं [केलेली] उपासना आवडते.

१५. हे अश्वी हो, तुम्ही उभयतां प्या, उभयतां उत्तम प्रसादांसहित आम्हांस सुख द्या.

14. After the bright appearance of ye that go round [the universe] the [Goddess] Ushas comes. Ye love oblations [offered] at night.

15. Drink ye both, As'vins, grant ye both happiness unto us with blameless favours.

---

१४. 'हे अश्वींनो, उषःकाल झाल्यावर अथवा सूर्योदय झाल्यावर दिलेलें हवि इतर देवांस जसें आवडतें तसें तुम्हांस आवडत नाहीं, उषःकाल होण्यापूर्वींच आणि अजून बरीच रात्र असतांहि दिलेलें जें हवि, तें तुम्हांस प्रिय असतें म्हणून तुम्ही उषेच्या पूर्वींच उगवत असतां, आणि तुम्ही उगवून गेल्यावर मग उषा उगवत असते,' असें तात्पर्य.

'प्रदक्षिणा करणारे' ='परिज्मनोः'. अश्वी म्हणजे शुक्रासारिखे मोठ्या पाहांटेस उगवणारे दोन तारे होत अथवा त्यासारिखेच कोणी देव होत अशाविषयीं पूर्वीं सू. ३ मंत्र. १ याजवर टीप दिली आहे ती पाहा. जशी उषा देवी, अथवा जसे सूर्यचंद्र पृथिवीस प्रदक्षिणा करितात तसेच हे अश्वीदेव करितात असें कवीचें हृद्ग.

१५. हा मंत्र सूक्ताचा उपसंहार आहे. म्हणून ऋषीच्या मनांत जें मागावयाचें आहे तें यांत मागितलें आहे. तें हें कीं, दोनी अश्वींनीं येऊन ऋषीनें अर्पण केलेला सोम प्यावा, आणि ऋषीचें संरक्षण अशा रीतीनें करावें कीं त्याविषयीं कोणासहि निंदा करितां येऊं नये, आणि ऋषीला सुख व्हावें.

हा साधा, तथापि सुंदर मंत्र वाचून असा उद्गार येतो कीं, प्राचीन ऋषि भक्तिमान्, देवांविषयीं प्रांजल आणि आपल्या निर्बलत्वाविषयीं सज्ञान असतांहि आपल्या पौराणिकांनीं त्यांस तपोबळानें देवांविषयीं उन्मत्त, देवांस लात मारणें इतके उद्धट आणि ज्ञानसागर आणि तपोबळाच्या योगानें ऋद्धिसिद्धींचे नायक कसे बनविले आहेत पाहा! तेव्हां वेदाचा अर्थ मनुष्यास होणें नाहीं, आणि जो करूं लागेल त्याचें निसंतान होईल अशी समजूत सर्वत्र करून देणें आणि त्यांप्रमाणें वर्तणें, हें पौराणिकांस आणि त्यांच्या अनुयायींस अवश्य होय यांत संशय नाहीं.

## सूक्तम् ४७.

कण्वपुत्रः प्रस्कण्व ऋषिः । अश्विनौ देवता । प्रथमातृतीयाद्या अयुजो बृहत्यः । द्वितीयाचतुर्थ्याद्या युजः सतोबृहत्यः ।

**अयं वां मधुमत्तमः सुतः सोम ऋतावृधा ।**
**तमश्विना पिबतं तिरोअह्न्यं धत्तं रत्नानि दाशुषे ॥ १ ॥**

अयम् । वाम् । मधुमत्ऽतमः । सुतः । सोमः । ऋतऽवृधा ।
तम् । अश्विना । पिबतम् । तिरःऽअह्न्यम् । धत्तम् । रत्नानि । दाशुषे ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे ऋतावृधा ( =ऋतावृधौ=यज्ञरूपेण सत्येन प्रवृद्धौ ), मधुमत्तमः ( =अतिशयेन मधुरः ) सुतः सोमः ( =अभिषुतः सोमरसः ) अयं वाम् ( =अत्र युवाभ्यां=युवयोरर्थे अत्र) [ वर्तते ] । तं तिरोअह्न्यं ( =पूर्वस्मिन् दिने अभिषुतं ) [ सोमं ] [ युवां ] पिबतम्, [ अपि च ] दाशुषे (=हविर्दत्तवते यजमानाय ) रत्नानि ( =उत्तमानि धनानि ) धत्तं ( =प्रयच्छतम् ) ॥

## सूक्त ४७.

ऋषि– कण्वाचा पुत्र **प्रस्कण्व** (जो पूर्वीच्या सूक्ताचा कर्ता तोच). देवता–**अश्वी** देव. वृत्त विषम ऋचांचें ( म्हणजे १ ली, ३ री, ५ वी, इत्यादिकांचें) **बृहती**, आणि सम ऋचांचें ( २ री, ४ थी इत्यादिकांचें ) **सतोबृहती.**

१. हे [ यज्ञरूप ] सत्याच्या योगानें आनंद पावणारे [ अश्वी ] हो, हा [ पहा ] तुम्हांसाठीं परम मधुर सोमरस काढिला [ आहे ]. [तर] हे अश्वी हो, तो काल काढिलेला [ सोमरस ] तुम्ही प्या आणि उपासकाला धनें द्या.

## Hymn 47.

To the *As'vins.* By *Praskaṇva* the son of *Kaṇva.* Metre—the *Bṛihatî* of those that are uneven (i.e. 1,3,5, &c.) and the *Sato-bṛihatî* of those that are even (i.e. 2, 4, 6, &c).

1. Here [is] the sweetest Soma extracted for you, O As'vins rejoicing in sacrifice. Drink that [ Soma ] [which was] prepared yesterday [ and ] confer blessings upon the sacrificer.

---

१. हेंहि सूक्त अश्वी देवांविषयींच आहे, आणि पूर्वसूक्ताच्या कर्त्याचेंच आहे.

या मंत्रांत कवि अश्वींस म्हणतो कीं, ' हा येथें फार गोड आणि नुक्ता कालच काढिलेला सोमरस तुम्हांस अर्पण केला आहे; तर हे यज्ञापासून आनंद पावणारे अश्वी हो, हा सोमरस तुम्ही प्या आणि अर्पण करणाऱ्या आम्हांस उत्तम उत्तम संपत्ति द्या.'

' [यज्ञरूप] सत्याच्या योगानें आनंद पावणारे' = 'ऋतावृधा.' अक्षरशः अर्थ 'सत्याच्या योगानें वाढणारे' अथवा 'संतोष पावणारे.' आमचे पूर्वज आर्य जी देवांची उपासना करीत त्यास ते यज्ञ म्हणत. आणि तसा यज्ञ करून देवांस जें भजणें त्यास 'ऋत' (=सत्य) आणि तद्विरुद्ध जें आचरण त्याला ते ' अनृत ' ( =असत्य) असें म्हणत असत. आम्हीं जो येथें अर्थ केला आहे त्याविषयीं सू. ४४, मं. १४ याजवरील टीप पाहा.

' काल काढिलेला' =' तिरो अह्न्यं.' सू. ४५ मं. १० याजवरील टीप पाहा.

या मंत्राचें वृत्त 'बृहती' आहे. 'बृहती' वृत्ताचें लक्षण असें आहे कीं, ' बृहती ' वृत्त म्हणजे अनुष्टुप् छंदच समजावयाचा, मात्र तिसऱ्या पादांत आठ अक्षरें न

त्रिवन्धुरेण त्रिवृता सुपेशसा रथेना यातमश्विना ।
कण्वासो वां ब्रह्म कृण्वन्त्यध्वरे तेषां सु शृणुतं हवम् ॥ २ ॥
त्रिऽवन्धुरेण । त्रिऽवृता । सुऽपेशसा । रथेन । आ । यातम् । अश्विना ।
कण्वासः । वाम् । ब्रह्म । कृण्वन्ति । अध्वरे । तेषाम् । सु । शृणुतम् ।
हवम् ॥ २ ॥
अश्विना मधुमत्तमं पातं सोममृतावृधा ।
अथाद्य दस्रा वसु बिभ्रता रथे दाश्वांसमुप गच्छतम् ॥ ३ ॥
अश्विना । मधुमत्ऽतमम् । पातम् । सोमम् । ऋतऽवृधा ।
अथ । अद्य । दस्रा । वसु । बिभ्रता । रथे । दाश्वांसम् । उप ।
गच्छतम् ॥ ३ ॥

## भाषायाम्.

२. हे अश्विना ( =अश्विनौ ), [ युवां ] त्रिवन्धुरेण ( =ईषारूपत्रिविधवन्धनकाष्ठयुक्तेन ) त्रिवृता ( =त्रिकोणेन ) सुपेशसा ( =शोभनरूपेण=सुन्दरेण ) [ युवयो' ] रथेन आयातम् ( =आगच्छतम् ) । वां ( =युवयोरर्थे ) [ हि ] कण्वासः (= कण्वाः=कण्वकुलोत्पन्ना मदादयः पुरुषा ) [ अस्मिन् ] अध्वरे ( =यागे ) ब्रह्म ( =स्तोत्रं ) कृण्वन्ति (=कुर्वन्ति=रचयन्ति ) तेषां हवम् ( =आह्वानं ) सु ( =सुष्ठु =आदरेण ) शृणुतम् ॥

३. हे ऋतावृधा ( =ऋतावृधौ=यज्ञरूपेण सत्येन प्रवृद्धौ संतुष्टौ) अश्विना (अश्विनौ), [ इमं ] मधुमत्तमम् (=अतिशयेन मधुरं ) सोमं पातं ( =पिबतम् ), अथ ( =अपि च ) हे दस्रा ( =दस्रौ=महाकर्मैककारिणौ ), रथे ( =युष्माकं रथे ) वसु (=धनं ) बिभ्रता ( =बिभ्रतौ ) [ सन्तौ ] अद्य दाश्वांसम् उप ( =हविःप्रदं यजमानं प्रति ) गच्छतम् ( =आगच्छतम् ) ॥

येतां बारा येत असतात आणि हा जो द्वादशाक्षरी तिसरा पाद तो 'वंशस्थ' नांवाच्या अर्वाचीन वृत्ताच्या पादाप्रमाणें वाचतां येतो. रघुवंशाचा तिसरा सर्ग वंशस्थवृत्तांत आहे.

पणि ज्या अनुष्टुप् मंत्रांत केवळ चरण वर सांगितल्याप्रमाणें द्वादशाक्षरी नसतां पहिला आणि तिसरा हे दोनीहि द्वादशाक्षरी चरण असतात (आणि वंशस्थ पादाप्रमाणें वाचतां येतात) त्यास 'सतोबृहती' असें नांव आहे. पुढचा मंत्र पाहा.

वृत्तानुरोधानें 'तिरोअह्न्यं'.याबद्दल 'तिरोअह्निअं' असें वाचलें पाहिजे.

२. हे अश्वी हो, तुम्ही आपल्या तीन दांड्यांच्या त्रिकोणी, [आणि] सुंदर रथांत [बसून] या. [कारण कीं] कण्वकुलोत्पन्न जन [ह्या] यज्ञांत तुमचें स्तवन करीत आहेत; त्यांची हाक [तुम्ही] लक्ष लावून ऐका.

३. हे [यज्ञरूप] सत्याच्या योगानें आनंद पावणारे अश्वी हो, [हा] परम मधुर सोमरस [तुम्ही] प्या, आणि हे पराक्रमी [देव] हो, रथांत द्रव्य भरून घेऊन [तुम्ही] आज उपासकाप्रत या.

2. Come hither, [ye] As'vins, in your triangular [and] beautiful car of the three-fold pole. The Kaṇvas compose a hymn for you in the sacrifice; hear their invocation with attention.

3. O As'vins rejoicing in sacrifice, drink [this] sweetest Soma; and carrying wealth in [your] chariot come, mighty [As'vins], to the worshipper to-day.

---

२. भावार्थः— 'प्रसिद्ध कण्वकुलांत जन्मलेले जे आम्ही ते या यज्ञांत तुम्हांसाठीं स्तोत्र रचून गात आहों, यास्तव हे अश्वी देवहो, तुम्ही आपल्या तीनदांडी आणि त्रिकोणी सुंदर रथांत बसून येथें या.'

'तीनदांड्यांच्या' = 'त्रिवन्धुरेण.' 'वन्धुर' म्हणजे आसापासून निघून जुकडापर्यंत पोहोंचणारी जी लांकडाची दांडी, आणि जीजवर सारथि म्हणजे गाडी हाकणारा बसत असतो ती. सू. ३४, मंत्र ९ पाहा. या दांडीवर बसून गाडी हाकण्याची चाल अजूनहि आहे.

'त्रिकोणी' = 'त्रिवृत्.' सू. ३४, मंत्र ९ पाहा.

या मंत्राचें वृत्त 'सतोबृहती' आहे. 'सतोबृहती' म्हणजे काय याविषयीं पूर्वील मंत्रावरची टीप पहा. वृत्तसुखासाठीं संहितेंत 'कृण्वन्ति अध्वरे' असें वेगवेगळें वाचलें पाहिजे.

३. या मंत्रांत अश्वींस अशी प्रार्थना आहे कीं त्यांणीं आपल्या पूर्वोक्त रथांत संपत्ति भरून घेऊन उपासकासाठीं ती आणावी आणि त्याणें अर्पण केलेला जो अति मधुर सोमरस तो प्यावा.

'[यज्ञरूप] सत्याच्या योगानें आनंद पावणारे' = 'ऋतावृधौ.' सू. ४४, मं. १४ याजवरील टीप पहा.

**त्रिषधस्थे बर्हिषि विश्ववेदसा मध्वा यज्ञं मिमिक्षतम् ।**
**कण्वासो वां सुतसोमा अभिद्यवो युवां हवन्ते अश्विना ॥ ४ ॥**

त्रिऽसधस्थे । बर्हिषि । विश्वऽवेदसा । मध्वा । यज्ञम् । मिमिक्षतम् । कण्वासः । वाम् । सुतऽसोमाः । अभिऽद्यवः । युवाम् । हवन्ते । अश्विना ॥ ४ ॥

**याभिः कण्वमभिष्टिभिः प्रावतं युवमश्विना ।**
**ताभिः ष्व१स्माँ अवतं शुभस्पती पातं सोममृतावृधा॥५ ॥ १ ॥**

याभिः । कण्वम् । अभिष्टिऽभिः । प्र । आवतम् । युवम् । अश्विना । ताभिः । सु । अस्मान् । अवतम् । शुभः । पती इति । पातम् । सोमम् । ऋतऽवृधा ॥ ५ ॥ १ ॥

---

## भाषायाम्.

४. हे विश्ववेदसा ( =विश्ववेदसौ=सर्वज्ञौ ) ( अश्विनौ ), [ युवां ] त्रिसधस्थे बर्हिषि ( =कक्ष्यात्रयरूपेणास्तीर्णतया त्रिषु स्थानेष्ववस्थिते दर्भे ) यज्ञं मध्वा (=मधुना) मिमिक्षतम् (=सेक्तुमिच्छतं=सिञ्चतम्) । कण्वासः (=कण्वाः=कण्वकुलोत्पन्ना मदादयः पुरुषा ) [ हि ] वां ( =युवयोरर्थे ) सुतसोमाः ( =अभिषुतसोमाः) [ सन्तः], अभिद्यवः (=अभिगतदीप्तयः=तेजस्विनः) [ सन्तः ], हे अश्विना ( =अश्विनौ ), युवां हवन्ते ( =आह्वयन्ते )॥

५. हे अश्विना ( =अश्विनौ ), याभिः अभिष्टिभिः ( =रक्षाभिः ) युवं (= युवां ) कण्वम् ( =अस्मत्कुलस्य आदिपुरुषं महर्षिं ) प्रावतं ( =रक्षितवन्तौ ), ताभिः हे शुभस्पती (=कल्याणाधिपती), अस्मान् (=कण्वकुलोत्पन्नान् पुरुषान् ) सु ( =सुष्ठु) अवतं ( =रक्षतम् ), [ अपि च ] हे ऋतावृधा ( =ऋतावृधौ=यज्ञरूपेण सत्येन प्रवृद्धौ) [ अश्विनौ ] [ इमं सोमं ] पातं ( =पिबतम् ) ॥

४. हे सर्वज्ञ [अश्वी] हो, त्रिस्थली दर्भांवर तुम्ही मधानें [आमचा] यज्ञ भिजवा. हे अश्वी [देव] हो, कण्वकुलोत्पन्न तेजस्वी जन तुम्हांकरितां सोमरस काढून तुम्हांस हाक मारीत आहेत.

५. हे अश्वी हो, ज्या कृपावलोकनांनीं तुम्ही कण्वाला रक्षिते झालां त्या[च कृपावलोकनां]नीं, हे कल्याणाचे अधिपती हो, आम्हांस तुम्ही संरक्षा; [आणि] हे यज्ञानें आनंद पावणारे अश्वी हो, [हा आमचा] सोमरस प्या.

4. Sprinkle with honey the sacrifice, O omniscient [As'vins], on the three-fold Kus'a-[grass]. The bright Kaṇvas, having extracted the Soma for you, are, As'vins, invoking you.

5. With those kindnesses with which, As'vins, you did protect Kaṇva, protect us well, lords of bliss, [and] O [gods] rejoicing in sacrifice, drink [our] Soma.

---

४. भावार्थः—'हे अश्वींनो, प्रसिद्ध कण्वकुळांत उत्पन्न झालेले आम्ही सोम काढून तुमचें आह्वान करीत आहों, तर तुम्ही या, आणि तीन ठिकाणीं आंथरलेले जे दर्भ त्यावर बसून आमचा यज्ञ तुमच्याजवळ असलेल्या मधूनें गोड करा.'

'त्रिस्थळी दर्भांवर' = 'त्रिसधस्थे बर्हिषि.' म्हणजे तिघांस बसण्यास जागा होईल अशा रीतीनें आंथरलेल्या दर्भांवर बसून. सर्व देवांस दर्भ आंथरतेवेळीं तिघांस जागा होई अशा रीतीनें आंथरीत अशाविषयीं कोठें सांगितलेलें आढळत नाहीं. तेव्हां अशा प्रकारचे दर्भ 'तीनचाकी' 'त्रिकोणी' रथांत बसून 'तीनदा' संपत्ति वाहून आणणारे, आणि 'तीनदा' प्रार्थना ग्रहण करून घेणारे, आणि 'तीनदा'.अन्नसंपत्ति देणारे जे अश्वी देव त्यांसाठींच तीन आसनें होत अशा रीतीनें दर्भ आंथरीत असें दिसतें. सू. ३४, मं. ५–१२ पाहा.

'मधानें यज्ञ भिजवा' = 'मध्वा यज्ञं मिमिक्षतम्.' सू. ३४, मं. ३ आणि त्याजवरील टीप पाहा. अश्वी देव आपल्या रथांत मधु घेऊन येतात असें वेदांत सांगितलें आहे.

'कण्वकुलोत्पन्न तेजस्वी जन' = 'अभिद्यवः कण्वासः.' म्हणजे शुचिर्भूत, आणि लखलखीत कांतीचे जे कण्वकुळांत उत्पन्न झालेले आम्ही ते. हा अर्थ आम्ही सायणांस अनुसरूनच केला आहे. कितीएक पाश्चात्य विद्वान् 'अभिद्यवः' याचा 'तेजस्वी' असा अर्थ न करितां स्वर्गाकडेस नेत्र लावून राहिलेले (द्याम् अभि पश्यन्तः) असें विशेषण करितात. परंतु 'अभिद्यु' हा शब्द ज्यांत येतो अशीं ऋग्वेदांतील सर्व स्थळें काढून

सुदासे दस्रा वसु बिभ्रता रथे पृक्षो वहतमश्विना ।
रयिं समुद्रादुत वा दिवस्पर्यस्मे धत्तं पुरुस्पृहम् ॥ ६ ॥

सुऽदासे । दस्रा । वसु । बिभ्रता । रथे । पृक्षः । वहतम् । अश्विना ।
रयिम् । समुद्रात् । उत । वा । दिवः । परि । अस्मे इति । धत्तम् ।
पुरुऽस्पृहम् ॥ ६ ॥

---

**भाषायाम्.**

६. हे दस्रा (=दस्रौ=शत्रूणाम् उपक्षपयितारौ) अश्विना (=अश्विनौ), सुदासे (=पिजवनपुत्राय एतन्नामकाय राज्ञे) [युवयो]रथे वसु (=अन्नादिसंपदं) बिभ्रता (=बिभ्रतौ=धारयन्तौ) [सन्तौ] [युवां] पृक्षः (=अन्नानि=अन्नवैपुल्यम्) [अ]वहतम् (=आनीतवन्तौ)। [तौ युवां] समुद्रात् (=अन्तरिक्षात्) उत वा (=अथवा) दिवस्परि (=द्युलोकात्) पुरुस्पृहं (=बहुभिः स्पृहणीयं) रयिं (=संपदम्) अस्मे (=अस्मासु=अस्मभ्यं) धत्तं (=स्थापयतम्=आनीय प्रयच्छतम्)॥

---

पाहातां आम्हांस सायणाचार्यांचाच अर्थ खरा दिसतो. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें 'अभिद्यु' म्हणजे ज्यांला प्रकाशाची प्रभावळ आहे, अर्थात् जे 'तेजस्वी' होत ते. हा अर्थ बहुतकरून सर्व स्थळीं जुळतो. ऋग्वेदांत ''अभिद्यु' हें विशेषण बहुतकरून देवांस लाविलेलें आढळतें. त्याचा अर्थ 'प्रभापल्लवित' म्हणजे ज्याच्या आसपास कांतीची प्रभावळ आहे तो.

५. प्रस्कण्व ऋषि म्हणतो कीं, 'हे अश्वीहो, आमचा मूळपुरुष कण्व ऋषि याचें अनेक प्रसंगीं तुम्हीं आपल्या कृपेनें संरक्षण पूर्वी केलें; तो जशी तुमची उपासना करीत असे तशी त्याचे वंशज आम्हीहि करीत आहों. तर हे कल्याणकारी, आणि यज्ञापासून आनंद पावणारे अश्वीदेव हो, तुम्ही हा आमचा सोमरस प्या, आणि कण्वाचें संरक्षण केलें तसेंच आमचेंहि संरक्षण उत्तम रीतीनें करा.'

या सूक्ताचा कर्ता कण्वकुळांतील प्रस्कण्व आहे हें लक्ष्यांत ठेविलें तर या मंत्रावरून असें अनुमान काढावयाचें कीं, अश्वी देवांची कण्वकुळांत वंशपरंपरेनें उपासना होत असे. आलीकडे तरी कोणी मनुष्य आपल्या कुळदेवतेला मानत करून घ्यावयाची असली म्हणजे आमच्या वाडवडिलांचें संरक्षण केलें तसेंच आमचेंहि कर अशी प्रार्थना करण्याची चाल आहे.

'या मंत्रावरून आपल्या आर्य पूर्वजांची देवांविषयीं भक्ति, श्रद्धा आणि वाडवडिलांचें संरक्षण केलें त्याप्रमाणें आपलेंहि संरक्षण देव करितील असा मोठा भरंवसा उघड दिसून येतो.

६. हे पराक्रमशाली अश्वी [ देव ] हो, तुम्ही सुदास [राजा]-साठीं धनधान्यसंपत्ति रथांत भरून घेऊन आलां; [ तर ] ज्याची इच्छा सर्वांनीं करावी असें वैभव अंतरिक्षांतून अथवा द्युलोकांतून [आणून ] तुम्ही आम्हांस द्या.

6. Carrying wealth in [your] chariot you brought, valiant As'vins, affluence to Sudâs. Grant us [then], either from the sky or from the heaven wealth that many may envy.

या मंत्राचें वृत्त 'बृहती' आहे. वृत्त-नियमानुरोधानें तिसरा चरण 'ताभिः सु अस्मान् अवतं शुभस्पती' असा पद-पाठांत असल्याप्रमाणें संहितेंत वाचावा म्हणजे वंशस्थपादाप्रमाणें लागेल.

६. या मंत्रांत ऋषि म्हणतो कीं, हे अश्वींनो, तुम्ही 'सुदास' म्हणून जो पिजवनाचा प्रसिद्ध पुत्र राजा होऊन गेला त्याला शत्रूंशीं युद्धप्रसंगीं यश देऊन तुम्ही आपल्या रथांतून अन्नादि संपत्ति भरून आणून देत होतां, त्याप्रमाणेंच आज आम्हांसहि सकळांच्या मनांत भरण्याजोगी संपत्ति द्या, मग ती तुम्ही आकाशांतून आणा, अथवा स्वर्गांतून आणा. तुमचा रथ आकाशांतून जसा फिरतो तसा स्वर्गलोकांतहि फिरत असतो.

सुदास् या नांवाचा एक प्रसिद्ध राजा वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितला आहे. त्याच्या बापाचें नांव 'पिजवन' अथवा 'दिवोदास.' (ऋ. ७. १८. २५ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा). तो 'तृत्सु' म्हणून कोणी लोक होते त्यांचा राजा होता, आणि वसिष्ठ त्या तृत्सूंचा पुरोहित झाला त्या दिवसापासून ते प्रसिद्धीस आले वगैरे ऋग्वेदांत सांगितलें आहे. हा सुदास् राजा कोणी दाहा राजांबरोबर लढत असतां त्याला इंद्रानें साहाय्य केलें आणि त्यामुळें तो यशस्वी झाला असें ऋ. ७. १८ इत्यादिक सूक्तांत सांगितलें आहे.

'तुम्ही सुदास [राजा]साठीं धनधान्यसंपत्ति रथांत भरून घेऊन आलां'= 'सुदासे वसु बिभ्रता रथे पृक्षो वहतम्.' अक्षरशः अर्थ, 'सुदासासाठीं रथांत धन भरून अन्न घेऊन आलां,' म्हणजे, 'अन्नरूप धन सुदासासाठीं रथांत भरून घेऊन आलां.'

'अंतरिक्षांतून'=' समुद्रात्.' येथें अंतरिक्षास 'समुद्र' असें नांव दिलेलें ध्यानांत ठेवावें. सागरांत जसा पाण्याचा संचय असतो तसा अंतरिक्षांत मेघोदकरूपानें पाण्याचा संचय असतो म्हणून अंतरिक्षासहि समुद्र नांव पडलें आहे. सू. ३४, मं. ६ याजवरील 'अंतरिक्ष', या शब्दाविषयींची टीप पाहा, आणि सू.

यन्नासत्या परावति यद्वा स्थो अधि तुर्वशे ।
अतो रथेन सुवृता न आ गतं साकं सूर्यस्य रश्मिभिः ॥ ७ ॥

यत् । नासत्या । पराऽवति । यत् । वा । स्थः । अधि । तुर्वशे ।
अतः । रथेन । सुऽवृता । नः । आ । गतम् । साकम् । सूर्यस्य ।
रश्मिऽभिः ॥ ७ ॥

अर्वाञ्चा वां सप्तयोऽध्वरश्रियो वहन्तु सवनेदुप ।
इषं पृञ्चन्ता सुकृते सुदानव आ बर्हिः सीदतं नरा ॥ ८ ॥

अर्वाञ्चा । वाम् । सप्तयः । अध्वरऽश्रियः । वहन्तु । सवना । इत् । उप ।
इषम् । पृञ्चन्ता । सुऽकृते । सुऽदानवे । आ । बर्हिः । सीदतम् ।
नरा ॥ ८ ॥

## भाषायाम्.

७. हे नासत्या (=असत्यरहितौ) [अश्विनौ], यद् (=यद्यपि) [युवां] परावति (=दूरदेशे) [स्थः] यद्वा (=अथवा यद्यपि) अधि तुर्वशे (=एतन्नाम्नः कस्यचित् प्रसिद्धस्य उपासकस्य गृहे) [समीपे] स्थः, तदपि अतः (=तस्माद् दूरप्रदेशात् अथवा तुर्वशगृहात्) सुवृता रथेन (=शोभनवर्तनं युवयो रथमधिष्ठाय) सूर्यस्य रश्मिभिः साकं (=सूर्यप्रकाशोदयकाले, सूर्यतेजोयुक्तौ वा), नः (=अस्मान् प्रति) आगतम् (=आगच्छतम्) ॥

८. [हे अश्विनौ,] अध्वरश्रियः (=यागसेविनः=नित्यमेव यज्ञं प्रति गन्तारो) [युवयोः] सप्तयः (= अश्वाः) वां (=युवां) सवना [नि]इत् उप (=सवनानां समीपमेव) अर्वाञ्चा वहन्तु (=अर्वाञ्चौ वहन्तु=अर्वाग् वहन्तु=आवहन्तु)। सुकृते (=सुकर्मकारिणे) सुदानवे (=शोभनहविर्दानयुक्ताय) [यजमानाय] इषं पृञ्चन्ता (=अन्नं पृञ्चन्तौ=धान्यादिसंपदं पूरयन्तौ=ददतौ) [युवां] हे नरा (=नरौ=शूरौ) [अश्विनौ], बर्हिः आसीदतम् (=आगत्य दर्भासनोपरि निषीदतम्) ॥

३५, मंत्र ८ याजवरील 'अंतरिक्ष' [illegible]दावरची टीप पाहा.

या मंत्राचें वृत्त सतोबृहती असल्यामुळें पहिला चरण वंशस्थाप्रमाणें लागावा म्हणून 'सुदासे' यांतील 'से' ऱ्हस्व वाचावी.

७. हे सत्यवंत अश्वी हो,[तुम्ही] दूर अंतरावर [असा], किंवा तुर्वशाजवळ असा,– तेथून [तुम्ही] [आपल्या] चांगला फिरणाऱ्या रथांत [बसून] सूर्याच्या किरणांबरोबर आम्हांकडेस या.

८. [हे अश्वी देव हो,] तुमचे यज्ञगामी अश्व तुम्हांला थेट आमच्या यज्ञांकडेस घेऊन येओत. सत्कृत्यें करणाऱ्याला [आणि] चांगलें हवि अर्पण करणाऱ्याला धनधान्य देणारे [जे तुम्ही ते] [शूर अश्वी] हो, इकडे [येऊन] [आमच्या या] दर्भावर बसा.

7. Whether you are, O truthful As'vins, far off at a distance or [near] with Turvas'a, come [ye] thence unto us in [your] easy-rolling car, to-gether with the rays of the sun.

8. May [your] horses, accustomed to repair to sacrifices, bring you hither direct to our sacrifices. Bestowers of food upon the doer of good deeds [and] upon the giver of good gifts, come brave [As'vins], and sit upon the kus'a-[grass].

---

७. यांत अश्वींस अशी प्रार्थना आहे कीं, 'ते आकाश, द्युलोक इत्यादि दूर प्रदेशांत असोत अथवा पृथ्वीवर त्यांच्या 'तुर्वशादि' प्रिय उपासकांच्या घरीं असोत, कोठें असतील तेथून आपल्या चपळ रथांत बसून सूर्यकिरणांबरोबर सूक्तकर्त्या प्रस्कण्व ऋषीजवळ यावें'.

'तुर्वशाजवळ'=' अधि तुर्वशे.' ऋ. ८. ४. १ पाहा. 'तुर्वश' नांवाचा कोणीएक मनुष्य ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितला आहे तो 'वसिष्ठ', 'अंगिरस्' इत्यादिकांप्रमाणें एका गोत्राचा मूळ पुरुष असावा असें आढळतें. आणि प्रस्तुत मंत्रांत तरी 'तुर्वशाजवळ' म्हणजे 'तुर्वश' कुळांत जन्मलेल्या लोकांच्या घरीं असाच अर्थ इष्ट आहे. 'तुर्वशांचे घरीं न राहातां आम्हां कण्वांचे घरीं ये' असें मंत्रकर्त्याचें विवक्षित. सू. ३६, मंत्र १८ पाहा.

'चांगला फिरणाऱ्या रथांत बसून'= 'सुवृता रथेन'. म्हणजे ज्या रथाचीं चाकें शीघ्रगामी होत. अश्वींच्या रथाविषयीं पूर्वी पुष्कळ सांगितलेंच आहे.

'सूर्याच्या किरणांबरोबर' =' साकं सूर्यस्य रश्मिभिः.' म्हणजे सूर्योदयकाळीं असें सायणाचार्य म्हणतात. परंतु अश्वी येण्याचा काल सूर्योदयापूर्वी फार वेळ असतो असें इतर ठिकाणीं सांगितलें आहे; यास्तव 'सूर्यकिरणांबरोबर' म्हणजे सूर्योदयापूर्वी ज्या कोमल प्रकाशानें दिशा फांकतात त्या प्रकाशासहित असें कवीचें हृद्य दिसतें. अथवा सूर्याचें जें तेज तेणेंकरून युक्त म्हणजे सूर्याच्या किरणांप्रमाणें लखलखीत रथांत बसून असेंहि संभ-

तेन नासत्या गतं रथेन सूर्यत्वचा ।
येन शश्वदूहथुर्दाशुषे वसु मध्वः सोमस्य पीतये ॥ ९ ॥
तेन । नासत्या । आ । गतम् । रथेन । सूर्यऽत्वचा ।
येन । शश्वत् । ऊहथुः । दाशुषे । वसु । मध्वः । सोमस्य । पीतये ॥९॥

## भाषायाम्.

९. हे नासत्या (=असत्यरहितौ) [ अश्विनौ ], येन [ रथेन ] [ युवां ] शश्वत् सदा (=सर्वदा) दाशुषे (=हविर्दत्तवते यजमानाय) वसु (=धनम्) ऊहथुः (=प्रापितवन्तौ=प्रापयथः) तेन सूर्यत्वचा (=सूर्यवद्भासमानेन) रथेन (=तं युवयो रथमधिष्ठाय) मध्वः सोमस्य पीतये (=मधुरस्य सोमस्य पानाय) आगतम् (=आगच्छतम्) ॥

वतें. पुढें नववा मंत्र आणि त्याजवरील टीप पाहा.

या मंत्रांत 'रथेन' हें पद आहे त्याचा 'न' ओढून दीर्घ म्हटला म्हणजे तिसरा चरण वंशस्थाप्रमाणें लागेल.

८. अश्वींस अशी प्रार्थना आहे कीं, 'हे अश्वींनो, तुमच्या रथाचे घोडे नवीन आहेत अथवा त्यांस मार्ग टाऊक नाहीं असें नाहीं; ते नित्यशः यज्ञाप्रत जाणारे आहेत. यास्तव ते आज तुम्हांस येथें आणोत, आणि मार्गात दुसऱ्या कोणत्याहि उपासकाजवळ घेऊन न जाओत, थेट आमच्याच यज्ञाकडे घेऊन येओत, आणि तुम्ही येऊन तुम्हांसाठीं आम्हीं कुशासन आंथरलें आहे त्याजवर बसा, कारण कीं सुकृत्यें आणि सुसेवा करणाऱ्या उपासकांस तुम्ही धनधान्यसंपत्तीनें भरून टाकणारे आहां.'

'यज्ञगामी '=' अध्वरश्रियः'. म्हणजे यज्ञाप्रत जात असणारे. हा सायणांनीं केलेला अर्थ योग्य आहे. 'यज्ञाला शोभविणारे' असा जो कितीएक पाश्चिमात्य विद्वान् अर्थ करितात तो निराधार दिसतो.

'घेऊन येओत '=' अर्वाञ्चा वहन्तु.' सू. ३४ मं. १२ याजवरील टीप पाहा.

'धनधान्य देणारे '=' इषं पृञ्चन्तौ.' अक्षरशः अर्थ 'अन्न भरपूर करणारे'. ऋ. ६. ६८. ८; ८. ५. ३६ आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा.

वृत्तसुखासाठीं प्रथम चरण,

अर्वाञ्चा वां सप्तयो अध्वरश्रियः

असा, आणि तिसरा चरण,

इषं पृञ्चन्ता सुकृते सुदानवे

असा म्हणावा; म्हणजे 'चा' 'यो' 'पृ' हीं अक्षरें दीर्घ असतांहि ऱ्हस्व म्हणावीं, आणि तसें केलें असतां सतोबृहती छंदास इष्ट असल्याप्रमाणें वंशस्थवृत्ताप्रमाणें लागतील.

९. हे सत्यवंत [अश्वी] हो, [तुम्ही] ज्या रथांत [भरून] उपासकासाठीं नित्य धन आणीत असतां त्या सूर्याप्रमाणें तेजःपुंज [तुमच्या] रथांत [बसून] [तुम्ही] मधुर सोमरस पिण्याकरितां या.

9. In that car, bright as the sun, truthful [As'vins], in which you ever bring wealth to the worshipper, come hither to drink the sweet Soma.

---

९. ज्या तेजःपुंज रथांत अश्वी बसून आले म्हणजे उपासकाला धनप्राप्ति होते, त्या रथांत बसून अश्वींनीं यावें आणि आपण अर्पण केलेला गोड सोमरस प्यावा, अशी प्रस्कण्व या मंत्रांत प्रार्थना करीत आहे.

'नित्य आणीत असतां '='शश्वत् ऊहथुः.' अक्षरशः अर्थ 'नित्य आणिते झालां आहां.' वेदांत रीतिवर्तमान काळाच्या ऐवजीं पूर्णवर्तमान काळचा प्रयोग होत असतो, असें पूर्वीं सांगितलेंच आहे.

'सूर्याप्रमाणें तेजःपुंज' =' सूर्यत्वचा.' अक्षरशः अर्थ सूर्याप्रमाणें कांति आहे ज्याची. ऋ ८. ८. २ आणि त्याजवरील सायणभाष्य पाहा.

हा मंत्र वृत्तसुखासाठीं खालीं लिहिल्याप्रमाणें म्हणावा, म्हणजे वृत्ताचें खरें स्वरूप दृष्टीस पडेल:—

'तेन नासत्या आगतं ।
रथेन सूरिअत्वचा ।
येन शश्वदूहथुर्दाशुषे वसु ।
मध्वः सोमस्य पीतये ।'

उक्थेभिरर्वागवसे पुरूवसू अर्कैश्च नि ह्वयामहे ।
शश्वत्कण्वानां सदसि प्रिये हि कं सोमं पपथुरश्विना ॥१०॥२॥

उक्थेभिः । अर्वाक् । अवसे । पुरूऽवसू इति पुरूऽवसू । अर्कैः । च । नि । ह्वयामहे ।
शश्वत् । कण्वानाम् । सदसि । प्रिये । हि । कम् । सोमम् । पपथुः । अश्विना ॥ १० ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

१०. [वयम्] उक्थेभिः (=उक्थैः=स्तोत्रैः) अर्कैश्च (=गायनैश्च) पुरूवसू (=प्रभूतधनौ) [अश्विनौ] अवसे (=अस्मद्रक्षणाय) अर्वाक् निह्वयामहे (=अत्रागच्छतम् इति नितराम् आह्वयामः)। हि (=यस्मात् कारणात्) हे अश्विना (=अश्विनौ), [युवां] शश्वत् (=सर्वदा) कण्वानां (=कण्वकुलोत्पन्नानाम् अस्माकं) प्रिये सदसि (=प्रिये गृहे=प्रिये यज्ञस्थाने) सोमं पपथुः कं (=पीतवन्तौ खलु=पिबथः खलु)॥

१०. आम्ही स्तोत्रांनीं आणि गायनांनीं विपुलधनवंत [अश्वीं-ला] [आमचें] संरक्षण करण्यासाठीं इकडे [या अशी] मोठ्यानें हाक मारीत आहों. कारण कीं हे अश्वी [देव]हो, कण्वांच्या प्रिय गृहीं [तुम्ही] सदैव सोम पीत आलां आहां.

10. With hymns and with songs we loudly call the wealthy [As'vins] hitherward for [our] protection. For, Asvins, you have ever drunk the Soma in the beloved house of the Kanvas.

---

१०. हा मंत्र सूक्ताचा उपसंहार आहे. यांत सूक्तकर्ता असें प्रार्थितो कीं, 'हे अश्वी देवहो, तुम्ही आमच्या ह्या कण्वकुळांत परंपरागत पिढ्यानपिढी सोम पीत आलां आहां, म्हणजे तुमची उपासना आम्ही आज नवीन करितों आहों असें नाहीं. आमच्या वाडवडिलांपासून आमच्या गोत्रांत तुमची उपासना चालत आली आहे. आणि कण्वांनीं आपल्या गृहीं तुम्हांस अर्पण केलेला सोम इतक्या औत्सुक्यानें पीत आलां आहां कीं, कण्वांचें घर तुम्हांस त्यामुळें प्रिय झालें आहे. त्या चालीला अनुसरून आम्ही आज तुमच्या नांवानें हें आणि यासारिखीं दुसरीं सूक्तें रचून म्हटलीं आहेत, आणि तुम्हीं येऊन आमचें रक्षण करावें असें प्रार्थीत आहों तर हे अश्वीहो, तुम्ही आमचे पाठराखे व्हा'.

या मंत्रांत प्रथमार्धात परोक्ष निर्देश असून उत्तरार्धात प्रत्यक्ष निर्देश आहे. अशीं उदाहरणें पूर्वी आलींच आहेत.

'स्तोत्रांनीं आणि गायनांनीं'='उक्थेभिः अर्कैः.' सायणाचार्य 'उक्थ' म्हणजे 'शस्त्र' असें म्हणतात. शस्त्र म्हणजे जें स्तोत्र केवळ मोठ्यानें अथवा हळू म्हणावयाचें, गावयाचें नव्हे तें. आणि जें स्तोत्र गाऊन म्हणावयाचें त्याला वैदिक भाषेंत स्तोम म्हणतात.

'इकडे [या अशी]'='अर्वाक्.' या 'अर्वाक्' अव्ययाचा प्रयोग येथें 'आ' या उपसर्गाच्या अर्थी केलेला आहे.

'पीत आलां आहां'='पपथुः.' रीतिवर्तमानाबद्दल पूर्णवर्तमान.

या मंत्रांत अश्वींची प्रीति उपासकांवर कशी आहे आणि त्यांची विनवणी किती नम्र रीतीनें प्रस्कण्व करीत आहे ती पहा. या नम्रतेशीं पुराणांचा उद्धतपणा ताडून पाहिला म्हणजे किती अंतर दृष्टीस पडतें?

वृत्तसुखासाठीं दुसऱ्या चरणांत 'च' दीर्घ म्हणावा आणि तिसरा चरण याप्रमाणें म्हणावा:—

शश्वत् कण्वानां सदसि प्रिये हि कं.

## सूक्तम् (४८)

कण्वपुत्रः प्रस्कण्व ऋषिः । उषा देवता । अयुजो बृहत्यः । युजः सत्योबृहत्यः ।

सह वामेन न उषो व्युच्छा दुहितर्दि[illegible]ः ।
सह द्युम्नेन बृहता विभावरि राया दे[illegible] दास्वती ॥ १ ॥

सह । वामेन । नः । उषः । वि । उच्छ । [illegible]तः । दिवः ।
सह । द्युम्नेन । बृहता । विभाऽवरि । राया । देवि । दास्वती ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे उषः, हे दिवो दुहितः (=द्युदेवस्य कन्यके), [त्वं] नः (=अस्मभ्यम् =अस्मदर्थं) वामेन सह (=धनेन सहितं) वि उच्छ (=विशेषेण प्रकाशस्व), हे विभावरि (=प्रकाशवति) [उषो] देवि, बृहता द्युम्नेन सह (=महत्या अन्नादिसंपदा सह) [तथा] [बृहता] राया (=पश्वादिलक्षणेन धनेन सह) दास्वती (=दानयुक्ता) [सती त्वं] [वि उच्छ=विशेषेण प्रकाशस्व] ॥

हे उषः, अस्मदर्थं विविधधनं गृहीत्वा उदिहीति भावः ॥

## सूक्त ४८.

ऋषि—कण्वकुलोत्पन्न प्रस्कण्व या नांवाचा. देवता—उषा देवी. वृत्त पूर्वसूक्ताप्रमाणेंच विषम ऋचा आहेत त्यांचें बृहती आणि सम ऋचांचें सतोबृहती आहे.

१. हे उषे, हे द्यूचे कन्यके, [ तूं ] धनासहित आम्हांसाठीं प्रकाश; हे प्रभावती देवी, उदार [अशी जी तूं ती] मोठ्या संपत्तीसहित [ आणि ] वैभवासहित [प्रकाश].

## Hymn 48.

To *Ushas* or the goddess of the early Dawn. By *Praskaṇva* son of *Kaṇva*. Metre—those that are uneven (1,3 etc.) are *Bṛihatîs*, and those that are even are *Saṭobṛihatîs*.

1. With beautiful wealth for us dawn forth, O Ushas, daughter of heaven; with plenteous affluence [and] with wealth, O brilliant goddess, [dawn forth] [thou] liberal [Ushas].

---

१. हें सूक्त प्रभातवेलारूप जी उषा या नांवाची देवता वेदांत प्रसिद्ध आहे तिजविषयीं होय. ऋग्वेदांत या 'उषा देवी' विषयीं कितीएक फार सुंदर सूक्तें आहेत त्यांपैकींच हें एक होय.

या मंत्राचा भावार्थ समजण्यास अशी कल्पना केली पाहिजे कीं, प्रस्कण्व ऋषि मोठ्या पहांटेस उठून पूर्वेकडेस तोंड करून म्हणतो कीं 'हे उषे, तूं आतां आम्हांसाठीं सुंदर धन, धान्य आणि हे प्रकाशवती देवी, इतर संपत्ति घेऊन उगव. तूं मोठी दात्री आहेस'.

'द्यूचे कन्यके' ='दुहितर्दिवः'. 'द्यु' म्हणजे आकाशापेक्षांहि उंच जो महाप्रकाशभरित अपरिमित अवकाशप्रदेश कीं ज्यांत सूर्यचंद्रादि तारे संचार करितात तो होय; आणि त्यावरून तद्रूप देव. 'उषा' ही उगवल्यानंतर सर्व जगतांत प्रकाश पडतो आणि तो प्रकाश कोमळ असतो म्हणून आणि द्यूच्या पोटांत उषेचें जन्म दरदिवस होत असतें म्हणून तिला 'द्यूची कन्यका' असें सुंदर नांव ऋग्वेद कवींनीं दिलेलें आहे. याच सूक्ताचा आठवा मंत्र आणि त्याजवरील टीप पाहा.

'प्रकाश'='वि उच्छ' म्हणजे उदय पाव. 'उच्छ' हें रूप वस्तुतः 'वस्' (प्रकाशणें) यापासून प्रकाशण्यास आरंभ करणें, थोडथोडा, मंदमंद, आणि कोमळ तेजासहित उदय पावणें या अर्थी रूपान्तर पावलेलें क्रियापद आहे. 'वस्' म्हणजे मोठ्या तेजासहित प्रकाशणें; आणि

अश्वा॑वती॒र्गोम॑ती॒र्वि॑श्वसु॒विदो॒ भूरि॑ च्यवन्त॒ वस्त॑वे ।
उदी॑रय॒ प्रति॑ मा सू॒नृता॑ उष॒श्चोद॒ राधो॑ म॒घोना॑म् ॥ २ ॥
अश्व॑ऽवतीः । गोऽम॑तीः । वि॒श्व॒ऽसु॒विदः॑ । भूरि॑ । च्य॒व॒न्त॒ । वस्त॑वे ।
उत् । ई॒र॒य॒ । प्रति॑ । मा॒ । सू॒नृताः॑ । उ॒षः॒ । चोद॑ । राधः॑ । म॒घोना॑म् ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

२. [ अन्या उषासः ] अश्ववतीः ( =अश्ववत्यः=बह्वश्वोपेता ) गोमतीः ( =गोमत्यः=बहुभिर्गोभिर्युक्ता ) विश्वसुविदः ( =सकलसंपत्त्या लम्भयित्र्यः ) [ सत्यः ] भूरि ( = पुनःपुनः ) वस्तवे [ अ]च्यवन्त ( =तिमिरविवासाय प्राप्ताः=व्युष्टये आगताः =व्युच्छनं कृत्वा गताः ) । [तस्मात् त्वं] हे उषः, मा प्रति (=मां प्रति=मामुद्दिश्य=मया ) सूनृताः ( =प्रियहितवाचः=स्तोत्ररूपा हितवाचः ) उदीरय (=उच्चारय ), [ तथा ] मघोनां ( =यजमानानां=यजमानार्थं ) राधः ( =धनं ) चोद ( =चोदय=प्रेरय=यथा आगच्छेत्तथा कुरु ) ॥

अत्रेदमुक्तं भवति । हे उषः, इतः पूर्वं या अनेका उषासः उपासकेभ्यः अश्वान् गास्तथा सकलधनान्तराणि आनयन्त्यः सत्यः उच्छनं कृत्वा जग्मुः, तथा अद्य त्वमपि व्युच्छ, व्युच्छनं कृत्वा च मां प्रति प्रियहितस्तोत्ररूपा वाच उच्चारय । मां देवप्रियाणि स्तोत्राणि गातुं शिक्षयेति यावत् । तथा अस्माकं ये यजमानास्तेभ्यो धनं देहीति ॥

---

¹ उच्छ म्हणजे प्रकाशूं लागणें, उजळणें.

वृत्तसुखासाठीं हा मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें म्हणावा.

सह वामेन न उषो ।
वि उच्छा दुहितर्दिवः ।
सह द्युम्नेन बृहता विभावरि ।
राया देवि दआस्वती ।

२. अश्वांनीं समृद्ध, गाईंनीं समृद्ध [आणि] सकल संपत्ति प्राप्त करून देणाऱ्या [उषा] पुनः पुनः प्रकाशून गेल्या आहेत. [तर] हे उषे, तूंहि आज मजकडून सुंदर वाणींचा उच्चार करीव [आणि] यजमानांला धन दे.

2. [Other Ushases], rich in horses, rich in cows, [and] excellent procurers of all wealth, have oft-times dawned and passed away. Inspire [thou] Ushas, [now] into me sweet and true words [and] send wealth to the sacrificers.

---

२. भावार्थः—'हे उषे, आजपर्यंत ज्या अनेक उषा होऊन गेल्या त्या उपासकांसाठीं घोडे, गाई आणि दुसऱ्या प्रकारची सकल संपत्ति आणून प्रकाशल्या आणि गेल्या. तर तूंहि आज उगव आणि मधुर स्तोत्रें रचून गाण्याची प्रेरणा माझ्या आंगीं कर आणि तुला यज्ञ करणारे जे उपासक त्यांला तूं धनसंपत्ति दे;' म्हणजे, 'तूं आजपर्यंत जशी मोठ्या पहांटेस उगवून कवींस सुस्तोत्रें गाण्याची शक्ति प्रेरणेनें दिलीस आणि तुझें यजन करणाऱ्या उपासकांला घोडे गाई इत्यादि दिलेंस, तशीच तूं आज उगव आणि मज कवीला मधुर स्तोत्रें गाण्याची शक्ति दे आणि यजमानाला धन दे.'

'प्रकाशून गेल्या आहेत' = 'व्यवन्त वस्तवे.' अक्षरशः अर्थ, 'प्रकाशण्यासाठीं प्राप्त झाल्या' म्हणजे 'उगवल्या-उगवून गेल्या. 'वस्तवे' हें 'वस्' धातूपासून [illegible] अव्यय आहे. 'वस्' म्हणजे प्रकाशणें ('तिमिरविवासने'). याच धातूपासून 'विवस्वान्,' 'उषा,' 'उच्छति' इत्यादि शब्द निघाले आहेत.

'मजकडून सुंदर वाणींचा उच्चार करीव '= 'उत् ईरय प्रति मा सूनृताः'. अक्षरशः अर्थ 'मजसाठीं मधुर वाणींचा उच्चार कर,' म्हणजे, 'एकादा शिक्षक आपल्या शिष्याला गायन शिकविण्याकरितां शिकवावयाची वस्तु गातो त्याप्रमाणें मी शिकावें म्हणून तूं गा.' प्रभातकाळीं म्हणजे उषा उगवल्याबरोबर पक्ष्यांस वाचा फुटते, गायकांस गायनाची स्फूर्ति होते, आणि कविजनांस मधुर स्तोत्रें गाण्याची प्रेरणा होते, याविषयीं आमच्या देशांत प्रसिद्धि आहेच (ऋ. १. ११३.१२ याजवरील सायणभाष्य पाहा). ह्या गोष्टींच्या अज्ञानामुळें कितीएक पाश्चिमात्य विद्वान् 'सूनृता उदीरय' याचा सायणांनी केलेला प्रसिद्ध अर्थ सोडून विनाकारण 'सुंदर धनसंपत्ति दे' असा अर्थ कल्पितात.

'यजमानांला धन दे'= 'चोद राधो मघोनाम्'. याचा अर्थ, 'यजमानांला तूं धन देत असतेस तें मला दे' असा होतो [illegible].

उवासोषा उच्छाच्च नु देवी जीरा रथानाम् ।
ये अस्या आचरणेषु दध्रिरे समुद्रे न श्रवस्यवः ॥ ३ ॥

उवास । उषाः । उच्छात् । च । नु । देवी । जीरा । रथानाम् ।
ये । अस्याः । आऽचरणेषु । दध्रिरे । समुद्रे । न । श्रवस्यवः ॥ ३ ॥

उषो ये ते प्र यामेषु युञ्जते मनो दानाय सूरयः ।
अत्राह तत्कण्व एषां कण्वतमो नाम गृणाति नृणाम् ॥ ४ ॥

उषः । ये । ते । प्र । यामेषु । युञ्जते । मनः । दानाय । सूरयः ।
अत्र । अह । तत् । कण्वः । एषाम् । कण्वऽतमः । नाम । गृणाति ।
नृणाम् ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. उषाः [ पुरा ] उवास (=प्रभातं कृतवती ), [ सा ] रथानां जीरा ( =प्रेरयित्री) देवी नु च (=अद्यापि) उच्छात् (=प्रभातं करोतु) । ये [रथाः], [नावः] समुद्रे न (समुद्रे नाव इव), श्रवस्यवः ( =परस्परं पुरोगमनार्थम् ईर्षा कुर्वन्तः) अस्या आचरणेषु ( =उषसः संचारप्रदेशेषु ) दध्रिरे (=धृता भवन्ति=आसते वर्तन्ते ) ॥

४. हे उषः, ये [ नरः ] सूरयः [ कण्वाः ] ते यामेषु (=तव आगमनेषु) [ सत्सु] दानाय ( =हविर्दानाय ) मनः प्रयुञ्जते (= स्वकीयं मनः प्रेरयन्ति ), एषां नृणां (=तेषां शूराणां ) [कण्वानां ] कण्वतमः कण्वः (=कण्वानां गुणैः अतिशयेन विशिष्टः कण्वपुत्रः ) [ प्रस्कण्वः ] अत्राह (=तस्मिन्नेव तवागमनकाल एव) तत् नाम (=कण्वा यत् नाम स्तोत्रं गृणन्ति तदेव स्तोत्रं) गृणाति ( =गायति ) ॥

अत्रेदमुक्तं भवति । हे उषः, शौर्यसंपन्ना विद्वांसः कण्वाः तवागमनकाले तुभ्यं हविर्दातुं निश्चयं कृतवन्तः यत् तव स्तोत्रं कुर्वन्ति तदेव (=तादृशमेव) स्तोत्रं कण्वानां मध्य उत्तमः कण्वः प्रस्कण्वोहं तस्मिन्नेव तवागमनकाल उच्चारयामीति ।

---

वृत्तसुखार्थ हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटला पाहिजे.

अश्वावतीर्गोमतीर्विश्वसुविदो । ०

भूरि च्यवन्त वस्तवे ।
उदीरय प्रति मा सूनृता उषः ।
चोद राधो मघोनाम् ।

३. उषा [देवी] [आजपर्यंत] प्रकाशली आहे, आणि ती रथ हाकणारी देवी आतांहि प्रकाशो: जे [रथ] तिच्या मार्गप्रदेशांत, समुद्रांतील [तारवां] प्रमाणें, पुढें पुढें जाण्याविषयीं एकमेकाची ईर्ष्या करीत असतात.

3. Ushas has shone [before]; may the goddess shine also now, the propeller of cars which lie in her regions vying with each other, as [ships] on the sea.

४. हे उषे, तुझ्या येण्याच्या वेळीं शूर [आणि] विद्वान् [कण्व]-[जन] [तुला] [हवि] देण्याविषयीं निश्चय करितात [आणि जें स्तोत्र गातात] तें [च] स्तोत्र त्या [सर्व] कण्वांत उत्तम कण्व त्याच वेळीं [आज] गात आहे.

4, That same praise, which, O Ushas, the learned [and] brave [Kanvas] [sing when] at thy approach [they] make up their mind to offer [an oblation to thee], is [this] Kanva, the best of the Kanvas, singing now at that same hour.

---

३. भावार्थः— 'उषा' आजपर्यंत नित्य उगवून प्रभात करून गेली आहे, तशीच ती आज सुद्धा उगवो. ही 'उषा' उगवली म्हणजे इचे सहचारी जे अश्वी, सविता, मित्र, अर्यमा इत्यादि देव तेहि येतील; कारण कीं, 'उषा' देवी ज्या आकाशप्रदेशांतून येते त्यांत तिच्या येण्याचे वेळीं त्या त्या देवांचे अनेक रथ मी पुढें जाईन मी पुढें जाईन अशी स्पर्धा करित करित राहिलेले असतात, त्यांस आपण येते वेळीं ती बरोबर घेऊन येत असते.'

'प्रकाशो'='उच्छात्'. हें लेट्चें रूप असल्यामुळें, आम्हीं केलेला अर्थ होतो म्हणून सांगावयास नकोच.

'पुढें पुढें जाण्याविषयीं एकमेकांची ईर्ष्या करणारे'='श्रवस्यवः'. 'श्रवस्यु' शब्दाचा मूळ अर्थ 'अन्नाची उत्सुकता ज्यास आहे तो'. त्यावरून 'एकमेकांचें धन हरण करण्याविषयीं लढणारा,' आणि या अर्थापासून 'झटणारा,' 'ईर्ष्या करणारा' असा अर्थ होतो. ऋ. १. ८५. ८ पहा.

वृत्तसुलासाठीं हा मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें म्हटला पाहिजे.

उवास उषा उच्छाँच नु ।
देवी जीरा रथानाम् ।
ये अस्या आचरणेषु दधिरिरे ।
समुद्रे न श्रवस्यवः ।

४. भावार्थः—'हे उषे, तुझ्या उगवण्या-

आ घा योषेव सूनर्युषा याति प्रभुञ्जती ।
जरयन्ती वृजनं पद्वदीयत उत्पातयति पक्षिणः ॥ ५ ॥ ३ ॥

आ । घ । योषांऽइव । सूनरी । उषाः । याति । प्रऽभुञ्जती ।
जरयन्ती । वृजनम् । पत्ऽवत् । ईयते । उत् । पातयति ।
पक्षिणः ॥ ५ ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

५. प्रभुञ्जती (=भोगान् प्रकर्षेण भुञ्जती) सूनरी (=सुन्दरा=मनोहारिणी) योषेव (=युवतीव) उषा आयाति च (=आगच्छति खलु)। [या उषाः] वृजनं जरयन्ती (=लोकं जरां प्रापयन्ती=पुनःपुनरावर्तनेन लोकानां वयोहानिं कुर्वन्ती) [अस्ति], [या] पद्वत् (=पादयुक्तं प्राणिजातम्) ईयते (=गमयति=स्वस्वकार्ये प्रवर्तयति) [अपि च] पक्षिणः उत्पातयति (=समुत्थाप्य भक्ष्येषणार्थं व्रजयति)॥

---

चा वेळ येतांच कण्वकुलोत्पन्न लोक तुला हवि देण्याचा निश्चय करून तुझें स्तोत्र गातात. त्याप्रमाणें सकल कण्वांत भक्तीनें आणि सद्भावानें उत्तम कण्व जो मी प्रस्कण्व तो आज त्याच वेळीं (म्हणजे तुझ्या उदयकाळीं) तसलेंच सुंदर स्तोत्र गात आहें.'

हा भावार्थ जरी उघड आहे तरी मंत्राची शब्दरचना किंचित् कठिण आहे. कांठिन्य इतकेंच कीं 'ये' हें संबंधी सर्वनाम कवीच्या मनांत 'यत्' (=नाम=स्तोत्रम्) असें म्हणावयाचें असतां 'ये' असें पद घालून त्याचा संबंध 'सूरयः' या शब्दाकडे घेतला. मंत्रवक्त्याच्या मनांत असें म्हणावयाचें होतें कीं, 'हे उषः ते यामेषु ये सूरयो नरः कण्वाः दानाय मनः प्रयुज्य यत् नाम (=स्तोत्रं) गृणन्ति तदेव नाम (=स्तोत्रं) तस्मिन्नेव तवोदयकाले तेषां सूरीणां नरां कण्वानां मध्ये कण्वतमः कण्वः प्रस्कण्वोहं गृणामि' = 'हे उषे, तुझ्या उदयकालीं जे विद्वान् आणि शूर कण्वकुलोत्पन्न पुरुष तुला हवि देण्याचा निश्चय करून जें स्तोत्र म्हणतात तेंच म्हणजे तसेंच स्तोत्र त्याच तुझ्या उदयकालीं त्या विद्वान् आणि शूर कण्वजनांमध्यें उत्तम असा जो तो मी प्रस्कण्व गात आहें'. ज्या संबंधि सर्वनामाचा संबंध वस्तुतः कर्म शब्दाकडेस लावावा त्याचा संबंध कर्तृपदाकडेस या मंत्रांत जसा लाविला आहे तसा लाविल्याचीं प्रयोगान्तरें वेदांत पुष्कळ मिळतील.

'हवि देण्याविषयीं' = 'दानाय'. 'दान' म्हणजे देव जी देणगी मनुष्यांस देतात तीच होय असें नाहीं. मनुष्यें देवांस जें हवि अर्पण करितात तेंहि

५. [ही पहा] विशेष भोग भोगणाऱ्या सुंदर तरुण स्त्रीसारिखी उषा इकडे येत आहे; [जी उषा] [उगवतांच] लोकांस वृद्ध करिते, जंगमास चालविते [आणि] पक्ष्यांस उडविते.

5. Here comes Ushas like a beautiful young damsel [who is] full of enjoyments: [Ushas] who makes the people old, [who] sets in motion those that have feet [and] makes to fly those that have wings.

---

'दान' होय. याविषयीं ऋ. ८. ४६. २६ याजवरील सायणभाष्य पाहा.

'तेंच स्तोत्र' = 'तत् नाम.' 'नाम' शब्दाचा अर्थ स्तोत्र असा होतो याविषयीं ऋ. ७. २२. ५ व १०. ८४. ५ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पाहा.

वृत्तसुखासाठीं प्रथम चरणांत 'ये' हें ऱ्हस्व, 'प्र' हें दीर्घ आणि 'यामेषु' हें पद 'यअमेषु' असें म्हटलें पाहिजे. आणि तिसऱ्या चरणांत 'एषां' हें पद 'ऍषां' आणि 'कण्वतमः' हें 'कॅण्वतमः' आणि चवथ्या चरणांत 'नृणां' हें पद 'नृणआम्' असें म्हटलें पाहिजे.

---

५. 'एकादी सुंदर तरुण कामिनी स्त्री जशी येते तशी ही पहा उषा पूर्वेकडून येत आहे. ही जरी स्वतः तरुण आहे तरी लोकांस ती वृद्ध करिते. ती उगवतांच द्विपाद, चतुष्पाद इत्यादि प्राण्यांस चालविते, म्हणजे त्यांस आपआपल्या कामीं लाविते आणि पक्ष्यांस उठवून चरावयास पाठवून देते,' असें तात्पर्य.

'विशेष भोग भोगणाऱ्या' = 'प्रभुञ्जती'. सायणाचार्य 'पालन करणारी' असा अर्थ करून उषेकडेस संबंध लावितात. परंतु 'भुज्' धातूचा 'भोगणें' हा अर्थ तर वेदांत व साधारण संस्कृतांतहि प्रसिद्धच आहे. आणि येथें दिलेल्या उपमेस तो अर्थ विशेष इष्ट दिसतो.

'वृद्ध करिते' = 'जरयन्ती'. म्हणजे दरदिवस उगवून लोकांस म्हातारे करिते. तरुण 'उषा' दरदिवस उगवून लोकांस म्हातारे करिते असें वेदांत उषेविषयीं पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे.

'जंगमास चालविते' = 'पद्वत् ईयते'. अक्षरशः अर्थ 'पाय असलेल्या प्राण्यांस चालविते'. 'ईयते' याचा साधारण अर्थ जातो (गच्छति) असा होतो, पण येथें 'अन्तर्भावितण्यर्थ' धातु समजून अर्थ करावा. तो 'जरयन्ती' आणि 'उत्पातयति' यांच्या साहचर्यामुळें अवश्य दिसतो.

वृत्तनियमांमुळें पहिला आणि दुसरा पाद नीट वाचतां यावा म्हणून 'सूनर्युषा' असें न म्हणतां 'सूनरी उषा' असें व्यस्त म्हटलें पाहिजे, आणि तिसऱ्या पादांत 'जरॅयन्ती वृजनं' असें म्हणावें लागतें.

वि या सृजति समनं व्यर्थिनः पदं न वेत्योदती ।
वयो नकिष्टे पप्तिवांस आसते व्युष्टौ वाजिनीवति ॥ ६ ॥

वि । या । सृजति । समनम् । वि । अर्थिनः । पदम् । न । वेति । ओदती ।
वयः । नकिः । ते । पप्तिऽवांसः । आसते । विऽउष्टौ । वाजिनीऽवति ॥ ६ ॥

एषायुक्त परावतः सूर्यस्योदयनादधि ।
शतं रथेभिः सुभगोषा इयं वि यात्यभि मानुषान् ॥ ७ ॥

एषा । अयुक्त । पराऽवतः । सूर्यस्य । उत्ऽअयनात् । अधि ।
शतम् । रथेभिः । सुऽभगा । उषाः । इयम् । वि । याति । अभि । मानुषान् ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

६. या ओदती (=उषा) समनं विसृजति (=संग्रामं=ग्रामं विविधं प्रेरयति=ग्रामस्थान् जनान् स्वस्वकर्मणि विविधं प्रवर्तयति) [या च] अर्थिनो वि[सृजति] (=भक्ष्यार्थिनः प्राणिनः पशुपक्ष्यादीन् भक्ष्येषणार्थं गोष्ठनीडादिभ्यो विविधं प्रेषयति) [सा] पदं न वेति (=स्थानं न कामयते=एकस्मिन्नेव स्थले चिरं न तिष्ठति)। हे वाजिनीवति (=अन्नादिसंपदां दात्रि उषः), ते व्युष्टौ (=तव व्युच्छने=प्रकाशवति तवोदये जाते सति) पप्तिवांसः (=पतनयुक्ता) वयः (=पक्षिणः) नकिः आसते (=केपि न तिष्ठन्ति=सर्वेपि स्वस्वनीडाद्विनिर्गत्य गच्छन्ति)॥

७. [पश्य पश्य] एषा [उषा] परावतः (=दूरदेशे) सूर्यस्य उदयनाद् अधि (=सूर्यस्य उदयस्थानस्योपरि=सूर्योदयस्थलसमीपे) अयुक्त (=शतं रथान् योजितवती)। इयं सुभगा उषा (=मनोहारिणी उषा देवी) शतं रथेभिः (=शतसंख्याकै रथैः=शतं रथान् आरुह्य) अभि मानुषान् (=विविधान् मानुषान् विविधान् लोकान् प्रति) वि याति (=विविधं यथा तथा समकालमेव गच्छति)॥

६. जी उषा मनुष्यांस [गांवांतून ] इकडे तिकडे पाठविते, [आणि] [जी] [भक्ष्य] शोधणाऱ्या [प्राण्यांस ] [आश्रयस्थानापासून] इकडे तिकडे [ पाठविते ] तिला बैठक आवडत नाहीं. – हे उदार उषे, तुझा प्रकाश येतांच कोणतेहिं उडणारे पक्षी बसून राहात नाहींत.

७. ही [पाहा] [उषा] दूर अंतरावर सूर्योदयाच्या ठिकाणीं [आपले रथ] जोडीत आहे; ही सुंदर उषा शंभर रथांत बसून वेगवेगळ्या ठिकाणीं मनुष्यांप्रत जात आहे.

6. The refreshing [Ushas] who sends in different directions people from their village [and] [sends] in different directions the [food]-questant tribes [from their nightly habitations, loves not rest.—No birds that fly [still] perch when, O liberal [goddess], thou dawnest forth.

7. Lo! she has harnessed [her chariots] far off near the rising place of the sun; in one hundred chariots this fair Ushas is going towards [different] men in different directions.

---

६. 'उषा उगवतांच गांव, नगरें वगैरे जीं मनुष्यांचीं निवासस्थानें त्यांतील मनुष्यांस जागृत करून कितीएकांस एका दिशेस, कितीएकांस दुसऱ्या दिशेस, कितीएकांस तिसऱ्या दिशस याप्रमाणें आपआपल्या कामाला पाठवून देते; आणि त्याप्रमाणेंच रात्रीच्या वेळीं गाव्यांत, घरव्यांत वगैरे विश्रांति घेण्यास्तव बसलेले, आणि पाहांट होतांच चरावयास जाणारे असे जे पशुपक्ष्यादिक प्राणी त्यांस जागृत करून चरावयास पाठवून देते. आणि इतकें करण्यास्तव उषा उगवल्यानंतर फार वेळ राहते असेंहि नाहीं, तर ती लागलीच निघून जाते; कारण कीं, तिला एका ठिकाणीं बसून राहणें हें आवडत नाहीं. हे उषे, तुझा उजेड दिसूं लागल्यावर कोणताहि पक्षी घरव्यांत बसून राहिलेला सांपडणार नाहीं, सर्व जिकडे तिकडे उडून जातात.' असा या मंत्राचा भावार्थ आहे.

'मनुष्यांस गांवांतून इकडे तिकडे पाठविते' = 'समनं विसृजति.' अक्षरशः अर्थ, 'गांव इकडे तिकडे पाठविते' म्हणजे गांवांतील लोकांस वेगळ्या वेगळ्या दिशांनीं पाठविते. 'समन' शब्दाचा 'संग्राम' म्हणजे जेथें मनुष्यें एकत्र जमतात तो ('गांव,' 'यज्ञास जमलेला समूह,' अथवा 'युद्ध') असा जो अर्थ तो वेदांत प्रसिद्ध आहे. ऋ. १०. ८६. १०; ७. २. ५; १०. १४३. ४ हे मंत्र पहा. बहुतेक मंत्रांत 'समन' म्हणजे संग्राम-युद्धांत एकमेकांबरोबर लढणारा जनसमूह अथवा युद्धच असा अर्थ होतो खरा, तथापि त्याचा मूळ अर्थ 'जनसमूह' असा असलेला आम्हीं येथें घेतला आहे.

'[ भक्ष्य ] शोधणाऱ्या प्राण्यांस '=

**विश्वमस्या नानाम चक्षसे जगज्ज्योतिष्कृणोति सूनरी।**
**अप द्वेषो मघोनी दुहिता दिव उषा उच्छदप स्रिधः ॥ ८ ॥**

विश्वम् । अस्याः । ननाम । चक्षसे । जगत् । ज्योतिः । कृणोति । सूनरी ।
अप । द्वेषः । मघोनी । दुहिता । दिवः । उषाः । उच्छत् । अप । स्रिधः ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. अस्या (=उषसः) चक्षसे (=प्रकाशाय) विश्वं जगत् (=सकलमपि प्राणिजातं) ननाम (=नमस्करोति) [यस्मात्] [सा] सूनरी (=मनोहारिणी देवी) ज्योतिः करोति (=तेजः करोति=तेज आविष्करोति=सर्वाणि वस्तूनि प्रकाशयति)। दिवो दुहिता (=द्युलोकरूपस्य देवस्य कन्यका) मघोनी (=धनवती) उषाः द्वेषो (=द्वेष्टॄन्=प्रकाशावरोधकान् वृत्रादीन् शत्रून्) अप उच्छत् (=उच्छित्वा अपनोदयति=व्युच्छनेन नाशयति) [तथा] स्रिधः (=शोषकान्=उपद्रवकारिणः अनार्यान् धर्मरहितान् शत्रून्) अप [उच्छत्] (=व्युच्छनेन निवारयति)॥

'अर्थिनः'. ऋ. १०. १२७. ५ पहा. त्यांत पक्ष्यांस 'अर्थिनः' हें विशेषण दिलें आहे. त्याचा अर्थ येथें दिलेलाच आहे यांत संशय नाहीं.

वृत्तसुलासाठीं हा मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें वाचावाः—

वि या सृजति समनं वि अर्थिनः।
पदं न वेति ओदती।
वयो न किष्टे पप्तिवांसो आसते।
विउष्टौ वाजिनीवति ॥

७. भावार्थः—सूक्तकर्ता उषेच्या उदयकाळीं पूर्वेकडेस पाहून म्हणतो, 'ही पाहा, उषा आम्हांकडेस व आम्हांसारिख्या दुसऱ्या लोकांकडेस जाण्याकरितां आपल्या रथास घोडे जोडीत आहे. ही सुंदर उषा, केवळ आम्हांकडेसच येत असते असें नाहीं, तर शेकडो रथांत बसून वेगळ्या वेगळ्या सर्व लोकांकडेस जात असते.'

'सूर्योदयाच्या ठिकाणीं'='सूर्यस्योदयनाद् अधि.' म्हणजे जेथें सूर्याचा उदय होतो त्या दूर स्थळीं. आम्हीं जो येथें 'उदयाद् अधि' याचा सप्तमीसारिखा अर्थ केला आहे त्याला आधार ऋ. ९. ५७. ४ याजवरील आणि १०. ४८. २ याजवरील सायणभाष्याचा आहे. 'अधि' हें कर्मप्रवचनीय येथें सप्तमीद्योतक आहे. कितीएक विद्वान्, 'उदयनाद् अधि' याचा अर्थ 'उदयस्थानापासून' असा पंचमी धरून करितात

८. हिचें दर्शन होतांच हिला सकल जग नमस्कार करितें, [कारण कीं] [ही] सुंदरी प्रकाश पाडीत असते : [ही] द्यूची उदार कन्यका उषा उगवून द्वेष्ट्यांस हाकून लावीत असते [आणि] हिंसक शत्रूंस हाकून लावीत असते.

8. All creation bows to her manifestation, [as] the fair one brings light. The rich daughter of Heaven dawns away the haters, Ushas [dawns] away the godless enemies.

---

आणि हा अर्थ ऋ. १०. १. २ याजवरील सायणभाष्यावरून सिद्ध होतो खरा, तथापि प्रस्तुत मंत्रांत तो इष्ट दिसत नाहीं; कारण कीं येथें अपादानाची अपेक्षा नसतां अधिकरणाची अपेक्षा आहे.

'शंभर रथांत बसून' = 'शतं रथेभिः.' अक्षरशः अर्थ 'शंभर रथांनीं.' शंभर म्हणजे येथें 'पुष्कळ' असा अर्थ घेतला पाहिजे. एकाच काळीं अनेक लोकांस उषोदर्शन होतें त्यापेक्षां अनेक रथांत बसून एकाच वेळीं ती अनेक मनुष्यांकडेस जात असेल अशी ऋषीची कल्पना.

वृत्तसुखासाठीं उत्तरार्ध खालीं लिहिल्याप्रमाणें वाचावा लागतोः—

शतं रथेभिः सुभगा उषा इयं ।
वियाति अभिमानुषान् ।

---

८. 'सुंदर उषा देवी दिसूं लागल्याबरोबर सकल जग तिला नमस्कार करितें, कारण कीं ती येतांच आपल्या बरोबर प्रकाश आणिते आणि ही द्यूची कन्यका आपल्या प्रकाशानें सर्व प्रकारच्या शत्रूंस हाकून लाविते' असें तात्पर्य.

'हिचें दर्शन होतांच हिला सकल जग नमस्कार करितें' = 'विश्वं जगत् अस्या चक्षसे ननाम.' अक्षरशः अर्थ, 'हिच्या दिसण्याला सकल जग नमस्कार करितें.' 'ननाम' हा पूर्णवर्तमान काळ, रीतिवर्तमानाऐवजीं योजिलेला आहे.

'द्यूची उदार कन्यका' = 'दिवो दुहिता मघोनी'. याच सूक्ताच्या पहिल्या मंत्रावरील टीप पाहा. उषा ही द्युमध्यें म्हणजे द्युलोकाच्या मोठ्या पोकळीमध्यें जन्मते म्हणजे उगवते, म्हणून तिला 'द्यूची कन्यका' हें जसें नांव पडलें आहे, त्याप्रमाणेंच सूर्याचेंहि जन्म दररोज दिवस तेथेंच होतें म्हणून त्याला 'द्यूचा पुत्र' असें वेदांत म्हटलें आहे ("दूरे दृशे देवजाताय केतवे दिवः पुत्राय सूर्याय शंसत"=दुरून पाहणारा आणि देवांपासून जन्मलेला प्रकाश हाच जो द्यूचा पुत्र सूर्य त्याला स्तोत्र गा. ऋ. १०. ३७.

उष आ भाहि भानुना चन्द्रेण दुहितर्दिवः ।
आवहन्ती भूर्यस्मभ्यं सौभगं व्युच्छन्ती दिविष्टिषु ॥ ९ ॥

उषः । आ । भाहि । भानुना । चन्द्रेण । दुहितः । दिवः ।
आऽवहन्ती । भूरि । अस्मभ्यम् । सौभगम् । विऽउच्छन्ती । दिविष्टिषु ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. हे उषः, हे दिवो दुहितः (=द्युलोकरूपस्य देवस्य पुत्रि), अस्मभ्यं भूरि (=प्रभूतं) सौभगं (=सौभाग्यम्) आवहन्ती (=आनयन्ती) [सती] [तथा] दिविष्टिषु (=दिवः स्वर्गस्यैषणद्योतकेषु यज्ञेषु=यज्ञसमयेषु=प्रातःकालेषु) व्युच्छन्ती (=व्युच्छनेन तमो वर्जयन्ती) [सती] [त्वम्] आ[गत्य] चन्द्रेण भानुना (=आह्लादकेन प्रकाशेन) भाहि (=प्रकाशस्व=शोभस्व) ॥

१). याच सूक्ताच्या पहिल्या मंत्रावरील टीप पहा.

'उगवून द्वेष्ट्यांस हाकून लावीत असते' = 'द्वेषः अप उच्छत्.' याचा अक्षरशः अर्थ मराठींत करणें फारच कठीण आहे. आम्हीं होईल तितका मूळाजवळ जंवळ केला आहे. या मंत्रांत सांगितलेले 'द्वेष्टे' आणि 'हिंसक शत्रु' म्हणजे प्रकाशाला अडवून धरणारे जे वृत्रादिक निशाचर (=तमोरूप रूपकसिद्ध देवशत्रु) ते आणि आर्य लोकांस रात्रीं त्रास देणारे जे कोळी, गोंड, भिल्ल इत्यादि अनार्य लोक तेच समजावयाचे. प्रकाशाला अवरोधून टाकणारे जे तिमिररूपी शत्रु अथवा निशाचर म्हणून रूपकानें मानिलेले त्याविषयीं सू. ३३, मं. १० याजवरील टीप पहा.

वृत्तानुरोधानें खालीं लिहिल्याप्रमाणें मंत्र म्हणावाः—

विश्वॅमॅस्या नानॉम चक्षसे जगत् ।
ज्योतिष्कृणोति सूनरी ।
अप द्वेषो मघोनी दुहिता दिवः ।
उषा उच्छदप स्रिधः ।

९. हे उषे, हे द्युचे कन्यके, [तूं] येऊन आल्हादकारक प्रकाशानें शोभ, आणि आम्हांला विपुल सौभाग्य वाहून आण [आणि] देवयजनकाळीं प्रकाशत जा.

9. [Come] hither, Ushas, daughter of Heaven, and shine with delightful brightness, bringing unto us plenteous prosperity, and dawning at the hours of sacrifices.

९. ह्या मंत्रांत उषेला अशी प्रार्थना आहे कीं, 'तिणें दरदिवस यज्ञसमयीं म्हणजे मोठ्या पहांटेस उगवावें आणि आपल्या सुंदर प्रकाशानें शोभावें आणि येतांना उपासकांसाठीं विपुलसंपत्तियुक्त उत्कर्ष आणावा.'

'देवयजनकाळीं' = 'दिविष्टिषु.' अक्षरशः अर्थ, 'स्वर्गाच्या इच्छेनें केलेले जे यज्ञ त्यांत, म्हणजे ते करण्याच्या वेळीं.' म्हणजे 'दरदिवस पहांटेस;' कारण आपले आर्य पूर्वज मोठ्या पहांटेस उठून दररोज देवांप्रीत्यर्थ यज्ञ करीत असत. आमच्या मनांत यज्ञ करावा असें वाटेल तेव्हां तूं प्रकाश, नाहीं तर नको असा भावार्थ नाहीं, परंतु आम्हीं दररोज उठून पहांटेस यज्ञ करीत जावें म्हणून तूं त्या वेळेस उगवत जा, असा भावार्थ आहे. या मंत्रावरून दोन गोष्टी सिद्ध होतात. १ली, आपले आर्य पूर्वज जे यज्ञ करीत ते केवळ ऐहिक सुखांसाठींच करीत असें नाहीं, तर स्वर्गप्राप्ति व्हावी या हेतूनेंहि करीत असत (ऋ. १. १३९. ४; ३. ४६. १; आणि ४. ४७. १ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा); आणि २री ही कीं, ते यज्ञ म्हणजे आठ च्यार दिवस, महिने महिने अथवा वर्षानवर्षेपर्यंत न संपणारे असे अजस्र यज्ञ नव्हते, तर यज्ञ म्हणजे दरदिवस प्रभातकाळीं उठून (अथवा दुसऱ्या कोणत्याहि काळीं) जें देवभजन, जी देवोपासना, जें देवस्तुतिगायन करणें त्यालाच ते यज्ञ म्हणत असत.

'वाहून आण,' अर्थात् 'आपल्या रथांत भरून' असें तात्पर्य देव आपल्या रथांत भरून उपासकांकरितां संपत्ति आणितात असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे.

या मंत्रांतील पहिला, दुसरा आणि चौथा (ह्या शेवटल्यांत 'विउच्छन्ती' असें वाचलें असतां) हे तीन चरण सरळ लागतात. तिसरा मात्र खडबडीत दिसतो, तो

आवहन्ती भूरि अस्मभ्यं सौभगं

असा म्हटला तर मग वृत्ताची अडचण राहत नाहीं. ह्या ऋचांचें वृत्त लक्ष्य लावून तपासून पाहिलें तर असें दिसून येईल कीं प्रत्येक अर्धातील जो शेवटचा चरण असतो तो बहुतकरून सरळ असतो, पण प्रथमचा भाग खडबडीत लागतो. अशा प्रकारचीं वृत्तें (म्हणजे ज्यांच्या ओळींतील आरंभींचे भाग खडबडीत असून शेवटचे सरळ वाचतां येतात अशीं) मराठींत म्हटलीं म्हणजे 'पोवाडे' आणि त्यांचे भाऊबंद जे लावण्या अथवा पदें इत्यादिक लौकिक वृत्तांचे प्रकार ते होत, त्यांत असाच प्रकार दृष्टीस पडतो.

विश्वस्य हि प्राणनं जीवनं त्वे वि यदुच्छसि सूनरि ।
सा नो रथेन बृहता विभावरि श्रुधि चित्रामघे हवम् ॥१०॥४॥

विश्वस्य । हि । प्राणनम् । जीवनम् । त्वे इति । वि । यत् । उच्छसि ।
सूनरि ।
सा । नः । रथेन । बृहता । विभाऽवरि । श्रुधि । चित्रऽमघे ।
हवम् ॥ १० ॥ ४ ॥

उषो वाजं हि वंस्व यश्चित्रो मानुषे जने ।
तेना वह सुकृतो अध्वराँ उप ये त्वा गृणन्ति वह्नयः ॥११॥

उषः । वाजम् । हि । वंस्व । यः । चित्रः । मानुषे । जने ।
तेन । आ । वह । सुऽकृतः । अध्वरान् । उप । ये । त्वा । गृणन्ति ।
वह्नयः ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

१०. हि (=यस्मात् कारणात्) हे सूनरि (=मनोहारिणि) [उषः], यद् (=यदपेक्षया) [त्वं] व्युच्छसि (=व्युच्छनेन तमो वर्जयसि=प्रतिदिनं प्रातः प्रकाशसे) [ततः] त्वे (=त्वय्येव) विश्वस्य (=सकलस्य प्राणिजातस्य) प्राणनं जीवनं [च] (=चेष्टनं प्राणधारणं च) [वर्तते] । सा [त्वम्] (=अतः कारणात् त्वं), हे विभावरि (=विशिष्टप्रकाशयुक्ते) चित्रामघे (=चायनीयधनयुक्ते=उत्तमधनोपेते) [उषः], बृहता रथेन (=तव विस्तीर्णे रथमधिष्ठाय) [आगत्य] नः (=अस्माकं) हवम् (=आह्वानम्=आह्वानयुक्तं त्वद्विषयकं स्तोत्रं) श्रुधि (=शृणु) ॥

११. हे उषः, ये वह्नयो (=यज्ञनिर्वाहका यजमानाः) त्वा (=त्वां) गृणन्ति (=स्तुवन्ति) [तेभ्यो] मानुषे जने (=सर्वेषु मनुष्यजनेषु) यो [वाजः=अन्नादिसंपद्] चित्रः (=चायनीयः=उत्तमो) [वर्तते] [तं] वाजं वंस्व हि (=देहि तावत्), तेन [च] (=अन्नादिसंपदो दानेन करणेन) [तेषां यजमानानाम्] अध्वरान् उप (=यज्ञान् प्रति) सुकृतः (=सुकर्मणो=देवान्) आवह (=आपय) ॥

अत्रेदमुक्तं भवति । देवेषु जनेषु यद्धनमुत्तममिति कथ्यते तत्तु अस्मादृग्भिर्मर्त्यैरलभ्यमेव । यत्पुनर्मनुष्यजनेषूत्तममिति गण्यते तत् त्वां स्तुवद्भ्यः अस्मादृग्भ्यस्त्वं देहि । तद् ददासि चेत् तेन समृद्धा वयं यान् यज्ञान् करिष्यामस्तान् प्रति सुकर्माणो देवा हविर्ग्रहणार्थम् अवश्यमेव आगमिष्यन्तीति ॥

१०. कारण कीं, हे सुंदरी, तूं जी प्रकाशतेस, त्या तुझ्याच ठायीं सकलांचे प्राण [आणि सकलांचें] जीवन [अवलंबून असतें]. तर हे प्रभावती, हे उत्तमधनवती [उषे], तूं विशाळ रथांत [बसून ये आणि] आमची हाक ऐक.

10. For in thee [lies], when [thou] dawnest forth, O fair [Ushas], the breath [and] the life of all. Do thou, therefore, bright [goddess] possessed of choice wealth, [come] in thy great car [and] hear our call.

११. हे उषे, मनुष्यलोकांत जी धनधान्यसंपत्ति उत्तम [होय] [ती] तूं तुझी स्तुति जे यजमान करितात त्यांस दे [आणि] तेणेंकरून त्यांच्या यज्ञांप्रत कल्याणकारी [देवां]ला घेऊन ये.

11. Give unto [those] sacrificers that glorify thee, O Ushas, the affluence that [is] the best among mankind, [and] thereby bring [thou] the beneficent [gods] to their sacrifices.

---

१०. भावार्थः—तूं दरदिवस प्रकाशत जा असें पूर्व मंत्रांत सांगितलें, त्याचें कारण या मंत्रांत सांगतो. तें असें कीं, 'हे उषे, तूं जर प्रकाशली नाहींस तर कोणी जगणार नाहीं, कोणाचें काम चालणार नाहीं; कारण तूं जेव्हां उगवतेस तेव्हांच रात्रीच्या वेळीं मृतवत् पडून राहिलेले सकळ प्राणी जागृत होतात आणि जणुं पुनर्जीवित होतात. यास्तव हे प्रकाशवती उषे, तूं आज आपल्या मोठ्या रथांत बसून ये, आणि आम्ही जी तुला हाक मारीत आहों आणि तुझें स्तोत्र करीत आहों तें ऐक.'

वृत्तसुखार्थ 'प्राणनें' असें प्रथम पादांत, आणि 'रथेन' असें तिसऱ्या पादांत म्हणावें. बाकी सर्व मंत्र सरळ आहे.

११. 'हे उषे, देवलोकीं जी धनधान्यसंपत्ति उत्तम अशी मानितात ती तर आम्हांस अलभ्यच आहे. परंतु आम्हांसारिखे जे मर्त्य उपासक तुझी स्तुति गातात त्यांस मनुष्यलोकीं उत्तम मानिलेली संपत्ति दे. आणि ती तूं दिलीस म्हणजे आम्ही जे यज्ञ करूं त्यांजप्रत देव आल्याविना राहणार नाहींत' असा भावार्थ.

'दे'='वंस्व.' ऋ. ८. २३. २७; ८. ६०. १४ आणि ७. १७. ५ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा. सू. ३६, मं. १७ याजवर 'देता झाला' याविषयींची टीप पहा.

'कल्याणकारी [देवांला]'='सुकृतः.' 'आवह सुकृतः अध्वरान् उप' या स-

ब्दांचा सायणाचार्य अर्थ करितात तो असाः– "चांगलें करणाऱ्या यजमा- "नांला विघ्नरहित यज्ञांप्रत पोंहचीव," म्हणजे त्यांजकडून विघ्नरहित यज्ञ करीव. परंतु 'आवह' याचा अर्थ 'आण' असा होतो, आणि 'यज्ञांप्रत पुण्यवान् यजमानांस आण' म्हणजे त्यांचे यज्ञ सिद्धीस पोंहचीव असा अर्थ ओढाताणी-शिवाय होत नाहीं. आणि 'यज्ञांप्रत आण' असें जेथें जेथें आहे, तेथें कर्मपद नित्य 'देव' हें (अथवा यासारिखेंच त्या अर्थाचें एकादें) असतें. आतां इत-की गोष्ट खरी आहे कीं 'सुकृत्' हें विशे-षण नामसाहचर्याशिवाय देव या अर्थी दुसऱ्या ठिकाणीं योजिलेलें आढळत नाहीं. तथापि तें विशेषण 'त्वष्टा' देवास (ऋ. ३. ५४. १२) 'देवजन' यांस म्हणजे सर्व देवांस ("सुकृतं दैव्यं जनम्" ऋ. १०. ६३..९), 'ऋभु' या देवांस (ऋ. ३. ६०. ३) आणि 'अग्नी'स (ऋ. १. ३१. ४) आणि 'विष्णू'स (ऋ. १. १५६. ५) लाविलेलें आढळतें. आणि प्रस्तुत मंत्रांत 'देवांस' अथवा 'देवज-नास' हा अर्थ इष्ट आहे. शिवाय पुढच्या मंत्रावरूनहि 'देवांला आण' हाच वि-चारतरंग कवीच्या मनांत घोळत होता असें दिसतें. यास्तव आम्हीं तसें समजून अर्थ केला आहे. देवांस 'सुकृत्' म्ह-णजे 'बरें करणारे' असें जें वेदांत म्ह-टलें आहे, त्यावरून असें उघड होतें कीं देव म्हणजे महाबळी आपल्या बळानें म-त्यांचें वाईट करणारे, अथवा पटकीनें व-गैरे मारून टाकणारे, अथवा मनुष्यांच्या स्त्रियांविषयीं लंपट, किंवा सत्त्व पाहण्या-करितां उपासकाच्या मुलांचेंच मांस खाव-यास घालविणारे कोणी आहेत असें आ-पले पूर्वज, आम्ही मानितों तसे, न मा-नितां, देव म्हणजे अनाथ मर्त्यांचें कल्या-णच करणारे दयाळु अमर होत असें ते समजत असत.

'ग्रहयज्ञ' अथवा 'ग्रहमख' म्हणजे अनिष्ट ग्रहांपासून उपद्रव न व्हावा या हेतूनें जो आपल्या लोकांत संस्कार अ-थवा समारंभ करावयाचा प्रचार आहे, त्यांत नवग्रहांबरोबर दुसऱ्याहि देवतांस आह्वान म्हणजे आमंत्रण करून बोलाव-ण्याची चाल आहे, त्यांत 'चित्रगुप्ता'सहि आमंत्रण होत असतें. त्याचें आह्वान करि-तांना हा मंत्र म्हणून 'ग्रहयज्ञ' करणारा "ॐभूर्भुवः स्वः चित्रगुप्त इहागच्छ इह तिष्ठ इति केतोर्दक्षिणपार्श्वे चित्रगुप्तम् आ-वाहयामि"='हे चित्रगुप्ता, तूं इकडे ये, येथें बैस, याप्रमाणें मी चित्रगुप्तास बोला-वून केतूच्या उजवीकडेस बसवितों,' असें म्हणून चित्रगुप्ताला आणून बसविल्यानं-तर हाच मंत्र पुनः म्हणून होमाच्या वेळीं चित्रगुप्तायेदं नमम (=' चित्रगुप्ताला हें आम्ही अर्पण करितों') असें म्हणून चि-त्रगुप्तासाठीं भाताचा एक घास, त्यांत थो-डेंसें तूप व तिळांचे आणि गव्हांचे थोडे-से दाणे, याप्रमाणें अग्नींत आहुति टाकि-तात. हा चित्रगुप्त म्हणजे मनुष्यांच्या पा-

पपुण्यांचा हिशेब लिहून ठेवणारा यमराजाचा कारभारी जो तोच होय. आतां प्रस्तुतचा मंत्र म्हटल्यानें चित्रगुप्त कसा येईल आणि हा मंत्र म्हणून अग्नींत टाकिलेली आहुति चित्रगुप्ताला कशी पोहोंचेल याचा विचार ग्रहयज्ञ करणारांनीं करावा. कारण कीं हा मंत्रच मुदलीं चित्रगुप्ताविषयीं नाहीं. यांत 'चित्र' हा शब्द मात्र आला आहे, पण त्याचा अर्थ 'चित्रविचित्र,' 'उत्तम' असा असून तें विशेषण आहे. चित्रगुप्ताचा कांहीं संबंध नाहीं. आतां इतकें खरें कीं, हा 'ग्रहयज्ञ' नारायण भट्ट म्हणून एका अर्वाचीन भटजीनें केलेल्या 'प्रयोगरत्ना'वरून करितात. तथापि जीं कर्मं आपण कल्याणकारक, अनिष्टनिवारक, आणि सुखदायक, व पुण्यसाधक अशीं समजून मोठ्या निष्ठेनें करितों, आणि ज्यांत कांहीं गैरसमजुतीनें एकादी क्षुल्लक चूक घडल्यास प्रायश्चित्त करितों, आणि 'सर्वसाङ्गतासिद्ध्यर्थं आचार्यास दक्षिणा देतों' ("सनवग्रहमखविवाहकर्मणः साङ्गतासिद्ध्यर्थम् आचार्याय दक्षिणां दातुमहमुत्सृजे!") त्या कर्मांत किती ठिकाणीं आणि कशा रीतीनें वडाच्या साली पिंपळास लाविल्या आहेत त्याचा शोध आणि विचार करणें हें किती अवश्य आहे पहा !

या मंत्रांत वृत्तसुखासाठीं प्रथम चरणांत 'वंस्व' बद्दल 'वंसुअ' असें, आणि तिसरा चरण

तेना वहँ सुकृतों अध्वरीँ उप ।

असा वाचला पाहिजे.

**विश्वान्देवाँ आ वह सोमपीतयेऽन्तरिक्षादुषस्त्वम् ।**
**सास्मासु धा गोमदश्वावदुक्थ्यमुषो वाजं सुवीर्यम् ॥१२॥**

विश्वान् । देवान् । आ । वह । सोमऽपीतये । अन्तरिक्षात् । उषः । त्वम् ।
सा । अस्मासु । धाः । गोऽमत् । अश्वऽवत् । उक्थ्यम् । उषः ।
वाजम् । सुऽवीर्यम् ॥ १२ ॥

---

**भाषायाम्**

१२. हे उषः, त्वम् अन्तरिक्षाद् विश्वान् देवान् सोमपीतये (=सोमपानाय) आवह (=अत्र प्रापय)। सा [ त्वं ] (=तदनन्तरं त्वं) हे उषः, गोमत् (=गोयुक्तं धनं=बहुभिर्गोभिरुपेतं धनम्) अश्ववत् (=बहुभिरश्वैरुपेतं धनम्) उक्थ्यं (=प्रशंसनीयं) वाजम् (=अन्नसंपदं) सुवीर्यं (=सुवीर्योपेतं धनं=सुशौर्ययुक्तापत्यानां समूहं) [ च ] अस्मासु धाः (=निधेहि=स्थापय=अस्मभ्यं देहि) ॥

अत्रेदमुक्तं भवति । हे उषः, त्वं सोमपानार्थं विश्वान् देवान् तेषां निवासस्थानभूताद् अन्तरिक्षाद् आनय । आनीताश्चेत् ते देवा अस्मभ्यम् उक्तगुणविशिष्टां संपदं दास्यन्तीति न संशय इति ॥ उषआनीतैर्देवैर्यद्दत्तं तद् उषसैव दत्तमिति कवेरभिप्रायः ॥

१२. हे उषे, तूं सर्व देवांस अंतरिक्षांतून इकडे सोम प्यावयाला घेऊन ये. आणि मग, हे उषे, गाईनीं भरपूर, घोड्यांनीं भरपूर [असें] धन, स्तुत्य अन्न [आणि] शूर वीरांनीं भरपूर [अशी] संतति तूं आम्हांस दे.

12. Bring thou, Ushas, from the firmament all the gods hither to drink the Soma; and then, Ushas, confer thou upon us wealth full of cows [and] horses, and excellent food, [and] brave progeny.

१२. या मंत्रांत ऋषि असें म्हणतो कीं, 'हे उषे, आम्हीं जो हा सोम तयार केला आहे तो पीण्यासाठीं तूं सर्व देवांस त्यांचें राहण्याचें ठिकाण जें अंतरिक्ष त्यांतून घेऊन ये. आणि तूं त्यांला आणिलेंस आणि ते आमचा सोमरस प्याले म्हणजे ते आम्हांस गाई, घोडे, आणि वीर्यसंपन्न पुत्रपौत्रादि संतति यांहींकरून भरलेली अशी संपत्ति आणि अन्न हीं देतील यांत संशय नाहीं.'

'आणि मग......तूं'=' सा [त्वम्].' म्हणजे त्यांस आणल्यावर. 'सा' याचा अर्थ असा करावा लागतो याविषयीं सू. २, मं. ५ याजवरची 'तर तुम्हीं' याविषयींची टीप पहा. तशीच सू. ४ मं. ९ याजवरील 'वास्तव......तुला' इत्यादि टीप पहा.

'घोड्यांनीं भरपूर'=' अश्ववत्.' या उत्तरार्धांत 'गोमत्,' 'अश्ववत्,' 'वाजं' आणि 'सुवीर्यम्' हीं वेगवेगळीं स्वतंत्र नामें होत असें समजावें. 'उक्थ्यम्' हें मात्र 'वाजम्' याचें (द्वितीयान्त पुंलिंगी) विशेषण समजावें. 'गोमत्' म्हणजे 'गोमत् धनम्'='गाईनीं भरलेली संपत्ति,' तसेंच 'अश्ववत्' म्हणजे 'अश्ववत् धनं'=' घोड्यांनीं भरलेली संपत्ति,' आणि 'सुवीर्यम्'=' सुवीरोपेतं धनम्'=' सुवीरसमूह.' 'गोमत्' आणि 'अश्ववत्' हीं रूपतः विशेषणें आहेत तरी पर्यवसानीं नामें अशीं समजून योजिलेलीं वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलीं आहेत. सायणाचार्य बहुतकरून 'धनम्' या पदाचा अध्याहार करीत असतात.

'आम्हांस दे'=' अस्मासु धाः.' अक्षरशः अर्थ, 'आमच्या येथें ठेव,' 'आमच्या करितां संपादन कर.' 'धा' या धातूचा अर्थ वेदांत 'कोणाला कांहीं तरी संपादन करून देणें' म्हणजे 'देणें' असा होतो याविषयीं ऋ. १. १७५. ३; ३. २४. १; ३. २९. ८; ७. ६२. ६; ३. ३६. १० इत्यादि अनेक प्रमाणें

यस्या रुशन्तो अर्चयः प्रति भद्रा अदृक्षत ।
सा नो रयिं विश्ववारं सुपेशसमुषा ददातु सुग्म्यम् ॥ १३ ॥

यस्याः । रुशन्तः । अर्चयः । प्रति । भद्राः । अदृक्षत ।
सा । नः । रयिम् । विश्वऽवारम् । सुऽपेशसम् । उषाः । ददातु ।
सुग्म्यम् ॥ १३ ॥

## भाषायाम्.

१३. यस्या [ उषसो ] रुशन्तः ( =दीप्तवर्णा ) भद्राः ( =सुखकरा ) अर्चयः ( =रश्मयः ) प्रत्यदृक्षत ( =इमे दृश्यमाना भवन्ति ) सा [ एषा ] उषा नः ( =अस्मभ्यं ) विश्ववारं ( =सर्वैर्वरणीयम्=उत्कृष्टं ) सुपेशसं (=शोभनरूपोपेतं=मनोहारिणं) सुग्म्यं ( =सुखकारकं ) रयिं ( =धनं ) ददातु ॥

आहेत. या मंत्रांवरील सायणभाष्य पहा.

हा मंत्र वृत्तसुखासाठीं खालीं लिहिल्याप्रमाणें म्हणावा लागतोः—

विश्वान् देवान् आवह सोमपीतये ।
अन्तरिक्षाद् उषस् तुअम् ।
सास्मासु धा गोमदश्वावद् उक्थिअम् ।
उषो वाजं सुवीरिअम् ।

१३. जिच्या उज्ज्वलित [आणि] कल्याणकारक कांति दृष्टीस पडूं लागल्या आहेत ती [ही] उषा सर्वोत्तम, सुंदर [आणि] सुखकारक [अशी] संपत्ति आम्हांस देओ.

13. This Ushas whose incandescent [and] refreshing rays are becoming visible,—may she grant us beautiful [and] blissful wealth that all may envy.

१३. भावार्थः—पूर्वेकडेस उषेचा उदय होऊन तिच्या आरक्त कांति पांढऱ्या होत आहेत, आणि तेणेंकरून विशेष आह्लादकारक होऊन दृष्टीस पडत आहेत असें पाहून ऋषि म्हणतो कीं, 'ही जी उषा उगवून जात आहे ती आम्हांस सर्वोत्तम, सुंदर, आणि आनंदकारक संपत्ति देओ.'

'उज्ज्वलित'='रुशन्तः'. अक्षरशः अर्थ 'पांढऱ्या होत जाणाऱ्या', 'उजळत आहेत अशा,' उदयकालापूर्वी आरक्त वर्णाच्या असतात तशा नव्हेत, पण उदय झाल्यावर पांढऱ्या पांढऱ्या होत आहेत अशा. आमच्या देशांत 'उषा' उगवण्यापूर्वी आणि उगवत आहे आणि नुकतीच उगवली आहे इतक्या अजमासास प्रभातकाळचें तेज आरक्तवर्ण असतें. परंतु थोडकाच वेळ होऊन गेल्यावर उषेची कांति पांढरी पांढरी दिसूं लागते. 'रुशन्तः' या शब्दाविषयीं ऋ. ८. ७२. २; ६. १. ३; १. ९२. ५ यांजवरील सायणभाष्य पाहा.

'सर्वोत्तम'='विश्ववारम्'. 'विश्ववार' हा शब्द ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आला आहे तीं सर्व स्थळें आम्हीं शोधून पाहिलीं त्यांत एक मंत्र खेरीज करून बाकी सर्व स्थळीं सायणाचार्य 'सर्वांनीं जें घेण्यास योग्य' असा अर्थ करितात, म्हणजे जें सर्वांस आवडेल, अर्थात् जें सर्वोत्तम तें. कितीएक विद्वान् 'वार' म्हणजे धन या अर्थाकडे लक्ष देऊन 'सर्वसंपत्तियुक्त' असा अर्थ करितात. आणि आम्हींहि सू. ३० म. १० यांत तोच अर्थ स्वीकारिला आहे. परंतु पुनर्विचाराअंतीं व विशेष शोधाअंतीं 'सर्वांनीं स्वीकारण्यास योग्य,' म्हणजे सर्वांनीं ज्याची इच्छा करावी, म्हणजे 'सर्वोत्तम' हा जो सायणाचार्यांचा अर्थ तोच योग्य दिसतो.

पहिल्या चरणांत 'रुशन्तो' असें, आणि तिसरा व चवथा चरण

सा नो रयिं विश्ववारं सुपेशसम् ।
उषा ददातु सुग्मिअम् ।

असे वाचावे लागतात.

**ये चिद्धि त्वामृषयः पूर्वे ऊतये जुहूरेऽवसे महि ।**
**सा नः स्तोमाँ अभि गृणीहि राधसोषः शुक्रेण शोचिषा॥१४॥**

ये । चित् । हि । त्वाम् । ऋषयः । पूर्वे । ऊतये । जुहूरे । अवसे । महि ।
सा । नः । स्तोमान् । अभि । गृणीहि । राधसा । उषः । शुक्रेण ।
शोचिषा ॥ १४ ॥

---

## भाषायाम्.

१४. हे महि (=महति) [उषः], ये चित् हि (=ये केपि=सर्वेपि) पूर्वे (=चिरंतना) ऋषयः (=मन्त्रद्रष्टारः=कवयः) [यां] त्वाम् ऊतये अवसे [च] (=रक्षणाय साहाय्याय च] जुहूरे (=आहूतवन्तः) सा [त्वं] राधसा (=दानेन=धनदानेन करणेन) [तथा] शुक्रेण शोचिषा (=दीप्तेन तेजसा करणेन) नः (=अस्माकं) स्तोमान् (=स्तुतीः=स्तुतियुक्तानि सूक्तानि) अभिगृणीहि (=अभिनन्दय=समीचीनाः सोमा इमे इति वद) ॥

पूर्वर्षिसेविता या उषाः सैव न तु अन्या काचित् नवीना मया कृतानीमानि स्तोत्राणि श्रुत्वा संतुष्टा भवतु संतुष्टा सती च मदर्थं शुक्रेण शोचिषा सह उच्छित्वा संपदं ददात्विति कवेरभिप्रायः ॥

१४. हे मोठे [उषे], [ज्या] तुला पूर्वीचे म्हणून जे जे सर्व ऋषि संरक्षणासाठीं [ आणि ] साहाय्यासाठीं हाक मारीत असत, तीच [तूं], हे उषे, [तुझ्या] प्रसादानें [आणि] प्रकाशमान तेजानें आमचीं स्तवनें वाखाण.

14. O great [Ushas], whom [all ancient] poets whatsoever invoked for protection [and] help, do that [self-same] thou, O Ushas, commend our hymns with [thy] favour [and] fair brightness.

---

१४. 'हीं जीं मी स्तवनें करीत आहें तीं ऐकून उषा प्रसन्न होओ, आणि वाहवा! फार उत्तम स्तवनें आहेत, अशी माझी प्रशंसा करो; आणि प्रसन्न झाल्यें असें दाखविण्याकरितां निर्मळ तेजानें प्रकाशो आणि मला अन्नादि संपत्ति देओ; पण असें करणारी एकादी नवी उषा येऊन तसें न करो, तर जिला प्राचीन सकल ऋषि स्तवीत आणि आपल्या रक्षणासाठीं आणि साहाय्यासाठीं बोलावीत तीच उषा तसें करो' असा ऋषीचा अभिप्राय.

'मोठे'= 'महति.' 'महती'शब्दाचा 'मोठी' हा अर्थ प्रसिद्धच आहे, तथापि ऋ. ७. ८१. ४ आणि ८. ९. १७ यांजवरील सायणभाष्य पहा. 'मोठी' म्हणजे 'श्रेष्ठ,' 'उत्तम' असा भावार्थ. उषेप्रमाणें इतर देवींसहि 'मोठी' हें विशेषण लाविलेलें आहे.

'पूर्वीचे म्हणून जे जे सर्व ऋषि'= 'ये चित् हि पूर्वे ऋषयः.' ऋ. १. १७९. २ आणि १. ८४. ९ हे मंत्र पहा.

'साहाय्यासाठीं'='अवसे.' 'ऊति' आणि 'अवस्' हे दोनी समानार्थकच आहेत. अर्थपुष्टीकरणार्थ एकाच्या ऐवजीं दोन शब्दांचा प्रयोग केलेला आहे.

'वाखाण'='अभि गृणीहि.' सू. १५ मं. ३ पहा.

ह्या मंत्रावरून दोन गोष्टी ध्यानांत ठेवण्याजोग्या सिद्ध होतात. १ ली, वेदसूक्तांचे ऋषि आपण परम पुरातन, अनादि, चिरंजीव अथवा अमर आहों असें मानीत नसत; तर जसें आम्ही ईश्वराची प्रार्थना करूं लागलों म्हणजे प्राचीनांस उद्देशून बोलतों तसे तेहि आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या पुराण ऋषींविषयीं बोलत असत. २ री, वेदमंत्र म्हणजे ऋषींनीं केलेलीं देवाचीं अथवा देवांचीं स्तवनें अपरिमितशक्तियुक्त आणि पाहिजे ती गोष्ट घडवून आणणारीं आणि खुद्द देवांसहि त्यांच्या मर्जीविरुद्ध सुद्धा खालीं आणणारीं व प्रसन्न करून घेणारीं होत असें त्यांचे कर्तेहि मानीत नसत, तर आपण दीन मानव आहों, (आणि

उषो यदद्य भानुना वि द्वारावृणवो दिवः ।
प्र नो यच्छतादवृकं पृथु छर्दिः प्र देवि गोमतीरिषः ॥ १५ ॥
उषः । यत् । अद्य । भानुना । वि । द्वारौ । ऋणवः । दिवः ।
प्र । नः । यच्छतात् । अवृकम् । पृथु । छर्दिः । प्र । देवि । गोऽमतीः । इषः ॥ १५ ॥

## भाषायाम्.

१५. हे उषः, यद् (=यस्मात् कारणात्) [त्वम्] अद्य (=अस्मिन् दिने) भानुना (=तव प्रकाशेन) दिवः (=द्युलोकस्य) द्वारौ (=पूर्वापरदिग्भागौ) वि ऋणवः (=अपावृणोः=विश्लिष्टवती) [तस्मात् कारणात्], [त्वं] नः (=अस्मभ्यम्) अवृकं (=हिंसकरहितं=निष्कण्टकं=निःसपत्नं) पृथु (=विस्तीर्णं) छर्दिः (=गृहम्=आश्रयं) प्रयच्छतात् (=देहि), [तथा] हे देवि, [नः=अस्मभ्यं] गोमतीः (=बहुभिर्गोभिरुपेता) इषः (=अन्नानि) प्र[यच्छतात्] (=देहि)॥

"त्वदागमनस्यास्मद्रक्षणार्थत्वाद् अभीष्टं गृहादिकं प्रयच्छेत्यर्थः" ॥

ते वस्तुतः तसे होतेच), आपण आपल्या शक्तीप्रमाणें स्तोत्र करितों तें देवांनीं कृपाकरून मान्य करून घ्यावें, आणि आम्हांवर प्रसन्न व्हावें, अशी त्यांची नम्र मनोवृत्ति असे. वेदमंत्रांविषयीं आणि त्यांच्या प्रेमळ, प्रांजळ, सत्यवृत्ति आणि अभिमानरहित कर्त्यांविषयीं आम्हांमध्यें ज्या विलक्षण समजुती आहेत त्यांत व ह्यांत किती भेद आहे पहा!

'हा मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें वाचला म्हणजे वृत्ताप्रमाणें लागतो:-

ये चिद्धि त्वामृषयः पूर्व ऊतये ।
जुहूरे अवसे महि ।
सा नस्तोमाँ अभि गृणीहि राधसा ।
उषः शुक्रेण शोचिषा ।

१५. हे उषे, ज्या अर्थीं [तूं] आज [आपल्या] प्रकाशानें द्युलोकाचीं कवाडें उघडलींस [त्या अर्थीं] [तूं] आम्हांस निष्कंटक [आणि] विस्तीर्ण घर दे, हे देवी, [तूं आम्हांस] गाईसकट अन्न दे.

15. Ushas, since [thou] hast this day opened the gates of heaven through [thy] light, grant [us] a thornless [and] wide shelter, grant [us], Goddess, food accompanied by cows.

१५. या मंत्रांत ऋषि म्हणतो कीं, 'हे उषे, सर्व रात्रभर अंधकारानें आकाश आणि द्युलोक भरलेला आणि जणुं काय आंधारकोठडीसारिखा झांकलेला असतो. तूं आतां उगवून आणि प्रकाश पाडून त्या द्युलोकरूपी कोठडीचीं कवाडें उघडलीं आहेस, इतका प्रसाद तूं आम्हांवर केला आहेस त्यापेक्षां तूं आम्हांस आज जें शत्रुरहित असल्यामुळें सुखकारक आणि जें विस्तीर्ण असें घर तें आणि अन्न आणि गुरेंढोरें हीं संपत्ति दे.'

'द्युलोकाचीं कवाडें उघडलींस'= 'वि द्वारौ ऋणवो दिवः.' म्हणजे उगवून जिकडे तिकडेस प्रकाश पाडिलास. उषा उगवून द्युलोकाचीं कवाडें उघडिते ही सुंदर उत्प्रेक्षा आलीकडील कृतक कवितेंत क्वचितच सांपडेल. उषेला द्यूची कन्या म्हणणें, तिणें तिमिरमग्न द्युलोकरूपी स्वर्गाचीं कवाडें उघडिलीं अशी उत्प्रेक्षा करणें, आणि तिजविषयीं दुसरे जे सुंदर विचारतरंग ऋग्वेदांत आढळतात त्यांस स्वाभाविक रीतीनें मनांत जागा देणें या गोष्टींच्या संबंधानें वैदिक ऋषि ज्या काळीं होऊन गेले तें खरोखर कृतयुग आणि आम्ही तूर्त आहों हें कलियुग होय यांत संशय नाहीं. कारण आतां आपण टला ट आणि पला प जोडिला, आणि यमकें घालून पोराच्या पायांतील घुंगुराप्रमाणें झणझण आवाज केला म्हणजे, आणि एकाच शब्दाचे अनेक अर्थ करितां येतील अशा रीतीनें शब्द जोडिले म्हणजे त्यास उत्तम कविता म्हणतों!

'घर'='छर्दिः.' 'छर्दि' हा शब्द पुष्कळ ठिकाणीं ऋग्वेदांत आला आहे त्या सर्व ठिकाणीं सायणाचार्य निघण्टूस अनुसरून 'घर' असा अर्थ करितात. पण कितीएक ठिकाणीं 'आश्रय' असा अर्थ केल्यास बरा शोभेल. ऋ. ६. ४६. ९ यावर सायणाचार्य सुद्धा तसाच अर्थ ("शरणम्" असें म्हणून) करितात असें दिसतें.

हा मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें वाचला तर आधुनिक वृत्ताप्रमाणेंच लागेलः—

उषो यदद्य भानुना ।
वि द्वारावृणवो दिवः ।
प्र नो यच्छतादवृकं पृथु छर्दिः ।
प्र देवि गोमतीरिषः ।

**सं नो॑ रा॒या बृ॑ह॒ता वि॒श्वपे॑शसा मिमि॒क्ष्वा समिळा॑भि॒रा ।**
**सं द्यु॒म्नेन॑ विश्व॒तुरो॑षो महि॒ सं वाजै॑र्वाजिनीवति ॥ १६ ॥ ५॥**

सम् । नः॒ । रा॒या । बृ॒ह॒ता । वि॒श्वऽपे॑शसा । मि॒मि॒क्ष्व । सम् । इळा॑ऽभिः । आ ।
सम् । द्यु॒म्नेन॑ । वि॒श्व॒ऽतुरा॑ । उ॒षः॒ । म॒हि॒ । सम् । वाजैः॑ । वा॒जि॒नी॒ऽव॒ति॒ ॥ १६ ॥ ५ ॥

## भाषायाम्.

१६. [ हे उषः ], नः ( =अस्मान् ) बृहता ( =प्रभूतेन ) विश्वपेशसा (=विश्वरूपेण=नानाविधेन ) राया ( =धनेन ) [ सं मिमिक्ष्व ] ( =संसिञ्च=प्रवाहमिव तम् अस्मान् प्रति संवाहय ), इळाभिः आ ( =अन्नैश्च ) सं मिमिक्ष्व ( =प्रवाहमिव ता अस्मान् प्रति संवाहय ), [ तथा ] हे महि उषः ( =महति उषोदेवि ), विश्वतुरा ( =सर्वेषां शत्रूणां हिंसकेन=सर्वजिता ) द्युम्नेन ( =यशसा ) सं [मिमिक्ष्व] (=प्रवाहमिव तद् अस्मान् प्रति संवाहय ), [ तथा ] हे वाजिनीवति ( =प्रभूतान्नवति ) [ उषः ], वाजैः ( =अन्नैः ) सं [ मिमिक्ष्व ] ( =प्रवाहमिव तान् अस्मान् प्रति संवाहय ) ॥

आ इति समुच्चयार्थकमव्ययम् ॥

१६. [हे उषे], [तूं] आम्हांस मोठें [आणि] सर्व प्रकारचें भाग्य भरपूर दे, आणि [आम्हांस] धनधान्य भरपूर [दे]. हे मोठे उषे, [तूं] सर्वांस जिंकणारी [अशी] कीर्ति आम्हांस भरपूर दे. हे अन्नपूर्णे, [तूं आम्हांस] अन्नें भरपूर [दे].

16. [Confer] upon us liberally great [and] universal wealth, [and] confer nourishments liberally; liberally glory that shall, O great Ushas, conquer all, [confer] liberally foods, O Goddess rich in food.

१६. सर्व सूक्ताचा हा उपसंहार आहे. यांत ऋषि म्हणतो कीं, 'हे उषे, आम्हांस अनेक प्रकारचें महाधन पुष्कळ दे, पुष्कळ धनधान्य दे, सर्वांस खालीं पहावयास लावणारी कीर्ति पुष्कळ दे, आणि हे अन्नसंपन्न देवी उषे, आम्हांस पुष्कळ अन्न दे.'

'भरपूर दे'='सं मिमिक्ष्व.' अक्षरशः अर्थ भाग्यानें आम्हांस 'भिजवून टाक,' जणुं काय भाग्याचा आम्हांवर 'वर्षाव कर,' भाग्याचा वर्षाव होऊन पूर वाहतील असें कर.

'धनधान्य'='इळाभिः.' इळाशब्दाचा अक्षरशः अर्थ अन्न असा आहे. त्याविषयीं ऋ. ५. ५३. २; ७. ६६. ४ याजवरील सायणभाष्य पहा.

'अन्नपूर्णे'='वाजिनीवति.' म्हणजे जी अन्नानें भरलेली आहे, जी पुष्कळ अन्न देणारी होय ती. ऋ. ७. ६९. १; ७. ३६. ६; ७. ९६. ३; ७. ७५. ५ हे मंत्र आणि यांजवरील सायणभाष्य पाहा.

खालीं लिहिल्याप्रमाणें मंत्र वाचल्यास आधुनिक वृत्ताप्रमाणेंच लागतोः—

सं नो रॉया बृहतॉ विश्वपेशसा ।
मिमिक्ष्वा समिळाभिरा ।
सं द्युम्नेन विश्वतुरा उषो महि ।
सं वाजैर्वाजिनीवति ॥

पूर्वी सांगितल्याप्रमाणें शेवटचे भाग (म्हणजे दुसरा आणि चौथा चरण हे) कांहीं अडचणीशिवाय सरळ वाचतां येतात.

## सूक्तम् ४९:

कण्वपुत्रः प्रस्कण्व ऋषिः । उषा देवता । अनुष्टुप् छन्दः ।

**उषो भद्रेभिरा गहि दिवश्चिद्रोचनादधि ।**
**वहन्त्वरुणप्सव उप त्वा सोमिनो गृहम् ॥ १ ॥**

उषः । भद्रेभिः । आ । गहि । दिवः । चित् । रोचनात् । अधि ।
वहन्तु । अरुणऽप्सवः । उप । त्वा । सोमिनः । गृहम् ॥ १ ॥

---

## भाषायाम्.

१. हे उषः, [ त्वं ] भद्रेभिः ( =भद्रैः=शोभनैः ) [ अश्वैः ] दिवश्चिद् रोचनाद् अधि ( =द्युलोकस्य रोचमानस्थानादेव ) आगहि ( =आगच्छ ), [ ते ] अरुणप्सवः ( =अरुणवर्णा ) [ अश्वास् ] त्वा ( =त्वां ) सोमिनः ( =सोमयुक्तस्य यजमानस्य ) गृहम् [ प्रति ] उपवहन्तु ( =प्रापयन्तु ) ॥

अधिः पञ्चम्यनुवादक इत्यवधेयम् ॥

## सूक्त ४९.

ऋषि– कण्वकुलोत्पन्न प्रस्कण्व या नांवाचा ( पूर्वीच्या सूक्ताचा जो तोच). देवता– उषा. वृत्त– अनुष्टुप्.

१. हे उषे, [ तूं ] सुंदर [घोड्यां]नीं द्युलोकाच्या तेजस्वी मंडलाहून ये, [ते तुझे] अरुणवर्ण [घोडे] सोमरस अर्पण करणाऱ्या [उपासका]च्या घरीं तुला घेऊन येओत.

## HYMN 49.

To *Ushas* or the Goddess of early *Dawn*. By *Praskanva* the son of *Kanva* or born in the family of *Knava*. Metre—*Anushtup*.

1. Ushas, come [hither] on beautiful horses from the bright region of heaven. May [they], of ruddy colour, carry thee to the house of him who offers the Soma.

---

१. हेंहि सूक्त उषेविषयींच आहे आणि पूर्वसूक्ताच्या कर्त्यानेंच केलेलें आहे. या पहिल्या मंत्रांत ऋषि उषेला द्युलोकाच्या प्रकाशमान मंडलापासून येण्याविषयीं प्रार्थना करितो, आणि उषेचे अरुणवर्ण घोडे सोमार्पक उपासकाच्या घरीं तिला आणोत अशी प्रार्थना करीत आहे.

‘ सुंदर [घोड्यांनीं]’=‘ भद्रेभिः.’ सायणाचार्य ‘बैलांनीं’ असें म्हणतात. कोणतेंहि घेतलें तरी अध्याहार केलाच पाहिजे. ‘ भद्र ’ हें विशेषण सूर्याच्या घोड्यांस ऋ. १. ११५. ३ यांत लाविलें आहे तें पाहा. उषा ही घोड्यांनीं येते अथवा बैलांनीं म्हणजे रथास बैल अथवा गाई जोडून येते असेंहि ऋग्वेदांत सांगितलें आहे. ऋ. १. ९२. २; १. १२४. ११; आणि ५. ८०. ३ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पाहा.

‘ द्युलोकाच्या तेजस्वी मंडलाहून ’= ‘ दिवश्चिद्रोचनादधि.’ म्हणजे द्युलोकाच्या ज्या भागांत अथवा ठिकाणीं नेहमी प्रकाश असेल तेथें उषा राहत असते अशी ऋषीची कल्पना असून, उषेनें तेथून यावें अशी प्रार्थना आहे. द्युलोकाचा कांहीं भाग विशेष प्रकाशयुक्त आहे अशा समजुतीस उद्देशून ऋग्वेदांत पुष्कळ वचनें आहेत. ऋ. १०. १७०. ४ यांत “ रोचनं दिवः” याचा अर्थ सायणाचार्य “दिवः संबन्धि [रोचमानं?] स्थानम्”= ‘ द्युलोकाचें [ तेजोयुक्त ] स्थान ’ असा अर्थ करितात. ऋ. १. १०५. ५ यांत “ रोचने दिवः” याचा अर्थ “ आदित्यस्य रोचमाने मण्डले ”=‘ आदित्याचें तेजोयुक्त मण्डल ’ असा करितात. ऋ. ३. ६. ८ यांत “ दिवो रोचने ” म्हणजे “ सूर्यस्य प्रकाशने आलोके ”=

**सुपेशसं सुखं रथं यमध्यस्था उषस्त्वम् ।**
**तेना सुश्रवसं जनं प्रावाद्य दुहितर्दिवः ॥ २ ॥**

सुऽपेशसम् । सुऽखम् । रथम् । यम् । अधिऽअस्थाः । उषः । त्वम् ।
तेन । सुऽश्रवसम् । जनम् । प्र । अव । अद्य । दुहितः । दिवः ॥२॥

**वयश्चित्ते पतत्रिणो द्विपच्चतुष्पदर्जुनि ।**
**उषः प्रारन्नृतूँरनु दिवो अन्तेभ्यस्परि ॥ ३ ॥**

वयः । चित् । ते । पतत्रिणः । द्विऽपत् । चतुःऽपत् । अर्जुनि ।
उषः । प्र । आरन् । ऋतून् । अनु । दिवः । अन्तेभ्यः । परि ॥३॥

## भाषायाम्.

२. हे उषः, त्वं यं सुपेशसं (=शोभनरूपोपेतं) सुखं (=सुखं यथा तथा गच्छन्तं) रथम् अधि अस्थाः (=अधिष्ठिता भूतासि) तेन [रथेन] [त्वं] सुश्रवसं (=शोभनहविर्युक्तं=शोभनं हविर्दत्तवन्तं) जनम् (=उपासकं), हे दिवो दुहितः (=द्युलोकरूपस्य देवस्य कन्यके), अद्य प्राव (=प्रकर्षेण रक्ष) ॥

३. हे अर्जुनि (=शुभ्रवर्णे) उषः, ते (=तव) ऋतून् अनु (=आगमनान्यनुलक्ष्य=आगमनसमयेषु) पतत्रिणो वयश्चित् (=पक्षोपेताः पक्षिणोपि), [तथा] द्विपत् (=पादद्वययुक्तं प्राणिजातं) [तथा च] चतुष्पत् (=चतुःपादयुक्तं प्राणिजातं) दिवः (=द्युलोकस्य) अन्तेभ्यः परि (=पर्यन्तेभ्यः=पर्यन्तानां सकाशात्) [त्वामभ्युद्गन्तुं] प्रारन् (=प्रस्थाय गच्छन्ति) ॥

उषसं व्युच्छन्तीं दृष्ट्वा सर्वेपि प्राणिनस्तामभ्युद्गन्तुमिव स्वस्वस्थानात् प्रतिष्ठन्तीत्यर्थः । परीति पञ्चमीद्योतकमित्यवधेयम् ॥

'सूर्याच्या प्रकाशांत' असें म्हणतात, आणि ऋ. ८. १०. १ यांत "रोचने दिवः" म्हणजे "द्युलोकस्य रोचमाने स्थाने"='द्युलोकाच्या प्रकाशयुक्त अथवा तेजस्वी स्थानांत' असें भाष्य करितात. शिवाय ऋ. १. १५९. ३ पहा.

प्रस्तुत ठिकाणीं आचार्य 'दिवश्चिद्रोचनादधि' या शब्दांचा "प्रकाशयुक्त अंतरिक्षाहून" असा अर्थ करितात.

हा मंत्र अनुष्टुप् श्लोकाप्रमाणेंच नीट वाचतां येतो, मात्र तिसरा चरण "वहन्तु अरुणप्सवः" असा म्हटला पाहिजे.

२. हे उषे, ज्या सुंदर [आणि] सुखकारक रथांत तूं बसली आहेस त्या [रथा]नें, हे द्यूचे कन्यके, चांगलें हवि देणाऱ्या जनाचें [ तूं ] आज संरक्षण कर.

2. With that beautiful [and]easy-rolling car which, Ushas, thou hast mounted, protect to-day, O daughter of Heaven, the man who offers a good oblation.

३. हे गौरवर्ण उषे, तूं [नित्य] यावयाच्या समयीं उडणारे पक्षी सुद्धा [आणि] द्विपाद [आणि] चतुष्पाद प्राणी [सुद्धा] द्युलोकाच्या कांठांकडून [ तुला भेटावयास ] सामोरे जातात.

3. Even the winged birds, the bipeds [and], Fair [one], the quadrupeds go forth, Ushas, from the confines of heaven [to meet thee] at thy hours of arrival.

---

२. 'हे उषे, तूं आपल्या सुंदर आणि न हालणाऱ्या आणि न पडणाऱ्या रथांत बसून येत आहेस. तर त्या रथांत तशीच बसलेली येऊन चांगले जे भक्त आहेत त्यांचें संरक्षण कर,' असा भावार्थ आहे.

हा मंत्र अनुष्टुप्प्रमाणें म्हणावयास कांहीं अडचण येत नाहीं, मात्र दुसऱ्या चरणांत 'त्वम्'च्या बद्दल 'तुअम्' आणि चौथ्या चरणांत 'प्रावात्र' आहे तेथें 'प्रावात्रं' असें म्हटलें पाहिजे.

३. 'उषा दररोज जेव्हां येते तेव्हां सर्व प्राण्यांस इतका आनंद होतो कीं, मनुष्यांविषयीं तर सांगावयासच नको, पण जनावरें आणि अज्ञानी उगाच इकडे तिकडे उडणारीं पाखरें सुद्धा जिकडे रात्रीच्या वेळीं पडून राहिलेलीं असतात तेथें उषेचा प्रकाश येऊन पोंहचतांच उषोदेवीला जणुं अभ्युत्थान देण्याकरितांच आपआपल्या ठिकाणाहून उठून बाहेर पडतात' असा या सुंदर मंत्राचा अभिप्राय आहे.

'गौरवर्ण' = 'अर्जुनि.' 'पांढरी' असा जरी 'अर्जुन'शब्दाचा साधारण अर्थ आहे, तरी भावार्थ हाच आहे. 'शुभ्रवर्ण' असें भाषांतर केलें तरी चालेल.

'तूं [नित्य] यावयाच्या समयीं' = 'ते ऋतून् अनु.' 'ऋतु' शब्दाचा अर्थ 'समय,' 'नेमलेला वेळ.' बरोबर नेमानें येणारा वेळ.

'द्युलोकांच्या कांठांकडून' = 'दिवः अन्तेभ्यः परि.' 'परि' हें केवळ पंचमीदर्शक आहे. ऋ. १. ४१. १३ याजवरील सायणभाष्य पहा. कवीच्या मनांतील भावार्थ असा आहे कीं, उषा ही द्युलोकांतून येऊं लागली म्हणजे तिला

व्युच्छन्ती हि रश्मिभिर्विश्वमाभासि रोचनम् ।
तां त्वामुषर्वसूयवो गीर्भिः कण्वा अहूषत ॥ ४ ॥ ६ ॥

वि॒ऽउ॒च्छन्ती॑ । हि । र॒श्मिऽभिः॑ । विश्व॑म् । आ॒ऽभासि॑ । रो॒च॒नम् ।
ताम् । त्वाम् । उ॒षः॒ । व॒सु॒ऽयवः॑ । गीः॒ऽभिः । कण्वाः॑ । अ॒हू॒ष॒त॥४॥६॥

---

## भाषायाम्.

४. व्युच्छन्ती ( =व्युच्छनेन प्रकाशनेन तिमिरं विनाशयन्ती ) [त्वं] हि रश्मिभिः ( =स्वतेजोभिः ) विश्वं रोचनं ( =द्युलोकस्य सकलमपि रोचमानं स्थानम् ) आभासि ( =प्रकाशयसि ) । तां त्वां ( =तादृशीं त्वाम्=अतः कारणात् त्वाम् ), हे उषः, वसूयवः ( =वसुकामाः ) कण्वाः (=कण्वपुत्राः=कण्वकुलोत्पन्ना मदादयः पुरुषा ) गीर्भिः ( =स्वरचितैरेतैः स्तोत्रैः ) अहूषत ( =स्तुवन्ति ) ॥

---

भेटण्याकरितां सर्व प्राणी जणुं सामोरे जातात. ते रात्रीच्या वेळीं विश्रांति घेण्यास द्युलोकाच्या कोनाकोपऱ्यांत म्हणजे क्षितिजाच्या किनाऱ्यांवर पडून राहिलेले असतात, तेथून निघून सामोरे जातात. ही उत्प्रेक्षा किती सुंदर आहे पहा.

'सामोरे जातात' ='प्रारत.' अक्षरशः 'पुढें जात आले आहेत,' म्हणजे नित्य पुढें जात असतात. रीतिवर्तमानाच्या ऐवजीं पूर्णवर्तमान.

ह्या मंत्राचा चवथा चरण खालीं लिहिल्याप्रमाणें म्हटला पाहिजेः—

'दिवो अन्तेभिअस्परि ।

४. कां कीं जेव्हां [तूं] उगवतेस तेव्हां [तूं आपल्या] तेजांनीं सकल आकाशभर प्रकाश पाडितेस. तर अशी जी तूं त्या तुला, हे उषे, कल्याणेच्छु कण्वपुत्र [आपल्या] स्तोत्रांनीं स्तवीत आहेत.

4. For [when] dawning forth [thou] enlightenest the whole celestial region with [thy] rays. Thee, therefore, O Ushas the sons of Kaṇva, desirous of bliss, are praising with [their] hymns.

---

४. 'हे उषे, तूं उगवलीस म्हणजे सर्व आकाश तुझ्या प्रकाशानें भरून जातें अशी उपकारकर्त्री तूं आहेस. यास्तव कण्वकुलोत्पन्न असे आम्ही जन तुला हीं स्तोत्रें म्हणून स्तवीत आहोंत तर कल्याण व्हावें अशी जी आमची इच्छा ती तूं पूर्ण कर.'

हा सूक्ताचा उपसंहार आहे यास्तव ऋषीच्या मनांत जो प्रसाद मागावयाचा असतो तो यांत मागितला आहे.

पहिला चरण 'विउच्छन्ती हि रश्मिभिः' असा म्हटला पाहिजे.

'कण्वपुत्र [आपल्या] स्तोत्रांनीं स्तवीत आहेत' = 'गीर्भिः कण्वा अहूषत.' यावरून पूर्वीं आम्हीं सांगितल्याप्रमाणें ही गोष्ट उघड दिसून येते कीं, आतां जशी पाश्चिमात्य लोकांत अथवा ब्राह्मलोकांत सर्व कुटुंबाचीं मनुष्यें मिळून देवभजन करण्याची चाल आपण पाहतों, तशी आपल्या आर्यपूर्वजांचीहि चाल होती. प्रत्येक मनुष्यानें आपल्याच मोक्षाची काळजी करावी, आणि सर्व जगाचा त्याग करावा, आणि कुटुंब टाकून जावें, रानांत राहावें, पैशाची हेळसांड करावी, आणि त्याजवर प्रीति करणें असते तेव्हां 'नारायण' व्याजानें दिले अशी 'नारायणा'च्या नांवानें करावी, हें जें वेदांती ज्ञान त्याचा प्रसार तेव्हां सुदैवेंकरून झाला नव्हता म्हणूनच हीं सुंदर सूक्तें आज आम्हांस वाचावयास मिळतात.

## सूक्तम् ५०.

कण्वपुत्रः प्रस्कण्व ऋषिः । सूर्यो देवता । १-९ गायत्री च्छन्दः । १०-१३ अनुष्टुप् छन्दः ।

**उदु त्यं जातवेदसं देवं वहन्ति केतवः ।**
**दृशे विश्वाय सूर्यम् ॥ १ ॥**

उत् । ऊम् इति । त्यम् । जातऽवेदसम् । देवम् । वहन्ति । केतवः ।
दृशे । विश्वाय । सूर्यम् ॥ १ ॥

**अप त्ये तायवो यथा नक्षत्रा यन्त्यक्तुभिः ।**
**सूराय विश्वचक्षसे ॥ २ ॥**

अप । त्ये । तायवः । यथा । नक्षत्रा । यन्ति । अक्तुऽभिः ।
सूराय । विश्वऽचक्षसे ॥ २ ॥

---

### भाषायाम्.

१. केतवः (=सूर्यस्य रश्मिरूपा अश्वा) विश्वाय सूर्यं दृशे (=सूर्यं द्रष्टुं विश्वस्मै भुवनाय=यथा सर्वे जनाः सूर्यं पश्यन्ति तथा) त्यं (=प्रसिद्धं=यं यूयं पश्यथ तमिमं) देवं (=सूर्यदेवम्) उदु वहन्ति (=उद्वहन्ति=ऊर्ध्वमानयन्ति=उदयस्थानादूर्ध्वमानयन्ति पश्यत) ॥

२. विश्वचक्षसे सूराय (=सर्वेषामपि द्रष्टुः सूर्यस्य उदये जाते सति) त्ये तायवो यथा (=ये चोराः सन्ति ते अपयन्ति पलायन्त इति यथा प्रसिद्धं वर्तते) [तथा] अक्तुभिः [सह] (=रात्र्या सह) नक्षत्राणि अपयन्ति (=अपगच्छन्ति प्रणष्टानि भवन्ति) ॥

## सूक्त ५०.

ऋषि—कण्वकुळांत झालेला प्रस्कण्व (पूर्वीच्या सूक्ताचा जो तोच). देवता—सूर्य. वृत्त—पहिल्या नव ऋचांचें गायत्री, बाकी राहिलेल्यांचें अनुष्टुप्.

१. सूर्याला सर्वांनीं पाहावें म्हणून ह्या सकलज्ञ [सूर्य]देवाला [त्याचे] किरण[रूप घोडे] वर घेऊन येत आहेत.

२. विश्वदर्शी सूर्य आल्याबरोबर चोर जे असतात ते जसें [पळून जातात तसीं] नक्षत्रें आणि रात्र [हींहि] पळून जातात.

## HYMN 50.

To *Sûrya* (or the Sun-god). By *Praskaṇva* of the family of *Kaṇva* (the same as the author of the previous hymn). Metre—*Gâyatrî* of the first nine verses and *Anushṭup* of the rest.

1. Lo! the beamy horses of omniscient Sûrya are bringing that God high that all may see him!

2. At the sight of the all-seeing sun the stars [together] with the night fly away as [do] the thieves.

---

१. हें सूक्त महत्त्वाचें आहे. आपल्या लोकांत जो सौर म्हणून अथवा सौरसूक्त म्हणून जें स्नानाच्या वेळीं म्हणतात त्यांत हें सूक्त पहिलें आहे. शिवाय दुसऱ्या कोणत्या ठिकाणीं याचा उपयोग करितात याविषयीं पुढें पहा.

आपण अशी कल्पना केली पाहिजे कीं, प्रस्कण्व ऋषि सूर्योदयाच्या वेळीं उठून पूर्वेकडेस पाहून म्हणतो आहे कीं, 'रात्रभर सूर्यदेव नाहींसारिखा झाला होता आणि तो दृष्टीस पडेनासा झाला म्हणून लोक मोठ्या विवंचनेंत होते. तर हे पहा त्याचे किरणरूपी घोडे त्या देवाला पूर्वदिशेला क्षितिजाच्या वर घेऊन येत आहेत!'

'सूर्याला सर्वांनीं पाहावें म्हणून' = 'दृशे विश्वाय सूर्यम्.' 'दृशे' हें तुमर्थी अव्यय आहे. ही शब्दरचना वेदांत पुष्कळ येते. याविषयीं आम्हीं पूर्वी एक दोन वेळां सांगितलेंच आहे. सू. ४५, मं. ६ याजवरील टीप पहा.

'ह्या' = 'त्यम्.' म्हणजे हा जो तुम्ही पाहात आहां त्या या प्रसिद्ध देवाला.

'सकलज्ञ' = 'जातवेदसम्.' म्हणजे सूर्य भुवनावर फिरतो तेव्हां सकल वस्तुमात्र त्याच्या पाहण्यांत व जाणण्यांत येतात म्हणून तो 'जातवेदाः' होय.

मार्गशीर्ष पौर्णिमेच्या रात्रीं करावयाचा 'प्रत्यवरोहण' म्हणून एक संस्कार सांगितला आहे. आपणास व आपल्या

अदृश्रमस्य केतवो वि रश्मयो जनाँ अनु ।
भ्राजन्तो अग्नयो यथा ॥ ३ ॥

अदृश्रम् । अस्य । केतवः । वि । रश्मयः । जनान् । अनु ।
भ्राजन्तः । अग्नयः । यथा ॥ ३ ॥

तरणिर्विश्वदर्शतो ज्योतिष्कृदसि सूर्य ।
विश्वमा भासि रोचनम् ॥ ४ ॥

तरणिः । विश्वऽदर्शतः । ज्योतिःऽकृत् । असि । सूर्य ।
विश्वम् । आ । भासि । रोचनम् ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. अस्य केतवः (=प्रज्ञापकत्वाद् ध्वजीभूता) रश्मयः (=किरणाः), भ्राजन्तः (=दीप्यमाना) अग्नयो यथा (=अग्नय इव), जनान् अनु (=अनुक्रमेण जनेषु) वि अदृश्रं (=विशेषेण दृश्यन्ते) ॥

अस्य अग्निवद्दीप्यमानाः किरणरूपा ध्वजाः उदयसमये बहुषु जनेषु अनुक्रमेण प्रथमं दृश्यन्ते पश्चादयमायातीत्यर्थः ॥

४. हे सूर्य, [त्वं] विश्वदर्शतः (=सर्वैर्दर्शनीयः) [तथा] ज्योतिष्कृत् (=प्रकाशस्य कर्ता) [एतादृक्] तरणिः (=महतोध्वनो गन्ता) असि । त्वं [हि] विश्वं रोचनं (=सकलं द्युलोकस्य रोचमानं स्थानम्) आभासि (=प्रकाशयसि) ॥

---

बायकामुलांस "पाण्यांत अथवा पृथ्वीवर राहणाऱ्यांपासून बाधा होऊं नये" म्हणून ("मम स्त्रीपुत्रादिसहितस्य जलस्थलचरसर्वबाधानिवृत्त्यर्थम्") तें कर्म करावें असें सांगितलें आहे. त्यांत या सर्व सूक्ताचा जप दुसऱ्या दिवशीं सकाळीं करावा असें सांगितलें आहे. पण हें 'प्रत्यवरोहण' कर्म आतां कोणी बहुतकरून करीत नाहींत.

शिवाय सूर्याचें उपस्थान म्हणजे जपादिकंकरून सेवन जेथें सांगितलें असतें तेथें या सूक्ताचा, निदान या मंत्राचा तरी, जप करितात.

वृत्तानुरोधासाठीं तिसरा चरण 'दृशे विश्वाय सूरिअम्' असा म्हटला पाहिजे.

२. 'सर्वांस पाहणारा जो सूर्यदेव तो येतांच जसे चोर पळून जातात तशीच नक्षत्रें आणि रात्र हीं सर्व पळून जातात,' असा भावार्थ.

'विश्वदर्शी' = 'विश्वचक्षाः.' ऋ. ७. ६३. १ यावरील सायणाचार्यांचें भाष्य पहा.

३. ह्याचे पताका[भूत] [जे] अग्नीप्रमाणें लकलकीत किरण [ते] अनुक्रमानें अनेक लोकांच्या दृष्टीस पडतात.

४. हे सूर्या, [तूं] सर्वांच्या दृष्टीस पडणारा, [ आणि ] प्रकाश करणारा [असा] महावेगवान् वाटसरू आहेस. [तूं] सर्व आकाशभर प्रकाश पाडितोस.

3. His rays [ serving as his] banners are seen among numerous people in order, refulgent like fires.

4. [Thou], Sûrya, art a great traveller [that is] seen by all [and] [that] maketh light. [ Thou ] enlightenest the whole celestial region,

---

'रात्र' = 'अक्तुभिः.' 'अक्तुभिः'-शब्दाचा साधारण अर्थ 'रात्रीच्या वेळीं' असा क्रियाविशेषणाच्या अर्थाचा होतो. परंतु येथें सायणाचार्य तसा अर्थ न करितां 'रात्र्या सह' असा करितात तो आम्हांस येथें इष्ट दिसतो. तसा न घेतल्यास अर्थ जुळणार नाहीं असें वाटतें.

वृत्तानुरोधामुळें दुसरा चरण 'नक्षत्रा यन्ति अक्तुभिः' असा म्हटला पाहिजे.

---

३. भावार्थः– 'सूर्याचे किरण ह्याच त्याच्या पताका आहेत, कारण कीं जसा एकादा राजा येऊं लागला म्हणजे त्याच्या पताका त्याच्या अगोदर येतात तसे ते किरण पुढें येऊन सूर्य मागाहून येत आहे असें सूचवितात. हे किरण तेजस्वी अग्नीप्रमाणें लकलकीत असून अनेक लोकांस अनुक्रमानें दिसूं लागतात.' ही, सूर्यकिरण दिसूं लागतात त्याविषयीं स्वभावोक्ति आहे.

'पताका[भूत]' = 'केतवः.' म्हणजे किरणरूप पताका इतकेंच विवक्षित आहे.

'अनुक्रमानें अनेक लोकांच्या दृष्टीस पडतात' = 'वि अदृश्रम् जनान् अनु.' अक्षरशः अर्थ, 'जनांमध्यें विशेषेकरून पाहिले जातात.' 'अदृश्रम्' हें रूप फार चमत्कारिक आहे. तें 'अदृश्रन्.' असावें आणि शाखांतराच्या पाठांत आहेच असें सायणाचार्य सुद्धा म्हणतात. 'जनान् अनु' या शब्दांचें जें आम्हीं 'जनांमध्यें,' 'लोकांमध्यें' असा अर्थ समजून भाषांतर केलें आहे, त्याला पुष्कळ आधार आहे. ऋ. १. १२०. ११ यांत 'जनान् अनु' याचा अर्थ सायणाचार्यांनींच 'जनेषु'= जनांमध्यें' असा केला आहे; ऋ. ८. ९. २ यांत 'पञ्च मानुषान् अनु' याचा अर्थ 'पञ्च मानुषा यत्र वर्तन्ते तत्र लोके'=' जेथें पांच प्रकारचे लोक राहतात तेथें' असा केला

प्रत्यङ् देवानां विशः प्रत्यङ्ङुदेषि मानुषान् ।

प्रत्यङ्विश्वं स्वर्दृशे ॥ ५ ॥ ७ ॥

प्रत्यङ् । देवानाम् । विशः । प्रत्यङ् । उत् । एषि । मानुषान् ।

प्रत्यङ् । विश्वम् । स्वः । दृशे ॥ ५ ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

५. [हे सूर्य,] [त्वं] देवानां विशः प्रत्यङ् (=देवानां लोकान् प्रति गच्छन्=देवलोकानां संमुखं यथा तथा) [उदेषि], मानुषान् प्रत्यङ् (=मनुष्यान् प्रति गच्छन्=मनुष्याणां संमुखं यथा तथा) उदेषि, [तथा] विश्वं स्वः प्रत्यङ् (=सकलं स्वर्लोकं प्रति गच्छन्=सकलस्य स्वर्लोकस्य संमुखं यथा तथा) [उदेषि]। [किमर्थम्?]। दृशे (=द्रष्टुम्=यथा ते पश्यन्ति तथा) ॥

सूर्यः देवलोकानां संमुखं तथा मनुष्यलोकानां संमुखं तथैव सकलस्य स्वर्लोकस्य संमुखम् उदेति। तदुदयादनन्तरं च ते सर्वेपि दृष्टिविषयान् द्रष्टुं समर्था भवन्ति प्राप्त भवन्ति ॥ एतज्ज्ञात्वैव सूर्यस्तेषां तेषां संमुखमुदेतीति भावः ॥

---

आहे. शिवाय 'धन्वा अनु' (२. ३८. ७), 'वना अनु' (३. ५५. ४), आणि 'गोमतीः अनु' (५.६१.१९) या सर्व ठिकाणीं सायणांनीं सप्तमीनें अर्थ केला आहे तो पहा.–'अनेक' हें पद 'जनान् अनु' या अनेकवचनापासून गम्यमान आहे.

४. या मंत्रांत ऋषि म्हणतो कीं, 'हे सूर्या, तूं मोठा वाटसरू आहेस. आणि साधारण वाटसराप्रमाणें जेथें असशील तेथल्याच लोकांस दिसणारा आणि काळोख होतांच थांबणारा असा नव्हेस, तर सर्व लोकांच्या दृष्टीस एकदम पडणारा आणि जाशील तिकडेस उजेड पाडणारा असा वाटसरू आहेस. कारण कीं तूं सर्व आकाशभर प्रकाश पाडीत असतोस.'

सूर्याच्या गतीविषयीं आणि प्रकाशाविषयीं यांत सुंदर स्वभावोक्ति आहे. सूर्यासारिखा मोठा वाटसरू दुसरा कोणीहि मनुष्यांस ठाऊक नाहीं.

वृत्तसुखासाठीं या ऋचेंत 'सूर्य' असें आहे तेथें 'सूरिअ' असें म्हटलें पाहिजे.

५. [ देवलोकांस, मनुष्यांस आणि स्वर्लोकास ] दिसावें म्हणून [ हे सूर्या ], [ तूं ] देवलोकांसमोर, मनुष्यांसमोर [ आणि ] सर्व स्वर्लोकासमोर उगवत असतोस.

5. [Thou] risest opposite the celestial beings, opposite the men [ and ] opposite all the heaven, that they may see.

---

५. ऋषि म्हणतो, 'हे सूर्या, तूं उगवण्यापूर्वी कोणासहि कांहींच दिसत नाहीं, तर डोळ्यांनीं दिसावें म्हणून तूं देवलोकांसमोर, मनुष्यलोकांसमोर आणि स्वर्गलोकासमोर उगवत असतोस; केवळ आम्हां मनुष्यांसमोरच उगवतोस असें नाहीं.—म्हणजे वस्तुतः तूं उगवतोस तर एकाच ठिकाणीं, पण सर्वांस वाटतें कीं तूं त्यांच्या समोरच उगवला आहेस.'

' देवलोकांसमोर '=' प्रत्यङ् देवानां विशः.' आम्ही जसे मनुष्यलोक आहों तसे देवलोक म्हणजे द्युलोकांत राहणारे देवलोक आहेत असा कवीचा भावार्थ. याच समजुतीस अनुसरून पुष्कळ ठिकाणीं ' देवजनां 'विषयीं वेदांत निर्देश अथवा सांगितलेलें आढळतें. ( ऋ. ६. १६. ९ आणि ३. ३४. २ इत्यादि अनेक प्रमाणें आहेत.) आणि जसें आम्हांस सूर्यप्रकाशाचें कारण पडतें तसेंच द्युलोकांत राहणाऱ्यांस म्हणजे देवांसहि पडतें असा विचारतरंग कवीच्या मनांत घोळत होता.

' स्वर्लोकासमोर '=' प्रत्यङ् स्वः.' 'स्वः' म्हणजे स्वर्लोक अथवा स्वर्गलोक असा अर्थ होतो याविषयीं ऋ. १०. १०७. ८; १०. १२१. ५; १. १३१. ३ इत्यादि प्रमाणें आहेत. हा स्वर्लोक जो सांगितला तो द्युलोकापेक्षांहि उंच आहे असें इतरत्र सांगितलेलें आढळतें. आणि तो द्युलोकापेक्षां जसा अधिक उंच आहे तसाच अधिक तेजस्वी आहे असें सांगितलें आहे. यावरून या मंत्राचें तात्पर्य असें होतें कीं अगदी खालीं म्हणजे भूमीवर आम्ही मर्त्य, आम्हांवर द्युलोकांत राहणारे देवलोक, आणि त्यांच्याहि वर स्वर्लोकांत राहणारे दुसरे लोक अशा तीनहि प्रकारच्या लोकांस सूर्य उगवतांच असें वाटतें कीं सूर्य आपल्याच समोर उगवला आहे.

ॐ भूः, भुवः, स्वः असें जें आपण उच्चारीत असतों, त्यांत जो ' स्वः ' शब्द येतो तोच हा. मात्र ' भुवः ' ह्याचा पत्ता ऋग्वेदांत कोठें लागत नाहीं. ' भूः' आणि ' स्वः ' यांच्या मध्यें ' भुवः' आपण उच्चारितों त्यावरून ' भुवः' म्हणजे मधला जो ' द्युलोक ' तो असावा असें समजतात.

वृत्ताप्रमाणें मंत्र म्हणतां यावा म्हणून खालीं लिहिल्याप्रमाणें वाचला पाहिजे:—

प्रतिअङ् देवानां विशः ।
प्रत्यङ्ङुदेषि मानुषान् ।
प्रत्यङ् विश्वं सुअर्दृशे ॥

येना पावक चक्षसा भुरण्यन्तं जनाँ अनु ।
त्वं वरुण पश्यसि ॥ ६ ॥*

येन । पावक । चक्षसा । भुरण्यन्तम् । जनान् । अनु ।
त्वम् । वरुण । पश्यसि ॥ ६ ॥

---

भाषायाम्.

६. हे पावक (=शोधक) वरुण (=वरुणसदृश) [सूर्य], येन चक्षसा (=येन पूर्वमन्त्रोक्तेन तेजस्विना उदयेन) त्वं भुरण्यन्तं जनान् (=भुरण्यन्तं लोकं=शीघ्रं लोकं=स्वस्वकर्मप्रवृत्तये शीघ्रं गच्छन्तं लोकं=स्वस्वकर्मणि त्वदुदयादनन्तरमेव शीघ्रं प्रवर्तमानं लोकम्) अनु पश्यसि (=अनुक्रमेण पश्यसि) ॥

यथा यथा त्वमुदेषि तथा तथा लोकाः स्वस्वकर्मणि प्रवर्तन्ते त्वं च तान् सर्वान् अनुक्रमेण पश्यसीति भावः ॥

---

* हें सर्व सूक्त अनेक कारणांमुळें प्रसिद्ध आहे. मुल जन्मलें आणि तें वाईट नक्षत्रावर जन्मलें तर तें जणुं कोणाच्या तरी अपराधामुळें अथवा चुकीमुळें जन्मलें असें समजून 'दुष्टजननशान्ति' या नांवाचें कर्म करावें अशी समजूत आपल्या भटजींनीं करून दिली आहे. त्यामुळें अमुक नक्षत्रावर जन्मलें तर अमुक शांति करावी असें ठरून गेलें आहे. त्याप्रमाणें व्यतिपात असतां जन्मलें तर त्याची 'व्यतिपातशान्ति' म्हणून कांहीएक कर्म करण्याची चाल अर्वाचीन काळीं जी पडली आहे त्यांत हें सर्व सूक्त (म्हणजे उदुत्यं जातवेदसम् हे तेरा मंत्र) म्हणण्याचा प्रघात आहे. पण 'व्यतिपातशान्ति' करणें अवश्य आहे असें म्हटलें तरी व्यतिपाताची शान्ति हें सूक्त म्हटल्यानें कशी होईल याचा विचार आहे.

शिवाय अन्त्येष्टींत म्हणजे मनुष्य मेल्यानंतर जी क्रिया करितात त्यांत प्रथम दिवसीं पिंडदान देतांना "उदुत्यं जातवेदसम्" या प्रथम मंत्राचा उच्चार करून पिंड देत असतात.

६. आणि हे पावका, हे वरुण-[सदृश] [सूर्या], त्या [तुझ्या] लकलकीत उदयाच्या योगानें तूं कामांत गुंतलेल्या सकल जनांला अनुक्रमानें पहातोस.

6. And through that bright rising [of thine], O Pâvaka, O Varuṇa-[like] Sûrya, thou seest the active world in order.

---

६. पांचव्या मंत्रांत सांगितलें कीं सूर्य अनेक लोकांच्या समोर उगवतो. त्याच कल्पनासरणीला अनुसरून आतां म्हणतो कीं, 'हे सूर्या, वर सांगितल्याप्रमाणें तूं उगवून आपल्यापुढें पाहूं लागलास म्हणजे तूं उगवतांच आपापल्या कामीं लागण्यासाठीं इकडे तिकडेस धांवणारे जे लोक ते सगळे एकामागून एक तुझ्या दृष्टीस पडतात.'

'पावका.' पावक हें नांव आलीकडील संस्कृतांत अग्नीचें असल्याविषयीं तर सर्वांस ठाऊक आहेच. वेदांतहि बहुतकरून अग्नीलाच लाविलेलें आढळतें. सायणाचार्य बहुतकरून 'शुद्ध करणारा' असा अर्थ करितात. येथें लाविल्याप्रमाणें सूर्यासहि केव्हां केव्हां लाविलेलें आढळतें. अग्नि अथवा सूर्य प्रकाशण्यास लागण्याच्या पूर्वीं सगळ्या वस्तु ओंगळ दिसतात आणि त्यांचें लकलकीत तेज पडतांच स्वच्छ दिसूं लागतात म्हणून त्यांस 'स्वच्छ करणारा' हें नांव पडलें.

पण सूर्याला 'वरुण' असें येथें कां म्हटलें तें समजत नाहीं. सायणाचार्य तें विशेषण करून 'अनिष्टनिवारक' असा अर्थ धात्वर्थास अनुसरून करितात. 'वरुण' असें सूर्याला या ठिकाणीं कां म्हटलें तें बराबर समजत नसल्यामुळें कितीएक विद्वान् हा मंत्र सूर्यदेवतेविषयीं नसून वरुणाविषयीं आहे असें समजतात. परंतु ह्या मंत्राचा संबंध मागच्या पुढच्या मंत्रांशीं चांगला जुळत असून सर्व सूक्त सूर्याविषयीं आहे यांत संशय नाहीं.

'आणि......त्या तुझ्या लकलकीत उदयाच्या योगानें'='येन चक्षसा.' अक्षरशः अर्थ 'ज्या पाहण्यानें.' 'जें पाहणें' म्हणजे पूर्व मंत्रांत सूर्य उगवतो म्हणून सांगितलें, तर उदयरूप जें जगाकडेस पाहणें किंवा दृष्टि घालणें तें.

'कामांत गुंतलेल्या सकल जनांला'='भुरण्यन्तं जनान्.' या ठिकाणीं 'जनान्' हें 'लोकम्' याऐवजीं आहे असें समजून निर्वाह करणें आहे. 'भुरण्यन्तम्' हा शब्द जरा कठिण आहे. सायणाचार्य 'जनान् भुरण्यन्तम् [इमं लोकम्]'='जनांला धारण करणाऱ्या या लोकास' असें करून निर्वाह करितात. आमच्या अर्थास ऋ. १०. २९. १ आणि २. ३८. ८ यांतील 'भुरण्यु' शब्दावर जें सायणभाष्य आहे त्याच्या भावार्थाचा आ-

**वि द्यामेषि रज॑स्पृथ्वहा मिमा॑नो अक्तुभिः ।**
**पश्य॒न् जन्मा॑नि सूर्य ॥ ७ ॥**

वि । द्याम् । एषि । रजः॑ । पृथु । अहा॑ । मिमा॑नः । अक्तुऽभिः ।
पश्य॑न् । जन्मा॑नि । सूर्य ॥ ७ ॥

**स॒प्त त्वा॑ ह॒रितो॒ रथे॒ वह॑न्ति देव सूर्य ।**
**शोचिष्के॑शं विचक्षण ॥ ८ ॥**

स॒प्त । त्वा॒ । ह॒रितः॑ । रथे॑ । वह॑न्ति । दे॒व । सू॒र्य॒ ।
शो॒चिःऽके॑शम् । वि॒ऽच॒क्ष॒ण ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

७. हे सूर्य, त्वं द्यां (=द्युलोकं=द्युलोकमध्ये) वि एषि (=विविधं गच्छसि) [तथा] पृथु रजः (=अन्तरिक्षावकाशस्य विस्तीर्णं प्रदेशं=विस्तीर्णस्य अन्तरिक्षस्य मध्ये) [वि एषि] (=विविधं गच्छसि) [स च] अक्तुभिः (=रात्रिसमयेषु=रात्रिस्थाने) अहा (=अहानि) मिमानः (=निर्ममन्) [तथा च] जन्मानि (=सकलानि प्राणिजातानि) पश्यन् (=अवलोकयन्) [वि गच्छसि] ॥

८. हे देव (=द्योतमान) विचक्षण (=विद्वन्ः) सूर्य, शोचिष्केशं (=तेजांस्येव यस्मिन्केशा दृश्यन्ते तादृशं) त्वा (=त्वां) रथे (=रथे स्थितं) सप्त हरितः (=हरिद्वर्णा अश्वा) वहन्ति ॥

---

धार आहे. 'भुरण्य्' धातूचा अर्थ 'जाणें' असा सायणाचार्य पुष्कळ ठिकाणीं करितात. त्यावरून 'चपल असणें' अथवा 'कामांत गुंतणें' हा अर्थ साहजिक दिसतो.

वृत्तनियमांसाठीं या श्लोकांत 'येन' बद्दल 'येना' असें झालें आहे तें ध्यानांत ठेवावें, आणि शेवटचा चरण 'त्वं वरुण पश्यसि' असा उच्चारला पाहिजे.

७. हे सूर्या, [तूं] द्युलोकामधून [आणि] विस्तीर्ण अंतरिक्षामधून चालतोस, आणि जातां जातां रात्रीच्या ठायीं दिवस निर्माण करितोस, आणि [मार्गी] [अनेक] प्राणी पाहात असतोस.

८. हे देवा, हे सर्वतोदर्शी सूर्या, दीप्तिकेशाला तुला सात पिवळे घोडे रथांत वाहून नेत असतात.

7. [ Thou ] wanderest through heaven [ and through ] the broad firmament, making days at nights, [ and ] O Sûrya, observing [ different ] creatures.

8. Seven tawny horses, O divine [ and ] far-seeing Sûrya, carry in thy car thee [who art ] ray-haired.

---

७. ' हे सूर्या, तूं उगवून महाविस्तीर्ण अंतरिक्ष प्रदेशांतून सर्वत्र चालत चालत द्युलोकामध्यें सर्वत्र जात असतोस. आणि जातां जातां मार्गी तूं रात्र असेल ती काढून टाकून दिवस निर्माण करितोस, आणि तुला येतां येतां मार्गी अनेक प्राणी दृष्टीस पडतात ' असा भावार्थ.

' द्युलोकामधून ...... चालतोस '= ' वि द्याम् एषि.' म्हणजे द्युलोकाच्या एकाच कोपऱ्याला तूं जातोस असें नाहीं. तुझें तेज द्युलोकांत जिकडेतिकडे पसरतें त्यामुळें तूं द्युलोकांत जिकडेतिकडे फिरतोस असा भास होतो. हा जो 'वि एषि' याचा आम्हीं येथें अर्थ केला त्याविषयीं ऋ. १०. ५. ३ याजवरील सायणभाष्य पहा.

' [जातां जातां] रात्रीच्या ठायीं दिवस निर्माण करितोस'= 'अहा मिमानो अक्तुभिः.' अक्षरशः अर्थ, ' रात्रीं दिवस निर्माण करीत [करीत].' म्हणजे सूर्य कोठें झाला तरी जाण्यापूर्वी रात्र असते, तेथें तो आला म्हणजे रात्र काढून टाकून त्याऐवजीं दिवस होई असें करितो. सूक्त ६ मं. ३ पहा. आणि सू. ३५ मं. २ याचें भाषांतर व त्यावरील टीप पहा. प्रस्तुत मंत्रांत सांगितलेली सूर्याविषयींची स्वभावोक्ति सुंदर आहे.'

वृत्तानुरोधासाठीं मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें म्हणावा:—

विद्यामेषि रजस्पृथु ।
अहा मिमानो अक्तुभिः ।
पश्यन् जन्मानि सूरिअ ॥

८. यांत इतकेंच सांगितलें आहे कीं, ' सूर्य रथांत बसून जातो आणि त्याच्या रथास सात पिवळे घोडे ओढीत असतात.'

' सर्वतोदर्शी '=' विचक्षण.' अक्षरशः अर्थ, ' पुष्कळ ठिकाणीं पाहणारा,' ' ज्याची दृष्टि दूर पोंहचते तो.' ( ऋ.

अयुक्त सप्त शुन्ध्युवः सूरो रथस्य नप्त्यः ।
ताभिर्याति स्वयुक्तिभिः ॥ ९ ॥
अयुक्त । सप्त । शुन्ध्युवः । सूरः । रथस्य । नप्त्यः ।
ताभिः । याति । स्वयुक्तिऽभिः ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. [ पश्य पश्य ] सूरः (=सूर्यो ) रथस्य नप्त्यः ( =रथस्य नप्त्रीः=रथस्य कन्यकाः=रथस्य कन्यकास्थानीयाः ) सप्त शुन्ध्युवः ( =शुन्ध्यूः=शुद्धाः=दोषरहिता ) [ अश्वा ] अयुक्त ( =स्वरथे योजितवान् ) । [ स ] ताभिः स्वयुक्तिभिः ( =स्वयमेव युज्यमानाभिः ) [ अश्वाभिः ] याति ( =गच्छति ) ॥

१०. ३७. ८ याजवरील सायणभाष्य पाहा.) याच अर्थावरून ' विचक्षण ' शब्दाचा आलीकडील आमचा (' शाहणा ' हा ) अर्थ निघाला आहे; कारण कीं ज्याची दृष्टि पुष्कळ ठिकाणीं पोंहचते त्यालाच लोक शाहणा म्हणतात.

' दीप्तिकेशाला '=' शोचिष्केशम्.' म्हणजे ज्याला मनुष्याच्या केशांसारिखे व साधारण केश नसतात, तर किरण आणि किरणांनीं भरलेल्या कांतिच ज्याचे केश होत तसा. हें विशेषण किती स्वभावोक्तिपूर्ण आहे पहा ! वेदांत वस्तूंचें वगैरे जें वर्णन किंवा निरूपण येतें तें त्या वेळच्या ऋषींस म्हणजे कवींस वस्तूंचें वगैरे स्वरूप जसें स्वभावतः भासलें तसेंच येत असतें, आणि कृतक काव्यांत उगीच कल्पित आढळतें तसें नसल्यामुळें फार सुंदर दिसतें. कवितेंत हें एक मोठें सौंदर्य आहे कीं, कवीच्या मनांत जें असेल तेंच हुबेहुब त्याच्या वाणीनें चित्रित व्हावें. नाहीं तर आमचे आलीकडीलहि कवि आहेत, त्यांणीं मोर अथवा हंस अथवा सिंह अथवा कमळ कधीं जन्मांत पाहिलें नसतांहि, त्यांच्या कवितेंत पाऊस येतांच मोर नाचतच असतात, हंस मानससरोवराकडे धांव घेत असतात, सिंहाचा बच्चा मोठ्याहि हत्तीला आपल्या किंकाळीनेंच मारून टाकीत असतो, आणि पादकमळांचा आणि हस्तकमळांचा तर पदोपदीं सुकाळ !

या ऋचेंत सुद्धा वृत्तासाठीं ' सूरिअ ' असा उच्चार केला पाहिजे.

९. सूर्य [ आपल्या रथाला ] रथाच्या कन्यका [ ज्या ] निर्मळ सात [घोड्या त्या ] जोडितो आहे [पहा]. [ आणि ] आपल्या आपणच जोडल्या जाणाऱ्या [ज्या त्या घोड्या ] त्यांच्या योगानें तो जात आहे.

9. There Sûrya harnesses the seven pure ones, the daughters of the car. [ He ] goes by means of those self-harnessed mares.

---

९. ' सूर्य देव आपल्या रथास सात घोडेच जोडितो असें नाहीं, तर हा पहा, तो सात घोड्याहि जोडीत आहे. त्या रथास जोडल्या म्हणजे रथाच्या मुलीच जणुं शोभतात. त्या रंगानें निर्मळ आहेत आणि त्यांला रथास जोडण्याचे श्रम घेण्याचीहि आवश्यकता नाहीं, कारण कीं त्या आपल्या आपणच रथास जोडल्या जातात,' असें तात्पर्य. ऋषि पूर्वेकडे पाहत पाहत उभा राहिला असतां त्याला सूर्य उगवूं लागत आहे असें दिसल्यावरून त्याणें हा मंत्र म्हटला अशी कल्पना केली पाहिजे.

' रथाच्या कन्यका '='रथस्य नप्त्यः'. हें नांव किंचित् चमत्कारिक दिसतें. परंतु जशा लहान लहान मुली आपल्या प्रौढ बापाची सेवा करण्यांत तत्पर असतात तशा या घोड्या रथाची सेवा करण्यांत म्हणजे काळजीनें तो ओढण्यांत वगैरे तत्पर दिसतात म्हणून त्यांस तें नांव दिलें आहे. याप्रमाणेंच सोम काढण्याच्या आणि तो अर्पण करण्याच्या वगैरे कामीं यजमानाच्या हाताचीं बोटें पडतात म्हणून त्यांसहि ' यजमानाच्या कन्यका ' असें ऋ. ९. १४. ५ यांत म्हटलें आहे तें पाहा.

' निर्मळ '='शुन्ध्युवः' म्हणजे रंगानें व कांतीनें ' शुद्ध, ' ' दोषरहित.' ऋ. १०. ४३. १ आणि ७. ८८. १ यांजवरील सायणभाष्य पाहा.

' आपल्या आपणच जोडल्या जाणाऱ्या '=' स्वयुक्तिभिः.' देवांच्या रथास जे घोडे वगैरे असतात त्यांस रथाला दुसऱ्यानें जोडावें लागत नाहीं,' ते आपणच आपणास रथाला जोडून घेतात असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. ' स्वयुक्ति' शब्दाचाहि हाच अर्थ होतो याविषयीं ऋ. १. ११९. ४ ही ऋचा आणि तिजवरील सायणभाष्य पहा.

घोडे असोत, अथवा घोड्या असोत, पण सूर्याच्या रथाला सात कां ? आठवड्याच्या सात वारांस अनुलक्षून ? किंवा सात मूळ रंगांस अनुलक्षून ?

उद्वयं तमसस्परि ज्योतिष्पश्यन्त उत्तरम् ।
देवं देवत्रा सूर्यमगन्म ज्योतिरुत्तमम् ॥ १० ॥

उत् । वयम् । तमसः । परि । ज्योतिः । पश्यन्तः । उत्ऽतरम् ।
देवम् । देवऽत्रा । सूर्यम् । अगन्म । ज्योतिः । उत्ऽतमम् ॥ १० ॥

उद्यन्नद्य मित्रमह आरोहन्नुत्तरां दिवम् ।
हृद्रोगं मम सूर्य हरिमाणं च नाशय ॥ ११ ॥

उत्ऽयन् । अद्य । मित्रऽमहः । आऽरोहन् । उत्ऽतराम् । दिवम् ।
हृत्ऽरोगम् । मम । सूर्य । हरिमाणम् । च । नाशय ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

१०. [पश्य पश्य] वयं तमसः परि (=तमस उपरि) उत्तरम् (=उत्कृष्टतरं) ज्योतिः उत्पश्यन्तः (=ज्योतिः कदायातीत्यपेक्षया उत्पश्यमाणः पश्यन्तः) [सन्तः] देवत्रा देवं (=देवेषु मध्ये देवं) सूर्यं (=सूर्यरूपम्) उत्तमं (=श्रेष्ठतमं) ज्योतिः (=तेजः) अगन्म (=प्राप्ताः स्मः) ॥

अत्रेदमुक्तं भवति । तमसः सकाशाद् उपरिवर्तमानं तमसोपेक्षया उत्कृष्टतरं सूर्यरूपं ज्योतिः कदा न्वायास्यतीति वयम् उत्पश्यमाण उत्पश्यन्तः सन्तः देवाधिदेवसूर्यरूपम् उत्तमम् (उत्कृष्टतरं) ज्योतिः सहसा प्राप्ताः स्म इति ॥

११. हे मित्रमहः (=अनुकूलदीप्तियुक्त) सूर्य, अद्य [त्वम्] उद्यन् (=उदयं गच्छन्=यथा उदयं गच्छसि तथा) [अपि च] उत्तरां दिवम् (=उन्नततरं द्युलोकम्) आरोहन् (=उत्कर्षेण प्राप्नुवन्=उत्कर्षेण यथा प्राप्नोषि तथा) मम हृद्रोगं (=हृदयगतम् आन्तरं रोगं) हरिमाणं (=शरीरगतकान्तिहरणशीलं बाह्यं रोगं) च नाशय ॥

---

वृत्तसुखासाठीं या ऋचेचा दुसरा चरण खालीं दाखविल्याप्रमाणें म्हणावाः—

सूरो रथस्य नप्त्रिअः ।

१०. [हे पाहा] आम्ही अंधःकाराच्या वर श्रेष्ठ तेजाकरितां पाहत असतां सकळ देवांमध्यें देव [जो] सूर्य [तद्रूप] परमश्रेष्ठ तेजाप्रत पावलों.

११. हे अनुकूळतेजा सूर्या, [तूं] आज उगवून [आणि] परम उंच द्युलोकावर चढून माझा हृदयरोग आणि शरीरास फिकट करणारा बाह्यरोग नाहींसा कर.

10. Lo! looking up for light higher than the darkness, we have obtained Sûrya, the God among the Gods, the highest light.

11. Rising to-day, O Sûrya of beneficent light, [and-] mounting the highest heaven, destroy my disease of the heart and the pallid disease.

---

१०. सर्व भुवनभर अजून अंधार पडलेलाच होता इतकी रात्र असतां ऋषि पूर्वेकडे सूर्योदयाची प्रतीक्षा करीत करीत उभा राहिला आहे आणि अंधकाराच्या डोकीवर येऊन उभें राहणारें जें सूर्यरूप तेज तें केव्हां येईल, केव्हां येईल अशी वाट पाहत राहिला आहे, इतक्यांत देवाधिदेव जो सूर्य तद्रूप परमश्रेष्ठ तेज एकाएकीं आविर्भूत झालें तें हें पहा, असें ऋषीचें विवक्षित आहे.

सूर्याच्या उदयाविषयीं यांत ऋषीचें मोठें औत्सुक्य आणि मोठी मार्गप्रतीक्षा उघड दिसून येते. ती दृढतर भक्तीच्या मनुष्याच्या मनांत फार बिंबेल यांत संशय नाहीं.

यांत सुद्धा 'सूरिअम्' असें तिसऱ्या चरणांत वृत्तासाठीं म्हटलें पाहिजे. बाकी ऋचा अनुष्टुपाप्रमाणें वाचतां येते.

११. तेजःपुंज सूर्य उगवत आहे असें पाहून ऋषि म्हणतो, 'हे सूर्या, तुझें हें जें प्रचंड तेज प्रगट होत आहे तें लोकांस त्रास देण्यासाठीं नव्हे, तर मित्राप्रमाणें सुख देणारें होय. यास्तव तूं आज जसजसा उगवशील तसतसा आणि उगवून फार उंच आकाशांत जसजसा चढशील तसतसा माझ्या आंगांतील मनोव्याधि आणि शरीरव्याधि हे नाहींसे करून टाक.'

'अनुकूलतेजा' = 'मित्रमहः'. सू. ४४ मं. १२ याजवरील टीप पाहा. या विशेषणावरून असें सुचतें कीं आम्ही 'मरकी (पटकी) माता' आम्हांस मारून टाकिते म्हणून, 'शितळाई' ही देवीची साथ आणिते म्हणून, आणि नागोबा डसून एका तासांत जीव घेतात म्हणून जशी या देवतांची उपासना करितों, तसे आपले आर्यपूर्वज सूर्य हा भाजतो म्हणून देव होय, अग्नि जाळतो म्हणून देव होय, अथवा इंद्र विजा पाडून मारितो म्हणून देव होय असें समजत नसत;

शुकेषु मे हरिमाणं रोपणाकासु दध्मसि ।
अथो हारिद्रवेषु मे हरिमाणं नि दध्मसि ॥ १२ ॥
शुकेषु । मे । हरिमाणम् । रोपणाकासु । दध्मसि ।
अथो इति । हारिद्रवेषु । मे । हरिमाणम् । नि । दध्मसि ॥ १२ ॥
उदगादयमादित्यो विश्वेन सहसा सह ।
द्विषन्तं मह्यं रन्धयन्मो अहं द्विषते रधम् ॥ १३ ॥ ८ ॥ ९ ॥
उत् । अगात् । अयम् । आदित्यः । विश्वेन । सहसा । सह ।
द्विषन्तम् । मह्यम् । रन्धयन् । मो इति । अहम् । द्विषते । रधम् ।
॥ १३ ॥ ८ ॥ ९ ॥

## भाषायाम्.

१२. वयं मे (=मम=अस्माकं) हरिमाणं (=शरीरगतं हरिद्वर्णविशिष्टं रोगं) शुकेषु (=हरिद्वर्णविशिष्टेषु एतत्संज्ञेषु पक्षिषु) [तथा] रोपणाकासु (=हरिद्वर्णविशिष्टासु एतत्संज्ञिकासु पक्षिणीषु) दध्मसि (=दध्मः=स्थापयामः), अथो (=अपि च) मे (=मम=अस्माकं) हरिमाणं (=हरिद्वर्णविशिष्टं रोगं) हारिद्रवेषु (=हारिद्वर्णविशिष्टेषु एतत्संज्ञिकेषु वृक्षेषु) निदध्मसि (=निदध्मः=स्थापयामः) ॥

शरीररोगादिहरिद्वर्णः हरिद्वर्णपक्षिषु हरिद्वर्णवृक्षेषु चैवास्तां मास्मान् प्राप्नोत्वित्यर्थः॥

१३. अयं (=पुरोवर्ती) आदित्यः (=अदितेः पुत्रः सूर्यः), द्विषन्तं (=द्वेष्टारं शत्रुं) मह्यं रन्धयन् (=मम वशं प्रापयन्), विश्वेन सहसा सह (=सकलेन बलेन सह) उदगात् (=उदितवान्)। मो (=मोत=अपि च मा) अहं द्विषते रधं (=शत्रोर्वशं प्राप्नुयाम्) ॥

अत्रेदमुक्तम्। अयमादित्य उदितवान् पश्य, उग्रश्च मम शत्रुं मम वशम् आनयत्। अहं मम शत्रोर्वशं मा गच्छेयम् ॥

तर ह्या देवांचे जे मर्त्य जनांवर उपकार करण्याचे गुण तेच त्यांच्या लक्षांत वागत असत. ह्याला वेदांत दुसरीं प्रमाणें जिकडे तिकडे आढळतील.

'शरीरास फिकट करणारा बाह्य रोग' =' हरिमाणं.' या शब्दावरून साधारण कोणताहि शरीररोग समजावयाचा किंवा शरीराचा रोगविशेष समजावयाचा तें निश्चयानें सांगवत नाहीं. परंतु हृदयरोग याच्या साहचर्यावरून पाहातां शरीरसंबन्धि कोणताहि साधारणरोग असेल असें वाटतें.

या ऋचेंतहि वृत्तानुसारानें 'सूरिअं' असें वाचलें पाहिजे.

१२. आमचा शरीर फिकट करणारा रोग, [ आम्ही ] शुक [पक्षी] आणि शारिका [पक्षिणी] यांच्या ठायीं ठेवितों, आणि आमचा शरीर फिकट करणारा रोग हारिद्रव [वृक्षां]च्या ठायीं ठेवितों.

12. In parrots [and] in thrushes we put our pallid disease; and in Hâridrava trees we put our pallid disease.

१३. हा [पहा] आदित्य आपल्या सकळ शक्तीनिशीं उगवला आहे आणि त्याणें शत्रूस माझ्या हस्तगत केलें आहे. [आणि] मी शत्रूच्या हस्तगत होईं असें कधींहि न होओ.

13. Here has the Âditya risen with all [ his ] might, subjecting the enemy to me. [And] may I never be subject to the enemy.

---

१२. पूर्वील मंत्रांत शरीर फिकट करणाऱ्या रोगापासून आमची मुक्ति कर अशी सूर्याला प्रार्थना केली, त्याच मनोवृत्तीला अनुसरून म्हणतो कीं, 'शरीर फिकट करणारा जो रोग तो आम्हांपासून निघून जाऊन फिकट रंगाचे जे पक्षी आणि वृक्ष त्यांच्या आंगीं राहो, आम्हांकडेस न येओ.'

'आमचा '=' मे.' वृत्तसुखासाठीं पुरुषव्यत्यय या ऋचेंत झाला आहे हें ध्यानांत ठेवावें.

'शुकपक्षी'='शुकेषु.' 'शारिका पक्षिणी '=' रोपणाका.' हे अर्थ आम्ही सायणांस अनुसरून केले आहेत. आलीकडील संस्कृतांत 'शुक' म्हणजे 'राघु' असें समजतात. पण 'हरिमा' म्हणजे कोणता रोगविशेष हें जसें निश्चयानें सांगवत नाहीं, तसें हे कोणते पक्षी हेंहि निश्चयानें सांगवत नाहीं; मात्र ते हरिद्वर्णाचे म्हणजे किंचित् पिवळे अथवा फिकट असावे असें सांगतां येतें.

हा मंत्र अनुष्टुप् छंदाप्रमाणें सरळ वाचतां येतो.

१३. ह्या ऋचेंत सर्व सूक्ताचा उपसंहार आहे. इतर उपसंहाराप्रमाणें यांतहि सूक्ताच्या देवतेनें कोणता प्रसाद दिला आहे आणि पुढें कोणता व्हावा अशी प्रार्थना आहे तें सांगितलें आहे. कारण कीं ऋषि म्हणतो, 'सूर्य उगवून त्याणें माझे शत्रु माझ्या हस्तगत केले. ही मजवर त्याची कृपा झाली. तर आतां अशी प्रार्थना आहे कीं मी कधींहि शत्रूच्या हस्तगत न व्हावें.'

'आदित्य.' 'आदित्य' शब्दाचा अर्थ

## सूक्तम् ५१.

अङ्गिरसः पुत्रः सव्य ऋषिः। इन्द्रो देवता। आद्यत्रयोदशानां जगती च्छन्दः। शिष्टयोस्त्रिष्टुप् छन्दः।

**अभि त्यं मेषं पुरुहूतमृग्मियमिन्द्रं गीर्भिर्मदता वस्वो अर्णवम्।**
**यस्य द्यावो न विचरन्ति मानुषा भुजे मंहिष्ठमभि विप्रमर्चत ॥१॥**

अभि। त्यम्। मेषम्। पुरुऽहूतम्। ऋग्मियम्। इन्द्रम्। गीःऽभिः। मदत। वस्वः। अर्णवम्।
यस्य। द्यावः। न। विऽचरन्ति। मानुषा। भुजे। मंहिष्ठम्। अभि। विप्रम्। अर्चत ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. त्यं मेषं (=तं मेषं=पुरा किल इन्द्रः कस्मिंश्चित्प्रसङ्गे मेषोभूदिति यद्वदन्ति तं) पुरुहूतं (=बहुभिराहूतम्) ऋग्मियं (=स्तोत्राहं) वस्वो अर्णवं (=वसुनः अर्णवं=धनस्य सागरम्) इन्द्रम् गीर्भिः (=स्तुतिभिः) अभिमदत (=आभिमुख्येन हर्षं प्रापयत=तं प्रति गत्वेव तं हर्षयत) यस्य [इन्द्रस्य] मानुषा (=मानुषाणि=मनुष्याणां हितानि कर्माणि), द्यावो न (=सूर्यरश्मय इव), विचरन्ति (=विविधं चरन्ति=सर्वत्र प्रवर्तन्ते) [तं] मंहिष्ठं (=दातृतमं) विप्रं (=मेधाविनम्) [इन्द्रं] भुजे (=भोगाय=भोग्यवस्तुलाभाय) अभ्यर्चत (=आभिमुख्येन पूजयत)॥

त्यं मेषमित्यत्र इन्द्रः किल मेषो भूत्वा काण्वस्य मेधातिथेः सोमरसं पपाविति ब्राह्मणेषु प्रसिद्धा काचिदाख्यायिकोद्दिष्टा भवतीत्यवधेयम्॥

'सूर्य' असा होतो हें प्रसिद्धच आहे आणि तोच अर्थ येथें आहे. परंतु विशेष इतकें आहे कीं वेदांत आदित्य म्हणजे केवळ सूर्यच नव्हे. तर 'पूषा,' 'भग,' 'मित्र,' 'वरुण' हे आणि इतर कितीएक देवहि 'आदित्य' होत. सूर्य हा सकल आदित्यांपैकीं एक आदित्य आहे.

- 'माझ्या हस्तगत केलें आहे'=' मह्यम् अरन्धयन्.' 'रन्ध्' धातूचा अर्थ वश करणें, स्वाधीन करून देणें, हस्तगत करून देणें असा यास्कांनीं केला आहे. आणि 'रन्ध्' हें 'वश होणें,' 'हस्तगत होणें' या अर्थी वेदांत प्रसिद्ध आहे. ऋ. १०.४९. ४ आणि १०. १२८. ५ या मंत्रांवरील सायणभाष्य पाहा. आणखीहि प्रमाणें पुष्कळ आहेत. प्रस्तुत ऋचेंत 'रन्धयन्' याचा अर्थ 'उपद्रव करणें' असा ते कां करितात तें कळत नाहीं.

यांत सांगितलेला शत्रु कोण आणि त्याला सूर्यानें ऋषीच्या हस्तगत कसें केलें तें निश्चयानें सांगवत नाहीं. कदाचित् अंधकाररूप शत्रु असेल काय?

## सूक्त ५१.

ऋषि–अंगिरा ऋषीचा पुत्र सव्यनामक. देवता–इंद्र. वृत्त–१ पासून १३, जगती; आणि १४ व १५ यांचें त्रिष्टुभ्.

१. जो मेष[रूपी] [होय], ज्याला पुष्कळ लोक बोलावितात, जो स्तवनयोग्य, जो कल्याणाचा सागर, त्या प्रसिद्ध इंद्राला स्तोत्रांच्या योगानें आनंदित करा; ज्याचीं मनुष्यहितावह कर्त्यें सूर्यकिरणांप्रमाणें जिकडे तिकडे पसरतात, त्या परम उदार, [ आणि ] बुद्धिमान् [इंद्रा]ला भोगांसाठीं प्रार्था.

## Hymn 51.

To *Indra.* By *Savya,* son of *Angiras.* Metre, 1-13 *Jagatî* and 14, 15 *Trishṭubh.*

1. Gratify with praises Indra who, as they say, once became a ram, who is invoked by many, who is praiseworthy [ and ] who is the ocean of good. [ He ] whose acts, beneficial to mankind, pervade [all] like [ the sun's ] rays,—glorify [that] wise [and] liberalest [ Indra ] that he may give [us] enjoyments.

'आणि मी शत्रूच्या हस्तगत होईं असें कधींहि न होओ'='मो अहं द्विषते रधम्.' यांत केलेली प्रार्थना प्राचीन वीर्यसंपन्न आणि स्वातंत्र्यप्रिय आर्यजनांच्या दासत्वप्रिय आणि आत्मद्रोही मत्सरसंपन्न अर्वाचीन वंशजांनीं विशेषेंकरून ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. कारण कीं हल्लींचे आर्यजन आपल्या पोटांत कांहीं पडेल अशी थोडी आशा असली तर तितक्याच लाभासाठीं सर्व देश शत्रूच्या हातांत जाऊं देण्यास पुष्कळ वेळ तयार झालेले आम्हांस ठाऊकच आहेत.

या ऋचेंत प्रथमार्धाच्या द्वितीयचरणांत ' विश्वेनें ' असें म्हणावें, आणि उत्तरार्धांतील पहिला म्हणजे तृतीय चरण किंचित् खडबडीत लागल्यासारिखा वाटतो तो खालीं लिहिल्याप्रमाणें वाचला तर सरळ होईल,

द्विषन्तं मह्यं रन्धयन् ।

१. हें सूक्त आणि यापुढचीं सहा सूक्तें अंगिरा ऋषीच्या कुळांतील सव्य ऋषीचीं आहेत, आणि तीं सर्व इंद्राविषयींचींच आहेत.

या पहिल्या मंत्रांत ऋषि म्हणतो कीं, ' मेधातिथिनांवाच्या ऋषीचा सोम पिण्यासाठीं पूर्वीं एका काळीं इंद्र मेष म्हणजे मेंढा होऊन आला अशी प्रसिद्धि आहे; तर असा जो इंद्र, कीं ज्याला पुष्कळ लोक आह्वान करून भजतात, आणि ज्याच्या स्तुति गाण्यास योग्य होत, आणि जो कल्याणाचा तर केवळ सागरच आहे, त्याला स्तोत्रें गाऊन प्रसन्न करा. आणि जो इंद्र मनुष्यांच्या हितासाठीं इतकीं

अभीमवन्वन्त्स्वभिष्टिमूतयोऽन्तरिक्षप्रां तविषीभिरावृतम् ।
इन्द्रं दक्षास ऋभवो मदच्युतं शतक्रतुं जवनी सूनृतारुहत् ॥२॥

अभि । ईम् । अवन्वन् । सुऽअभिष्टिम् । ऊतयः । अन्तरिक्षऽप्राम् । तविषीभिः । आऽवृतम् ।
इन्द्रम् । दक्षासः । ऋभवः । मदऽच्युतम् । शतऽक्रतुम् । जवनी । सूनृता । आ । अरुहत् ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. स्वभिष्टिम् (=अभिलषितस्य शोभनं दातारम्) अन्तरिक्षप्रां (=द्युलोकं स्वतेजसा पूरयितारं) तविषीभिः आवृतं (=बलैरावृतं=महाबलम्) ईम् (=एनम्) [इन्द्रमेव] ऊतयः (=सहायभूता मरुतः) अभ्यवन्वन् (=आभिमुख्येन अकामयन्त=अभजन्त)। मदच्युतं (=शत्रूणां मदं गर्वं हर्षं वा च्यावयितारं=वीर्यसंपन्नम्) इन्द्रम् [एव] दक्षासः (=बलिनः) ऋभवो (=मेधाविनो) [मरुतः] [अभ्यवन्वन्=अभजन्त]। शतक्रतुं (=शतप्रज्ञम्) [इन्द्रमेव] जवनी (=चोदयित्री=वृत्रवधं प्रति प्रेरयित्री) सूनृता (=मरुद्भिः प्रयुक्ता प्रिया वाग्) आरुहत् (=आरूढवती=प्राप्ता)॥

बलवन्तः प्रज्ञावन्तो मरुत एव स्वयम् इन्द्रस्य प्रियाः सहाया भूत्वा वृत्रहनने तं प्रोत्साहितवन्त इतीन्द्रस्य महिमेति भावः ॥८

कृत्यें करीत असतो कीं, तीं. सूर्याच्या किरणांप्रमाणें सर्वत्र जिकडे तिकडे पसरलेलीं आहेत, आणि जो इंद्र प्रज्ञायुक्त आणि परम उदार होय त्याजप्रत तुम्ही स्तोत्रें गाऊन त्याला भजा, कीं जेणेंकरून तो आम्हांस उपभोग घेण्याच्या वस्तु देईल.' याप्रमाणें सव्य ऋषि त्याच्याबरोबर इंद्राची सेवा करण्यांत गुंतलेल्या मनुष्यांस म्हणतो आहे, आणि ते मनुष्य बहुतकरून अंगिरा ऋषीच्या कुळांतीलच होत असें समजलें पाहिजे.

" 'जो मेषरूपी होय' = 'त्यं मेषम्'. अक्षरशः अर्थ, 'तो जो मेष त्याला' म्हणजे जो मेष झाला अशी प्रसिद्धि आहे त्याला. सायणाचार्य म्हणतात, "कण्वकुलो-" त्पन्न मेधातिथीचा सोमरस प्यावयाला "इंद्र मेंढ्याचें रूप घेऊन गेला, आणि "प्याला, त्यावरून इंद्राला अजून मेष "असें म्हणतात." यासारिख्या कोणत्या तरी एकाद्या कथेला उद्देशून 'त्यं मेषम्' हे शब्द या मंत्रांत घातले आहेत असें आम्हांलाहि वाटतें. ऋ. ८. २.४० यांत इंद्राला असें म्हटलें आहे कीं, 'इत्था धीवन्तमद्रिवः काण्वं मेध्यातिथिं मेषो भूतोभि यन्नयः' = 'हे वज्रधारी इंद्रा, खरा भक्तिमान् जो कण्वकुळांतील मेध्यातिथि, त्याजप्रत तूं मेष होऊन आलास.' तथापि ५२ व्या सूक्ताच्या पहिल्या मंत्रावरील टीप पहा.

'कल्याणाचा सागर'='अर्णवो वस्वः'.

२. साहाय्यकारी [जे मरुत् ते] या महाफलदात्या [आणि] आकाश भरून टाकणाऱ्या [आणि] सर्वशक्तियुक्त [इंद्रालाच] भजले, चतुर [आणि] बुद्धिमान् [मरुत्] शत्रुजित् [इंद्रालाच] [भजले]. [त्यांची] उत्साहकारक वाणी शतप्रज्ञ [इंद्रा]कडेसच पोंहचली.

2. It was this [Indra] the great granter of wishes, the pervader of heaven, surrounded by powers, that [his] allies [the Maruts] loved; it was brave Indra that the mighty [and] wise [Maruts] [loved]: it was [Indra] of hundred wisdoms that [their] encouraging voice reached.

'वसु' म्हणजे केवळ दृष्टिगोचर धनच नव्हे, तर जें बरें, वाईट नव्हे, जें कल्याणरूप होय, त्या सर्वांचा त्यांत समावेश होतो असें पूर्वी सुचविलेंच आहे.

'मनुष्यहितावह कृत्यें' = 'मानुषा.' 'मानुषा'शब्दाचे या ठिकाणीं निरनिराळे विद्वान् निरनिराळे अर्थ करितात. त्या सर्वांचा विचार करितां सायणाचार्यांचाच अर्थ योग्य दिसल्यामुळें तो आम्ही घेतला आहे. आणि तो घेतला तरच उत्तरार्धांत असलेली उपमा बरोबर जुळते. 'द्याव:'शब्दाचा सूर्यकिरण हा अर्थ आम्हीं सायणांस अनुसरून केला आहे. त्याचा 'दिवस' हा तर अर्थ वेदांत प्रसिद्ध आहेच, त्यावरून 'दिवस उत्पन्न करणारे जे किरण ते' असा अर्थ घेण्यांत फारशी ओढाताण नाहीं.

'परम उदार'=' मंहिष्ठम्.' ऋ. ८. १५. १० हा मंत्र, आणि त्याजवरील सायणभाष्य पाहा. प्रस्तुत स्थळीं सायणाचार्य 'अतिशयेंकरून प्रवृद्ध' म्हणजे 'मोठा' असा अर्थ करितात.

या मंत्राचें वृत्त 'जगती' आहे. या जगती वृत्तास आलीकडील संस्कृतांत 'वंशस्थ' असें नांव आहे. हा मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें वाचला तर वंशस्थाप्रमाणें लागेल:—

अभि त्वं मेषं पुरुहूतमृग्मियम् ।
इन्द्रं गीर्भिर्मदता वस्वो अर्णवम् ।
यस्य द्यावो न विचरन्ति मानुषा ।
भुजे मंहिष्ठमभि विप्रमर्चत ।

तथापि आम्ही आतां वंशस्थ वृत्त ज्या रीतीनें म्हणतों तसेंच केवळ वैदिकयुगांत जगती वृत्त म्हणत नसत असें दिसतें. नाहीं तर दुसऱ्या पादांत 'मदत' यांतील 'त' हें अक्षर वंशस्थ वृत्ताला ऱ्हस्व इष्ट असतांना संहितेंत मुद्दाम ऱ्हस्वाचें दीर्घ केलें नसतें.

२. यांत इंद्राचा महिमा एका गोष्टीविषयीं वर्णिला आहे. पुढील प्रत्येक ऋचेंतहि इंद्राचा कांहीं, एक एक गोष्टीविषयीं महिमा सांगितला आहे. यांतील महिमा हा कीं, 'महापराक्रमी आणि महाबुद्धिमान् जे मरुत् तेहि इन्द्राचे साहाय्यकर्ते झाले, आणि वृत्रवधाविषयीं त्याला उत्तेजन देते झाले. अशी प्रीति, असें साहाय्य, आणि असें उत्तेजन म-

त्वं गोत्रमङ्गिरोभ्योऽवृणोरपोतात्रये शतदुरेषु गातुवित् ।
ससेन चिद्विमदायावहो वस्वाजावद्रिं वावसानस्य नर्तयन् ॥३॥

त्वम् । गोत्रम् । अङ्गिरःऽभ्यः । अवृणोः । अप । उत । अत्रये । शतऽदुरेषु । गातुऽवित् ।
ससेन । चित् । विऽमदाय । अवहः । वसु । आजौ । अद्रिम् । ववसानस्य । नर्तयन् ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. [ हे इन्द्र], त्वम् अङ्गिरोभ्यो गोत्रम् अपावृणोः (=त्वमेव अङ्गिरःकुलोत्पन्नपुरुषेभ्यो मेघजलरूपाणां गवां गोष्ठम् ) उद्घाटितवान् (=वृत्रहननेन अप आसृष्टवान्)। उत (=अपि च ) [ त्वमेव ] शतदुरेषु (=शतद्वारयुक्तेषु यन्त्रेषु ) अत्रये (=एतन्नामकाय कस्मैचिन्महर्षये ) गातुवित् ( =मार्गस्य लम्भयिता ) [ अभवः ] । त्वमेव विमदाय ( =एतन्नामकाय कस्मैचिद् ऋषये ) ससेन चित् ( =हविरन्नमात्रेण=हविरन्नग्रहणेनैव ) वसु (=धनम् ) अवहः (=अनयः=आनीतवान् ) । [ त्वमेव ] वावसानस्य ( =एतन्नामकस्य कस्यचित् स्तोतुः ) आजौ (=संग्रामे ) अद्रिं (=तव वज्रं) नर्तयन् ( =युद्धकर्मणि इतस्ततश्चालयन् ) [ भवसि ] ॥

अत्र प्रतिपादम् अङ्गिरसाम् अर्थे इन्द्रः किल वृत्रं हत्वा मेघोदकम् आवृष्टवान्, तथा अत्रये तच्छत्रुभिः पीडार्थं शतद्वारैर्युक्ते यन्त्रे प्रक्षिप्ताय निर्गमनार्थं मार्गं दर्शितवान् किलेति, तथा विमदस्य केवलं हविरन्नं गृहीत्वा तस्मै धनं किल ददाविति, तथा च वावसानस्य कस्यचिद्युद्धे तदर्थं वज्रं गृहीत्वा तच्छत्रुं हतवान् किलेति प्रसिद्ध इतिहासः सूक्तस्य कर्त्रा सव्येन उद्दिष्ट इत्यवधेयम् ॥

स्तुतांनीं दिलें तें इंद्रालाच दिलें, दुसऱ्या कोणास कधींहि दिलें नाहीं'.

' साहाय्यकारी '=' ऊतयः.' ' ऊति'-शब्दाचा साधारण अर्थ ' साहाय्य ' असा होतो; पण केव्हां केव्हां ' साहाय्यभूत जो तो ' म्हणजे 'साहाय्य करणारा' असाहि होतो. पुढच्या सूक्ताचा ४था आणि ५वा मंत्र पहा.

' महाफलदात्या '=' स्वभिष्टिम्.' अक्षरशः अर्थ, ' मनकामना चांगल्या रीतीनें पूर्ण करणारा,' ' इच्छिलेलें फल चांगल्या रीतीनें देणारा.' कितीएक विद्वान् ' चांगलें साहाय्य करणारा ' असा अर्थ करितात; तो ( ऋ. ८. ६८. ५ यावरील सायणभाष्यावरून ) संभवतो, तरी सायणांस अनुसरून आम्हीं येथें केलेला पुष्कळ ठिकाणीं जुळतो.

' सर्वशक्तियुक्त '=' तविषीभिरावृतम्.' अक्षरशः अर्थ ' शक्तींनीं वेष्टित,' ज्याच्या आसपास पुष्कळ शक्ति आहेत तो.

३. [हे इंद्रा], तूंच अंगिरसां-प्रीत्यर्थ गाईंचा गोठा उघडलास, आणि [तूंच] अत्रीला शंभर दरवाजे असलेल्या ठिकाणांतून मार्ग दाखविणारा झालास; [तूंच] विमदाला केवळ हविरन्नाच्या योगानें संपत्ति आणिता झालास; आणि [तूंच] वावसानाच्या युद्धांत [तुझें] वज्र नाचविता झालास.

3. Thou, [Indra], didst break open the cow-shed for the Angirases, and [ becamest ] a guide to Atri out of the labyrinth of one hundred doors; thou didst bring wealth to Vimada simply through [his] sacrificial food, and thou didst cause thy thunderbolt in the battle of Vâvasâna to dance.

'बुद्धिमान्'=' ऋभवः.' ऋ. १०. ८०. ७ याजवरील सायणभाष्य पहा.

'शत्रुजित्'='मदच्युत्.' हेंहि विशेषण जरा कठिण आहे. सायणाचार्य 'शत्रूचा मद म्हणजे गर्व हरण करणारा' असें म्हणतात, त्यालाच अनुसरून आम्हीं अर्थ केला आहे. 'सोमरसाच्या मदानें म्हणजे मादानें उन्मत्त झालेला' असा जो अर्थ कित्येक विद्वान् करितात त्याला आधार दिसत नाहीं. 'मदच्युत्' हें सोमाचें विशेषण असतें तेव्हां 'माद उत्पन्न करणारा' असा अर्थ होतो खरा ( ऋ. ९. १०८. ११; ९. ३२. १; आणि ९. ७९. २ यांजवरील सायणभाष्य पहा ) परंतु देवास वगैरे जेव्हां लाविलेलें असतें तेव्हां सायणाचार्य बहुतकरून 'शत्रूचा गर्व हरण करणारा' असा अर्थ करितात. तो पर्यवसानीं आम्हांस खरा दिसतो. 'मदच्युत्' सोम जसा बली होय, तसा 'मदच्युत् इन्द्र' म्हणजे 'बलवान् इन्द्र' हें संभवतें.

हा मंत्र एकंदरींत कठिण आहे यांत संशय नाहीं. काठिन्याचें कारण हें कीं, जरी मरुतांनीं साहाय्य केलें तें इंद्रालाच केलें असें तात्पर्य उघड दिसतें, तथापि 'मरुत्' हा शब्द मंत्रांत नाहीं, त्यांविषयीं केवळ 'ऊति' शब्दांत ज्ञापन आहे तेवढेंच. त्यामुळेंच या मंत्राचा अनेक प्रकारांनीं अर्थ करण्यांत आलेला आढळतो. आम्ही सायणांस अनुसरलों आहों.

केवळ वंशस्थाप्रमाणें लागण्यासारिखा म्हणावयाचा असेल तर हा मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें म्हणावा:—

अभिमवन्वन् सुअभिष्टिमूतयो ।
अन्तरिक्षप्रां तविषीभिरावृतम् ।
इन्द्रं दक्षासो ऋभवो मदच्युतं ।
शतक्रतुं जवनी सूनृतारुहत् ॥

याप्रमाणेंच ऱ्हस्वदीर्घ करून वगैरे मंत्र वाचले तर अर्वाचीन वृत्तांप्रमाणें वाचतां येतात.

३. वरील मंत्रांत जसा इंद्राचा एक महिमा सांगितला तसाच या मंत्रांतहि प्रत्येक पादांत एक एक सांगितला आहे: १, इंद्रानें मेघरूपी वृत्राला मारून त्याणें कोंडून

त्वमपामपिधानावृणोरपाधारयः पर्वते दानुमद्वसु ।
वृत्रं यदिन्द्र शवसावधीरहिमादित्सूर्यं दिव्यारोहयो दृशे ॥ ४ ॥

त्वम् । अपाम् । अपिऽधाना । अवृणोः । अप । अधारयः । पर्वते । दानुऽमत् । वसु ।
वृत्रम् । यत् । इन्द्र । शवसा । अवधीः । अहिम् । आत् । इत् । सूर्यम् । दिवि । आ । अरोहयः । दृशे ॥ ४ ॥

### भाषायाम्.

४. त्वम् [ एव ] अपाम् ( =उदकानां=मेघोदकानाम् ) अपिधाना ( =अपिधानानि=आच्छादकान् मेघान्) अपावृणोः (=अपावरीधः=उद्घाटितवानसि), [त्वमेव] पर्वते ( =मेघे ) दानुमत् ( =दानयुक्तं=प्रभूतं ) वसु ( =धनम्=उदकरूपम् ) अधारयः ( =स्थापितवान्=त्वमेव मेघान् जलधारिणः कृतवान् )। [ अपि च ] हे इन्द्र, यद् ( =यदा ) [ त्वं ] शवसा ( =बलेन ) अहिं वृत्रम् ( =अहिरूपं वृत्रम् ) अवधीः ( =हतवान् ) आद् इत् ( =तदानीमेव ) सूर्यं दृशे ( =द्रष्टुं=स विश्वं यथा पश्यति तथा ) दिवि ( =द्युलोके ) अरोहयः ॥

त्वमेव मेघोदकस्यावरकं वृत्रं हत्वा मेघोदकान्यावर्षयसि, त्वमेव मेघान् जलगर्भान् करोषि तथा त्वमेव वृत्रेणावृतं सूर्यं तस्माद्वृत्रान्मोचयसीत्यर्थः ॥

---

ठेविलेल्या मेघोदकरूपी गाई त्या मेघरूप गोठ्यांतून खालीं सोडून दिल्या; २, अत्रि म्हणून कोणीएक महापुरुष होऊन गेला त्याला त्याच्या शत्रूंनीं शंभर दारें असलेल्या ठिकाणीं कोंडून ठेविला असतां बाहेर येण्याला त्यास मार्ग दाखविला; ३, विमद म्हणून कोणीएक मनुष्याजवळ इंद्रास द्यावयाला कांहीं नव्हतें, हवीचें अन्न मात्र होतें, तर तेवढेंच घेऊन इंद्रानें प्रसन्न होऊन त्यास श्रीमान् केलें; आणि ४, वाव्सान म्हणून कोणी एक उपासक आपल्या शत्रूशीं लढत असतांना इंद्रानें त्याला साहाय्य करून त्याच्या पक्षानें युद्ध केलें, आणि विद्युद्रूप वज्रानें लढला.

'अंगिरसांप्रीत्यर्थ गाईंचा गोठा उघडलास.' 'अङ्गिरस' हे फार प्राचीन काळचे उपासक होत आणि त्यांजवर देवांनीं अमुक अमुक प्रसाद केले असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं येतें, आणि प्रस्तुत स्थळीं तरी इंद्रानें आपल्या अति प्राचीन स्तोत्यांसाठीं मेघवृष्टि करण्याचा उपक्रम केला इतकेंच विवक्षित आहे.

'अत्रीला.' बाहेरून तर शंभर दरवाजे दिसावेत परंतु आंतून बाहेर यावयास मिळूं नये असें कोणत्या प्रकारचें कूट होतें, आणि त्याच्या शत्रूंनीं त्यास त्यांत कां टाकिलें याविषयीं कांहीं विशेष

४. तूंच उदकांचीं झांकणें उघडिता झालास, [तूंच] पर्वतांत विपुल धन स्थापिता झालास. हे इंद्रा, तूं जेव्हां [आपल्या] शक्तीच्या योगानें अहिरूप वृत्राला मारिलेंस तेव्हांच [तूं] सूर्याला द्युलोकीं चढवून [ जगाकडेस ] पाहावयास लाविलेंस.

4. Thou didst open the covers from off the waters, [thou] didst place the plenteous wealth in the mountain. When, O Indra, [thou] slewest the Serpent Vṛitra with [thy] might, then only didst [ thou ] cause the sun to ascend into heaven that he might see.

---

टाऊक नाहीं, आणि 'विमदा'च्या कथेविषयीं, तसेंच 'वावसाना'च्या कथेविषयींहि कांहीं ठाऊक नाहीं.

'केवळ हविरन्नाच्या योगानें'=' ससेन चित्.' सायणाचार्य 'अन्नासहित' (वसु) असें म्हणतात. परंतु 'वसु'-शब्दांत अन्नाचा समावेश होतोच. 'सस' म्हणजे 'अन्न' असा अर्थ होतो याविषयीं सायणाचार्यच लिहितात. कितीएक विद्वान् 'ससेन' म्हणजे 'निद्रेनें' असा अर्थ करितात त्याला आधार नाहीं असें दिसतें.

'वावसाना'च्या. सायणाचार्य हें विशेषनाम समजतात असें आम्हांस दिसतें. आणि तीनहि चरणांत विशेषनामें आहेत त्यावरून येथेंहि पाहिजे असें दिसतें. आणि सायणाचार्य दुसरा 'एक स्तोता' असा अर्थ करितात, त्यावरून विशेषनामच घ्यावयाचें त्यांच्या मनांत आहे असें आम्हास वाटतें.

'तूंच.' यांतील 'च' हा मंत्रांत 'त्वम्' शब्द आरंभीं आहे त्यापासून गम्यमान आहे.

---

४. 'हे इंद्रा, आकाशजलांस झांकून टाकणारीं जीं मेघरूपी झांकणें तीं उघडतोस तो तूंच; ढगांत उदकरूपानें पुष्कळ धन भरून ठेवितोस तो तूंच; आणि अहीसारिखा जो मेघरूप वृत्र सूर्याला आच्छादून त्याला आंधळा करून टाकितो, त्याला मारून सूर्याला पुनः आकाशांत चढवून त्याजकडून जगाकडेस पाहावितोस तोहि तूंच, असा तुझा महिमा आहे.'

इंद्रसूक्त औलें म्हणजे आकाशजलांचा अवरोध करून टाकणाऱ्या मेघरूपी वृत्राला मारिलें, आणि सूर्याच्या किरणांला आच्छादून टाकणाऱ्या (मेघरूपीच) वृत्राला मारिला, हा इंद्राचा द्विविध पराक्रम यावयाचाच. सू. ३२ मं. १ यावरील टीप पहा.

'झांकणें'= 'अपिधाना.' म्हणजे मेघरूपीच आच्छादनें.

त्वं मायाभिरप मायिनोऽधमः स्वधाभिर्ये अधि शुप्तावजुह्वत ।
त्वं पिप्रोर्नृमणः प्रारुजः पुरः प्र ऋजिश्वानं दस्युहत्येष्वाविथ ॥
॥५॥९॥

त्वम् । मायाभिः । अप । मायिनः । अधमः । स्वधाभिः । ये । अधि ।
शुप्तौ । अजुह्वत ।
त्वम् । पिप्रोः । नृऽमनः । प्र । अरुजः । पुरः । प्र । ऋजिश्वानम् ।
दस्युऽहत्येषु । आविथ ॥ ५ ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

५. त्वम् [एव] मायिनः (=कपटोपेतान्=असुरान्=अनार्यजनरूपान्?) मायाभिः (=कपटैः) अपाधमः (=धमनेनैव अपास्तवान्), ये [मायिनः] स्वधाभिः (=हविर्लक्षणैरन्नैः) शुप्तौ (=स्वकीये मुख एव) अजुह्वत (=अहौषुः) [न त्वग्नौ]। [त्वमेव] हे नृमणः (=नृषु अनुग्रहबुद्धियुक्त) [इन्द्र], पिप्रोः (=एतन्नामकस्य असुरस्य) पुरः (=नगराणि) प्रारुजः (=प्राभाङ्क्षीः) [तथा] दस्युहत्येषु (=दस्युहननार्थेषु युद्धेषु=अनार्यहननार्थेषु युद्धेषु) ऋजिश्वानं (=कंचिद् आर्य राजानं) प्राविथ (=प्रकर्षेण ररक्षिथ)॥

अत्रेदमुक्तम्। हे इन्द्र, त्वमेव आर्यजनान् रक्षितवान् अपि च त्वमेव धर्मरहितांस्तेषां शत्रून् अनार्यान् नाशितवानिति॥

---

'पर्वतांत विपुल धन स्थापिता झाला-स'=' अधारयः पर्वते दानुमद्वसु.' 'पर्वत' म्हणजे मेघ. त्यांत विपुल धन म्हणजे पाणी. कारण पाण्यापासून सर्व कांहीं उत्पन्न होतें.

'द्युलोकीं चढवून [जगाकडेस] पाहावयास लाविलेंस'='दिवि आ अरोहयः दृशे.' अक्षरशः अर्थ. 'पाहण्यासाठीं द्युलोकीं चढविलेंस.' म्हणजे वृत्रानें सूर्यास आच्छादून टाकिल्यावर तो आकाशांत चढूं शकला नाहीं, आणि त्यामुळेंच जगाला पाहूं शकला नाहीं; म्हणजे प्रकाशूं शकला नाहीं. मग वृत्राला मारून इंद्रानें सूर्याचा आकाशमार्ग मोकळा केला, आणि त्याची दृष्टि जिकडे तिकडे पोंहचे असें केलें. सू. ३२ मं. २ याजवरील टीप पहा.

५. तूंच [त्या] कपटी जनांस कपटांच्या योगानें फुंकून फेकून दिलेंस, [कीं] जे हविरन्नांनीं [आपल्याच] तोंडांत हवन करीत [आणि] हे नरहितचिंतका, तूंच पिप्रूचीं नगरें भंगिलींस, [आणि] दस्युमारणांच्या प्रसंगीं ऋजिश्च्याला [तूंच] संरक्षिता झालास.

5. Thou didst by [thy] schemes blow away [those] schemers, who sacrificed with the oblations into [their own] maw. Thou didst, O [Indra], benevolent to mankind, destroy the cities of Pipru, [thou] didst protect Rijis'vâ in the fights for the destruction of the Dasyus.

५. ह्या मंत्राचें तात्पर्य इतकेंच दिसतें कीं, 'हे इंद्रा, देवांस भजणारे जे आर्य लोक त्यांचा सर्वत्र जय व्हावा म्हणून तूं त्यांचें संरक्षण करून, त्यांस उपद्रव करणारे जे अनार्यलोक, (म्हणजे, या देशांत आर्यलोक येण्यापूर्वी जे माहार, घोंड, भिल्ल, कोळी इत्यादिकांचे पूर्वज होते), कीं जे देवांस न भजतां आपल्या सुखाकरितांच सर्व खर्च करणारे, आणि ज्यांस मारण्याविषयीं आर्यलोक युद्धें करीत, त्यांस तूंच आर्यलोकांच्या हातून मारून टाकिलेंस.'

'[त्या] कपटी जनांस'='मायिनः.' हे कोण? सायणाचार्य 'वृत्रादि असुर' असें म्हणतात. तथापि जे देवांस हवि अर्पण करीत नाहींत ते असुर म्हणजे अनार्यलोक समजल्यास खरा अर्थ सुटणार नाहीं. ऋग्वेदांत अधार्मिक जे अनार्यलोक ते आणि वृत्रादि जे रूपकसिद्ध असुर यांच्याविषयीं जें सांगितलें आहे तें संकरानें सांगितलेलें आढळतें. म्हणजे, वृत्रादि रूपकसिद्ध असुरांविषयीं सांगावें तें वास्तविक विद्यमान जे अनार्यलोक त्यांविषयीं, आणि या शेवटच्यांविषयीं सांगावें तें त्या रूपकसिद्ध वृत्रादिकांविषयीं सांगितलेलें आहे. सू. ३३ मं.५, ६, ७, ८, ९, १० हे मंत्र आणि त्यांजवरील टीप पहा.

'हविरन्नांनीं आपल्याच तोंडांत हवन करीत'='स्वधाभिः अधि शुप्तौ अजुह्वत.' म्हणजे जें अन्न देवांस अर्पण करावें असें असतां आपणच खात; म्ह० देवांस भजत नसत. आपलें पोट भरणें याशिवाय दुसरा देवच नाहीं असें समजत. 'स्वधाभिः' याचा 'हविरन्नांनीं' हा अर्थ सायणानुसारानेंच केला आहे. 'आपल्या परिपाटीप्रमाणें' असा जरी संभवेल तरी येथें नीट जुळत नाहीं असें आम्हांस वाटतें. आणि 'शुप्ति'-शब्दाचा अर्थ छंद भाषेस अनुलक्षून 'खांदा' असा जो कितीएक पाश्चिमात्य विद्वानांनीं केला आहे, तोहि आम्हांस निराधार दिसतो.

'पिप्रूचीं.' पिप्रु याचीं नगरें इंद्रानें

त्वं कुत्सं शुष्णहत्येष्वाविथारन्धयोऽतिथिग्वाय शम्बरम् ।
महान्तं चिदर्बुदं नि क्रमीः पदा सनादेव दस्युहत्याय जज्ञिषे ॥ ६

त्वम् । कुत्सम् । शुष्णऽहत्येषु । आविथ । अरन्धयः । अतिथिऽग्वाय । शम्बरम् ।
महान्तम् । चित् । अर्बुदम् । नि । क्रमीः । पदा । सनात् । एव । दस्युऽहत्याय । जज्ञिषे ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. त्वम् [ एव ] शुष्णहत्येषु ( =शुष्णनाम्नः शत्रोर्हननाय यानि युद्धानि तेषु ) कुत्सं ( =कुत्ससंज्ञमृषिम् ) आविथ ( =ररक्षिथ ), [ त्वमेव ] शम्बरम् ( =एतन्नामानं कंचित् शत्रुम् ) अतिथिग्वाय अरन्धयः ( =अतिथिग्वनामकस्य कस्यचिद् वशं प्रापितवान् ) । [ त्वमेव ] महान्तं चित् ( =महान्तमपि ) अर्बुदम् ( =एतन्नामकं कंचित् शत्रुं ) पदा ( =पादेन) निक्रमीः ( =नितराम् आक्रमितवान् ) । [ एवं प्रकारेण ] [ त्वं ] सनादेव (=चिरकालादेवारभ्य ) दस्युहत्याय ( =अनार्यजनादिशत्रुहननाय ) जज्ञिषे ( =जातोसि=सर्वदैव शत्रुहननशीलो भवसि ) ॥

अस्यामृचि शुष्णहननेषु कुत्समिन्द्रः किल प्रावेति, तथा शम्बरं वशीकर्तुं प्रवृत्तस्य अतिथिग्वस्य साहाय्यं कृत्वा तद्वशीकरणमिन्द्रः किल संपादितवानिति, तथा महान्तमपि कंचिदर्बुदं नाम शत्रुमिन्द्रः किल स्वपादेनैवाक्रम्य हतवानिति कांश्चित्प्रसिद्धानितिहासानुद्दिश्य वदति सव्य इति मन्तव्यम् ॥

फोडून टाकिलीं असें ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. तो कोणी अनार्यांचा राजा होता, कीं रूपकसिद्ध असुर होता, तें निश्चयानें सांगवत नाहीं. तरीहि पुढची टीप पहा.

' दस्युमारणांच्या प्रसंगीं ' = ' दस्युहत्येषु. ' म्हणजे ( अनार्यरूप ) ' शत्रूंस ' मारून टाकण्यासाठीं जीं युद्धें त्यांत. सू. ३३ मं. ४ याजवरील टीप पहा. ' ऋजिश्वा ' म्हणून कोणीएक आर्यभक्त. तो अनार्यांस मारण्याच्या कामीं गुंतला असतां त्याला तूं साहाय्य केलेंस असें तात्पर्य. तो उशिजाचा पुत्र होता आणि तो पिप्रूशीं लढला असें वर्णन आढळतें. त्यावरून येथें जो पिप्रु सांगितला तो कोणी अनार्य लोकांचा राजा असावा.

६. तूंच शुष्णमारणांच्या प्रसंगीं कुत्साला रक्षिता झालास, [तूंच] शंबराला अतिथिग्वाच्या हस्तगत करिता झालास, अर्बुद मोठा [असतां]हि [त्याला] [तूंच] पायाखालीं रगडून टाकिता झालास, [ याप्रमाणें ] दस्यूंचा नाश करण्यास्तव [तूं] प्राचीन काळापासूनच जन्मला आहेस.

6. Thou didst protect Kutsa in the fights for the destruction of S'ushṇa, [thou] didst subject S'ambara to Atithigva. Even the great Arbuda [thou] didst crush under [ thy ] foot: [ thus ] [thou ] hast been born even of yore for the destruction of the Dasyus.

६. ' शुष्ण म्हणून कोणी एक शत्रु, त्याला मारण्याकरितां कुत्स लढत असतां कुत्साला इंद्रानें साहाय्य केलें; शंबर म्हणून कोणी एक शत्रु आपल्या हस्तगत व्हावा म्हणून अतिथिग्व प्रयत्न करीत होता, तेव्हां इंद्रानें शंबराला अतिथिग्वाच्या हस्तगत केलें; आणि बलाढ्य अर्बुद नांवाच्या एका शत्रूला इंद्रानें आपल्या पायांखालीं चिरडून मारिलें; ह्या सर्व कथा प्रसिद्ध आहेत. त्यापेक्षां हे इंद्रा, तूं अशा प्रकारच्या शत्रूंचा नाश करण्यास्तवच झाला आहेस,' असा भावार्थ.

' शुष्ण.' ' शुष्ण ' या नांवाचा असुर इंद्रानें मारिला असें ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. आणि पुष्कळ ऋचांमध्यें शुष्णाला मारण्यास इंद्रानें कुत्साला साहाय्य केलें असें सांगितलें आहे. आणि ह्या सर्व ऋचा ताडून पाहातां इंद्रानें स्वतः मारिला तो शुष्ण, आणि जो मारण्याविषयीं कुत्सास साहाय्य केलें तो, एकच असावा असें दिसतें. जर शुष्ण म्हणून कुत्साचा वस्तुतः विद्यमान कोणी एक शत्रु होता, तर त्याचा नाश करण्याला कुत्सास इंद्राचें साहाय्य मिळालें याचा अर्थ स्पष्ट होतो ( आम्हांस जय येतो तो उपास्य देवाचे प्रसादानें येतो अशी समजूत सर्वत्र आहे ); आणि शुष्ण म्हणजे शोषण करणारा जो मेघ तद्रूप रूपकसिद्ध असुर जर असेल, तर इंद्रानें त्याला मारिलें हेंहि रूपक समजावयाला सोपें आहे (कारण कीं मेघरूपी असुरास मारणें हा इंद्राचा पराक्रम सर्वत्र वर्णिलेला आहेच ). परंतु दोनी शुष्ण मिळून एकच असतील, तर मेघरूप जो रूपकसिद्ध शुष्ण त्याला मारावयास इंद्राचें साहाय्य कुत्साला मिळालें आणि कुत्सानें तो मारिला म्हणजे काय? आम्हांस असें वाटतें कीं, प्रथम कुत्स या नांवाच्या मनुष्याचा शुष्ण म्हणून वास्तविक शत्रु असावा (ऋ. ७. १९. २ यांत त्याला 'दास शुष्ण' असें म्हटलें आहे), आणि तो इंद्रकृपेनें त्याणें मारिला असावा.

आणि त्या मारण्याविषयीं इंद्रकृपा अथवा इंद्रप्रसाद कुत्सास झाला ही गोष्ट प्रख्यात झाली. नंतर इंद्रानें शुष्ण मारिला अशी स्वतंत्र प्रख्याति होऊं लागली. मग इंद्रानें केलेला शुष्णवध कविजन वर्णू लागले तेव्हां इंद्रकृत जो मेघरूप वृत्रासुराचा वध, त्याचें वर्णन ज्या रीतीनें करण्याचा संप्रदाय असे त्याच रीतीनें वर्णन करूं लागले. त्यामुळें शुष्णाला असुरत्व सहजच आलें. इंद्रानें जे वेगळे वेगळे म्हणून असुर मारिल्याविषयीं वर्णन येत असतें, तें ज्यांणीं वाचलें असेल त्यांस आम्हीं येथें म्हणतों यांत ओढाताण आहे असें वाटणार नाहीं.

'कुत्स.' हें नांव ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलें आहे. बहुत ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, शुष्णाचा वध करण्यासाठीं इंद्रानें कुत्साला साहाय्य केलें आणि शुष्णाला मारून कुत्साला रक्षिलें. कितीएक मंत्रांत कुत्साचें रक्षण अश्वी देवांनीं केलें असेंहि सांगितलें आहे. (ऋ १. ११२. ९, २३). परंतु बहुत मंत्रांत कुत्साला इंद्रानेंच रक्षिल्याबद्दल वर्णिलें आहे. बऱ्याच मंत्रांत इंद्र कुत्साला घेऊन रथांत बसून शुष्णाला मारावयास गेला असें आढळतें, (ऋ. ४. १६.११; ५. २९. ९) कुत्साला इंद्रानें रक्षिल्याबद्दल वैदिकयुगांत इतकी प्रसिद्धि झाली होती कीं, आतां जसें 'हे विठोबा, तूं जसा तुकारामास प्रसन्न झालास तसा आम्हांस हो' असें, अथवा 'हे जनहो, जो विठोबा तुकारामावर कृपा करी, त्याजला तुम्ही भजा' असें आपण सहज म्हणूं, त्याप्रमाणें वैदिक युगांत त्या वेळचे भक्तजन म्हणजे ऋषि असें सहज म्हणत कीं, 'हे इंद्रा, तूं कुत्साचें संरक्षण केलेंस तसें आमचें कर,' अथवा 'हे जनहो, ज्याणें कुत्साला रक्षिलें, त्या इंद्राला तुम्ही सोम अर्पण करा.'

ऋग्वेद १. ५३. १०; २. १४. ७ आणि ( सायणाचार्याचें मत भिन्न दिसतें तथापि ३. २६. १ ) यांत इंद्रानें कुत्साचा पराभव केला व त्याचे वीर मारिले इत्यादि सांगितलें आहे. परंतु तो कुत्स निराळा असावा; आणि सायणाचार्य तरीं याच उद्देशानें त्याला राजर्षि कुत्स असें म्हणतात.

'अतिथिग्व.' हेंहि नांव वेदांत बऱ्याच ठिकाणीं आलें आहे. परंतु या नांवाचेहि दोन पुरुष असावे असें दिसतें. यांतून एकाविषयीं ऋग्वेदांत असें सांगितलें आहे कीं, त्याला इंद्रानें कुत्साला रक्षिलें तसें रक्षिलें. या अतिथिग्वाचें उपनांव दिवोदास असें असे. या दिवोदास अतिथिग्वासाठीं इंद्रानें 'शंबर' या नांवाचा शत्रु मारिला, आणि त्याचीं अनेक नगरें फोडून टाकिलीं ( ऋ. ४. २६. ३) व त्याची संपत्ति अतिथिग्वाला दिली असें ऋग्वेदांत सांगितलें आहे. आणि शुष्णाला मारून टाकण्याविषयीं जसें इंद्रानें कुत्साला साहाय्य केलें, तसेंच शंबराला मारण्याच्या प्रसंगीं अतिथिग्वाला साहाय्य केलें असें सांगितलें आहे. ( ऋ. १. ११२. १४ ).

दुसऱ्या अतिथिग्वाविषयीं असें सांगितलें आहे कीं, त्याचा पराभव 'तूर्वयाण' या भक्तासाठीं इंद्रानें केला (ऋ. १. ५३. १०) आणि त्याचे वीर इंद्रानें मारिले (ऋ. २. १४. ७). याशिवाय अतिथिग्वाविषयीं आणखी कांहीं सांगितलेलें आढळत नाहीं.

'शंबर.' शंबराचा नाश इंद्रानें केला असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. आणि हा जो नाश केला तो दिवोदासाकरितां म्हणजे अतिथिग्वाकरितां असें पुष्कळ ठिकाणीं आहे. इंद्रानें शंबरास मोठ्या पर्वतावर म्हणजे मेघमंडलावर अथवा आकाशांत मारून तेथून खालीं ढकलून दिलें (ऋ १. १३०. ७; १. ५४. ४; ७. १८. २०). इंद्राला भिऊन 'शंबर' हा चाळीस वर्षेंपर्यंत पर्वतांमध्यें म्हणजे मेघमंडळांत लपून राहिला होता, तेथून इंद्रानें त्याला चाळिसावे वर्षी शोधून काढिला आणि मग मारिला (ऋ. २. १२. ११).

शंबर हा 'कुलितरा'चा मुलगा होय (ऋ. ४. ३०. १४). इंद्र दिवोदासानें अर्पण केलेला सोमरस पिऊन (ऋ. ४. २६. ३; ६. ४७. २; ६. ४३. १) दिवोदासाकरितां त्याचीं अनेक नगरें फोडून टाकिता झाला (ऋ. २. २४. २; ६. ३१. ४; १. १०३. २). कितीएक ठिकाणीं नव्याण्णव नगरें आणि दुसऱ्या कितीएक स्थळीं शंभर नगरें असें सांगितलें आहे. परंतु याचा अर्थ अनेक नगरें इतकाच घ्यावयाचा. शंबराला 'दास' म्हणजे अनार्य असें म्हटलें आहे (ऋ. ६. २६. ५).

या सर्व गोष्टींवरून असें वाटतें कीं, 'शंबर' म्हणून प्रथम कोणी अनार्य जातीचा दिवोदासाचें वैर करणारा (शुष्णाप्रमाणें) शत्रु असला तरी, आणि त्याचें हनन करण्याविषयीं इंद्रानें साहाय्य केलें असलें तरी, इंद्रानेंच त्याचा वध केला अशी प्रसिद्धि झाल्यामुळें वृत्रहननाप्रमाणेंच 'शंबर'हननाच्या कथांचा प्रसार होत गेला. त्यावरून 'शंबर' म्हणजे मेघोदकें झांकून ठेवणारा आणि त्यांचा भूमीवर वर्षाव न होऊं देणारा जो वृत्ररूपी रूपकसिद्ध असुर, तोच 'शंबर' अशी समजूत होऊन त्याप्रमाणें कविजन म्हणजे ऋषि वर्णन करूं लागले (ऋ. १. ५९. ६ आणि २. २४. २ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पाहा). हा जो वास्तविक विद्यमान शंबरनामक अनार्य शत्रूचा आणि वृष्टि न पडूं देणाऱ्या मेघरूपी रूपकसिद्ध असुराचा संकर झाला, त्यामुळें नगरें फोडिलीं तीं वास्तविक विद्यमान नगरें होतीं किंवा मेघमंडलांत नगरांच्या आकारानें दिसणारीं जीं अभ्रें तींच नगरें समजावयाचीं, याचा निर्णय होत नाहीं.

'अर्बुद.' ऋ. १०. ६७. १२ यांत "इन्द्रो मह्ना महतो अर्णवस्य वि मूर्धानम् अभिनद् अर्बुदस्य" = 'इंद्र आपल्या मोठेपणानें उदकभरित अर्बुदाचा शिर-

त्वे विश्वा तविषी सध्र्यग्घिता तव राधः सोमपीथाय हर्षते ।
तव वज्रश्चिकिते बाह्वोर्हितो वृश्चा शत्रोरव विश्वानि वृष्ण्या ॥७॥

त्वे इति । विश्वा । तविषी । सध्र्यक् । हिता । तव । राधः । सोमऽपीथाय । हर्षते ।

तव । वज्रः । चिकिते । बाह्वोः । हितः । वृश्च । शत्रोः । अव । विश्वानि । वृष्ण्या ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. [ हे इन्द्र ], त्वे (=त्वयि) विश्वा तविषी (=सकलमपि बलं) सध्र्यक् हिता (=सध्रीचीना सती स्थापिता समष्ट्या वर्तते) । तव राधः (=मनः) सोमपीथाय (=सोमपानार्थं ) हर्षते (=हृष्यति) । तव वज्रो बाह्वोर्हितः (=स्थापितः) चिकिते(=ज्ञायते=विभाति ) । [ तस्मात् हे इन्द्र ], शत्रोः विश्वानि वृष्ण्यानि ( =सकलानि वीर्याणि ) अववृश्च ( =अवच्छिन्धि ) ॥

च्छेद करिता झाला' असें आहे. याचा भावार्थ मेघ फोडिता झाला असा सायणाचार्य करितात. कारण ते 'अर्बुद' आणि 'अंबुद' एकच असें म्हणतात. ऋ. १. ११.२०; ८.३२.२६; ८. ३२.३ यांजवरीलहि त्यांचें भाष्य पहा. ऋ. १.१४. ४;८.३.१९ याजवर 'अर्बुद' हा असुर होय असें म्हणतात तथापि तो मेघरूप असुर असा त्यांचा अभिप्राय घेतल्यास चालेल. 'अर्बुद'शब्द जेथें आला आहे तीं सर्व स्थळें विचारपूर्वक पाहतां सायणाचार्यांचा मेघरूप असुर हा अर्थ वास्तविक दिसतो.

..पूर्वीच्या मंत्रापेक्षां हा चांगला सरळ म्हणतां येतो. खालीं दाखविल्याप्रमाणें थोडाच फेरफार केला पाहिजेः-

त्वं कुत्सं शुष्णहतिएषु आविथ ।
अरन्धयोऽतिथिग्वाय शम्बरं ।
महान्तं चिदर्बुदं नि क्रमीः पदा ।
सनादेव दस्युहत्याय जज्ञिषे ।

७. तुझ्याठायीं सकल शक्ति मिळाल्या आहेत. तुझें मन सोम प्यावयाला आनंदित होत असतें. तुझें वज्र [तुझ्या] खांद्यावर शोभत असतें. [तर हे इंद्रा], तूं शत्रूच्या सकल वीर्याचा छेद करून टाक.

7. In thee is placed all strength, collected. Thy mind rejoices to drink the Soma. Placed on [thy] shoulders thy thunderbolt is conspicuous. Cut [thou] down all the strength of the enemy.

७. भावार्थः—' सकल देवांच्या निरनिराळ्या शक्ति तुझ्या एकट्याच्या ठायीं जमलेल्या आहेत, आणि उपासकांनीं अर्पण केलेला सोम पिण्याला तुझें मन हर्षयुक्त होत असतें, आणि तुझ्या खांद्यावर तुझें वज्र शोभत असतें. तर हे इंद्रा, तूं सकल शत्रूंस हतवीर्य करून टाक.'

' मिळाल्या आहेत '=' सम्यक् हिता.' अक्षरशः अर्थ ' गोळा करून स्थापिली [ आहे ].'

' मन '=' राधः'. 'राधस्'शब्दाचा हा अर्थ येथें आम्हीं सायणाचार्यांस अनुसरून केला आहे. त्याचा नित्याचा अर्थ ' धन ' असा आहे, परंतु प्रस्तुत स्थळीं ' धन देणारी बुद्धि ' म्हणजे ' प्रसन्न मन,' असा अर्थ केला आहे, तो अवश्य आहे.

हा मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें वाचल्यास आधुनिक वृत्ताप्रमाणें लागेलः—

तुए॑ विश्वा तविषी सध्रिअग्घिता ।
तव राधः सोमपीथाय हर्षते ।
तव वज्रश्चिकिते बाहुओर्हितो ।
वृश्चा शत्रोरव विश्वानि वृष्णिआ ॥

**वि जानीह्यार्यान्ये च दस्यवो बर्हिष्मते रन्धया शासदव्रतान् ।**
**शाकी भव यजमानस्य चोदिता विश्वेत्ता ते सधमादेषु चाकन॥८**

वि । जानीहि । आर्यान् । ये । च । दस्यवः । बर्हिष्मते । रन्धय ।
शासत् । अव्रतान् ।
शाकी । भव । यजमानस्य । चोदिता । विश्वा । इत् । ता । ते ।
सधऽमादेषु । । चाकन ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

८. [ हे इन्द्र ], [ त्वम् ] आर्यान् ये च दस्यवः [ सन्ति ] [ तान् ] विजानीहि (=विशेषेण जानीहि=इमे आर्या देवभजका इमे अनार्या भिल्लादयो धर्मकर्मरहिता इति विशेषं जानीहि), [अपि च] अव्रतान् (=यज्ञादिदेवोपासनाकर्मरहितान्) [दस्यून्] शासत् [ सन् ] [ तान् ] बर्हिष्मते (=यज्ञयुक्ताय आर्यजनाय ) रन्धय (=वशमानय ) । [ त्वं ] यजमानस्य (=यज्ञेन देवसेवां कुर्वाणस्य आर्यजनस्य ) [ अनार्यैः सह ये संग्रामास्तेषु ] शाकी चोदिता भव ( =शक्तियुक्तः प्रेरको नायको भव ) । ता (=तानि ) ते ( =तव ) विश्वेत् ( =विश्वान्यपि ) [ कर्माणि=आर्याणाम् अनार्याणां च मध्ये भेदकरणम्, अनार्यजनानाम् आर्यजनवशं प्रति आनयनम्, अनार्यजनैः सह ये संग्रामास्तेषु आर्याणामेव साहाय्यदानम्, इत्येवमादीनि ] सधमादेषु (=यज्ञेषु) [ गातुम् अहं ] चाकन ( =कामये ) ॥

अस्यामृचि आर्यजनानां भिल्लाद्यनार्यजनैः सह युध्यतां जयो भवतु ते चानार्या आर्याणां वशमागच्छन्त्विति प्रार्थना क्रियते ॥

८. [ हे इंद्रा ], आर्य कोण आणि दस्यु कोण यांत तूं भेद कर, [आणि] कर्महीन [दस्यूं]ला शासन करून [तूं त्यांजला] भजनपरायण [आर्यां]च्या हस्तगत कर. यज्ञ करणाऱ्या [आर्य जनां]चा [तूं] बळवान् नायक हो. तुझे ते ते सर्व [पराक्रम] मला यज्ञांमध्यें गावयास आवडतात.

8. Distinguish between the Âryas and [those] who [are] Dasyus; [and] punishing the irreligious [Dasyus] bring them under the authority of the sacrificing [Âryas]. Be the strong leader of the sacrificing man. I love [to sing] all those thy [deeds] in the sacrifices.

८. हा मंत्र मोठ्या महत्त्वाचा आहे. आपले पूर्वज प्रथम उत्तरेकडून या भारतवर्ष देशांत आले तेव्हां येथें भिल्ल, कोळी, खोंड, महार वगैरे धर्मरहित रानटी लोक राहत होते. त्यांजबरोबर आपले आर्य पूर्वज नित्य लढत असत, आणि त्यांस आपल्या अमलाखालीं आणण्याचा प्रयत्न करीत असत. आणि त्यांजबरोबर ज्या लढाई होत, त्यांत आपणांस यश मिळो आणि ते अनार्य जन आपल्या अमलाखालीं येओत असें ते आपल्या देवांपाशीं प्रार्थीत. आणि तसें झालें म्हणजे जय देणाऱ्या देवाचा पराक्रम यज्ञांत गात असत. अशी जी आपल्या आर्य पूर्वजांची स्थिति तिचें उदाहरण या सुंदर मंत्रांत आलें आहे. ऋषि म्हणतो, 'हे इंद्रा, तूं हे आर्य लोक आणि हे अनार्य लोक असा भेद कर, सगळ्यांस एकसारिखेच मानूं नकोस. यज्ञादिक कांहींच कर्म न करणारे जे अनार्य, त्यांस यज्ञ करणारे जे आर्य त्यांच्या अमलाखालीं आण. आर्यलोक अनार्यांबरोबर लढूं लागले म्हणजे, तूं आर्यांचा नायक म्हणजे पुरस्कर्ता हो, अनार्यांचा होऊं नको. तूं पूर्वीं तरी आर्यांचाच पक्ष धरून त्यांचें कल्याण केलें आहेस, आणि तीं सर्व तुझीं उत्तम चरितें मी यज्ञप्रसंगीं मोठ्या आवडीनें गात असतों.'

' आर्य कोण आणि दस्यु कोण यांत तूं भेद कर '=' वि जानीहि आर्यान् ये च दस्यवः.' अक्षरशः अर्थ, ' आर्यांस आणि जे दस्यु [त्यांस तूं] वेगवेगळे जाण.' 'दस्यु'विषयीं सू. ३३ मं. ४ यावरील टीप पहा.

' कर्महीन [ दस्यूं]ला '= 'अव्रतान्.' दस्यूंस म्हणजे अनार्य जातींच्या लोकांस 'अव्रत' असें वेदांत म्हटलें आहे. आणि आर्यजातीच्या लोकांस ' बर्हिष्मत्,' ' सुन्वत्,' ' देवयु,' ' यज्वन् ' म्हणजे 'यज्ञ करणारे,' ' सोम काढणारे,' ' देवांची वांछा करणारे,' ' यजन करणारे ' इत्यादि विशेषणें दिलेलीं आढळतात. कारण कीं आमचे आर्यपूर्वज देवांची सेवा

अनुव्रताय रन्धयन्नपव्रतानाभूभिरिन्द्रः श्नथयन्ननाभुवः ।
वृद्धस्य चिद्वर्धतो द्यामिनक्षतः स्तवानो वम्रो वि जघान संदिहः
॥ ९ ॥

अनुऽव्रताय । रन्धयन् । अपऽव्रतान् । आऽभूभिः । इन्द्रः । श्नथयन् । अनाभुवः ।
वृद्धस्य । चित् । वर्धतः । द्याम् । इनक्षतः । स्तवानः । वम्रः । वि । जघान । सम्ऽदिहः ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. इन्द्रः अपव्रतान् ( =अपगतकर्मणो जनान्=अनार्यजातिपुरुषान् ) अनुव्रताय ( =अनुकूलकर्मणे देवयजनादि कर्म कुर्वते ) [ आर्यजनाय ] रन्धयन् ( =वशमानयन् ) [ तथा ] अनाभुवः (=स्तोत्रमकुर्वतः=अनार्यान्) आभूभिः (=स्तोत्रं कुर्वद्भिः=आर्यैः ) श्नथयन् ( =हिंसयन् ) [ वर्तते ] । [ अत एव ] वृद्धस्य चित् वर्धतः ( =पूर्वमेव वृद्धस्य महतः सतो वर्धमानस्य ) द्याम् इनक्षतः ( =द्युलोकं व्याप्नुवतः ) [ इन्द्रस्य ] स्तवानः ( =स्तुतिं कुर्वाणः ) वम्रः ( =एतन्नामा कश्चिदृषिः ) संदिहः ( =वल्मीकवपाः ) विजघान ॥

अस्य मन्त्रस्य उत्तरार्धो न स्पष्टार्थः । कंचित् वम्रनामकर्षिविषयमितिहासमुद्दिश्य मन्त्रकृतो वचनम् । सायणाचाया अपि " संदिहः सम्यगुपचिता वल्मीकवपा विज- " घान । इन्द्रेण परिहृतान्तरायः सन् पृथिव्याः सारभूतं वल्मीकवपालक्षणं यज्ञ- " संभारमहार्षीदित्यर्थः । तथा च शाखान्तरे समाम्नातम् । यद्वल्मीकवपासंभारो " भवति ऊर्जमेव पृथिव्या अवरुन्ध इति " इत्येतावदेवाहुः ॥

यज्ञादिकें करून करीत तसे ते करीत नसत.

'बळवान नायक हो '=' शाकी चोदिता भव.' म्हणजे लढाईंत तूं त्यांचा बिनीवाला हो. ऋ. १०. १३३. १ हा मंत्र पहा. ऋ. ८. १०२. ३ हाहि मंत्र पहा.

'यज्ञांमध्यें ' = ' सधमादेषु.' ' सधमाद ' हा शब्द किंचित् चमत्कारिक आहे. त्याचा मूळ अर्थ ' ज्यांत सगळेजण मिळून पिऊन हर्षयुक्त होतात ती जागा'; त्यावरून ' यज्ञ ' असा अर्थ होतो, कारण कीं यज्ञांत सर्व मिळून सोम पीत आणि माद करीत. हा मूळ अर्थ सायणाचार्यांनींच आपल्या भाष्यांत दिला आहे. ऋ. ३.४३.३ इत्यादि मंत्रांवरील भाष्य पहा.

वम्राविषयीं आम्ही जें सांगत असतों त्याचा उद्देश एकच वृत्त प्राचीन-

९. इंद्र अधार्मिक [जनां]ला धार्मिक [जनां]च्या हस्तगत करणारा [आणि] भक्त[जनां]कडून अभक्तांचा संहार करविणारा [असा आहे], [म्हणूनच] मोठा असतांहि [आणखी] मोठा होणाऱ्या [आणि] द्युलोकाप्रत पोंहचणाऱ्या [इंद्रा]ची स्तुति गाणारा [जो] वम्र [ऋषि] [तो] वपा काढून काढिता झाला.

9. Indra subjugates the irreligious for the religious, and destroys the impious through the pious. [Thus] Vamra, singing the praises of [Indra] who grows high [though] already high [and] who reaches the heaven, broke asunder the entrails.

---

काळीं कसें म्हणत आणि आतां कसें म्हणतात तें दाखवावें इतकाच आहे. पुष्कळ अक्षरें ऱ्हस्व असतां दीर्घ म्हणत अथवा दीर्घ असतां ऱ्हस्व म्हणत असें सर्वत्र सांगणें नाहीं. जेथें आम्हांस आतांच्या नियमांप्रमाणें ऱ्हस्व किंवा दीर्घ पाहिजे तेथें प्राचीन लोकांस ऱ्हस्व किंवा दीर्घ न चालतां दीर्घ किंवा ऱ्हस्वच लागे तरी नकळे; त्याचें उदाहरण या ऋचेंत आलें आहे. तें असें: 'बर्हिष्मते रन्धय शासदव्रतान्' असें सरळ असावें तसें असतांहि वृत्तासाठीं म्हणून 'रन्धया' असें संहितेंत आहे. तेव्हां सातवें अक्षर पूर्वी दीर्घ वाचीत असें म्हणावें लागतें. पण तसें म्हणावें तर इतर मंत्रांत तें अक्षर अर्वाचीन वृत्ताप्रमाणें ऱ्हस्वहि आहे (पुढचाच मंत्र पहा)!

ही प्रस्तुतची ऋचा वंशस्थाप्रमाणें म्हणण्यास फार न्यूनाधिक्य नाहीं:—

विजानीहि आर्यान् ये च दस्यवः ।
बर्हिष्मते रन्धय शासदव्रतान् ।
शाकी भव यजमानस्य चोदिता ।
विश्वेत्ता ते सधमादेषु चाकन ॥

---

९. पहिल्या अर्धाचा भावार्थ:—'इंद्रास भक्तजन जे आर्य ते आवडतात, अनार्य जाति आवडत नाहींत; तो अनार्यांस आर्यांच्या अमलाखालीं आणितो आणि ते शरण न येतील तर त्यांस आर्यांच्या हातून मारवितो.' उत्तरार्ध तिमिरमय आहे म्हटल्यास चालेल. आम्हीं सायणांस अनुसरून केलेल्या अर्थाचें तात्पर्य:—'म्हणूनच वम्र ऋषीस विघ्न आलें असतां तें इंद्रानें दूर केल्यामुळें त्याला वपा तोडून काढितां आल्या.' त्यांच्या म्हणण्याचें हृद्गत असें कीं, वल्मीकवपा म्हणून कांहीं यज्ञद्रव्य आहे तें पृथ्वींत मिळतें, तें मिळण्यास त्याला विघ्न झालें, तें इंद्रानें दूर केलें तेव्हां त्याणें तें पृथ्वींतून ओढून काढिलें.

**तक्षद्यत्त उशना सहसा सहो वि रोदसी मज्मना बाधते शवः।**
**आ त्वा वातस्य नृमणो मनोयुज आ पूर्यमाणमवहन्नभि श्रवः**
**॥ १० ॥ १० ॥**

तक्षत्। यत्। ते। उशना। सहसा। सहः। वि। रोदसी इति।
मज्मना। बाधते। शवः।
आ। त्वा। वातस्य। नृऽमनः। मनःऽयुजः। आ। पूर्यमाणम्। अवहन्।
अभि। श्रवः ॥ १० ॥ १० ॥

### भाषायाम्.

१०. यद् (=यदा) उशना (=एतन्नामकः कश्चिदृषिः) सहसा (=आत्मीयेन बलेन) ते (=तव) सहः (=बलं) तक्षत् (=अतक्षत्=तनूकृतवान्=तीक्ष्णीकृतवान्) [तदा] शवः (=तव बलं) मज्मना (=स्वमहत्त्वेन) रोदसी (=द्यावापृथिवी) विबाधते (=विविधं बबाधे=एकाम् एकस्यां दिशि अन्याम् अन्यस्यां दिशि व्यस्तवत्)। [तदा] हे नृमणः (=नृषु विषये अनुग्राहकबुद्धे) [इन्द्र], त्वा (=त्वां) वातस्य (=वायोः) मनोयुजः (=मनसैव युज्यमाना) [अश्वाः] आ [अवहन्] (=आनीतवन्तः), [उशनार्षिणा] पूर्यमाणं (=विपुलं यथा तथा अर्प्यमाणं) श्रवः अभि (=हविरन्नं प्रति) आ अवहन् (=आनीतवन्तः)॥

अत्रेदमुक्तं भवति। उशना ऋषिः स्वकीयस्य प्रेमयुक्तस्य स्तोत्रस्य बलेन इन्द्रस्य बलं वर्धितवान्। तस्य वर्धमानस्य बलस्य अतिमहीयस्त्वात् तद् द्यावापृथिव्योर्नान्तर्भवितुं शशाक। तस्मात् कारणात् ते परस्परम् अपजग्मतुः। अनन्तरम् इन्द्रः प्रसन्नः सन् वातस्य अतिजवैरश्वैरागत्य उशनसार्प्यमाणं प्रभूतमन्नं भक्षितवानिति॥

'मोठा असतांहि आणखी मोठा होणाऱ्या'=' वृद्धस्य चित् वर्धतः.' याचा आणि 'द्युलोकाप्रत पोंहचणाऱ्या'= 'द्याम् इनक्षतः' याचा अर्थ, वम्राची खरोखर सगळी कथा काय आहे ती समजल्यावर, समजणार.'

वंशरथाला आणि ह्या मंत्राला किती थोडें अंतर आहे तें पाहा:—

अनुव्रताय रन्धयन्नपव्रतान्।
आभूभिरिन्द्रः श्नथयन्ननाभुवः।
वृद्धस्य चिद् वर्धतो द्यामिनक्षतः।
स्तवानो वम्रो विजघान संदिहः।

१०. [ हे इंद्रा ], जेव्हां उशनानें [आपल्या ] बळानें तुझें बळ तीक्ष्ण केलें [तेव्हां] [तुझ्या ] बळाच्या मोठेपणामुळें द्युलोक आणि पृथ्वी [हीं] एकमेकापासून दूर दूर हटलीं; [तेव्हां] हे नरहितचिंतक [इंद्रा], मनांत येतांच जुंपले जाणारे वायूचे [घोडे] तुजप्रीत्यर्थ भरून दिलेल्या हविरन्नाप्रत [तुला] घेऊन आले.

10. When Us'anâ sharpened thy strength with [his] strength, thy power pressed asunder the earth and the heaven through its vastness: [then] did the wind's mind-yoked horses bring thee, o [Indra], benevolent to mankind,—bring thee to the sacrificial food that was being offered in plenty.

---

१०. भावार्थः—' उशना या नांवाच्या ऋषीनें आपल्या स्तवनांनीं इंद्राचें बळ इतकें वाढविलें कीं, तें फारच मोठें झाल्यामुळें पृथ्वी आणि आकाश यांत मावेनासें झालें तेव्हां तीं एकमेकापासून दूर दूर झालीं. मग इंद्र प्रसन्न होऊन वायूच्या अति सत्वर घोड्यांनीं येऊन उशनानें अर्पण केलेलें विपुल हविरन्न ग्रहण केलें.'

' उशनानें.' उशना हें एका ऋषीचें नांव आहे. त्यालाच ' काव्य ' असेंहि म्हणत असतात. ' काव्य ' असें आडनांव पडण्याचें कारण सायणाचार्यांच्या मतें ' कवीचा पुत्र ' म्हणून काव्य; परंतु उशनाविषयींचे सर्व मंत्र एकमेकांशीं ताडून पाहतां ' काव्य' म्हणजे 'विद्वान्, ' ' ज्ञानी ' असल्यामुळें त्याला तें नांव दिलें आहे असें दिसतें. ऋ. १. १२१. १२ यांत उशनानें इंद्राला वज्र दिलें असें सांगितलें आहे, आणि तें इंद्रासाठीं त्यानें तीक्ष्णहि करून दिलें असें सांगितल्याप्रमाणें दिसतें ( " यं ते काव्य उशना मन्दिनं दाद्वृत्रहणं पार्यं ततक्ष वज्रम् "). यावरून प्रस्तुत मंत्रांतहि 'सहः तक्षत् ' याचा अर्थ 'वज्ररूपी बळ तीक्ष्ण करिता झाला ' असा संभवतो. ऋ. ९. ८७. ३ यांत उशना हा सकलजनांच्या पूर्वी होऊन गेला, आणि त्यालाच ज्ञानाच्या योगेंकरून कांहीं गोष्टींचें गूढतत्त्व समजलें, आणि तो कुशल व ज्ञानी होता असें सांगितलें आहे ( ऋषिर्विप्रः पुर एता जनानाम् ऋभुर्धीर उशना काव्येन । स चिद्विवेद निहितं......गुह्यं नाम...). ऋ. ९. ९७. ७ यांत स्तोत्र करण्याच्या कुशळतेविषयीं आणि देवजातींच्या ज्ञानाविषयीं कोणा एकाला 'उशना'ची उपमा दिली आहे. ऋ. ६. २०. ११ यांत इंद्राला 'तूं पुरातन काळीं उशनाला प्रसन्न झालास' असें म्हटलें आहे. ऋ. १०. ४०. ७ यांत अश्वी देवांची प्रशंसा करीत असतांना त्याणीं उशनावर प्रसाद केला होता असें सांगितलें आहे. याशिवाय उशनाविषयीं ऋग्वेदांत कांहीं आढळत नाहीं. सांपडलें त्यावरून उशना

मन्दिष्ट यदुशने काव्ये सचाँ इन्द्रो वङ्कू वङ्कुतराधि तिष्ठति ।
उग्रो ययिं निरपः स्रोतसासृजद्वि शुष्णस्य दृंहिता ऐरयत्पुरः॥ ११

मन्दिष्ट । यत् । उशने । काव्ये । सचा । इन्द्रः । वङ्कू इति । वङ्कुऽतरा । अधि । तिष्ठति ।
उग्रः । ययिम् । निः । अपः । स्रोतसा । असृजत् । वि । शुष्णस्य । दृंहिताः । ऐरयत् । पुरः ॥ ११ ॥

## भाषायाम्.

११. यद् (=यदा) इन्द्रः उशने काव्ये सचा (=उशनसा काव्येन सह) मन्दिष्ट (=स्तुतोभूत्=स्तुत्या संतुष्टोभूत्) [तदा] [उशनसः शत्रुहननाय] [वातस्य] वङ्कू (=वक्रगमनशीलौ) वङ्कुतरा (=वङ्कुतरौ=अतिशयेन कुटिलं गच्छन्तौ) [अश्वौ] अधितिष्ठति (=आरोहति=आरुरोह)। [अपि च] उग्रः (=महाबल) [इन्द्रः] ययिं (=गमनयुक्तात् मेघात्) अपः (=मेघोदकानि) स्रोतसा (=प्रवाहरूपेण) निरसृजत् (=निरगमयत्) [तथा] शुष्णस्य (=मेघरूपस्य असुरस्य) दृंहिताः (=प्रवृद्धाः) पुरः (=नगरीः= नगराकाराणि मेघमण्डलानि) विऐरयत् (=विविधं प्रेरितवान् =विदारितवान्) ॥

उशनसः स्तोत्राणि श्रुतवान् इन्द्रः वायोर्वायुवद् अतिशयेन वक्रगमनशीलावश्वावारुह्य मेघं भित्त्वा अपां वृष्टिं कृतवानित्यर्थः ॥

---

हा कोणी एक अति पुरातन काळचा म्हणजे वैदिक युगापेक्षांहि फार प्राचीन काळचा देवभक्त होऊन गेला. तो फार चतुर, विद्वान् आणि तत्त्वज्ञ असे त्यामुळें तो देवांस आवडणारीं अशीं स्तोत्रें करी म्हणून इंद्र त्याला प्रसन्न झाला होता इतकें तात्पर्य निघतें. आधुनिक युगांत उशना हें बृहस्पतीचें नांव झालें आहे. त्याचें कारण इतकेंच कीं जसा एकादा नवीन स्थानिक देव हळुहळु प्रसिद्धीस येऊन फार प्रख्यात झाल्यावर त्याचे भक्त अथवा पुजारी त्याला कोणत्या तरी एका जुन्या मोठ्या देवाचा अवतार करून टाकितात, तसाच प्रकार जुन्या दैविक अथवा मानुषिक व्यक्तीविषयीं आहे. बृहस्पति हा फार चतुर, विद्वान्, तत्त्वज्ञ, वाणीकुशळ, आणि शाहणा आणि इंद्राच्या प्रीतींतला होय आणि 'उशना' हि त्याच गुणांनीं संपन्न आहे असें आढळलें, आणि बृहस्पतीला अतिप्राचीन असा कांहीं तरी संबंध लावून दिला पाहिजे, तेव्हां उशना आणि बृहस्पति एकच करून टाकिला. अशीं एकीकरणें आपल्या आधुनिक ग्रंथांत अनेक सांपडतील.

'तुझ्या बळाच्या मोठेपणामुळें द्युलोक

११. जेव्हां इंद्र काव्य उशनाला प्रसन्न झाला [तेव्हां] [तो] [वायूच्या] वांकडे वांकडे चालणाऱ्या [आणि] अधिक वांकडे वांकडे चालणाऱ्या घोड्यांवर बसला. आणि प्रतापी [इंद्र] पळून जात असलेल्या [मेघां]तून प्रवाहद्वारें उदकें खालीं सोडून देता झाला, [आणि] शुष्णाचीं बळकट नगरें विदारून टाकिता झाला.

11. When Indra became pleased with Us'anâ Kâvya he mounted on the crooked-going, the very crooked-going horses [of the wind],—mighty [Indra] poured the waters down in a stream from the runaway cloud, away.he broke the strong cities of S'ushna.

---

आणि पृथ्वी हीं एकमेकापासून दूर दूर हटलीं'='वि रोदसी मज्मना बाधते सहः.' अक्षरशः अर्थ, '[तुझें] बळ द्युलोक आणि पृथ्वी यांस मोठेपणानें दूर हटवितें [झालें].' म्हणजे 'तुझें बळ इतकें वाढलें कीं ब्रह्माण्डगोल फुटला आणि द्यु आणि पृथ्वी हीं दोनहि शकलें एकमेकापासून दूर दूर झालीं.'

'मनांत येतांच जुंपले जाणारे'='मनोयुजः.' ज्यांस हातानें जुंपावयास नको, धन्याच्या मनांत येतांच आपोआप गाडीला जोडिले जाणारे. हा गुण वायूच्या घोड्यांच्या आंगीं अवश्य असलाच पाहिजे. 'वायूचे घोडे' म्हणजे सायणाचार्य 'वायूसारिखे शीघ्र घोडे' असें एका ठिकाणीं म्हणतात, (ऋ. १. १२१. १२ आणि १. १७४. ५ ह्या मंत्रांवरचें भाष्य पहा). 'वायुदेवाचे घोडे' असें प्रस्तुत मंत्रांत ते म्हणतात. अर्थात अंतर पडत नाहीं.

---

११. भावार्थः—'उशना ऋषीवर इंद्र प्रसन्न होऊन वायूच्या घोड्यांवर बसला आणि पाणी न यावें या हेतूनें पळून जाणारा जो मेघ तो फोडून त्यांतून उदकें बाहेर काढून वृष्टि केली.'

'काव्य उशनाला प्रसन्न झाला'='मन्दिष्ट उशना काव्ये सचा.' हा अर्थ सायणांस अनुसरून केला आहे. 'उशना काव्यासह सोम पिऊन संतुष्ट झाला' असाहि अर्थ संभवतो.

'वांकडे वांकडे चालणाऱ्या आणि अधिक वांकडे वांकडे चालणाऱ्या'='वङ्कू वङ्कुतरा.' वाऱ्याची गति सतत वांकडी असते त्यामुळें त्याचे घोडेसुद्धा तसेच आहेत अशी कवीची स्वभावोक्ति होय. इंद्र वायूच्या घोड्यांवर बसून जातो याविषयीं वरच्या मंत्रांत आलेंच आहे. आतां या मंत्रांत सांगितलेले वक्रगामी अश्व वायूचेच होत, इंद्राचे नव्हेत याविषयीं ऋ. ८. १. ११ हा मंत्र पाहा. ('यत् तुदत् सूरः एतशं वङ्कू वातस्य पर्णिना

**आ स्मा रथं वृषपाणेषु तिष्ठसि शार्यातस्य प्रभृता येषु मन्दसे ।**
**इन्द्र यथा सुतसोमेषु चाकनोऽनर्वाणं श्लोकमा रोहसे दिवि ॥ १२**

आ । स्म । रथम् । वृषऽपानेषु । तिष्ठसि । शार्यातस्य । प्रऽभृताः । येषु । मन्दसे ।
इन्द्र । यथा । सुतऽसोमेषु । चाकनः । अनर्वाणम् । श्लोकम् । आ । रोहसे । दिवि ॥ १२ ॥

## भाषायाम्.

१२. [ हे इन्द्र ], वृषपाणेषु (=वीर्ययुक्तसोमानां पानेषु) [निमित्तभूतेषु] [ त्वं] रथम् आतिष्ठसि स्म (=स्वयमेव रथमारुह्य तादृक्सोमरसपानयुक्तं स्थलं प्रति प्राप्नोषि) [त्वम्] एषु शार्यातस्य [सोमेषु] (=शार्यातप्रभृतसदृशेषु सोमेषु) मन्दसे (=हर्षं प्राप्नोषि) [ तादृशाः सोमा ] [इमे तुभ्यं ] प्रभृताः (=अर्पिताः) [सन्ति] । हे इन्द्र, यथा[यथा] सुतसोमेषु (=अभिषुतेषु सोमेषु ) चाकनः (=कामयसे=सकामं यथा तथा पिबसि ) [ तथातथा ] अनर्वाणं श्लोकं दिवि आरोहसे (=स्थिरं स्तोत्रम् आरुह्य दिवि गच्छसि ) ॥

अत्रेदं भावगतम् । हे इन्द्र, त्वं सोमपानार्थं यत्रकुत्रापि स्वयमेव गच्छसि तस्माद् अत्रापि आगच्छ । अत्र हि तव प्रियोपासकेन शार्यातेन नाम्ना पुरा ये सोमास्तुभ्यम् अर्पिताः तादृशा एव वयम् अर्पयामः । तद् आगत्य तान् पिब । अपि च त्वं यथा यथा अस्माकं सोमान् पिबसि तथा तथा अस्माभिः क्रियमाणं स्तोत्रम् आरुह्य दिवि गमिष्यसीति ॥

वहत् कुत्सम् आर्जुनेयं शतक्रतुः'='जेव्हां सूर्यानें एतश ऋषीला पीडा केली तेव्हां शतप्रज्ञ इंद्र वायूच्या वक्रगामी सपक्ष घोड्यांवर बसून आर्जुनेय कुत्साजवळ आला '). फार लौकर जाणें असेल तर वायूच्या घोड्यांवर बसून जाणें याशिवाय दुसरा त्वरित उपाय नाहीं. यास्तव ऋषि इंद्रास वायूचे घोडे बैसावयाला देतो हें योग्य आहे.

'शुष्णाचीं बळकट नगरें विदारून टाकिता झाला ' = ' वि शुष्णस्य दृंहिता ऐरयत् पुरः.' उत्तरार्धाच्या प्रथम भागांत 'प्रवाहद्वारें उदकें खालीं सोडून देता झाला' असें जें सांगितलें आहे तोच अर्थ शब्दान्तरांनीं येथें सांगितला आहे. कारण कीं शुष्ण म्हणजे मेघासुर आणि त्याचीं नगरें म्हणजे मेघमंडलें आणि तीं नगरें फोडणें म्हणजे मेघोदकांची वृष्टि करणें. वर साहाव्या मंत्रावरील टीप पाहा.

१२. [हे इंद्रा], सोम प्यावयाला जाण्यासाठीं तूं रथांत बसत असतोसच; तुला शार्याताचे [सोमरस पिऊन] आनंद होतो, [तर] [तसले हे सोम] [तुला] अर्पण केले [आहेत]; हे इंद्रा, जसजसा सोमयुक्त यज्ञांमध्यें [तूं] संतुष्ट होतोस [तसतसें] तुझें अविनाशी स्तोत्र स्वर्गीं पोंहचतें.

12. [Thou] dost always mount thy chariot towards places where strong Somas are drank; [here are] offered [Somas] [like those] of S'âryâta in which [thou] takest delight. O Indra, as [thou] feelest pleased with [sacrifices] in which Somas are extracted, [thou] mountest unperishing praise to heaven.

---

१२. या मंत्रांत इंद्रानें स्तोत्रवक्त्याकडे येऊन त्याणें अर्पण केलेला सोम प्यावा अशी प्रार्थना आहे. तो म्हणतो, 'हे इंद्रा, तूं विशेष आग्रहाशिवाय स्वताहाच सोम पिण्याकरितां उपासकांकडे रथांत बसून जात असतोस, त्याप्रमाणें आम्हांजवळ येऊन तूं आमचा सोम पिशीलच. शिवाय, हा जो आम्हीं तुला आज सोम अर्पण करीत आहों तो साधारण नव्हे, तर पूर्वीं तुझा प्रियभक्त शार्यात जसे सोम अर्पण करी, तसले हे सोम आहेत, यास्तव तूं येऊन हे पी. आणि जर तूं येऊन पिशील, तर आम्ही तुझी मोठी स्तुति करूं, आणि ती दिगंतरीं पोंहचेल इतकेंच नाहीं, तर ती तुझ्या बरोबर स्वर्गींहि जाऊन पोंहचेल.'

'सोम प्यावयाला जाण्यासाठीं' = 'वृषपाणेषु.' अक्षरशः अर्थ विशेषेंकरून माद उत्पन्न करणाऱ्या सोमाचें पिणें असलें म्हणजे.

'शार्यात.' हा कोण होता याविषयीं विशेष कांहीं आढळत नाहीं, मात्र दुसऱ्या एका मंत्रांत (ऋ. ३. ५१. ७) 'हे इंद्रा, तूं शार्याताच्या घरीं सोम प्यालास तसा आज येथें पी' = 'इन्द्र मरुत्व इह पाहि सोमं यथा शार्याते अपिबः सुतस्य.' असें सांगितलें आहे.

'तसें तुझें अविनाशी स्तोत्र स्वर्गीं पोंहचतें' = 'अनर्वाणं श्लोकम् आरोहसे दिवि.' अक्षरशः अर्थ 'अविनाशी स्तोत्रावर स्वर्गीं चढशील.' म्हणजे आम्ही तुला आपल्या स्तोत्रावर बसवून स्वर्गीं पाठवूं.

अददा अर्भां महते वचस्यवे कक्षीवते वृचयामिन्द्र सुन्वते ।
मेनाभवो वृषणश्वस्य सुक्रतो विश्वेत्ता ते सवनेषु प्रवाच्या॥१३

अददाः । अर्भाम् । महते । वचस्यवे । कक्षीवते । वृचयाम् । इन्द्र । सुन्वते ।
मेना । अभवः । वृषणश्वस्य । सुऽक्रतो इति सुऽक्रतो । विश्वा । इत् । ता । ते । सवनेषु । प्रऽवाच्या ॥ १३ ॥

## भाषायाम्.

१३. हे इन्द्र, [ त्वं ] वचस्यवे (=स्तुतिरूपं वच आत्मन इच्छते=तव स्तुतिकरणोत्सुकाय ) सुन्वते (=त्वदर्थं सोमम् अभिषुण्वते=यज्ञं कुर्वते ) महते (=प्रवृद्धाय ) कक्षीवते ( =एतन्नामकाय कस्मैचिदुपासकाय ) अर्भाम् (=अल्पां=कनीयसीं ) वृचयाम् (=एतन्नामकां भार्याम् ) अददाः । हे सुक्रतो (=शोभनप्रज्ञ ) इन्द्र, [ त्वं ] वृषणश्वस्य (=एतदाख्यस्य) उपासकस्य मेना (=एतन्नाम्नी भार्या अभवः)। ता (=तानि) [ एतानि ] ते (=तव ) विश्वा इत् (=विश्वान्यपि ) [ चरितानि ] सवनेषु (=यज्ञेषु ) प्रवाच्या (=प्रवाच्यानि=वर्णयितुं योग्यानि ) [ सन्ति ] ॥

अत्रेन्द्रः किल वृद्धाय कक्षीवते वृचयां नाम तरुणां भार्यां ददाविति तथैव इन्द्रः किल वृषणश्वस्य कस्यचिद् राज्ञो मेना नाम्नी भार्याभवदिति कंचित् प्रसिद्धम् इतिहासमधिकृत्य सत्यो ब्रूत इत्यनुसंधेयम् ॥

१३. हे इंद्रा, तूं स्तोत्र करण्याविषयीं तत्पर [आणि] [तुजकरितां] सोम काढणाऱ्या मोठ्या कक्षीवंताला तरुण वृचया देता झालास. हे सुप्रज्ञ [इंद्रा], [तूं] वृषणश्वाची मेना झालास. [तर] हीं सर्व तुझीं [चरित्रें] यज्ञांमध्यें गाण्यास योग्य [होत].

13. [Thou] gavest, o Indra, the young Vṛichayâ to great Kakshîvân intent on praising [and] extracting the Soma [for thee]. [Thou] becamest, o wise [Indra], the Menâ of Vrishaṇas'va. Even all those thy [deeds] deserve to be sung in sacrifices.

१३. मोठ्या कक्षीवंताला लहान वृचया इंद्रानें दिली आणि इंद्र 'वृषणश्व' राजाची मेना नांवाची बायको झाला. अशा प्रसिद्ध कथांस अनुलक्षून ऋषि म्हणतो, 'हे इन्द्रा, हीं जीं आणि अशीं तुझीं दुसरीं अनेक चरितें तीं सर्व यज्ञांत आम्हांसारिख्या कवींनीं गाण्यास योग्य होत.'

परंतु 'वृचया' ही कोण होती याविषयीं दुसरे मंत्र कांहीं सांपडत नाहींत आणि 'मेना' इजविषयींहि कांहीं दुसऱ्या ठिकाणीं सांगितलेलें आढळत नाहीं, त्याप्रमाणेंच 'वृषणश्व' हा कोण होता व त्याचा इतिहास काय आहे याविषयीं तरी ऋग्वेदांत इतर ठिकाणीं कांहीं सांगितलेलें नाहीं. 'कक्षीवान्' हा मात्र वेदांत चांगला प्रसिद्ध आहे. सू. १८ मं. १ याजवरील टीप पाहा.

परंतु 'वृचया' 'कक्षीवंता'ला दिली याविषयीं सायणाचार्यांनीं दिलेला इतिहास, संक्षेपानें असा आहे:– ''अंगदेशाचा राजा आपल्या स्त्रियांस घेऊन ''गंगेंत जलक्रीडा करीत असतां 'दीर्घतमा' ''या नांवाचा ऋषि गरीब आणि दुर्बळ ''असल्यामुळें त्याला त्याच्या स्त्रीपुत्रादिकांनीं त्या नदींत टाकिला. तेव्हां राजानें ''त्याला म्हटलें, ही माझी भार्या आहे ''पण हिला पुत्र होत नाहीं, तर तूं इच्या ''पोटीं पुत्र उत्पन्न कर. ऋषीनें बरें म्हटल्यावरून राजानें आपल्या पत्नीस त्याजकडेस जावयास सांगितलें. परंतु ऋषि ''कुरूप असल्यामुळें राणीनें आपली दासी ''त्याजकडेस पाठविली. या दासीच्या पोटीं '' 'दीर्घतमा' पासून झालेला जो पुत्र तोच '' 'कक्षीवान्.' त्याणें पुष्कळ यज्ञ केल्या''मुळें इंद्रानें त्याला प्रसन्न होऊन 'वृचया' ''या नांवाची स्त्री प्राप्त करून दिली''. परंतु या इतिहासापासून तरुण स्त्री प्राप्त करून देण्याचें कारण कांहीं समजत नाहीं. इंद्र हा 'वृषणश्वा'ची मेना स्त्री कसा झाला याविषयींहि सायणाचार्यांनीं 'शाट्यायन' आणि 'ताण्ड्य' ब्राह्मणांतून कांहीं इतिहास दिला आहे परंतु त्यावरून कांहीं खुलासा होत नाहीं.

इन्द्रो अश्रायि सुध्यो निरेके पज्रेषु स्तोमो दुर्यो न यूपः ।
अश्वयुर्गव्यू रथयुर्वसूयुरिन्द्र इद्रायः क्षयति प्रयन्ता ॥ १४ ॥
इन्द्रः । अश्रायि । सुऽध्यः । निरेके । पज्रेषु । स्तोमः । दुर्यः । न । यूपः ।
अश्वऽयुः । गव्युः । रथऽयुः । वसुऽयुः । इन्द्रः । इत् । रायः । क्षयति । प्रऽयन्ता ॥ १४ ॥

---

## भाषायाम्.

१४. निरेके (=नैर्धन्येपि ) इन्द्रः सुधियः (=सुकर्मणः प्रति) अश्रायि (=अश्रयत्=श्रयति सेवते ) । पज्रेषु (=अङ्गिरस्सु ) इन्द्रस्य स्तोमः (=स्तोत्रं ) दुर्यो यूपो न (=द्वारि निखाता स्थूणेव ) [ निश्चलस्तिष्ठति ] । अश्वयुः (=अश्वान् ) इच्छन् (=अश्वानामर्थे युध्यन्=युद्धेषु यजमानेभ्योश्वान् ददत् ), गव्युः गा इच्छन् (=यजमानेभ्यो गा दातुम् इच्छन् ), रथयुः (=रथान् इच्छन्=यजमानेभ्यो रथान् दातुम् इच्छन् ), वसूयुः (=वसूनीच्छन्=यजमानेभ्यो वसूनि दातुम् इच्छन्) रायः प्रयन्ता (=संपदो दाता) इन्द्र इत् (=इन्द्र एव ) [ रायः ] क्षयति (=संपद ईश्वरो भवति ) ॥

इन्द्रो न केवलं सति धने स्वोपासकानां गृहे सोमपानाय गच्छति ते वा तमुपासते, अपि तु प्राप्तेपि नैर्धन्ये स तेषां गृहे गच्छति ते च तमुपासते । अत एव पज्रेषु सति वा न वा सति धने इन्द्रस्य स्तोत्रं द्वारि स्थिता स्थूणेव निश्चलम् । सततमिति यावत् । गीयते । अपि च यजमानेभ्योश्वादीन् संपादयन्निन्द्र एव धनस्य प्रभुरस्तीत्यर्थः ॥

---

'स्तोत्र करण्याविषयीं तत्पर'= 'वचस्यवे.' अक्षरशः अर्थ, 'स्तोत्र करण्याविषयीं इच्छिणारा,' 'स्तोत्र करण्यास झटणारा.'

'यज्ञांमध्यें गाण्यास योग्य'='सवनेषु प्रवाच्या.' ज्या देवाच्या नांवानें आपले आर्य पूर्वज यज्ञ करीत त्याचीं चरित्रें म्हणजे त्याणें कांहीं पराक्रम केले असतील ते, अथवा कोणावर तरी प्रसन्न होऊन कांहीं संकटांत अथवा मोठ्या प्रसंगांत साहाय्य केलें असेल तें, अथवा त्यासारखीच कांहीं दुसरीं कृत्यें केलीं असतील तीं गात. म्हणजे, त्यांविषयीं तत्काळ सूक्तें रचून म्हणत असत. दुसऱ्यांनीं रचलेलीं पूर्वींचीं सूक्तें म्हणून आतांच्या काळांत लोक करितात तसे, यज्ञ करीत नसत. ते आमच्या श्रोत्रियांप्रमाणें पुरातन काळचे मंत्र अर्थ वगैरे कांहींच न समजतां केवळ पाठ करून ठेविल्याप्रमाणें न म्हणतां यज्ञाचे देवतेविषयीं आपणच सूक्तें रचीत. आणि हीं सूक्तें जुनीं नव्हेत, आतांच रचलेलीं नवीं आहेत, यास्तव हीं तुम्ही ग्रहण करा अशी त्याच सूक्तांत देवांस प्रार्थना करीत.

१४. दारिद्रावस्था आली असतांहि, चांगलीं कर्में करणाऱ्यांच्या येथें इंद्र जात असतो. पज्रांचे घरीं [इंद्राची] स्तुति दारांतील खांबाप्रमाणें [ स्थिर असते ]. घोडे मिळविणारा, गाई मिळविणारा, रथ मिळविणारा, [आणि] द्रव्य मिळविणारा उदार इंद्रच संपत्तीचा राजा [ होय ].

14. Indra repairs to [ the house of ] the pious [ even ] in poverty. With the Pajras the praise of Indra [is] [firm] as the door-post. Desirous of [ winning in battle] horses, cows, chariots, [and] riches [for his worshippers ], Indra the giver [of riches] [ is ] alone the lord of riches.

१४. 'इन्द्र संपत्ति असली म्हणजेच उपासकांस आश्रय देतो असें नाहीं, दरिद्रावस्था आली तरी तो त्यांस सोडीत नाहीं; त्याप्रमाणेंच त्याचे सेवक त्यास दारिद्र असे पर्यंत स्मरतात, मग विसरतात असें नाहीं, पण सर्व वेळीं भजत असतात. उदाहरणार्थ पज्रांचे येथें म्हणजे आमचे वंशांत इंद्रभजन अचल असतें. आणि इंद्र तरी दरिद्रावस्था राहूं देतो असें नाहीं; तो घोडे, गाई वगैरे सर्व देणारा होय आणि सकल संपत्तीचा तोच स्वामी होय,' असा या मंत्राचा भावार्थ आहे.

'दरिद्रावस्था आली असतांहि'='निरेके.' याविषयीं थोडीशी अडचण आहे. 'निरेक 'शब्दाचा अर्थ सायणाचार्य बहुतकरून दारिद्र असा करितात. या ठिकाणीं त्यांणींच 'निर्धनत्व,' 'दारिद्र' असा अर्थ केला आहे. आणि ऋ. ७. ९०. ३ याजवरहि त्यांणीं तोच अर्थ केला आहे. ऋ. ८. २४. ४ यांत मात्र त्यांणीं धन असा अर्थ केला आहे. पण तेथें तरी दारिद्र हा अर्थ जुळणार नाहीं असें म्हणवत नाहीं, आणि म्हटलें तरीहि एकाच शब्दाचे असे विरोधी अर्थ होतात यांत विशेष नवल नाहीं. 'यु' म्हणजे 'जोडणें' आणि 'वेगळें करणें' हे दोनी अर्थ होतात. कितीएक पाश्चिम विद्वान् प्रस्तुत स्थळीं 'निरेक' म्हणजे 'संनिधान', '"अतिसंनिकटता ' असा अर्थ करून 'इन्द्रो अश्रायि सुधियो निरेके ' यांत 'सुधियो ' ही षष्ठी घेऊन 'इन्द्र सत्कर्म करणाऱ्याच्या समीप असतो ' असें भाषान्तर करितात, आणि ऋग्वेदांत सर्वत्र 'निरेक ' शब्दाचा हाच अर्थ घेतात. परंतु याला आधार सायणांचा नाहीं इतकेंच नव्हे, पण दुसऱ्या कोणत्याहि एतद्देशीय ग्रंथाचाहि दिसत नाहीं, आणि केवळ कल्पनेवर बसविलेला आहे. पण ज्या ज्या मंत्रांत हा शब्द आला आहे ते सर्व शोधून आणि विचारून पाहतां 'दारिद्र' हा अर्थ (ऋ. ८. २४. ४ खेरीज करून ) सर्वत्र उत्तम जुळतो, आणि सायणांनीं तरी बहुतकरून तोच केला आहे, आणि 'समीप' हा जुळत नाहीं.

'चांगलीं कर्में करणाऱ्यांच्या येथें जात असतो '=' अश्रायि सुधियः.' अक्षरशः अर्थ, 'चांगलीं कर्में करणाऱ्यांमत जात

इदं नमो वृषभाय स्वराजे सत्यशुष्माय तवसेऽवाचि ।
अस्मिन्निन्द्र वृजने सर्ववीराः स्मत्सूरिभिस्तव शर्मन्त्स्याम ॥१५॥
॥ ११ ॥

इदम् । नमः । वृषभाय । स्वऽराजे । सत्यऽशुष्माय । तवसे । अवाचि । अस्मिन् । इन्द्र । वृजने । सर्वऽवीराः । स्मत् । सूरिऽभिः । तव । शर्मन् । स्याम ॥ १५ ॥ ११ ॥

## भाषायाम्.

१५. इदम् (=अधुना उपसंह्रियमाणं) नमः (=स्तोत्रं) वृषभाय (=वर्षणशीलाय=वीर्यसंपन्नाय), स्वराजे (=स्वकीयेन तेजसा राजमानाय), सत्यशुष्माय (=अवितथ-बलयुक्ताय), तवसे (=अत्यन्तं प्रवृद्धाय) [इन्द्राय] अवाचि (=अस्माभिः प्रायोजि=उक्तमस्ति)। [तस्मात् कारणात्], हे इन्द्र, अस्मिन् वृजने (=संग्रामे=युद्धे) [वयं] सर्ववीराः (=सकलवीरैः सहिताः) सूरिभिः (=विद्वद्भिः) [सहिताश्च] तव शर्मन् (=तव शर्मणि=रक्षणे) स्मत् स्याम (=सुष्ठु यथा तथा भवेम) ॥

कस्मिंश्चिद् युद्धे प्रसक्ते सति सूक्तमिदं रचितमभूदित्यनुसंधेयम् ॥

असतो.' 'अश्रायि' हें कर्तरि आत्मनेपद आहे. 'सुधियः' ही षष्ठी घेतल्यास अडचण नाहीं. मग 'चांगलीं कर्में करणाऱ्याच्या दरिद्रावस्थेंतहि इंद्र आश्रय देतो' असें भाषान्तर करावें.

'पज्रांच्या येथें'='पज्रेषु.' पज्र म्हणजे 'अंगिरस.' अंगिरस कुळाचें पज्र हें दुसरें नांव आहे. सूक्तकर्ता सव्य ऋषि याच वंशांतला आहे. हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

'दारांतील खांबाप्रमाणें'=' दुर्यो न यूपः.' ह्या उपमेकडे लक्ष्य द्यावें. आम्ही अर्थ सायणांस अनुसरूनच केला आहे. दारांतील खांब अचळ कसा असतो तें प्राचीन घरांची रचना कशी होती तें समजल्याशिवाय लक्ष्यांत येण्यास कठिण आहे.

'घोडे मिळविणारा'=' अश्वयुः.' अक्षरशः 'घोड्यांची इच्छा करणारा,' 'घोडे मिळवून देण्याविषयीं युक्त्या वगैरे झटणारा.'

'उदार'=' रायः प्रयन्ता.' अक्षरशः अर्थ 'संपत्ति देणारा.' 'रायः' हें पद 'प्रयन्ता' आणि 'क्षयति' या दोहीं पदांशीं घेतलें पाहिजे. या ऋचेचें वृत्त 'त्रिष्टुभ्' आहे. 'त्रिष्टुभ्' म्हणजे आलीकडे ज्याला आपण 'उपजाति' म्हणतों तेंच. रघुवंशाचा पांचवा सर्ग उपजातींत अथवा त्रिष्टुभांत लिहिलेला आहे. जसा 'जगतींत' थोडासा फेरफार करून घातल्यावर वंशस्थाप्रमाणें म्हणतां येतें तसेंच त्रिष्टुभ् वृत्तहि उपजातीसारिखें म्हणतां येतें. साधारण उपजातीच्या श्लोकामध्यें

१९. हें स्तोत्र बळवान्, स्वतेजस्वी, सत्यपराक्रम, [ आणि ] प्रतापी इन्द्राप्रीत्यर्थ गाइलें आहे.– [तर] हे इन्द्रा, या संग्रामीं सकळ वीरांसहित [आणि] [सकळ] विद्वानांसहित आम्ही तुझ्या आश्रयांत संपूर्ण राहूं असें कर.

15. This hymn is chanted to the mighty, the self-resplendent, the true-valored [and] the great [Indra].– May we, [therefore], o Indra, be fully under thy protection in this battle with all [our] heroes [and] [ our ] learned men.

---

आणि या ऋचेमध्यें किती थोडें अंतर आहे पहाः–

इन्द्रो अँश्रायि सुधियो निरेके ।
पज्रेषु स्तोमो दुरिओ न यूपः ।
अश्वयुर्गव्यू रथयुर्वसूयुः ।
इन्द्र इद्रायः क्षयति प्रयन्ता ॥

---

१५. हा या सूक्ताचा उपसंहार आहे. आणि सूक्ताचे अंतीं जें इष्टदेवतेपासून मागून घेणें आहे आणि ज्या प्रसंगास अनुलक्षून सूक्त रचिलें आहे त्याच्या संबधानें यांत प्रार्थना आहे. ऋषि म्हणतो, ' हा जो युद्धप्रसंग आला आहे, त्यांत आम्ही आपल्या शूर योद्धयांसहित आणि विद्वान् मनुष्यांसहित तुझ्या आश्रयांत राहूं आणि यशस्वी होऊं असें कर; कारण, हे इंद्रा, तूं बळवान्, स्वतःसिद्धतेजोयुक्त, सत्यपराक्रमी आणि महाप्रतापी आहेस, आणि हें सूक्त तुजप्रीत्यर्थ आम्हीं रचून म्हटलें आहे.'

आपण अशी कल्पना केली पाहिजे कीं कांहीं युद्धप्रसंग आला होता, आणि त्या वेळीं इंद्रानें साहाय्य करावें म्हणून हें सूक्त रचिलेलें आहे, आणि म्हटलेलें आहे. म्हणूनच या ' संग्रामीं ' म्हणजे हा जो युद्धप्रसंग आला आहे त्यांत असें सत्य-ऋषि म्हणतो.

' सकळ वीरांसहित [ आणि ] [ सकळ ] विद्वानांसहित'='सर्ववीराः सूरिभिः' म्हणजे युद्धांत लढावयास जे जातील ते आमचे पुत्रपौत्रादि योद्धे आणि घरीं राहतील असे जे विद्वान् लोक, त्या सर्वांसहित म्हणजे योद्धयांस यश येओ आणि विद्वज्जनांस लढाईपासून उपद्रव न होओ. सूक्तकर्ता ब्राह्मण ( म्हणजे ज्याला आतां आपण उत्तम ब्राह्मण अथवा ऋषि मानितों तसा ) आहे, त्यापेक्षां लढाईंत आमच्या शूर पुत्रपौत्रादिकांना जय होओ असें जें म्हणतो तें महत्त्वाचें आहे. आपले आर्य पूर्वज आधुनिक ब्राह्मणांहून फार निराळे होते, आणि त्यांचे कितीएक मुलगे विद्वान् आणि दुसरे कितीएक रणशूर वीर असत, सर्वच गोमुखींत हात घालून जप करीत नसत, अथवा भिक्षुकी करीत नसत. याविषयां. या मंत्राशिवाय दुसरींहि अनेक प्रमाणें आहेत.

' तुझ्या आश्रयांत–तव शर्मणि.' सायणाचार्य 'तुझ्या सुखांत ' असा अर्थ करितात. परंतु ' शर्म ' याचा अर्थ 'सुख' हा जरी होतो तथापि 'आश्रय,' 'शरण'

## सूक्तम् ५२.

आङ्गिरसः सव्य ऋषिः । इन्द्रो देवता । त्रयोदशीपञ्चदश्योस्त्रिष्टुप् शिष्टानां जगती च्छन्दः ।

**त्यं सु मेषं महया स्वर्विदं शतं यस्य सुभ्वः साकमीरते ।**

**अत्यं न वाजं हवनस्यदं रथमेन्द्रं ववृत्यामवसे सुवृक्तिभिः ॥१॥**

त्यम् । सु । मेषम् । महय । स्वःऽविदम् । शतम् । यस्य । सुऽभ्वः । साकम् । ईरते ।

अत्यम् । न । वाजम् । हवनऽस्यदम् । रथम् । आ । इन्द्रम् । ववृत्याम् । अवसे । सुवृक्तिऽभिः ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. यस्य [ इन्द्रस्य ] शतं सुभ्वः (=स्तोतारः) साकं (=युगपद्) ईरते (=वाच उदीरयन्ति=स्तुती प्रवर्तन्ते ) [ तं ] त्यं (=प्रसिद्धं ) मेषं (=शत्रुभिः सह स्पर्धमानं= वीर्यसंपन्नं ) स्वर्विदं (=द्युलोकरूपस्य स्वर्गस्य लम्भयितारम् ) [ इन्द्रं ] सु (=सुष्ठु यथा भवति तथा ) महय (=पूजय ) । [ अहमपि ], अत्यं वाजं हवनस्यदं रथं न (=वेगवन्तमश्वं यथा हवनगामिनं रथं प्रति तथा ) इन्द्रम् अवसे (=रक्षणाय=आगत्य रक्षणं यथा करोति तथा ) सुवृक्तिभिः (=शोभनरचनायुक्ताभिः=सुरचिताभिः) स्तुतिभिः आववृत्याम् (=आवर्तयेयम्=अत्रागन्तुं प्रवर्तयेयम् ) ॥

ह्याहि होतं. असतो. याविषयीं ऋग्वेदांतील पुष्कळ मंत्र शोधून पाहतां आपली खात्री होते. ऋ. ४. १७. १०; ६. १६. ३८; २. २७. ७; आणि १०. १६७. ३ हे मंत्र पहा. ऋ. २. २७. ७ यांतहि प्रस्तुत प्रसंगीं केलेल्या स्तुतीप्रमाणेंच स्तुति आणि प्रार्थना आहे.

'या संग्रामीं'='अस्मिन् वृजने.' हा सायणानुसारी अर्थ आम्हांस खरा दिसतो. ऋ. १. १०५. १९ हा मंत्र पहा; त्यांतहि यासारिखीच प्रार्थना आहे. कितीएक पाश्चिमात्य विद्वान् 'वृजन'-शब्दाचा अर्थ 'खेडें,' 'गांव' अथवा 'ठिकाण' असा कल्पितात. 'गृह' हा अर्थ जरी ( ऋ. १. १०१. ८ याजवरील भाष्यावरून ) सिद्ध होतो, तरी तो अर्थ सर्वत्र लागत नाहीं, आणि 'संग्राम' असा सायणाचार्यांनीं केलेला बहुतेक ठिकाणीं उत्तम जुळतो, असें 'वृजन' शब्द जेथें जेथें आला आहे ते सर्व मंत्र ताडून पहातां दिसून येतें.

खालीं लिहिलेल्या थोड्याच फेरफारानें हा त्रिष्टुभ् मंत्र उपजातीप्रमाणें वाचतां येतो:-

इदं नमो वृषभाय स्वराजे ।
सत्यशुष्माय तवसे अवाचि ।
अस्मिन्निन्द्र वृजने सर्ववीराः ।
स्मत्सूरिभिस्तव शर्मन् सिआम ॥

## सूक्त ५२.

ऋषि–पूर्वसूक्ताचा जो सव्य तोच. देवता–इंद्र. वृत्त– जगती; म्हणजे आतां ज्यास 'वंशस्थ' म्हणून म्हणतात तें. मात्र १३वी आणि १५वी या ऋचांचें त्रिष्टुभ्, म्हणजे आतां आपण 'उपजाति' असें म्हणतों आणि ज्यांत रघुवंशाचा पांचवा सर्ग रचिलेला आहे तें.

१. ज्याप्रीत्यर्थ शेकडो सुंदर [स्तोते] एक वेळेस गात असतात असा जो प्रसिद्ध [ आणि ] शूर [आणि] स्वर्गप्राप्ति करून देणारा इंद्र त्याला चांगला पूज. वेगवान् अश्वाला यज्ञगामी रथाकडे [वळविल्या]प्रमाणें [ मी ] इन्द्राला सुसंस्कृत स्तोत्रांनीं रक्षणाकरितां इकडे वळवीन.

## HYMN 52.

To *Indra*. By *Savya*, the author of the previous hymn. Metre-*Jagatî*, except that of verses 13 and 15, which is *Trishtubh*.

The *Jagatî* is the same as the modern *Vamsastha* and the *Trishtubh* the same as what is now known as the *Upajâti* metre.

1. Worship well that brave [Indra] the bestower of heaven, whose hundred excellent singers sing forth simultaneously. Let me with well-fashioned hymns turn Indra hitherward for protection like as [his] swift horse to the car that runs to the invocation.

---

१. सूक्तकर्त्या सव्य ऋषीबरोबर जे इंद्रभजनास उभे राहिले आहेत त्यांस तो म्हणतो, 'ज्या इंद्राची स्तुति त्याचे शेकडो स्तोते मिळून एकत्रच गात असतात, असा जो शूर आणि स्वर्गप्रद इंद्र, त्याला तुम्ही चांगला पूजा. आणि मी चांगलीं स्तोत्रें रचितों आणि वेगवान् घोडा जसा गाडीकडे वळवितात तसा इंद्राला तीं स्तोत्रें गाऊन इकडे येण्याविषयीं वळवितों, म्हणजे तो येईल आणि आमचें संरक्षण करील.'

'ज्याप्रीत्यर्थ शेकडो सुंदर स्तोते एकेवेळेस गात असतात '=' यस्य शतं सुम्वः साकम् ईरते.' अक्षरशः, ' ज्याचे शंभर सुंदर [ स्तोते ] एकेवेळेस गात असतात;' म्ह० ज्याचे स्तोते शेकडो आहेत आणि ते एकदम गात असतात. प्राचीनकाळीं आमचे पूर्वज पुष्कळजण मिळून देवस्तुति गात असें पूर्वीं सांगितलेंच आहे.

' शूर '=' मेषम्.' 'मेष' म्हणजे मेंढा. सायणाचार्यांच्या भावार्थास अनुसरून आम्हीं हा अर्थ केला आहे. मेंढा जसा आपल्या शत्रूंबरोबर टक्कर मारितो

**स पर्वतो न धरुणेष्वच्युतः सहस्रमूतिस्तविषीषु वावृधे ।**
**इन्द्रो यद्वृत्रमवधीन्नदीवृतमुब्जन्नर्णांसि जर्हृषाणो अन्धसा ॥२॥**

सः । पर्वतः । न । धरुणेषु । अच्युतः । सहस्रम्ऽऊतिः । तविषीषु । ववृधे ।
इन्द्रः । यत् । वृत्रम् । अवधीत् । नदीऽवृतम् । उब्जन् । अर्णांसि । जर्हृषाणः । अन्धसा ॥ २ ॥

---

**भाषायाम्.**

२. अन्धसा (=सोमलक्षणेन अन्नेन ) जर्हृषाणः (=अतिशयेन हृष्टः) स इन्द्रः यद् (=यदा ) अर्णांसि उब्जन् (=अपो निपातयन्=निपात्य ) नदीवृतम् (=अपाम् आवरकं ) वृत्रम् अवधीत् (=हतवान् ) [ तदा ] सहस्रमूतिः (=सहस्ररक्षणोपेतः) स, धरुणेषु (=उदकेषु ) पर्वतो न (=गिरिरिव ), अच्युतः (=निश्चलस् ) [तिष्ठन् ]. तविर्षीषु (=बलेषु ) वावृधे (=ववृधे= प्रवृद्धो बभूव ) ॥

इन्द्रः किल मन्त्रवक्तः सव्यस्य पूर्वैरङ्गिरोभिः समर्पितं सोमं पीत्वा हृष्टः सन् पुरा उदकानाम् आवरकं मेघरूपं वृत्रासुरम् अवधीत्, तस्मिन् वधप्रसङ्गे च जलानां प्रवाहेषु इन्द्रं निमज्य मारयितुं वृत्रेण आसृष्टेषु इन्द्रो न केवलं न मज्जा नच ममार अपि तु तेषु पर्वत इव निश्चलस्तिष्ठन् स्वबलेन प्रवृद्ध एव बभूवेति प्रसिद्ध-मितिहासम् अनुलक्ष्य ब्रूते सव्य इत्यनुसंधेयम् ॥

---

तसा टक्कर मारणारा ( स्वशत्रुभिः स्पर्धमानः) म्हणून ' मेष ' असा त्यांचा अभिप्राय आहे. तरीहि ५१ व्या सूक्ताच्या पहिल्या मंत्रावरची टीप पहा.

'सुंदर [ स्तोते ] गात असतात.' हा अर्थ सायणांनीं केलेला आम्हांस खरा वाटतो. कितीएक पाश्चिमात्य विद्वान् ' सुंदर सोमरस हालतात ' असा अर्थ करितात; पण त्याला आधार दिसत नाहीं.

' वेगवान् अश्वाला यज्ञगामी रथाकडे [ वळविल्या]प्रमाणें '= ' अत्यं न वाजं हवनस्यदं रथम्.' या उपमेचा अर्थ असा दिसतो कीं, इंद्राचे चपळ घोडे जसे त्याच्या रथाकडे वळवावे तसा मी इंद्राला इकडे वळवितों; त्याच्या घोड्यांला रथास जोडिले म्हणजे ते जसे रथ घेऊन आलेच पाहिजेत तसा मी इंद्राला इकडे येण्याविषयीं असा वळवितों कीं त्याच्यानें इकडे आल्याशिवाय राहवणार नाहीं.

' सुसंस्कृत स्तोत्रांनीं'= 'सुवृक्तिभिः.' अक्षरशः अर्थ चांगल्या रीतीनें तासणें अथवा तोडणें, कापणें, ज्यांत होत आहे अशा स्तुति, साफ अथवा स्वच्छ, गुळगुळीत ( फळीप्रमाणें तासून ) केलेल्या

२. सोमानें अत्यंत आनंद पावून जेव्हां इंद्र उदकांस आवरून धरणाऱ्या वृत्राला मारिता झाला आणि उदकें खालीं पाडिता झाला, [तेव्हां] तो सहस्ररक्षणवान् [इन्द्र] [त्या] उदकांत पर्वताप्रमाणें स्थिर [राहिला] [आणि] बळानें वाढला.

2. That Indra, possessed of a thousand helps, [stood] unshaken like a mountain in the midst of the [deep] waters [and] grew in strength, when he, overjoyed at the Soma libation, slew the water-restraining Vritra, and let down the streams.

खालीं दाखविल्याप्रमाणें वाचल्यास वंशस्थवृत्तांतील श्लोकांत आणि या मंत्रांत किती थोडें अंतर आहे तें दृष्टीस पडेल:—

त्यं सु मएषं महया सुअर्विदं ।
शतं यस्य सुभुअः साकमीरते ।
अत्यं न वाजं हवनस्यदं रथम् ।
इन्द्रं ववृत्यामवसे सुवृक्तिभिः ॥

२. 'वृत्रानें मेघोदकांस अवरोधून वृष्टि बंद केली तेव्हां मंत्रवक्त्याचे जे पूर्वज अंगिरस त्यांनीं इंद्राला सोम अर्पण करून त्याला वृत्रवध करण्याविषयीं प्रवृत्त केला. मग इंद्र सोम पिऊन फार हर्षयुक्त झाला आणि उदकांचा अवरोध करणाऱ्या वृत्राचा वध करिता झाला. तेव्हां उदकें खालीं पडून मोठ्या प्रवाहांनीं आणि झपाट्यानें वाहूं लागलीं, आणि सर्वत्र जलमय झालें. असें असतांहि इंद्र डगमगला नाहीं, अथवा प्रवाहामुळें हालला नाहीं, तर पर्वताप्रमाणें निश्चल उभा राहिला, आणि त्याचें बळ कमी झालें नाहीं इतकेंच नाहीं परंतु उलटें अधिकच वाढलें.' असा या मंत्राचा भावार्थ आहे. सू. ३२ मं. १३ पाहा.

'सहस्ररक्षणवान्' = 'सहस्रम् ऊतिः.' म्हणजे इंद्राचें रक्षण करणारे सहस्रावधि साहाय्यदाते होते असा अर्थ नाहीं, परंतु सहस्रावधि उपायांनीं देवभक्तांचें रक्षण करणारा अशा स्वभावोक्तियुक्त अर्थाचें हें विशेषण आहे.

'त्या उदकांत' = 'धरुणेषु.' 'धरुण' शब्द वेदांत पुष्कळ ठिकाणीं आला आहे. त्याचा बहुत करून 'धारण करणारा', किंवा 'धारण' असा अर्थ होत असतो, (उदाहरणार्थ—विष्टम्भो धरुणो दिवः=' स्वर्गलोकातें उचलून धरणारा स्तंभच ' जणुं असा सोम. ऋ. ९. २.५ इ०). परंतु वृत्रानें अवरोधून 'धरिलेलीं' म्हणून 'धरुणें' अशा व्युत्पत्तीनें धरुण शब्दाचा अर्थ उदक असा होतो असें म्हटलें पाहिजे; कारण कीं सायणाचार्य प्रस्तुत मंत्रांतच उदक हा अर्थ करितात असें नाहीं, परंतु ऋ. १. १२१. २ यांतहि त्यांणीं तोच अर्थ केला आहे तो पाहा.

'बळानें वाढला' = 'तविषीषु वावृधे.' अक्षरशः अर्थ, 'बळांमध्यें वाढला.' म्हणजे त्याच्या बळांनीं वृद्धि झाली.

वंशस्थवृत्ताला हा मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें बसतो:—

स पर्वतो न धरुणेषु अच्युतः ।

स हि द्वरो द्वरिषु वव्र ऊधनि चन्द्रबुध्नो मदवृद्धो मनीषिभिः ।
इन्द्रं तमह्वे स्वपस्यया धिया मंहिष्ठरातिं स हि पप्रिरन्धसः ॥३॥

सः । हि । द्वरः । द्वरिषु । वव्रः । ऊधनि । चन्द्रऽबुध्नः । मदऽवृद्धः । मनीषिऽभिः ।
इन्द्रम् । तम् । अह्वे । सुऽअपस्यया । धिया । मंहिष्ठऽरातिम् । सः । हि । पप्रिः । अन्धसः ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. स हि [ इन्द्रः ] द्वरिषु द्वरो (=शत्रुषु अतिशयेन शत्रुः=शत्रुजयशीलो!) [वर्तते ] । ऊधनि (=ऊधसदृशे अन्तरिक्षे ) वव्रः(=संभक्तो व्याप्तवान् ) [ वर्तते ] । चन्द्रबुध्नः (=आह्लादकमूलः) [ स ] मनीषिभिः (=प्राज्ञैः) मदवृद्धः ( =सोमैर्वर्धितः ) [ अस्ति ] । तं मंहिष्ठरातिम् (=अतिशयेन प्रवृद्धदानम् ) इन्द्रम् ( अहं ) स्वपस्यया धिया (=शोभनकर्मेच्छायुक्तया स्तुत्या ) अह्वे (=आह्वयामि ) । स हि अन्धसः (=अस्मदपेक्षितस्यान्नस्य ) पप्रिः (=अतिशयेन पूरयिता ) [ भवति ] ॥

अस्यामृचि " स हि द्वरो द्वरिषु वव्र ऊधनि चन्द्रबुध्नः" इत्येतदतिमात्रदुर्बोधं वाक्यमस्माभिरनुसायणाचार्यं व्याख्यातम् । ते हि "द्वरिरावरीतृषु शत्रुषु द्वरो हि । अ-"तिशयेनावरीता खलु । शत्रुजयशील इत्यर्थः । यस्मात्......जलवत्यन्तरिक्षे वव्रः "संभक्तो व्याप्य वर्तते । अत एव चन्द्रबुध्नः । सर्वासां प्रजानामाह्लादकमूलः । अन्त-"रिक्षस्य सर्वाह्लादकत्वाद् " इत्याहुः ॥

सहस्रमूतिस्तविषीषु वावृधे ।
इन्द्रो यद्वृत्रमवधीन्नदीवृतम् ।
उब्जन्नर्णांसि जर्हृषाणो अन्धसा ॥

यावरून असें दिसतें कीं रेफानेंच संयुक्त झालेल्या अक्षरापूर्वीचें ऱ्हस्व अक्षर ऱ्हस्व गणावें अथवा दीर्घ गणावें; उदाहरणार्थ 'अर्णांसि,' 'जर्हृषाणः;' आणि 'पर्वतः,' 'सहस्रमूतिः.' दुसरा असा नियम दिसतो कीं, यति ज्यावर असते तें म्हणजे वशस्थ वृत्तांतील प्रत्येक पादाचें पांचवें अक्षर ऱ्हस्व असतांहि पादांतींच्या अक्षरासारिखेंच दीर्घ वाचावें; उदाहरण, 'स पर्वतो न,' 'इन्द्रो यद्वृत्र,' आणि 'उब्जन्नर्णांसि.' तिसरा एक असा नियम दिसतो कीं, विसर्गाच्या ठायीं जो ओकार झालेला असतो तो वृत्तानुसारानें दीर्घ किंवा ऱ्हस्व वाचावा; उदाहरण 'स पर्वतो' आणि 'जर्हृषाणो.' चवथा नियम असा दिसतो कीं, 'उ'कार आणि 'अ'कार, अथवा 'इ'कार आणि 'अ'कार यांचा 'व' अथवा 'य' असा संधि झालेला असल्यास वृत्तासाठीं संधि फोडून संधि झालाच नव्हता असें समजून वाचावें; उदाहरण, 'भुवनेषु अच्युतः.'

३. कारण कीं तो शत्रूंत शत्रु [होय]. अंतरिक्षाला [तो] व्यापून राहणारा [होय]. [तो] आह्लादकमूल [इंद्र] विद्वज्जनांनीं सोमरसाच्या योगेंकरून वाढविलेला आहे. त्या परम उदार इंद्राला [मी] सत्कर्मेच्छायुक्त स्तोत्रानें बोलावीत आहें. कारण कीं तो अन्नाचा उत्तम दाता होय.

3. For he [is] an enemy among enemies, pervading the skies. Of delightful foundation [he] is by the wise made to grow through the exhilerating Somas. That Indra I am invoking with a prayer full of desires to do good deeds,—Indra whose gifts are most liberal. For he [is] the great giver of food.

---

३. या मंत्रांतील उत्तरार्धाचा भावार्थ उघड आहे. पण पूर्वार्ध बराच (म्ह० 'कारण' पासून 'आह्लादकमूळ' एथपर्यंत) फार दुर्बोध आहे. त्याचा अर्थ स्पष्ट समजत नाहीं. सायणाचार्यांच्या भाष्यास अनुसरून आम्हीं पदशः अर्थ केला आहे. त्यांच्या अर्थाचा भाव असा आहे कीं, " इंद्र हा शत्रूंमध्यें अतिशयें-"करून शत्रु होय, म्हणजे तो शत्रूंचा प-"राजय करणारा होय; कारण कीं तो स-"कल अंतरिक्षाला व्यापून राहतो. आणि "वास्तवच तो आह्लादकमूल म्हणजे ज्या-"च्या मूलापासून सर्वांस आह्लाद होतो "असा आहे. कारण की अंतरिक्षापा-"सून सर्वांस आह्लाद होतो." परंतु आम्हांस याविषयीं संशय आहे.

'विद्वज्जनांनीं सोमरसांनीं वाढविलेला आहे '=' मदवृधो मनीषिभिः.' सायणाचार्य म्हणतात " सोमापासून माद "म्हणजे अंमल येतो म्हणून त्यास मद हें "नांव पडलें आहे." इंद्र जो इतका बळवान् आहे तो केवळ मूळचाच सगळा बळवान् नाहीं, देवभक्तांनीं त्याला सोम पाजून पाजून बळ आणिलें आहे असा या शब्दाचा अभिप्राय दिसतो.

' सत्कर्मेच्छायुक्त स्तोत्रानें '=' सुअपस्यया धिया.' म्हणजे देवसेवादि सत्कर्म करण्याची इच्छा ज्यांत प्रगट आहे अशी स्तुति. ऋ. ७. ४५. २ हा मंत्र आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

' अन्नाचा उत्तम दाता '=' पप्रिः अन्धसः.' 'अन्धस्'शब्दाचा अर्थ बहुतकरून सोमरस अथवा सोमरसरूप हवि असा होतो; म्हणजे जें देवांस अर्पण करावयाचें तें अन्न. या स्थळीं देवांनीं प्रसन्न होऊन मनुष्यांस गावयाचें अन्न असा अर्थ होतो. हा सायणांनींच केला आहे. गाईनीं खाण्यापिण्याचें जें द्रव्य

**आ यं पृणन्ति दिवि सद्मबर्हिषः समुद्रं न सुभ्व१: स्वा अभिष्टयः।**
**तं वृत्रहत्ये अनु तस्थुरूतयः शुष्मा इन्द्रमवाता अह्रुतप्सवः॥४॥**

आ। यम्। पृणन्ति। दिवि। सद्मऽबर्हिषः। समुद्रम्। न। सुऽभ्वः।
स्वाः। अभिष्टयः।
तम्। वृत्रऽहत्ये। अनु। तस्थुः। ऊतयः। शुष्माः। इन्द्रम्। अवाताः।
अह्रुतऽप्सवः॥ ४॥

---

## भाषायाम्.

४. यम् [इन्द्रं] सद्मबर्हिषः (=बर्हिरेव सद्म येषां=बर्हिरुपरि स्थापिताः) [सोमाः], स्वा अभिष्टयः सुभ्वः समुद्रं न (=आभिमुख्येन गमनवत्यः सुन्दर्यो नद्यः स्वं समुद्रमिव), दिवि (=स्वर्गलोके) [गत्वा] आपृणन्ति (=परिपूरयन्ति), तम् इन्द्रम् ऊतयः (=सहायभूताः) शुष्मा (=बलिनः) अवाता (=निःसपत्नाः) अह्रुतप्सवः (=अविकलाङ्गाः=शोभनरूपा) [मरुतो] वृत्रहत्ये (=वृत्रनाशार्थं कृते युद्धे) अनुतस्थुः (=अनुलक्ष्य स्थिता बभूवुः=अनुचेरुः)॥

वृत्रहननसमये मरुत इन्द्रस्य साहाय्यं चक्रुरिति भावः॥

---

त्याला 'अन्धस्' असें म्हटलेलें आढळतें (ऋ. ५. ५४. ८).

वृत्तसुखार्थ खालीं लिहिल्याप्रमाणें हा मंत्र म्हणावाः–

*स हि द्वरो द्वरिषु वव्र ऊधनि।
चन्द्रबुध्नो मदवृद्धो मनीषिभिः।
इन्द्रं तमह्वे सुअपस्यया धिया।
मंहिष्ठरातिं स हि पप्रिरन्धसः॥

४. समुद्राच्या [ ज्या ] संमुख वाहून जाणाऱ्या सुंदर [नद्या] [त्या] [जशा] समुद्राला भरून टाकितात त्याप्रमाणें ज्या [इंद्रा]ला दर्भासनावर स्थापिलेले [ सोमरस ] स्वर्गीं भरून टाकितात, त्या इंद्राला बलवान्, अजातशत्रु [आणि] सुरूप सहायभूत [मरुत् ] वृत्रहननांत साहाय्य करिते झाले.

4. Him whom the Somas, placed on the Kus'a-grass, fill in heaven as the rivers flowing towards their ocean fill the ocean,—that Indra the [Maruts], [ his ] allies, did stand by during the destruction of Vritra,—the mighty, supreme, [and] handsome [ Maruts ].

४. 'इंद्रानें वृत्रवध केला त्या प्रसंगीं त्याला मरुतांनीं साहाय्य केलें; आणि इंद्राचा महिमा असा आहे कीं, अनेक लोकांनीं त्याला अर्पण केलेले जे सोम ते नद्यांसारिखे जणुं वाहून जाऊन त्याजप्रत प्रविष्ट होतात. आणि त्याचे साहाय्यकर्ते जे मरुत् ते तरी साधारण आहेत असें नाहीं, तर बळवान् आणि निःशत्रु आणि रूपानें सुंदर असे आहेत.'

या मंत्रांत इंद्राप्रत जाणाऱ्या सोमांला समुद्रांकडेस वाहून जाणाऱ्या नद्यांची जी उपमा दिली आहे ती थोडी चमत्कारिक असली तरी वेदांत दुसऱ्या पुष्कळ ठिकाणीं आलेली आहे. तिचें स्वारस्य इतकेंच कीं, अर्पण केलेले सोम विपुळ असतात आणि नद्या जशा इतर ठिकाणीं न जातां आपला पति समुद्र त्याजकडेसच धांवत असतात तसे ते इंद्राकडेसच धांवत असतात.

'दर्भासनावर स्थापिलेले [ सोमरस] स्वर्गीं भरून टाकितात '=' सद्मबर्हिषः दिवि आ पृणन्ति.' अक्षरशः दर्भासनवान् [ सोमरस ] स्वर्गीं भरून टाकितात; म्हणजे यज्ञांत इंद्राला अर्पण करून दर्भासनावर ठेविलेले जे सोमरस ते स्वर्गीं जाऊन भरून टाकितात.

'अजातशत्रु '='अवाताः.' हा अर्थ आम्हीं सायणाचार्यांस अनुसरून केला आहे. शब्दनिरुक्तीविषयीं कांहीं वाद असला तरी आचार्यांनीं केलेला अर्थ बरोबर दिसतो. कितीएक पाश्चिमात्य पंडित भिन्न अर्थ करितात पण तो आम्हांस निराधार दिसतो.

या मंत्रांत पहिला आणि तिसरा हे चरण वंशस्थाप्रमाणें सरळ वाचतां येतात, पहिल्या चरणांत मात्र 'पृणन्ति' हा शब्द पृणन्तिं असा उच्चारिला पाहिजे. (दुसऱ्या मंत्रावरची टीप पाहा ). दुसरा आणि चवथा हे पाद खालीं लिहिल्याप्रमाणें वंशस्थांत बसतात.

( २ ) समुद्रं न सुभ्वः स्वा अभिष्टयः।
( ४ ) शुष्मा इन्द्रमवातो अह्रुतप्सवः ।

अभि स्ववृष्टिं मदे अस्य युध्यतो रघ्वीरिव प्रवणे सस्रुरूतयः ।
इन्द्रो यद्वज्री धृषमाणो अन्धसा भिनद्वलस्य परिधीँरिव त्रितः ॥५
॥ १२ ॥

अभि । स्वऽवृष्टिम् । मदे । अस्य । युध्यतः । रघ्वीःऽइव । प्रवणे । सस्रुः । ऊतयः ।
इन्द्रः । यत् । वज्री । धृषमाणः । अन्धसा । भिनत् । वलस्य । परिधीन्ऽइव । त्रितः ॥ ५ ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

५. अन्धसा धृषमाणः ( =सोमलक्षणेन अन्नेन धर्षणयुक्तः कृतो ) वज्री (=वज्रधारी) इन्द्रः, त्रित इव (=पुरा त्रितः, एतन्नामकः कश्चिद् अतिपुरातनो देवः? ) [बिभेद] [तद्वत्], वलस्य (=वृत्रस्य ) परिधीन् (=आच्छादनानि ) भिनत् (=अभिनत् ), [तदा] मदे (=सोमपानाज्जाते हर्षे ) युध्यतः अस्य [इन्द्रस्य] [पुरतः] ऊतयः (=सहायभूता मरुतः ), प्रवणे रघ्वीरिव ( =निम्नप्रदेशे नद्यः सरन्ति तद्वत्), स्ववृष्टिं (=स्वाङ्गजन्यवृष्टेः कर्तारं) वलं [प्रति] अभि (=आभिमुख्येन) सस्रुः ( =जग्मुः ) ॥

५. जेव्हां सोमानें धैर्ययुक्त झालेला वज्रधारी इंद्र आपल्या आंगापासून वृष्टि करणाऱ्या वलाबरोबर सोमाच्या भरांत युद्ध करून त्याचीं झांकणें, [ पूर्वीं ] त्रितानें [ फोडिल्या]प्रमाणें, फोडावयास लागला, [तेव्हां] [इंद्राचे] साहाय्यकर्ते मरुत्, नद्या सखल जागाकडेस [धांवतात त्या]प्रमाणें, [त्या वलाच्या] आंगावर धांवून गेले.

5. When Indra, the wielder of the thunderbolt, emboldened through the Somalibation, fought in the exhileration of the Soma with Vala and, like Trita [of yore], broke his walls, Indra's allies (the Maruts), like rivers rushing to a low place, rushed against the demon as he let go the flood from his person.

---

५. वरील मंत्रांत वृत्रहननार्थ मरुतांनीं इंद्राला साहाय्य केलें म्हणून सांगितलें तेंच वर्णन शब्दान्तरानें पुनः करितो, तें असें:– ' इंद्र सोम पिऊन आनंदित झाला, तेव्हां वृत्राला मारण्याविषयीं त्याला आवेश आला त्या वेळीं तो वृत्राशीं युद्ध करूं लागला, आणि वृत्रानें मेघोदकें लपवून ठेवण्यासाठीं जीं आच्छादनें घातलीं होतीं तीं फोडून टाकूं लागला; तेव्हां इंद्राला बुडवून टाकण्यासाठीं वृत्रानें आपणच मोठी वृष्टि केली, तेव्हां त्यापासून इंद्राला उपद्रव होऊं नये म्हणून त्याचे साहाय्यकर्ते जे मरुत् ते वृत्राच्या आंगावर नद्या सखल भूमीकडे धांवतात तसे झपाट्यानें धांवून गेले.'

'आपल्या आंगापासून वृष्टि करणाऱ्या' ='स्ववृष्टिम्;' म्हणजे इंद्राला बुडवून टाकण्यासाठीं महावृष्टि करणाऱ्या. इंद्र आणि वृत्र यांच्या युद्धाच्या संबंधानें पूर्वीं सांगितलेंच आहे, कीं इंद्राला जीं शस्त्रें योजण्याची शक्ति आहे, तीच त्याचा जो शत्रु बल म्हणजे वृत्र त्यालाहि आहे; ज्याप्रमाणें वृष्टि करण्याचें सामर्थ्य इंद्राला आहे तसेंच वृत्रालाहि आहे, असेंच ऋचेचा भावार्थ असल्यामुळें 'स्ववृष्टि' असें विशेषण वृत्राला या मंत्रांत लाविलेलें आहे. याचा अर्थ 'मूत्रवृष्टि करणारा' असा कितीएक जण करितात, पण तो जसा अश्लील आहे तसाच निराधारहि आहे.

'पूर्वीं त्रितानें फोडिल्याप्रमाणें'=' इव त्रितः.' हे शब्द, म्हणजे यांत जी उपमा आहे, ती, फार दुर्बोध आहे. अक्षरशः अर्थ ' त्रिताप्रमाणें ' असा होतो. ' त्रित ' कोण? 'त्रित' हें नांव ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलें आहे. कितीएक पाश्चिम पंडितांचें मत असें आहे कीं, ग्रीक आणि झंद ग्रंथांत म्हणजे युनानी आणि पारसिक यांच्या पुरातन धर्मपुस्त-

कांत 'त्रित' म्हणून एक देव आहे; आणि ज्यापेक्षां भाषासाम्याच्या वगैरे प्रमाणांवरून युनानी (ग्रीक), पारसिक आणि भरतखंडांतील आर्यलोक हे मूळचे एकच जातीचे, एकच धर्माचे आणि एकच भाषा बोलणारे लोक होते, आणि एकच ठिकाणीं राहत होते, आणि मागाहून त्यांची फुटाफूट होऊन ग्रीक लोक युरोपखंडांत गेले, पारसिक इराणदेशांत गेले आणि आमचे लोक भरतखंडांत आले, त्यापेक्षां या तीनहि भाषांतील पुरातन धर्मग्रंथांत जो 'त्रित' म्हणून देव सांगितला आहे तो एकच; आणि वेदांत सांगितलेला 'त्रित' हा देव इंद्रापेक्षांहि अति प्राचीनकाळीं आर्यलोक पूजित होते असा एक देव होय व इंद्रानें वृत्रभेद केला तसाच या त्रितानेंहि केलेला होता. याप्रमाणें या पश्चिमखंडपंडितांचें मत आहे. आतां आपल्या देशांतील पंडितांचें मत पाहूं गेलें तर ऋ. ८. ४७. १६ याजवरील भाष्यांत सायणाचार्यहि त्रित हा कोणीएक देव होय असें समजून अर्थ करितात असें दिसून येतें. इतर ठिकाणीं ते 'त्रित' हें अग्नि देवाचें विशेषण आहे असें समजून अर्थ करितात (ऋ. ५.४१.४;५.९.५). ऋ. ६. ४४. २३ यांत तर 'त्रित' हें एका देवगणाचें नांव आहे असें ते म्हणतात. ऋ. १०. ८६. २०; १०. ९५. [illegible] ३१. ६ यांत सायणाचार्य 'त्रित' [illegible] लावितात. ऋ. ८.४१.६ यांत जो त्रित देव सांगितला आहे तो वरुणच होय असें ते म्हणतात. ऋ. ८.४७.१३, १४, १५, १६ यांजवरून त्रित हा कोणी महाबल देव असून आधुनिक काळीं काळकूट विष पिऊन सहन करण्याची शक्ति महादेवास आहे तशी त्याला दुःस्वप्नादि विघ्नें हरण करण्याची शक्ति आहे अशी प्रसिद्धि होती असें दिसतें; कारण त्या मंत्रांत मंत्रवक्ता आदित्यांस आणि उषेस अशी प्रार्थना करितो कीं, जें जें म्हणून गुप्त अथवा प्रगट विघ्न अथवा दुःस्वप्न वगैरे संकट असेल, तें त्यांणीं नेऊन त्रिताच्याठायीं स्थापन करावें (सायणाचार्य वेगळा अर्थ करितात हें आम्हांस ठाऊक आहे). ऋ. ८.१२.१६ यांतहि त्रित हें एका देवाचें नांव आहे यांत संशय नाहीं. दुसरे पुष्कळ ठिकाणीं त्रित हें एका ऋषीचें नांव समजून सायणाचार्य अर्थ करितात (ऋ. १. ३४. १४; १. ३२. २; १. ३७. ४; १. ३८. २; १. ११. १९, २०; १. १०२. २, ३; १०. ८. ८) आणि तसा अर्थ दिसतो खरा.

या सर्वांवरून 'त्रित' हा एक देव होय असें म्हणण्यास आम्ही मागें सरत नाहीं, पण त्याणें वृत्रहनन केलें अथवा मेघमंडलरूपी आच्छादनें फोडून टाकिलीं अशी कथा वेदांत आढळत नाहीं. तथापि आम्हीं प्रस्तुत मंत्रांत अक्षरशः अर्थ केला आहे.

सायणाचार्य 'तैत्तिरीय ब्राह्मण' म्हणून जो वेदग्रंथ आहे त्यास अनुसरून असें

म्हणतात कीं, " हवि ज्यांत शिजवितात " त्या भांड्याचें खरकाटें घांसून टाकण्या- " करितां म्हणून अग्नीपासून आपोदेवीं- " च्या (=उदकांच्या) पोटीं एकत, द्वित " आणि त्रित असे तीन पुत्र जन्मले. त्यां- " तून त्रित हा पाणी प्यावयास आडांत " उतरला असतां त्याला वर न येऊं " देण्यासाठीं म्हणून असुरांनीं (पण " ऋ. १. १०५ हें सूक्त पहा) त्या आ- " डावर झांकणें घातलीं; तीं त्रितानें " फोडून टाकिलीं तसा इंद्र वलाचीं॰झां- " कणें फोडून टाकिता झाला."

'वलाच्या आंगावर धांवून गेले.' वल आणि वृत्र एकच. या 'वल'शब्दा- पासूनच साधारण संस्कृतांतील 'वलाह- क'(=मेघ) हा शब्द निष्पन्न झाला आहे.

एक दोन ठिकाणीं व्यत्ययानें ऱ्हस्व दीर्घ वाचलें तर हा मंत्र आधुनिक वंश- स्थाप्रमाणें चांगला वाचावयास येतो. तो असाः—

अभि स्ववृष्टिं मदे अस्य युध्यतो।
रघ्वीरिव प्रवणे सस्रुरूतयः।
इन्द्रो यद्वज्री धृषमाणो अन्धसा।
भिनद्वलस्य परिधींरिव त्रितः॥

परीं घृणा चरति तित्विषे शवोऽपो वृत्वी रजसो बुध्नमाशयत् ।
वृत्रस्य यत्प्रवणे दुर्गृभिश्वनो निजघन्थ हन्वोरिन्द्र तन्यतुम् ॥६॥

परि । ईम् । घृणा । चरति । तित्विषे । शवः । अपः । वृत्वी । रजसः । बुध्नम् । आ । अशयत् ।
वृत्रस्य । यत् । प्रवणे । दुःऽगृभिश्वनः । निऽजघन्थ । हन्वोः । इन्द्र । तन्यतुम् ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

६. हे इन्द्र, यद् (=यदा) [त्वं] दुर्गृभिश्वनः (=दुर्ग्राह्यव्यापनस्य=महाव्यापनवत्त्वाद् दुःखेन जेतव्यस्य) वृत्रस्य हन्वोः (=मुखपार्श्वयोः) प्रवणे (=निम्नदेशे यथा तथा) निजघन्थ (=नितरां प्रजहर्थ=प्रहृत्य निपातितवानसि), [तदा] ईम् (=एनं=त्वाम् इन्द्रं) घृणा (=शत्रुजयलक्षणा तव दीप्तिः) परिचरति(=परिचचार=सर्वतो व्याप), [तथा] शवः (=तव बलं) तित्विषे (=दिदीपे), [वृत्रश्च] अपो वृत्वी (=उदकान्यावृत्य=मरणसमयेपि मेघोदकानि संवेष्ट्य) रजसो बुध्नम् आशयत् (=अन्तरिक्षस्य तलोपरि मृतः पतितवान्) ॥

यदा मेघगर्जनादनन्तरं वृष्टिर्जायते तदा विद्युदाविर्भवतीत्येतदत्र रूपकबीजमित्यनुसंधेयम् ॥

६. हे इंद्रा, [तूं] जेव्हां दुर्धर वृत्राच्या दोनी गालांवर वज्रप्रहार करून खालीं पाडिता झालास, [तेव्हां] [तुझी] दीप्ति तुझ्या आसमंतात् पसरली [आणि] [तुझा] प्रताप [तुझ्या आसमंतात् झकाकला], [आणि] [वृत्र] उदकांस वेष्टून अंतरिक्षाच्या सपाटीवर पडून राहिला.

6. When, O Indra, [thou] didst strike down [thy] thunderbolt on the cheeks of the invincible Vritra [thy] splendor surrounded [thee] [and thy] glory shone forth, [and] Vritra lay [dead] on the surface of the sky, [still] surrounding the waters.

६. वृत्रावर इंद्रानें वज्रप्रहार केला तेव्हां काय काय झालें तें सांगतोः– 'इंद्राचें जें महातेज तें इंद्राच्या सभोंवतालीं एकाएकीं प्रगट झालें, आणि इंद्राचें बळ एकाएकीं प्रकाशलें, आणि वृत्र हा वज्रप्रहारानें मरणोन्मुख झाला तरी उदकांस वेष्टून आकाशतलावर मरून पडला.'

'दुर्धर'=' दुर्गृभिश्वन्.' वृत्राविषयीं जें वेदांत वर्णन येतें तें वृत्र इंद्राला शत्रु शोभे असेंच पुष्कळ ठिकाणीं येत असतें, आणि जसा इंद्र मोठा तसाच इंद्राचा शत्रुहि मोठा होय असें वर्णन आढळतें. प्रस्तुत स्थळीं वृत्र हा सर्व प्रदेश व्यापून राहत असल्यामुळें त्याचा निग्रह करणें कठीण म्हणून 'दुर्गृभिश्वन्' हें विशेषण त्याला लाविलें आहे, असें सायणाचार्य म्हणतात, त्यालाच आम्ही अनुसरलों आहों.

'वज्रप्रहार करून खालीं पाडिता झालास'=' प्रवणे तन्यतुं निजघन्थ.' अक्षरशः अर्थ 'गर्जना करणारें [वज्र] खालीं मारिता झालास.' 'प्रवणे' हें येथें क्रियाविशेषण आहे. 'नि' या उपसर्गाच्या अर्थास बळकटी आणण्यासाठीं त्याचा प्रयोग केला आहे.

'तुझी दीप्ति तुझ्या आसमंतात् पसरली'=' घृणा ईं परिचरति.' रूपक एकीकडेस ठेविलें तर याचा अर्थ इतकाच आहे कीं, आकाशांत गर्जना होऊन मेघवृष्टि होण्याच्या समयीं विजा चमकतात, आणि सृष्टीच्या एका अतितेजस्वी शक्तीचा प्रादुर्भाव होतो.

'तुझ्या आसमंतात्'=' ईं परि०.' हा सायणानुसारी अर्थ जरी चिन्त्य नाहीं तरी 'ईम्' हें वृत्राकडेस लाविलें तर बरें होईल. मग इंद्रानें तेज, आणि प्रताप यांणीं वृत्राला आच्छादून टाकिलें अशा भावार्थानें भाषांतर करावें.

'अंतरिक्षाच्या सपाटीवर'=' रजसो बुध्नम्.' म्हणजे अंतरिक्षाच्या पाठीवर, अथवा तलावर. जसा कोणीतरी मनुष्या-

ह्रदं न हि त्वा न्यृषन्त्यूर्मयो ब्रह्माणीन्द्र तव यानि वर्धना ।
त्वष्टा चित्ते युज्यं वावृधे शवस्ततक्ष वज्रमभिभूत्योजसम् ॥ ७॥

ह्रदम् । न । हि । त्वा । निऽऋषन्ति । ऊर्मयः । ब्रह्माणि । इन्द्र । तव । यानि । वर्धना ।
त्वष्टा । चित् । ते । युज्यम् । ववृधे । शवः । ततक्ष । वज्रम् । अभिभूतिऽओजसम् । ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. हे इन्द्र, ऊर्मयः (=जलप्रवाहा) ह्रदं न (=जलाशयम् इव), ब्रह्माणि (=स्तोत्राणि) त्वा (=त्वां) निऋषन्ति (=त्वां प्रति गत्वा त्वां पूरयन्ति) हि। यानि [ब्रह्माणि] तव वर्धनानि (=तव शक्तेर्वर्धयितॄणि) [सन्ति]। ते युज्यं शवः (=तव योग्यं बलं=तव बलं तुभ्यं यथा योग्यं स्यात् तथा) त्वष्टा चित् (=त्वष्टा देव एव) वावृधे (=प्रावर्धितवान्), [त्वदर्थम्] अभिभूतिओजसं (=शत्रूणां अभिभवस्य कर्तारं) वज्रं ततक्ष (=निर्मितवान्) ॥

पूर्वस्यामृचि वृत्रो मृतः पतितवानिति यदुक्तं तस्य हेतुमाहास्याम्, नाश्चर्यं, यस्मादनेकमहर्षीणां स्तोत्रैर्वर्धितबल इन्द्रो भवति तथा स्वयं त्वष्टैव वृत्रहननार्थं वज्रं निर्माय तस्मै प्रादादिति ॥

ला शस्त्रप्रहार लागून तो भूतलावर म्हणजे जमिनीवर पडतो, तसा वृत्राला वज्रप्रहार होतांच तो अंतरिक्षाच्या पाठीवर पडला, असें म्हटलें आहे. 'वृत्र,' आणि 'इंद्र' यांचें युद्ध उंच आकाशप्रदेशांत होत असतें, आणि वृत्राचें राहाणें उदकांबरोबर अंतरिक्षांत असल्यामुळें वृत्र पडला तो अंतरिक्षाच्या पाठीवर पडला हें म्हणणें साहजिक आहे. सू. ३२, मं. ७, ८ पाहा. तथापि दुसऱ्या मंत्रांत (सू. ३२, मं. ५) वृत्र पृथ्वीजवळ पडला असेंहि सांगितलें आहे.

**७. कारण कीं हे इंद्रा, जसे जलप्रवाह [एकाद्या] डोहाला [भरून टाकितात], तशीं तुझें बळ वाढविणारीं स्तोत्रें [तुजकडे वाहून जाऊन] तुला भरून टाकितात. तुला योग्य [असें] बळ त्वष्टा[देव]-च वाढविता झाला, [त्वष्टाच] [शत्रूंचा] पराभव करण्याविषयीं शक्तिमान् [असें] वज्र निर्माण करिता झाला.**

7. For, O Indra, as streams flow towards and fill a lake, [so] prayers, that [are] augmenters of thy strength, flow towards and fill thee. Tvashṭâ himself increased thy strength that it might befit thee—[he] fashioned [for thee] [thy] thunderbolt of victorious strength.

७. वरील मंत्रांत इंद्रानें वज्रप्रहार करितांच वृत्र मरून पडला असें सांगितलें त्याचें कारण या मंत्रांत सांगितलें आहे:—' आणि यांत आश्चर्य नाहीं; कारण कीं, अनेक नाले, नद्या, इत्यादि प्रवाह एकाद्या तलावांत वाहून त्यास भरून टाकितात, आणि त्याचें बळ वाढवितात; तशीं इंद्राचें बळ वाढविणारीं असंख्य स्तोत्रें इंद्राकडेस जाऊन इंद्राला भरून टाकीत असतात त्यामुळें त्याची शक्ति वृद्धिंगत होत असते; शिवाय इंद्राचें बळ वाढून वृत्राला मारण्याची शक्ति त्याला यावी म्हणून खुद्द त्वष्ट्या देवानें शत्रुघातक वज्र निर्माण करून त्याला दिलें.'

' तुझें बळ वाढविणारी स्तोत्रें '=' तव वर्धनानि ब्रह्माणि.' स्तोत्राच्या योगानें आणि हवीच्या योगानें इंद्रादि देवांची शक्ति वाढते ही समजूत वेदांत सर्वत्र सांपडते. या मंत्रांत जी उपमा दिली आहे, तीहि लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे. पुष्कळ ठिकाणांहून अर्पण केलेले सोमरस इंद्राकडेस जाऊन प्रविष्ट होतात असें सांगावयाचें असल्यासहि हीच उपमा देण्यांत येते.

'तुला योग्य असें बळ त्वष्टा देव वाढविता झाला'=' त्वष्टा चित् ते युज्यं वावृधे शवः.' म्हणजे इंद्राला जें बळ होतें तें इंद्राच्या मोठेपणास शोभे इतकें त्वष्ट्यानें वाढविलें. तें कसें वाढविलें तें लागलेंच खालीं सांगतो:— 'त्वष्टाच शत्रूंचा पराभव करण्याविषयीं शक्तिमान् असें वज्र निर्माण करिता झाला '=' ततक्ष वज्रम् अभिभूतिओजसम्.' इंद्राला पूर्वी वज्र नव्हतें तें वृत्रहननाच्या प्रसंगीं त्वष्ट्यानें निर्माण करून दिलें, त्यामुळें इंद्राला जेवढी बळकटी पाहिजे होती तितकी आली. सू. ३२ मं. २ पहा. त्वष्टा हा कोण देव होय याविषयीं सू. १४ मं. १० याजवरील टीप पहा.

' भरून टाकितात ' =' निऋषन्ति.' अक्षरशः, 'व्यापून टाकितात.' ऋ. ३. ५५. २० याजवरील सायणभाष्य पहा.

जघन्वाँ उ हरिभिः संभृतक्रतविन्द्र वृत्रं मनुषे गातुयन्नपः ।
अयच्छथा बाह्वोर्वज्रमायसमधारयो दिव्या सूर्यं दृशे ॥ ८ ॥

जघन्वान् । ऊम् इति । हरिऽभिः । संभृतऽक्रतो इति संभृतऽक्रतो ।
इन्द्र । वृत्रम् । मनुषे । गातुऽयन् । अपः ।
अयच्छथाः । बाह्वोः । वज्रम् । आयसम् । अधारयः । दिवि । आ । सूर्यम् ।
दृशे ॥ ८ ॥

बृहत्स्वश्चन्द्रममवद्यदुक्थ्य१मकृण्वत भियसा रोहणं दिवः ।
यन्मानुषप्रधना इन्द्रमूतयः स्वर्नृषाचो मरुतोऽमदन्ननु ॥ ९ ॥

बृहत् । स्वऽचन्द्रम् । अमऽवत् । यत् । उक्थ्यम् । अकृण्वत । भियसा ।
रोहणम् । दिवः ।
यत् । मानुषऽप्रधनाः । इन्द्रम् । ऊतयः । स्वः । नृऽसाचः । मरुतः ।
अमदन् । अनु ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

८. उ (=उत अपि च) हे संभृतक्रतो (=समस्तप्रज्ञ) इन्द्र, मनुषे अपो गातुयन् (=मनुष्याणां समीपे प्राप्तुं वृत्रनिरुद्धानाम् अपां मार्गो यथा भवति तथा इच्छन्=मनुष्येभो जलान्यावर्षितुमिच्छन्) [त्वं] हरिभिः (=अश्वैः) [युक्तः सन्] वृत्रं जघन्वान् (हतवान्) [असि]। [त्वम्] आयसं (=लोहमयं) वज्रं बाह्वोः (=तव बाह्वोः) अयच्छथाः (=अग्रहीः), [अपि च] दृशे (=द्रष्टुं=दर्शनार्थं=सर्वेषामस्माकं दर्शनाय) सूर्यं दिवि आ (=द्युलोके) अधारयः (=स्थापितवानसि)॥

९. यद् (=यस्मिन् वृत्रहननकाले) भियसा (=भयेन) [स्तोतारो] बृहत् (=महत्=महाध्वनियुक्तं) स्वश्चन्द्रं (=स्वतेजसा आह्लादकं=रमणीयम्) अमवत् (=बलयुक्तं) दिवो रोहणं (=दिवि प्राप्नुवत्=स्वर्गे श्रूयमाणम्) उक्थ्यं (=स्तोत्रं) भूम्याम् अकृण्वत (=अकुर्वन्)। यद् (=यस्मिन्काले च) स्वः (=स्वर्गे) मानुषप्रधनाः (=मनुष्यहितसंग्रामाः=मनुष्यहितार्थं युध्यन्तो) नृषाचः (=नॄन् सेवमानाः=नृभ्यो हितभूताः) ऊतयः (=इन्द्रस्य सहायभूताः) [एतादृशा] मरुतः [इन्द्रम्] अन्वमदन् (=अभिननन्दुः)॥*

*तदा इन्द्रो वृत्रं जघन्वानिति पूर्वया संबन्धः॥

८. आणि हे समस्तप्रज्ञावान् इंद्रा, उदकांस मनुष्यांजवळ वाहून येण्याला मार्ग मिळावा अशी इच्छा धरून [तूं] अश्वारूढ [होऊन] वृत्राला मारिता झालास; तूं [आपलें] लोहमय वज्र खांद्यावर घेता झालास; लोकांस दिसावें म्हणून [तूं] सूर्याला आकाशांत स्थापिता झालास.

८. And, O Indra, in whom all wisdom is united, [thou], desiring the waters to find their way towards man, slewest Vritra; [thou] didst stretch the iron thunderbolt on thy shoulders, [thou] didst place the sun in heaven that [men] might see;

९. [कीं] जेव्हां [लोक] भयभीत होऊन मोठें, आल्हादकारक [आणि] बलयुक्त [आणि] स्वर्गीं चढणारें स्तोत्र करिते झाले; [आणि] जेव्हां मनुष्यांच्या हितासाठीं लढणारे [आणि] मनुष्यांचे सखे [जे] इंद्रसाहाय्यकारी मरुत् [ते] स्वर्गीं इंद्राचें अभिनंदन करिते झाले.

9. when men through fear offered a loud, self-resplendent, mighty [and] heaven-ascending prayer; when [Indra's] allies, the Maruts, the champions of men [and] the defenders of heroes congratulated Indra in heaven.

---

८. 'वर सांगितल्याप्रमाणें जेव्हां अनेक जनांच्या स्तोत्रांच्या योगानें आणि त्वष्ट्यानें निर्माण करून दिलेल्या वज्राच्या योगानें इंद्राची शक्ति वाढली तेव्हां इंद्रानें वृत्रनिरुद्ध जलांस मनुष्यांजवळ वाहण्यास मार्ग सांपडावा अशी इच्छा धरून वृत्राला मारिलें; व त्याला मारण्यासाठीं आपल्या खांद्यावर वज्र घेतलें आणि वृत्रवध केला, आणि मनुष्यांस दिसावें म्हणून सूर्याला आकाशांत स्थापिलें.' म्हणजे मेघोदकांस आवरून धरून वृष्टिहि न पडूं देणारा, आणि सूर्यकिरणांहि पृथ्वीवर न येऊं देणारा जो रूपकसिद्ध अभ्ररूप वृत्र त्याला मारल्यावर उदकें जमिनीवर पडलीं, आणि आकाश निरभ्र झाल्यामुळें सूर्य पुनः प्रकाशूं लागला. अभ्ररूप वृत्रासुराला इंद्र मारितो, आणि मेघोदकरूप व सूर्यकिरणरूप गाई मोकळ्या करून पृथ्वीवर पाठवून देतो हें रूपक वेदांत जिकडे तिकडे आहे.

'समस्तप्रज्ञावान्' = 'संभृतक्रतो.' म्हणजे जी जी म्हणून प्रज्ञा, अथवा शहाणपण जाणून ठाऊक आहे तें सर्व याच्या आंगीं भरलें आहे.

'उदकांस मनुष्यांजवळ वाहून येण्याला मार्ग मिळावा अशी इच्छा धरून'=

**द्यौश्चिदस्यामवाँ अहेः स्वनादयोयवीद्भियसा वज्र इन्द्र ते ।**
**वृत्रस्य यद्बद्बधानस्य रोदसी मदे सुतस्य शवसाभिनच्छिरः ॥**
**॥ १० ॥ १३ ॥**

द्यौः । चित् । अस्य । अमऽवान् । अहेः । स्वनात् । अयोयवीत् ।
भियसा । वज्रः । इन्द्र । ते ।
वृत्रस्य । यत् । बद्बधानस्य । रोदसी इति । मदे । सुतस्य । शवसा ।
अभिनत् । शिरः ॥ १० ॥ १३ ॥

## भाषायाम्.

१०. यद् (=यदा) [त्वं] सुतस्य मदे (=अभिषुतस्य सोमस्य पानेन जाते हर्षे) रोदसी बद्बधानस्य (=द्यावापृथिवी अतिशयेन बाधमानस्य सर्वतो व्यापकत्वात् महाभयत्वाच्च ते . उभे अपि सर्वस्मादप्यवकाशाद् अपनुन्ने इव कुर्वतो) वृत्रस्य शिरः शवसा (=तव बलेन) अभिनत् (=अच्छिनत्=छिन्नवानसि), [तदा] अमवान् (=बलवान्=महाबलो) द्यौश्चित् (=द्यौरपि) अस्य अहेः स्वनात् (=तस्य वृत्ररूपस्य सर्पस्य गर्जनाद्) भियसा (=भयेन) अयोयवीत् (=अत्यर्थं पृथग्भूत आसीत्=अकम्पत), [तथा], हे इन्द्र, ते (=तव) वज्रः (=वज्रम्) [अपि] [अयोयवीत्=अकम्पत] ॥

अत्रेदमुक्तं भवति । यदा द्यावापृथिव्योरपि उपद्रवकारिणं वृत्रम् इन्द्रोवधीत्, तदा परममहिमयुक्तो द्युलोकोपि भयेन चकम्पे, तथा महाबलयुक्तमपि इन्द्रस्य वज्रं स्वकृताद् वृत्रहननादनन्तरं द्युलोकवदेव चकम्प इति ॥

---

'मनुषे अपो गातुयन्'. अक्षरशः अर्थ, 'मनुष्यांकरितां उदकांस मार्गाची इच्छा धरून.'

'लोकांस दिसावें म्हणून'='दृशे'. अक्षरशः अर्थ, 'पाहण्यासाठी.' म्हणजे सूर्यानें प्रकाशावें, आणि अंधकार दूर करून लोकांस दिसावें असें करावें म्हणून. 'दृशे' ही तुमन्तार्थी दृश् धातूची [illegible] आहे. साधारण संस्कृतांत असा [illegible] होत नसतो.

९. वृत्राला मारिला असें पूर्व ऋचेंत सांगितलें. त्या वेळीं काय काय झालें तें सांगतोः—'हें जें इंद्रवृत्रांचें युद्ध चाललें आहे त्याचा परिणाम काय होईल नकळे, इंद्राचा पराजय झाला तर सर्व जग दुष्ट वृत्राच्या हातीं सांपडेल अशी भीति मनुष्यांस पडल्यावर, जेव्हां शेवटीं इंद्रजय झाला, तेव्हां त्यांणी आपल्या शक्तीप्रमाणें इंद्राचें उत्तम स्तोत्र केलें, आणि तें इतकी मोठी गर्जना करून तें

१०. [हे इंद्रा], द्यावापृथिवींस दाबून टाकून उपद्रव करणाऱ्या वृत्राचें शिर जेव्हां तुला सोमपानानें हर्ष उत्पन्न झाला असतां [तूं] [आपल्या] बळाच्या योगानें छेदून टाकिता झालास, [तेव्हां] त्या अहीच्या गर्जनेस भिऊन महाबलवान् द्यु[लोक] सुद्धा कंपायमान झाला— हे इंद्रा, तुझें वज्र [सुद्धा] [कंपायमान झालें].

10 Even the mighty Dyaus ( heaven ) trembled with fear at the roar of that Serpent, [ even ] thy [ own ] thunderbolt, O Indra, [ trembled ], when [ thou ] in the exhilaration of the Soma didst sever with [ all ] [ thy ] might the head of Vritra, the great oppressor of earth and heaven.

१०. वृत्रवध केला तेव्हां वर सांगितल्याप्रमाणें मनुष्येंच भ्यालीं असें नाहीं गाते झाले कीं, तें स्वर्गी जाऊन पोंहचलें; आणि दुसरें असें झालें कीं, इंद्रजय होतांच इंद्राचे सहाय आणि मनुष्यांस हितकारी जे मरुत् त्यांणीं इंद्राचें अभिनंदन केलें, म्हणजे, ये वा इंद्रा, तुझा जय झाला हें फार चांगलें झालें, तूं धन्य आहेस, अशी वाहवा करिते झाले.

'मोठें' = 'बृहत्.' म्हणजे मोठ्या गर्जनेनें उच्चारिलेलें असा अर्थ आहे यांत संशय नाहीं. ऋ. ७. ३३. ४; ९. ९७. ३६; ५. ४३. ८ हे मंत्र पाहा.

'आल्हादकारक' = 'स्वश्चन्द्रम्'. अक्षरशः अर्थ, 'स्वताहाचें तेज ज्याला आहे तें.' पण स्वताहाचें या पदावर विशेष जोर नाहीं. तेजस्वी, अथवा सुंदर इतकाच पर्यवसित अर्थ समजावयाचा.

'बलयुक्त' = 'अमवत्'. म्हणजे ज्यांत इंद्राचे उत्तेजनयुक्त धन्यवाद केले होते. कोणाचें तरी उत्तेजन येई अशा वाणीनें स्तोत्र केल्यावर कांहीं एकादा पराक्रम करण्याचें आवेशजन्य बळ त्याला उत्पन्न होतें; म्हणून त्या स्तोत्रास 'बलयुक्त' म्हणणें यांत विशेष ओढाताण नाहीं.

'मनुष्यांच्या हितासाठीं लढणारे, आणि मनुष्यांचे सखे' = 'मानुषप्रधना नृषाचः'. हीं विशेषणें हेतुगर्भ होत, कारण कीं मनुष्यांच्या हितासाठीं इंद्रानें वृत्रवध केला त्यापासून मनुष्यहितचिंतक जे मरुत् त्यांसहि आनंद झाला असें तात्पर्य आहे.

'स्वर्गी' = 'स्वः.' मरुतांनीं स्वर्गी, आणि मनुष्यांनीं भूमीवर अभिनंदन केलें असा विरोध आहे. हा जो 'स्वः' शब्द तो, आणि 'ॐ भूर्भुवः स्वः' यांतला 'स्वः' शब्द एकच आहे.

तर, 'जेव्हां इंद्र सोम पिऊन हर्षयुक्त झाला, आणि आवेशाविष्ट होऊन वृत्राचा वध आपलें सर्व बळ खर्चून करिता झाला, तेव्हां महाबलयुक्त जो द्यु (द्युलोक) तोहि त्या वृत्राच्या गर्जनेस भिऊन थरथर कांपला, आणि इंद्राचें महातेजस्वी वज्र सुद्धा त्या भयंकर गर्जनेस भिऊन थरथर कांपलें' असा भावार्थ.

'द्यावापृथिवींस दाबून टाकून उपद्रव करणाऱ्या वृत्राचें'=' रोदसी बद्धधानस्य वृत्रस्य.' म्हणजे, वृत्रानें पृथ्वी आणि स्वर्ग यांस अशा रीतीनें व्यापून टाकिलें आणि आपल्या प्रचंड भारानें इतकें पीडिलें कीं, त्यांस [illegible] जागा [illegible] नाहींशी झाली, आणि सर्व ब्रह्मांड याणेंच व्यापून टाकून द्यावापृथिवींस सर्व बाजूंनीं ढकलून ढकलून ब्रह्मांडगोलाच्या बाहेर जणुं हाकून लाविलीं होतीं. हा या सुंदर कल्पनातरंगाचा अर्थ झाला. परंतु मूळांत 'बद्धधान्यस्य रोदसी' असें आहे त्यामुळें 'रोदसी' हें द्वितीयान्त नसून संबोधनाचें द्विवचन आहे, यास्तव 'हे द्यावापृथिवी, अतिशयेंकरून उपद्रव करणाऱ्या' इत्यादि भाषांतर होऊं पाहातें. आणि अर्थास तर, 'हे द्यावापृथिवी,' हें संबोधन इष्ट नसून 'बद्धधानस्य रोदसी' (='द्यावापृथिवीतें दाबून पीडा करणाऱ्या') असें इष्ट आहे. यास्तव मंत्रकर्त्याचा पाठ 'बद्धधानस्य रोदसी' असा असला पाहिजे. सायणाचार्य सुद्धा 'रोदसी' असें संबोधनार्थी पद न घेतां 'रोदसी' असें द्वितीयान्त घेऊन निर्वाह करितात, आणि या स्वराच्या अडचणीविषयीं कांहींच लिहीत नाहींत. 'बद्धधानस्य रोदसी' असेंच असावें, 'बद्धधानस्य रोदसी' असें असूं नये याविषयीं ऋ. ७. ६९. १ यांतील 'आ वां रथो रोदसी बद्धधानो हिरण्ययो वृषभिर्यात्वश्वैः'(=हे अश्वी हो, द्यावापृथिवींस आपल्या भारानें दाबून टाकणारा तुमचा सोन्याचा रथ तरुण घोड्यांच्या योगानें इकडे येओ) या शब्दांवरून बळकट प्रमाण सांपडतें. वैदिकांच्या पाठांत तर 'बद्धधानस्य रोदसी' असें आहे, आणि अर्थाच्या संबंधानें पाहिलें असतां तसें असूं नये. असें समजून सायणाचार्य सुद्धा भाष्य करितात. यावरून दोन गोष्टी निर्विवाद सिद्ध होतात. १ली, हल्लीं जो वेदाचा वैदिक पाठ आहे, तो अनादि काळापासून तसाच चालत आलेला आहे आणि सूक्तकर्त्यांनीं जसा रचिला तसाच म्हणण्यांत येत असतो अशी जी आपली समजूत आहे, ती बहुत अंशीं योग्य आहे तरी तिला कांहीं अपवाद आहेत असें कबूल केलें पाहिजे; आणि २री ही कीं, असे अपवाद भाष्यकार सायणाचार्यांसहि संमत आहेत, कारण कीं नसते तर प्रस्तुत मंत्रांत 'रोदसी' असाच स्वर समजून त्यांणीं कांहीं ना कांहीं तरी निर्वाह केला असता.

'तुला सोमपानानें हर्ष उत्पन्न झाला असतां'='मदे सुतस्य.' अक्षरशः

अर्थ 'पिळून काढिलेल्या [सोमाच्या] आनंदांत'. वृत्राला मारण्यापूर्वी इंद्र सोम पिऊन गेला होता, आणि सोमपानापासून उत्पन्न झालेला जो मादरूपी हर्ष, त्यामुळें इंद्रास सामर्थ्य आलें असें ऋषीच्या मनांतलें म्हणणें आहे. सोमपान केल्यानें आंगांत आवेशयुक्त बळ येतें अशी समजूत वेदांत सर्वत्र आहे, आणि या कलियुगांत सुद्धा अजूनहि ती समजूत आणि तिजप्रमाणें प्रवृत्तिहि लोकांत आहेच.

'तूं......छेदून टाकिता झालास' =' अभिनत्'. सायणाचार्य 'अभिनत्' हें क्रियापद इंद्राकडेस द्वितीयपुरुषीं न लावितां 'वज्रः' याच्याशीं घेतात. व्याकरणदृष्ट्या कांहीं अडचण नाहीं तरी वाक्यांतील शब्दरचनेवरून आणि अर्थसंदर्भावरून पाहातां द्वितीयपुरुषीं (इंद्राकडेस) घेणें हेंच चांगलें दिसतें.

'त्या अहीच्या गर्जनेस.' वृत्रास अहि अथवा सर्प म्हणतात त्याविषयीं सू. ३२ मं. ५, ८, ११ हे पाहा.

'महाबळवान द्युलोक '=' अमवान् द्यौः.' म्हणजे मोडक्या घरासारिखा लहानसान भारानें पडूं लागणारा असा नव्हे, तर ज्यांत अमित भाराचे असंख्य सूर्यचंद्रादि प्रचंड गोल धारण केलेले आहेत आणि जो एकाद्या महामंडपासारिखा स्थिर आणि [redacted] तोहि कंपायमान झाला.

यदिन्न्विन्द्र पृथिवी दशभुजिरहानि विश्वा ततनन्त कृष्टयः ।
अत्राह ते मघवन्विश्रुतं सहो द्यामनु शवसा बर्हणा भुवत् ॥११॥

यत् । इत् । नु । इन्द्र । पृथिवी । दशऽभुजिः । अहानि । विश्वा । ततनन्त । कृष्टयः ।
अत्र । अह । ते । मघऽवन् । विऽश्रुतम् । सहः । द्याम् । अनु । शवसा । बर्हणा । भुवत् ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

११. हे इन्द्र, यद् इन्नु (=यदा खलु) पृथिवी दशभुजिः (=दशगुणिता) [भवेत्], कृष्टयः (=मनुष्याश्) [च] विश्वानि अहानि (=सर्वाण्यहानि=सर्वकालपर्यन्तं) ततनन्त (=आत्मानं विस्तारयेयुः=चिरंतना जीवेयुः), अत्राह (=तदैव=तस्मिन्नेव काले) हे मघवन्, शवसा बर्हणा (=शवसा बर्हणया=त्वदीयेन बलेन वृत्रहननादिक्रिया[illegible] पराक्रमक्रियया च) विश्रुतं (=प्रख्यातिमानीतं) ते (=तव) सहः (=प्रभावो) द्याम् अनु भुवत् (=द्युसदृशं भवेत्) ॥

अत्रेदमुक्तम् । इन्द्रस्य वृत्रहननादिक्रियायां प्रकाशितेन पराक्रमेण यद्यपि तस्य प्रभावः प्रसिद्ध एवास्ति, तदपि तस्य प्रसेधयितॄणां मनुष्यभावजन्याद् अल्पायुस्त्वात् तेषां च स्थानभूतायाः पृथिव्या अल्पत्वात् तस्य महिमा द्युलोकादाश्रावयितुं न शक्यते, यदि तु पृथिवी दशगुणिता भवेत् सा च स्तोतृभिर्मनुष्यैः परिपूर्णा स्यात् स्तोतारश्च मरणरहिता भूत्वा अहर्निशञ्च इन्द्रस्य सहसो महिमानमेव वर्णयेयुः, तदैव स सर्वामपि द्यां व्याप्नुयात् न प्रागिति ॥

११. [हे इंद्रा], जर पृथिवी दसपट मोठी होईल, [आणि] मनुष्यें सर्वकाळ शाश्वत [राहातील], तरच हे मघवा, [तुझ्या] शक्तीच्या योगानें [आणि] [तुझ्या] पराक्रमाच्या योगानें प्रख्यात [झालेला] [असा जो] तुझा प्रभाव [तो] द्युलोकाइतका मोठा होईल.

11. If, O Indra, the earth [were] ten times as great, [and] men were to prolong their lives to eternity, then only, O Maghavan, would thy might, made famous by [thy] strength [and] by [thy] exploit, be as great as heaven.

११. हा मंत्र थोडासा कठिण आहे, पण त्याचा भावार्थ उघड दिसतो. तो असा कीं, 'इंद्राचा प्रभाव फारच मोठा आहे आणि तो सर्व दिगंत व्यापून द्युलोकाएवढा होण्यासारिखा आहे. पण त्याचें वर्णन करणारीं मनुष्यें अल्पायु आहेत, आणि तीं ज्या पृथ्वीवर रहातात तीहि लहान आहे. तर पृथिवी जर आहे त्याच्या दसपट मोठी होईल, आणि तिच्या सर्व पाठीवर इंद्राच्या प्रभावाचें वर्णन करणारे स्तोते राहतील, आणि हे स्तोते अल्पायु असून मरतात तसे न मरतां सदैव जगतील, तर मग इंद्राचा प्रभाव सर्व द्युलोकभर पसरेल, तोंपर्यंत पसरणार नाहीं.'

'तुझ्या शक्तीच्या योगानें आणि तुझ्या पराक्रमाच्या योगानें प्रख्यात [झालेला]'= 'विश्रुतं शवसा बर्हणा.' म्हणजे वृत्रहननादि जे पराक्रम आणि त्यांत दाखविलेली शक्ति तिच्या योगानें प्रसिद्धीस आलेला. 'बर्हणा' ही 'बर्हणा' शब्दाची 'बर्हणया' याऐवजीं तृतीया आहे.

या मंत्रावरून आपले आर्य पूर्वज आपली पृथ्वी ही द्युलोकापेक्षां फार लहान आहे असा जो ज्योतिषाचा खरा सिद्धांत त्याला, आणि देवाच्या प्रभावापुढें बापडीं मर्त्य [redacted] आहेत या सर्वतोज्ञात सिद्धांताला जाणून असत असें स्पष्ट समजून येतें. ऋषि आपणास अमर अथवा चिरंजीव मानीत नसत अशाविषयीं या मंत्रांत चांगलें ज्ञापक आहे.

'मनुष्यें सर्वकाळ शाश्वत राहतील' =' अहानि विश्वा ततनन्त कृष्टयः.' अक्षरशः अर्थ, 'मनुष्यें सगळे दिवस विस्तृत होतील;' म्हणजे मनुष्यांचें आयुष्य इतकें लांब होईल कीं तें अनंतकाळपर्यंत संपणारच नाहीं.

'द्युलोकाइतका मोठा होईल' = 'द्याम् अनु भुवत्.' अक्षरशः, 'द्युप्रमाणें होईल.' ही ऋचा खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटल्यास वृत्ताला जमतेः—

यदिन्नु इन्द्र पृथिवी दशभुजिः ।
अहानि विश्वा ततनन्त कृष्टयः ।

**त्वम॒स्य पा॒रे रज॑सो॒ व्यो॑मनः स्व॒भूत्यो॑जा॒ अव॑से धृषन्मनः ।**
**च॒कृ॒षे भूमिं॑ प्रति॒मान॒मोज॑सो॒ऽपः स्वः॑ परि॒भूरे॒ष्या दिव॑म्॥१२॥**

त्वम् । अ॒स्य । पा॒रे । रज॑सः । विऽओ॑मनः । स्वभू॑तिऽओजाः । अव॑से ।
धृ॒षत्ऽम॒नः ।
च॒कृ॒षे । भूमि॑म् । प्र॒ति॒ऽमान॑म् । ओज॑सः । अ॒पः । स्व॒१रिति॒ स्वः॑ ।
प॒रि॒ऽभूः । ए॒षि । आ । दिव॑म् ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

१२. हे धृषन्मनः (=धर्षकमनोयुक्त=धैर्यवद्मनोयुक्त) [ इन्द्र ], स्वभूतिओजाः (=स्वभूतबलस्) [ त्वम् ] अवसे (=अस्मदादीनां रक्षणाय सुखाय वा) अस्य (=पुरोदृश्यमानस्य) रजसः (=अन्तरिक्षस्य) व्योमनः (=द्युलोकस्य) [ च ] पारे (=परतः) भूमिं (=पृथिवीम्) ओजसः प्रतिमानं (=त्वदीयस्य बलस्य प्रतिमानं यथा भवति तथा) चकृषे (=कृतवानसि) । [ त्वं च ] अपः (=अन्तरिक्षं) स्वः (=स्वर्गं) दिवम् आ (=द्युलोकं च) परिभूरेषि (=परिग्रहीता सन् प्राप्नोषि=संवेष्ट्य तिष्ठसि) ॥

आ समुच्चयार्थे ।

---

अत्राह ते मघवेन् विश्रुतं सहो ।
द्यामनुं शवसअ बर्हणा भुवत् ॥

'शवसा' याऐवजीं 'शवसअ' असें वाचावें लागतें यावरून असा नियम निघतो कीं एकाच दीर्घ अक्षराचीं दोन ऱ्हस्व अक्षरें समजून वाचली पाहिजेत. आणि याप्रमाणें दुसरेहि प्रयोग पुढें पुष्कळ येत जातील.

१२. हे धैर्यमनस्क [इंद्रा], स्वतःसिद्धबलयुक्त [असा जो] तूं [तो] [आमच्या] संरक्षणासाठीं, या अंतरिक्षाच्या [आणि] द्युलोकाच्या शेवटीं, [तुझ्या] तेजाचें प्रतिमान [होय अशी] [ही] भूमि निर्माण करिता झालास. [आणि तूं] अंतरिक्ष [आणि] स्वर्ग [आणि] द्युलोक यांस वेष्टून राहत असतोस.

12. Thou, O [Indra] of daring mind, whose power is self-existent, createdst, at the other end of this firmament [and] of this heaven, the earth for [our] protection, [as] a measure of [thy] power. [Thou] surroundest the firmament, the heaven and the sky.

---

१२. या मंत्रांत 'इंद्रानें मनुष्यांच्या संरक्षणाकरितां पृथिवी निर्माण केली, आणि ती पृथिवी इंद्राचें बळ किती आहे तें दाखविणारी होय, आणि तिला उत्पन्न करून द्युलोकाच्या आणि अंतरिक्षाच्या शेवटीं स्थापिली; आणि इंद्र इतका मोठा आहे कीं, तो पृथिवींत मावण्यासारिखा नाहीं इतकेंच नाहीं; पण द्युलोक, अंतरिक्ष आणि स्वर्ग या सर्वांतहि मावणारा नाहीं. तो या सर्वांस वेष्टून राहतो' असा इंद्राचा महिमा वर्णिला आहे.

'धैर्यमनस्क'=' धृषन्मनः.' म्हणजे ज्याचें मन भितरें नव्हे, तर शत्रूचा पराभव करण्याचें धैर्य ज्यांत आहे अशा मनाचा. या विशेषणाचें येथें विशेष प्रयोजन आहे असें नाहीं, पण पूर्वील मंत्रापर्यंत इंद्राचें शौर्य वर्णीत आला त्या संबंधानें शूर वीरास शोभे असें विशेषण दिलें आहे.

'स्वतःसिद्धबलयुक्त'=' स्वभूतिओजाः.' म्हणजे दुसऱ्यानें कोणी त्याला बळ दिलें असें नाहीं, त्याला आंगचेंच बळ आहे असें तात्पर्य. ईश्वराचें बळ, तेज, शक्ति हीं सर्व स्वतःसिद्ध आहेत असा जो सिद्धान्त, त्याचें उत्तम ज्ञापक हें विशेषण होय. वरील विशेषण आणि हें प्रस्तुतचें विशेषण यांजवरून देवाविषयीं आमच्या आर्य पूर्वजांचे विचार कसे होते, आणि ते अलीकडच्या कितीएक विचारांहून किती भिन्न आहेत, तें दिसून येतें.

'तुझ्या तेजाचें प्रतिमान होय अशी ही भूमि'=' प्रतिमानमोजसः.' सायणाचार्य किंचित् निराळा अर्थ करितात. ते पृथ्वीकडे न घेतां इंद्राकडेस घेतात, आणि "सर्व बळवान् मनुष्यांचें प्रतिमान असा जो तूं तो." असें भाष्य करितात.

'अंतरिक्षाच्या आणि द्युलोकाच्या शे-

**त्वं भुवः प्रतिमानं पृथिव्या ऋष्ववीरस्य बृहतः पतिर्भूः ।**
**विश्वमाप्रा अन्तरिक्षं महित्वा सत्यमद्धा नकिरन्यस्त्वावान्॥१३॥**

त्वम् । भुवः । प्रतिऽमानम् । पृथिव्याः । ऋष्वऽवीरस्य । बृहतः ।
पतिः । भूः ।
विश्वम् । आ । अप्राः । अन्तरिक्षम् । महिऽत्वा । सत्यम् । अद्धा ।
नकिः । अन्यः । त्वाऽवान् ॥ १३ ॥

## भाषायाम्.

१३. त्वं पृथिव्याः (=विस्तीर्णाया भूमेः) प्रतिमानं भुवः (=प्रतिनिधिर्भवसि) (=सर्वामपि पृथिवीं व्याप्नोषि), [त्वम्] ऋष्ववीरस्य (=श्रेष्ठवीरस्य=श्रेष्ठवीरवतो) बृहतः (=प्रवृद्धस्य=उत्तुङ्गस्य) [स्वर्गस्य] पतिः (=प्रभुः) भूः (=अभूः=भवसि), [त्वं] महित्वा (=महत्त्वेन=तव महिम्ना) विश्वम् आ (=सकलमपि) अन्तरिक्षम् अप्राः (=पूरयसि=व्याप्नोषि) । [अतः कारणात्] सत्यमद्धा (=सत्यमेव) त्वावान् (=त्वत्सदृशः) अन्यो नकिः (=नहि) ॥

वटीं '="पारे रजसः व्योमनः.' म्हणजे वर पाहिल्यास प्रथम द्युलोक आणि नंतर अंतरिक्ष दिसतें आणि त्याच्या तीरावर पृथिवी दिसते म्हणून, तसें म्हटलें आहे. 'पारे' शब्दाचा हा अर्थ प्रसिद्ध असून शिवाय प्रयोगान्तरेंहि पुष्कळ आहेत.

'वेष्टून राहत असतोस' इ०. आपले आर्य पूर्वज मूर्तिपूजा करीत नसत, त्यामुळें त्यांचें मन लहानशा मूर्तींच्या योगानें आकुंचित झालेलें नसे; म्हणून इंद्रादि देवांचें खरोखर दिव्यस्वरूप त्यांनें ते चांगलें वर्णन करूं शकत. याचें हें एक चांगलें उदाहरण आहे. शिवाय ते, इंद्राणी आपल्या सवतीबरोबर भांडत असतां तिचें समाधान करतां करतां इंद्र थकला तेव्हां संतापशांतीसाठीं आपल्या डोक्यावर यमुनानदी घेऊन राहिला इत्यादि आधुनिक ऋषींसारिखें (कवींसारिखें) वर्णन करीत नसत.

'स्वर्ग'=' स्वः.' 'स्वः' हा 'भू'-च्याहिपेक्षां उंच आहे आणि तो प्रकाशयुक्त आणि तेजःपुंज आहे असें वर्णन येत असतें.

वृत्तसुखार्थ 'विओमनः,' 'स्वभूतिओजाः' असें, आणि चवथा चरण 'अपः सुअः परिभूरेषि आ दिवम्' असें संहितेंत म्हटलें पाहिजे.

१३. तूं [या] विस्तीर्ण भूमीचें प्रतिमान होस. [तूं] महावीर ज्यांत राहतात त्या उच्च [स्वर्गा]-चा प्रभु होस. [तूं] आपल्या मोठेपणानें सर्वैहि अंतरिक्ष भरून टाकिलें आहेस. तुझ्यासारिखा दुसरा कोणी नाहीं [हें] अगदी सत्य [आहे].

13. Thou art the counterpart of the vast earth, [thou] art the lord of the high [heaven] where excellent heroes dwell. [Thou] hast filled even the whole ether with thy greatness. Truly, indeed, [there is] no other like thee.

१३. या मंत्रांत इंद्राचें सर्वप्रभुत्व सांगितलें आहे:– 'तो पृथ्वीला व्यापून आहे; तो स्वर्गाचा प्रभु आहे; आणि त्याणें सर्व अंतरिक्ष आपल्या माहात्म्यानें भरून टाकिलें आहे: याप्रमाणें इंद्र श्रेष्ठ आहे आणि त्यासारिखा दुसरा कोणीहि नाहीं.'

'विस्तीर्ण भूमीचें प्रतिमान होस'= 'भुवः प्रतिमानं पृथिव्याः.' म्हणजे, जिकडे जिकडे पृथिवी आहे तिकडे तिकडे तूं आहेस, अर्थात् सर्व पृथिवीस तूं व्यापून टाकितोस. एकाद्या चौरंगावर त्या चौरंगाच्या मापाचीच बनात आंथरली आणि तो चौरंग तेणेंकरून भरून गेला तर ती बनात त्या चौरंगाचें प्रतिमान होईल. त्याप्रमाणें पृथ्वीचें प्रतिमान इंद्र आहे, म्हणजे पृथ्वीचा असा कोणताहि भाग नाहीं कीं जेथें इंद्र नाहीं. सर्व पृथ्वीस इंद्र व्यापून आहे इतकेंच तात्पर्य.

'महावीर ज्यांत राहातात'='ऋष्ववीरस्य.' सायणाचार्य येथें 'वीर' शब्दाचा देव असा अर्थ समजतात. देवास 'वीर' असें वेदांत म्हटलें आहे खरें आणि त्यावरून आचार्यांचा अर्थ सिद्ध होतो. परंतु 'वीर' शब्दाचा ~~लौकिक अर्थ~~ येथें घेतला तरी चालेल आणि योग्यहि दिसतो असें आम्हांस वाटतें. शौर्यसंपन्न वीर युद्धांत पडले तर ते स्वर्गी जातात अशी जी पौराणिक प्रसिद्धि आहे त्यास वेदांत कांहीं तरी आधार असला पाहिजे.

या मंत्रांत जें इंद्राचें स्वरूप वर्णिलें आहे त्यांत आणि ईश्वराच्या सर्वव्यापकत्वाविषयीं जो आपला सिद्धांत आहे त्यांत विशेष भेद दिसत नाहीं. ईश्वराच्या स्वरूपाविषयीं आणि साधारण धर्माविषयीं अतिपरिपक्व दशेला आणिलेले जे आपले सिद्धांत, त्या सर्वांचें बीज तरी वेदांत आहे असें जें आम्ही म्हणत असतों त्याचें हें एक चांगलें उदाहरण आहे.

**न यस्य॒ द्यावा॑पृथि॒वी अनु॒ व्यचो॒ न सिन्ध॑वो॒ रज॑सो॒ अन्त॑मान॒शुः।**
**नोत स्ववृ॑ष्टिं॒ मदे॑ अस्य॒ युध्य॑त॒ एको॑ अ॒न्यच्च॑कृ॒षे विश्व॑मानु॒षक्**
**॥ १४ ॥**

न । यस्य॑ । द्यावा॑पृथि॒वी इति॑ । अनु॑ । व्यचः॑ । न । सिन्ध॑वः । रज॑सः ।
अन्त॑म् । आ॒न॒शुः ।
न । उ॒त । स्वऽवृ॑ष्टिम् । मदे॑ । अ॒स्य॒ । युध्य॑तः । एकः॑ । अ॒न्यत् ।
च॒कृ॒षे । विश्व॑म् । आ॒नु॒षक् ॥ १४ ॥

---

### भाषायाम्.

१४. यस्य व्यचः (=व्यापनं=महत्त्वं) द्यावापृथिवी (=द्यावापृथिव्यौ=द्युलोकभूलोकावपि) न [अनु आनशाते] (=प्राप्तुम् असमर्थे बभूवतुः), [यस्य] अन्तं (=व्यचसो अन्तं), ~~रजसः सिन्धवः~~ सिन्धवः (=अब्रूपा अन्तरिक्षप्रदेशा) न अन्वानशुः (=प्राप्तुमसमर्था बभूवुः), अस्य उत (=यस्य च) स्ववृष्टिं (=स्वकृतवृष्टि) [वृत्रादिं] मदे (=अभिषुतसोमस्य पानेन जाते हर्षे) युध्यतो [बलस्य अन्तं] न [अन्वानशुः], [स] एकः (=एकाकी=अद्वितीयस्) [त्वं हे इन्द्र], विश्वमन्यत् (=आत्मव्यतिरिक्तानि सकलान्यपि अन्यवस्तूनि) आनुषक् (=आनुपूर्व्येण=अनुक्रमेण) चकृषे (=निर्मितवानसि) ॥

यो भूलोकान्तरिक्षलोकद्युलोकान् व्याप्यावशेषस्तिष्ठति यस्य च बलं वृत्रहननप्रसङ्गे केनापि परिमिततया न ज्ञातं स इन्द्र एव विश्वस्यैतस्य वस्तुमात्रस्य निर्माता भवतीति भावः ॥

---

आधुनिक काळीं आपल्या कोणत्या मूर्तीचें माहात्म्य ह्या मंत्रांत केल्याप्रमाणें वर्णन केल्यास शोभेल?

एकंदरींत हा मंत्र फारच सुंदर आणि महत्त्वाचा आहे.

वृत्रासाठीं ' त्वावान् ' हें पद ' तुआवान् ' असें म्हटलें पाहिजे.

१४. ज्याच्या मोठेपणाचा अंत द्यावापृथिवींस लागला नाहीं [आणि] अंतरिक्षास[हि] लागला नाहीं; आणि [सोम]हर्षांत वृत्राशीं युद्ध करीत असतां ज्याच्या [बळाचा अंत मिळाला] नाहीं, [तो] [तूं] एकला [हे इंद्रा], सकल वस्तु अनुक्रमेंकरून निर्माण करिता झालास.

14. [He] whose magnitude earth and heaven [have] not [reached], [whose] end the ethereal regions have not attained and whose [power] was not [guaged] when he in the exhilaration [of the Soma] fought the self-showering demon;—that thou, alone [O Indra], didst create every other thing in order.

---

१४. पूर्वील ऋचेंत इंद्र पृथ्वी आणि आकाश आणि द्युलोक यांस व्यापून राहातो असें सांगितलें. आतां म्हणतो कीं. 'या तीनी लोकांस इंद्राच्या मोठेपणाचा अंत लागत नाहीं, आणि वृत्राबरोबर जें अतिप्रचंड युद्ध इंद्रानें केलें त्या प्रसंगीं त्याच्या बळाला अंत नाहीं असें दिसून आलें. तर असा जो मोठा इंद्र त्यानेंच एकल्यानें हें सर्व जग एकामागून एक उत्पन्न केलें आहे.'

'ज्याच्या मोठेपणाचा अंत द्यावापृथिवींस लागला नाहीं'='न यस्य द्यावापृथिवी अनु व्यचः [आनशाते].' अक्षरशः अर्थ 'ज्याचें व्यापन म्हणजे व्यापून राहण्याची जी शक्ति, अर्थात् मोठेपण, त्याप्रत द्यावापृथिवी पोंहचल्या नाहींत;' म्हणजे, ज्याचा मोठेपणा द्यावापृथिवींपेक्षांहि मोठा होय, असें तात्पर्य आहे.

'आणि अंतरिक्षासहि लागला नाहीं'='न सिन्धवः अन्तम् आनशुः.' अक्षरशः अर्थ, 'अंतरिक्षाच्या सिंधु अंताप्रत पोंहचल्या नाहींत.' 'अंतरिक्षाच्या सिंधु' म्हणजे अंतरिक्षाचा प्रदेश; म्हणजे, अंतरिक्षच. अंतरिक्षाचे प्रदेशांस 'सिंधु' म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, त्यांत मेघोदकें (=सिंधु) बाष्परूपानें जिकडे तिकडे पसरलेलीं असतात. सू. ३५ मं. ८ यांजवर 'अंतरिक्ष' याविषयींची टीप पाहा.

'सकलवस्तु'='अन्यत् विश्वम्.' अक्षरशः अर्थ 'दुसऱ्या सर्व वस्तु,' म्हणजे आपणाशिवाय जें सर्व जग तें. इंद्राला कोणीं निर्माण केलें नाहीं, इंद्रानें मात्र सर्व जग निर्माण केलें, असा भावार्थ. आणि तें त्यानें एकल्यानें निर्माण केलें, दुसऱ्या कोणाचें साहाय्य नव्हतें.

'अनुक्रमेंकरून'='आनुषक्.' सायणाचार्य 'आनुषक् चकृषे' याचा अर्थ

**आर्चन्नत्र मरुतः सस्मिन्नाजौ विश्वे देवासो अमदन्ननु त्वा ।**
**वृत्रस्य यद्भृष्टिमता वधेन नि त्वमिन्द्र प्रत्यानं जघन्थ १५॥१४॥**

आर्चन् । अत्र । मरुतः । सस्मिन् । आजौ । विश्वे । देवासः । अमदन् । अनु । त्वा ।
वृत्रस्य । यत् । भृष्टिऽमता । वधेन । नि । त्वम् । इन्द्र । प्रति । आनम् । जघन्थ ॥ १५ ॥ १४ ॥

## भाषायाम्.

१५. हे इन्द्र, सस्मिन् आजौ (=तस्मिन् संग्रामे) यद् (=यदा) त्वं भृष्टिमता वधेन (=अग्रिमता तीक्ष्णधारेण वज्रेण) वृत्रस्य आनम् (=आननं=मुखं) प्रति नि जघन्थ (=नितरां प्राहार्षीः), अत्र (=तदा) मरुतस् [त्वा=त्वाम्] आर्चन् (=अपूजयन्=स्तोत्रैस्तव प्रशंसाम् अकुर्वन्) [तथा] विश्वे देवासः (=सर्वे देवास्) त्वा (=त्वाम्) अन्वमदन् (=अभिननन्दुः) ॥

---

'अनुक्रमेंकरून उत्पन्न करिता झालास' असा न करितां 'सर्व जग तूं आपल्या स्वाधीन करून घेता झालास' असा करितात; पण आम्ही केलेल्या 'आनुषक्' याच्या अर्थाविषयीं ऋ. १. ६. ८ हा मंत्र आणि याजवरील सायणभाष्य पाहा.

या ऋचेंत जें इंद्राचें स्वरूप आणि कर्तृत्व वर्णिलें आहे तें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. हा मंत्र रचिल्यापासून अनेक युगें होऊन गेलीं, तरीहि ईश्वराच्या अपरिमितत्वाविषयीं आणि कर्तृत्वाविषयीं आमचें ज्ञान याच्या पेक्षां फार वाढलें आहे असें नाहीं. या संबंधानें हा मंत्र मोठ्या महत्त्वाचा आहे.

या ऋचेच्या पहिल्या तीन पादांत इंद्राविषयीं तृतीयपुरुषीं निर्देश असून चवथ्या पादांत द्वितीयपुरुषीं आहे; असें करण्याचें कारण वृत्तसुखार्थ 'चकृषे' हें रूप घालावें लागलें इतकेंच आहे, दुसरें कांहीं नाहीं.

१५. हे इंद्रा, त्या युद्धांत तीक्ष्णधार असलेल्या वज्रानें तूं जेव्हां वृत्राचें तोंड चेंचून टाकिता झालास, तेव्हां मरुत् तुझें स्तोत्र करिते झाले, [आणि] सकल देव तुझें अभिनंदन करिते झाले.

15. In that battle the Maruts sang thy praises [and] All the Gods congratulated thee, when, O Indra, [thou] didst strike down with thy sharp-edged thunderbolt the head of Vritra.

---

१५. 'वृत्रवध केला तेव्हां मरुतांस, आणि सर्व देवांस आनंद झाला, आणि इंद्राच्या जयापासून आपणास झालेला संतोष त्यांणीं स्तोत्रादिकेंकरून बोलून दाखविला,' असा भावार्थ.

'त्या युद्धांत'=' सस्मिन् आजौ.' म्हणजे वरील मंत्रांत दर्शविलेल्या वृत्रयुद्धांत. 'सस्मिन्' हें 'तस्मिन्' याबद्दलचें 'स' या सर्वनामाच्या सप्तमीचें रूप ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.

'स्तोत्र करिते झाले'=' आर्चन्.' सायणाचार्य 'पूजिते झाले' असें म्हणतात. 'अर्च्' धातूचा 'पूजणें' आणि 'स्तोत्र गाणें' असे दोनी अर्थ होतात. कोणताहि घेतला तरी तात्पर्य एकच आहे; कारण पूजा केली ती तरी स्तोत्ररूपानेंच केलेली, यास्तव अर्थांत अंतर पडत नाहीं.

'अभिनंदन करिते झाले'=' अन्वमदन्.' म्हणजे त्यांस झालेला आनंद हास्यमुखानें वगैरे दर्शविते झाले, आणि, तुझा जय झाला हें फार चांगलें झालें, असें म्हणून शाबासकी देते झाले.

'सकल देव'=' विश्वे देवासः.' सायणाचार्य हे शब्द मरुतांकडेसच लावितात आणि "दानादिगुणयुक्त जे सर्व मरुत् ते" असा अर्थ करितात; पण तसें करण्याचें कारण दिसत नाहीं. 'विश्वे देवासः' म्हणजे मित्र, अर्यमा, वरुण इत्यादि जे दुसरे देव ते.

हें बावन्नावें सूक्त येथें संपलें. एकंदरींत पाहातां हें फार महत्त्वाचें आहे. इंद्रादि जे मोठे देव त्यांचें स्तोत्र आपले आर्य पूर्वज कोणत्या रीतीनें करीत, आणि त्या त्या देवांच्या आबडधोबड पाषाणमय अथवा ताम्रमय मूर्ति करून त्यांपुढें न बसतांहि त्यांचें मन देवांकडेस कसें लागे, आणि देवांचें खरें स्वरूप मनावर ठसण्याजोगें त्यांस तें कसें वर्णितां येई, याचें हें एक उदाहरण आहे. पृथिवीसारिखे जे विस्तीर्ण, आणि तेज, पराक्रम, आणि प्रताप यांहीं भरलेले महापदार्थ, जलबाष्पमय जे अंतरिक्षाचे अपरिमित प्रदेश, आणि त्यांच्याहि वर एकाद्या प्रचंड मंडपासारिखा सूर्यचंद्रादि कोट्यावधि महागोलांनीं भरलेला द्युलोक त्यांस इंद्रानें उत्पन्न केलें आहे, आणि त्यांत दृष्टीस पडणारें जें इंद्राचें माहात्म्य तेंच वर्णनीय होय असें मानून आपले पूर्वज

## सूक्तम् ५३.

आङ्गिरसः सव्य ऋषिः । इन्द्रो देवता । अन्त्ययोस्त्रिष्टुप्, शिष्टानां जगती च्छन्दः ।

न्यू३ षु वाचं प्र महे भरामहे गिर इन्द्राय सदने विवस्वतः ।
नू चिद्धि रत्नं ससतामिवाविदन्न दुष्टुतिर्द्रविणोदेषु शस्यते ॥१॥

नि । ऊम् इति । सु । वाचम् । प्र । महे । भरामहे । गिरः । इन्द्राय । सदने । विवस्वतः ।
नु । चित् । हि । रत्नम् । ससताम्ऽइव । अविदत् । न । दुःऽस्तुतिः । द्रविणःऽदेषु । शस्यते ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. महे (=महत इन्द्राय) सु वाचं (=सुष्ठु=शोभनं स्तोत्रं) नि प्र भरामहे (=नितरां प्रार्पयामः), विवस्वतः (=यजमानस्य) सदने (=यज्ञगृहे) [सु=शोभना] गिरः (=स्तुतीः) इन्द्राय [प्र भरामहे] । हि (=यस्मात्) [स] ससतामिव (=स्वपतामिव=निद्रितवद् अनपेक्षमाणेभ्यः पुरुषेभ्यः) नू चित् (=क्षिप्रमेव) रत्नं (=धनम्) अविदत् (=ददाति) । [एतादृशेषु च] द्रविणोदेषु (=धनदेषु) [विषयेषु] दुष्टुतिः (=असमीचीना स्तुतिः) न शस्यते (=नोच्यते) ॥

अत्रेदमुक्तं भवति । निद्रिताः पुरुषा इव यदा मनुष्या धनं नापेक्षन्ते तदापि तेभ्य इन्द्रः क्षिप्रं धनं ददाति । एतादृशेषु धनदेषु विषयेषु च समीचीना स्तुतिः शंस्या भवति । अतः कारणात् समीचीनानि स्तोत्राणि रचयित्वा अस्य नो यजमानस्य यज्ञशालायां महत इन्द्राय अर्पयामेति ॥

ऊम् इत्यवधाने ॥

आर्यलोक त्याच्या चिंतनेंत पहुडत असत, त्यांस दुसऱ्या पृथक् मूर्तींची कांहींच जरूर पडत नसे, अशाविषयीं धासारिख्या अनेक सूक्तांनीं वेदार्थाभ्यास करणारांची खात्री होते.

## सूक्त ५३.

ऋषि—सव्य (पूर्वीच्या सूक्ताचा जो कर्ता तोच). देवता—इंद्र. वृत्त—जगती, मात्र शेवटच्या दोन (१०, ११ या) ऋचांचें त्रिष्टुभ्.

१. [आपण] मोठ्या इंद्राला चांगलें स्तोत्र अर्पण करूं, [या] यजमानाच्या घरीं चांगले गुणानुवाद [अर्पण करूं]. कारण कीं, [इंद्र] [आम्हांस] जसा कीं निजून राहणाऱ्यांस एकदम द्रव्य मिळवून देत असतो. आणि द्रव्य देणाऱ्यांविषयीं वाईट स्तुति कोणी गात नसतात.

## HYMN 53.

To *Indra*. By *Savya* (author of the previous hymn). Metre—*Jagati* [illegible]t of the last two verses, which is *Trishṭubh*.

1. Hark, offer we a good hymn to great Indra, [offer] good prayers in the sacrificial hall of the sacrificer. For [Indra] bestows wealth upon [men as little expecting it] as if they were sleeping. And a bad praise is not sung of those that bestow wealth.

---

१. हेंहि सूक्त सव्य ऋषीचें होय असें सर्वानुक्रमणिकेंत सांगितलें आहे. या पहिल्या मंत्राचा अर्थ समजण्यास अशी कल्पना करणें अवश्य आहे कीं, मंत्रकर्ता हा आपल्या यजमानाच्या आज्ञेवरून यजमानाच्या यज्ञशाळेंत दुसऱ्या ऋत्विजांसहित इंद्रासाठीं स्तोत्रें रचण्याच्या कामीं गुंतला आहे. आणि म्हणतो कीं 'हे मित्र हो, इंद्र इतका दयाळू आहे कीं त्याच्या उपासकांस धन मिळण्याची आशा नसते, आणि आपल्यास तें मिळेल हें त्यांच्या गावींहि नसतें, आणि ते निद्रिस्त मनुष्यांप्रमाणें कशाचा कांहींच विचार न करितां उगीच असतात, तेव्हां सुद्धा तो त्यांस एकाएकीं धन प्राप्त करून देतो. आणि असे जे धनदाते उदार असतात त्यांची स्तुति गाणें ती चांगली गावी, वाईट गाऊं नये. यास्तव हे मित्रहो, या मोठ्या इंद्राची आपण चांगली स्तुति गाऊं, आपण चांगलीं स्तोत्रें रचून त्याला अर्पण करूं.'

'कारण कीं [तो आम्हांस] जसा कीं निजून राहणाऱ्यांस एकदम द्रव्य मिळवून देतो'='नु चित् हि रत्नं ससतामिव अविदत्.' याचा अर्थ 'कारण कीं, तो निजून राहाणाऱ्यांसारिख्या आळशी लोकांस' म्हणजे आळसानें निजून राहाणाऱ्या लोकांस, कधींहि धन देत नसतो' असाहि होऊं शकेल ('नु चित्' याचा 'कधींहि नाहीं' असा अर्थ होतो या-

दुरो अश्वस्य दुर इन्द्र गोरसि दुरो यवस्य वसुन इनस्पतिः ।
शिक्षानरः प्रदिवो अकामकर्शनः सखा सखिभ्यस्तमिदं गृणीमसि ॥ २ ॥

दुरः । अश्वस्य । दुरः । इन्द्र । गोः । असि । दुरः । यवस्य । वसुनः । इनः । पतिः ।
शिक्षाऽनरः । प्रऽदिवः । अकामऽकर्शनः । सखा । सखिऽभ्यः । तम् । इदम् । गृणीमसि ॥ २ ॥

---

### भाषायाम्.

२. हे इन्द्र, [ त्वम् ] अश्वस्य दुरो (=वाजिनां दाता ) [ असि ], गोः (=गवां) दुरो ( =दाता ) असि, यवस्य ( =धान्यस्य ) दुरो ( =दाता ) [ असि ], [ त्वं ] वसुनः ( =धनस्य ) इनः पतिः ( =प्रभवन् स्वामी ) [ असि ], [ त्वं ] शिक्षानरः ( =मनुष्याणां शिक्षयिता=गुरुः ), प्रदिवः ( =पुरातनः ), अकामकर्शनः ( =कामान् अभिमतप्रदानेन पूरयिता ) [ तथा ] सखिभ्यः सखा ( =सखिषु मित्रेषु ऋत्विगादिषु विषयेषु ) सखा ( =सखिवत्कृपालुः ) [ असि ] । तं [ त्वाम् ] ( =अतः कारणात् त्वाम् ) इदम् (=अनेन प्रकारेण स्तोत्रं कृत्वा ) गृणीमसि (=गृणीमः=स्तुमः )॥

---

विषयीं सू. ४१ मं. १ ला यावरील टीप ५३८ व्या पानावर (पाहा). परंतु चवथ्या पादाच्या अर्थाच्या साहचर्यावरून पाहातां तिसऱ्या पादांत द्रव्य देतो असें म्हणणें हें इष्ट आहे, कधींहि देत नाहीं असें म्हणणें इष्ट दिसत नाहीं.

या मंत्रावरून वैदिक युगांतील ऋषि म्हणजे मंत्रकर्ते कवि खरोखर कसे होते तें दिसून येतें. ते दांभिक नसत, आणि तपोबळाची खोटी घमेंडी पाळणारे नसत. द्रव्याच्या इच्छेनें अथवा द्रव्य मिळालें असेल त्याविषयीं उपकृतबुद्धि दाखविण्याच्या हेतूनें इंद्रासारिख्या महान् देवाचें स्तोत्र रचिलें तर, तसलेंच स्तोत्र रचिलें आहे असें ते त्याच स्तोत्रांत स्पष्ट म्हणण्यास लाजत नसत, आणि आपणास यजमानानें, अथवा कोणी तरी द्रव्य दिलें तर तें 'कृष्णार्पण' झालें असा उंचा रंग दानास लावीत नसत.

हा मंत्र आधुनिक वंशस्थ वृत्ताप्रमाणें विशेष अडचणीशिवाय म्हणतां येतोः—

नि ऊ षु वाचं प्र महे भरामहे ।
गिरः इन्द्राय सदने विवस्वतः ।
नू चिद्धि रत्नं ससतामिवाविदन् ।
न दुष्टुतिर्द्रविणोदेषु शस्यते ॥

२. [हे इंद्रा], [तूं] अश्व देणारा [होस]. हे इंद्रा, [तूं] गुरें देणारा होस, [तूं] धान्य देणारा [होस], [तूं] द्रव्याचा शक्तिमान् प्रभु [होस]; [तूं] मनुष्यांचा गुरु [होस], [तूं] पुरातन, कामनाभंग न करणारा, [आणि] मित्रांस मित्र [होस]. त्या [तुज]प्रीत्यर्थ हें स्तोत्र [आम्हीं] गातों आहों.

2. [Thou art] a bestower of horses, [thou] art, O Indra, a bestower of cows, a bestower of corn, the mighty lord of wealth; [thou art] the preceptor of mankind, [thou art] ancient, [thou art] the fulfiller of wishes, a friend to [thy] friends. We, therefore, sing this unto thee.

२. या ऋचेचा भावार्थ स्पष्टच आहे; तो हा कीं, 'जें कांहीं सर्व म्हणून मनुष्यांस मिळतें तें इंद्र देतो, आणि त्यानें संरक्षण करण्याची शक्तिहि इंद्रच देत असतो. मनुष्यांस शाहणपण आहे तेंहि तोच शिकवितो; तो फार पुरातन आहे, आणि कोणाची मनकामना अतृप्त ठेवीत नाहीं, आणि इतकेंहि असून तो आपल्या उपासकांला स्नेहाप्रमाणें मायाळू आहे. यास्तव हें स्तोत्र आम्ही रचून त्याला अर्पण करीत आहों.' या मंत्रावरून सुद्धा इंद्राविषयींचें खरें स्वरूप आपले आर्य पूर्वज कसें वर्णीत तें दिसून येतें. त्यावरून हा मंत्र महत्त्वाचा आहे.

ही ऋचा साधारण वंशस्थ श्लोकाप्रमाणें खालीं लिहिल्याप्रमाणें म्हणतां येते:—

दुरो अश्वस्य दुर इन्द्र गोरसि ।
दुरो यवस्य वसुन इनस्पतिः ।
शिक्षानरः प्रदिवो अकामकर्शनः ।
सखा सखिभ्यस्तमिदं गृणीमसि ॥

शचीव इन्द्र पुरुकृद्द्युमत्तम तवेदिदमभितश्चेकिते वसु ।
अतः संगृभ्याभिभूत आ भर मा त्वायतो जरितुः काममूनयीः॥३॥

शचीऽवः । इन्द्र । पुरुऽकृत् । द्युमत्ऽतम । तव । इत् । इदम् । अभितः । चेकिते । वसु ।
अतः । सम्ऽगृभ्य । अभिऽभूते । आ । भर । मा । त्वाऽयतः । जरितुः । कामम् । ऊनयीः ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. हे शचीवः (=प्रज्ञावन्) इन्द्र, हे पुरुकृत् (=प्रभूतस्य वृत्रवधादेः कर्तः), हे द्युमत्तम (=अतिशयेन दीप्तिमन्), इदं वसु (=इदं धनं) तव इत् (=तवैव) अभितः (=सर्वत्र) चेकिते (=ज्ञायते=दृश्यते) । [तत्] अतः (=तेभ्यः सर्वेभ्यः स्थानेभ्यः) संगृभ्य (=संगृह्य=संचितं कृत्वा) हे अभिभूते (=शत्रूणाम् अभिभवितः) आभर (=आहर=अत्र अस्मत्समीपम् आनय) । त्वायतः (=त्वाम् आत्मन इच्छतो= त्वां भृशम् उपासीनस्य) [अस्मादृशस्य] जरितुः (=स्तोतुः) कामम् (=अभिलाषं) मा ऊनयीः (=परिहीनं मा कार्षीः=पूरय)॥

अत्र जगति यद्धनं दृश्यते तत् सर्वं तवैवास्ति । अतः कारणात् हे इन्द्र, तत्सर्वं तत्तत्स्थानाद् आनीय अस्मभ्यं देहि। अस्मादृशानां तव स्तोतृणांहि अभिलाषं परिहीनं कर्तुं नार्हसीति भावः ॥

३. हे प्रज्ञावान इंद्रा, हे पराक्रमशाली, हे परम देदीप्यमान [इंद्रा], ही जिकडे तिकडे तुझीच संपत्ति दृष्टीस पडत आहे. [तर] हे जयशाली इंद्रा, [ती तूं] गोळा करून घेऊन ये. तुझी आशा करणाऱ्या स्तोत्याची मनकामना अपूर्ण होऊं देऊं नको.

3. O wise Indra, O performer of many deeds, O brightest [Indra], thine [is] [ all ] this wealth [ that is] seen everywhere. Gather [it ] thence, and O defeater of enemies, and bring [ it ] hither. Mayest [thou] never fail the desire of [ thy ] praiser who yearns after thee.

---

३. 'हे इंद्रा, या भुवनांत जी जी म्हणून संपत्ति आमच्या दृष्टीस पडते ती ती सर्व तुझीच आहे, ती सर्व तूं आणून आम्हांस दे. आम्हांसारिखे जे तुझे तत्पर स्तोते त्यांची मनकामना पूर्ण केल्याशिवाय राहूं नकोस. संपत्ति आणून आम्हांस देण्यास तुला कोणतीहि अडचण पडणार नाहीं, कारण कीं पाहिजे तो शत्रु आला तरी त्याचा तूं पराभव करणारा आहेस.'

'प्रज्ञावान्'=' शचीवान्,' हा शब्द ध्यानांत ठेवावा. कारण कीं, 'शची' याचा मुळचा अर्थ 'प्रज्ञा' म्हणजे 'बुद्धि' इतकाच होता; आणि 'शचीवान्' म्हणजे 'शची ज्याला आहे तो' म्हणजे 'बुद्धि' अथवा 'प्रज्ञा' ज्याला आहे तो, असा होत असे. 'शची ही स्त्री ज्याला आहे तो,' असा होत नसे. हा मूळ अर्थ, विस्मृतीनें म्हणा अथवा चुकीनें किंवा रमणीय कथा रचण्याच्या इच्छेनें म्हणा, मागाहून एक बाजूस राहिला आणि 'शची' ही इंद्राची स्त्री होय अशी कथा रचिली गेली.

'पराक्रमशाली'='पुरुकृत्.' अक्षरशः अर्थ पुष्कळ [ कृत्यें ] करणारा. म्हणजे वृत्रवधादि जे मोठे मोठे पराक्रम ते करणारा.

'ही जिकडे तिकडे तुझीच संपत्ति दृष्टीस पडत आहे'= 'तव इत् इदं वसु अभितः चेकिते.' म्हणजे जी जी म्हणून संपत्ति आपल्या दृष्टीस पडते, मग ती मनुष्याजवळ असो, शेतामध्यें असो, किंवा खाणींत असो, ती सर्व तुझीच आहे.

'जयशाली इंद्रा'=' अभिभूते.' म्हणजे शत्रूंचा पराजय करणारा, कोणतीहि अडचण आली तरी ती दूर करणारा. हें येथें हेतुगर्भ विशेषण आहे. हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटला तर वंशस्थ श्लोकाप्रमाणें सहज बसतोः—

शचीवः इन्द्र पुरुकृद् द्युमत्तम ।
तवेदिदमभितश्चेकिते वसु ।
अतः संगृभ्य अभिभूत आभर ।
मा त्वायतो जरितुः काममूनयीः ॥

एभिर्द्युभिः सुमना एभिरिन्दुभिर्निरुन्धानो अमतिं गोभिरश्विना ।
इन्द्रेण दस्युं दरयन्त इन्दुभिर्युतद्वेषसः समिषा रभेमहि ॥ ४ ॥

एभिः । द्युऽभिः । सुऽमनाः । एभिः । इन्दुऽभिः । निऽरुन्धानः । अमतिम् । गोभिः । अश्विना ।
इन्द्रेण । दस्युम् । दरयन्तः । इन्दुऽभिः । युतऽद्वेषसः । सम् । इषा । रभेमहि ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

४. [ हे इन्द्र ], एभिर्द्युभिः (=एतैर्दीप्तैः) एभिः इन्दुभिः (=एतैः सोमैः) एतैः (=पुरोवर्तिभिरस्माभिरर्प्यमाणैः सोमैः) सुमनाः ( =प्रसन्नो ) [ भूत्वा ] [ त्वं ] गोभिः (=पशुभिः=पशुदानेन ) अश्विना (=अश्वयुक्तेन धनेन=अश्वयुक्तधनस्य दानेन ) अमतिं (=दारिद्र्यं ) निरुन्धानः (=निवर्तयन्=परिहरन्) [भव ] । [ हे ऋत्विक्समूह], इन्दुभिः (=सोमैः=सोमानर्पयित्वा ) इन्द्रेण [ सहायेन ] दस्युं (=शत्रुं ) दरयन्तः (=हिंसन्तो ) [ वयं ) युतद्वेषसः (=पृथक्कृतशत्रवः निःशत्रवः) [ सन्तः ] इषा (=अन्नेन ) संरभेमहि (=संगच्छेमहि ) ॥

दीप्तिमतो यान्सोमान् वयमर्पयामस्तान् पीत्वा इन्द्रः प्रसन्नो भविष्यति अपि च अस्माकं शत्रुहननाय साहाय्यं करिष्यति येन वयं निःशत्रवः कृता अन्नसंपन्ना भवेमेत्यर्थः ॥ एभिरित्यस्य द्विरुक्तिरादरार्थेत्यनुसंधेयम् ॥

४. [हे इंद्रा], या देदीप्यमान, या [आमच्या देदीप्यमान] सोमरसांनीं [तूं] प्रसन्न [होऊन] गुरांच्या योगानें [आणि] घोड्यांच्या योगानें [आमचें] दारिद्र नष्ट करणारा [हो]. सोमरसांनीं इंद्राचें साहाय्य मिळवून [आम्ही] शत्रूला मारून निःशत्रु होऊं आणि अन्नसंपन्न होऊं असें घडो.

4. Pleased with these sparkling, with these [sparkling] Somas [be thou] [O Indra] an averter of [our] poverty by [the grant of] cows [and] horses. Destroying the enemy with [the help of] Indra through [our] Somas, [and] made free from enemies, may we obtain food.

---

४. या मंत्राच्या प्रथमार्धांत ऋषि इंद्रास म्हणतो कीं, 'हे इंद्रा, हे जे लखलखणारे सोमरस आम्ही तुला अर्पण करीत आहोंत ते पिऊन तूं प्रसन्न हो, आणि आम्हांस गुरें ढोरें आणि घोडे देऊन आमचें दारिद्र नाहींसें करणारा हो;' आणि उत्तरार्धांत ऋषि जवळ असलेल्या मित्रांस म्हणतो कीं 'आमचे सोमरस पिऊन प्रसन्न झालेला जो इंद्र, त्याच्या साहाय्यानें आम्ही आपले शत्रु मारून टाकूं आणि तसें करून निःशत्रु होऊन मग अन्नादिसंपत्तियुक्त होऊं ही आमची प्रार्थना इंद्र पूर्ण करो.'

'या देदीप्यमान, या आमच्या देदीप्यमान सोमरसांनीं '=' एभिः द्युभिः.' 'एभिः इन्दुभिः' हे शब्द कठिण नाहींत तरी 'द्युभिः' हें पद संदिग्ध आहे त्याचा नेहमीचा अर्थ ' दिवसीं,' ' दिवसांनीं' असा आहे. ' देदीप्यमान ' ( म्हणजे ' लखलखणारे') हा अर्थ आम्हीं सायणानुसार केला आहे. या सगळ्या वाक्याचा अर्थ कितीएक पाश्चिमात्य पंडित 'या दिवसीं आणि रात्रीं' असा करितात पण तसें केल्यानें ' या.' याचा निर्वाह चांगला होत नाहीं, आणि ' इन्दु ' शब्दाचा अर्थ ' रात्र ' असा (किंवा चन्द्र असाहि ) वेदांत आढळत नाहीं असें आम्हांस वाटतें.

' घोड्याच्या योगानें '=' अश्विना.' अक्षरशः 'घोडे ज्यांत आहेत अशा संपत्तीनें. 'अश्विन् ' शब्दाचा हा अर्थ ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. तो त्याचा मूळ अर्थ आहे. त्यावरून ' अश्वी ' हें एका देवद्वयाचें नांव पडलें, कारण कीं त्यांस घोडे असतात व ते घोडेसवार देव होत.

' सोमरसांनीं इंद्राचें साहाय्य मिळवून '=' इन्द्रेण इन्दुभिः.' अक्षरशः अर्थ ' सोमांनीं इंद्राचें.' म्हणजे, ' सोम अर्पण करून इंद्राचे द्वारें.'

यांत असलेली नम्र प्रार्थना ध्यानांत

**समिन्द्र राया समिषा रभेमहि सं वाजेभिः पुरुश्चन्द्रैरभिद्युभिः ।**
**सं देव्या प्रमत्या वीरशुष्मया गोअग्रयाश्वावत्या रभेमहि॥५॥१९॥**

सम् । इन्द्र । राया । सम् । इषा । रभेमहि । सम् । वाजेभिः । पुरुऽच-न्द्रैः । अभिद्युऽभिः ।
सम् । देव्या । प्रऽमत्या । वीरऽशुष्मया । गोऽअग्रया । अश्वऽवत्या । रभेमहि ॥ ५ ॥ १९ ॥

## भाष्यम्.

५. हे इन्द्र; [वयं] राया (=संपदा) सं[रभेमहि] (=संगच्छेमहि), इषा (=अन्नेन) संरभेमहि (=संगच्छेमहि) [तथा] पुरुश्चन्द्रैः (=अतिशयेन आह्लादकैः) अभिद्युभिः (=अभितो दीप्यमानैः=विशेषेण सुन्दरैः) वाजेभिः (=वाजैः=अश्वैः) सं[रभेमहि] (=संगच्छेमहि) । [अपि च] वीरशुष्मया (=वीराः शूरपुत्रा एव शुष्मं बलं यस्याः सा तया), गोअग्रया (=गावः अग्रे यस्याः सा तया=गोसंपन्नया) अश्वावत्या (=अश्वसंपन्नया) देव्या (=देवसंबन्धिन्या) प्रमत्या (=प्रकृष्टबुद्ध्या=अनुग्राहबुद्ध्या) संरभेमहि (=संगच्छेमहि) ॥
तव प्रसादेन एतत्सर्वं वयं लभेमहीत्यर्थः

---

देवावी. त्यांत 'आम्ही आपल्या शापानें शत्रूस जाळून भस्म करूं, किंवा तपोबळानें अन्न संपादन करूं' असें ऋषि म्हणत नाहींत. तपानें पाहिजे तें करण्याची शक्ति आपल्या साध्या आर्य पूर्वजांस नव्हती, आणि ते विनाकारण आणि निष्फल प्रयासयुक्त असें तप करीत, असेंहि दिसून येत नाहीं. यःकश्चित् शत्रूचा नाश होणें इष्ट असल्यासहि ते इंद्राच्याच साहाय्याची अपेक्षा करीत असत. आणि गुरें, ढोरें, घोडे, चाकर इत्यादि मिळवून संसार करून राहत, आणि प्रसंग पडला म्हणजे शत्रूबरोबर लढत. वेदांत जें काय खरोखर सौंदर्य आहे त्यांत, आणि वेदांत काय भरलें आहे म्हणून सर्व लोकांची समजूत होऊन गेली आहे त्यांत, किती अंतर आहे पहा.

५. हे इंद्रा, आम्हीं संपत्तिमान् [व्हावें], अन्नसंपन्न व्हावें [आणि] परम आल्हादकारक [आणि] सुंदर अश्वांनीं [युक्त व्हावें] असें कर. [आणि] वीरप्रतापयुक्त, गोधनेंकरून श्रेष्ठ, [आणि] अश्वसंपूर्ण [अशी जी तुझी] दिव्य कृपा तत्संपन्न आम्हीं व्हावें असें कर.

...am [that] divine grace [which is] full of the strength of valorous sons, full of cattle [and] full of horses.

## HYMN 54.

To *Indra*. By *Savya* (author of the previous hymn). Metre—*Jagati*, except 6, 8, 9, and 11.

---

५. हा मंत्र जसा सोपा आहे, तसाच तो सुंदर आहे. त्यावरून एक गोष्ट सिद्ध होते कीं, आपले आर्य पूर्वज आतां आम्ही वागतों त्याहून अन्य रीतीनें वागत. ते शूर पुत्र आणि सुंदर आणि बळकट असे घोडे आपणास मिळोत अशी नित्य प्रार्थना करीत. कारण कीं या दोनी वस्तूंची त्यांस फार अवश्यकता असे. ते आम्हांसारिखी भिक्षुकी आणि कारकुनी करून राहत नसत. त्यांच्या आसपास जे कोळी, घोंड, इत्यादि अनार्य लोक राहत असत त्यांजशीं व दुसऱ्या शत्रूंशीं युद्ध करण्याचा प्रसंग त्यांस नित्य येत असे. आणि त्या वेळीं शूर पुत्र आणि बळकट घोडे फारच उपयोगीं पडत. पुरातन ऋषि जर दरींत आणि गुहेंत वाघांसारि- ... राहून नित्य तपच करीत बसत आणि या योगानें सर्व सिद्ध करीत हें खरें होऊं तर आम्हांस गुरें, सुंदर घोडे ... शूर पुत्र द्या, असें त्यांणीं कां प्रार्थिलें असतें ?

'वीरप्रतापयुक्त' म्हणजे 'वीर' (=शूर पुत्र) हाच जो प्रताप अथवा पराक्रम करण्याची शक्ति ती आहे जींत. दिव्य (देवांची) कृपा झाली म्हणजे शूर पुत्र, गुरें ढोरें, आणि घोडे हे पाहिजे तितके प्राप्त होतात असा भावार्थ आहे. अजून तरी कोणत्याहि देशाची झाली तरी खरी दौलत म्हटली म्हणजे शूर पुत्र हीच होय यांत संशय नाहीं. आणि आंमीं शौर्य असणें हें ईश्वरी कृपेचें चिन्ह आहे असें मानितात तें अगदी खरें आहे.

...ा ते सोमासो वृत्रहत्येषु सत्पते ।
...ष्मते नि सहस्राणि बर्हयः ॥ ६ ॥

...नै । वृष्ण्या । ते । सोमासः । वृ-
त्रऽहत्येषु । सत्ऽपते ।
यत् । कारवे । दश । वृत्राणि । अप्रति । बर्हिष्मते । नि । सहस्राणि । बर्हयः ॥ ६ ॥

---

भाष्यम्

६. हे सत्पते (=सतां पालक) ..., यद् (=यदा) [ त्वं ] कारवे (=स्तोत्रस्य कर्त्रे) बर्हिष्मते (=यज्ञाय वृक्तबर्हिः... यज्ञवते यजमानाय) [ च ] दशसहस्राणि (=एतदुपलक्षितानि असंख्यात... त्राणि (=शत्रून्) अप्रति (=शत्रुभिः अप्रतिगतं यथा तथा) निबर्हयः (=नि अ... :=अवधीः), [ तदा ] वृत्रहत्येषु (=तेषु तेषु शत्रुहननेषु) ते मदाः (=तत्तत्स्तोतृय...मानैरर्पिता) मदाः (=मादकाः पेयरसाः) [तथा] तानि वृष्ण्यानि (=तत्तत्स्तोतृ...जमानैरर्पितानि वीर्यकारकाणि चरुपुरोडाशादीनि) [ तथा ] ते सोमासः (=तत्तत्स्तोतृयजमानैरर्पिताः सोमास्) त्वा (=त्वाम्) अमदन् (=हर्षं प्रापयन्) ॥

यदा यदा इन्द्रः स्वोपासकानां शत्रून् हन्ति तदा तदा तैरुपासकैः समर्पितान् सोमान् चरुपुरोडाशादीनि च अन्नानि भक्षयित्वा हृष्टः सन्नेव हन्ति, तस्मात् अत्र... नाभ्यागत्य अस्माकं सोमादीनि भक्षयितुमर्हतीत्यर्थः ॥

१. हे सज्जनांच्या पालका [इंद्रा], तूं जेव्हां जेव्हां स्तोत्यासाठीं [आणि] यज्ञकर्त्या उपासकासाठीं, दशसहस्रावधि अनिवार [illegible] आहेस, [तेव्हां] [त्या त्या] शत्रुहननाच्या प्रसंगीं त्या त्या उपासकांनीं अर्पिलेल्या मादक [पेयां]नीं, आणि बळकटी आणणाऱ्या [हवींनीं] [आणि] सोमरसांनीं तुला हर्ष होत होता.

HYMN 54.

To *Indra*. By *Savya* (author of the previous hymn). Metre—*Jagatī*, except 6, 8, 9, and 11.

[...] for [ thy ] praiser [ and ] for [ thy ] sacrificer, those exhilarators, those invigorators, those Somas have delighted thee.

---

१. या ऋचेचा भावार्थ असा आहे कीं, 'इंद्रानें आजपर्यंत आपल्या उपासकांसाठीं असंख्य शत्रु मारून टाकिले आहेत, पण त्या त्या सर्व प्रसंगीं त्या त्या उपासकांनीं अर्पण केलेले जे सोम आणि जीं इंद्रास बळकटी आणणारीं हविरन्नें, तीं भक्षून इंद्र संतुष्ट होत असे, आणि शत्रु हनन करीत असे. तर आजहि त्याणें येऊन आमचा हा सोम, आणि आमचीं हीं हविरन्नें भक्षून संतुष्ट व्हावें.'

'सज्जनपालका'=' सत्पते.' 'सत्पति' हा शब्द ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आला आहे. तो बहुतकरून इंद्रादि देवांचें आणि राजांचें विशेषण असतें. याचा अर्थ सायणाचार्य सज्जनांचा पालक असा करितात. दुसरे कितीएक विद्वान् 'बलवान् प्रभु' असा करितात कारण कीं त्यांच्या मतें 'सत्' या शब्दाचा सज्जन [...] असा अर्थ वैदिक ग्रंथां- होऊं लागला नव्हता आणि सू. ११.१ यांतहि आम्हीं तोच अर्थ घेतला आहे. परंतु हा अर्थ जरी अक्षरशः संभवतो तरी 'सत्पति' शब्द ज्यांत आला आहे तीं सर्व स्थलें पुनः आणखी एकदा विचारपूर्वक शोधून पाहतां सायणाचार्यांनींच दिलेला अर्थ घेण्यास योग्य आहे असें आम्हांस वाटतें.

'दशसहस्रावधि शत्रु'=' दशसहस्राणि वृत्राणि.' अक्षरशः अर्थ 'दहा हजार शत्रु.' हें अपरिमितार्थीं परिमितार्थवचन आहे.

'अनिवार'=' अप्रति.' म्हणजे मारतांना इंद्राला कोणींहि प्रतिबंध करूं न शके अशा रीतीनें. ज्या शत्रूंस इंद्रानें मारिलें त्यांजकडून इंद्राला कांहीं प्रतिबंध करवला नाहीं.

'त्या त्या उपासकांनीं अर्पिलेल्या मादक [पेयां]नीं आणि बळकटी आण-

ा तेजिष्ठयातिथिग्वस्य वर्तनी ।
ण्यं नानुदः परिषूता ऋजिश्वना ॥ ८॥

नै । वधीः । तेजिष्ठया । अतिथिऽग्वस्य ।

सम् । इदम् । हंसि । आज...

नम्यां । यत् । इन्द्र । सख्यां । पराऽवतिं । निऽबर्हयः । नमुचिम् ।
नाम । मायिनम् ॥ ७ ॥

---

भाष्यम्.

७. हे इन्द्र, यद् (=यदा) [ त्वं ] सख्या नम्या (=नमीनाम्ना तव मित्रभूतेन केनचिद् ऋषिणा सह ) नमुचिं नाम मायिनं (=नमुचिनामानं कंचित् मायाविनम् असुरं ) परावति निबर्हयः (=दूरदेशे नितराम् अहिंसीः=निहत्य दूरदेशे प्रक्षिप्तवानसि ), [ तदा ] धृष्णुया ( =धैर्ययुक्तस्त्वं ) [ त्वं ] युधा युधं (=युद्धेन संबद्धं युद्धं=युद्धाद्युद्धं=नैरन्तर्येण बहूनि युद्धानि ) उप घ इत् एषि (=उपैव गच्छसि=तानि प्रति उपगतवानेवासि ), [ तथा ] ओजसा (=तव बलेन ) [ तेन ] पुरा पुरं (=नगरेण ) [ संबद्धम् ] इदं पुरं (=एकस्मान्नगरात् अनन्तरं अन्यत् नगरम् ) [ एवंप्रकारेण तस्य नगराणि ] संहंसि (=सर्वाण्यपि विनाशितवानसि ) ॥

यदा इन्द्रः स्वोपासकस्य नमीनाम्न ऋषे रक्षणार्थं नमुचिनामानम् असुरं हतवान् तदा तेन नमुचिना सह एकस्माद्युद्धात् अनन्तरम् अन्यद्युद्धम् एवंप्रकारेण अनेकानि युद्धानि चकार, तथा एकस्मान्नगराद् अनन्तरम् अन्यन्नगरम् एवंप्रकारेण नमुचेः सर्वाण्यपि नगराणि हतवानित्यर्थः ॥

---

णाऱ्या हवींनीं आणि सोमरसांनीं' =' ते मदाः तानि वृष्ण्या ते सोमासः.' अक्षरशः अर्थ ' ते मादक [रस], तीं बळकटी आणणारीं, ते सोम.' म्हणजे, जे हर्षकारक पीण्याचे पदार्थ, जीं बळकटी आणणारीं हविरन्नें आणि जे सोम त्या त्या उपासकांनीं अर्पण केले ते. येथें सांगितलेले मादक पीण्याचे पदार्थ आणि पुढें सांगितलेले सोमरस हे एकच आहेत असें दिसतें, आदरासाठीं दोन शब्द घातले आहेत.

वृत्ताला जमण्यासाठीं या ऋचेच्या संहितेंत ' वृत्राणि अप्रति ' असा उच्चार केला पाहिजे.

...या परमतेजस्वी ...लास, तूं वंगृ- ...रें ऋजिश्व्यानें वे- ... ता] युद्धा-मागें युद्धाला धांवलास [ आणि ] [ आपल्या ] प्रतापानें [त्या] नगरामागून हें नगर [ अशा रीतीनें त्याचीं नगरें ] विध्वंसिता झालास.

To *Indra.* By *Savya* (author of the previous hymn). Metre—*Jagati*, except 6, 8, 9, and 11 ...

...didst thou run to fight after fight [ and ] with [ thy ] power didst thou destroy [his] cities one after another.

७. भावार्थः—' नमी' या नांवाच्या कोणा एकास रक्षण्यासाठीं जेव्हां इंद्रानें 'नमुचि' या नांवाच्या शत्रूस मारिलें, तेव्हां इंद्रानें त्याजबरोबर एकामागून एक अशीं अनेक युद्धें केलीं, आणि एकामागून एक अशा प्रकारें त्याचीं सर्व नगरें मोडून टाकिलीं.

'तुझा सखा नमी याच्या साहाय्यानें'=' नम्या सख्या.' सायणाचार्य 'तुझा मित्र असें जें वज्र त्याच्या योगानें' असा अर्थ करितात. परंतु नमी हें एका उपासकाचें नांव आहे आणि त्याला रक्षण्यासाठीं इंद्रानें नमुचि असुरास मारिलें असें ऋ. ६. २०. ६; १०. ४८. ९ यांत सांगितलें आहे तें पाहा. या ठिकाणीं आम्हीं केलेला अर्थ अगदी स्पष्ट असतां 'नमी' याची व्युत्पत्ति दुसरीच करून आचार्य वेगळा अर्थ कां करितात...

'धृष्णुवान् [असा जो तूं ]'=' धृष्णु-...' ... मं. ५ यांजवरील टीप पाहा.

'[ त्या ] नगरामागून हें नगर अशा रीतीनें त्याचीं नगरें विध्वंसिता झालास'='पुरा पुरं, समिदं हंसि.' अक्षरशः अर्थ '[ त्या] नगराबरोबर हें नगर विध्वंसितोस;' म्हणजे, एकामागून एक सर्व नगरें विध्वंसिता झालास. यांत 'पुर' शब्द सायणाचार्यांस योग्य वाटल्यावरून त्यांनीं नपुंसकलिंगीं घेतला आहे. तसा घेतला तरच 'इदम्' याचा निर्वाह होतो. 'विध्वंसितोस' हा वर्तमानकाळ 'विध्वंसिता झालास' या भूतकाळाच्या अर्थी योजिलेला आहे. याचप्रमाणें पूर्वीं झालेला कांहीं इतिहास वर्णावयाचा असला म्हणजे भूतार्थीं वर्तमान योजण्याची चाल सर्व भाषांमध्यें आहे. त्याप्रमाणें मराठींतहि पुष्कळ उदाहरणें आहेत; जसें,

शिवशिव हरहर ऐसें
बोलुनि सात्यकि म्हणे अगा रामा।
धर्मासि दोष लाविसि
तरि सोडिल विष्णुच्या अगारा मा.

यांत 'म्हणे' हा म्हणतो या अर्थानें

... सुश्रवसोपजग्मुषः ।
... नि चक्रेण रथ्या दुष्पदावृणक् ॥९।
... वः । दश । अबन्धुना । सुऽश्रवसा ।

वर्तनी ।

त्वम् । शता । वङ्गृदस्य । अभिनत् । पुरः । अनानुऽदः । परिऽसूताः ।

ऋजिश्वना ॥ ८ ॥

---

## भाष्यम्.

८. [हे इन्द्र], त्वम् अतिथिग्वस्य (एतन्नामकस्य राज्ञः) तेजिष्ठया (=अतिशयेन तेजस्विन्या) वर्तनी (=वर्तन्या=चक्रेण) करञ्जम् (=एतन्नामानं कंचित्) उत (=अपि च) पर्णयम् (=एतन्नामानं कंचित्) वधीः (=अवधीः=हतवानसि) । त्वम् ऋजिश्वना (=एतत्संज्ञकेन राज्ञा) परिषूताः (=परितोवष्टब्धाः) वङ्गृदस्य (एतन्नामकस्य कस्यचिद् असुरस्य) शता (=शतानि=शतसंख्याकाः) पुरः (=नगरीः) अभिनत् (=छिन्नवानसि) ॥

---

वर्तमान, 'म्हणाला' या भूतार्थी योजिलेला आहे.

'नमुचि' हें इंद्रानें मारिलेल्या एका असुराचें नांव आहे. नमुचि हा असुर म्हणजे मेघोदकांची वृष्टि न होऊं देणारा, रूपकसिद्ध मेघरूप वृत्र तोच होय, असें सांगितलें आहे.

६. तूं सहायरहित सुश्रवसानें ज्यांजवर घाला घातला होता [अशा] त्या वीस राजांस [आणि] [ त्यांच्या ] साठ हजार नव्याण्णव [ सैन्यासहि ] ... विध्वंसिता झालास.

# HYMN 54.

To *Indra.* By *Savya* (author of the previous hymn). Metre—*Jagatî*, except 6, 8, 9, and 11.

...akest the hundred cities of Vangrida. [which had been] besieged by Rajisvâ.

---

८. वरच्या मंत्रांत इंद्रानें आपल्या उपासकांसाठीं असंख्य शत्रु मारिले असें सांगितलें. या मंत्रांत त्याचीं कितीएक उदाहरणें सांगतो;– ‘अतिथिग्वासाठीं ‘करंज’ आणि ‘पर्णय’ हे शत्रु मारिले, आणि ‘ऋजिश्वा’ या नांवाच्या उपासकासाठीं ‘वङ्गृद’ या नांवाच्या शत्रूचीं शेकडो नगरें फोडून टाकिलीं’; आणि हे पराक्रम करितांना इंद्राच्या साहाय्यास कोणी नव्हतें. म्हणजे, ‘करंज’ आणि ‘पर्णय’ यांजबरोबर ‘अतिथिग्व’ लढत असतां त्याच्या चक्रानें ते शत्रु मरत असें इंद्रानें केलें; आणि ‘ऋजिश्वा’ याणें वंगृदाच्या शहरांस वेढा घातला होता, पण त्यांचा नाश त्याच्यानें करवला नव्हता तो इंद्रानें करविला.

‘करंज’ आणि ‘पर्णय’ आणि ‘वंगृद’ हे कोण होते, आणि त्यांचा इतिहास काय आहे तें ठाऊक नाहीं. सायणाचार्य ते असुर होते इतकेंच म्हणतात.

‘अतिथिग्व’ याविषयीं सू. ५१ मं. ६ यांजवर दिलेली टीप पाहा.

‘शंभर नगरें.’ म्हणजे ‘पुष्कळ नगरें,’ ‘शेकडो.’ अपरिमितार्थी परि-

...तार्थवचन. इंद्रानें नगरें फोडिलीं ...ांत समजण्यास विशेष कठिण कांहीं ...ाहीं. नगरें फोडिलीं म्हणजे इंद्राच्या ...बंधानें पाहिलें असतां, अभ्ररूपी नगरें ...ोडिलीं असें बहुतकरून तात्पर्य असतें. ...सऱ्या कोणाच्या संबंधानें पाहिलें असतां ...ूने किल्ले ‘फोडिले अथवा हस्तगत ...रून घेतले असा भावार्थ असतो. शिवाजी छत्रपति राजाविषयीं जर आलीकडील कोणी ऋषि सूक्त रचील तर शिवाजीनें विजयपुरस्थ शत्रूचीं ( विजापूरच्या बादशहाचीं) नगरें फोडिलीं अथवा शिवाजी छत्रपतीसाठीं विजयपुरस्थ शत्रूचीं शेकडो नगरें भवानीनें फोडिलीं असें वर्णन केलें तर वेदसूक्ताप्रमाणें वर्णन केल्यासारिखें होईल.

‘सहायाविना’ = ‘अनानुदः’ याचा अक्षरशः अर्थ करणें थोडें कठिण आहे. ‘अनुदः’ म्हणजे दुसऱ्याप्रमाणें देणारा,’ ‘दुसऱ्याप्रमाणें दाता,’ तो ज्याला नाहीं तो ‘अनानुद;’ म्हणजे ‘इंद्रासारिखा दाता कोणी नाहीं’. असा जरी मूळ अर्थ आहे, तरी ‘इंद्रासारिखा दुसरा कोणी नाहीं,’ ‘अद्वितीय’ किंवा ‘असहाय’ अ-

...........श्रवसनस्य मूर्धनि ।
..............रोरुवद्वना ।
..............नेईणावता ।
..............कस्तुआ परि ।

[illegible] मा-रून टाकिता झालास, [आणि ते-णेंकरून] प्रख्यात [झालास].

[illegible] unaided Sus'ravas, [and] their] sixty thousand and [n]inty, nine [ men ] [ and ] [b]ecamest ] renowned.

## Hymn 54.

[T]o *Indra.* By *Savya* (author of the previous hymn). Metre—*Jagati*, except 6, 8, 9, and 11. [illegible]

९. आठव्या मंत्रांत सांगितली त्या-शिवाय इंद्रानें उपासकांच्या शत्रूंचा वध केला याचीं आणखी उदाहरणें या मंत्रांत सांगतो;–'सुश्रवस् या नांवाचा कोणीएक उपासक आपल्या बलाढ्य वीस शत्रूंबरोबर लढावयास गेला असतां, त्याचें साहाय्य करण्यास कोणीहि नव्हता; तेव्हां इंद्रानें त्याचें साहाय्य केलें, आणि प्रखर चक्र घेऊन ते वीसहि शत्रु आणि त्यांचें असंख्य सैन्य मारून टाकिलें.'

'सुश्रवसानें.' हा 'सुश्रवस्' कोण होता आणि याचे वीस शत्रु कोण याविषयीं आम्हीं इतिहास ठाऊक नाहीं, निदान [illegible]वेदांत तरी सांपडत नाहीं.

'साठ हजार नव्याण्णव [सैन्यास]'= '[illegible] [illegible]ला नवतिं नव.' ही संख्या [illegible] असलेल्या सैन्याची नसावी, [illegible] परिमितार्थसंख्यावचन [illegible] आहे असें दिसतें. असंख्य इत-[illegible] तात्पर्य.

[illegible] = 'चक्रेण रथ्या.' र-[illegible] युद्ध करणें, आणि [illegible]म्हणून जें अस्त्र आहे तेणेंकरून युद्ध करणें, हें एकत्र आहे कीं काय नकळे. तरीहि 'नि अवृणक्' (अक्षरशः का-[illegible] टाकिता झालास) याचा प्रयोग केला आहे, त्यावरून एकच असावें असें [दिस]तें. परंतु मग 'रथ्य' हें विशेषण [का] लाविलें आहे तें समजत नाहीं. व[र] आठव्या मंत्रांत जें 'वर्तनि' शब्दानें च[क्र] सांगितलें आहे तें आणि या मंत्रां-ती[ल] चक्र एकत्र आहे असें दिसतें, आणि त्याल[ा] 'तेजिष्ठ' (=परमतेजस्वी) असें विशेष[ण] लाविलें आहे तें त्याच्या धारेच्या संबंधानें आहे.

'[ आणि तेणेंकरून ] प्रख्यात [झा-लास]'='श्रुतः.' अक्षरशः अर्थ 'प्रख्यात' इतकाच आहे. सायणाचार्य 'प्रख्यात असा जो तूं तो' असें गुणविशेषण करितात; परंतु अशा गुणविशेषणाचें येथें प्रयोजन नसल्यामुळें आम्हीं विधि-विशेषणाच्या भावार्थानें भाषांतर केलें आहे

इन्द्र । तूर्वयाणम् ।

त्वम् । अस्मै । कुत्सम् । अतिथिऽग्वम् । आयुम् । महे । राज्ञे । यूने ।
अरन्धनायः ॥ १० ॥

---

## भाष्यम्.

१०. हे इन्द्र, त्वं सुश्रवसम् (=एतन्नामानं पूर्वोक्तं राजानं) तव ऊतिभिः (=पालनैः) आविथ (=ररक्षिथ) [तथा] त्व त्रामभिः (=त्वदीयैः संरक्षणैः) तूर्वयाणम् (=एतन्नामानं राजानं=दिवोदासम् ?) [आविथ], त्वं कुत्सम्, अतिथिग्वं [तथा] आयुम् (=एतांस्त्रीन् राज्ञः) अस्मै महे (=महते) यूने राज्ञे (=दिवोदासाय ?) अरन्धनायः (=तस्य वशमानयः)

............श्वसनस्य मूर्धनि ।
..............रोरुवद्वना ।
..............बर्हणावता ।
..............कस्तुआ परि ।

... मोठ्या तरूण राजाच्या हस्तगत करून दिलेंस.

## HYMN 54.

To *Indra*. By *Savya* (author of the previous hymn). Metre—*Jagati*, except 6, 8, 9, and 11 ...

...pports. Thou subjectedst Kutsa, Atithigva, [and] Ayu to that great youthful king.

१०. आणखीहि पुढें उदाहरणें सांगतो:– ' सुश्रवसाचे शत्रु मारून सुश्रवसाला रक्षिलें; तूर्वयाणाचे शत्रु मारून तूर्वयाणाला रक्षिलें; आणि कुत्स, अतिथिग्व, आणि आयु यांस हस्तगत करून घेऊन ते ज्या तरुण आणि मोठ्या इंद्रोपासक राजाला (तूर्वयाणाला=दिवोदासाला?) उपद्रव देत, त्याच्या अमलाखालीं आणिलें.' यांपैकीं सुश्रवसाविषयीं वरच्या मंत्रांत एकदा सांगितलेंच आहे.

' तूर्वयाण ' याविषयीं कांहीं इतिहास ठाऊक नाहीं. मात्र ऋ. ६. १८. १३ यांत ' तूर्वयाण ' म्हणजे दिवोदास असें सायणाचार्य म्हणतात.

'कुत्स' आणि 'अतिथिग्वं' हे कोण आहेत याविषयीं ऋ. १. ५१. ६ यावरील टीप पाहा.

' आयु ' हें एका मनुष्याचें नांव आहे. त्याविषयीं इतिहास कांहीं ठाऊक नाहीं. मात्र 'कुत्स,' ' अतिथिग्व ' आणि ' आयु ' या तिघांस इंद्रानें जिंकिलें असें ऋग्वेदांत एक दोन ठिकाणीं सांगितलें आहे. (ऋ. २. १४. ७; ६. १८. १३ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पाहा ).

' तरुण राजाच्या. ' हा तरुण राजा कोण ?. सायणाचार्य 'सुश्रवस्' असें म्हणतात. परंतु या वाक्यांतील शब्दसाहचर्यावरून पाहातां ' तूर्वयाण ' असावा आणि ' तूर्वयाण ' म्हणजे दिवोदास होय असें सायणाचार्यांचें मत असल्याविषयीं वर सांगितलेंच आहे.

असाम ।

ताम् । स्तोषाम ... वयम् । अ... । द्राघीयः । आयुः । प्रऽतरम् ।
दधानाः ॥ १ ... ६ ॥

भाष्याम्.

११. [हे इन्द्र], ये वयम् उदृचि (=अस्मिन् यज्ञस्यान्ते) देवगोपाः (=देवैः संरक्षिताः) [देवानां च] सखायः (=मित्राणि [स्मः]) ते (=तादृशाः) [वयम्] [उत्तरमपि] शिवतमाः (=अतिशयेन कल्याणाः=अतिशयेन सुखिनः) असाम, (=स्याम), [तथा] त्वया (=तवानुग्रहेण) सुवीराः (=शोभनपुत्रवन्तः) [तथा] द्राघीयः (=अतिशयेन दीर्घम्) आयुः प्रतर (=प्रकर्षेण यथा तथा) दधानाः (=धारयन्तः) [सन्तः] त्वां स्तोषाम (=तव स्तुतिं करवाम) ॥

'ते' इत्यत्र निघातः 'असाम' इत्यत्र निघाताभावश्च व्यत्ययेन जातोऽस्तीत्यनुसन्धेयम् । अथवा हे इन्द्र, ये वयम् उदृचि यज्ञस्यान्ते देवगोपा देवरक्षितास्ते तव शिवतमाः सखायः सुखितमा मित्रा असाम अभूम ते वयं त्वां स्तोषामेति अनुसायणार्थं व्याख्यातव्यम् ॥

............श्वसनस्य मूर्धनि ।
..............रोरुवद्वना ।
..............बर्हणावता ।
..............कस्तुआ परि ।

[illegible] जगती.

१. हे मघवा, आम्हांस या दुःखांत, [या] युद्धांत [घालूं] नकोस; तुझ्या बळाचा अंत लागत नाहीं. [तूं] मोठी गर्जना करीत करीत नद्यांस [आणि] उदकांस गाजवितोस. [मग] भयानें लोक एकत्र जमल्याशिवाय कसे राहतील ?

## HYMN 54.

To *Indra.* By *Savya* (author of the previous hymn). Metre—*Jagatî*, except 6, 8, 9, and 11 where it is *Trishtubh.*

1. Do not, O Maghavan, [place] us in this, [in these] battles, [in this] distress. [There is] no end to find of thy strength. Rumbling didst thou make the rivers [and] the waters roar. How [then] should not the people collect together through fear?

वयम् उदर्के इत उत्तरे काले देवगोपाः देवरक्षिताः स्याम तथा देवानां शिवतमाः सुखितमाः सखायोपि स्याम=इत उत्तरं वयं देवरक्षितास्तथा देवानाम् अतिशयेन सुखितमाः सखायो भवाम ) असा अर्थ करावा.

वृत्रनियमांसाठीं ही ऋचा खालीं दाखविल्याप्रमाणें समजावयाची आहे:

य उदृचि इन्द्र देवगोपाः ।
सखायस्ते शिवतमा असाम ।
[illegible]आं स्तोमामं तुअया सुवीराः ।
द्रा[illegible] आयुः प्रतरं दधानाः ॥

१. हा मंत्र समजण्यास अशी कल्पना केली पाहिजे कीं, कांहीं युद्धसंकटाचा प्रसंग आला आहे[illegible] तो दूर व्हावा म्हणून [illegible] ऋषि म्हणतो कीं, 'हे इंद्रा, आम्हांस या संकटांत, या युद्धप्रसंगांत घालूं नकोस. आणि या संकटाचें निवारण करणें तुला [illegible] नाहीं, कारण कीं तुझें बळ अनंत आहे, आणि अनंत आहे हें वृत्र[illegible]च्या [illegible] तूं [illegible] करून दाखविलेंस, कारण कीं त्या वेळीं तूं महावृष्टि केलीस, आणि इतकी मोठी गर्जना केलीस कीं, सर्व म[illegible] तुष्यें भिऊन एकमेकाजवळ धांवलीं आणि एकत्र गोळा झालीं.

'मघवा.' हें इंद्राचें नांव आहे, त्याच अक्षरशः अर्थ धनवान् अथवा श्रीमा[illegible] असा आहे.

'अंत लागत नाहीं'='अन्तो न प[illegible] [illegible]'. अक्षरशः अर्थ, 'अंत लाग[illegible]

नाहीं,' म्हणजे, अंत लागावयाचा नाही. 'परीणशे' हें तुमर्थी 'परीणश्' याचें चतुर्थ्यंत रूप आहे.

[illegible] :.' अक्षरशः अर्थ, 'गाजविता झालास,' म्हणजे, जेव्हां वृत्रवध केला तेव्हां. इंद्र नित्य वृत्रवध करितो (प्रतिवर्षी मेघगर्जना करून वृष्टि पाडितो) म्हणून आम्हीं सायणांस अनुसरून वर्तमान काळीं अर्थ केला आहे.

'लोक'='क्षोणीः.' 'क्षोणी' शब्दाचा मूळ अर्थ पृथ्वी किंवा लोक असा आहे, त्यावरून पृथिवींत राहणारे जे जन म्हणजे मनुष्य ते, असा अर्थ सायणांनीं येथें केल्याप्रमाणें होतो; पण कित्येक पाश्चात्य विद्वान् येथें 'उदकप्रवाह' असा अर्थ विनाकारण कल्पितात. 'जन' हा अर्थ सायणाचार्यांनीं याच मंत्रांत केला आहे असें नाहीं, दुसऱ्याहि पुष्कळ मंत्रांत त्यांणीं तोच केला आहे. ऋः १०. २२. ९; १०. १७३. ७; ८. १३. १७ हे मंत्र आणि त्यांजवरील [illegible] भाष्य पाहा. जसा 'लोक' या शब्दाचा अर्थ प्रथम पृथिव्यादि लोक अथवा गोल असा असतां मागाहून जन अथवा मनुष्यें असा झाला, तसाच 'क्षोणी' याचाहि होणें अगदी स्वाभाविक आहे.

ही ऋचा वंशस्थ वृत्ताला थोड्याच फेरफारानें बसते:—

मा नो [illegible] घर्वन् पृत्सु अंहसि।
नहि ते अन्तः शवसः परीणशे।
अक्रन्दयो नद्यो रोरुवद् वना।

त्यांचें वृत्तीच्या [illegible] मिळतात; म्हणजे ह्रस्वदीर्घांचा विशेष फेरफार करावा लागत नाहीं. जसें,

............पृत्सु अंहसि।
............शवसः परीणशे।
............रोरुवद्वना
............भियसा समारत॥

यांत आणि आलीकडील वंशस्थ वृत्तांत कांहींच भेद नाहीं. याप्रमाणेंच पुढच्या ऋचेच्या पादांचे शेवट पाहिले तरी असेच जमतात. जसें:—

............किने शचीवते।
............महयन्नभि ष्टुहि।
............रोदसी उभे।
............वृषभो निऋञ्जते।

याप्रमाणेंच त्याच्या पुढचाहि मंत्र पाहिला तरी,

............शूषिअं वचः।
............धृषतो धृषन्मनः।
............बर्हणा कृतः।
......वृषभो रथो[illegible]।

त्याच्याहि पुढचा (४ था) मंत्र पहातां,

............सानु कोपयः।
............शम्बरं भिनत्।
............मन्दिना धृषत्।
............अशनिं पृतन्यसि।

पाहतांहि (५ वा मंत्र),

............श्वसनस्य मूर्धनि ।
...............रोरुवद्वना ।
...............बर्हणावता ।
...............कस्तुआ परि ।

[illegible] असें समजावयाचें कीं, वेदांत जें 'जगती' वृत्त आहे, त्यांत आणि आलीकडचें 'वंशस्थ' या नांवाचें प्रसिद्ध वृत्त यांत, ह्रस्वदीर्घांचा जो थोडथोडा भेद आढळतो तो पादांच्या शेवटीं शेवटीं अगदीं नाहींसाच होत जातो, आणि पादांच्या आरंभीं आरंभीं विशेष असतो. आलीकडील तरी अभंग, लावणी, कटाव, आणि पोवाडे हीं जीं साधारण लोकांचीं प्रसिद्ध आणि आवडतीं वृत्तें, तीं पाहूं गेल्यास त्यांच्या पादांच्या शेवटीं शेवटीं तीं सरळ म्हणतां येतात, पण आरंभीं आरंभीं जरा खडबडीत असतात. याचें कारण असें कीं कोणतेंहि वृत्त गातां गातां आरंभींचे शब्द जसे असे म्हटले तरी येतीं नाहीं, पादांत जसा सूर चांगला जमला पाहिजे. आपण आर्या म्हणूं लागलों म्हणजे पहिल्या पहिल्या शब्दांवरून लौकर लौकर धांवत जातों असे दिसतों, आणि प्रत्येक अर्धाच्या शेवटीं शेवटीं चांगली धाटणी काढून सुरानें म्हणत असतों. आतांच्या वेळीं जशी वेदांची प्रसिद्धि केवळ ब्राह्मणमुखांत आहे तशी पूर्वीं नव्हती; पूर्वीं वेदसूक्तें जिकडे तिकडे प्रेमानें गात असत, त्यामुळें आतां जशी अभंगादिक वृत्तांची स्थिति आहे तशी वेदांतील वृत्तांची पूर्वीं होती असें उघड दिसून येतें.

अर्चा शक्राय शाकिने शचीवते शृण्वन्तमिन्द्रं महयन्नभि ष्टुहि ।
यो धृष्णुना शवसा रोदसी उभे वृषा वृषत्वा वृषभो न्यृञ्जते ॥२॥

अर्च । शक्राय । शाकिने । शचीऽवते । शृण्वन्तम् । इन्द्रम् । महयन् । अभि । स्तुहि ।
यः । धृष्णुना । शवसा । रोदसी इति । उभे इति । वृषा । वृषऽत्वा । वृषभः । निऽऋञ्जते ॥ २ ॥

### भाषायाम्.

२. [ हे अध्वर्यो ], शाकिने (=शक्तियुक्ताय ) शचीवते ( =प्रज्ञावते ) शक्राय (=प्रबलायेन्द्रार्थं) अर्च ( =स्तोत्रं गाय ), शृण्वन्तं (=स्तोत्रं सावधानं शृण्वन्तम् इन्द्रं) महयन् (=पूजयन् ) [ त्वं ] [ तम् ] अभिस्तुहि ( =आभिमुख्येन स्तुहि ) । य [ इन्द्रो ] धृष्णुना (=धर्षकेण ) शवसा (=बलेन ) उभे रोदसी (=द्यावापृथिव्यौ ), वृषा (=सेचनसमर्थो=वीर्यवान् ) वृषभः (=कश्चित् तरुणो ) वृषत्वा (=वृषत्वेन= वीर्येण ) [ स्त्रियमिव ], निऋञ्जते (=न्यक्करोति=वशीकरोति ) ॥

२. शक्तिमान् [ आणि ] प्रज्ञावान् शक्राला गा. ऐकून घेणाऱ्या इंद्राला पूजून स्तव. जो [ इन्द्र ] [आपल्या] प्रखर बळानें, वीर्यवान् [व्यक्ति] [आपल्या] वीर्यानें [जेर करितो तसा], द्यू आणि पृथिवी [या] दोघींसहि जेर करितो.

2. Sing in honour of mighty [ and ] wise S'akra, worshippingly praise the audient Indra; who with [ his ] challenging power overpowers both Earth and Heaven, [as] a puissant hero with [ his ] puissance.

२. ऋषि आपल्याजवळ असलेल्या मित्रास, ( सायणाचार्यांप्रमाणें ) अध्वर्यूस, म्हणतो कीं, 'शक्तिमान् व बुद्धिमान् असा जो महाप्रबळ इन्द्र, त्याजकारणें स्तोत्र गा; इंद्राकारणें गाणें म्हणजे रानांत रडल्यासारिखें नाहीं. तो स्तोत्र ऐकून घेत असतो. तर मोठ्या संमानानें त्याच्या समोर उभा राहून त्याची स्तुति कर. तो बळी तर असा आहे कीं, जसा एकादा वीर्यवान् तरुण पुरुष आपल्या वीर्यानें एकादे स्त्रियेस जेर करून टाकितो तसा तो द्यावापृथ्वी या दोघींसहि आपल्या अतिप्रखर बळानें जेर करून टाकीत असतो.' यांतील उपमा ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. जसजसे आपण अतिप्राचीनकाळचे ( कोणत्याहि लोकांचे ) ग्रंथ पाहतों तसतशी वीर्यवान् वीरांची प्रशंसा अनेकरूपांनीं जिकडे तिकडे केलेली आढळते. जे गुण उत्तम पुरुषाच्या आंगीं आहेत अथवा असावेत असें लोकमनीत तेच अतिशयेंकरून देवांच्या आंगीं कल्पणें हें अगदी स्वाभाविक आणि यथार्थ आहे. त्यावरूनच वेदांत इंद्रादि देवांचें वर्णन आलें म्हणजे 'वीर्यवान्,' 'उत्तम वीर,' इत्यादि विशेषणें लाविलेलीं आढळतात.

'शक्राला'=' शक्राय. 'शक्र' याचा अर्थ 'प्रबळ' असा आहे, आणि तें विशेषण जरी आतां इन्द्राचेंच नांव होऊन गेलें आहे, तरी प्राचीन काळीं म्हणजे वेदांत इंद्राशिवाय दुसऱ्या देवांसहि 'प्रबळ' या अर्थी लाविलेलें आढळतें. (अश्वी या देवांस ऋ. २. ३९. ३ आणि १०. २४. ४ यांत आणि ऋ. १.१६६.१यांत मरुतांस लाविलेलें आहे.) तथापि बहुतकरून इंद्रासच लाविलेलें आंहे, त्यावरून वेदोत्तर संस्कृतांत 'शक्र' हें इंद्राचें नांव होऊन राहिलें आहे.

'गा'=' अर्च.' 'अर्च' धातूचे 'पूजणें,' आणि 'गाणें' असे दोनी अर्थ होतात. येथें आम्हांस योग्य वाटल्यावरून आम्हीं शेवटचा अर्थ घेतला आहे. 'गाणें' असा अर्थ असला म्हणजे ज्याच्या करितां गावयाचें तो चतुर्थ्यन्त असतो. ऋ. ५. ५९. १; ८. ४९. १; ८. ६९. ८; आणि ६. ४५. ४ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा.

अर्चा दिवे बृहते शूष्यं१ वचः स्वक्षत्रं यस्य धृषतो धृषन्मनः ।
बृहच्छ्रवा असुरो बर्हणा कृतः पुरो हरिभ्यां वृषभो रथो हि षः ॥३॥

अर्च । दिवे । बृहते । शूष्यम् । वचः । स्वऽक्षत्रम् । यस्य । धृषतः । धृषत् । मनः ।
बृहत्ऽश्रवाः । असुरः । बर्हणा । कृतः । पुरः । हरिऽभ्याम् । वृषभः । रथः । हि । सः ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. [हे स्तोतः], दिवे (=गुरुपत्वाद् देदीप्यमानाय) बृहते (=गुरुपत्वान्महते) [इन्द्राय] शूष्यं (=सुखकरं) वचः (=स्तोत्रम्) अर्च (=गाय) । यस्य धृषतः (=धैर्ययुक्तस्य) [इन्द्रस्य] धृषद् (=धैर्ययुक्तं) मनः (=स्वक्षत्रं) (=स्वभूतबलवद्) [अस्ति] । बृहच्छ्रवाः (=महाकीर्तिः) असुरः (=प्राणवान्) बर्हणा (=शत्रूणां निबर्हयिता=नाशयिता) हरिभ्याम् (=अश्वाभ्यां) पुरः कृतः (=पूजितः) वृषभः (=वीर्यवान्) स रथो हि (=रथो वर्तते खलु) ॥

अस्यामृचि 'कृतः पुरो हरिभ्यां वृषभो रथो हि सः' इत्येतद्वाक्यं नितरां दुर्बोधं स्थितस्य गतिश्चिन्तनमिति न्यायेन अस्माभिः सायणानुसारेणैव व्याख्यातम् । तथापि हरिभ्यां पुरः कृतः इत्यस्यार्थे रथो हि सः इत्यस्यार्थे च गरीयानेव संशयः ॥ बर्हणापदं तु कारणेति वत्प्रथमान्तम् ॥

'ऐकून घेणाऱ्या'='शृण्वन्तम्.' म्हणजे इन्द्र दिसत नाहीं आहे, यावरून तो उपासकांचें स्तोत्र ऐकूं घेऊं शकत नाहीं असें समजूं नये, तो तें कोठून झालें तरी आणि अदृश्य असला तरी ऐकूं शकतो असें तात्पर्य.

'वीर्यवान् पति [आपल्या] वीर्यानें [जेर करितो तसा]'= वृषा वृषत्वा वृषभ [इव].' 'वृषभ' याचा येथें अर्थ 'तरुण पति' असा आहे. ऋ. ८. ६४. ७ आणि १०.१०.१० यांजवरील सायणभाष्य पहा. 'वृषा'शब्दाचा 'वीर्यवान्' (='सेक्तुं समर्थः' रेतःसेचनसमर्थः) हा अर्थ तर ऋग्वेदांत सायणाचार्यांनीं पुष्कळ ठिकाणीं घेतलेला आहे.

'द्यावापृथिवी [या] दोघींसहि'= 'रोदसी उभे.' 'रोदसी' हा शब्द संस्कृतांत स्त्रीलिंगी आहे. त्यावरून आणि दिलेल्या उपमेवरून, 'दोघी स्त्रियांसारिख्या ज्या द्यावापृथिवी त्यांस' असा ऋषीच्या मनांतील अर्थ आहे.

'जेर करितो'= निकजते.' आम्हीं केलेल्या अर्थास प्रमाण आहे असाविषयीं

३. दीप्तिमान् महान् इंद्राला सुखकारक स्तोत्र गा; ज्या धैर्यवान् [इंद्रा]चें धैर्ययुक्त मन स्वशक्तिसंपन्न [होय]. कारण कीं तो महाकीर्ति, प्राणमय [आणि] शत्रुघातक [होय], [आणि] वीर्यवान् [आणि] अश्वांनीं पूजित असा रथ [होय].

3. Sing a delightful hymn to the effulgent [and] great [and] brave Indra, whose brave mind [is] possessed of self-existent power. For of vast renown, full of life, a destroyer of enemies, he, a hero, [is] a chariot worshipped by his pair of horses.

ऋ. ८. ९०. ४; १०. १४२. २; आणि १. १४३. ५ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा. सायणाचार्य प्रस्तुतस्थळीं 'प्रसाधयति' ("अलंकृत करितो अथवा स्वाधीन करून घेतो?) या शब्दानें अर्थ करितात.

३. या मंत्राच्या उत्तरार्धाचा अर्थ फारच दुर्बोध आहे. निर्वाहासाठीं आम्हीं (सायणांस अनुसरूनच) शब्दशः त्याचा अर्थ केला आहे. परंतु त्याचें तात्पर्य काय आहे तें खात्रीपूर्वक सांगवत नाहीं. पूर्वार्धाचा भावार्थ असा आहे कीं, 'ज्या भयरहित इंद्राचें मन स्वतःसिद्ध बलानें परिपूर्ण असून भयरहित होय, त्या इंद्राप्रीत्यर्थ, हे मित्र हो, तुम्ही आनंदकारक स्तोत्र गा.' उत्तरार्धातील सर्वच शब्द कठिण आहेत असें नाहीं, परंतु 'शत्रुघातक' ('बर्हणा') आणि 'अश्वांनीं पूजिलेला रथ होय' ('पुरः कृतः हरिभ्यां रथो हि सः') इतके शब्द दुर्बोध आहेत. 'बर्हणा' याचा अर्थ 'शत्रुघातक,' म्हणजे शत्रूंचा नाश करणारा असा सायणाचार्य करितात. आणि तसा अर्थ संभवतो. ऋ. १. ५४. मं ३ याजवरील आमची टीप पहा. 'बर्हणा' (म्हणजे मारणें) या स्त्रीलिंगी शब्दाची 'बर्हणया' याच्या ऐवजीं एकवचनी तृतीया आहे असें कित्येक विनाकारण कल्पितात. आतां इंद्र हा रथ होय असें म्हणण्याचा भावार्थ काय आहे तो तर अगदी समजत नाहीं.

'दीप्तिमान्'='दिवे.' अक्षरशः अर्थ जरी ('द्यु' शब्द विशेषण नसल्यामुळें) दीप्तिमान् असा होणें कठीण आहे, तरी पर्यवसानीं तोच अर्थ आहे यांत शंका नाहीं. 'द्युलोकरूप जो इंद्र' असें म्हणणें आणि 'द्युलोकाप्रमाणें दीप्तिमान् असा जो इंद्र' असें म्हणणें त्यांत अर्थ एकच आहे. या स्थळीं इंद्राला द्युरूपत्व मानिलें आहे हें मात्र लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

'सुखकारक'='शूष्यम्.' हा सायणांस अनुसरून आम्हीं केलेला अर्थ योग्य दिसतो. ऋ. ६. १०. २; ३. ७. ६; १. ५२. १; ३. ५४. १; ७. २५. ५;

**त्वं दिवो बृहतः सानु कोपयोऽव त्मना धृषता शम्बरं भिनत् ।**
**यन्मायिनो व्रन्दिनो मन्दिना धृषच्छितां गभस्तिमशनिं पृतन्यसि॥४**

त्वम् । दिवः । बृहतः । सानु । कोपयः । अव । त्मना । धृषता । शम्बरम् । भिनत् ।
यत् । मायिनः । व्रन्दिनः । मन्दिना । धृषत् । शिताम् । गभस्तिम् । अशनिम् । पृतन्यसि ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. [हे इन्द्र], यत् (=यदा) [त्वं] व्रन्दिनः (=वृन्दिनः=समूहीभूतान्) मायिनः (=मायाविनः) [असुरान्] [जेतुं] मन्दिना (=हर्षवता) सोमेन (=सोमपानेन जाते हर्षे) धृषत् (=धृषता मनसा धैर्येण) शितां (=तीक्ष्णां) गभस्ति.(=हस्ते गृहीताम्) अशनिं (=वज्रं) पृतन्यसि (=अपृतन्यः=तान् प्रति प्रेरितवानसि), [तदा] त्वं बृहतो दिवः (=महतो द्युलोकस्य) सानु (=उपरिप्रदेशम्) [अ]कोपयः (=अकम्पयः) [तथा] धृषता (=धर्षणयुक्तेन मनसा=धैर्येण) शम्बरम् (=एतन्नामकमसुरम्) अव त्मना (=अवैव) भिनत् (=अभिनत्=भिन्नवानसि=भित्त्वा अपास्तवानसि) ॥

इदमुक्तं भवति । अनेकमायाव्यनुचरयुक्तः शम्बरः इन्द्रेण सह युद्धायाजगाम । तदा हस्तग्रहणोचितं तीक्ष्णं वज्रं गृहीत्वा सोमपानेन जातहर्ष इन्द्रो धैर्ययुक्तमनाः सन्, शम्बरेण सह युद्धं कृत्वा तं जघान । तस्मिन्समये महान् द्युलोकोपि इन्द्रभियसा चकम्प इति ॥

अत्र व्रन्दिनः इत्येतच्छब्दस्य प्रयोगान्तरबाहुल्याभावाद् अर्थनिर्णये संशयो वर्तते॥

१०.१२०.८; १०.३१.३ हे मंत्र पाहा. कितीएक पाश्चिमात्य विद्वान् 'शूष्यम्' याचा 'मोठ्यानें म्हटलेलें' अथवा 'उच्चारिलेले' असा जो अर्थ करितात तो निराधार आहे असें आम्हांस वाटतें.

'स्वशक्तिसंपन्न'=' स्वक्षत्रम्.' म्हणजे, ज्याला दुसऱ्यानें उत्तेजन दिल्यावरून धैर्य आलेलें असतें असें नव्हे, तर 'ज्याला स्वाभाविकच बळ आहे' असा अर्थ. 'स्वधावान्' असें म्हटलें असतें तर हाच अर्थ झाला असता.

'प्राणमय'='असुरः'. म्हणजे मूर्तींसारिखा मृन्मय, पाषाणमय अथवा धातुमय नव्हे, तर केवळ आत्ममय, म्हणजे अविनाशी जो आत्मा तन्मय असा अर्थ. 'असुर' शब्दाचा आलीकडील संस्कृतांत दैत्य असा अर्थ होतो तो वैदिक संस्कृतांत होत नाहीं. वेदांत 'असुर' शब्द देवांस लाविला आहे. सू. २४ मं. १४ याजवर दिलेली टीप पाहा.

४. [ हे इंद्रा ], [ तूं ] जेव्हां आपल्या हातांत तीक्ष्ण वज्र घेऊन [त्या] एकत्र जमलेल्या कपटी [असुरां]बरोबर सोमाच्या भरांत शौर्यानें युद्ध करिता झालास, [तेव्हां] तूं महान् द्युलोकाचें शिखर हालविता झालास, [ आणि ] शौर्यानें शंबराला छेदून खालीं ढकलून देता झालास.

4. Thou didst shake the ridge of great heaven [and] bravely didst strike down S'ambara, when in the exhilaration of the Soma [thou] didst bravely brandish the sharp handy thunderbolt [against] [those] collected intriguers (the demons).

४. या ऋचेचा भावार्थ असा आहे कीं ' शंबर आणि त्याचे मायावी म्हणजे कपटविद्यायुक्त अनुचर इंद्राबरोबर लढावयास आले. तेव्हां इंद्राला सोम पिऊन हर्ष झालाच होता, म्हणून नेहमीं हातांत घ्यावयाचें अतितीक्ष्ण वज्र हातांत घेऊन मोठ्या धैर्यानें शंबरास मारून द्युलोकांतून खालीं फेकून दिलें. तेव्हां शंबरास मारण्याच्या वेळीं इंद्रानें जें आपलें बळ प्रगट केलें तेणेंकरून महान् द्युलोकहि भयभीत होऊन कांपूं लागला, तेणेंकरून त्याचें शिखर हालूं लागलें'.

' तूं जेव्हां आपल्या हातांत तीक्ष्ण वज्र घेऊन [त्या] एकत्र जमलेल्या कपटी असुरांबरोबर युद्ध करिता झालास '= ' यत् मायिनः व्रन्दिनः मंदिता गभस्तिम् अशनिं पृतन्यसि.' अक्षरशः अर्थ ' हातांत घेतलेलें तीक्ष्ण वज्र जेव्हां तूं एकत्र जमलेल्या कपटी [ असुरां]प्रत प्रेरितोस.' यांत इतकें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं ' पृतन्यसि ' हा भूतार्थी वर्तमान आहे, आणि द्विकर्मक आहे.

'एकत्र जमलेल्या '=' व्रन्दिनः.' या अर्थाविषयीं थोडा संदेह आहे. आम्हीं केलेला अर्थ सायणांनीं दिलेल्या दोन अर्थांपैकीं एक आहे. ते तरी निश्चयानें अर्थ करीत नाहीत.

' शंबर ' याजबद्दल सू. ५१ मं. ६ याजवरील टीप पाहा.

**नि यद्वृणक्षि श्वसनस्य मूर्धनि शुष्णस्य चिद् व्रन्दिनो रोरुवद्वना।**
**प्राचीनेन मनसा बर्हणावता यदद्या चित्कृणवः कस्त्वा परि॥५॥१७**

नि । यत् । वृणक्षि । श्वसनस्य । मूर्धनि । शुष्णस्य । चित् । व्रन्दिनः । रोरुवत् । वना ।
प्राचीनेन । मनसा । बर्हणाऽवता । यत् । अद्य । चित् । कृणवः । कः । त्वा । परि ॥ ५ ॥ १७ ॥

## भाषायाम्.

५. हे इन्द्र, यद् (=यस्मात्) [त्वं] रोरुवत् (=मेघैरतिशयेन गर्जयन् श्वसनस्य (=श्वसनं कुर्वतः) व्रन्दिनः (=वृन्दिनः-अनुचरसमूहयुक्तस्य) शुष्णस्य चित् (=अपां शोषकस्य=एतद्रूपस्य असुरस्यापि) मूर्धनि (=शिरसि) वना (=वनानि=उदकानि मेघोदकानि) नि वृणक्षि (=आवर्जयसि), [तथा] यद् (=यस्मात्) [त्वं] प्राचीनेन (=अपराङ्मुखेन) बर्हणावता (=शत्रुहननेच्छायुक्तेन) मनसा अद्य चित् (=अधुनापि) [तथैव] कृणवः (=कर्तुं शक्नोषि) [तस्मात्] त्वा परि (=त्वां परि=तवोपरि) कः [भवति]?

इदमुक्तं भवति। इन्द्रः पुरा अप्शोषणरूपस्य असुरस्य शुष्णनामकस्य मूर्धानं तदुपरि मेघोदकानां वृष्टिं कृत्वा बिभेदेति ऋषिवचनेषु प्रसिद्धिः। तथैव तन्मूर्धच्छेदनम् अधुनापि यदि कामयेत तत्कर्तुं शक्नोति। एवं सति कोऽस्ति नाम इन्द्रादपि गरीयान्? न कोऽपीत्यर्थः॥

५. ज्यापेक्षां [तूं] झपाट्यानें वाहणाऱ्या [आणि] शोषून टाकणाऱ्याहि सानुयायी [असुरा]च्या माथ्यावर मोठी गर्जना करीत करीत मेघोदकें फोडिता झालास, [आणि] ज्यापेक्षां [तसेंच] उत्साही [आणि] शत्रुघातक मनानें अजूनहि करूं शकतोस, [त्यापेक्षां] [हे इंद्रा], तुझ्यावर श्रेष्ठ कोण [आहे] ?

5. Since thou didst roaringly cut down the [heavenly] waters on the head of even the [demon] that blows violently [and] that causes drought, [and] since [thou] couldst do this even now with a forward mind desirous of destroying the enemy, who [is there] above thee ?

५. याचा भावार्थ असा आहे कीं, 'शुष्ण या असुरानें सोसाटा वारा सोडून सर्व पाणी शोषून नेलें आणि तो त्यांस जमिनीवर पडूं देईना, तेणेंकरून लोकांस फार उपद्रव होऊं लागला. मग इंद्र त्याजबरोबर युद्ध करीत असतां शुष्ण आपलें सर्व सैन्य घेऊन त्याजबरोबर युद्धास आला; तेव्हां जमिनीवरून शोषण करून नेलेलीं आणि अंतरिक्षांत मेघरूपी गुहांमध्यें लपवून ठेविलेलीं जी उदकें तीं त्या गुहा फोडून इंद्रानें खालीं सोडिलीं, आणि शुष्णाला त्यांत बुडवूनच जणुं मारिलें. हा जो इंद्रानें पराक्रम केला तो आजहि त्याच्यानें पुनः करवेल (आणि हें खरेंच आहे, कारण कीं पाहिजे तेव्हां मेघवृष्टि करण्याची शक्ति इंद्राला आहेच). तर असा जो इंद्र त्याहून दुसरा कोणी श्रेष्ठ नाहीं.'

'शुष्ण' सू. ११. मं. ७ सू. ३३ मं. १२ आणि ५१. ११ हे मंत्र आणि त्यांजवरील आमच्या टीपा पाहा. प्रस्तुतच्या मंत्रावरून शुष्ण म्हणजे उदकें शोषून नेणारा आणि सोसाटा वारा सोडून त्यांची वृष्टि न होऊं देणारा असा जो रूपकसिद्ध असुर तो होय, असें उघड होतें.

'सानुयायी'='ऋन्दिनः'. या शब्दाच्या अर्थाविषयीं संशय आहे म्हणून पूर्वींच्या मंत्रांत सांगितलेंच आहे.

'मोठी गर्जना करीत करीत'='रोरुवत्.' ही गर्जना म्हणजे मेघगर्जनाच होय असें सायणाचार्य म्हणतात तें निर्विवाद दिसतें. 'रोरुवत्' हें व्याकरणदृष्ट्या क्रियाविशेषण समजावें.

'उत्साही आणि शत्रुघातक मनानें'='प्राचीनेन बर्हणावता मनसा.' म्हणजे शत्रूचा नाश करण्याविषयीं ज्याला उत्साह आणि आवेश आहे अशा मनानें.

**त्वमा॑विथ॒ नर्यं॑ तु॒र्वशं॒ यदुं॒ त्वं तु॒र्वीतिं॑ व॒य्यं॑ शतक्रतो।**
**त्वं रथ॒मेत॑शं॒ कृत्व्ये॒ धने॒ त्वं पुरो॑ नव॒तिं द॑म्भयो॒ नव॑ ॥ ६ ॥**

त्वम् । आ॒वि॒थ॒ । नर्य॑म् । तु॒र्वश॑म् । यदु॑म् । त्वम् । तु॒र्वीति॑म् । व॒य्य॑म् । श॒त॒क्र॒तो॒ इति॑ शत॒ऽक्र॒तो॒ ।
त्वम् । रथ॑म् । एत॑शम् । कृत्व्ये॑ । धने॑ । त्वम् । पुर॑: । न॒व॒तिम् । द॒म्भ॒य॒: । नव॑ ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. [ हे इन्द्र ], त्वं नर्यं [ तथा ] तुर्वशं यदुं [ च ] आविथ (=ररक्षिथ ) । हे शतक्रतो (=बहुप्रज्ञ इन्द्र ), त्वं तुर्वीतिं [ तथा ] वैय्यम् [ आविथ ] । त्वं धने (=धनार्थे युद्धे ) कृत्व्ये (=कर्तव्ये ) [ सति ] रथम् एतशं [ च ] [ आविथ ] । त्वं [ शम्बरस्य ] नवतिं नव (=नवोत्तरनवतिसंख्याकाः) पुरः (= नगराणि ) [ अ]-दम्भयः (=व्यनीनशः) ॥

अत्र नर्यतुर्वशयदुतुर्वीतिवैय्यरथैतशाः केचिद् इन्द्रेण रक्षिताः पुरुषाः । तुर्वीतिवैय्ययोर्भिन्नत्वम् ऋ. २. १३. १२, ४. १९. ६ इत्यत्र सायणाचार्येरेव प्रतिपादितम् ॥

६. हे शतप्रज्ञ [इंद्रा], तूं नर्याला, [तूं] तुर्वशाला, [तूं] यदूला, तूं तुर्वीतीला [आणि] वय्याला रक्षिता झालास. तूं युद्ध करण्याचा प्रसंग आला तेव्हां रथाला [आणि] एतशाला [रक्षिता झालास]. तूं नव्याण्णव नगरें विध्वंसून टाकिता झालास.

6. Thou protectedst Narya, Turvas'a, [and] Yadu. Thou protectedst, O [Indra] of hundred wisdoms, Turvîti [and] Vayya. Thou protectedst Ratha [and] Etas'a at the time of battle. Thou brakest the ninty-nine fortresses.

६. या मंत्राचा अर्थ उघड आहे. यांत इंद्रानें पूर्वी कोणकोणत्या उपासकांचें रक्षण केलें तें सांगितलें आहे.

'नर्य,' हा कोण होता अथवा त्याचा इतिहास काय आहे तें ऋग्वेदांत सांगितलेलें नाहीं. आणि हें नांव आणखी एकच वेळ ऋक्संहितेंत (ऋ. १. ११२. ९. यांत) आलें आहे आणि त्यांत 'नर्याला' अशी देवांनीं रक्षिलें असें सांगितलें आहे.

'तुर्वश.' सू. ३६, मं. १८ याजवर दिलेली टीप पहा.

'यदु.' याविषयींहि सू. ३६ मं. १८ याजवरील टीप पहा.

'तुर्वीति.' याविषयींहि सू. ३६ मं. १८ याजवरील टीप पहा.

'वय्य.' ऋ. २. १३. १२ आणि ४. १९. ६ यांत वय्यासाठीं इंद्रानें पृथिवी उदक आणि अन्न यांहीं करून समृद्ध केली असें सांगितलें आहे. याशिवाय 'वय्य' हा कोण आणि कोठला होता आणि त्याचा इतिहास काय होता तें ठाऊक नाहीं. प्रस्तुत स्थळीं सायणाचार्य 'वय्य' म्हणजे 'वय्यकुळांत जन्मलेला' असा विशेषणीं अर्थ करून तुर्वीतीकडेस घेतात. परंतु आम्हीं आतांच सांगितलेल्या दोनहि मंत्रांत तुर्वीति आणि वय्य हे एक नव्हेत, वेगवेगळे होत असें सायणाचार्यांच्याच भाष्यावरून समजतें.

'रथ.' हें सायणाचार्यास अनुसरून आम्हीं विशेषनाम घेतलें आहे. परंतु तो कोण होता याविषयीं कांहीं कथा ठाऊक नाहीं. आणि 'रथ' हें विशेषनाम वेदांत प्रसिद्ध दिसत नाहीं. तरीहि येथें विशेषनाम करणें हाच आम्हांस उत्तम पक्ष दिसतो.

'एतश.' हा कोण होता त्याविषयीं कांहीं ठाऊक नाहीं.

'नव्याण्णव नगरें'='पुरः नवतिं नव.' हीं नगरें शंबराचीं होत असें आचार्य म्हणतात. नव्याण्णव म्हणजे शब्दशः अर्थ समजावयाचा नाहीं असें आम्हांस वाटतें. ऋग्वेदांत नव्याण्णव नगरें फोडि-

**स घा राजा सत्पतिः शूशुवज्जनो रातहव्यः प्रति यः शासमिन्वति ।**
**उक्था वा यो अभिगृणाति राधसा दानुरस्मा उपरा पिन्वते दिवः॥७**

सः । घ । राजा । सत्ऽपतिः । शूशुवत् । जनः । रातऽहव्यः । प्रति ।
यः । शासम् । इन्वति ।
उक्था । वा । यः । अभिऽगृणाति । राधसा । दानुः । अस्मै । उपरा ।
पिन्वते । दिवः ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. यो जनो रातहव्यः (=दत्तहविष्कः) [सन्], शासम् (=इन्द्रस्य अनुशासनं) प्रति इन्वति (=व्याप्नोति=स्वीकरोति) स सत्पतिः (=सतां पालकः) [एतादृशो] राजा [भूत्वा] शूशुवत् घ (=आत्मानं वर्धयत्येव), वा (=अपि च) यो [जनो] राधसा (=हविर्लक्षणेनान्नेन सह=हविर्लक्षणान्नम् अर्पयित्वा) उक्था (=उक्थानि=स्तोत्राणि) अभिगृणाति (=अभिमुखो भूत्वा गायति) अस्मै (=तस्मै जनाय) उपरा दानुः (=मेघरूपा वृष्टिः) दिवः (=द्युलोकसकाशात्) पिन्वते (=वर्धतेऽपीना सती वर्षति.)॥

इदमुक्तं भवति । यो जनो दत्तहविष्कः सन् तथा दत्तराधाः सन् इन्द्रस्य शासनं पालयति तथा तस्य स्तुतीर्गायति स निःसंशयं सत्पती राजा भूत्वा वर्धते तदर्थे च दिव्या मेघोदकवृष्टिर्विपूलं यथा तथा पततीति ॥

त्याविषयीं पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. ऋ. १. १९. ६ यांत इंद्रानें शंबराचीं ९९ नगरें फोडिलीं असें सांगितलें आहे. (नवतिं च नव इन्द्रः पुरः वि ऐरयत् शम्बरस्य); ऋ. ७. १९. ५ यांत 'हे इन्द्रा, जेव्हां तूं तीं नव्याण्णव नगरें एकदम फोडून टाकिता झालास' (तानि नव यत् पुरो नवतिं च सद्यः); ऋ. ७. ९९. ५ यांत, 'हे इंद्र आणि विष्णू हो, तुम्ही शंबराचीं नव्याण्णव बळकट नगरें विध्वंसून टाकिते झालां' (इन्द्राविष्णू दृंहिताः शम्बरस्य नव पुरो नवतिं च श्नथिष्टम्); ऋ. ८. ९३. २ यांत 'जो वृत्रघ्न इंद्र आपल्या बाहुबळानें नव्याण्णव नगरें फोडून टाकिता झाला आणि वृत्ररूप अहीस मारिता झाला' (नव यो नवतिं पुरो बिभेद बाह्वोजसा, अहिं च वृत्रहावधीत्) असें सांगितलें आहे, आणि ऋ. १. १३०. ७ यांत 'हे इंद्रा, तूं मानवाकरितां नव्वद नगरें विध्वंसिता झालास' (='भिनत् पुरो नवतिम् इन्द्र पूरवे'); ऋ. १. ५४. ६

७. तो मनुष्य निःसंशय सज्जनपालक राजा [होऊन] उत्कर्षाप्रत पावतो, [कीं] जो [इंद्राला] हवि अर्पण करून [त्याची] आज्ञा पाळितो; अथवा जो [हविरूप] अन्न देऊन स्तोत्रें गातो त्यासाठीं पोषणयुक्त मेघवृष्टि स्वर्गाहून पडत असते.

7. That man who, having offered oblations [to Indra], promotes [his] ordinance, shall indeed prosper [as] a king [and] protector of the good; or he who, offering the sacrificial food, sings prayers unto [him],—to him the rainy stream shall richly flow.

---

यांत ' हे इंद्राग्नी, तुम्ही दासांचीं म्हणजे अनार्य शत्रूंचीं नव्वद नगरें हालवून देते झालां ' (=इन्द्राग्नी नवतिं पुरो दासपत्नीः अधूनुतम्) असें सांगितलें आहे. आणि कोठकोठें शंभर नगरें फोडिलीं असेंहि सांगितलें आहे; उदाहरणार्थ ऋ. १·५३. ८ यांत वंग्रृदाचीं शंभर नगरें इंद्रानें फोडिलीं असें आहे. ऋ. ४. ३०. २ यांत '.इंद्रानें देवभक्त दिवोदासाकरितां शंबराचीं पाषाणमय शंभर नगरें फोडून फेकून दिलीं ' ( शतम् अश्मन्मयीनां पुराम् इन्द्रो व्यास्यत् दिवोदासाय दाशुषे ) असें म्हटलें आहे. या सर्वांचा विचार करितां, नव्वद अथवा नव्याण्णव अथवा शंभर म्हणजे असंख्य इतकाच अर्थ घ्यावयाचा असें दिसतें. पूर्वी सू. ३२ मं. १४ यांत इन्द्र नव्याण्णव नद्यांपलीकडे गेला असें सांगितलें आहे तें व त्याजवरील टीप पहा. या सर्व स्थळीं अपरिमितार्थी परिमितवचन आहे असें समजलें पाहिजे.

'विध्वंसिता झालास.' नगरें विध्वंसिता झालास म्हणजे ज्या किल्ल्यांत शंबरासुर आश्रय करून राहिला ते फोडून टाकिता झालास. शंबरादिकांनीं पृथ्वीवरील सर्व पाणी शोषून घेऊन आकाशांत मेघरूप किल्ल्यांत ठेवून आपणहि त्यांतच राहिले. तेव्हां इंद्रानें ते किल्ले फोडिले. म्हणजे, मोठी मेघगर्जना करून मेघोदकांची वृष्टि करून नयं. तुर्वश इत्यादिक जे देवभक्त त्यांस सुख दिलें इतकाच पर्यवसित अर्थ आहे.

---

७. भावार्थः—'जो कोणी मनुष्य इंद्राला हवि अर्पण करीत असतो आणि त्याची आज्ञा पाळीत असतो, आणि हवि अर्पण करून त्याजबरोबर इंद्राचीं स्तोत्रें गात असतो, तो निःसंशय राजा होतो आणि सज्जनाचा पालक होतो, आणि त्याचा उत्कर्ष होतो, आणि त्याच्या हितार्थ द्युलोकाहून मेघवृष्टि मोठमोठी होऊन पडत असते.'

' सज्जनपालक '=' सत्पतिः.' हा

**अस॑मं क्ष॒त्रमस॑मा मनी॒षा प्र सो॑म॒पा अप॑सा सन्तु॒ नेमे॑ ।**
**ये त॑ इन्द्र द॒दुषो॑ व॒र्धय॑न्ति॒ महि॑ क्ष॒त्रं स्थवि॑रं॒ वृष्ण्यं॑ च ॥ ८ ॥**

अस॑मम् । क्ष॒त्रम् । अस॑मा । म॒नी॒षा । प्र । सो॒म॒ऽपाः॑ । अप॑सा । स॒न्तु॒ । नेमे॑ ।
ये । ते॒ । इ॒न्द्र॒ । द॒दुषः॑ । व॒र्धय॑न्ति । महि॑ । क्ष॒त्रम् । स्थवि॑रम् । वृ॒ष्ण्य॑म् । च॒ ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. [इन्द्रस्य] क्षत्रं (=बलम्) असमम् (=अनुपमम्) । [तस्य] मनीषा (=बुद्धिः) असमा (=अनुपमा) [भवति] । नेमे (=एते) सोमपाः (=सोमस्य पातारो) [यजमाना] अपसा (=स्वकर्मणा) प्र सन्तु (=प्रवृद्धा भवन्तु) । ये [सोमपाः] हे इन्द्र, ददुषः (=दत्तवतः=अभीष्टदानस्य दातुः) ते (=तव) महि क्षत्रं (=महद् बलं) स्थविरं वृष्ण्यं च (=स्थूलं वीर्यप्रवृद्धं पुंस्त्वं च) वर्धयन्ति (=प्रवृद्धं कुर्वन्ति) ॥

अर्थ आम्हीं सायणानुसारें केला आहे तो योग्य वाटतो. सू. ५३ मं. ६ याजवरील टीप पहा.

'निःसंशय उत्कर्षाप्रत पावतो'= 'शूशुवत् घ.' 'शूशुवत्' हें आम्हीं लेट्चें रूप आहे असें समजून भाषांतर केलें आहे. अक्षरशः अर्थ 'उत्कर्षाप्रत पावेलच' अथवा 'पावूं शकेल'.

'आज्ञा पाळितो'='शासं प्रति द्रवति.' म्हणजे यज्ञ करितो आणि तेणेंकरून सन्मार्गानें चालतो, इंद्राची आज्ञा मोडीत नाहीं.

'त्यासाठीं पोषणयुक्त मेघवृष्टि स्वर्गाहून पडत असते'='दानुः अस्मै उपरा पिन्वते दिवः.' 'दानुः' म्हणजे 'वृष्टि' असा अर्थ होतो याविषयीं ऋ. १०. ४३. ७ हा मंत्र आणि त्याजवरील सायणभाष्य पहा. 'उपरा दानुः' म्हणजे 'मेघवृष्टि' असा भावार्थ आहे. 'उपरा' हें येथें 'दानु' या स्त्रीलिंगी शब्दाचें विशेषण आहे. 'उपर' म्हणजे मेघ असा अर्थ यास्कांनीं केलाच आहे. ऋ. १०. २७. २०; ५. ४४. २; १०. २७. २३; १. १६७. ३ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा. 'उपर' शब्दाचा मेघ असा अर्थ कसा होतो तें सांगवत नाहीं, तरी मेघ हा अर्थ होतो यांत संशय दिसत नाहीं. प्रस्तुत स्थळीं 'मेघसंबन्धी' अशा अर्थाचें विशेषण आहे. 'पिन्वते' म्हणजे 'वृद्धिंगत होते.'

८. [इंद्राचें] बळ अनुपम [होय], [याची] प्रज्ञा अनुपम [होय]. [तर हे इन्द्रा], हे सोमपान करणारे [जन] [आपल्या] कर्मानें उत्कर्षाप्रत पावोत; कारण कीं हे इंद्रा, ते तुज उदाराचें महाबळ आणि स्थिर पुंस्त्व वाढवीत असतात.

8. Unequalled [is Indra's] power, unequalled [ is his ] wisdom. May these Soma-drinking worshippers be prosperous through [their] work; for they [ through their hymns ] glorify, O Indra, the great might and the vast puissance of thee the liberal.

---

'पीन होते,' 'पुष्ट होते,' म्हणजे मेघवृष्टि विपुळ पडते. मोठी होणें आणि पुष्ट होणें किंवा पुष्ट होत्सातें वाहणें अशा अर्थाविषयीं ऋ. ७. ३४. ३; ४. ५०. ८; ६. ५०. ४; ६. २३. ६; आणि ८. १२. ५ हे मंत्र आणि त्यांजवरील भाष्य पहा.

---

८. भावार्थः—'इंद्राचें बळ आणि शहाणपण हीं अद्वितीय आहेत. यास्तव इंद्राची सेवा करणारे जे हे आम्ही त्यांचा उत्कर्ष होओ. कारण कीं हे इंद्रा, आम्हांस इच्छिलेलें देणारा जो तूं, त्याचें मोठें बळ आणि अचल वीर्य हीं आम्ही आपल्या सूक्तांच्या योगानें वाढवीत असतों.'

'हे सोमपान करणारे जन'='नेमे सोमपाः'. हा अर्थ सायणांस अनुसरून आम्हीं केला आहे. 'नेमे' याचा अर्थ 'दुसरे,' 'हे नव्हेत ते' असा बहुतकरून होतो. (ऋ. ४. २४. ४ आणि ४. २४. ५ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा.) परंतु या मंत्रांत सायणांनीच केलेला अर्थ योग्य दिसतो. अथवा 'सकळ सोमपान करणारे [जन]', असा अर्थ केल्यास चांगला संभवतो.

'[आपल्या] कर्मानें'='अपसा.' म्हणजे देवयजनादि जें शुभकर्म तेणेंकरून असा अर्थ आहे.

'कारण कीं...ते'='ये.' अक्षरशः अर्थ 'जे' इतकाच आहे. पण यच्छब्दाचा केव्हां केव्हां असा अर्थ करावा लागतो हें पूर्वीं पुष्कळ वेळ सांगितलेंच आहे.

'वाढवितात'='वर्धयन्ति.' स्तोत्रानें देवाचें बळ अथवा वीर्य वाढतें असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलेलें अथवा जाणविलेलें आढळतें. त्याचें तात्पर्य असें दिसतें कीं, स्तोत्र म्हणून प्रार्थना केल्यानें प्रार्थित देवाच्या आंगीं आवेश येऊन तज्जन्य बळ उत्पन्न होत असतें. समरांगणांत योद्ध्यांचें बळ उत्तेजन येणाऱ्या शब्दांनीं सेनापति कसें वाढवितात हें प्रसिद्धच आहे.

तुभ्येदेते बहुला अद्रिदुग्धाश्चमूषदश्चमसा इन्द्रपानाः ।
व्यश्नुहि तर्पया काममेषामथा मनो वसुदेयाय कृष्व ॥ ९ ॥

तुभ्य । इत् । एते । बहुलाः । अद्रिऽदुग्धाः । चमूऽसदः । चमसाः । इन्द्रऽपानाः ।
वि । अश्नुहि । तर्पय । कामम् । एषाम् । अथ । मनः । वसुऽदेयाय । कृष्व ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. हे इन्द्र, एते (=पुरोवर्तिनो ) बहुलाः (=प्रभूता) अद्रिदुग्धाः (=ग्रावभिरश्मभिर्दुग्धा अभिषुताः) चमूषदः (=चमसेषु स्थिता ) इन्द्रपानाः (=त्वत्पानाः=त्वया पातुं योग्याः) चमसाः (=सोमाः) तुभ्येत् (=तुभ्यमित्=त्वदर्थमेव) [ सन्ति ] । [ तस्मात् हे इन्द्र ], [ तान् ] व्यश्नुहि (=भक्षय ), [ भक्षयित्वा च ] एषां (=चमसानां ) कामं (=त्वं भक्षयेरिति मनोरथं ) तर्पय (=पूरय ) । अथ (=अनन्तरं ) वसुदेयाय (=वसुने देयाय=अस्मभ्यं धनं दातुं ) मनः कृष्व (=मनः कुरुष्व=दातुकामो भव ) ॥

उपासकैर्दत्ताः सोमा इन्द्र अस्मान्भक्षयेदितीच्छन्त आसन् । तद् आगत्य तान् पिबेति भावः । उक्तं चान्यत्र 'इन्दवो वामुशन्ति हीति ऋ. १. २. ४. ॥

वृत्तानुसारेंकरून 'वृष्ण्यं च' या ऐवजीं 'वृष्णिअं च' असें संहितेंत म्हटलें पाहिजे, म्हणजे उपजाति श्लोकाप्रमाणें म्हणतां येईल.

९. हे इंद्रा, हे विपुल, पाषाणापासून दोहून काढिलेले, चमसपात्रांत असलेले [आणि] त्वां पिण्यास योग्य असलेले सोम तुझ्याकरितांच [आहेत]. [तर हे इंद्रा,] [हे तूं] भक्षण कर [आणि] यांची इच्छा पूर्ण कर, आणि आम्हांस संपत्ति देण्याचा निश्चय कर.

9. For thee only [are] these plentiful, [and] stone-milked Somas, standing in the bowls [and] fit to be drunk by thee. Drink them, [and thereby] gratify their desire. And then make up thy mind to give [us] wealth.

---

९. मंत्रकर्त्या ऋषीनें म्हणजे सत्यानें सोम काढण्याचे जे ग्रावे म्हणून पाषाण असत, त्यांच्या योगानें पुष्कळसे आणि इंद्रानें पिण्यास योग्य असे चांगले सोमरस काढून, चमस म्हणून जो प्याला असे त्यांत घातले; आणि इंद्रास अर्पण करून म्हणतो, 'हे इंद्रा, हे सोमरस तुजकरितांच आहेत आणि तूं आपणांस प्यावेंस अशी इच्छा करीत आहेत; तर तूं ते पी आणि त्यांची इच्छा पूर्ण कर. आणि मग आम्हांसहि संपत्ति देण्याचें मनावर घे.'

'पाषाणापासून दोहून काढिलेले' = 'अद्रिदुग्धाः.' म्हणजे गाईपासून जसें दूध दोहून काढावें तसे जणुं काढिलेले.

'यांची इच्छा पूर्ण कर' =' तर्पय कामम् एषाम्.' उपासकांनीं देवांस अर्पण केलेले सोम देव केव्हां येतील आणि पीतील अशी इच्छा करून वाट पाहत असतात याविषयीं सू. २ मं. ४ पहा. सायणाचार्य प्रस्तुत स्थळीं 'या [तुझ्या] इंद्रियांची इच्छा तृप्त कर' असें भाष्य करितात, पण 'इंद्रियांची' हें पद अध्याहृत घ्यावें लागतें, आणि 'एषाम्' (=यांना) ह्या पदाचा मग निर्वाह चांगला होत नाहीं.

'[आम्हांस] संपत्ति देण्याचा निश्चय कर' = मनः वसुदेयाय कृष्व.' अक्षरशः अर्थ 'देण्याच्या धनासाठीं मन [निश्चित] कर.' 'वसुदेयाय,' म्हणजे 'देयाय वसुने.' लाटीन भाषेंत असे प्रयोग फार येतात. 'वसुने देयाय' = ad bona danda.

या मंत्रावरून इंद्रादि देवांस आपले पूर्वज आर्य सोम प्यावयास अर्पण करीत हें जसें सिद्ध होतें तसेंच पूर्वील मंत्रावरून ते स्वताहाहि पीत असत असें सिद्ध होतें. आपण जसजसा वेद पुढें पुढें वाचूं तसतसा, पुरातन ऋषि सोम देवांस अर्पण करीत पण आपण स्वतः पीत नसत या आधुनिक गोष्टीला, आणि पुरातन ऋषि देवांस मांस अर्पण करण्याकरितां पशु मारीत पण त्यांस पुनः जीवंत

अपामतिष्ठद्धरुणह्वरं तमोऽन्तर्वृत्रस्य जठरेषु पर्वतः ।
अभीमिन्द्रो नद्यो वव्रिणा हिता विश्वा अनुष्ठाः प्रवणेषु जिघ्नते॥१०

अपाम् । अतिष्ठत् । धरुणऽह्वरम् । तमः । अन्तः । वृत्रस्य । जठरेषु । पर्वतः ।

अभि । ईम् । इन्द्रः । नद्यः । वव्रिणा । हिताः । विश्वाः । अनुऽस्थाः । प्रवणेषु । जिघ्नते ॥ १० ॥

### भाषायाम्.

१०. अपाम् (=उदकानां) धरुणह्वरं (=धारानिरोधकं) तमः अतिष्ठत् (=आसीत्)। वृत्रस्य (=मेघानाम् आवरकस्य एतन्नामकस्यासुरस्य) जठरेषु अन्तः (=उदरे) पर्वतः (=पर्ववान् मेघः) [अतिष्ठत्=आसीत्]। [तदा] इन्द्रः अभि ईम् (=एनं पर्वतम् अभिलक्ष्य), वव्रिणा (=आवरकेण वृत्रेण) हिताः (=पिहिता) [अत एव] अनुष्ठाः (=आनुपूर्व्येणावस्थिता) विश्वाः (=सकला) नद्यः (=नदीः=अपः) प्रवणेषु (=निम्नप्रदेशेषु) जिघ्नते (=तं पर्वतम् अभिहत्य जलानि भूम्यादिषु निम्नप्रदेशेषु आवर्जितवान्) ॥

अत्रेदमुक्तं भवति। पुरा किल जलानां वर्षकं मेघं वृत्रः स्वोदरे निधाय सकलं जगत् तिमिरावृतं कृत्वा मेघोदकानि निरुद्धवान् तदा इन्द्रस्तदुदरस्थं मेघरूपं पर्वतं भित्त्वा तत्रस्थान्युदकानि भूमौ पातितवानिति ॥

करण्याची शक्ति त्यांस होती आणि त्याप्रमाणें ते करीत असत त्यामुळें त्यांच्या हातून हिंसा होत नसे याहि गोष्टीला कांहीं आधार नाहीं असें दिसून येईल. आलीकडच्या युगांत जे प्रचार निंद्य (आणि कांहीं अंशानें योग्य रीतीनें निंद्य) समजतात ते आपल्या अतिपवित्र पूर्वजांच्या वेळीं चालू होते असें कबूल करावें लागतें, तर त्यांपासून निंद्यपणा जावा म्हणून त्या दोनहि गोष्टी आलिकडेस रचिल्या आहेत हें उघड दिसून येतें.

१०. उदकांच्या धारांचा अवरोध करणारा अन्धकार [ जिकडे तिकडे] [पसरला] होता. वृत्राच्या पोटांत पर्वत [ राहिला होता ]. तो फोडून इंद्र, वृत्रानें लपविलेलीं [ आणि ] एकास एक लागून राहिलेलीं सकल उदकें खालीं पाडिता झाला.

10. [ There ] was darkness that stopped the flow of the waters: the mountain (the rain-cloud ) [ was ] in the bowels of Vritra. Striking this. Indra let flow down all the waters which concealed by Vritra, had stood one behind another.

१०. भावार्थः–' पूर्वी पाण्याचा अवरोध करणारा जो वृत्र त्याणें मेघरूप पर्वत आपल्या पोटांत घालून ठेविला, तेव्हां उदकें सहजच वर्षून वाहण्याचीं बंद झालीं, आणि जिकडे तिकडे अंधार झाला. मग इंद्रानें तो उदरस्थ पर्वत फोडून टाकून वृत्रानें लपवून ठेविल्यामुळें आखडून गेलेलीं जीं उदकें तीं सर्व खालीं पाडिलीं.'

' धारांचा अवरोध करणारा'=' धरुणह्वरम्.' हा अर्थ आम्हीं सायणानुसारें केला आहे आणि तो आम्हांस योग्य दिसतो. कितीएक विद्वान् दुसरा अर्थ कल्पितात त्याला आधार दिसत नाहीं. हा शब्द ऋग्वेदांत दुसऱ्या स्थळीं आलेला नाहीं. 'धरुण 'शब्दाविषयीं सू. ५२ मं. २ याजवरील आमची टीप पहा.

' वृत्रानें लपविलेलीं'='वव्रिणा हिताः.' अक्षरशः ' आच्छादकानें ठेविलेलीं.' वृत्र यास आच्छादक म्हणण्याचें कारण असें कीं, तो मेघोदकांस आच्छादून अथवा झांकून टाकितो.

' एकास एक लागून राहिलेलीं.'= 'अनु स्थाः.' म्हणजे, वृत्रानें त्यांस आपल्या पोटांत कोंडून ठेविल्यामुळें, लहानशा गोठ्यांत पुष्कळ गुरें कोंडून ठेविल्यामुळें जशी एकमेकास भिडून उभीं राहतात तशीं उभीं राहिलीं होतीं असें तात्पर्य आहे.

इंद्रानें वृत्रवध करून मेघजलांची वृष्टि केली हा जो त्याचा सर्ववर्णनव्यापी पराक्रम तोच या मंत्रांत रूपान्तरानें सांगितला आहे.

' तो फोडून...उदकें खालीं पाडिता झाला '=' अभि ईम् नद्यः प्रवणेषु जिघ्नते.' हा प्रयोग चमत्कारिक आहे. अक्षरशः अर्थ ' त्याजवर उदकें फोडिता झाला ' असा आहे; म्हणजे ' त्याजवर (=पर्वतावर ) मार मारून उदकें खालीं पाडिता झाला.' ' जिघ्नते ' हा भूतार्थी वर्तमान आहे.

स शेवृधमधि धा द्युम्नमस्मे महि क्षत्रं जनाषाळिन्द्र तव्यम् ।
रक्षा च नो मघोनः पाहि सूरीन्राये च नः स्वपत्या इषे धाः ॥११॥१८

सः । शेऽवृधम् । अधि । धाः । द्युम्नम् । अस्मे इति । महि । क्षत्रम् जनाषाट् । इन्द्र । तव्यम् ।
रक्ष । च । नः । मघोनः । पाहि । सूरीन् । राये । च । नः । सुऽअपत्यै । इषे । धाः ॥ ११ ॥ १८ ॥

## भाषायाम्.

११. स [ त्वं ] (=तादृशस्त्वं=पूर्वोक्तगुणयुक्तस्त्वम् ) अस्मे अधि (=अस्मासु ) शेवृधं (=शेवंवृधं=सुखवर्धकं ) द्युम्नं (=यशो) धाः (=स्थापय), [तथा] महि (=महत्) जनाषाट् (=जनानाम् अभिभवितृ ) तव्यं (=प्रवृद्धं ) क्षत्रं (=बलम् ) [अस्मे अधि धाः= अस्मासु स्थापय ] । च (=अपि च) मघोनो नः (=अस्मान् धनयुक्तान् कृत्वा ) रक्ष (=पालय ), सूरीन् (=विदुषः) पाहि (=रक्ष ) । च (=अपि च ) नः (=अस्मान् ) राये (=धनाय ) [ तथा ] स्वपत्यै (=सदपत्ययुक्तायै ) इषे (=अन्नाय ) धाः (=स्थापय=अस्मान् धनयोग्यान् सदपत्यान्नयोग्यांश्च कुरु=अस्मभ्यं धनं सदपत्ययुक्तमन्नं च देहि ) ॥

अस्मिन् सूक्तोपसंहारे सूक्तकर्ता सव्य ऋषिः स्वाभीष्टं याचत इति ज्ञेयम् ॥

११. तर हे इंद्रा, तूं सुखवर्धक यश आम्हांला दे, [ आणि ] मोठें [आणि] लोकांस जिंकून टाकणारें [आणि] विपुल बळ [आम्हांला दे]; आणि आम्हांला संपत्तिमान् करून रक्ष; विद्वानांचें पालन कर; आणि आम्हांला संपत्ति [ आणि ] सुसंततिसंपन्न अन्न दे.

11. Confer thou, therefore, upon us glory that increases happiness, [ and ] O Indra, power that is great, that conquers the world, [and] that is magnificent. And [ making ] us rich, protect us, protect the learned. And enable us to gain wealth [ and ] food accompained by good progeny.

११. हा या सूक्ताचा उपसंहार आहे, आणि उपसंहारांत सूक्तकर्ता आराध्य देवतेपाशीं जें काय मागावयास इच्छितो तें सव्यऋषीनें या शेवटच्या मंत्रांत मागितलें आहे. तो म्हणतो कीं, असा म्हणजे वर सांगितल्याप्रमाणें तुझा पराक्रम आहे त्यापेक्षां 'हे इंद्रा, ज्या वैभवापासून सुखाची वृद्धि होते असें वैभव, आणि मोठें व पराक्रमी, आणि सर्वलोकांस जिंकून टाकणारें असें बळ आम्हांस तूं दे; आणि आम्हांस धनसंपन्न केल्यावरहि आमचें रक्षण करीत राहा, आणि सर्व विद्वानांचें पालन कर, आणि आम्हांस संपत्ति, आणि चांगल्या संततीनें युक्त जें अन्न तें मिळे असें कर.'

या मंत्रांत ऋषि काय मागतो त्याजकडेस विशेष लक्ष द्यावें. तो प्रथम आपणास अन्नादि संपत्ति मिळावी असें म्हणतो; २ सुसंतति म्हणजे वीर्यवान् पुत्रपौत्रादि प्राप्त व्हावे म्हणतो; ३ सर्व जनांस जिंकून त्यांजवर आपला अधिकार चालावा म्हणतो; आणि ४ इतकें झाल्यावरहि इंद्रानें आपलें संरक्षण करण्याचें सोडूं नये. आधुनिक महावैभवास चढलेल्या पण खरोखर धर्मनिष्ठ देशांतील लोक झाले तरी यापेक्षां चांगला वर मागूं इच्छितील असें नाहीं. आमच्या देशांत मात्र वर मागावयाचा तो याहून फार वेगळ्या रीतीचा मागतील यांत संशय नाहीं.

'तर ..तूं'=' स [ त्वम् ]'. म्हणजे वर सांगितल्याप्रमाणें तुझा पराक्रम आहे त्यापेक्षां. या प्रकारचे प्रयोग वेदांत पुष्कळ येतात.

'सुखवर्धक'=' शेवृधम्.' या पदाचा अर्थ प्रस्तुत स्थळीं जरी सायणाचार्य येथें केलेल्या अर्थाहून भिन्न करितात, तरी ऋ. ५. ८७. ४; १०. ४६. ३; आणि १०. ६१. २० हे मंत्र आणि त्यांजवरील त्यांचें भाष्य पाहा.

## सूक्तम् ५५.

आङ्गिरसः सव्य ऋषिः । इन्द्रो देवता । जगती च्छन्दः ।

**दिवश्चिदस्य वरिमा वि पप्रथ इन्द्रं न मह्ना पृथिवी चन प्रति ।**
**भीमस्तुविष्मान् चर्षणिभ्य आतपः शिशीते वज्रं तेजसे न वंसगः ॥ १**

दिवः । चित् । अस्य । वरिमा । वि । पप्रथे । इन्द्रम् । न । मह्ना ।
पृथिवी । चन । प्रति ।
भीमः । तुविष्मान् । चर्षणिऽभ्यः । आऽतपः । शिशीते । वज्रम् ।
तेजसे । न । वंसगः ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. अस्य [ इन्द्रस्य ] वरिमा (=उरुत्वं=महिमा ) दिवश्चित् (=द्युलोकादपि ) वि पप्रथे (=विशेषेण विस्तीर्णो बभूव ) । इन्द्रं पृथिवी चन (=पृथिव्यपि ) मह्ना (=स्वकीयेन महत्त्वेन ) न प्रति [ भवति ] (=पृथिव्यपि इन्द्रस्य प्रतिमानं न भवति ) । भीमः (=भयंकरः) तुविष्मान् (=बलवान् ) चर्षणिभ्यः आतपः (=मनुष्येभ्यः संतापकारी=मनुष्येभ्यः सूर्यप्रकाशद्वारा स्वकीयं तेजो दर्शयन् ) [ स इन्द्रो] वंसगो न (=वृषभः स्वकीये शृङ्गे शिशीते तथा ) तेजसे (=तैक्ष्ण्यार्थं ) वज्रम् (=एतन्नामकं स्वकीयम् अस्त्रं ) शिशीते (=तीक्ष्णीकरोति ) ॥

द्यावापृथिवीभ्यामपि इन्द्रस्य महिमा गरीयान् तथा इन्द्रो भीमादिगुणविशिष्टः सन् स्वबलस्य दर्शयितृ वज्रं हस्ते धारयतीत्यर्थः ॥

---

'आम्हांला संपत्ति [ ऊर्णि ] सुसंततिसंपन्न अन्न दे '=' राये नः स्वपत्या इषे धाः.' अक्षरशः अर्थ, 'आम्हांस संपत्तीसाठीं आणि सुसंततियुक्त अन्नासाठीं कर,' अर्थात् 'योग्य कर' म्हणजे, 'आम्हांस मिळवून दे ' असा पर्यवसानीं अर्थ आहे. या स्थळीं जसा 'धा ' धातूशीं चतुर्थीचा प्रयोग केला आहे तसाच इतर पुष्कळ ठिकाणीं ऋग्वेदांत केलेला आढळतो. याचें एक प्रसिद्ध उदाहरण हें आहे कीं, 'आपो हि ष्ठा मयोभुवस्ता न ऊर्जे दधातन । महे रणाय चक्षसे '=' हे उदकांनो, तुम्ही ज्या अर्थी सुख करणारी आहां त्या अर्थी आम्हांस अन्नाकरितां, आणि मोठें आणि रमणीय जें ज्ञान त्याजकरितां करा,' म्हणजे 'योग्य करा,' अर्थात् 'तें आम्हांस मिळे असें करा.' ऋ. १०. ९. १.

## सूक्त ५५.

ऋषि–सव्य (पूर्व सूक्ताचा जो कर्ता तोच); देवता–इंद्र. वृत्त–जगती.

१. याचा महिमा द्युलोकापेक्षांहि विस्तीर्ण आहे. पृथिवी सुद्धा [आपल्या] मोठेपणानें [इंद्रा]-एवढी नाहीं. भयंकर, बलवान् [आणि] लोकांस [आपला] प्रताप दाखविणारा [इंद्र], वृषभ [आपलीं शिंगें घांसतो] तसें, [आपलें] वज्र तेजासाठीं घांसीत असतो.

## HYMN 55.

To *Indra*. By *Savya* (author of the previous hymn). Metre—*Jagatî*.

1. His greatness has spread wider than heaven. Not even the wide earth with [her] greatness is Indra's match. Awful, mighty, [and] exhibiting his effulgence to the people, he sharpens [his] thunderbolt for brightness, like as the bull [sharpens his horns].

---

१. या मंत्रांत इंद्राचा महिमा सांगितला आहे. महिमा म्हणजे मोठेपण. 'इंद्राचें मोठेपण एवढें आहे कीं तें द्युलोकांतहि मावेनासें झालें, तेव्हां सर्व द्युलोक भरून त्याच्या बाहेरहि पसरलें आहे. पृथ्वी इतकी मोठी आहे तरी ती सुद्धा इंद्राची बरोबरी करूं शकत नाहीं, म्हणजे इंद्राचा महिमा पृथिवीपेक्षांहि मोठा आहे. तसाच तो भयंकर म्हणजे आपल्या मोठेपणानें आणि तेजानें भय उत्पन्न करणारा असून बळवान् आहे. आणि आपलें तेज सकळ जनांस दाखवून त्यांस संताप उत्पन्न करितो, तो आपलें वज्र आपल्या हातांत घेऊन त्यास वारंवार तीक्ष्ण करीत असतो, आणि प्रसंग येतांच त्याचा उपयोग करूं शकतो.' इंद्र द्युलोकापेक्षां आणि पृथिवीपेक्षांहि मोठा आहे याविषयीं पूर्वी सू. ५२ मं. १८ आणि त्याजवरील टीप पहा. इंद्राच्या मोठेपणाविषयीं वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे, त्याजवरून ईश्वराचा जो मोठेपणा त्याविषयीं ज्ञान अतिपुरातन काळापासून आर्य लोकांत कसें वाढत आलें आहे तें दृष्टीस पडतें.

'लोकांस [आपला] प्रताप दाखविणारा [इंद्र]'= 'चर्षणिभ्यः आतपः.' अक्षरशः अर्थ 'लोकांस संतापकारी' इतकाच आहे. तात्पर्य असें आहे कीं, इंद्राचें तेज किती आहे तें तो आकाशांत सूर्य चढवून दाखवितो, आणि मध्यान्हीं सूर्याचे 'किरण तापूं लागले' म्हणजे मनुष्यांस इंद्राच्या प्रतापाचा अनुभव ये-

सो अर्णवो न नद्यः समुद्रियः प्रति गृभ्णाति विश्रिता वरीमभिः ।
इन्द्रः सोमस्य पीतये वृषायते सनात्स युध्म ओजसा पनस्यते ॥२॥
सः । अर्णवः । न । नद्यः । समुद्रियः । प्रति । गृभ्णाति । विऽश्रिताः । वरीमऽभिः ।
इन्द्रः । सोमस्य । पीतये । वृषऽयते । सनात् । सः । युध्मः । ओजसा । पनस्यते ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. स [ इन्द्रः ] वरीमभिः (=उरुत्वैः) विश्रिताः (=व्याप्ताः=विस्तृताः) समुद्रियः (=समुद्र्यः=समुद्राः=अन्तरिक्षरूपसमुद्रस्य संबन्धिनीः=अन्तरिक्षाद् मेघोदकरूपैः प्रवाहैः सरन्तीः) नद्यः (=नदीः) अर्णवो न (=समुद्रः प्रतिगृभ्णाति=स्वीकरोति तथा) [सोमरूपा नदीः] प्रतिगृभ्णाति (=प्रतिगृह्णाति=स्वीकरोति) । इन्द्रो [ हि ] सोमस्य पीतये (=पानाय ) वृषायते (=वृषवद् आचरति=अत्युत्सुको भवति ) [ सोमं पीत्वा च ] स युध्मः (=स योधः) ओजसा (=वृत्रवधादिरूपेण शौर्यकर्मणा ) सनात् (=चिरादेव ) पनस्यते (=स्तुतिमिच्छति सोमपानेन जाते हर्षे स्तुत्यर्हाणि शौर्ययुक्तानि कर्माणि करोति ) ॥

अत्रेदमुक्तं भवति । इन्द्रः सोमस्य पाने प्रभूतमेव तृष्णालुर्भवति । अत एव अनेकैरुपासकैरर्पितान् सोमान्, समुद्रो नदीरिव, स्वीकरोति, सोमं पीत्वा च स्तुत्यर्हाणि वृत्रहननादीनि कर्माणि करोतीति ॥

तो. आकाशांत सूर्य आहे तो इंद्रानेंच तेथें स्थापिला आहे असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलें आहे.

'वृषभ' इ० ही उपमा थोडी चमत्कारिक आहे. इंद्राच्या मोठेपणाविषयीं उत्कृष्ट रीतीनें वर्णन करितांना अशी क्षुद्र उपमा कां दिली व ती शोभते असें ऋषीस कशानें वाटलें नकळे.

'वज्र तेजासाठीं घांसीत असतो.' म्हणजे, नित्य वृत्रहननासाठीं वगैरे वज्रप्रहार करण्यास सिद्ध असतो. नित्य युद्ध करण्याच्या तयारींत असतो असें तात्पर्य. शस्त्र सदैव घांसीत राहणें हें युद्धाच्या सिद्धतेचें लक्षण होय. इंद्र हा मोठा शूर योद्धा आहे असें विवक्षित आहे.

हा मंत्र फार थोड्या फेरफारानें वंशस्थ श्लोकाला लागतोः—

दिवश्चिदस्य वरिमा वि पप्रथे ।
इन्द्रं न मह्ना पृथिवी चन प्रति ।
भीमस्तुविष्मान् चर्षणिभ्य आतपः ।
शिशीते वज्रं तेजसे न वंसगः ॥

२. इंद्र [हा], समुद्र अंतरिक्षांतील अतिविस्तीर्ण प्रवाह ग्रहण करितो तसा, [सोमाचे प्रवाह] ग्रहण करितो. इंद्र सोमपानाविषयीं अति तृष्णाक्रान्त होतो, [ आणि ] तो योद्धा [ आपल्या ] शौर्यानें नित्य स्तवनाची इच्छा करीत असतो.

2. He receives [ the streams of Soma] as the ocean[receives]the ethereal streams swollen with magnitude; Indra feels thirsty to drink the Soma. That warrior with his valour ever desires praise.

२. भावार्थः—' इंद्र हा सोम पिण्याविषयीं फार उत्सुक असतो त्यामुळे अनेक उपासकांनीं अनेक पात्रांत भरून अर्पण केलेले जे सोमरस ते तो पीतो; तेव्हां असें दिसतें कीं, अंतरिक्षांतून अनेक ठिकाणीं अनेकशः धारांनीं उदकें वाहून अनेकशः प्रवाहांनी समुद्राकडे धांवतात तीं जसा समुद्र ग्रहण करितो, त्यासारिखा इंद्र सोम ग्रहण करितो. आणि सोम पिऊन इंद्राला इतका आवेश येतो कीं, तो मोठमोठीं शौर्ययुक्त कर्में करितो कीं जेणेंकरून ऋषिजन त्याची स्तुति गातात'.

' अंतरिक्षांतील '=' समुद्रियः'. 'समुद्रियः ' हें ' समुद्री ' या स्त्रीलिंगी विशेषणाचें ' समुद्रयः' याऐवजीं अनेकवचन आहे. याचा अर्थ 'समुद्रसंबंधी.' समुद्र हें नांव जसें सागराचें आहे तसेंच अंतरिक्षाचेंहि नांव आहे. आणि 'समुद्री नदी ' म्हणजे अंतरिक्षांतून मेघवृष्टिरूपानें वाहणारी नदी अथवा प्रवाह. ऋ. १०. ६५. १३; ५. ७३. ८; १०. ६५. १३ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा.

' अतिविस्तीर्ण ' = ' विश्रिताः वरीमभिः.' शब्दशः अर्थ, ' विस्तारांनीं पसरलेले.' पुष्कळ विस्तार होऊन वाढलेले.

'[ सोमाचे प्रवाह] ग्रहण करितो.' समुद्र नद्या पीतो तसा इंद्र सोमाचे प्रवाह पीतो याविषयीं अथवा नद्यांसारिखे सोमाचे किंवा स्तुतींचे प्रवाह इंद्राकडे धांवतात याविषयीं उल्लेख वेदांत बरेच आले आहेत.

' सोमपानाविषयीं अति तृष्णाक्रान्त होतो ' = ' सोमस्य पीतये वृषायते. ' अक्षरशः अर्थ, ' सोमाच्या पानाविषयीं बैलाप्रमाणें करितो, ' म्हणजे बैलास गाईची इच्छा झाली म्हणजे तो जसा आर्त होतो तसा सोमपानाविषयीं अति आर्त अथवा आतुर होतो.

' स्तवनाची इच्छा करितो ' = ' पनस्यते.' हा अर्थ अगदी अक्षरशः आहे स्तुतीची इच्छा धरून, ऋषींनीं गाण्यास योग्य अशीं शूरतेचीं कर्में करितो. म्हण

**त्वं तमिन्द्र पर्वतं न भोजसे महो नृम्णस्य धर्मणामिरज्यसि ।**
**प्र वीर्येण देवताति चेकिते विश्वस्मा उग्रः कर्मणे पुरोहितः ॥३॥**

त्वम् । तम् । इन्द्र । पर्वतम् । न । भोजसे । महः । नृम्णस्य । धर्मणाम् । इरज्यसि ।
प्र । वीर्येण । देवता । अति । चेकिते । विश्वस्मै । उग्रः । कर्मणे । पुरःऽहितः ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. हे इन्द्र, त्वं तं पर्वतं (=तं प्रसिद्धं पर्ववन्तं–मेघं ) भोजसे (=भोजनाय=लोका यथा भोजनं कुर्वन्ति तथा ) न (=अवर्तमानं) [ करोषि ] (=हंसि ) । [ त्वं हि ] महो (=महतो ) नृम्णस्य (=धनस्य ) [ तथा ] धर्मणां (=यज्ञादिकर्मणाम् ) इरज्यसि (=ईश्वरोसि ) । उग्रः (=उद्गूर्णः=बलवान् ) [ इन्द्रः ] विश्वस्मै कर्मणे (=सर्वस्मै कर्मणे=सर्वेषामपि कर्मणां करणे ) [ देवैः ] पुरोहितः (=पुरस्तादवस्थापितः=पुरस्कृतः) [ सन् ] वीर्येण (=स्वकीयेन बलेन ) देवता ( सर्वेषु देवेषु ) प्रातिचेकिते (=ज्ञातो भवति=दृश्यते ) ॥

अत्र ‘त्वं तमिन्द्र पर्वतं न भोजसे’ इत्येतद् दुर्बोधतरं सायणाचार्यैरेवं व्याख्यातम् । “हे इन्द्र त्वं भोजसे भोजनाय पर्वतं पर्ववन्तं मेघं नाकार्षीः । नहि हतो “भुङ्क्ते । इन्द्रो हि वर्षणार्थं मेघं हन्ति” इति ।

जे शूरतेचीं कर्में करून ऋषिजनांनीं आपली स्तुति करावी अशी इच्छा करितो. इंद्रानें सोमपान केल्यावर शूरतेचीं कर्में करण्याविषयीं त्यास आवेश येतो याविषयीं ऋग्वेदांत जिकडे तिकडे सांगितलें आहे.

३. हे इंद्रा, तूं त्या पर्वताला नाहीं[सा करून] [लोकांला] खावयास [अन्न मिळे असें करितोस]. [तूं] मोठ्या धनाचा [आणि] कर्मांचा राजा होस.—[इंद्र आपल्या] वीर्यानें देवांमध्यें श्रेष्ठ आहे. प्रत्येक कार्य करण्यासाठीं सकल देव बलवान् इंद्रास पुढें करीत असतात.

3. O Indra, thou destroyest that mountain that [people] may enjoy [their food]. Thou art master of great wealth [and] of actions.—With [his] puissance [Indra] is conspicuous among the gods. For achieving every exploit mighty [Indra] is placed in front.

---

३. 'वृत्र जोंपर्यंत जीवंत असतो तोंपर्यंत लोकांस अन्नाचें वगैरे सुख भोगावयास सांपडत नाहीं, तें सांपडावें म्हणून हे इंद्रा, तूं त्या पर्वतसदृश मेघाला (म्हणजे वृत्रालाच) नाहींसा करून टाकितोस. आणि या जगांत जितकें धन आहे त्याचा आणि सकल यजमान लोक जीं यज्ञादि कर्में करितात त्यांचा तूं राजा आहेस, म्हणजे तुला पाहिजे तितकें धन मिळेल आणि तुझ्या प्रीत्यर्थच सर्व लोक यज्ञयागादिक करितात. त्यामुळेंच सर्व देव कांहीं झाला तरी पराक्रम करावयाचा असला तर तुलाच पुढें करितात, आणि तुजकडून तो करवितात. यास्तव सकळ देवांत तूं श्रेष्ठ असा साजत असतोस' असें ऋषीच्या मनांतील म्हणणें आहे.

'हे इंद्रा, त्या पर्वताला नाहीं[सा करून लोकांला] खावयास [अन्न मिळे असें करितोस]' = 'त्वं तम्, इन्द्र पर्वतं न भोजसे.' हें वाक्य फार संदिग्ध आहे आणि त्याचा अर्थाविषयीं [illegible]पत्ति आहे. यांत क्रियापदाचा अध्याहार करावा लागतो आणि 'न' या अव्ययाचा नेहमीच्या अर्थास सोडून थोडा निराळा अर्थ करावा लागतो. तथापि निर्वाह करण्याचा दुसरा कांहीं चांगला मार्ग दिसत नाहीं.

'धनाचा' = 'नृम्णस्य.' हा अर्थ आम्हीं सायणानुसारेंच केलेला आहे. 'नृम्ण' याचा साधारण आणि मूळ अर्थ वीर्य अथवा बळ जरी आहे, तरी 'धन' असा सायणाचार्यांनीं दिलेला कां होऊं नये यानें कारण दिसत नाहीं. सायणाचार्य ऋ. ५. ३८. ४; ६. २५. ९; ६. ४६. ७; ७. ५६. ५; आणि ८. ९. २ यांतहि धन असा अर्थ करितात. तेव्हां शार्मण्य पंडित ग्रास्मन बळ इतकाच अर्थ करितात तो चिंत्य दिसतो.

'कर्मांचा' = 'धर्मणाम्.' ऋ. ८. ४३. २४; २. १३. ७; २. ३६. ६; ३. ३८. २; ३. ३. १ आणि १. १६४.

**स इद्वने नमस्युभिर्वचस्यते चारु जनेषु प्रब्रुवाण इन्द्रियम् ।**
**वृषा छन्दुर्भवति हर्यतो वृषा क्षेमेण धेनां मघवा यदिन्वति ॥४॥**

सः । इत् । वने । नमस्युऽभिः । वचस्यते । चारु । जनेषु । प्रऽब्रुवाणः । इन्द्रियम् ।
वृषा । छन्दुः । भवति । हर्यतः । वृषा । क्षेमेण । धेनाम् । मघऽवा । यत् । इन्वति ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. जनेषु (=लोकेषु) चारु (=सुन्दरम्) इन्द्रियं (=स्वकीयं बलं) प्रब्रुवाणः (=प्रकटयन्) स इत् (=इन्द्र एव) नमस्युभिः (=नमसा स्तोत्रेण पूजयितृभिः) वने (=अरण्ये) वचस्यते (=स्तूयते) । यद् (=यदा) [च] मघवा (=धनवान् इन्द्रः) क्षेमेण (=रक्षणेच्छया) धेनां (=स्तुतिम्) इन्वति (=प्रेरयति=स्तोतृभिः कारयति) [तदा] वृषा (=सेचनसमर्थो वीर्यवान् इन्द्रः) छन्दुः (=छन्दोभिः स्तोतृभिः स्तवनीयः) [सत्यमेव] भवति वृषा (=वीर्यवान् इन्द्रो) हर्यतः (=कमनीयो) [भवति=भवत्येव] ॥

अत्रेदमुक्तं भवति । इन्द्रो वृत्रहननादीनि कर्माणि कृत्वा स्वबलं जनेषु प्रकटयति । तेन स्तोतारस्तमेव वने स्तुवन्ति । न च असत्येव स्तुत्यर्हत्वे स्तूयते सः । अपि तु तस्य स्तोत्रकरणे यदा यदा प्रेरणा जायते तदा तदा वीर्यसंपन्न इन्द्रः सत्यमेव=छन्दनीयः कमनीयश्च अर्थात् स्तवनीयो भवतीति ॥

४३ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा. या ठिकाणीं 'कर्म' म्हणजे सोमादिक अर्पण करून जें यज्ञादिक कर्म लोक करितात तें समजावयाचें.

'प्रत्यक्ष कार्य.' म्हणजे वृत्राला मारणें, उदकें खालीं पाडणें इत्यादि जीं मोठीं कार्यें तीं करण्याला.

'पुढें करीत असतात'='पुरोहितः' अक्षरशः 'पुढें केलेला [असतो].' 'पुरोहित' या शब्दाचा हा मूळ अर्थ येथें आला आहे तिकडेस लक्ष द्यावें. आपल्याऐवजी अथवा दुसऱ्याच्या ऐवजीं पुढें केलेला अथवा पुढें ठेविलेला तो 'पुरोहित.' आपण आपल्याऐवजीं अग्नीला 'पुढें करितों' आणि देवांकडेस आम्हांविषयीं बोलावयास लावितों म्हणून तो 'पुरोहित' होय कांहीं धर्मसंबंधी विद्वत्तायुक्त कर्म करावयाचें असलें आणि तें करण्यासाठीं कोणाहि विद्वान् मनुष्याची आपण योजना केली म्हणजे तो 'पुरोहित' होय. केवळ पुरोहित बोवाचा जन्मातें मुलगा असला म्हणजे तितक्यावरूनच तो 'पुरोहित' होत नाहीं.

४. लोकांत आपलें सुंदर बळ प्रगट करणाऱ्या त्या इंद्राचीच स्तुति भाविकजन वनांत करितात. जेव्हां मघवा कृपा करून स्तुतीची प्रेरणा करितो [ तेव्हां ] वीर्यवान् [ मघवा ] स्तवनीय असतोच, वीर्यवान् [ मघवा ] प्रीतिपात्र [असतोच असतो].

4. Proclaiming his own beautiful might among the people, he—Indra—alone is praised by the pious in the forest. The hero [Indra] is praiseworthy, the hero [is] loveable [indeed], when [he] the Maghavà inspires the prayer with a desire to protect.

४. 'वृत्रहननादि मोठमोठीं कामें करून इन्द्र आपलें बळ लोकांत प्रगट करीत असतो. तेणेंकरून भाविक जन त्याचेंच स्तोत्र रानांत गातात. आणि गातात तें उगीच अयोग्य म्हणजे इंद्रास तशी योग्यता नसतां उगीच गातात असें नाहीं. तर जेव्हां त्याचें स्तोत्र करण्याची प्रेरणा लोकांस होते, तेव्हां तो खरोखरच स्तवनीय आणि प्रीतिपात्र असतो' असा या मंत्राचा भावार्थ आहे.

हा जरी भावार्थ उघड दिसून येतो, तरी या मंत्रांत एक दोन अडचणी आहेत. १ ली, 'वनांत' स्तुति गातात म्हणजे काय? दुसऱ्या पादांत 'लोकांत' (जनेषु) असें पद आहे तेव्हां, 'वनांत' आणि 'लोकांत' यांच्यामध्यें कांहीं विरोध विवक्षित आहे कीं काय? भाविक जन वनांत स्तुति गातात यावरून ऋषिजन अरण्यांत राहत होते असें सिद्ध होत नाहीं, कारण त्याविरुद्ध पुष्कळ ज्ञापकें आहेत. तेव्हां 'रानोमाळ,' 'रानीं वनीं' म्हणजे 'जिकडे तिकडे' असा अर्थ समजावयाचा असेल तरी कोण जाणे. २ री अडचण ही कीं 'कृपा करून' ('क्षेमेण') म्हणजे काय? आणि या पदाचें येथें प्रयोजन काय आहे? सायणाचार्य 'क्षेमकरेण मनसा' = 'बरें करणाऱ्या मनानें' असा अर्थ करितात, त्यालाच अनुसरून आम्हीं निर्वाह केला आहे. इंद्राची स्तुति केल्यापासून कल्याण होतें असें तात्पर्य दिसतें, आणि तें व्हावें अशी इच्छा धरूनच इंद्र आपली स्तुति लोकांनीं करावी अशी प्रेरणा तो लोकांच्या मनांत करितो असें विवक्षित दिसतें.

'स्तुतीची प्रेरणा करितो' = 'धेनाम् इन्वति.' हा, 'धेना' शब्दाचा अर्थ आम्हीं सायणानुसारें केला आहे आणि आम्हांस वाटतें तो खरा आहे. शार्मण्य पंडित ग्रासमन 'धेना' म्हणजे 'गाय' असा अर्थ करितात, आणि 'क्षेमेण धेनां मघवा यद् इन्वति' याचा अर्थ 'सुखरूपपणें गाईस हांकतो' असें भाषांतर करूं इच्छितात. परंतु 'गाय' हा अर्थ सायणांनींच जरी (३.३४. ३ यांत)

स इन्महानि समिथानि मज्मना कृणोति युध्म ओजसा जनेभ्यः ।
अधा चन श्रद्दधति त्विषीमत इन्द्राय वज्रं निघनिघ्नते वधम् ॥ ५ ॥ १९ ॥

सः । इत् । महानि । सम्ऽइथानि । मज्मना । कृणोति । युध्मः । ओजसा । जनेभ्यः ।
अध । चन । श्रत् । दधति । त्विषिऽमते । इन्द्राय । वज्रम् । निऽघनिघ्नते । वधम् ॥ ५ ॥ १९ ॥

## भाषायाम्.

५. स इत् (=स एव) युध्मः (=योद्धा) [इन्द्रः] मज्मना (=स्वकीयेन बलेन) [तथा] ओजसा (=स्वतेजसा) [च] जनेभ्यः (=जनहितार्थं) महानि (=महान्ति) समिथानि (=युद्धानि) [वृत्रादिभिः सह] कृणोति (=करोति)। अधा चन (=अत एव कारणाद्) वधं (=वधकरं) वज्रं निघनिघ्नते (=पुनःपुनर्घ्नते वज्रस्य प्रहारप्राचुर्येण दारुणं युद्धं कुर्वते) त्विषीमते (=दीप्तिमते) इन्द्राय [जनाः] श्रद्दधति (=अयं बलवानस्त्यस्माकं रक्षणं कर्तुम् इति श्रद्धां धारयन्ति)॥

दिला आहे आणि दुसऱ्या एक दोन स्थळीं इष्ट दिसतो तथापि तो सर्वत्र नसत नाहीं, आणि ' स्तुति ' हा अर्थ सायण बहुतकरून सर्वत्र देतात; यावरून तो त्यांच्या पदरचा अर्थ नव्हे, परंपरागत आलेला आहे. तो एकीकडे टाकून अन्यथा कल्पना करण्यांत कांहींच लाभ नाहीं असें आम्हांस वाटतें (ऋ. १०. १०४. १०; १. १४१. १; ७. ९४. ४; ८. ३२. २२; १०. ४३. ६; १०. १०४. ३ हे मंत्र आणि त्यांजवरील भाष्य पहा).

' प्रीतिपात्र '=' हर्यतः.' हें प्रथमेचें एकवचन आहे. ' लोकांनीं ज्याचा प्रीति करावी तो ' असा अर्थ आहे. ऋ. १०. ९६. १०. आणि ऋ. ३. ५. ३ यांजवरील भाष्य पहा.

' आपलें सुंदर बळ '=' चारु इन्द्रियम्.' ' आपलें बळ ' हा अर्थ ' इन्द्रियम् ' इतक्या शब्दाचा आहे. ' इन्द्रिय ' शब्द तर आपल्या ओळखीचा आहेच, पण त्याची उत्पत्ति कशी झाली तें या मंत्रावरून सुंदर रीतीनें दिसून येतें. ' इन्द्रियम् ' म्हणजे ' इन्द्राचें आत्मत्व ' =' इन्द्रपण,' अर्थात् ' इन्द्राचें बळ.' यावरून ' इन्द्राच्या प्रभुत्वासारिखें प्रभुत्व', किंवा ' बळ ' ' इन्द्र देतो तसलें धन ' असे अर्थ होऊं लागले. इंद्रानें लोकांस

५. तोच योद्धा जन[हिता]-साठीं [आपल्या] बळानें [आणि] प्रतापानें मोठीं युद्धें करितो. यास्तवच घातक वज्राचा प्रहारामागें प्रहार करणाऱ्या महाबळी इंद्रावर [लोक] विश्वास ठेवितात.

5. That warrior alone fights for the people great battles with [his] power [and] valour. It is therefore that [they] believe in Indra possessed of puissance, [and] used to strike over and over again the deadly thunderbolt.

---

'इंद्रिय (इंद्रपण) दाखविलें' म्हणजे इंद्रानें आपली स्वताह्याची शक्ति दाखविली, हा प्रयोग स्वाभाविक आहे. ऋ. १. ८५. २ यांत मरुतांनीं इंद्रास उत्तेजन येण्याजोगें भाषण करून इंद्रिय उत्पन्न केलें (जनयन्तः इन्द्रियम्) असें सांगितलें आहे; म्हणजे, इंद्राचें बळ उत्पन्न केलें. ऋ. १. १११. २ यांत ऋषि ऋभु या नांवाच्या देवांस म्हणतो कीं आम्हांस इंद्र देतो तसें धन अथवा बळ द्या (=धासथ इन्द्रियम्). यावरून उत्तरोत्तर बळ इतकाच अर्थ होऊं लागला आणि नंतर 'बळ संपादण्याचे जे अवयव तें' हा शेवटील अर्थ आतां प्रसिद्ध आहेच. जसा इंद्रशब्दापासून 'इंद्रिय' तसा रुद्रशब्दापासून 'रुद्रिय' हा शब्द निघाला आहे आणि त्याचाहि अर्थ 'रुद्राचें बळ' असा होतो.

---

५. 'जनांचें हित करण्यासाठीं महायोद्धा जो इंद्र, तोच आपल्या बळानें आणि प्रभावानें वृत्रादिक शत्रूंबरोबर मोठें प्रचंड युद्ध करून मेघोदकांची वृष्टि करितो. आणि यास्तवच इंद्र हा बलवान् आहे, तो आपलें संरक्षण करील, त्यासारिखा वज्रप्रहारानें शत्रूंचा नाश करणारा दुसरा कोणी नाहीं, असा सर्वांनां भरंवसा असतो.'

'बळानें'='मज्मना.' सायणाचार्य या ठिकाणीं 'मज्मना' शब्दाचा अर्थ 'शुद्ध करणार' असा विशेषणार्थी करून 'प्रतापानें' ('ओजसा') याशीं संबंध लाविताक. परंतु 'मज्मन्' शब्दाचा अर्थ 'बळ' असा होतो याविषयीं ऋ. ७. ८२. ५, १. ६४. ३ हे मंत्र, आणि त्यांजवरील सायणाचेंच भाष्य पहा. कितीएक पाश्चात्य विद्वान् 'मज्मन्' म्हणजे 'मोटेपणा,' 'महिमा' असा अर्थ करितात. तो जरी शब्दशास्त्रानुसारें संभवतो तरी पर्यवसानीं 'बळ' हाच अर्थ वेदांत आहे.

'जन[हिता]साठीं'='जनेभ्यः.' हें जनहित म्हणजे वृष्टि होऊन जनांस उदक मिळावें हें होय. ही चतुर्थी ध्यानांत ठेवण्याजोगी आहे.

**स हि श्रवस्युः सदनानि कृत्रिमा क्ष्मया वृधान ओजसा विनाशयन्। ज्योतींषि कृण्वन्नवृकाणि यज्यवेऽव सुक्रतुः सर्तवा अपः सृजत् ॥ ६ ॥**

सः । हि । श्रवस्युः । सदनानि । कृत्रिमा । क्ष्मया । वृधानः । ओजसा । विऽनाशयन् ।
ज्योतींषि । कृण्वन् । अवृकाणि । यज्यवे । अव । सुऽक्रतुः । सर्तवै ॥ अपः । सृजत् ॥ ६ ॥

भाषायाम्.

६. हि (=यस्मात् कारणात्) स [इन्द्रः] श्रवस्युः (=कीर्तिमात्मन इच्छन्) क्ष्मया वृधानः (=पृथिव्या समानं वर्धमानः) ओजसा (=स्वतेजसा) कृत्रिमाणि (=क्रियया रचितानि) [वृत्रादीनां] सदनानि (=गृहाणि) विनाशयन् (=विध्वंसयन्) [सन्] [तेन च] यज्यवे (=यष्ट्रे=यजमानाय= उपासकहितार्थं) ज्योतींषि (=सूर्यादीनि तेजांसि) अवृकाणि (=आवरकवृत्रमुक्तानि) कृण्वन् (=कुर्वन्) [सन्] सुक्रतुः (=शोभनप्रज्ञावान्) [इन्द्रः]. अपः (=उदकानि) सर्तवै (=सर्तुं=यथा ताः सरन्ति वहन्ति तथा) अव सृजत् (=अवासृजत्=भूमावावर्जितवान्) ॥

अत्रेदमुक्तम् । वृत्रहा आकाशे. बहुरूपवर्णयुक्तानि मेघरूपाणि गृहाणि रचयति। तानि सर्वाणि इन्द्रः पृथिव्या समानं स्थूलो भूत्वा विनाशयति यथा ऋषयस्तस्य कीर्तिं गायेयुरिति । वृत्ररचितानि च गृहाणि नाशयित्वा महाप्रज्ञ इन्द्रः स्वोपासकहितार्थं सूर्यादीनि तेजांसि पूर्वं वृत्रेण निरुद्धानि वृत्रनिरोधमुक्तानि करोति तथा मेघोदकान्यपि वृत्रनिरोधमुक्तानि कृत्वा तानि भूमौ वर्षयति यथा तानि नदीप्रवाहद्वारा सरन्तीति । एतस्मादेव कारणाद् इन्द्राय श्रद्धतीति पूर्वस्थेन सह हेः संबन्धः ॥

'विश्वास ठेवितात'='श्रद्धति.' म्हणजे, इंद्र आपलें संरक्षण करण्यास शक्तिमान आहे असा भरंवसा ठेवितात.

वंशस्थ वृत्ताला आणि या मंत्राला किती थोडें अंतर आहे पहा:—

स इन्महानि समिथानि मज्मना ।
कृणोति युध्मः ओजसा जनेभ्यः ।
अधा चन श्रद्धति त्विषीमते ।
इन्द्राय वज्रं निघनिघ्नते वधम् ।

६. कारण कीं कीर्तिविषयीं उत्कंठित [असा] तो [इंद्र] पृथ्वीप्रमाणें मोठा होऊन [आपल्या] बळानें [शत्रूचीं] कृत्रिम घरें विध्वंसणारा, [आणि] उपासकांच्या हितासाठीं [सूर्यादि] तेजें प्रगट करणारा, [आणि] सुप्रज्ञासंपन्न [असा होत्साता], उदकांस खालीं सोडून वाहविता झाला.

6. For he, desirous of renown, grew as large as the earth, [and] destroying with [his] splendor the artificial homes [of the demons], [and] freeing the heavenly lights from [their] besieger,—he, the possessor of good wisdom—let down the water that they might flow.

---

६. इन्द्रावर भरंवसा ठेवितात म्हणून वरच्या मंत्रांत सांगितलें, त्याचें कारण या मंत्रांत स्पष्ट करून सांगतोः—' कारण कीं वृत्र हा आकाशांत अभ्ररूपी अनेक रंगांचीं आणि अनेक आकृतींचीं घरें जिकडे तिकडे बांधितो, तीं सर्व इन्द्र पृथ्वीप्रमाणें मोठा वाढतो आणि आपल्या तेजानें नाहींसीं करितो, म्हणजे मेघ फोडून नाहींसे करून टाकितो; आणि तसें करून सूर्यचंद्रतारकादिक जीं अनेक तेजें आकाशांत आहेत आणि ज्यांच्या प्रकाशानें सकल प्रजांचे सर्व कांहीं व्यापार चालतात आणि असें असतांहि ज्यांस वृत्र अंधकारानें आणि ढगांनीं वगैरे आच्छादित करितो, त्यांस त्या आच्छादनापासून मुक्त करितो, आणि मेघांतून उदकें वृष्टिरूपानें खालीं पाडितो, कीं जीं नदीप्रवाहरूपानें जमिनीवरून वाहत जातात.' इन्द्रानें वृत्रास मारून प्रकाश आणि उदकें हीं आपल्या उपासकांच्या हितासाठीं मोकळीं केलीं हीच गोष्ट रूपान्तरानें या ऋचेंत सांगितली आहे.

' कीर्तिविषयीं उत्कंठित '=' श्रवस्युः.' म्हणजे आपली कीर्ति ऋषींनीं गावी अशी उत्कंठा म्हणजे इच्छा आहे ज्यास तो; आपली कीर्ति ऋत्विजन गातील अशा हेतूनें.

' पृथिवीप्रमाणें मोठा होऊन '= ' क्ष्मया वृधानः.' म्हणजे पृथिवीएवढा मोठा, पृथिवी समान स्थूळ असा जो इंद्र इतकेंच विवक्षित दिसतें. या शब्दांचा दुसरा अर्थ करून कसा निर्वाह करावा समजत नाहीं. ' पृथिवीशीं आनंद पावणारा ' असा जो पाश्चिमात्य पंडित अर्थ करितात तो चिंत्य दिसतो.

' कृत्रिम घरें '= ' कृत्रिमा सदनानि.' म्हणजे साधारण घरांप्रमाणें स्थिर राहणारीं घरें नव्हेत, तर घटकेंत एक रंग घटकेंत दुसराच रंग, आतां एक आकृति आणि पुनः लागलीच दुसरी

दानाय मनः सोमपावन्नस्तु तेऽर्वाञ्चा हरी वन्दनश्रुदा कृधि ।
यमिष्ठासः सारथयो य इन्द्र ते न त्वा केता आ दभ्नुवन्ति भूर्णयः॥७

दानाय । मनः । सोमऽपावन् । अस्तु । ते । अर्वाञ्चा । हरी इति ।
वन्दनऽश्रुत् । आ । कृधि ।
यमिष्ठासः । सारथयः । ये । इन्द्र । ते । न । त्वा । केताः । आ ।
दभ्नुवन्ति । भूर्णयः ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. हे सोमपावन् (=सोमस्य पातः) [इन्द्र], ते (=तव) मनः दानायास्तु (=अस्मभ्यम् अभिमतं दातुं कृतनिश्चयं भवतु), हे वन्दनश्रुत् (=वन्दनस्य स्तोत्रस्य श्रोतः) [इन्द्र], [तव] हरी (=एतन्नामकावश्वौ) अर्वाञ्चा (=अर्वाञ्चौ=अस्मद्यज्ञाभिमुखौ) आकृधि (=आकुरु=आभिमुख्येन स्थापय)। ये हि, हे इन्द्र, ते (=तव) सारथयः [सन्ति] [ते] यमिष्ठासः (=यमिष्ठाः=अतिशयेन यन्तारः=अश्वनियमने अतिकुशलाः) [भवन्ति], [तेन च] [तव] भूर्णयः (=क्षिप्रगामिनः) केताः (=केतवः=अश्वाः) त्वा (=त्वां) न आदभ्नुवन्ति (=न हिंसन्ति) ॥

हे इन्द्र, त्वम् अत्रागत्य नः सोमं पीत्वा अस्मभ्यम् अस्मदभीष्टं देहि । न च तवागमनसमये तव क्षिप्रा अश्वास्त्वाम् उच्चावचप्रदेशेषु पादाघातादिना पतित्वा हिंसिष्यन्ति. तव सारथीनाम् अश्वनियमनेतिकुशलत्वादिति भावगतम् ॥

आकृति, अशी ज्यांची अवस्था होत असते तीं. हीं घरें म्हणजे आकाशांत जी ढगें अनेक प्रकारचीं अनेक वेळीं येतात आणि प्रकाशास आणि उदकांस अडवून जणुं टाकितात तीं समजावयाचीं आहेत. त्यांस 'कृत्रिम,' हें विशेषण चांगलें साजतें.

'उदकांस खालीं सोडून वाहविता झाला'=' अपः सर्तवै अव सृजत्.' अक्षरशः अर्थ, 'उदकांस वाहण्यासाठी खालीं सोडिता झाला,' म्हणजे 'उदकांनीं वाहावें म्हणून त्यांस आकाशांतून खालीं सोडिता झाला.' 'सोडून वाहविता झाला' हा भूतकाळ घालण्याचें कारण इतकेंच कीं, इंद्रानें पूर्वी वृष्टि केली ती अशा रीतीनें केली. अजून तरी सदैव तशी करीत असतोच म्हणून वर्तमानकाळीं भाषांतर केलें तरी चालेल. पर पृथिवीवर पाऊस कोठून पडला? असा प्रश्न कल्पून ऋषीनें या मंत्रांत उत्तर दिलें आहे यास्तव भूतकाळाचा प्रयोग घातला आहे.

७. हे सोम पिणाऱ्या इंद्रा, तुझें मन [आम्हांस] [इच्छिलेलें] देण्याला [सिद्ध] असो. हे स्तवन-श्रोत्या इंद्रा, [तूं] [आपले] घोडे इकडे वळीव. हे इंद्रा, तुझे जे सारथि [आहेत] [ते] घोडे हाकण्याविषयीं परमकुशल [आहेत]. तुला [तुझे] वेगवान् घोडे दुखविणार नाहींत.

7. May thy will, O drinker of the Soma, be disposed to liberality; O [Indra] that hearest the praise, turn [thy] pair of tawny horses hitherward. [For] those who [are] thy chariot-drivers [are] most skilful, [thy] swift horses will not hurt thee.

---

हा मंत्र वंशस्थाप्रमाणें होण्यास थोडी च अडचण आहे:-

स हि श्रवस्युः सदनानि कृत्रिमा ।
क्ष्मया वृधानः ओजसा विनाशयन् ।
ज्योतींषि कृण्वन्नवृकाणि यज्यवे ।
अव सुक्रतुः सर्तवा अपः सृजत् ॥

---

७. या मंत्रांत ऋषि असें प्रार्थितो कीं, 'हे इंद्रा, तूं आपले घोडे इकडे वळीव, आणि आमच्या सोमाप्रत ये. येतांनां तुझे अतिवेगवान घोडे मस्ती वगैरे करून तुला दुःख होई असें करणार नाहींत, कारण कीं तुझे जे सारथि आहेत, ते रथ चालविण्याविषयीं फारच कुशल आहेत.

'तुझें मन आम्हांस इच्छिलेलें देण्याला सिद्ध असो' = 'दानाय मनः अस्तु ते.' हा अर्थ सायणांस अनुसरून आम्हीं केला आहे. परंतु 'सोमपावन्' (=सोम पिणाऱ्या) या हेतुगर्भ विशेषणाच्या संबोधनावरून पाहातां, आणि मंत्रांतील वाक्यसंदर्भाच्या साहचर्यावरून पाहातां, आणि 'दान' शब्दाचा अर्थ देवांस सोमादिक जें अर्पण करितात तें असाहि होतो (सू. ४८. मं. ४ याजवरील टीप पहा) यावरून पाहातां, 'तुझें मन आम्हीं अर्पण केलेल्या या सोमाप्रत असो,' म्हणजे 'या सोमाकडेस यावें असें तुला वाटो' असा अर्थ चांगला संभवतो.

'स्तवनश्रोत्या' = 'वन्दनश्रुत्.' ज्याची प्रार्थना करावयाची त्याला हें विशेषण लावण्यास अत्यंत योग्य आहे. यांत देवांची बुद्धि मनुष्यांविषयीं क्रूर नाहीं, तर ते जें त्याचें स्तोत्र गातात तें ऐकून घेत असतात असें देवांविषयीं योग्य ज्ञान दर्शविलें आहे.

'तुला तुझे वेगवान् घोडे दुखविणार नाहींत' = 'न त्वा केताः आ दभ्नुवन्ति भूर्णयः.' आम्ही 'केत' शब्द 'केतु'-शब्दार्थक आहे असें समजून भाषांतर

**अप्रक्षितं वसु बिभर्षि हस्तयोरषाळ्हं सहस्तन्वि श्रुतो दधे ।**
**आवृतासोऽवतासो न कर्तृभिस्तनूषु ते क्रतव इन्द्र भूरयः॥८॥२०॥**

अप्रऽक्षितम् । वसु । बिभर्षि । हस्तयोः । अषाळ्हम् । सहः । तन्वि । श्रुतः । दधे ।
आऽवृतासः । अवतासः । न । कर्तृऽभिः । तनूषु । ते । क्रतवः । इन्द्र । भूरयः ॥ ८ ॥ २० ॥

## भाषायाम्.

८. [हे इन्द्र], [त्वं] हस्तयोः (=त्वदीययोः करयोः) [स्तोतृभ्यो दातुम्] अप्रक्षितं (=प्रक्षेयरहितं) वसु (=धनं) बिभर्षि (=धारयसि)। [तथा] [स्तोतारं रक्षितुं] श्रुता (=विख्यातः) [त्वम्] अषाळ्हम् (=अपराजितं) सहः (=बलं) तन्वि (=तन्वां=तव शरीरे आत्मनि) दधे (=धारयसि)। [अपि च] हे इन्द्र, ते तनूषु (=त्वदीयेषु शरीरेषु=विविधासु विभूतिषु) [जलोद्धर्तृभिः] आवृतासः (=आवृताः =वेष्टिता) अवतासो न (=आवृताः=कूपा इव), कर्तृभिः (=यज्ञकर्तृभिः) [जिज्ञासार्थमागतैः] [आवृताः] क्रतवः (=प्रज्ञाः) भूरयः (=बहवः) [सन्ति]॥

अत्रेदं भावमतम्। इन्द्रो न केवलं यजमानेभ्यो धनं दातुं सिद्धो वर्तते अपि तु तान् भयादिभ्यो रक्षितुं बलवान् अस्ति। तथा न केवलम् इन्द्रस्य धनदातृत्वं बलं च प्रसिद्धं तर्हि तस्य विविधाः प्रज्ञा अपि प्रसिद्धा वर्तन्ते ताश्च, जलोद्धरणार्थमागतैः पुरुषैः कूपा इव, ज्ञानग्रहणार्थम् आगतैरिन्द्रस्योपासकैर्वेष्टिता भवन्तीति॥

केलें आहे (' केतु ' शब्दाचा अर्थ 'घोडा' कसा होतो याविषयीं सू. ५० मं. १ याजवरील सायणभाष्य पहा). आणि ' भूर्णि ' शब्दाचा ' वेगवान् ' असा अर्थ तर ऋग्वेदावरील सायणभाष्यांत प्रसिद्ध आहे ( ऋ. ९. ५०. ४; ८. २५. १५; ९. ७३. ४; ९. १७. १ आणि ९. ४१. १ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा). यावरून आमचा अर्थ सिद्ध होतो असें आम्हांस वाटतें. सायणाचार्य या मधल्या पादाचा अर्थ "[आयुध]-धारी शत्रु तुला दुखवीत नाहींत " असा एक आणि " तीक्ष्ण शत्रु तुला दुखवीत नाहींत " हा एक असे दोन करितात. ' केत ' शब्द ऋग्वेदांत पुष्कळ स्थळीं आलेला आहे पण बहुतकरून ' प्रज्ञान ' या अर्थी आहे. तरी ' केतु ' हाहि त्याच अर्थी आलेला आहे आणि दोनहि शब्दांची व्युत्पत्ति एकच धातूपासून आहे.

वरचा मंत्र जर वंशस्थ श्लोकाप्रमाणें सहज वाचतां येतो तर यांत किती अंतर आहे तें पहाः—

८. [ हे इंद्रा• ], [ तूं ] अक्षय धन [ आपल्या ] हातांत धरीत असतोस. कीर्तिमान् [ असा जो तूं तो ] आपल्या अंगीं अपराजित बळ धारण करितोस. हे इंद्रा, [ पाणी काढणाऱ्या लोकांनीं ] जशा विहिरी [ घेरलेल्या असतात तशा ] [ यज्ञ ]-कर्त्यांनीं घेरलेल्या प्रज्ञा तुझ्या अंगीं अनेक आहेत.

8. Indestructible wealth, [ O ] Indra ], dost [ thou ] hold in [thy] hands. Renowned [ Indra ] holds in himself puissance that has not been conquered. O Indra, in thee [ are ] numerous wisdoms surrounded by [ consulting ] sacrificers, as wells [ are surrounded by persons to draw water ].

दानाय मनः सोमपावन्नस्तु ते ।
अर्वाञ्चा हरी वन्दनश्रुदा कृधि ।
यमिष्ठासः सारथयो य इन्द्र ते ।
न त्वा केता आ दभ्नुवन्ति भूर्णयः॥

आणि दोनहि मंत्रांचें वृत्त 'जगती' आहे. यावरून पाहतां, अमुक वृत्तांत अमुक अक्षरें असावीं आणि पादांच्या शेवटीं शेवटीं अमुक दीर्घ अमुक ऱ्हस्व असावीं असें जरी धरून सूक्त रचीत, तरी इतर अक्षरें ऱ्हस्व असावीं किंवा दीर्घ असावीं याविषयीं आलीकडे जसा आम्हीं इतर वृत्तप्रमाणें वंशस्थ वृत्ताविषयीं कडक नियम पाळितों, तसा वेदयुगांत पाळीत नसत असें उघड दिसून येतें, आणि याविषयीं आश्चर्य वाटण्यास कारण नाहीं; कारण आपल्या ओवीवृत्तांत जरी कांहीं साधारण नियम आहेत, तरी अमुक अक्षर ऱ्हस्वच आणि अमुक अक्षर दीर्घच असावें असा नियम कोणीहि कवि पाळीत नाहींत. आणि अभंग आणि अनुष्टुप् या वृत्तांविषयीं तरी असेंच म्हटलें पाहिजे.

८. हा सूक्ताचा उपसंहार आहे. आणि यांत इंद्राची कृपा भक्तांवर केवढी असते आणि ती कोणकोणत्या प्रकारची तें यांत सांगितलें आहे. ऋषि म्हणतोः— 'उपासकांस धन देण्यासाठीं इंद्र इतका तयार असतो कीं, तो तें हातांतच जणुं घेऊन उभा असतो; आणि भयापासून वगैरे तारण्यासाठीं इंद्राच्या अंगीं पुष्कळ बळ आहे हें प्रसिद्धच होय, आणि तें बळ इतकें आहे कीं, त्याचा कोणीहि शत्रु पराजय करूं शकत नाहीं; आणि इंद्र धन आणि बळ यांहींच संपन्न आहे असें नाहीं, तर त्याच्या अंगीं अनेक प्रसंगीं अनेक रीतीनें उपयोगीं पडणाऱ्या अशा अनेक प्रज्ञा म्हणजे शहाणपणें भरलेलीं आहेत. आणि पाण्यानें भरलेल्या कूपाजवळ पाणी काढून घेण्यास आलेलीं मनुष्यें जशीं त्या कूपास वेष्टितात तसे इंद्राजवळ

## सूक्तम् ५६.

आङ्गिरसः सव्य ऋषिः । इन्द्रो देवता । जगती च्छन्दः ॥

**एष प्र पूर्वीरव तस्य चम्रिषोऽत्यो न योषामुदयंस्त भुर्वणिः ।**
**दक्षं महे पाययते हिरण्ययं रथमावृत्या हरियोगमृभ्वसम् ॥ १ ॥**

एषः । प्र । पूर्वीः । अव । तस्य । चम्रिषः । अत्यः । न । योषाम् । उत् । अयंस्त । भुर्वणिः ।
दक्षम् । महे । पाययते । हिरण्ययम् । रथम् । आऽवृत्य । हरिऽयोगम् । ऋभ्वसम् ॥ १ ॥

### भाषार्थम्.

१. एष भुर्वणिः (=अत्ता=सोमस्य विशेषेण भक्षयिता) [इन्द्रः], अत्यो योषां न (=अश्वो वडवाम् इव=अश्वो वडवामारोहति तद्वत्), तस्य (=यजमानस्य) पूर्वीः (=प्रभूताः) चम्रिषः (=चमूषु स्थिताः सोमरूपा इषः=अन्नानि) प्रावोदयंस्त (=तासामुपरि प्रकर्षेण आत्मानमुद्यच्छति=प्रकर्षेणारोहति)। [स इन्द्रो] हिरण्ययं (सुवर्णमयं) हरियोगं (=हरिद्वर्णाश्वयुक्तम्) ऋभ्वसं (=महान्तं) रथम् आवृत्य (=अस्मदाभिमुख्येन प्रवर्त्य तं रथमधिष्ठाय अत्रागत्य) दक्षं (=प्रवृद्धमात्मानं=स्वकीयबलं) महे (=महते) [कर्मणे] (=वृत्रवधादि महत् कर्म कर्तुं) [सोमं] पाययते (=पानं कारयति=महत् कर्म कर्तुं बलं यथा वर्धते तथा स्वयमेव पिबति) ॥

अस्यामृचि इन्द्रपदस्याभावात् 'एष' इत्यस्य तथा 'तस्य' इत्यस्य संबन्धग्रहणे किंचिद्दुर्बोधत्वमनिवार्यम् । तदपि इन्द्रः स्वर्णमयं स्वकीयं महान्तं हरिद्वर्णाश्वयुक्तं रथमधिष्ठाय अत्रागत्य यजमानेनार्पितसोमलक्षणानि पेयानि, वडवां कामी वाजीव, आक्रमति वृत्रवधादि च महत् कर्म कर्तुं स्वकीयं बलं यथा वर्धते तथा सोमपानं करोतीति भावगतं स्पष्टम् ॥

शहाणपणा विचारण्यास आलेले यजमान म्हणजे इंद्रभक्त इंद्राच्या प्रज्ञांस वेढून टाकितात.

या मंत्रांत प्रथम द्वितीयपुरुषीं निर्देश असून नंतर तृतीयपुरुषीं आणि पुनः शेवटीं तृतीयपुरुषी निर्देश आहे. वस्तुतः सगळ्या मंत्रांत द्वितीयपुरुषच विवक्षित आहे, परंतु वृत्तानुसारें 'दधे' हें रूप मध्यें घालावें लागल्यामुळें पुरुषव्यतिरेक झाला आहे.

'[यज्ञ]कर्त्यांनी' = 'कर्तृभिः' ऋ. ६. १०. १; ७. ६२. १ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पाहा. 'तुझ्या अंगीं' = 'तनूषु.' हें अनेक-

## सूक्त ५६.

ऋषि–सव्य ( पूर्व सूक्ताचा जो कर्ता तोच ). देवता–इंद्र. वृत्त–जगती.

१. घोडा घोडी[वर चढतो] तसा हा [पहा] सोमपी [इंद्र] त्या [यजमाना]चे पात्रस्थ विपुळ सोमरसांवर चढत आहे! [इंद्र] [आपल्या] पिंवळे घोडे जोडलेल्या सुवर्णमय महारथांत बसून येऊन मोठें [काम करण्या]ची शक्ति येण्यासाठीं सोम पीत आहे.

## HYMN 56.

To *Indra*. By *Savya* ( author of the previous hymn ). Metre—*Jagatî*.

1. This [ Soma ]-consuming [ Indra here ] alights on the plentiful drinks in the bowl of that [ sacrificer ], [ even ] as a stallion [ alights ] on a mare. [ Indra ], driving hither [ his ] great golden chariot, refreshes [ his ] vigour with the draught.

वचन कां योजिलें याविषयीं सायणाचार्य कांहीं सांगत नाहींत. ‘प्रज्ञा’ ( =क्रतवः ) हें अनेकवचन असल्यामुळें त्याच्या आकर्षणानें अनेकवचन झालें असावें एक, किंवा इंद्राच्या ज्या अनेक विभूति म्हणजे निरनिराळी रूपें तींच शरीरें असतील म्हणून अनेकवचन घातलें असावें एक. किंवा ‘अवयव’ या अर्थी अनेकवचनाचा प्रयोग असावा. पण इंद्राच्या अनेक विभूति सांगितलेल्या ऋग्वेदांत प्रसिद्ध नाहींत. परंतु ‘अवयव’ अथवा ‘अंगें’ या अर्थी ‘तनु’शब्दाचा अनेकवचनीं प्रयोग ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणी आढळतो. ऋ. १. १६२. २० आणि ५. ७०. ४ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा. तर तनूषु हें अनेकवचन ‘तन्वि’ या अर्थीच घातलें आहे असें समजावयाचें असा पर्यवसानीं शेवट दिसतो. अजून जसे विहिरीवर पाणी भरणारे लोक जाऊन जमत असतात तसेच वैदिक युगांतहि जमत असत असें या मंत्रांतील उपमेवरून उघड दिसून येतें. अनेक लोक पिणारे, पण विहीर एकच जशी, तसे इंद्राचे सेवक अनेक आहेत. ते एकट्या इंद्राच्याच अंगीं असलेल्या प्रज्ञेचा उपयोग करून घेतात असें उपमेचें तात्पर्य.

वंशस्थवृत्ताप्रमाणें हा मंत्र वसतो तो असाः—

अप्रक्षितं वसु बिभर्षि हस्तयोः ।<br>
अषाळ्हं सहस्तनुइ श्रुतो दधे ।<br>
आवृतासो अवतासो न कर्मभिः ।<br>
तनूषु ते क्रतव इन्द्र भूरयः ॥

१. हा मंत्र समजण्यास आपण अशी कल्पना केली पाहिजे कीं, कोणी यज-

**तं गूर्तयो नेमन्निषः परीणसः समुद्रं न संचरणे सनिष्यवः ।**
**पतिं दक्षस्य विदथस्य नू सहो गिरिं न वेना अधि रोह तेजसा॥२**

तम् । गूर्तयः । नेमन्ऽइषः । परीणसः । समुद्रम् । न । संऽचरणे । सनिष्यवः ।
पतिम् । दक्षस्य । विदथस्य । नु । सहः । गिरिम् । न । वेनाः । अधि । रोह । तेजसा ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. संचरणे (=समुद्रसंचारे कर्तव्ये सति) सनिष्यवः (=धनेच्छवो वणिजः) समुद्रं न (=समुद्रं यथा) [स्तुवन्ति] [तथा] नेमन्निषः (=नीतहविष्काः) परीणसः (=बहवो) गूर्तयः (=स्तोतारः) तम् [इन्द्रं] [स्तुवन्ति]। [तस्मात् हे स्तोतः], वेना (=कान्ताः स्त्रियः) गिरिं न (=पर्वतं यथा) [पुष्पापचयार्थम् अधिरोहन्ति=आरोहन्ति] [तथा] [त्वं] नू (=इदानीं) सहः (=बलवन्तं) दक्षस्य विदथस्य (=महतो यज्ञस्य) पतिं (=स्वामिनम्) [इन्द्रम्] अधिरोह (=आरोह=अभिमत-धनप्राप्त्यर्थम् उपसर्प)॥

पूर्वेणापि इयं दुर्बोधतरा। वयं तु सायणमनुसृत्य व्याख्यामः। तदपि 'गूर्तयः,' 'सहः,' 'वेनाः' 'अधिरोह' तथा 'तेजसा' इत्येतानि पदानि वादोत्पादकानि भवन्ति। 'गूर्ति'पदं स्तुत्यपरपर्यायं इति कृत्वा सायणोऽन्यत्र (ऋ. ९. १०५. १ १०. ६१.१५) व्याचष्टे। 'सहः' इत्यस्य बलवत्त्वार्थग्रहणे गरीयसैव विप्रतिपत्तिः। तथा 'तेज'इति शब्दस्य तेजस्विस्तोत्रार्थग्रहणे सायणानुसृतिः अनिर्वाहपक्ष एव साध्वी॥

मानानें 'कवीस' म्हणजे 'ऋजीस' इंद्राची स्तुति करण्यास सांगून आपण पात्रांत सोम घालून इंद्राला अर्पण करित आहे, तें पाहून स्तोत्रकर्ता म्हणतोः– 'हा पाहा इंद्र येऊन सोम पिऊं लागला आहे, आणि सोमपी इंद्र सोमरसांकडे इतक्या आवेशानें आणि उत्कंठेनें धांवला आहे कीं, तो घोडीच्या आंगावर जसा कामाविष्ट घोडा धांवतो तसा दिसतो. इंद्र आपल्या सोन्याच्या मोठ्या रथांत, कीं ज्याला पिंवळे घोडे जोडले आहेत त्यांत, बसून जात असतां या यजमानाचे सोम पाहून रथ इकडे फिरवून, वृत्रवधादिक जे मोठे पराक्रम ते करण्याकरितां आपल्या आंगीं बळ यावें म्हणून सोमपान करित आहे.' हा या मंत्राचा भावार्थ दिसतो. तरीहि हा मंत्र कांहींसा कठीण आहे. एक तर यांत दिलेली उपमा कांहींशी विलक्षण आहे इतकेंच नव्हे पण किंचित् दुर्बोधहि आहे; दुसरें असें कीं इंद्राविषयीं हा मंत्र असून इंद्र हें पद मंत्रांत मुळींच नाहीं, आणि

२. [समुद्रावर] संचार करावयाचा असला म्हणजे धनार्थी [लोक] जसे समुद्राला [स्तवितात], [तसे] अनेक स्तोत्रकर्ते हवि अर्पण करून त्या [इंद्रा]ला [स्तवितात]. [तर] [हे स्तोत्या], स्त्रिया जशा [पुष्पग्रहणार्थ] पर्वतावर चढतात [तसा तूं] आज महायज्ञाचा प्रबळ प्रभु [जो] इंद्र त्याजवर तेजस्वी स्तोत्रानें चढ.

2. As when a voyage is to be undertaken the merchants [pray] to the sea, many praisers after offering an oblation [pray to] that [Indra]. [Therefore] do thou, [O worshipper], just as beautiful damsels [mount] the hill [for flowers], now mount with resplendent prayer Indra the puissant lord of the mighty sacrifice.

---

तिसरें असें कीं, यजमानाचे सोमरस असें विवक्षित असतां यजमान हें पद मंत्रांत नाहीं, केवळ 'त्याचे' (=तस्य) इतकेंच आहे.

'सोमपी'='भुर्वणिः.' सायणाचार्य भक्षण करणारा असा अर्थ करितात त्याला अनुसरून आम्हीं भाषांतर केलें आहे.

'पात्रस्थ विपुळ सोमरसावर चढत आहे'='प्र पूर्वाः अव चम्विषः उत् अयंस्त.' यांत उपमेस अनुलक्षून 'अव' आणि 'उत्' यांचा अर्थ केला पाहिजे.

'महारथांत बसून इकडे येऊन'='ऋभ्वसं रथम् आवृत्य.' अक्षरशःअर्थ, 'महारथ इकडे फिरवून'. 'ऋभ्वस' याचा अर्थ 'ऋभ्वन्' शब्दाप्रमाणें महा अथवा मोठा असा आहे. प्रस्तुत स्थळीं सायणाचार्य तेजानें वेष्टित असा अर्थ करितात, तथापि ऋ. ५. ५७. ८, ८. ७७. ३, आणि ९. ८६. ५ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा.

'शक्ति येण्यासाठीं सोम पितो'='दक्षं प्रायपते.' अक्षरशः अर्थ, '[आपल्या] शक्तीला [सोम] पाजतो,' म्हणजे शक्ति वाढावी म्हणून सोमपान करितो. सोमपान केल्यानें शक्ति वाढते अथवा नसलेलें बळ अंगांत येतें, आणि त्यावरूनच इंद्र उपासकांनीं दिलेला सोम पिऊन त्यांजकरितां मोठमोठे पराक्रम करितो असें वेदांत प्रसिद्ध आहे.

वंशस्थ वृत्ताला आणि या मंत्राला किती थोडें अंतर आहे पहाः—

एष प्र पूर्वीरव तस्य चम्रिषः ।
अत्यो न योषामुदयंस्त भुर्वणिः ।
दक्षं महे पाययते हिरण्ययं ।
रथम् आवृत्या हरियोगम् ऋभ्वसम् ।

---

२. हा मंत्र फार कठीण आहे, आणि ऋषीच्या मनांत काय सांगावयाचें आहे तें स्पष्ट समजत नाहीं. च्यार पांच पदांचा अर्थ तर फारच संदिग्ध आहे. आम्हं

( सायणाचार्यांच्या भाष्याप्रमाणें ) केलेल्या भाषांतराचें तात्पर्य असें आहे कीं, एक स्तोता दुसऱ्या स्तोत्याला म्हणतो, ' समुद्रांत जहाज घालून सफर करावयाची असली म्हणजे जहाजांतून जाणारे व्यापारी जशी समुद्राची प्रार्थना करितात, तशी पुष्कळ स्तोते हवि अर्पण करून इष्ट वस्तु प्राप्त करून घ्यावयाच्या असतात तेव्हां इंद्राची स्तुति करितात; आणि आज आपणांस इष्टप्राप्ति करून घ्यावयाची आहे, तर फुलें तोडण्यास जशा स्त्रिया पर्वतावर चढतात तसा इष्टप्राप्तीसाठीं बलवान् इंद्रावर तूं चढ, म्हणजे इंद्राची तूं प्रार्थना कर.'

' समुद्रावर संचार करावयाचा असला म्हणजे धनार्थी लोक जसे '=' समुद्रं न संचरणे सनिष्यवः.' या शब्दांच्या अर्थाविषयीं संशय नाहीं, आणि या उपमेवरून असें दिसून येतें कीं वैदिक युगांत जहाजांत बसून समुद्रावर जात असत, आणि तारवांत बसण्यापूर्वी समुद्राची प्रार्थना करीत. हीच उपमा ऋग्वेदांत आणखी एका मंत्रांत आली आहे ती हीः—' नू रोदसी अहिना बुध्न्येन स्तुवीत देवी अप्येभिरिष्टैः । समुद्रं न संचरणे सनिष्यवो '=हे देवी द्यावापृथिवीहो धनेच्छु जन समुद्रावरून संचार करावयाचा असतां जसा समुद्राला स्तवितात तसा धनप्राप्तीसाठीं मी तुम्हांस अहिर्बुध्न्य देवासहित स्तवितों, ४.५५.६. यावरून समुद्रपर्यटन वेदांत प्रसिद्ध आहे आणि त्याविषयीं उपमा देण्यांत येते ती अशा रीतीनें कीं, समुद्रपर्यटनांत कांही वाईट नाही आणि त्यांत निषेध करण्यासारिखें कांहीं नाहीं असें ऋषिजन समजत; जर न समजते तर समुद्रावर संचार करावयास जाणारे धनेच्छु समुद्राला स्तवितात तसे आम्ही धनाची इच्छा करून स्तवूं या अशी उपमा घेतली नसती.

'स्तोत्रकर्ते'=' गूर्तयः.' ' गूर्ति' शब्दाचा अर्थ दुसऱ्या सर्व ठिकाणीं सायणांनीं स्तुति असा दिला आहे तरी या ठिकाणीं स्तोता असा जो अर्थ केला आहे तो निर्वाह करण्याच्या इच्छेनें केला आहे यांत संशय नाहीं.

'अनेक'='परीणसः' ऋ. ३. २४. ५; १. १६६. १४; १. १००. ९ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पाहा.

' हवि अर्पण करून '=' नेमघितः.' हाहि शब्द कठीण आहे. आम्ही सायणास अनुसरूनच अर्थ केला आहे. ऋग्वेदांत प्रयोगांतरें नाहींत.

' स्त्रिया जशा पुष्पग्रहणार्थ पर्वतावर चढतात '=' वेना गिरिं न.' ही उपमा चमत्कारिक आहे, कारण स्त्रिया फुलें तोडण्यास पर्वतावर जातात ही प्रसिद्ध उपमा देण्याइतकी होणें म्हणजे फुलें आणण्याकरितां पर्वतावर जाण्याचा फारच प्रचार असला पाहिजे. पण या उपमेविषयीं संशयाची गोष्ट अशी आहे कीं यांत ' फुलें तोडण्यास ' या अर्थाचा

शब्द मुळांत नाहीं. आणि सुंदर स्त्रिया असा 'वेना' शब्दाचा अर्थ जो आम्हीं आचार्यांप्रमाणें केला आहे त्याविषयीं तरी संशय नाहीं असें नाहीं.

'प्रबळ'='सहः.' हा तर अर्थ अगदीच वादग्रस्त आहे. असलेल्या शब्दाचा कांहीं तरी निर्वाह झाला पाहिजे म्हणून हें भाषांतर केलें आहे.

'तेजस्वी स्तोत्रानें'='तेजसा.' याच्या तरी अर्थाविषयीं संशय त्याप्रमाणेंच आहे आणि अनिर्वाहपक्षींच आम्हीं भाषांतर केलें आहे.

'चढ'='अधिरोह.' स्तोत्रानें इंद्रावर चढ म्हणजे इंद्राला स्तव असा भावार्थ आहे असें सायणाचार्य म्हणतात. आमचा अर्थ अक्षरशः आहे.

आतां हा आणि वरचा मंत्र दुर्बोध आहेत असें आम्हीं सांगितल्यावरून आपण निराश होण्यास कांहीं कारण नाहीं. कारण असेच दुर्बोध पुष्कळ मंत्र वेदांत येत जातील. आणि वेदाच्या प्राचीनतेविषयीं थोडासा विचार केला तर, किती एक मंत्रांचा अर्थ समजत नाहीं याविषयीं दुःख न करितां हजारो मंत्रांचा अर्थ सहज आणि स्पष्ट समजतो याविषयीं आनंद मानण्यास विशेष कारण आहे. साडे पांचशें वर्षांची मराठी ज्ञानेश्वरी, तीनच्यारशें वर्षांपूर्वीं चालू असलेल्या मराठीप्रमाणें रूपांतर केलेली असतांहि, आज आपणांस समजण्यास फार कठीण जाते. मग ज्ञानेश्वराप्रमाणें एकानेंच एकाच काळीं रचिलेली नव्हे, तर अनेक काळीं अनेक ऋषींनीं अनेक प्रसंगीं वेगळ्या वेगळ्या संबंधांनीं रचिलेल्या फार फारच पुरातन सूक्तांची जी ऋक्संहिता तींतील कितीएक मंत्र कोठें कोठें दुर्बोध असले म्हणून कांहींच आश्चर्य नाहीं. वेदव्यासांनीं या वेदसूक्तांस संहितेचें रूप दिलें तें सूक्तें रचिलीं गेल्यावर महाकालावधीनें दिलें; म्हणजे सूक्तें वेगवेगळ्यां ऋषींच्या कुटुंबांत होतीं तीं सर्व एकत्र करून आतां आहे तशी संहिता म्हणजे गाथा केला, तेव्हां गाथारचना करितांना ज्या मंत्रांचा किंवा सूक्तांचा एकमेकाशीं वस्तुतः अर्थसंबंध नाहीं असे मंत्र किंवा सूक्तें एका ठिकाणीं घातलीं जाण्याचा प्रसंगवशात् केवढा संभव आहे याचा आपण विचार केला पाहिजे. अशी कल्पना करा कीं, महाराष्ट्र, गुजराथ, मध्यदेश, आणि पंजाब या वेगवेगळ्या काळीं होऊन गेलेले जे आपले अर्वाचीन ऋषि ज्ञानेश्वर, मुकुंदराज, तुकाराम, महीपति, नामदेव, सोहिरोबा आंब्ये, नर्सई मेहता, सांभळभट, तुलसीदास, चांद, कबीर, नानक, आणि गुरु गोविंद यांणीं रचिलेलीं जीं सूक्तें म्हणजे पदें, अभंग, दोहरे, साक्या, ओव्या इत्यादि, तीं कोणीं देशकल्याणेच्छु महापुरुषानें एकत्र करण्याचें मनांत आणून त्यांचा एक गाथा केला, परंतु त्या गाथ्यांत एकाच प्रांताचीं किंवा एकाच ऋषीचीं म्हणजे कवीचीं अथवा साधूचीं

**स तुर्वणिर्महाँ अरेणु पौंस्ये गिरेर्भृष्टिर्न भ्राजते तुजा शवः ।**
**येन शुष्णं मायिनमायसो मदे दुध्र आभूषु रामयन्नि दामनि॥३॥**

सः । तुर्वणिः । महान् । अरेणु । पौंस्ये । गिरेः । भृष्टिः । न । भ्राजते । तुजा । शवः ।
येन । शुष्णम् । मायिनम् । आयसः । मदे । दुध्रः । आभूषु । रमयत् । नि । दामनि ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. स [ इन्द्रः ] तुर्वणिः (=शत्रूणां हिंसिता ) [ तथा ] महान [ भवति ] । [ तस्य ] अरेणु (=रेणुरहितं=निर्मलम्=अनवद्यं ) शवः (=बलं ) पौंस्ये (=संग्रामे ), गिरेः (=पर्वतस्य) भृष्टिर्न (=शृङ्गमिव), तुजा (=शत्रुहिंसकया शक्त्या सहितं यथा स्यात्तथा) भ्राजते (=दीप्यते ) । येन [ शवसा ] आयसः (=अयोमयकवचयुक्तो ) दुध्रः (=दुर्धर ) [ इन्द्रो ] मदे (=सोमपानेन जाते हर्षे) मायिनं (=मायाविनं ) शुष्णम् (=उदकानां शोषयितारम् एतन्नामानमसुरं ) दामनि ( =निगडे ) [ कृत्वा ] आभूषु (=कारागृहेषु ) निरमयत् (=न्यरमयत्=न्यवासयत् ) ॥

तुजेति पदं वादमुत्पादयति । वयं यथाशक्यं सायणमनुसृताः स्मः । गिरेर्भृष्टिरिव भ्राजते इत्युपमाबलात् 'शवः'शब्देन अत्र वज्रग्रहणं शक्यम् । दुध्र इत्यत्र तच्छब्दयुक्तेषु मन्त्रान्तरेषु दृष्टेषु दुर्धर इति यत् सायणव्याख्यानं तदेव साधीयः । 'आभू'-शब्दस्य व्याख्यानं कारागृहमिति यत् सायणाचार्यैः कृतं तद् व्याख्यानान्तरप्राचुर्यापेक्षया संभाव्यतेतराम् इति कृत्वा गृहीतमस्माभिः ॥

किंवा एकाच शतकामध्यें रचिलेलीं सर्व सूक्तें एकाच अध्यायांत किंवा गाथ्याच्या भागांत घालावीं असा कडक निर्बंध न राखतां, जशीं हातास आलीं तशीं घातलीं आणि कांहीं पदांचीं कडवीं सोहिरोबा ऋषीचीं म्हणून इन्दुरास सांपडलेलीं घेऊन त्याचींच सूक्तें म्हणजे पदें सावंतवाडीस जीं सगळीं सांपडलीं असतील त्यांत कोठें घालावीं हें बरोबर न समजल्यामुळें थोड्याशा विचाराअंतीं ज्या पदांत घातलीं असतां जुळतील असें वाटलें त्यांत घातलीं. पण वस्तुतः त्या कडव्यांचा त्या पदांशीं कांहीं संबंध नसल्यामुळें आणि तीं कडवीं सोहिरोबाचींच किंवा दुसऱ्याचीं ह्याविषयींहि शंका असल्यामुळें गाथा झाल्यानंतर हजारो वर्षांवर तीं कडवीं दुर्बोध आहेत असें वाटूं लागल्यास काय आश्चर्य आहे? शिवाय गाथा केल्यानंतर तो शुद्ध राहवा म्हणून पुष्कळ काळजी घेण्यांत

३. तो रणधीर [आणि] [महान्] [होय], त्याचें निर्दोष [आणि] अनिवार्य बळ संग्रामांत पर्वताच्या शिखराप्रमाणें लखलखतें; ज्या [बळाच्या योगानें] लोहमय [आणि] दुर्धर [इंद्र] [सोमपानाच्या] हर्षामध्यें कपटी शुष्णाला बिड्या घालून कारागृहांत ठेविता झाला.

3. He [is] victorious [and] great. [His] stainless power in battle proudly shines like the peak of a mountain: with which [power] [Indra], armed in iron [and] invincible, in the exhilaration [of the Soma] kept the intriguing S'ushna fettered down in the prison.

आली, पण तो करण्याच्या पूर्वीच त्या त्या वेगवेगळ्या पदांत, अभंगांत, दोहऱ्यांत आणि साक्यांत शेकडो वर्षांत कांहीं तरी फेरफार झाल्याशिवाय राहिला असेल काय? तर ऋग्वेदसंहितेची स्थिति यासारिखीच आहे. म्हणून त्यांत किती एक मंत्र अति दुर्बोध असले तरी नवल नाहीं, आणि त्यामुळेंच वेदाचा अर्थ कोणत्याहि मर्त्यास समजावयाचा नाहीं अशी आपल्या लोकांची समजूत होऊन राहिली आहे यांतहि आश्चर्य नाहीं, मात्र हजारो मंत्र स्पष्ट आणि सहज व बिनचूक अजूनहि मर्त्यास समजण्यासारिखे आहेत हेंच आश्चर्य.

३. भावार्थः—' इंद्र जयशाली आणि मोठा आहे. कारण त्याचें बळ युद्धांत अनिवार्य असून इतरांच्या बळापेक्षां इतकें मोठें असतें कीं, तें जणुं पर्वताच्या शिखराप्रमाणें उंच आणि तेजःपुंज असें लकलकत असतें. याच बळाच्या योगानें सोम पिऊन हर्ष झालेला इंद्र आंगांत लोखंडाचें कवच घालून आणि दुर्धर होऊन कपटयुक्तिपूर्ण शुष्णासुराला जिंकून हस्तगत करून घेतो.'

'अनिवार्य'='तुजा.' हा अर्थ आम्हीं बहुत अंशीं सायणांस अनुसरून केला आहे. परंतु हें पद कठीण आहे. असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं. ' तुजा '-शब्दाचा अक्षरशः अर्थ ' हिंसक शक्तीनें ' असा आहे (ऋ. ५. १७. ३ यावरील सायणभाष्य पाहा.).

' बळ '=' शवः.' पर्वताच्या शिंगाप्रमाणें असें म्हटलें आहे त्यावरून 'बळ'-शब्दाचा अर्थ या ठिकाणीं वज्ररूप जें बळ तें होय असें संभवतें.

' शुष्णाला.' ' शुष्ण ' म्हणजे जगतामधील पाणी शोषून घेणारा जो अवर्षणरूपी रूपकसिद्ध असुर आहे तो होय. याविषयीं सू. ५१ मं. ११ आणि सू. ५४ मं. ५ हे पाहा. शुष्णास बंदिखान्यांत घालून टाकिलें असें जें या मंत्राच्या उत्तरार्धांत सांगितलें आहे त्याचें तात्पर्य

**देवी यदि तविषी त्वावृधोतय इन्द्रं सिषक्त्युषसं न सूर्यः ।**
**यो धृष्णुना शवसा बाधते तम इयर्ति रेणुं बृहदर्हरिष्वणिः ॥४॥**

देवी । यदि । तविषी । त्वाऽवृधा । ऊतये । इन्द्रम् । सिसक्ति । उषसम् । न । सूर्यः ।
यः । धृष्णुना । शवसा । बाधते । तमः । इयर्ति । रेणुम् । बृहत् । अर्हरिऽस्वनिः ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. [ हे स्तोतः ], यदि (=यदा ) त्वावृधा (=त्वया स्तोत्रैः प्रवृद्धा ) [ इन्द्रस्य ] देवी (=दिव्या ) तविषी (=बलं ), सूर्यः उषसं न (=सूर्यः उषसमिव), ऊतये (=संरक्षणाय ) इन्द्रं सिषक्ति (=सचते=सेवते ), [ तदानीं ] य [ इन्द्रो] धृष्णुना शवसा (=धर्षकेण स्वबलेन ) तमः (=तमोरूपं वृत्रं ) बाधते (=अपनोदति ) [ स ] अर्हरिष्वणिः (=शत्रुनाशक ) [ इन्द्रः] [ सर्वं ] रेणुं (=पापं ) बृहत् (=प्रभूतं यथा स्यात् तथा ) इयर्ति (=अपगमयति ) ॥

अत्रेदमुक्तं भवति । हे स्तोतः, त्वत्कृतैः स्तोत्रैः प्रवृद्धम् इन्द्रस्य बलं यदा इन्द्रं समवैति ( रक्षणार्थं भ्रियमाणम् अयःकवचमिव तेन सह संबद्धं भवति ) तदा शत्रुनाशक इन्द्रस्तेन धृष्णुना स्वबलेन तमोरूपं वृत्रं हन्ति तथा कृत्वा च सकलमपि पापं समूलं नाशयति । अतस्त्वम् इन्द्रं स्तुहीति ॥

अर्हरिष्वणिरिति पदम् अस्माभिः सायणस्य भावगतम् अनुसृत्य व्याख्यातं प्रयोगान्तराभावेन तस्यार्थं साधीयो निर्णेतुमशक्यत्वात् । यत्तु हृष्धातोः शार्मण्यपण्डितद्वयेन निर्वचनं कल्पयित्वा हर्षाद् उच्छृङ्खल इति व्याख्यातं तद् आधाराकाङ्क्षमेव ॥

इतकेंच कीं, इंद्रानें वज्रप्रहार करून म्हणजे विजांचा लखलखाट आणि मेघांचा गडगडाट करून उदकवृष्टि केली आणि अवर्षण बंद केलें.

' कारागृहांत '=' आभूषु ,' या शब्दाचा अर्थ अन्य ठिकाणीं सायणाचार्यांनी अन्य रीतीनें केला आहे तरी येथें दिलेला त्यांचा हा अर्थ चांगला संभवतो.

' बिड्या घालून ठेविता झाला '=' रमयत् नि दामनि.' या अर्थाविषयीं शंका नाहींच. या वाक्यावरून इतकें उघड होतें, कीं आतांप्रमाणेंच वैदिक युगांतहि शत्रूचा पराभव केल्यावर त्याला बिड्या घालून बंदिखान्यांत ठेवण्याची चाल होती.

४. [ हे स्तोत्या ], जेव्हां त्वां वाढविलेली [इंद्राची] दिव्यशक्ति, सूर्य उषेच्या बरोबर राहातो तशी, रक्षणासाठीं इंद्राबरोबर राहाते, तेव्हां [आपल्या] धैर्ययुक्त बळानें अंधकार[रूप] वृत्राला हाकून देणारा शत्रुघातक [इंद्र] [सकल] पाप समूळ नाहींसें करितो.

4. When, [O praiser], [Indra's] divine power, augmented by thee [through thy prayers], attends upon Indra even as does Sûrya his Ushas, [then] the foe-destroying [Indra], who chases away the demon of darkness with [his] overwhelming strength, wholly removes the evil.

४. एक स्तोता दुसऱ्या स्तोत्यास म्हणतो कीं 'तूं जेव्हां इंद्राची स्तुति करून इंद्राचें बळ उत्तेजनानें वाढवितोस, तेव्हां तें इंद्रास साहाय्य करण्याकरितां इंद्राबरोबर जातें आणि त्याच्या योगानें इंद्र अंधकाररूप वृत्राला मारून सर्व पाप नाहींसें करून टाकितो. यास्तव तूं आज इंद्राची स्तुति कर.'

'त्वां वाढविलेली '=' त्वावृधा.' ऋ. १०. १४७. ४; १०. ६९. ९ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पाहा. इंद्राचें बळ स्तोत्यांच्या स्तोत्रांच्या योगानें वाढतें याविषयीं पूर्वीं आलेंच आहे.

'सूर्य उषेबरोबर राहतो तशी '= 'उषसं न सूर्यः.' 'उषा सूर्याबरोबर राहते तशी ' असें असतें तर उपमा बरोबर बसली असती असें प्रथमदर्शनीं वाटतें, पण सूर्य हा उषेच्या मागाहून तिचें रक्षण करण्याकरितां जणुं लागलाच उगवतो, सूर्याच्या मागाहून उषा उगवत नाहीं, म्हणून लिंगव्यतिरेक असला तरी आहे तेंच बरोबर आहे. स्त्रियांचें संरक्षण करण्याकरितां पुरुषांनीं त्यांचें पाठबळ करावें असें विवक्षित घेऊन उपमा दिली आहे.

'अंधकार[रूप वृत्रा]ला '='तमः.' अक्षरशः अर्थ 'अंधकाराला ' इतकाच आहे. 'अंधकाररूप वृत्राला ' हा सायणाप्रमाणें आम्हीं केलेला अर्थ योग्य आहे. यावरून इतकें स्पष्ट होतें कीं, वेदांत सांगितलेला वृत्र म्हणजे केवळ मेघोदकें आवरून धरणारा रूपकसिद्ध असुर इतकेंच नव्हे, पण आकाशांतील सूर्यप्रकाशाला अवरोधून धरणारा जो मेघरूप असुर त्याचेंहि नांव वृत्र होय. म्हणजे, मेघापासून दोन गोष्टी होतात; १ ली, तो सर्व उदकें आवरून धरितो असें वाटतें म्हणून तो उदकांचा अवरोधक होय, आणि २ री, सूर्यप्रकाशाला तो भूमीवर येऊं देत नाहीं. यास्तव वृत्र म्हणजे आकाशांतील उदकें वृष्टिद्वारें भूमीवर न पडूं देणारा, आणि सूर्यप्र-

**वि यत्तिरो धरुणमच्युतं रजोऽतिष्ठिपो दिव आतासु बर्हणा ॥**
**स्वर्मीळ्हे यन्मद इन्द्र हर्ष्याहन्वृत्रं निरपामौब्जो अर्णवम् ॥ ५ ॥**

वि । यत् । तिरः । धरुणम् । अच्युतम् । रजः । अतिस्थिपः । दिवः । आतासु । बर्हणा ।
स्वःऽमीळ्हे । यत् । मदे । इन्द्र । हर्ष्या । अहन् । वृत्रम् । निः । अपाम् । औब्जः । अर्णवम् ॥ ५ ॥

## भाषायाम्.

५. [ हे इन्द्र ], यद् (=यदा ) बर्हणा (=शत्रोर्हन्ता ) [ त्वं ] धरुणम् (=उदकं) तिरः अच्युतं रजः (=च्यवनरहितं दृढम् अन्तरिक्षं तिरस्कृत्य=अन्तरिक्षं व्यवधायकं कृत्वा ) दिव आतासु (=नभसो दिक्षु ) वि अतिष्ठिपः (=विविधं स्थापितवानसि=विविधेषु स्थलेषु आसृष्टवानसि), यद् ( =यदा) [च] मदे ( =सोमपानेन हर्षे जाते सति ) हर्ष्या ( =सोमपानाज्जातेन हर्षेण ) स्वर्मीळ्हे ( =युद्धे ) वृत्रम् अहन् (=हतवानसि), [तदा ] अपाम् अर्णवं (=वृत्रान्मुक्तानाम् उदकानां संचयं) निरौब्जः (=वृष्ट्यर्थम् अधोमुखं कृतवानसि ) ॥

अत्रेदं भावगतम् । हे इन्द्र, यदा त्वं सोमपानेन जातमदो जातहर्षश्च सन् वृत्रेण सह युद्ध्यन् तं हत्वा अनार्द्रान्तरिक्षाधिष्ठितं मेघं भित्त्वा उदकानि सर्वासु दिक्षु आसृष्टवानसि, तदा तान्युदकानि न क्षुद्राण्यासन् अपि तु उदकानां समुद्रमिव आसृष्टवानसीति ॥ ·

अत्रापि ' बर्हणा'शब्दः सायणाननुसृत्य वयं व्याख्यामः । अनेकेषु स्थलेषु तैरस्यैव अर्थस्य कृतत्वात् तेन च अस्य अर्थस्य पूर्वव्याख्यानकृतां परंपरागतत्वसंभवात् इदानींतनव्याख्यातृभिः कल्पितार्थान्तरापेक्षया अस्यैव साधीयस्त्वाच्च ॥

काशहि भूमीवर न पडूं देणारा जो मेघरूपी रूपकसिद्ध असुर तो होय. आणि वृत्राला इंद्रानें मारून आकाशांतील गाई मुक्त केल्या आणि भूमीवर आणिल्या म्हणजे उदकवृष्टि केली आणि आकाश निरभ्र पृथ्वीवर उघडें पाडिला असें तात्पर्य असतें.

' शत्रुघातक '=' अर्हरिष्वणिः.' हा शब्द कठीण आहे. प्रयोगान्तरें तर सांपडत नाहींत,पण सायणांनीं दिलेलें निर्वचन निर्विवाद नसलें तरी त्यांचा भावार्थ खरा दिसतो, तोच आम्हीं घेतला आहे.

' पाप '=' रेणुम्.' हें पाप म्हणजे जिकडे तिकडे पसरलेल्या अंधकारापा-

५. हे इंद्रा, शत्रुघातक [असा जो तूं तो] जेव्हां उदकाला कठिण अंतरिक्षामधून द्युलोकाच्या प्रांतांवर पाडिता झालास, [आणि] जेव्हां तूं सोमपानाच्या भरांत [आणि] हर्षांत वृत्राला युद्धांत मारिता झालास, [तेव्हां] तूं उदकांचा संचयच फोडून बाहेर काढिता झालास.

5. When, O Indra, [thou] the destroyer [of enemies], didst let down the water on the borders of Heaven through the hard firmament, [and] when in the exhilaration [and] the elevation [of the Soma] [thou] slewest Vritra in battle, [then] [thou] didst send forth the ocean of waters.

सून उत्पन्न होणारे जे अनेक अपाय आणि अपराध ते असा अर्थ. ऋ. ४. १७. १३ आणि ४. ४२. ५ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा.

'समूळ'=' बृहत्.' हें येथें क्रियाविशेषण आहे. अक्षरशः अर्थ 'मोठें' 'फार,' 'अतिशय.'

हा मंत्र साधारण श्लोकासारिखा म्हणण्यास विशेष ओढाताण नको:–

देवी यदि तविषी त्वावृधोतये ।
इन्द्रं सिषक्ति उषसं न सूरिअः ।
यो धृष्णुना शवसा बाधते तमः
इयर्ति रेणुं बृहदर्हरिष्वणिः ॥

५. हा मंत्र किंचित् कठिण आहे पण सारांश उघड दिसतो, तो असा की, 'हे इंद्रा, तूं जेव्हां सोम पिऊन प्रसन्न झालास आणि सोमाच्या भरांत वृत्रास मारून टाकिलेंस आणि पाणी खालीं पडूं न देणारें जें खडकासारिखें कठिण अंतरिक्ष त्यांतून पाणी फेंकून देऊन सर्व दिशांभर पसरिलेंस, तेव्हां तें पाणी म्हणजे साधारण वृष्टीप्रमाणें क्षुल्लक होतें असें नाहीं, तर उदकांचा मोठा प्रवाह वाहे अशा रीतीनें मोठा उदकांचा समुद्रच जणुं खालीं सोडून दिलास.'

यांत कठिण म्हटलें म्हणजे 'तिरः धरुणम् अच्युतं रजः दिवः आतासु बिअतिष्ठिपः' हे शब्द आहेत. यांचा अर्थ 'उदकाला कठिण अंतरिक्षामधून द्युलोकाच्या प्रांतांवर पसरिता झालास' असा आम्हीं केला आहे त्याचें तात्पर्य असें कीं उदक खालीं न पडूं देणारें जें पर्वतप्राय कठिण आकाश त्यांतून उदक काढून सर्वत्र टाकून दिलेंस, सर्वत्र वृष्टि केलीस. 'दिवः आतासु'=' द्युलोकाच्या प्रांतांवर,' म्हणजे द्युलोक आणि पृथिवी हीं जेथें मिळतात असें वाटतें असे जे क्षितिजप्रदेश यांच्या ठायीं; अर्थात्

**त्वं दिवो धरुणं धिष ओजसा पृथिव्या इन्द्र सदनेषु माहिनः।**
**त्वं सुतस्य मदे अरिणा अपो वि वृत्रस्य समया पाष्यारुजः।**
**॥ ६ ॥ २१ ॥**

त्वम् । दिवः । धरुणम् । धिषे । ओजसा । पृथिव्याः । इन्द्र । सदनेषु । माहिनः ।
त्वम् । सुतस्य । मदे । अरिणाः । अपः । वि । वृत्रस्य । समया । पाष्या । अरुजः ॥ ६ ॥ २१ ॥

## भाषायाम्.

६. हे इन्द्र, माहिनः (=प्रवृद्धस्) त्वं दिवो धरुणं (=द्युलोकस्य धारकं=सोमम्) ओजसा (=बलेन) पृथिव्याः सदनेषु (=पृथिव्युपरि स्थितेषु गृहेषु=यज्ञमण्डपेषु) धिषे (=स्थापयसि) । त्वं सुतस्य (=अभिषुतस्य=सोमस्य) मदे (=पानेन जाते हर्षे) अपः (=उदकानि) अरिणाः(=अगमयः=गमयसि आसृजसि) वृत्रस्य [च] पाष्या (=पाषाणान्=पाषाणमयप्राकारान्?) समया (=समीपे गत्वा=अतिसंनिकटयुद्धे) वि अरुजः (=विविधम् अभाङ्क्षीः=भङ्क्त्वा तेषां खण्डान् नानादिक्षु अपास्यसि) ॥

अत्रेदमुक्तं भवति । हे इन्द्र, पार्थिवेषु मनुष्यगृहेषु यः सोमो वर्तते तं त्वमेव तव बलेन तत्र स्थापितवानसि । त्वमेव वृत्रेण सह युद्धं कृत्वा तस्य दुर्गाणि विनाशयसि तथा कृत्वा च वृत्रावृतानि उदकानि भूमौ त्वमेवावर्षयसीति ॥

---

'च्यारी दिशेला' असें तात्पर्य. 'दिव आतासु' हेच शब्द ऋ. १. ११३. १४ 'वि अञ्जिभिः दिव आतासु अद्यौत्' यांत आले आहेत त्याजवरील सायणभाष्य पहा.

'अंतरिक्षामधून'=' तिरो रजः.' 'तिरः' हें शब्दयोगी अव्यय आहे. याचीं उदाहरणें ऋग्वेदांत अनेक आहेत. ऋ. ९. ६७. ७; ९. ६८. ३; ९. ११०. १६; ८. ६८. ३; ९. ३. ७, ८; आणि ९. ७७. २ हीं स्थळें व त्यांजवरील सायणभाष्य पहा. आणि प्रथमार्धांत 'बर्हणा' शब्द आहे याचा अर्थ आम्हीं सायणानुसार केला आहे. कारण ते त्याचा नित्य बहुत करून शत्रुघातक असाच अर्थ करीत असतात. कितीएक पाश्चिमात्य विद्वान् 'बर्हणा' म्हणजे 'बर्हणया'=शौर्यानें अथवा पराक्रमानें असा अर्थ करितात.

'सोमपानाच्या भरांत आणि हर्षांत'=' मदे हर्ष्या.' म्हणजे सोमपान केल्यानें जो आनंद म्हणजे अंमल आणि हर्ष झाला तेणेंकरून. 'हर्षि' शब्दाविषयीं ऋ. ८. ६८. १४ हा मंत्र आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

६. हे इंद्रा, महान् [असा जो] तूं [तो] [आपल्या] पराक्रमानें स्वर्गाच्या स्तंभाला पृथिवीवरील घरांत स्थापितोस. तूं सोमाच्या भरांत उदकें सोडून देतोस, [आणि] वृत्राचे पाषाण हातघाईनें फोडून टाकितोस.

6. Thou, O Indra, [who art] great, settest through [thy] might the prop of heaven in the houses on earth. Thou sendest forth the waters in the exhilaration of the Soma, [and] breakest asunder the rocks of Vṛitra in close fight.

६. भावार्थः–' हे इंद्रा, स्वर्गातें उचलून धरणारा असा जो सोमरस पृथ्वीवर मर्त्यांच्या घरीं असतो तो तेथें तुझ्याच प्रभावानें असतो. आणि तो सोम उपासकांनीं तुला अर्पण केला म्हणजे तो पिऊन तूं वृत्राशीं लढून त्याचीं मेघरूप पाषाणांनीं बांधिलेलीं नगरें तूं फोडून टाकितोस आणि त्यांतून उदकें मुक्त करून त्यांचा भूमीवर वर्षाव करितोस.'

'स्वर्गाच्या स्तंभाला'=' धरुणं दिवः' म्हणजे सोमरसाला. सोमरसाला 'स्वर्गाचा स्तंभ' म्हणजे स्वर्गानें (द्युलोकाला) धारण करणारा असें पुष्कळ ठिकाणीं ऋग्वेदांत म्हटलें आहे. ऋ. ९. २. ५; ९. ७४. २; ९. ७२. ७; ९. ८६. ८; ९. ८७. २; ९. ८९. ६ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा. सोमाविषयीं आर्यजनांची प्रीति आणि त्याचें महत्त्व आणि पराक्रम हे असे होते कीं, ते त्याचें वर्णन अतिशयोक्तीनें करीत, आणि त्याला पृथिवीचा आणि स्वर्गाचा खांब, म्हणजे न पडूं देणारा आश्रय असें म्हणत असत.

'वृत्राचे पाषाण हातघाईनें फोडून टाकित असतोस'=' वि वृत्रस्य समया पाष्या अरुजः.' म्हणजे मेघरूप पाषाणांनीं बांधिलेले जे वृत्राचे किल्ले ते असें तात्पर्य दिसतें. सायणाचार्यः– "धैर्ययुक्त "पाषाणानें अथवा शक्तीनें वृत्राला मारून "टाकिता झालास," म्हणजे धैर्ययुक्त असें जें तुझें वज्र तेणेंकरून त्याला मारून टाकिता झालास, असा त्यांचा भावार्थ दिसतो. परंतु 'समं' शब्दाचा अर्थ धैर्ययुक्त असा आणि विशेषणार्थी होईल कीं नाहीं, याविषयीं आणि 'वृत्रस्य' ही द्वितीया असावी तशी नसतां षष्ठी कां आहे याविषयीं आम्हांस अडचण दिसते. तथापि आम्हीं जो 'हातघाईनें' असा 'समया' या तृतीयान्त क्रियाविशेषणाचा अर्थ केला आहे त्याला तरी प्रयोगान्तरांची अपेक्षा आहे. 'समया'चा मात्र साधारण संस्कृतांत झाला तरी जवळ अथवा जवळून असाच अर्थ होतो.

## सूक्तम् ५७.

आङ्गिरसः सव्य ऋषिः । इन्द्रो देवता । जगती च्छन्दः ।

**प्र मंहिष्ठाय बृहते बृहद्रये सत्यशुष्माय तवसे मतिं भरे ।**
**अपामिव प्रवणे यस्य दुर्धरं राधो विश्वायु शवसे अपावृतम् ॥ १ ॥**

प्र । मंहिष्ठाय । बृहते । बृहत्ऽरये । सत्यऽशुष्माय । तवसे । मतिम् । भरे ।
अपाम्ऽइव । प्रवणे । यस्य । दुःऽधरम् । राधः । विश्वऽआयु । शवसे ।
अपऽवृतम् ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. [ अहं ] मंहिष्ठाय (=दातृतमाय ) बृहते (=महते ) बृहद्रये (=महाधनाय ) सत्यशुष्माय (=सत्यबलाय ) तवसे (=प्रवृद्धाय ) [ इन्द्राय ] [ इमां ] मतिं (=स्तुतिं ) प्रभरे (=प्रकर्षेण संपादयामि प्रार्थयामि ) । यस्य प्रवणे (=निम्नदेशे ) [ वहन्तीनाम् ] अपामिव (=उदकानीव ) दुर्धरं (=दुःखेन निवार्यं ) राधः (=दत्तधनं) विश्वायु (=सकलव्यापि ) [ सत् ] [ स्तोतृणां ] शवसे (=बलाय=स्तोतृणां बलमाहर्तुम् ) अपावृतम् (=अपगतावरणम्=उद्घाटितं ) [ क्रियते ] ॥

यस्येन्द्रस्य दानप्रवाहः, निम्नदेशे गच्छतामुदकानां प्रवाह इव, अनिवार्यः । विपुलः प्रेरणादनन्तरं च अप्रतिहत इति यावत् । तथा सर्वव्यापी सन् स्तोतॄन् प्रति बलमाहर्तुं स्वस्य बलं वा प्रकटयितुम् उद्घाटितो वर्तते तस्मा एतां स्तुतिं संपाद्य प्रार्थयामीति भावः ॥

## सूक्त ५७.

ऋषि–सव्य ( पूर्वसूक्ताचा जो कर्ता तोच). देवता– इंद्र. वृत्त–जगती.

१. परमदानशील, मोठ्या, महाधन, सत्यबल, [आणि] पराक्रमी [इंद्रा]प्रत [मी] [हें] स्तोत्र अर्पण करितों; ज्याचें औदार्य खोल जाग्याकडे [वाहणाऱ्या] पाण्यासारिखें अनिवार्य [आणि] सर्वव्यापी [असून] [स्तोत्यांला] बळ [येण्या]साठीं प्रगट होत असतें.

## HYMN 57.

To *Indra*. By *Savya* ( author of the previous hymn ). Metre—*Jagatî*.

1. To the most liberal, the great, the vastly rich, the truly mighty [ and ] the puissant [ Indra ], I offer [ this ] praise; whose gifts, irresistible [ in their flow ] like waters on a declivity, [ are ] far-reaching [ and ] manifested for the strength [ of his worshippers ].

---

१. या सुंदर मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, ' ज्या इंद्राच्या प्रसादाचा प्रवाह वाहूं लागला म्हणजे डोंगरावरून वाहणाऱ्या उदकांच्या प्रवाहाप्रमाणें विपुळ, चपळ आणि मागें न फिरणारा, आणि सर्वत्र पोंहचणारा असून स्तोत्याचें बळ वाढविणारा होय, त्या महाउदार, मोठ्या, अतिसंपत्तिमान्, सत्यपराक्रमी आणि बलिष्ठ इंद्राकरितां मी हें सूक्त रचून अर्पण करीत आहें.'

सूक्ताचा हा आरंभ आहे तेव्हां त्यांत स्तोत्र कोणासाठीं रचिलें आणि कां रचिलें, म्हणजे, ज्यासाठीं रचिलें तो कसा आहे, तें या मंत्रांत सांगितलें आहे. जशी एखाद्या ग्रंथास प्रस्तावना असावी तशी या सूक्ताला ही प्रस्तावनेसारिखी आहे.

' अर्पण करितों '='प्रभरे.' सायणाचार्यप्रमाणें ' रचितों,' अथवा रचून अर्पण करितों. ' अर्पण करितों ' असें म्हटलें तरी रचून अर्पण करितों असाच भावार्थ आहे.

' खोल जाग्याकडे वाहणाऱ्या पाण्यासारिखें अनिवार्य '= 'अपामिव प्रवणे दुर्धरम्.' म्हणजे डोंगरावरून खालीं वाहणारें पाणी जसें कोणीहि मागें फिरवूं शकत नाहीं अथवा बंद करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें इंद्राची कृपा होऊं लागली म्हणजे कोणीहि तिला मागें फिरविण्यास अथवा बंद करण्यास समर्थ होत नाहीं.

' सर्वव्यापि '=' विश्वायु.' हें विशेषण वेदांत बऱ्याच ठिकाणीं आलें आहे आणि सर्वव्यापि हा अर्थ कसा होतो याविषयीं जरी वाद असला, तरी तो अर्थ खरा आहे असें मंत्रांतरांच्या उदाहरणांवरून

**अर्ध ते विश्वमनु हासदिष्टय आपो निम्नेव सवना हविष्मतः ।**
**यत्पर्वते न समशीत हर्यत इन्द्रस्य वज्रः श्नथिता हिरण्ययः ॥२॥**

अध । ते । विश्वम् । अनु । ह । असत् । इष्टये । आपः । निम्नाऽइव ।
सवना । हविष्मतः ।
यत् । पर्वते । न । सम्ऽअशीत । हर्यतः । इन्द्रस्य । वज्रः । श्नथिता ।
हिरण्ययः ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. यद् (=यदा) इन्द्रस्य (=हे इन्द्र, तव ) हर्यतः (=शोभनः) श्नथिता (=शत्रूणां हिंसनशीलो ) हिरण्ययः ( =सुवर्णमयो ) वज्रः पर्वते (=मेघरूपे पर्वते=वृत्रे ) न समशीत ( =न संशयितोभूत्=निःशङ्कम् अभ्यपतत् ) , अध ह (=अनन्तरमेव=तदैव=तत्क्षणमेव ), [ हे इन्द्र], विश्वं (=सकलं जगत् ) ते (=तव ) इष्टये (=यागाय =त्वदर्थं यजनपूजनादिकं कर्तुम् ) अन्वसत् (=अनुकूलमभूत्=प्रवृत्तमभूत् ), [ तथा ] हविष्मतः (=उपासकस्य=उपासकेन प्रार्पितानि ) सवना (=सवनानि=अभिषुतसोमा), [ निम्ना] आप इव (=निम्नप्रदेशे सरन्ति जलानीव ), निम्ना (=सरन्ति ) [ अभूवन् ] ॥

" यदेन्द्रेण प्रेरितो वज्रोऽप्रतिहतः सन्वृत्रमवधीत् तदाप्रभृत्येव तं यष्टुं सर्वे यजमानाः प्रावर्तिषतेति भावः ''इति सायणाचार्याः ॥

निःसंशय सिद्ध होतें. कारण कीं सायणाचार्य दुसऱ्या पुष्कळ ठिकाणीं तोच अर्थ करितात. ऋ. ७. ३४. ११; ९. ४. १० हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पाहा. तथापि प्रस्तुत स्थळीं 'सकळांचें आयुष्य ज्यांत आहे तें ' असाहि अर्थ होऊं शकेल.

'[ स्तोत्याला ] बळ [ येण्या] साठीं '= ' शवसे.' अक्षरशः अर्थ ' बळासाठीं ' इतकाच आहे. ' आपलें बळ किती आहे तें जगाला दाखविण्याकरितां ' असाहि अर्थ होईल.

' प्रगट होत असतें '= 'अपावृतम्.' अक्षरशः अर्थ, ' उघडलें [ जातें ]' असा आहे. भांडार झांकलेलें असून जसें उघडतात तसें उघडलें जातें असें तात्पर्य.

या मंत्रावरून इंद्र कसा देव होय असें मानीत तें दिसून येतं:–तो अतिशय उदार, अतिशय मोठा, सर्वसंपत्तियुक्त, खरा पराक्रमी आणि महाबळी असा असून, त्यानें केलेलें कल्याण सर्वांस पोंहचतें आणि त्याच्या मनांत कल्याण करावयाचें आलें म्हणजे तें कोणाच्यानेंहि बंद करवणार नाहीं असा तो आहे; बहुत करून ईश्वराचे सर्व गुण यांत आले असें म्हटलें तरी चालेल.

२. हे इंद्रा, जेव्हां तुझें सुंदर शत्रुघातक [आणि] सुवर्णमय वज्र वृत्रावर निःशंक पडलें, तेव्हां एकाएकीं सकळ जग तुझ्या प्रीत्यर्थ यज्ञ करण्यास प्रवृत्त झालें, [आणि] उपासकांनीं अर्पिलेले सोम खोल जाग्याकडेस वाहणाऱ्या पाण्याप्रमाणें [वाहूं लागले].

2. Immediately that thy thunderbolt, bright, destructive [and] golden, unhesitatingly fell upon the mountain (Vritra), the whole [universe], O Indra, became obedient to thy worship, [and] the Somas of the sacrificer [flowed] like waters running down a declivity.

२. भावार्थः—' हे इंद्रा, तुझें तेजस्वी आणि सुवर्णाप्रमाणें सुशोभित पण शत्रुघातक असें वज्र तूं जेव्हां त्या पर्वतासारिखा दिसणाऱ्या मेघरूपी वृत्रावर मारिलेंस, आणि तें मागें न सरतां एकदम वृत्रावर जाऊन पडलें, तत्क्षणींच सगळें जग तुझ्या स्वाधीन झालें. सर्व लोक तुझी उपासना करून तुला हवि आणि सोम अर्पण करूं लागले; आणि तुला इतका सोम अर्पण केला कीं त्याचे प्रवाह खोल जाग्याकडे वाहून जाणाऱ्या पाण्याप्रमाणें खळखळ वाहूं लागले.' इंद्रानें वृत्राला मारून पाऊस पाडला हा जो प्रसिद्ध पराक्रम, तो आणि त्यामुळें सगळें जग इंद्राच्या स्वाधीन झालें हा जो त्याचा दुसरा पराक्रम, तो या मंत्रांत सांगितला आहे.

' हे इंद्रा, जेव्हां तुझें '=' यद् इन्द्रस्य.' अक्षरशः अर्थ 'जेव्हां इंद्राचें.' या ऋचेंत प्रथमार्धांत द्वितीयपुरुषीं निर्देश असून उत्तरार्धांत तृतीयपुरुषीं निर्देश आहे. पण असा पुरुषव्यतिरेक वेदांत पुष्कळ येतो त्याचीं उदाहरणें पूर्वीं आलींच आहेत.

' वृत्रावर निःशंक पडलें '=' पर्वते न समशीत.' अक्षरशः अर्थ, ' पर्वतावर [पडण्यास] साशंक झालें नाहीं,' 'पर्वतावर [पडण्यास] भ्यालें नाहीं.' पर्वत म्हणजे पर्वतासारिखा दिसणारा जो मेघ तद्रूप वृत्र. पर्वत शब्दाचे वेदांत डोंगर आणि मेघ हे दोनी अर्थ होतात याविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे.

' तुझ्या प्रीत्यर्थ यज्ञ करण्यास प्रवृत्त झालें '=' ते इष्टये अनुअसत्.' अक्षरशः ' तुझ्या उपासनेला अनुकूल झालें असा अर्थ.' इष्टि याचा अर्थ ' इच्छा ' असा करून ' तुझ्या इच्छेला अनुकूळ झालें ' असाहि अर्थ करितां येईल.

ही ऋचा श्लोकाप्रमाणें म्हणण्यास थोडीच अडचण पडते:—

अधं ते. विश्वमनु हासदिष्टये ।
आपो निम्नेवं सवना हविष्मतः ।

अस्मै भीमाय नमसा समध्वर उषो न शुभ्र आ भरा पनीयसे ।
यस्य धाम श्रवसे नामेन्द्रियं ज्योतिरकारि हरितो नायसे ॥३॥

अस्मै । भीमाय । नमसा । सम् । अध्वरे । उषः । न । शुभ्रे । आ । भर । पनीयसे ।
यस्य । धाम । श्रवसे । नाम । इन्द्रियम् । ज्योतिः । अकारि । हरितः । न । अयसे ॥ ३ ॥

भाषायाम्.

३. हे उषो न शुभ्रे (=उषोदेवीवन्मनोहारिणि भार्ये), अस्मै (=पुरोवर्तिने) भीमाय (=भयानकाय) पनीयसे (=अतिशयेन स्तवनीयाय) [इन्द्राय] अध्वरे (=अस्मिन् यज्ञे) नमसा (=नमस्कारेण) [सह] [श्रवः=हविरन्नं] समाभर (=संपादय=प्रार्पय)। यस्य (=यस्मात् तस्य इन्द्रस्य) धाम (=तेजो) नाम (=कीर्तिः) इन्द्रियं (=बलं) [तथा] ज्योतिः (=प्रकाशः), हरितः (=तस्याश्वा) अयसे न (=गमनायेव), श्रवसे (=हविरन्नाय) अकारि (=आविष्कृतमस्ति)॥

यस्मात् कारणादिन्द्रस्य धामादीनि हविर्ग्रहणार्थम् आविर्भूतानि सन्ति तस्मात् कारणात् भयानकाय स्तवनीयाय चेन्द्राय, हे मम भार्ये, अस्मिन् यज्ञे नमस्कारं कृत्वा हविरन्नं समर्पयेति भावः। हरितः अयसेनेत्युपमा दुर्बोधतरा भाति। तस्या अपरिज्ञानेपि श्लिष्टं स्पष्टम्। कदाचिद् एवं स्यादर्थस्तस्याः। यथेन्द्रस्य धामादीनि हविर्ग्रहणार्थम् आविष्कृतानि सन्ति तथा तस्य हरितः (=अश्वा) अयसे (=गमनाय) सिद्धाः सन्ति, अत एव हे प्रिये, शीघ्रमिन्द्राय हविरन्नमर्पय यथा तद् गृहीत्वा गच्छेत् अगृहीत्वैव मा गच्छेदिति॥

---

यत्पर्वते न समशीत हर्यतः ।
इन्द्रस्य वज्रः श्नथिता हिरण्ययः ।

कितीएक ऋचा यापेक्षांहि सरळ म्हणतां येतात. आणि कितीएक तर कांहींच फेरफार न करितां आलीं(पडल्या). वृत्ताप्रमाणें म्हणतां येतात याचीं उदाहरणें:-

संजागृवद्भिर्जरमाण इध्यते
दमे दमूना इषयन्निळस्पदे ।
विश्वस्य होता हविषो वरेण्यो
विभुर्विभावा सुषखा सखीयते ।
ऋ. १०. ९१. १.

बृहस्पतिर्नः परिपातु पश्चाद्
उतोत्तरस्मादधरादघायोः ।
इन्द्रः पुरस्तादुत मध्यतो नः
सखा सखिभ्यो वरिवः कृणोतु ।
ऋ. १०. ४२. ११.

३. हे उषेप्रमाणें सुंदर स्त्रिये, ह्या भयानक [आणि] अत्यंत स्तवनीय इंद्राकारणें या यज्ञांत नमस्कारासहित हवि अर्पण कर. ज्या [इंद्रा]चें, तेज, कीर्ति [आणि] बळ [ आणि ] प्रकाश हीं, त्याचे घोडे धावण्याकरितां तयार आहेत तशीं, हविरन्न [घेण्या]करितां प्रगट झालीं आहेत.

3. [ O fair one ], beautiful as the Dawn, offer to the solemn [ and ] praiseworthy [ Indra ] in this sacrifice [ food ] together with obeisance, since for food his strength, [ his ] glory, his puissance [ and his ] splendor are manifested, like as his horses [ stand ready ] to go.

३. ह्या मंत्रांत ऋषि आपल्या स्त्रियेस म्हणतो कीं, ' हे उषेप्रमाणें सुंदरी प्रिये, हा पाहा इंद्र आपल्या तेजासहित, कीर्तीसहित, वीर्यासहित आणि प्रकाशासहित रथांत बसून हवि घेण्यास आला आहे; तर ह्या प्रचंड आणि स्तवनीय इंद्राला नमस्कार करून लौकर हविरन्न अर्पण कर, नाहीं तर तो हविरन्न घेतल्याशिवायच निघून जाईल. कारण कीं आमचें हवि स्वीकारून घेण्यास जसा तो आपल्या तेजास व कीर्ति इत्यादिकांसहित प्रगट झाला आहे, तसे त्याचे घोडेहि त्याला येथून घेऊन जाण्याविषयीं सिद्ध आहेत, यास्तव त्वरा कर.' या मंत्रांत ऋषि, हा पाही इंद्र आला आहे त्याला लौकर हवि दे, नाहीं तर हा असाच निघून जाईल असें आपल्या स्त्रियेस म्हणत आहे. 'हरितः न अयसे' हे जे उपमादर्शक शब्द ऋचेंत आहेत ते दुर्बोध दिसतात. आम्हांस जो त्याचा अर्थ वाटतो त्याप्रमाणें हा भावार्थ दिला आहे. त्यांत ' न ' याचा अर्थ ' आणि ' असा केला म्हणजे बरीच अडचण दूर होते.

' उषेप्रमाणें सुंदर स्त्रिये '=' उषो न शुभ्रे.' यांत ' उषः ' ही संबोधनविभक्ति ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. 'शुभ्रे' ही संबोधनी असल्यामुळें उपमेंत सुद्धां ' उषः ' ही संबोधनी शब्दसाहचर्याच्या आकर्षणामुळें झालेली आहे. अशा प्रयोगाचीं दुसरीं उदाहरणें वेदांत सांपडतात.

' त्याचे घोडे '=' हरितः.' ' हरित् ' हें पाहिजे त्या घोड्याचें नांव आहे असें नाहीं; इंद्राचे, सूर्याचे, आणि अग्नीचे जे पिवळे घोडे त्यांस ' हरित् ' हें नांव आहे. सूर्याचें आणि अग्नीचे पिवळे घोडे म्हणजे पिवळ्या वर्णाचे किरणरूप घोडे होत. बालसूर्याचे किरण सुवर्णाप्रमाणें पिवळ्या रंगाचे असतात त्यामुळें त्यांस 'हरित्' म्हणजे पिवळ्या रंगाचे घोडे असें नांव पडलें आहे. आणि सूर्याचा तेजःपुंज रथ किरणरूप पिवळे घोडे ओढतात

**इमे त इन्द्र ते वयं पुरुष्टुत ये त्वारभ्य चरामसि प्रभूवसो ।**
**नहि त्वदन्यो गिर्वणो गिरः सघत्क्षोणीरिव प्रति नो हर्य तद्वचः ४**

इमे । ते । इन्द्र । ते । वयम् । पुरुऽस्तुत । ये । त्वा । आऽरभ्य । चरामसि । प्रभुवसो इति प्रभुऽवसो ।

नहि । त्वत् । अन्यः । गिर्वणः । गिरः । सघत् । क्षोणीःऽइव । प्रति । नः । हर्य । तत् । वचः ॥ ४ ॥

### भाषायाम्.

४. हे पुरुष्टुत (=बहुभिः स्तुत) प्रभूवसो (=प्रभूतधन=प्रभूतधनस्य पते) इन्द्र इमे (=त्वत्पुरोवर्तिनो) ये वयं त्वा आरभ्य (=त्वाम् आरभ्य=त्वय्यवलम्ब्य) नरामसि (=चरामः=स्थामः), [ते वयं] ते (=तव) [स्मः] । हे गिर्वणः (=प्रियस्तोत्र) [इन्द्र], त्वत् (=त्वत्तः) अन्यः [कोपि देवो] गिरः (=स्तुतीः) न सघत् न (=प्राप्नोति=तासाम् ईश्वरो न भवति), तत् (=तस्मात्) नः (=अस्माकं) वचः (=वचांसि=वचोरूपाः स्तुतीः) क्षोणीरिव (=कश्चिद्यथा स्वपरिचरा) [हर्यति=कामयते] [तथा], प्रतिहर्य (=कामयस्व तान् प्रति स्निग्धदृशा दृष्ट्वा ताः कामयमानो भव) ॥

अशी प्रसिद्धि झाल्यावर उपासकाचा सोमरस पिण्याकरितां यज्ञाप्रत रथांत बसून येणारा इंद्रहि सूर्याप्रमाणें पिवळे घोडे आपल्या रथास जोडितो असें मानणें हें स्वाभाविक आहे. शिवाजीच्या तलवारीचें नांव 'भवानी' होतें हें प्रसिद्ध आहे, आणि शिवाजी छत्रपति आपल्या भवानीच्या योगानें अनेक पराक्रम करीत असे याविषयी एकदा प्रसिद्धि झाल्यावर दुसरा कोणीएक तसाच विख्यात राजा होईल आणि त्याजवळ तसेच पराक्रम करणारी तलवार असेल तर तिला सुद्धां आपण 'भवानी' असें नांव सहज देऊं. याचप्रमाणें वेदांत इंद्राच्या घोड्यास 'हरित्' हें नांव पडलें आहे.

४. हे बहुतांनीं स्तविलेल्या विपुलसंपत्तिमान् इंद्रा, आम्ही ज्यापेक्षां तुजवर अवलंबून चालतों त्यापेक्षां आम्ही तुझे आहोंत. कारण कीं हे स्तुतिप्रिय इंद्रा, तुजशिवाय दुसऱ्या कोणालाहिं स्तुति प्राप्त होत नाहींत. तर आमच्या ह्या स्तुतींवर, दासीवर प्रीति केल्याप्रमाणें, प्रीति कर.

4. O Indra, praised by many, O Lord of bliss, thine are we who live in dependence on thee. For none else than thee owns the praises, O prayer-loving Indra. Look, therefore, with kindness upon our praises as [though they were thy] attendants.

४ भावार्थः—' हे इंद्रा, ज्यापेक्षां आम्ही तुजवर अवलंबून आहों आणि तुला तनमनधनेंकरून हे शरण आलों आहों, त्यापेक्षां आम्ही तुझेच आहोंत. आणि आम्ही तुझ्याच स्तुति गात आहों. कारण कीं आमच्या स्तुतींचा तूंच स्वामी आहेस, दुसरा कोणी नाहीं. यास्तव तुझ्या स्तुति आम्ही आज गात आहों. त्या तूं आपल्या दासी असें समजून त्यांजवर कृपा कर.'

' बहुतांनीं स्तविलेल्या '= ' पुरुष्टुत. ' म्हणजे ज्याची स्तुति पुष्कळजण करितात.

' आम्ही ज्यापेक्षां तुजवर अवलंबून चालतों त्यापेक्षां आम्ही तुझे आहों '= 'ये वयं त्वा आरम्य चरामसि ते [वयं] ते [स्मः].' अक्षरशः अर्थ, 'जे आम्ही तुजवर अवलंबून चालतों ते आम्ही तुझे आहों.'

भूरि॑ त इन्द्र वी॒र्यं१॒॑ तव॑ स्मस्य॒स्य स्तो॒तुर्म॑घव॒न्काम॒मा पृ॑ण ।
अनु॑ ते॒ द्यौर्बृ॑ह॒ती वी॒र्यं॑ मम इ॒यं च॑ ते पृथि॒वी ने॑म॒ ओज॑से ॥५॥

भूरि॑ । ते॒ । इ॒न्द्र॒ । वी॒र्य॑म् । तव॑ । स्म॒सि॒ । अ॒स्य । स्तो॒तुः । म॒घ॒ऽ
व॒न् । काम॑म् । आ । पृ॒ण ।
अनु॑ । ते॒ । द्यौः । बृ॒ह॒ती । वी॒र्य॑म् । म॒मे॒ । इ॒यम् । च॒ । ते॒ । पृ॒थि॒वी ।
ने॒मे॒ । ओज॑से ॥ ५ ॥

---

भाषायाम्.

५. हे इन्द्र, ते (=तव ) वीर्यं (=सामर्थ्यं ) भूरि (=महद् ) [ अस्ति ] । [ वयं तव स्मसि (=स्मः) । हे मघवन् (=धनवन्निन्द्र ), [ त्वम् ] अस्य स्तोतुः (=मम ) कामम् (=अभिलषितम् ) आपृण (=पूरय ) । ते (=तव ) वीर्यं (=सामर्थ्यं ) महती द्यौः (=महान् द्युलोकोपि ) अनुममे (=पश्चात् मीयते=तव वीर्यादनन्तरं मीयते, नतु पूर्वं तेन समं वा=तव वीर्याद् अल्पीयसी भवति ) इयं (=पुरोदृश्यमाना ) पृथिवी च ते (=तव ) ओजसे (=बलाय=त्वद्बलाद् भीत्वा ) नेमे (=नता बभूव) ॥

महान् द्युलोकोपि तव सामर्थ्यादल्पीयानेव तथा इयं विस्तीर्णा पृथिवी त्वद्बला-द्भीत्येव त्वद्बलभाराद्वा अधोनता भूत्वा तिष्ठतीति भावः ॥

५. हे इंद्रा, तुझें सामर्थ्य मोठें [आहे]. [आम्ही] तुझे आहों. हे संपत्तिमान् [इंद्रा], [तूं] या स्तोत्याची मनकामना पूर्ण कर. महान् द्युलोकहि तुझ्या सामर्थ्याच्या बरोबर नाहीं; आणि ही पृथिवी तुझ्या बळास भिऊन नमून खालीं राहिली आहे.

5. Vast [is] thy heroism, O Indra. We are thine. Fulfil the desire of this [thy] praiser, O blessed [Indra]. The vast heaven falls short of thy heroism: and this earth bows to thy strength.

---

५. या सुंदर ऋचेचा भावार्थ असा आहे कीं, 'हे इंद्रा, तुझें सामर्थ्य अपरिमित आहे, याकरितां आम्ही तुझेच आहों, दुसऱ्या देवांस शरण जात नाहीं. यास्तव मी जी ही तुझी स्तुति करीत आहें त्या माझी मनकामना तूं पूर्ण कर. कारण कीं तूं सर्व प्रकारच्या संपत्तींनीं परिपूर्ण आहेस. तुझें सामर्थ्य तर इतकें मोठें आहे कीं, हा जो महान् द्युलोक आमच्या डोक्यावर दिसतो तोहि त्यापेक्षां लहान आहे. आणि ही बापडी पृथिवी तर तुझ्या बळाच्या भारानें नमूनच जणुं अशी खालीं पडून राहिली आहे.' या ऋचेंत इंद्राच्या मोठेपणाविषयीं, सामर्थ्याविषयीं, आणि संपत्तीविषयीं उत्तम वर्णन आहे, आणि इतकेंहि असून अर्थ किती सरळ आहे पाहा!

पुरातनकाळचे ऋषींचा असा पूर्ण समज होता कीं देव अति मोठे, अति बलाढ्य, अति श्रीमान्, आणि आपण च्यार दिवस जगणारे, निर्बळ आणि निर्धन अल्प प्राणी आहों, यास्तव आपण त्यांस शरण जावें आणि त्यांचे अंकित व्हावें यांतच आपलें संरक्षण, आणि मोठेपण आहे.

**त्वं तमिन्द्र पर्वतं महामुरुं वज्रेण वज्रिन्पर्वशश्चकर्तिथ ।**
**अवासृजो निवृताः सर्तवा अपः सत्रा विश्वं दधिषे केवलं सहः**
**॥ ६ ॥ २२ ॥ १० ॥**

त्वम् । तम् । इन्द्र । पर्वतम् । महाम् । उरुम् । वज्रेण । वज्रिन् ।
पर्वऽशः । चकर्तिथ ।
अव । असृजः । निऽवृताः । सर्तवै । अपः । सत्रा । विश्वम् । दधिषे ।
केवलम् । सहः ॥ ६ ॥ २२ ॥ १० ॥

## भाषायाम्.

६. हे इन्द्र, त्वं तं (=प्रसिद्धं) महां (=महान्तम्) उरुं (=विस्तीर्णं) पर्वतं (=मेघं=वृत्रं) पर्वशः (=पर्वणि पर्वणि) वज्रेण चकर्तिथ (=शकलीचकृषे) । [ त्वं ] निवृताः (=अवरुद्धा) अपः (=उदकानि=मेघोदकानि) सर्तवै (=सर्तुं=सरणाय) अवासृजः (=अवाङ्मुखमस्राक्षीः=आवर्जितवानसि) । सत्रा (=सत्यमेव) [ त्वं ] विश्वं (=नानाविधं) सहः (=बलं) केवलं (=समस्तं=संगृहीतं) दधिषे (=धारयसि)॥ नानाविधं बलं केवलं तवैवास्तीत्यर्थः ॥

अत्र सत्रेत्यस्य केचित् 'सह'शब्देन व्याख्यानं कुर्वन्ति । तच्चिन्त्यम् । ऋ. ४. ३०. ३ सत्रा ते अनु कृष्टयो विश्वा चक्रेव वावृतुः । सत्रा महां असि श्रुतः इत्यत्र सत्रेत्यस्य सत्यमेवेत्येव व्याख्यानं कर्तुं योग्यत्वात् बहुषु मन्त्रान्तरेषु सायणाचार्यैस्तथैव व्याख्यातत्वाच्च ।

६. हे इंद्रा, हे वज्रधरा, त्या महान् [आणि] विस्तीर्ण पर्वताला तुकडे तुकडे करून तूंच तोडून टाकिता झालास. [आणि] अवरोधून ठेविलेल्या उदकांस तूं वाहण्यासाठीं खालीं सोडिता झालास. [आणि] खरोखर तूंच सर्व कांहीं बळ एकटाच धारण करितोस.

6. Thou didst, O Indra, thou, O thunderer, with thy thunderbolt didst cut to pieces that great and vast mountain (the Cloud): thou didst pour down the confined waters that they might flow. Truly thou alone dost possess all power undivided.

६. 'वृत्राला मारून त्याचे तुकडे तुकडे करून टाकिले ते त्वांच टाकिले, आणि वृत्राला मारून मेघोदक भूमीवर पाडिलें तें त्वांच पाडिलें. या प्रकारेंकरून सर्व प्रकारचें बळ एकट्या तुझ्याच अंगीं मिळालें आहे, तुझ्या शिवाय दुसऱ्या कोणाच्या अंगीं नाहीं', असें तात्पर्य होय.

१.- 'त्या महान् [आणि] विस्तीर्ण पर्वताला'=' तं पर्वतं महान् उरुं.' हा पर्वत म्हणजे पर्वतासारिखा दिसणारा जो मेघ तद्रूपी वृत्रासुर. त्याला पर्वत म्हणतात याविषयीं पूर्वीं पुष्कळ वेळ सांगितलेंच आहे. तो 'महान् पर्वत' म्हणजे ज्याला इंद्रानें विध्वंसिल्याविषयीं प्रसिद्धि आहे तो.

खालीं लिहिल्याशिवाय अधिक फेरफार न करितां ही ऋचा साधारण श्लोकाप्रमाणें म्हणतां येते:-

तुअं तमिन्द्र पर्वतं महामुरुं ।
वज्रेण वज्रिन् पर्वशश्चकर्तिथ ।
अवासृजो निवृताः सर्तवा अपः ।
सत्रा विश्वं दधिषे केवलं सहः ।

## सूक्तम् ५८.

गौतमो नोधा ऋषिः । अग्निर्देवता । आद्याः पञ्च जगत्यः । शिष्टास्त्रिष्टुभः ।

नू चित्सहोजा अमृतो नि तुन्दते होता यद्दूतो अभवद्विवस्वतः ।
वि साधिष्ठेभिः पथिभी रजो मम आ देवताता हविषा विवासति
॥ १ ॥

नु । चित् । सहःऽजाः । अमृतः । नि । तुन्दते । होता । यत् । दूतः ।
अभवत् । विवस्वतः ।
वि । साधिष्ठेभिः । पथिऽभिः । रजः । ममे । आ । देवऽताता । हविषा । विवासति ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. सहोजाः (=बलेन जातः) अमृतः (=मरणरहितो) होता (=देवानाम् आह्वाता) [अग्निः] यद् (=यदा) विवस्वतः (=यजमानस्य) दूतो (=हविषां हर्ता देवानामाहर्ता च) अभवत् (=भवति) [तदा] [स] नूचित् (=क्षिप्रमेव) वितुन्दते (=अरण्योः सकाशात् निर्गच्छति)। [अनन्तरं च] साधिष्ठेभिः (=साधिष्ठैः=साधकतमैः) पथिभिः (=मार्गैः) रजः (=अन्तरिक्षं) विममे (=विशेषेण परिमितं करोति=अन्तरिक्षं विचरति)। [एवं प्रकारेण आविष्कृतस्वरूपः सन् देवांश्च आनीतवान् सन्] देवताता (=देवतातौ=यज्ञे) [देवान्] हविषा आविवासति (=परिचरति=यजति)॥

स्वीकृतदूत्योऽग्निः सहसा अरण्योर्निर्मथ्यमानो झटिति तयोः सकाशाज् जनितो भूत्वा अन्तरिक्षं प्रति गच्छति। तस्माच्च देवान् आनीय यज्ञे तान्परिचरतीत्यर्थः ॥

## सूक्त ५८.

ऋषि—गोतमकुळांत जन्मलेला नोधा या नांवाचा कोणीएक. देवता—अग्नि. वृत्त—पहिल्या पांच ऋचांचें जगती, आणि राहिलेल्यांचें त्रिष्टुभ्.

१. बळानें उत्पन्न झालेला मरणरहित होता [अग्नि] जेव्हां यजमानाचा दूत होतो, [तेव्हां] तो सत्वर [अरणींतून] बाहेर पडतो. [तो] अगदी जवळच्या मार्गांनीं अंतरिक्षांत जातो [आणि] हवीनें यज्ञांत [देवांची] उपासना करितो.

## HYMN 58.

To *Agni*. By *Nodhas* of the Family of *Gotama*. Metre—*Jagatî* of the first five, and the *Trishtubh* of the rest.

1. Quickly does the strength-born, immortal invoker (Agni) come out [from the wood] when he becomes the messenger of the sacrificer. By the best paths he passes through the aerial regions. With the oblation he serves [the gods] in the sacrifice.

---

१. भावार्थः—'बलपुत्र आणि अमर असा जो अग्निरूप होता तो जेव्हां उपासकांचें दूतत्व स्वीकारितो, तेव्हां तो आपल्या आईबापांच्या पोटांतून म्हणजे अरणींतून एकाएकीं बाहेर पडतो, आणि अगदी जवळच्या वाटेनें आकाशांतून स्वर्गीं जाऊन देवांस घेऊन येतो, आणि त्यांस यज्ञांत हवि अर्पण करून पूजितो.' म्हणजे अग्नीला उपासक जन अरणींत संघर्षणानें उत्पन्न करून त्याला पेटवितात आणि देवांस खालीं आणण्याकरितां आकाशमार्गानें वर पाठवितात. तो जाऊन देवांस घेऊन येतो, आणि त्यांस यजमानानें सिद्ध केलेलें हवि अर्पण करितो.

'बलानें उत्पन्न झालेला'='सहोजाः.' म्हणजे बलाचा अथवा शक्तीचा पुत्र सू. २६ मं. १० आणि त्याजवरील टीप पहा.

'होता.' म्हणजे देवांस यज्ञाप्रत बोलावून आणणारा. अग्नीस 'होता' म्हणण्याचें कारण पूर्वी पुष्कळ ठिकाणीं सांगितलेंच आहे.

'अरणी' म्हणून पिंपळाच्या लांकडाचे दोन तुकडे असत. ते एकमेकावर घांसून अग्नि उत्पन्न करीत असत. या अरणींस वेदांत अग्नीचीं मातापितरें असें म्हटलें आहे. उदाहरणार्थः—आ यो मात्रोरुशेन्यो जनिष्ट देवयज्याय सुक्रतुः पावकः (='जो सुंदर, सुप्रज्ञ आणि तेजःपुंज अग्नि आपल्या आईबापांपासून यज्ञकर्मासाठीं जन्मला'). ऋ. ७. ३.९.

'अगदी जवळच्या मार्गांनीं.' ऋ. ७. ६४. ३ पहा.

**आ स्वमद्म युवमानो अजरस्तृष्वविष्यन्नतसेषु तिष्ठति ।**
**अत्यो न पृष्ठं प्रुषितस्य रोचते दिवो न सानु स्तनयन्नचिक्रदत् ॥ २**

आ । स्वम् । अद्म । युवमानः । अजरः । तृषु । अविष्यन् । अतसेषु । तिष्ठति ।
अत्यः । न । पृष्ठम् । प्रुषितस्य । रोचते । दिवः । न । सानु । स्तनयन् । अचिक्रदत् ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. स्वम् अद्मं (=भक्ष्यं) तृषु (=क्षिप्रम्) आयुवमानः (=स्वकीयज्वालया संमिश्रयन्=गृह्णन्) अजरः [=जरारहितः] [अग्निः] अविष्यन् (=भक्षयितुमिच्छन्] [सन्] अतसेषु (=समित्काष्ठेषु) तिष्ठति (=आरोहति) । प्रुषितस्य (=घृतसिक्तितस्य) [=अग्नेः] पृष्ठम्, अत्यो न (=अश्व इव=घर्षणसंवाहनादिना संस्कृतस्याश्वस्य पृष्ठमिव), रोचते (=शोभते) । [स] दिवः सानु स्तनयन्न (=द्युलोकस्य समुच्छ्रितं पृष्ठं पादाघातेन गर्जयन्निव), अचिक्रदत् (=गम्भीरशब्दं करोति) ॥

अत्रेदमुक्तं भवति । अस्माभिः प्रथमं दत्तं भक्ष्यं शीघ्रं गृह्णन् अजरोऽग्निरधिकं भक्षयितुमिच्छन् (=अस्माभिरर्पयिष्यमाणं हविः सेवितुमिच्छन्) सन् समित्काष्ठेष्वारोहति । घृतसिक्तितः संश्च घर्षणसंवाहनादिसंस्कारेण प्रसाधितोऽश्व इव रोचमानः सन् देवानावोढुं द्युलोकं प्रति गच्छति सत्वरगमनाच्च द्युलोकस्य पृष्ठं पादाघातेन गर्जयन्निव नादं करोतीति ॥

'अंतरिक्षांत जातो'='वि रजो ममे' अक्षरशः अर्थ, 'अंतरिक्ष मोजतो.' म्हणजे अंतरिक्षांतून चालून स्वर्गात जातो. सायणाचार्य येथें 'अंतरिक्ष उत्पन्न करितो' असें भाष्य करितात. 'वि+मा' याचा अर्थ जरी 'निर्माण करणें' असा कितीएक ठिकाणीं होतो असा दिसतो, तरी 'मोजणें' म्हणजे जमिनीवरून, आकाशांतून वगैरे चालणें, जाणें असाहि अर्थ होतो. त्याचीं उदाहरणें ऋ. ५. ८५. ५; १. १६४. ५; ६. ४९. १३; आणि ५. ८१. ३ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्यांत आहेत.

या ऋचेंत तर खडबडीतपणा फारच थोडा आहे; दुसऱ्या आणि तिसऱ्या चरणांत प्रत्येकी एकेक दीर्घ ऱ्हस्व म्हणावा लागतोः—

नू चित्सहोजा अमृतो नि तुन्दते ।
होता यद्दूतो अभवद्विवस्वतः ।
वि साधिष्ठेभिः पथिभी रजो ममे ।
आ देवताता हविषा विवासति ।

२. जरारहित [अग्नि] आपला भक्ष सत्वर घेऊन, मग भक्षण करण्याच्या इच्छेनें लांकडांवर उभा राहतो. घृतामें शिंपडलेल्या [अग्नी]ची पाठ घोड्या[च्या पाठी]प्रमाणें शोभते. तो द्युलोकाचें शिखर जणुं गर्जविता होत्साता मोठा नाद करितो.

2. Quickly seizing his own food, [and] wishing to eat, the ever youthful [Agni] stands upon the fuel. The back [of Agni] anointed [with ghee] shines like [the back of] a horse. He makes a noise as if causing the ridge of heaven to resound.

---

२. 'अरणींतून अग्नि बाहेर पडून वृद्धिंगत होऊन आम्हीं अर्पण केलेलें भक्ष्य त्वरित खाऊन हविरन्नादि जें आम्हीं अर्पण करणार तें खाण्याची इच्छा करून हा तरुण अग्नि समिधांवर चढून बसला आहे. याजवर आम्हीं तूप ओतल्यामुळें, खरारा करून घांसून मजिवलेल्या घोड्याप्रमाणें, याची पाठ दिसत आहे. आणि हा नाद करीत आहे जसा काय देवांस आणण्यास जात असून स्वर्गाच्या पाठीवरून धांवत असतां तेथें प्रतिशब्दच उत्पन्न करीत आहे,' असा भावार्थ.

'जरारहित'='अजरः.' अग्नि नित्य तरुणच असतो, कधींहि म्हातारा होत नसतो, असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलें आहे. सू. ३६, मं. १५; सू. २२ मं. १० इत्यादि पहा.

'लांकडावर उभा राहतो'='अतसेषु तिष्ठति.' म्हणजे जो समिधांचा ढीग घालून ठेविला आहे त्यावर. समिधा पेटूं लागल्या आहेत आणि अग्नीच्या ज्वाळा जिकडे तिकडे पसरत आहेत इतकें विवक्षित दिसतें.

या ऋचेचा उत्तरार्ध तर अगदी साधारण श्लोकाप्रमाणें वाचतां येतो, प्रथमार्धांतील शेवटचा भाग विशेष ओढाताणीशिवाय म्हणतां येतो, परंतु प्रथम पाद मात्र बराच खडबडीत आहेः—

आ सुअमद्म युवमानो अजरः।
तृषु अविष्यन्नतसेषु तिष्ठति।
अत्यो न पृष्ठं प्रुषितस्य रोचते।
दिवो नसानु स्तनयन्नचिक्रदत्।

क्राणा रुद्रेभिर्वसुभिः पुरोहितो होता निषत्तो रयिषाळमर्त्यः ।
रथो न विक्ष्वृञ्जसान आयुषु व्यानुषग्वार्या देव ऋण्वति ॥ ३ ॥

क्राणा । रुद्रेभिः । वसुऽभिः । पुरःऽहितः । होता । निऽसत्तः । रयिषाट् । अमर्त्यः ।
रथः । न । विक्षु । ऋञ्जसानः । आयुषु । वि । आनुषक् । वार्या । देवः । ऋण्वति ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

३. क्राणा (=हविर्वहनं कुर्वाणो) रुद्रेभिः (=रुद्रैरेतन्नामकैर्देवैः) वसुभिः (=एतन्नामकैर्देवैश्) [च] पुरोहितः (=पुरस्कृतः=हविरानयनार्थं प्रेषितः) रयिषाट् (=रयीणां शत्रुधनानामभिभविता) अमर्त्यः (=मरणरहितः) [एतादृशः] [अग्निरूपो] होता निषत्तः (=निषण्णः=स्थानापन्नोऽस्ति) । [अयं] देवः ऋञ्जसानः (=स्तोत्रैः प्रसाधितः=स्तुतः सन्) आयुषु (=उपासकेषु=उपासकानां गृहेषु) आनुषक् (अनुक्रमेण=सातत्येन) वार्या (=वार्याणि=धनानि) विऋण्वति (=प्रापयति), ऋञ्जसानः (=प्रसाधितो) रथो विक्षु न (=कृषिजनानां गृहेष्विव=कृषिकारिणां गृहेषु यथा धान्यमानयति तथा) ॥

वसन्तर्तौ क्षेत्रे लूनेषु धान्यभारेषु गृहं प्रत्यानेतव्येषु सत्सु इदानीमपि क्षेत्रकारा रथं पुष्पादिभिः प्रसाध्य क्षेत्रेषु नीत्वा धान्यराशीन् रथे स्थापयित्वा ततो वाद्यगीतनृत्यैः सह रथं स्वगृहमानयन्तीति दक्षिणदेशे प्रसिद्धम् ॥

अत्र ऋञ्जसानः इत्येतत् पदं कैश्चिच्छार्मण्यविद्वद्भिः ‘ रजिष्ठपथेन धावन् ’ इति व्याख्यातं तत् तु चिन्त्यं भाति, ‘ तमीळत प्रथमं यज्ञसाधं विश आरीराहुतमृञ्जसानम् (ऋ. १. ९६. ३)’ इत्यत्र तथा ‘ उप यो नमो नमसि स्तभायन्नियर्ति वाचं जनयन्यजध्यै । ऋञ्जसानः पुरुवारः उक्थैः आ इन्द्रं कृण्वीत सदनेषु होता (ऋ. ४. २१. ५)’ इत्यत्र ऋञ्जसानशब्दस्य सायणाचार्येण स्तोत्रैः प्रसाधित इति स्थाने व्याख्यातत्वात् । ‘ सरलं धावन् ’ इति व्याख्यानस्य केवलं धात्वर्थाश्रयत्वाच्च । क्राणेत्याकारान्तं पदं ‘ बर्हणा ’ (ऋ. १. ५६. ५ इत्यादौ) साधुया (ऋ. ५. ११. ४; १. ४६. ११) इतिवच्च पुंसि प्रथमान्तम् ॥

३. रुद्रांनीं [आणि] वसूंनीं पुढें केलेला, हविर्वहनाविषयीं कुशळ, मरणरहित [आणि] धनें जिंकणारा [असा] हा [अग्निरूप] होता स्थानापन्न [झाला आहे]. लोकांचे घरीं [जसा सजविलेला] रथ [धनें आणून देतो] तसा उपासकांचे घरीं [हा अग्नि]देव [स्तोत्रांनीं] सजविलेला होत्साता धनांची रास आणून देतो.

3. [Agni], active in the sacrifice, put forward by the Rudras [and] by the Vasus, winner of wealth, the immortal invoker, has taken his seat. [This] god adorned [with praises] brings a stream of wealth to the houses of [his] worshippers, as [does] an adorned car [bring grain] to the houses of the cultivators.

---

३. 'अग्नि प्रदीप्त होऊन हवि ग्रहण करण्यासारिखा झाला आहे असें पाहून ऋषि जवळ असलेल्या मित्रांस म्हणतो कीं, 'हा पाहा हवि वाहून नेण्याविषयीं कुशळ, रुद्रगणनामक देवांनीं आणि वसुगणनामक देवांनीं आम्हीं अर्पण केलेलें हवि त्यांजकडेस घेऊन जाण्यासाठीं पुढें केलेला म्हणजे पाठविलेला, आणि युद्धांत शत्रूंशीं लढून त्यांचें धन हरण करणारा, आणि मरणरहित जो अग्नि तो आमचा होता म्हणजे होमनिष्पादक होऊन बसला आहे. तर आपण याची स्तुति करून हवि अर्पण करूं. कारण कीं याची स्तुति करून याला सजविला असतां, सजविलेली गाडी जशी धान्याची रास शेतकऱ्याच्या घरीं आणिते तसा हा संपत्तीची रास उपासकांच्या घरीं आणीत असतो.'

यांत जी उपमा दिली आहे तिचा अर्थ असा आहे कीं, शेतकरी लोक सुगीच्या दिवसांत शेतांतून, दाण्याची रास आणावयाची झाली म्हणजे गाडी सजवून तींतून घरीं आणीत असतात. ही चाल दक्षिणी महाराष्ट्र देशांत अजून आहे. पाडव्याच्या सुमारें शाळु जोंधळा अथवा हरभरे किंवा गहूं शेतांत मळून राशी केल्या असतील त्या घरीं आणावयाच्या असल्या म्हणजे शेतकरी आपल्या गाड्या फुलें, हार वगैरे लावून शोभवितात, आणि त्यांत दाणे भरून वाजत गाजत, नाचत गात धरीं घेऊन येतात. याच चालीला अनुलक्षून यांत उपमा दिली आहे असें आम्हांस वाटतें.

'रुद्रांनीं आणि वसूंनीं.' 'रुद्र आणि वसु' हे कोण देव आहेत याविषयीं सू. ४५ मं. १ याजवरील 'वसु,' 'वसुगण' यांजवरील टीप पहा. रुद्रांनीं आणि वसूंनीं पुढें केलेला असें विशेषण अग्नीस या मंत्रांत देण्याचें प्रयोजन इतकें आहे

**वि वार्तजूतो अतसेषु तिष्ठते वृथा जुहूभिः सृण्या तुविष्वणिः ।**
**तृषु यदग्ने वनिनो वृषायसे कृष्णं त एम रुशदूर्मे अजर ॥ ४ ॥**

वि । वार्तऽजूतः । अतसेषु । तिष्ठते । वृथा । जुहूभिः । सृण्या । तुविऽस्वनिः ।
तृषु । यत् । अग्ने । वनिनः । वृषऽयसे । कृष्णम् । ते । एम । रुशत्ऽऊर्मे । अजर ॥ ४ ॥

### भाषायाम्.

४. वातजूतः (=वायुना प्रेरितः) [ अग्निः ] जुहूभिः (=ज्वालारूपाभिर्जिह्वाभिः) सृण्या [ च ] (=तेजोयष्टिरूपेण=लवित्रेण च) तुविष्वणिः (=महास्वनः) [ सन् ], अतसेषु (=उन्नतेषु वृक्षेषु ) वृथा (=अनायासेन ) वितिष्ठते (=विशेषेण तिष्ठति=विविधं प्रसरति ) । –हे रुशदूर्मे (=दीप्तज्वाल ) अजर (=जरारहित ) अग्ने, यद् (=यदा ) [ त्वं ] तृषु (=शीघ्रं ) वनिनो (=वनवृक्षान् ) वृषायसे (=धारयसि ) [ तदा ] ते (=तव ) एम (=मार्गः) कृष्णं (=कृष्णवर्ण ) [ भवति ] ॥
' एतस्यामृचि वातप्रेरितोऽग्निर्वनं कथं दहतीति स्वभावोक्तिः क्रियते ।

र्की, ' वसु आणि रुद्र ' या देवास ऋषीच्या मनांत हवि अर्पण करावयाचें आहे.

' धनें जिंकणारा '=' रयिषाट् ' म्हणजे, उपासक शत्रूंशीं लढूं लागले म्हणजे शत्रूंचा पराजय करून त्यांचें धन उपासकांस मिळवून देणारा. शत्रूंचा पराजय झाला म्हणजे त्यांची संपत्ति सहजच जिंकणारास प्राप्त होते.

' शेतकरी लोकांचे घरीं ' ' विक्षु.' हा शब्द आणि त्याच्या संबंधानें हा सगळाच मंत्र मोठ्या महत्त्वाचा आहे. कारण कीं ' ब्राह्मण,' ' क्षत्रिय,' 'वैश्य,' ' शूद्र,' असे जे च्यार वर्ण आपण मानितों, त्यांतून ' वैश्य ' म्हणजे खरोखर कोण समजावयाचें तें या मंत्रावरून दिसून येतें. ' क्षत्रिय ' अथवा राजन्य म्हणजे जसा राज्य करणाऱ्या अथवा अधिकार चालविणाऱ्या जातींतील मनुष्य होय, आणि याप्रमाणें ब्राह्मण म्हणजे ब्रह्म अथवा यज्ञकर्म चालविणाऱ्या मनुष्याचा मुलगा अथवा तशा कुळांत झालेला मनुष्य होय, तसा वैश्य म्हणजे 'विश्' यांत जन्मलेला मनुष्य. ' विश् ' म्हणजे साधारण लोक, प्रजा; कीं जे यज्ञादिक कर्में संपादण्याचा धंदा करणारेहि नव्हेत आणि राज्यहि करणारे म्हणजे (क्षत्रियहि) नव्हेत, ते ' वैश्य ' होत. म्हणजे साधारण प्रजा, शेतकरी, कुणबी. हा अर्थ मोठ्या महत्वाचा आहे. कारण

४. वातप्रेरित [अग्नि] [आपल्या] जिह्वांनीं [आणि] कोयतीनें मोठा आवाज करीत करीत सहजच मोठमोठया वृक्षांवर पसरतो.—हे उज्ज्वलज्वालायुक्त अग्नी, हे जरारहित अग्नी, [तूं] जेव्हां एकाएकीं महावृक्षांवर घालून घेतोस [तेव्हां] तुझा मार्ग काळा [होत असतो].

4. [Agni] propelled by the wind, [and] roaring with his tongues [and] with [his] sickle, easily spreads among the trees.—When, O youthful Agni of burning flames, [thou] dost quickly attack the forest-trees, thy path [becomes] black.

---

कीं आतां वैश्य म्हणजे बहुतकरून वाणी लोकांसच समजतात, आणि शेतकरी लोकांस शूद्र समजतात आणि त्यांच्याशीं शूद्राप्रमाणें व्यवहार ठेवितात; म्हणजे 'ब्राह्मणांनीं वैश्यांचें अन्न घ्यावें, पाणी प्यावें, त्यांची मुलगी करावी असें शास्त्रांत सांगितलें आहे तरी त्यांतून कांहींच करीत नाहींत. गुजराथेंत मात्र कुणब्यांस शूद्र असें न समजतां वैश्य म्हणतात.'

'सजविलेला होत्साता '=' ऋञ्जसानः.' हा सायणानुसारें केलेला अर्थ आम्हांस योग्य दिसतो. प्रोफेसर मास्मान या शार्मण्य पंडितांनीं 'समोर धांवणारा' असा अर्थ कल्पिला आहे त्यास पुरता आधार नाहीं असें दिसतें. यास्कांस अनुसरून सायणाचार्य सर्वत्र अर्थ आम्हीं येथें केलेलाच देतात. तेव्हां सायणाचार्यांचा अर्थ स्वकपोलकल्पित नसतां पुरातन काळापासून 'व्याख्यापरंपरागत आलेला आहे, आणि तो सर्वत्र जुळतो. तसा शार्मण्य पंडितांचा जुळत नाहीं.

'धनांची रास आणून देतो '='वार्या आनुषक् वि ऋण्वति.' अक्षरशः अर्थ 'धनें एकामागून एक आणून देतो,' म्हणजे 'धनांचा प्रवाह वाहवितो.'

आधुनिक वृत्तांत आणि या ऋचेंत विशेष भेद नाहीं:—

ऋाणा इंद्रेभिर्वसुभिः पुरोहितो ।
होता निषत्तो रयिषाळमर्त्यः ।
रथो न विक्षु ऋञ्जसान आयुषु ।
वि आनुषग् वारिआ देव ऋण्वति ।

---

४. या मंत्रांत अग्नि काय काय करीत असतो त्याची स्वभावोक्ति केली आहे. म्हणजे अग्नि हा दावाग्नि होऊन अरण्याचीं अरण्यें कशीं जाळून खाक करितो तें सांगितलें आहे. ऋषि म्हणतो, 'अग्नीला वायूनें म्हणजे वाऱ्यानें प्रेरणा केली म्हणजे, तो आपल्या ज्वालारूप अनेक जिभांनीं आणि कांतिरूप कोय-

तपुर्जम्भो वन आ वातचोदितो यूथे न साह्वाँ अव वाति वंसगः ।
अभिव्रजन्नक्षितं पाजसा रजः स्थातुश्चरथं भयते पतत्रिणः ॥५॥
॥ २३ ॥

तपुःऽजम्भः । वने । आ । वातऽचोदितः । यूथे । न । सह्वान् । अव । वाति । वंसगः ।
अभिऽव्रजन् । अक्षितम् । पाजसा । रजः । स्थातुः । चरथम् । भयते । पतत्रिणः ॥ ५ ॥ २३ ॥

---

भाषायाम्.

५. तपुर्जम्भः (=तपूंषि ज्वाला एव मुखानि यस्य स ) वातचोदितः (=वातेन प्रेरितः) [ अग्निः ], यूथे सह्वान् वंसगो न ( =गोसमूहे बलवान् वृषेव ), अववाति (=व्याप्नोति ), [ अपि च ] अक्षितं ( =सकलं ) रजः ( =अन्तरिक्षम्=आकाशं ) पाजसा ( =तेजोरूपेण बलेन ) अभिव्रजन् ( =अभिभवन् ) [ भवति ] । [ एवं सति ] पतत्रिणः ( =पक्षिवदभिपततोग्नेः सकाशात् ) स्थातुश्चरथं ( =सर्वं स्थावरं जङ्गमं च वस्तुजातं=सकलमपि स्थावरजङ्गमरूपं पदार्थजातं ) भयते ( =बिभेति ) ॥

---

तीनें मोठा अवाज करून मोठमोठ्या वृक्षांत पसरतो.–आणि हे दीप्तज्वाल आणि अजर अग्नी, तूं जेव्हां एकाएकीं मोठमोठ्या वृक्षांवर घालून घेतोस, तेव्हां तूं सगळें रान जाळून टाकून ज्या रस्त्यानें तूं जातोस तो मार्ग काळा करून टाकितोस.' ज्याणीं कोंकणांत अथवा सातपुड्यांत वणवा पाहिला असेल त्यांस हें वर्णन अगदी स्वाभाविक दिसेल यांत संशय नाहीं.

'कोयतीनें '=' सृण्या.' म्हणजे अग्नि गवताला किंवा झाडांस वगैरे लागला म्हणजे कोयतीनें गवत, झाड वगैरे कापल्याप्रमाणें आवाज होत असतो. आणि अग्नि त्यांतून फिरतो तेव्हां एकादी लकलकीत कोयतीच जणुं फिरते आहे असें भासूं लागतें. 'सृणि' शब्दाचा असाच अर्थ होतो अशाविषयीं ऋ. १०. १०१ ३, आणि १०. १०६. ६ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा.

'महावृक्षांवर घालून घेतोस '=' वनिनः वृषायसे.' अक्षरशः अर्थ वृक्षांशीं माजलेल्या बैलाप्रमाणें वागतोस. म्हणजे एकादा माजलेला पोळ जसा एकाएकीं धांवून येतो तसा त्या वृक्षांवर जाऊन पडतोस. 'वृषायसे' हें सकर्मक आहे. ( ऋ. १०. ४४. ४ पहा ).

"तुझा मार्ग काळा होतो '=' ते एम कृष्णम्.' जेथून अग्नि गेला असेल तें

५. ज्वालामुख [ आणि ] वातप्रेरित [ अग्नि ], बळकट बैल गाईंच्यां कळपांत [ फिरतो ] तसा, अरण्यांत फिरतो, आणि [ आपल्या ] तेजानें सर्व अवकाश व्यापून टाकितो. [ अग्निरूप ] पक्ष्याला सकल स्थावरजंगम सृष्टि भीते.

5. Fire-jawed [Agni], propelled by the wind, sweeps in the forest as a mighty bull in a flock; pervading the entire space. From winged [ Agni ] [all creation ], that which stands, [ and ] that which moves, receives fear.

स्थळ काळें होतें हें प्रसिद्धच आहे म्हणूनच अग्नीस ' कृष्णवर्त्मा ' (काळा आहे मार्ग ज्याचा तो ) असें नांव पडलें आहे.

हा मंत्र तर सहजच श्लोकाप्रमाणें म्हणतां येतोः—

वि वातजूतो अतसेषु तिष्ठते ।
वृथा जुहूभिः सृण्या तुविष्वणिः ।
तृषु यदग्ने वनिनो वृषायसे ।
कृष्णं त एम रुशदूर्मे अजर ।

५. 'ज्वालादंष्ट्र आणि वायुप्रेरित अग्नि अरण्यांत झपाट्यानें धांवू लागला म्हणजे एकाद्या गुरांच्या कळपांत जसा एकादा फार बळकट बांगर फिरतो आणि अनिवार्य होतो, तसा दिसतो. हा अग्नि आपल्या तेजानें सर्वहि आकाश आणि सर्व जग भरून टाकितो, आणि जसा काय धगधगीत ज्वाळेचाच एक महाप्रचंड पक्षी जिकडे तिकडे उडतो असें भासतें. तेव्हां सकल स्थावरजंगम पदार्थ आणि प्राणी याला भितात ' असा भावार्थ. मोठ्या अरण्यास वणवा लागला म्हणजे अग्नि एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं पाखराप्रमाणें कसा उडतो आणि सगळी जागा कशी व्यापून टाकितो, आणि पशु, पक्षी, झाडें, गवत इत्यादि जे सर्व प्राणी आणि पदार्थ त्यांस कोठेंच पळून जाण्यास व लपून जाण्यास कशी जागाच नाहींशी होते आणि ते सर्व कसा नाश पावतात त्याविषयीं स्वभावोक्ति या ऋचेंत आहे. यांत सांगितलेल्या गोष्टींवरून अग्निदेवाचें खरें स्वरूप काय आहे, म्हणजे अग्निशब्दानें ईश्वर समजावयाचा किंवा अग्निरूप एक देव समजावयाचा तें उघड दिसून येतें.

' आकाश '=' रजः.' म्हणजे जमिनीवरील आणि आकाशांतील जी सर्व पोकळी ती असा अर्थ.

हीहि ऋचा सहज साधारण श्लोकाप्रमाणें थोडक्याच फेरफारानें म्हणतां येतेः—

तपुर्जम्भो वन आ वातचोदितो ।
यूथे न साह्वाँ अव वाति वंसगः ।
अभिव्रजन्नक्षितं पाजसा रजः ।
स्थातुश्चरथं भयते पतत्रिणः ।

दधुष्ट्वा भृगवो मानुषेष्वा रयिं न चारुं सुहवं जनेभ्यः ।
होतारमग्ने अतिथिं वरेण्यं मित्रं न शेवं दिव्याय जन्मने ॥ ६ ॥

दधुः । त्वा । भृगवः । मानुषेषु । आ । रयिम् । न । चारुम् । सुऽहवम् ।
जनेभ्यः ।
होतारम् । अग्ने । अतिथिम् । वरेण्यम् । मित्रम् । न । शेवम् । दिव्याय ।
जन्मने ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. हे अग्ने, भृगवः (=एतत्संज्ञा महर्षयः) सुहवं (=सुखेनाहूतं) त्वा (=त्वां) जनेभ्यः (=मर्त्यानां हिताय) मानुषेषु आ (=मर्त्येषु=मर्त्यानां गृहेषु), रयिं न चारुं (=शोभनं धननिधिमिव कृत्वा), दधुः (=स्थापयामासुः) । दिव्याय जन्मने (=दिव्याय जनाय=देवजनाय=देवानां हिताय) [च] होतारं (=देवानामाह्वातारं) मित्रं न शेवं (=मित्रवत् सुखकरं) वरेण्यं (=वरणीयं=श्रेष्ठम्) अतिथिं [च] [कृत्वा] [दधुः=स्थापयामासुः] ॥

अत्रेदमुक्तं भवति । हे अग्ने, त्वं मर्त्यानां गृहेषु स्थित्वा यथा मर्त्येभ्यो धनं ददासि अपि च देवेभ्यो हविर्यथा प्रापयसि तथा त्वां धनं कृत्वा होतारं च कृत्वा मर्त्यानां गृहेषु भृगवो नाम ऋषयः स्थापयामासुरिति ॥

'मानुषेषु आ' इत्यत्र 'आ' सप्तमीद्योतकः । भृगवो नाम महर्षयः किल स्वर्गाद् अग्निमानीय मृत्युलोके प्रथमं स्थापयामासुरिति तत्पूर्वमग्निर्भूलोके नासीदिति च वेदेषु प्रसिद्धिः ॥

६. [हे अग्नी], ज्याला उपासक सहज बोलावूं शकतात अशा तुला भृगूंनीं, एकाद्या सुंदर खजिन्याप्रमाणें, [मर्त्य] जनांसाठीं मानवांच्या घरीं स्थापिला आहे: हे अग्नी, तुला होता, आणि मित्राप्रमाणें सुखदायक श्रेष्ठ अतिथि करून देवांसाठीं स्थापिला आहे.

6. Thee, O Agni, who can be easily invoked, the Bhṛigus have established in the houses of men as a dear treasure for the benefit of men, [ and ] as an invoker [and] excellent guest pleasing like a friend, for the benefit of the gods.

६. यज्ञशाळेंत प्रदीप्त झालेल्या अग्नीस पाहून ऋषि म्हणतो कीं, 'हे अग्नी, तूं प्रथम या मृत्युलोकीं नव्हतास, तेव्हां तुला भृगु या नांवांच्या ऋषींनीं स्वर्गाहून भूमीवर आणून मनुष्यांच्या घरीं स्थापिलें; आणि दोन हेतूंनीं स्थापिलें. १ ला हा कीं, तूं मनुष्यांस देवांपासून धन आणून द्यावें; आणि २ रा हा कीं, मनुष्यांनीं अर्पण केलेलें हवि खाण्यासाठीं तूं देवांस यज्ञाला आणून त्यांजकडून तें खावयास लावावें. याप्रमाणें मर्त्यांच्या आणि अमर्त्यांच्या हितासाठीं तुला या भूलोकीं भृगूंनीं स्थापिलें आहे· आणि तूं मानवांस आणि देवांस सारिखा प्रिय आहेस.'

'ज्याला उपासक सहज बोलावूं शकतात'='सुहवं.' अक्षरशः अर्थ 'ज्याचा धांवा सोपा आहे तो.' म्हणजे, ज्याचा धांवा केला असतां तो प्रसन्न होऊन त्वरित येतो, इतर देवांप्रमाणें विलंब करणारा नव्हे. आलीकडे कोंकणांत कितीएक गांवीं भूतें अथवा समंद काढावयाचे असतात त्यांस हाक मारिली तरी, म्हणजे ढोल वाजवून गाऱ्हाणें घातलें तरी, लौकर वारें येत नाहीं आणि ते उभे राहत नाहींत. तर अग्नि तसा नव्हे. त्यात्र म्हणून फूक मारिल्याबरोबर ज्वाला टाकून लागलाच प्रगट होतो असें तात्पर्य. ऋ. ६. ५२. ६ यांत 'अग्निः सुशंसः सुहवः पितेव'=' अग्नि हा बापाप्रमाणें ज्याच्याशीं सहज बोलावें आणि बापाप्रमाणें ज्यास सहज हाक मारितां येते असा होय' असें म्हटलें आहे. याप्रमाणें अग्नि हा मोठा प्रिय देव होय, भयंकर नव्हे.

'भृगूंनीं स्थापिला आहे'=' भृगवो दधुः.' भृगु हें नांव येथेंच प्रथम आलें आहे यास्तव याजविषयीं वेदांत काय सांगितलें आहे त्याचें दिग्दर्शन येथें केलें पाहिजे. तें येणेंप्रमाणें:—' भृगु हे प्रख्यात महापुरातन महर्षि होत. पूर्वी या जगांत अग्नि नव्हता, तो भृगूंसाठीं मातरिश्व्यानें म्हणजे वायूनें पृथ्वीवर आणिला (ऋ. १. ६०. १ ). भृगु हे अग्नीला प्रदीप्त करून भजूं लागले (ऋ. १. १२७. ७).-अग्नीला प्रथम भृगूंनीं वेदीवर स्थापिलें, (ऋ. १. १४३. ४ ). भृगूंनीं अग्नीला प्रथम यजमानाच्या घरीं स्थापिलें (ऋ. २. ४. २; ४. ७. १). भृगूंनीं अग्नीला मित्राप्रमाणें घरांत स्थापिलें.' यावरून काय समजावयाचें?

होतारं सप्त जुह्वो३ यजिष्ठं यं वाघतो वृणते अध्वरेषु ।
अग्निं विश्वेषामरतिं वसूनां सपर्यामि प्रयसा यामि रत्नम्॥ ७ ॥
होतारम् । सप्त । जुह्वः । यजिष्ठम् । यम् । वाघतः । वृणते । अध्वरेषु ।
अग्निम् । विश्वेषाम् । अरतिम् । वसूनाम् । सपर्यामि । प्रयसा । यामि ।
रत्नम् ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

७. यम् [ अग्निं ] यजिष्ठं ( =यष्टृतमम्=अतिशयेन कुशलं यष्टारं ) होतारं (=देवानाम् आह्वातारं) [ कृत्वा] सप्त जुह्वः (=सप्तसंख्याका होतारो) वाघतः (=ऋत्विजः) अध्वरेषु ( =यागेषु ) वृणते ( =संभजन्ते=स्वीकुर्वन्ति ) [ तं ] विश्वेषां वसूनां ( =सर्वेषां धनानाम् ) अरतिम् ( =ईश्वरम् ) अग्निं प्रयसा ( =हविरन्नेन ) सपर्यामि ( =परिचरामि ) रत्नं ( =रमणीयम् उत्तमं धनं ) [ च ] यामि ( =याचे ) ॥

'सप्त जुह्वः' इत्येतस्य 'सप्तसंख्याका होतार' इति यद् व्याख्यानम् अनु सायणमस्माभिः कृतं तत्र बहूनि प्रमाणानि । "तमित्त्वा सप्त होतारः ईळते" ऋ. ८. ६०. १६; "सप्त दिशो नानासूर्याः सप्त होतारः ऋत्विजः देवाः आदित्याः ये सप्त तेभिः नः अभिरक्ष" ९. ११४. ३; "समीचीनाः आसते होतारः सपजामयः पदम् एकस्यः पिप्रतः" ९. १०. ७; "इदमित्था रौद्रं गूर्तवचाः" इत्यादि १०. ६१. १; "सादय सप्त होतॄन्" १०. ३५. १०; "स केतुः अध्वराणाम् अग्निः देवेभिः आगमत् अञ्जानः सप्त होतृभिः हविष्मते" ३. १०. ४; "येभ्यो होत्रां प्रथमाम् आयेजे मनुः समिद्धः मनसा सप्त होतृभिः" १०. ६३. ७ इत्यत्र होतॄणां सप्तत्वं प्रतिपादितम् । एवं सत्यपि शार्मण्यपण्डितो विदुष्टरो मास्मान् यदन्यथा व्याचष्टे तच्चिन्त्यमिति भाति ॥

'अरतिं वसूनाम्' इत्येतस्य 'धनानां स्वामी' इति यद् व्याख्यानं सायणाः कुर्वन्ति तत्रापि बहूनि प्रमाणानि । ऋ. १. १२८. ८; ९. २. ३; इत्येते ऋचे दृश्येताम् । यज्ञस्य प्रसाधयितेति यद् विदुष्टरो मास्मान् व्याचष्टे तन्न । "प्राग्नये तवसे भरध्वं गिरं दिवो अरतये पृथिव्याः" ( ऋ. ५. ७. १ ), "अरतिं युवत्योः" ( ऋ. ६. ४९. २.), तथा च "अरतिं मानुषाणां" ( ऋ. ७. १०. ३) इत्यादिषु मन्त्रेषु अरतिशब्दस्य स्वामिशब्देनैव व्याख्यातुं योग्यत्वात् प्रसाधयिता इत्यस्यार्थस्य अरम् इति संशयग्रस्तनिर्वचनान्याधारस्याभावाच्च ॥

---

भृगु हे अतिप्राचीन देवोपासक असून अग्नि पेटवून अग्नीच्या मुखांत देवांप्रीत्यर्थ आहुति घालण्याचा प्रचार प्रथम त्यांनीं घातला असा गूढार्थ आहे कीं काय?

७. ज्याची उत्तम यजनकर्त्ता आणि देवांस बोलावून आणणारा असा समजून सात होते ऋत्विज् यज्ञांत योजना करितात असा जो सकलसंपत्तींचा स्वामी अग्नि, त्याला मी हविरन्नानें भजतों आणि [त्या-जपाशीं] उत्तम धन प्रार्थितों.

7. Him whom the seven invoking priests choose as the best sacrificer [and] invoker in sacrifices—that Agni, the lord of all gifts, I worship with [my] oblation, [and] pray for the highest wealth.

किंवा भृगूंनी अग्नि पृथ्वीवर आणिला हें केवळ रूपक आहे असें समजावयाचें कीं काय? हा शेवटचा पक्ष स्वीकारिला तर त्याला आधार ऋ. ३. ५. १० यांत सापडेल. त्यांत असें सांगितलें आहे कीं 'भृगुभ्यः परिमातरिश्वा गुहा सन्तं हव्यवाहं समीधे.' याचा अर्थ सायणाचार्य, "लपून राहिलेला जो अग्नि त्याला मातरिश्व्यानें भृगूंपासून म्हणजे सूर्यकिरणांपासून पेटविलें" असा करितात. यावरून भृगु म्हणजे सूर्यकिरण असा अर्थ परंपरागत आला आहे असें दिसतें, आणि त्यामुळें जेथें जेथें भृगूंनीं पृथिवीवर यज्ञकर्मासाठीं म्हणून अग्नि प्रथम आणिला किंवा पेटविला असें सांगितलें आहे, तेथें तेथें सूर्यकिरणांनीं अग्नीस प्रथम पृथ्वीवर आणिलें असा गूढार्थ समजतां येईल, आणि मातरिश्व्यानें अग्नि भृगूंसाठीं पेटविला म्हणजे सूर्यकिरणांपासून पृथिवीवर प्रगट होणारा जो अग्नि त्याला वाढवून वायूनें विस्तृत केलें असा अर्थ.

किंवा भृगु हे वास्तविक विद्यमान पुरातन महर्षि असून त्यांणीं अग्निभक्तीचा प्रचार प्रथम स्थापिला ही, आणि भृगु म्हणजे सूर्यकिरण आणि त्यांणीं अग्नीला पृथिवीवर आणिलें ही, अशा दोनी गोष्टी घेऊन त्यांचा संकर झाला आहे असें समजल्यास चालेल.

कसेंहि असले तरी ऋग्वेदांत आणखी असें सांगितलें आहे कीं (ऋ. १०. ४६. २) विद्वान् भृगूंनीं गुराप्रमाणें पळून गेलेला, आणि लपून राहिलेला जो अग्नि त्याला शोधून काढिलें. भृगु हे अतिप्राचीन ऋषि होत असें वेदमंत्र रचले गेले तेव्हांहि मानीत असत. सगळ्या ऋग्वेदसंहितेंत भृगूंनीं केलेलीं सूक्तें नाहींत. आणि ऋग्वेदांत कित्येक ठिकाणीं अशी देवांस अशी प्रार्थना आहे कीं, 'सर्व एकतीस देव, आपो देवी, मरुत्, भृगु, उषा आणि सूर्य, यांसहित तुम्ही येऊन आमचा सोम प्या' (ऋ. ८. ३५. ३). एका मंत्रांत (ऋ. १०. १४. ६) एका ऋषीनें म्हटलें आहे कीं, आमचे जे पितर म्हणजे प्राचीन पूर्वज त्यांचा प्रसाद आम्हांवर असो; आणि त्या पूर्वजांचीं जीं नांवें दिलीं आहेत त्यांत भृगु हे आहेत. तीं नांवें 'अङ्गिरस्', 'नवग्व,' 'अथर्वण' आणि 'भृगु' हीं होत.

याशिवाय ऋग्वेदांत भृगूंविषयीं विशेष कांहीं सांगितलेलें नाहीं. वेदाच्या आलीकडील जे पुराणादिक ग्रन्थ त्यांत तर भृगु हें नांव प्रसिद्ध आहेच, आणि

**अच्छिद्रा सूनो सहसो नो अद्य स्तोतृभ्यो मित्रमहः शर्म यच्छ ।**
**अग्ने गृणन्तमंहस उरुष्योर्जो नपात्पूर्भिरायसीभिः ॥ ८ ॥**

अच्छिद्रा । सूनो इति । सहसः । नः । अद्य । स्तोतृऽभ्यः । मित्रऽमहः । शर्म । यच्छ ।

अग्ने । गृणन्तम् । अंहसः । उरुष्य । ऊर्जः । नपात् । पूःऽभिः । आयसीभिः ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

८. हे सहसः सूनो (=बलस्य पुत्र), मित्रमहः (=अनुकूलदीप्तिमन्) [ अग्ने ], [ त्वम् ] अद्य नः (=अस्मभ्यम्) अच्छिद्रा (=छिद्ररहितानि=क्षयरहितानि) शर्म (=शर्माणि=सुखानि) यच्छ (=प्रयच्छ) । हे अग्ने, हे ऊर्जो नपात् (=बलस्य पुत्र) गृणन्तं (=त्वां स्तुवन्तम्=अस्मत्सदृशं स्तोतारम्) अंहसः (=पापाद्) आयसीभिः पूर्भिः (=अयोवदृढतरैः पालनसाधनैः प्राकारैः) उरुष्य (=रक्ष) ॥

---

विष्णूनें जो परशुरामावतार घेतला तो भृगूच्याच पोटीं घेतला हेंहि प्रसिद्ध आहे.

हा मंत्र श्लोकाप्रमाणें वाचला जाण्यास खालीं दाखविल्याप्रमाणें म्हणावाः—

दधष्टुआ भृगवो मानुषेषु आ ।
रयिं न चारुं सुहवं जनेभिअः ।
होतारमग्ने अतिथिं वरेणिअं ।
मित्रं न शेवं दिविआय जन्मने ।

---

७. या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'सातहि होते ज्या अग्नीला आपणांपेक्षां चांगला होता असें समजून यज्ञांत नेमितात, जो अग्नि सकल धनाचा प्रभु त्याला मी आज येथें हविरन्न देऊन भजतों आणि त्याजवळ संपत्ति प्रार्थितों.'

'सातहि होते.' होते ऋत्विज सात असतात याविषयी ऋग्वेदांत सांगितलें आहे. ते सर्व मंत्र 'भाष्य' खालीं उतरून घेतले आहेत, ते पहा. यज्ञांत जरी सात 'होते' म्हणजे देवांस आह्वान करणारे ऋत्विज आहेत, तरी ते देवांस बोलावून आणण्याचें काम आपणाकडून चांगलें होणार नाहीं, अग्नीकडून चांगलें होईल असें आणि देवांचें यजन व्हावें तसें उत्तम यजन आपणाकडून होणार नाहीं, अग्नीकडून उत्तम होईल असें, समजून अग्नीला आपणांवर श्रेष्ठ होता करून नेमितात, असें तात्पर्य.

**८. हे बलपुत्रा, हे सुखदायकदीप्तिमान् [अग्नी], [तूं] आज आम्हां स्तोत्यांला अक्षय सुखें दे. हे अग्नी, हे शक्तिपुत्रा, तूं [या] स्तोत्याला संकटापासून लोखंडाच्या भिंतींनीं रक्ष.**

8. O son of might, grant thou to-day, O [ Agni ] of friendly brightness, imperishable blessings unto us, thy praisers. O Agni, child of strength, save thou thy praiser from danger by means of iron walls.

---

८. या ऋचेंत ऋषि असें म्हणतो कीं, ' हे बलपुत्रा, हे शक्तिपुत्रा अग्नी, तूं आम्हांसारिख्या स्तोत्यांस आज अक्षय सुख दे, तूं मजसारिख्या स्तोत्याला लोखंडाच्या भिंती बांधून त्यांच्या आंत ठेवून संकटापासून रक्ष. ' हा जरी स्तोत्राचा उपसंहार नाहीं तरी त्याच्या जवळ जवळ आहे, त्यामुळें उपसंहारांत जी प्रार्थना म्हणजे मागणें असतें तें यांत आहे. ' ह्या सूक्तानें तुझें आम्हीं स्तवन केलें आहे, तर तूं कृपा करून आम्हांसारिखे जे तुझे दीन स्तोते त्यांचें तूं संरक्षण कर.'

' सुखदायकदीप्तिमान् '=' मित्रमहः.' सू. ५० मं. २१ याजवरची टीप पहा.

' शक्तिपुत्रा '=' ऊर्जो नपात्.' प्रस्तुत स्थळीं सायणाचार्य ' अन्नाचा पुत्र ' असा अर्थ करितात, पण ऋ. ५. ७. १; ६. ४८. २; ७. १६. १ यांजवरील त्यांचेंच भाष्य पहा.

' लोखंडाच्या भिंतींनीं ' = 'आयसीभिः पूर्भिः.' ऋ. ७. १५. १४ याजवरील सायणभाष्य पहा. शिवाय ऋ. ४. २७. १ यांतहि ' शतं मा पुरः आयसीः अरक्षन् '=' लोखंडाच्या शंभर भिंतींनीं मला रक्षिलें ' असें गर्भस्थ वामदेव ऋषीनें म्हटलें आहे.

अग्नीला बलपुत्र आणि शक्तिपुत्र कां म्हणतात यांविषयीं पूर्वीं पुष्कळ वेळं सांगितलेंच आहे.

हा मंत्र खालीं लिहिल्यावरून पूर्वकाळीं कसा म्हणत असतील, याविषयीं समजून येईल:—

अच्छिद्रा सूनो सहसो नो अद्य ।
स्तोतृभ्यो मित्रमहः शर्म यच्छ ।
अग्ने गृणन्तमंहसः उरुष्य ।
ऊर्जो नपात् पूर्भिरायसीभिः ।

भवा वरूथं गृणते विभावो भवा मघवन्मघवद्भ्यः शर्म ।
उरुष्याग्ने अंहसो गृणन्तं प्रातर्मक्षू धियावसुर्जगम्यात् ॥९॥२४॥

भव । वरूथम् । गृणते । विभाऽवः । भव । मघऽवन् । मघवत्ऽभ्यः । शर्म ।

उरुष्य । अग्ने । अंहसः । गृणन्तम् । प्रातः । मक्षु । धियाऽवसुः । जगम्यात् ॥ ९ ॥ २४ ॥

## भाषायाम्.

९. हे विभावः ( =विभावन्=विशेषेण प्रभावन् ) [ अग्ने ], [त्वं] गृणते (=स्तोत्रे=मत्सदृशाय ) वरूथं ( =रक्षणसाधनं=कवचं ) भव, हे मघवन् (=धनवन् ) [ अग्ने ], [ त्वं ] मघवद्भ्यः ( =धनयुक्तेभ्यो ) [ यजमानेभ्यः] शर्म ( =शरणस्थानं ) भव । हे अग्ने, [ त्वं ] गृणन्तं ( =मत्सदृशं स्तोतारम्) अंहसः (=पापाद् ) उरुष्य (=रक्ष) । –धियावसुः ( =धीमान् प्रज्ञायुक्तः ) [ अग्निः ] प्रातः ( =प्रातःकाले ) मक्षु ( =सत्वरं ) जगम्यात् ( =दिने दिन आगच्छतु ) ॥

९. हे प्रकाशमान् [अग्नी], [तूं] स्तोत्रकर्त्याचें कवच हो, हे धनसंपन्न [अग्नी], [तूं] धनसंपन्न यजमानाचें शरणस्थान हो. हे अग्नी, [तूं] स्तोत्याला संकटापासून तार.—बुद्धिमान् [अग्नि] प्रतिदिवसीं सकाळीं येत जाओ.

9. Do [thou], O brilliant [Agni], become the coat of arms to the praiser, do [thou], O rich [Agni], become the shelter to the rich sacrificers, save [thou], O Agni, the praiser from danger.—May wise [Agni] come daily early in the morn.

---

९. हा या सूक्ताचा उपसंहार आहे. आणि उपसंहारांत जी प्रार्थना म्हणजे वर मागण्याचें मनांत असतें, तो यांत उपास्य देव जो अग्नि त्याजपत मागितला आहे. तो हा कीं, ‘ हे अग्नी, या स्तोत्राचा कर्ता स्तोता जो मी त्या माझें तूं कवच हो, म्हणजे, आंगांत घातलेल्या कवचाप्रमाणें माझें रक्षण करीत जा; आणि मला स्तोत्र करावयास लावणारे जे धनसंपन्न यजमान त्यांनीं तूं शरणस्थान हो, म्हणजे, त्यांनीं तुला शरण यावें आणि त्वां संरक्षण करावें अशा प्रकारें त्यांजवर कृपा कर. कां कीं तूं धनसंपन्न आहेस. तर आणखी पुनः प्रार्थितो कीं, तूं मज स्तोत्याचें संरक्षण कर.—हा अग्नि प्रतिदिनीं प्रातःकाळीं प्रगट होओ, आणि आम्हीं दिलेलें हविर्ग्रहण करीत जाओ.’

पूर्वीच्या काळीं सुद्धा अशी चाल होती कीं, जे देवभक्त श्रीमन्त असतील त्यांणीं गरीब ब्राह्मणांस म्हणजे सूक्तें ज्यांलीं रचितां येत अशा कवींस सूक्तें रचून तीं म्हणून आहुति देऊन यज्ञ करण्याच्या कामीं लावीत आणि यज्ञ संपादणारा यज्ञ करून उपास्य देवतेची स्तुति करून, आपणास यज्ञाच्या कामीं लावणाऱ्या यजमानाचें आणि आपलें स्वताहाचें कल्याण होओ, आणि नित्य संकट दूर होओ, अशी तिची प्रार्थना सूक्ताच्या शेवटच्या मंत्रांत म्हणजे उपसंहारांत स्पष्ट करीत. अथवा जाणवीत. पण त्या वेळीं स्तोता अथवा यज्ञसंपादक एका जातींतील आणि यज्ञ करविणारा यजमान हा दुसऱ्या एका जातीतील हा भेद नसे. स्तोत्र करितां आलें आणि विद्वान् असला म्हणजे पुरे; अमुक जातींतील असला पाहिजे असें नव्हतें, अथवा होमसंपादक झाले तरी आम्ही उंच वर्णाचे ब्रह्मदेवाच्या मुखांतून जन्मलेले आहों आणि यज्ञ करविते यजमान आपणापेक्षां कमी आहेत असें मानीत नसत. म्हणूनच या मंत्रांत सूक्तकर्ता सव्य ऋषि अग्नीजवळ स्तोत्याचें आणि यजमानाचें कल्याण कर अशा अर्थाची प्रार्थना करितो, आपणा

## सूक्तम् ५९.

गौतमो नोधा ऋषिः । अग्निर्वैश्वानरो देवता । त्रिष्टुप् छन्दः ।

**वया इदग्ने अग्नयस्ते अन्ये त्वे विश्वे अमृता मादयन्ते ।**
**वैश्वानर नाभिरसि क्षितीनां स्थूणेव जनाँ उपमिद्ययन्थ ॥ १ ॥**

वयाः । इत् । अग्ने । अग्नयः । ते । अन्ये । त्वे इति । विश्वे । अमृताः । मादयन्ते ।
वैश्वानर । नाभिः । असि । क्षितीनाम् । स्थूणाऽइव । जनान् । उपऽमित् । ययन्थ ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. हे अग्ने, अन्येग्नयः ते (=तव) वया इत् (=शाखा एव) [भवन्ति]। त्वे (=त्वयि) [एवं] विश्वे अमृताः (=सर्वे देवा] मादयन्ते (=हृष्यन्ति)। हे वैश्वानर (=" विश्वेषां नराणां जठररूपेण संबन्धिन् अग्ने)," [त्वं] क्षितीनां मनुष्याणां नाभिः (=अवस्थापयिता) असि। त्वम् उपमित् (=उपस्थापयिता सन्) जनान् (=मनुष्यान् स्थूणेव=स्तम्भ इव) ययन्थ (=धारयसि)॥

स्वताहाला तारण्याची अवश्यकता नाहीं, यज्ञ करवित्या यजमानाला मात्र आहे असें समजून प्रार्थीत नाहीं.

दुसरी गोष्ट अशी ध्यानांत ठेवण्याजोगी दिसून येते कीं, आलीकडच्या काळांतील स्तोते अथवा ऋषि म्हणजे पुरोहित, भट, भिक्षुक यांच्याकडून यज्ञादिक कांहीं तरी कर्म करविलें म्हणजे ते यजमानाचें रक्षण अथवा कल्याण होओ अथवा त्याच्या स्त्रियेला, किंवा मुलीला नित्य सौभाग्य असो आणि त्याप्रमाणेंच आपलें रक्षण म्हणते संरक्षण आणि कल्याण होओ किंवा आपल्या स्वताहाच्या कुटुंबांतोल स्त्रियांसहि सदैव सौभाग्य असो अशी देवांची अथवा ईश्वराची प्रार्थना न करितां, यजमानालाच मात्र ' शांति असो, पुष्टि असो, संतोष असो, वृद्धि असो, विघ्नें दूर होओत, दीर्घायुष्य असो, आरोग्य असो, कर्मांपासून कल्याण होओ, कर्मांचा उत्कर्ष होओ, धर्माची बढती होओ, सुखाची बढती असो, धन आणि धान्य यांचा उत्कर्ष असो, इच्छिलेली संपत्ति प्राप्त होओ, बाहेरच्या प्रदेशीं अरिष्टाचें निरसन होओ, जें बरें असेल तें होओ, पुढच्या कामास विघ्न न होओ, सौभाग्य होओ, सुमंगल असो, ' ( शान्तिरस्तु पुष्टिरस्तु तुष्टिरस्तु वृद्धिरस्तु निर्विघ्नमस्तु

## सूक्त ५९.

ऋषि–गोतमकुळांतील नोधा या नांवाचा. देवता–अग्नि. वृत्त–त्रिष्टुभ्, म्हणजे ज्याला आतां आपण उपजाति म्हणतों तें.

१. हे अग्नी, दुसरे [सर्व] अग्नि तुझ्या शाखाच [होत]. सकळ अमर तुझ्याच ठायीं हर्ष पावतात. हे वैश्वानरा, [तूं] लोकांचा नाभि होस. [तूं] स्तंभाप्रमाणें जनांस आधार [होत्साता] धारण करितोस.

## HYMN 59.

To Agni known as *Vais'vânara* or the Agni of all men. By *Nodhas* of the family of *Gotama*, same as the author of the previous hymn. Metre–*Trishtubh* i.e. the modern *Upajâti*.

1. O Agni, [all] other Agnis [are] thy branches. In thee all immortals are gratified. O Vais'vânara thou art the centre of all races. [Being] a support thou holdest the people like a pillar.

---

आयुष्यमस्तु आरोग्यमस्तु शिवं कर्मास्तु कर्मसमृद्धिरस्तु धर्मसमृद्धिरस्तु इष्टसंपदस्तु बहिर्देशे अरिष्टनिरसनमस्तु यच्छ्रेयस्तदस्तु उत्तरे कर्मण्याविघ्नमस्तु सौभाग्यमस्तु सुमङ्गल्यं चास्तु ) असा लांबचलांब आशीर्वाद देतात, जणूं काय आशीर्वाद देणाऱ्याच्या घरीं तर ह्या सगळ्या संपत्ति भरूनच वाहत आहेत.

या ऋचेच्या पहिल्या तीन पादांत अग्नीविषयीं प्रत्यक्षनिर्देश असून चवथ्या पादांत परोक्षनिर्देश आहे तो लक्षांत ठेवावा. दुसरीं उदाहरणें आजपर्यंत पुष्कळ आलींच आहेत. शिवाय हा येथें परोक्षनिर्देश असण्याचें कारण असें आहे कीं, चवथा पाद म्हणजे 'प्रातर्मक्षू धियावसुर्जगम्यात्' हे शब्द उपासनाविसर्जनाच्या वेळीं उच्चारावयाची गोतमकुळांत चालच पडून गेली होती असें दिसतें. सूक्ताच्या शेवटील मंत्राच्या शेवटीं हे शब्द घातलेले इतर सूक्तांत आढळतात. या मण्डलाच्या साठाव्या सूक्ताचा नववा मंत्र पाहा, त्यांत अग्नीसच लाविले आहेत; पण ऋ. ८. ८० या सूक्ताच्या शेवटील मंत्राच्या शेवटील पादांत सोमरूपी देवास लाविले आहेत. ऋ. ९. ९३ या सूक्ताच्या शेवटील मंत्राच्या शेवटील पादांत सुद्धा सोमासच लाविले आहेत. दुसरींहि उदाहरणें पुष्कळ आहेत.

---

१. हें सूक्त वैश्वानर अग्नीविषयीं आहे. वैश्वानर अग्नि म्हणजे सर्व मनुष्यांचा जो अग्नि तो असें सायणाचार्य म्हणतात; आणि ते असें म्हणतात कीं,

मूर्धा दिवो नाभिरग्निः पृथिव्या अथाभवदरती रोदस्योः ।
तं त्वा देवासोऽजनयन्त देवं वैश्वानर ज्योतिरिदार्याय ॥ २ ॥

मूर्धा । दिवः । नाभिः । अग्निः । पृथिव्याः । अथ । अभवत् । अरतिः । रोदस्योः ।

तम् । त्वा । देवासः । अजनयन्त । देवम् । वैश्वानर । ज्योतिः । इत् । आर्याय ॥ २ ॥

आ सूर्ये न रश्मयो ध्रुवासो वैश्वानरे दधिरेऽग्ना वसूनि ।
या पर्वतेष्वोषधीष्वप्सु या मानुषेष्वसि तस्य राजा ॥ ३ ॥

आ । सूर्ये । न । रश्मयः । ध्रुवासः । वैश्वानरे । दधिरे । अग्ना । वसूनि ।

या । पर्वतेषु । ओषधीषु । अप्ऽसु । या । मानुषेषु । असि । तस्य । राजा ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. अग्निः दिवो (=द्युलोकस्य) मूर्धा (=मूर्धस्थानीयः प्रधानभूतः) पृथिव्या नाभिः (=मध्यस्थानीयश्च) [चास्ति] । अथ (=अनन्तरम्=अत एव) [स] रोदस्योः (=द्यावापृथिव्योः) अरतिः (=स्वामी) अभवत् । तं (=तादृशं) त्वा (त्वां) देवं, हे वैश्वानर [अग्ने], देवासः (=देवा) आर्याय (=आर्यजाताय=आर्यजनानामर्थे) ज्योतिरित् (=ज्योतीरूपेणैव) अजनयन्त (=उदपादयन्) ॥

३. ध्रुवासः (=ध्रुवाः=निश्चला) रश्मयः (=किरणा) आ सूर्ये न (=सूर्य इव) वैश्वानरे अग्नौ [ध्रुवाणि] वसूनि (=धनानि) दधिरे (=ध्रियन्ते=आहूयते) । [अतः कारणात् हे अग्ने], या (=यानि) [वसूनि] पर्वतेषु, ओषधीषु (=वृक्षेषु) अप्सु (=उदकेषु), या (=यानि) [च] मानुषेषु (=मनुष्येषु) [विद्यन्ते], तस्य (=वसुजातस्य=तेषां सर्वेषां वसूनां) [त्वं] राजासि (=अधिपतिर्भवसि) ॥

---

सकळ मनुष्यांच्या जठरांत अग्नि असतो म्हणून वैश्वानर होय आणि त्यामुळेच सकळ देवांसाठीं अग्नीच्याच मुखांत हवि अर्पिलें जातें, म्हणून सकळ अमर जे

२. अग्नि [हा] द्युलोकीचा माथा [आणि] पृथिवीचा नाभि [होय]. आणि तो द्यावापृथिवींचा स्वामी झाला आहे.–असा जो देव तूं त्या तुला, हे वैश्वानर अग्नी, आर्यजनासाठीं ज्योतीरूपानें देव निर्माण करिते झाले.

2. Agni [is] the head of Heaven [and] the navel of the Earth. So he became the master of both Heaven and Earth.—Such thou hast been begotten, O good Vais'vânara, by the gods as a light for the Ârya.

३. सूर्याच्या ठायीं किरण अचल [आहेत] तशीं वैश्वानर अग्नीचे ठायीं धनें [अचल] आहेत.–[हे अग्नी], पर्वतांत जीं [धनें] [आहेत], जीं वृक्षांत, [जीं] उदकांत [आहेत], [आणि] जीं मनुष्यांमध्यें [आहेत], त्यांचा [तूं] राजा होस.

3. As eternal rays in the sun [even so] blessings stand constant in Agni Vais'vânara.—What [blessings] [are] in the mountains, in plants, in the waters, [and] what among men, of those thou, O Agni, art the king.

---

देव ते अग्नीच्याच ठायीं म्हणजे अग्नीच्या मुखानें हर्ष पावतात असें मंत्रांत म्हटलें आहे.

'लोकांचा नाभि होस'=' नाभिरसि क्षितीनाम्'. म्हणजे जनांची व्यवस्था करणारा असें सायणाचार्य म्हणतात. परंतु सकल जन ज्यापासून निघाले आहेत म्हणजे उत्पन्न झाले आहेत तो असा अर्थ संभवतो. आणि सकळ अग्नि, सकळ देव, सकळ मनुष्य यांचा उत्पत्तिकर्ता आणि रक्षिता वैश्वानर अग्नीच होय. असें सांगण्याचें तात्पर्य आहेसें दिसतें.

हा मंत्र उपजातीला खालीं दाखविल्याप्रमाणें मिळतो.

वया इदग्ने अग्नयस्ते अन्ये ।
तुए विश्वे अमृतो मादयन्ते ।
वैश्वानर नाभिरसि क्षितीनां ।
स्थूणेव जनाँ उपमिद्ययन्थ ।

---

२. 'अग्नि हा एवढा मोठा आणि इतका व्यापक आहे कीं, तो द्युलोकाचा माथा होय आणि पृथिवीचा मध्यभाग होय; म्हणजे द्युलोक आणि पृथिवी हीं त्याच्या जणूं अधिकाराखालीं आहेत. यामुळें तो या दोहोंचा पति होय. तर

**बृहती इव सूनवे रोदसी गिरो होता मनुष्यो न दक्षः ।**
**स्वर्वते सत्यशुष्माय पूर्वीर्वैश्वानराय नृतमाय यह्वीः ॥ ४ ॥**

बृहती इवेति बृहतीऽइव । सूनवे । रोदसी इति । गिरः । होता । मनुष्यः । न । दक्षः ।
स्वःऽवते । सत्यऽशुष्माय । पूर्वीः । वैश्वानराय । नृऽतमाय । यह्वीः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

४. रोदसी ( =द्यावापृथिव्यौ ) सूनवे ( =पुत्राय=पुत्रभूताय अग्नये ) बृहती इव ( =बृहत्याविव=प्रभूते इव ) [ जाते स्तः ] । [अयं] होता (=पुरोवर्ती देवानामाह्वाता) स्वर्वते ( =तेजोयुक्ताय ) सत्यशुष्माय ( =सत्यबलाय ) नृतमाय ( =अतिशयेन पराक्रमवते ) वैश्वानराय पूर्वीः ( =बहुविधा ) यह्वीः ( =बृहतीः ) गिरः ( =स्तुतीः ), दक्षो मनुष्यो न ( ="यथा मनुष्यो लौकिको बन्दी दातारं प्रभुं बहुविधया स्तुत्या स्तौति तद्वत् "), [प्रयुङ्क्ते ] ॥

---

असा जो वैश्वानर अग्निदेव, त्याला देवांनीं आर्यजनांस प्रकाश मिळावा म्हणून उत्पन्न केला आहे' असा या मंत्राचा भावार्थ आहे.

या मंत्रांत अग्नीला देवांनीं उत्पन्न केलें असें सांगितलें आहे. परंतु इतर ठिकाणीं अग्नि हा सर्व देवांत श्रेष्ठ आणि सर्व देवांपेक्षां पुरातन होय असें सांगितलें आहे.

'पृथिवीचा नाभि'='नाभिः पृथिव्याः' याचा अर्थ 'पृथिवीचा रक्षक' असा सायणाचार्य करितात.

उपजातिवृत्ताला आणि या त्रिष्टुप् ऋचेला किती थोडें अंतर आहे हें पहाः—

मूर्धा दिवो नाभिरग्निः पृथिव्याः ।
अथाभवदरती रोदसीओः ।
तं त्वा देवासोजनयन्त देवं ।
वैश्वानर ज्योतिरिदारिआय ।

३. या ऋचेंत वैश्वानर अग्नीचें वैभव सांगितलें आहेः— 'हे वैश्वानर अग्नी, पर्वतांत जीं खनिज द्रव्यें, सस्यादि धान्यें आहेत; वृक्षापासून फळपुष्पगंधादि जीं द्रव्यें प्राप्त होतात; जलापासून वनस्पत्यादिकांची उत्पत्ति, रसोत्पत्ति, नौकावहनापासून होणारे व्यापार उदीम, जलचर, मनुष्यमात्रांपासून आदरातिथ्य, दानमानादि होणारे लाभ, या सर्वांचा,

४. द्यावापृथिवी [आपल्या] पुत्राकरितांच जणुं काय विस्तीर्ण झाल्या आहेत. चतुर मनुष्यासारिखा [हा] होता तेजःपुंज, सत्यबल, [आणि] अतिपराक्रमी [अशा] वैश्वानराप्रीत्यर्थ नाना प्रकारचीं [आणि] मोठीं स्तोत्रें [अर्पण करीत आहे].

4. Earth and Heaven have as it were become vast for their son. [This] invoker like a civil man [is offering] varied [and] loud hymns to the effulgent, truly powerful [and] most valourous Vais'vânara.

तूं स्वामी असून हीं तुजजवळ क्षणिक राहणारीं नव्हेत, तर सूर्याचे किरण जसे त्याचे सहवासी आहेत, तशीं सहचर व शाश्वत आहेत.

४. 'अग्नि इतका मोठा आहे कीं, तो सगळी पृथ्वी आणि सगळा द्युलोक यांत मावत नाहीं, आणि तो त्यांत राहावा म्हणूनच जणूं पृथ्वी आणि स्वर्ग इतके विस्तीर्ण होऊन राहिले आहेत. तो तेजःपुंज, खरा बलवान् आणि अतिशयेंकरून शौर्ययुक्त असा होय. त्याला हा आमचा होता (म्हणजे यज्ञसंपादक) कुशळ स्तोत्याप्रमाणें, नानाविध स्तोत्रें रचून मोठ्यानें म्हणून अर्पित आहे' असा या मंत्राचा भावार्थ आहे. येथें अग्नीला द्यावापृथिवींचा मुलगा म्हटला आहे, तें लक्षांत ठेवावें. ऋ. ४. १५. ६ यांत अग्नीस 'दिवः शिशुः' म्हणजे द्युलोकाचा पुत्र असें म्हटलें आहे. त्याप्रमाणेंच अश्वी देव, आदित्यगण आणि सूर्य यांसहि द्युलोकाचे पुत्र असें वेदांत नांव दिलें आहे. उषा देवीस तर द्यूची म्हणजे द्युलोकाची कन्यका असें नांवें वेदांत प्रसिद्ध असल्याविषयीं पूर्वी पुष्कळ वेळ सांगितलेंच आहे. यावरून उघड दिसून येईल कीं, विस्तीर्ण पृथिवीवर महान् द्युलोक जो हा वर पसरला आहे त्या दोघांच्या मध्यें उषेची उत्पत्ति प्रतिदिनीं प्रभातकाळीं होत असते; आणि सूर्य, सविता, वरुण (म्हणजे रात्रीचा जो भयंकर अंधकार तद्रूप देव) आणि कोणीएक दोन तारे तद्रूप जे अश्वी देव त्यांची उत्पत्ति म्हणजे उगवणें अथवा आगमन होत असतें म्हणून त्या सर्वांस द्युलोकाचीं मुलें असें वेदांत वर्णिलें आहे. अग्नि हा सूर्यरूप तेजानें व विद्युद्रूप तेजानें पृथिवी आणि द्युलोक यांच्या पोटांत जन्मतो म्हणजे आविर्भूत होतो म्हणून त्याला द्यूचा पुत्र असें म्हटलें आहे.

'चतुर मनुष्याप्रमाणें, [हा] होता' 'होता मनुष्यो न दक्षः' सायणाचार्य

**दिवश्चित्ते बृहतो जातवेदो वैश्वानर प्र रिरिचे महित्वम् ।**
**राजा कृष्टीनामसि मानुषीणां युधा देवेभ्यो वरिवश्चकर्थ ॥ ५॥**

दिवः । चित् । ते । बृहतः । जातऽवेदः । वैश्वानर । प्र । रिरिचे । महिऽत्वम् ।
राजा । कृष्टीनाम् । असि । मानुषीणाम् । युधा । देवेभ्यः । वरिवः । चकर्थ ॥ ५ ॥

---

## भाषायाम्.

५. हे जातवेदः (=सर्वेषां जातानां वेदितर्) वैश्वानर, ते (=तव) महित्वं (=महत्त्वं=बृहत्त्वं) बृहतो (=विस्तीर्णस्य) दिवश्चिद् (=द्युलोकादपि) प्र रिरिचे (=प्रववृधे=महीयोस्ति) । [त्वं] मानुषीणां कृष्टीनां (=मनोर्जातानां प्रजानां=मनुष्यजातस्य) राजासि (=प्रभुरसि) । [त्वं] युधा (=युद्धेन) देवेभ्यः (=स्तोतृभ्यो) वरिवः (=धनं) चकर्थ (=अकार्षीः=प्रयच्छसि) ॥

त्वं स्तोतृणां हितार्थं युद्धा संग्रामे तेभ्यः शत्रुधनं जित्वा ददासीत्यर्थः ।

'वरिवः' शब्दः सायणमनुसृत्यैवास्माभिर्व्याख्यातः । यत्तु विदुष्टरो मास्मान् अन्ये च केचित् मुक्तातासुखादिशब्दैर्व्याख्यानं कुर्वन्ति तच्चिन्त्यम् । युधा इन्द्रो महा वरिवश्चकारेति वाक्यं प्रभृतेषु मन्त्रेषु सायणेन धनशब्देनैव व्याख्याततत्वात् । यस्माच्चैवं सर्वत्र धनशब्देनैव व्याख्यानं कृतमस्ति तस्मात्सोर्थो पुरातनव्याख्यानपरंपरामनुसृत्यैव सायणेन कृतोस्तीति मन्तव्यम् । स चार्थः सर्वेष्वपि मन्त्रेषु योग्यो भाति । एवं सति ननु केवलं धात्वर्थपरं सायणस्य व्याख्यानं न तु पुरातनव्याख्यानपरंपरागतमिति कृत्वा भूयोभूयस्तद्दूषयन्तो व्याख्यातारः स्वयमेव पुरातनव्याख्यानपरंपरागतमर्थं त्यक्त्वा केवलधात्वर्थाधिगतमर्थान्तरं कुर्वन्तीत्यवधेयम् ॥

---

म्हणतातः— "कोणीतरी साधारण मनुष्य "दात्याची अनेक स्तुति करितो तसा." 'हा होता' म्हणजे मंत्रवक्ता असेल एक किंवा मंत्रकर्त्याच्या बरोबर देवयजन करण्यांत गुंतला आहे तो असेल. कितीएक विद्वान् 'होता मनुष्यो न दक्षः' हे शब्द अग्नीकडे लावून तितक्यांचेंच एक वाक्य करून 'अग्नि हा मनुष्याप्रमाणें कुशळ होता होय' असा अर्थ करितात, आणि 'अर्पण करा' याचा अध्याहार करितात.

'[अर्पण करीत आहे.]' याबद्दल मुळांत क्रियापद नाहीं. त्यामुळें हा मंत्र बराच कठिण म्हटला पाहिजे.

५. हे सर्वज्ञा वैश्वानरा, तुझें मोठेपण मोठ्या द्युलोकापेक्षांसुद्धा मोठें आहे. [तूं] मनुष्यलोकांचा राजा होस. [तूं] युद्धाच्या योगानें स्तोत्यांकरितां द्रव्य संपादन करितोस.

5. O all-knowing Vais'vânara, thy vastness exceeds even the vast heaven. [Thou] art the king of the human races. [Thou] dost secure wealth for [thy] praisers through battle.

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें उपजातिवृत्ताला बसतोः—

बृहती इव सूनवे रोदसी ।
गिरो होता मनुषिभ्यो न दक्षः ।
सुअर्वते सत्यशुष्माय पूर्वीः ।
वैश्वानराय नृतमाय यह्वीः ।

५. अग्नि मोठा आहे असें वर सांगितलेंच आहे. त्याच विचारसरणीला अनुसरून ऋषि म्हणतो कीं, ‘ अग्नि इतका मोठा आहे कीं, तो द्युलोकापेक्षांहि मोठा होय. आणि तो केवळ मोठा आहे इतकेंच नव्हे, पण या पृथ्वीवरील सकळ मनुष्यांचा तो राजा होय आणि त्यांतून जे मनुष्य त्याची स्तुति करितात त्यांचा पक्ष धरून तो युद्धांत लढतो आणि त्यांस यश आणि शत्रूचें द्रव्य मिळवून देतो. ’

‘मोठ्या द्युलोकापेक्षांहि मोठा ’=‘दिवश्चित् प्र रिरिचे.’ द्युलोक म्हणजे पृथ्वीवर जो अतिविस्तीर्ण आकाशप्रदेश आहे, आणि ज्यांत सूर्यचंद्रादिक तारे, ग्रह आणि असंख्य नक्षत्रें आहेत आणि ज्याचा पार नाहीं तो. त्याहून अग्नि मोठा आहे असें म्हणणें म्हणजे मोठेपणाची सीमाच झाली. येथें अग्नि म्हणजे केवळ आग नव्हे, तर पृथ्वीवर जो आपण अग्नि पाहतों तो, आकाशांत जे सूर्यकिरण आहेत तद्रूप, विजा चमकतात तद्रूप, आणि नक्षत्रादिक तेजें,जिकडे तिकडे प्रकाशतात तद्रूप जे महातेज तें होय. आणि त्या अग्नीचें येथें केलेलें वर्णन विशेष अतिशयोक्तियुक्त आहे असें नाहीं.

‘युद्धाच्या योगानें द्रव्य संपादन करितोस.’ असेंच इंद्रास कितीएक मंत्रांत म्हटलें आहे. ऋ. ३. ३४. ७; ७. ९८. ३; १. ६३. ७ हे मंत्र पहा. इतरहि पुष्कळ असेच मंत्र आहेत.

हा मंत्र उपजातीप्रमाणें थोडक्याच अडचणीनें म्हणतां येतोः—

दिवश्चिचे बृहतो जातवेदो ।
वैश्वानर प्र रिरिचे महित्वम् ।
राजा कृष्टीनामसि मानुषाणां ।
युधा देवेभ्यो वरिवश्चकर्थ ॥

**प्र नू मंहित्वं वृषभस्य वोचं यं पूरवो वृत्रहणं सचन्ते ।**
**वैश्वानरो दस्युमग्निर्जघन्वाँ अधूनोत्काष्ठा अव शाम्बरं भेत् ॥६॥**

प्र । नु । महिऽत्वम् । वृषभस्य । वोचम् । यम् । पूरवः । वृत्रऽहनम् । सचन्ते ।
वैश्वानरः । दस्युम् । अग्निः । जघन्वान् । अधूनोत् । काष्ठाः । अव । शम्बरम् । भेत् ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

६. वृषभस्य (=वर्षितुं रेतः सेक्तुं समर्थस्य=वीरस्य) [वैश्वानरस्याग्नेः] महित्वं नु (=क्षिप्रं) प्रवोचं (=प्रब्रवीमि,), यं वृत्रहणं (=वृत्रस्य हन्तारं) [वैश्वानरं] पूरवः (=मनुष्याः) सचन्ते (=सेवन्ते)। वैश्वानरोऽग्निः दस्युं (=रसानामुपक्षपयितारं शम्बरं) जघन्वान् (=हतवान्) [सन्] काष्ठाः (=अपः=मेघोदकानि) अधूनोत् (=अधोमुखा न्यपातयत्) शम्बरं [च] अव भेत् (=भित्त्वा, अवक्षिप्तवान्)॥

अत्र काष्ठशब्दः सायणमनुसृत्यैवास्माभिर्व्याख्यातः। यत्तु शार्मण्यपण्डितैरन्यथा व्याख्यानं कृतं तदाधाराकाङ्क्षयैव। 'उदु त्ये सूनवो गिरः काष्ठा अज्मेष्वत्नत (ऋ. १. ३७. १०) इत्यत्र, तथा 'अतिष्ठन्तीनामनिवेशनानां काष्ठानां मध्ये निहितं शरीरम् (ऋ. १. ३२. १०) इत्यत्र च काष्ठशब्दस्य उदकशब्देनैव व्याख्यानं कर्तुं योग्यत्वात् सायणकृत एवार्थः साधुरिति मन्तव्यम् ॥

६. त्या महाशूराचें महाभाग्य मला त्वरित गाऊं दे [कीं] ज्या वृत्रहंत्या [शूरा]ला मनुष्यें सेवितात. वैश्वानर अग्नि दस्यूला मारून उदकें वर्षविता झाला, [तो] शंबराला छेदून खालीं टाकिता झाला.

6. Let me quickly sing the greatness of [that] hero, the killer of Vritra, whom men adore: Agni Vais'vânara having killed the Dasyu, shook the waters; he struck down S'ambara.

---

६. 'ज्या वृत्रघातक वैश्वानराची उपासना मनुष्यें करितात त्या शूर वैश्वानराचें महाभाग्य मी आतां वर्णितों. त्याचें मुख्य महाभाग्य हें होय कीं, त्याणें वृत्र आणि शंबर हे मेघोदकें चोरणारे असुर मारून उदकें मुक्त केलीं आणि खालीं सोडून दिलीं.'

'त्या महाशूराचें'='वृषभस्य.' अक्षरशः अर्थ 'वर्षण करणाराचें.' वर्षण करणारा म्हणजे जो नपुंसक नव्हे तो, जो शूर असा वीर होय तो. सायणाचार्य पाण्याचा वर्षाव करणारा म्हणून वृषभ असें म्हणतात. यास्कहि तसेंच म्हणतात.

या मंत्रांत वैश्वानर अग्नीनें वृत्र मारून उदकवृष्टि केली असें सांगितलें आहे. हें काम इंद्र करीत असतो असें वेदांत आढळतें. या ठिकाणीं वैश्वानर करितो म्हणून सांगण्याचें कारण काय असा प्रश्न निघाल्यामुळें वैश्वानर हा कोण याचा विचार यास्कांनीं निरुक्तांत केला आहे, व सायणांनींहि केला आहे. ते म्हणतात कीं, "कितीएकांचें मत वैश्वा-"नर म्हणजे अंतरिक्षांत वास करणारा "असा जो वायु अथवा इंद्र; आणि "वायु किंवा इंद्र यांजकडून वर्षण होत "असतें यास्तव ही स्तुति योग्य होय. "दुसरे कितीएक म्हणतात कीं, द्युलो-"कांत राहणारा जो सूर्य तोच वैश्वानर "अग्नि होय, व याविषयीं त्यांणीं कांहीं "युक्तिहि सांगितली आहे. परंतु हीं "दोनींहि मतें योग्य नाहींत. वस्तुतः "असें आहे कीं, वैश्वानर हें अग्नीचें "नांव असून वैश्वानर आणि अग्नि ए-"कच होत. वैश्वानर याची शब्दव्यु-"त्पत्ति सर्व नरांस लोकान्तरास नेणारा "म्हणून वैश्वानर अशी आहे; अथवा "सर्व प्राणी अग्नीला यज्ञादिकांनीं भ-"जतात म्हणून अग्नि हा वैश्वानर होय; "अथवा अंतरिक्ष आणि द्युलोक हे "सर्व प्राण्यांस व्यापून राहतात म्हणून "ते विश्वानर आणि त्यांपासून विद्युद्रू-"पाचें अग्नीची उत्पत्ति होते म्हणून त्या-"चें नांव वैश्वानर होय. यास्तव वै-"श्वानर या नांवाच्या व्युत्पत्तीवरून "पाहिलें असतां वैश्वानर म्हणजे अग्नि

**वैश्वानरो महिम्ना विश्वकृष्टिर्भरद्वाजेषु यजतो विभावा ।**
**शातवनेये शतिनीभिरग्निः पुरुणीथे जरते सूनृतावान् ॥७॥२९॥**

वैश्वानरः । महिम्ना । विश्वऽकृष्टिः । भरत्ऽवाजेषु । यजतः । विभाऽवा । शातऽवनेये । शतिनीभिः । अग्निः । पुरुऽनीथे । जरते । सूनृताऽवान् ॥ ७ ॥ २९ ॥

## भाषायाम्.

७. विश्वकृष्टिः (=विश्वाः कृष्टयः सर्वेपि मनुष्याः स्वभूता यस्य सः=विश्वासां प्रजानां स्वामी ) विभावा (=विशेषेण प्रकाशयिता ) [ एतादृशो ] वैश्वानरो महिम्ना (=स्वमहत्त्वेन ) भरद्वाजेषु (=एतत्संज्ञकेषु ऋषिषु=तेषां गृहेषु ) यजतो (=यष्टव्यो ) [ भवति ] । सूनृतावान् (=प्रियसत्यवाग् ) अग्निः शातवनेये (=शतवनेः पुत्रे=तस्य गृहे ) [ तथा ] पुरुणीथे (=एतत्संज्ञके=पुरुणीथस्य गृहे ) शतिनीभिः (=शतसंख्याकाभिः ) [ स्तुतिभिः ] जरते (=स्तूयते ) ॥

भरद्वाजाः शातवनेयाः पुरुणीथाश्च वैश्वानरमग्निं नित्यं यजन्त इति भावः ॥

"असें म्हणणें योग्य होय. आतां अ-
"ग्नीच्या कृतीवरूनहि त्याला ही स्तुति
"शोभते. कारण कीं 'अग्नींत टाकिलेली
"आहुति आदित्याप्रत पोंहचते; आ-
"दित्यापासून वृष्टि होते; वृष्टीपासून अ-
"न्न, आणि अन्नापासून प्रजा होते'
"असें स्मृतींत सांगितलें आहे आणि
"हा सर्व विस्तर निरुक्तांत सांगितला
आहे."

यावरून वैश्वानर म्हणजे इंद्र अथवा वायु नव्हे, तर अग्नीच होय असें यास्क आणि सायण यांचें मत आहे. आणि आम्हांसहि तसेंच वाटतें. परंतु त्या मताविषयीं जी त्यांणीं युक्ति सांगितली ती एकदम ग्रहण करवत नाहीं. आतां अग्नीला वृत्रहंता कां म्हटला यांत विशेष अडचण नाहीं. वृत्रहंता हें जरी इंद्राचें नांव आणि वृत्राला मारणें जरी इंद्राचें काम होय, तरीहि ऋग्वेदांत इतर देवांलाहि 'वृत्रहंता' असें म्हटलें आहे. अग्नीलाच ऋ. १. ७४. ३; ३. २०. ४; ६. १६. १९ इत्यादि अनेक मंत्रांत म्हटलें आहे. सोमाला ऋ. ८. ८९. ७; १. ९१. ५ यांत म्हटलें आहे. ऋ. १. १०८. ३; ७. ९३. १ इत्यादिकांत इंद्राग्नीस म्हटलें आहे. आणि वृत्राला मारून उदकवृष्टि करणें हा इंद्राचा पराक्रम अग्नीनें केला असें कोठें कोठें सांगितलेलें आढळतें. उदाहरणार्थः— ऋ. ६. ५९. ३ यांत इंद्र आणि अग्नीस वज्रधारी म्हटलें आहे. शिवाय ऋ. १. ७८. ४ पहा. ऋ. ६. १६. १४, ४८ हाहि मंत्र पहा. ऋ. ७. ५. ३ यांत वैश्वानरानें नगरें म्हणजे मेघ फोडिले असें

७. सकळ मनुष्यांचा प्रभु [आणि] विशेष तेजस्वी वैश्वानर [आपल्या] मोठेपणामुळें भरद्वाजांच्या येथें यज्ञास पात्र [झाला आहे]. प्रियसत्यवाक् अग्नि शातवनेयाच्या येथें [आणि] पुरुणीथाच्या येथें शेकडो [स्तुतीं]नीं स्तविला जातो.

7. Vais'vânara, the lord of all men, [and] possessed of great brightness receives worship by his greatness among the Bharadvâjas. In the house of S'âtavaneya [and] Purunîtha sweet-singing Agni is praised with hundreds of hymns.

---

म्हटलें आहे. ऋ. ७. ६. २ हाहि मंत्र पहा.

यावरून असें समजावयाचें कीं जशी व्यासाची महाभारत आणि पुराणादिक यांच्या कर्तृत्वाविषयीं अथवा कालिदासाची काव्यसौंदर्याविषयीं प्रख्याति झाली असल्यामुळें यःकश्चित् ग्राम्य कवीनें केलेलें एकादें 'सूर्पालीमाहात्म्य' अथवा 'महाबलेश्वरमाहात्म्य' व्यासानें केलें, किंवा 'ज्योतिर्विदाभरणादिक' जैनबनावट ग्रंथ कालिदासानें केले अशी प्रख्याति त्या त्या ग्रंथांचे कर्ते करूं पाहतात; तसाच वृत्रहनन करून उदकवृष्टि करणें हा मोठा पराक्रम प्रसिद्धीस आल्यावर इंद्राव्यतिरिक्त जे दुसरे देव त्यांचे भक्त त्यांची स्तोत्रें करूं लागले म्हणजे ते ते इंद्रानें पराक्रम त्यांणीं केले असें वर्णन करूं लागतात.

'शंबर' हा कोण आहे याविषयीं सू. ५१. मं. ६ याजवरील टीप पहा. येथें शंबर म्हणजे वृत्रच समजावयाचा आहे.

या मंत्राचा प्रथमार्ध तर अगदी उपजातीप्रमाणें वाचतां येतो, उत्तरार्धांत विशेष फेरफार करावयाला नको:—

प्र नू महित्वं वृषभस्य वोचं
यं पूरवो वृत्रहणं सचन्ते ।
वैश्वानरो दस्युमग्निर्जघन्वान्
अधूनोत्काष्ठा अव शम्बरं भेत् ॥

---

७. या मंत्रांत वैश्वानर अग्नीची उपासना कोणकोणत्या प्रसिद्ध उपासकांच्या घरीं होत असते तें सांगितलें आहे. 'भरद्वाजकुळांत, शातवनेयाचे घरीं आणि पुरुणीथ राजाचे घरीं वैश्वानर अग्नीची उपासना होत असते.' अग्नीची प्रख्याति आणि योग्यता कशी आहे त्याजविषयीं हा मंत्र आहे.

भरद्वाजांच्या येथें '=' भरद्वाजेषु.' अक्षरशः अर्थ, 'भरद्वाजांचे ठायीं.' या सप्तम्यर्थाविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे. 'भरद्वाज' हें जें ऋषिकुळ तें वे-

दांत प्रसिद्ध आहे. आणि ऋग्वेदाचें साहावें मंडळ भरद्वाजकृत आहे. शिवाय पुराणादिक ग्रंथांत तर भरद्वाज ऋषि प्रसिद्धच आहे. आणि तूर्त जे ब्राह्मण भरद्वाजगोत्राचे आहेत ते भरद्वाजकुळांतील, म्हणजे, भरद्वाजापासून परंपरेनें जन्मलेले होत असा अर्थ आहे त्यापेक्षां भरद्वाजाची प्रसिद्धि अजूनहि कमी झाली आहे असें नाहीं.

'प्रियसत्यवाक्'=' सूनृतावान्.' म्हणजे 'प्रिय अथवा रमणीय आणि खरें वर्णन करणारा.' अग्नि हा होता होय आणि होत्याचें काम म्हटलें म्हणजे मनोरमणीय स्तोत्रें गाऊन देवांस यज्ञांप्रत बोलाविणें हें आहे, म्हणून हें विशेषण अग्नीला लाविलें आहे.

'शातवनेयाच्या येथें'=शातवनेये.' 'शातवनेय' हा शतवनीचा मुलगा होय. पण शतवनि हा कोण होता हें ठाऊक नाहीं. आणि 'शातवनेय.' याजविषयीं झालें तरी ऋग्वेदांत दुसऱ्या ठिकाणीं नांव सुद्धा आलेलें नाहीं.

'पुरुणीथाच्या येथें.' पुरुणीथ हा तरी कोण होता याजविषयों कांहीं ठाऊक नाहीं. मात्र सायणाचार्य पुरुणीथ हा राजा होता इतकेंच म्हणतात. हें विशेषनाम दुसऱ्या मंत्रांतहि कोठें आलेलें आढळत नाहीं.

हें वैश्वानर अग्नीविषयींचें सूक्त येथें संपलें. पुनः पुनः या सूक्ताचा विचार करून पाहतां वैश्वानर अग्नि हा कोण, याविषयीं असें वाटतें कीं, साधारण जो भूमीवर अग्नि आपण पाहतों तो घ्यावयाचा नाहीं; तर सर्व आकाश, पृथिवी, द्युलोक इत्यादिकांनीं भरलेला जो प्रचंड अवकाश म्हणजे पोकळ प्रदेश, त्यांत साधारण अग्नीच्या रूपानें म्हणा, अथवा अपार प्रकाश देणारा जो सूर्य त्या रूपानें म्हणा, अथवा मेघवृष्टीच्या प्रसंगीं भयंकर वीज पडते त्या रूपानें म्हणा, जें जें म्हणून तेज सर्वत्र पसरलें आहे तो अग्नि समजावयाचा आहे. त्याला वैश्वानर हें नांव पडण्याचें कारण आम्हांस वाटतें तें असें:– 'विश्वानर' याचा अर्थ सकळ मनुष्यांवर ज्याचा अधिकार चालतो तो. हें नांव वेदांत इंद्रास एकदोन ठिकाणीं लाविलें आहे (ऋ. १०. ५०. १ पहा); 'विश्वकृष्टि' या शब्दाचा अर्थ ('विश्व' म्हणजे सगळे आणि 'कृष्टि' म्हणजे मनुष्यें यांपासून) जसा 'सर्व मनुष्यांवर ज्याचा अधिकार चालतो तो' असा होतो (ऋ. ४. ३८. २; १०. ९२. ६; १. १६९. २ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा); आणि 'विश्वदेवः' शब्दाचा अर्थ जसा सकळ देवांवरचा स्वामी असा होतो (ऋ. ५. ८२. ७ हा मंत्र आणि त्याजवरील सायणभाष्य पहा); आणि 'विश्वायु' याचा ('विश्व' म्हणजे सगळे आणि 'आयु' म्हणजे मनुष्य यांपासून) जसा सकळ मनुष्यांचा प्रभु असा अर्थ होतो (ऋ. ४. ४२. १ हा मंत्र आणि त्याज-

वरील सायणभाष्य पहा ); तसा 'वि- श्वानर' याचा अर्थ 'सकळ मनुष्यांचा प्रभु,' 'सार्वभौम पदवी भोगणारा' असा होतो. हें विशेषण ऋग्वेदांत इंद्रास लाविलेलें आढळतें आणि त्याचा अर्थ सायणाचार्य सुद्धा असाच करितात. त्यावरून विश्वानराचा म्हणजे इंद्राचा पुत्र म्हणून 'वैश्वानर.' इंद्रानें अग्नीस जन्म दिलें असें ऋग्वेदांत एका प्रसिद्ध सूक्तांत सांगितलें आहे ( ऋ. २. १२. ३ यो अश्मनोरन्तरग्निं जजान संवृक्समत्सु स जनास इन्द्रः= हे जनहो, जो दोन दगडांच्या मध्यें म्हणजे मेघांच्या मध्यें अग्नीला जन्म देता झाला आणि जो युद्धांत नाश करणारा होय तो इंद्र आहे असें समजा ). आतां विश्वानर हें इंद्राचें नांवच जर असतें तर ही आम्हीं सांगितलेली युक्ति निर्विवाद घेण्यासारिखी झाली असती असें कोणी म्हणेल, तर तितकें आम्ही मान्य करितों. पण दुसरी कोणतीहि युक्ति सांगून वैश्वानर हें नांव कां पडलें तें सांगू लागलों तर त्यापेक्षां ही युक्ति बरी दिसते.



## सूक्तम् ६०.

गौतमो नोधा ऋषिः । अग्निर्देवता । त्रिष्टुप् छन्दः ।

**वह्निं यशसं विदथस्य केतुं सुप्राव्यं दूतं सद्योअर्थम् ।**
**द्विजन्मानं रयिमिव प्रशस्तं रातिं भरद्भृगवे मातरिश्वा ॥ १ ॥**

वह्निम् । यशसम् । विदथस्य । केतुम् । सुप्रऽअव्यम् । दूतम् । सद्यःऽअर्थम् । द्विऽजन्मानम् । रयिम्ऽइव । प्रऽशस्तम् । रातिम् । भरत् । भृगवे । मातरिश्वा ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. वह्निं (=हविषो वोढारं) यशसं (=यशस्विनं) विदथस्य केतुं (=यज्ञस्य प्रकाशयितारं प्रज्ञापकं) सुप्राव्यं (=सुष्ठु प्रगच्छन्तं) सद्योअर्थं (="यदा हवींषि जुह्वति तदानीमेव हविर्भिः सह देवान्प्रति गन्तारं") दूतं (=देवानां दूतं) द्विजन्मानं (=द्यावापृथिव्योर्जातम्) [एतादृशम् अग्निं] मातरिश्वा भृगवे (=एतत्संज्ञकाय महर्षये=भृगुकुलोत्पन्नेभ्यो यजमानेभ्यः) प्रशस्तं (=प्रख्यातम्=उत्तमं) रयिमिव (=धनमिव) रातिम् [इव च] (=मित्रमिव च) भरत् (=अभरत्=आहरत्=आनिनाय) ॥

को नाम मातरिश्वेति सांप्रतं सनिश्चयं न निर्णेतुं शक्यते । योऽग्निः स एव मातरिश्वेत्येकोऽर्थस्तु तं शुभ्रमग्निमवसे हवामहे वैश्वानरं मातरिश्वानमुक्थ्यम् (ऋ. ३. २६. २) इत्यादौ निर्विवाद एव । यत्तु मातरिश्वा किल भृगुभ्यः (ऋ. ३. ५. ४) दूरदेशादग्निमाजहार, तथा च विवस्वदर्थे मातरिश्वने प्रथम आविरभूदग्निरिति (ऋ. १. ३१. ३; १. १४३. २) तथैव मनुष्याणामर्थे मातरिश्वा किल प्रथमोऽग्निं निरमथ्नादिति (ऋ. १. ७१. ४; १. १४१. ३; १. १४८. १) दृश्यते तत्र मातरिश्वशब्देन कस्य निर्देश इति जिज्ञासा । सायणाचार्यास्तु तादृशेषु सर्वेष्वपि मन्त्रेषु मातरिश्वा नाम वायुरिति विवृण्वन्ति । युक्तिं च मातर्यन्तरिक्षे श्वसिति प्राणिति (वर्तत इति यास्कः) इति मातरिश्वेति कथयन्ति । विदुष्वरः शार्मण्यभट्टाचार्यो रोधस्तु तन्नेति । मातरिश्वशब्दस्य वेदे क्वापि वायुरित्यर्थो नैव भवतीति च प्रवदति । सूचयति च मातरिश्वेति कश्चिन्मनुष्यभावभाग्देवदूतो विवस्वांश्च तादृश एव कश्चिद्भवितुमर्हति यस्मै सोऽग्निं दूरदेशादाजहारेति । अस्माकं मते तु मातरिश्वा वैद्युतोऽग्निः । द्युलोकाद्भूमौ पतन्वैद्युतोऽग्निर्हि भौममग्निमुत्पादयति स्वर्गाद् यद्वा दूरदेशाद् विवस्वतो (=यजमानस्य) अर्थेऽत्र लोक आनयतीति युज्यत एव । मातरिश्वा यदमिमीत मातरीति (३. २९. ११) मन्त्रस्य व्याख्याने सायणेन **यदान्तरिक्षे विद्योतते तदा मातरिश्वनामको भवती**ति स्थान उक्तत्वात् ॥

## सूक्त ६०.

ऋषि–नोधा ( पूर्वसूक्ताचा जो तोच ). देवता–अग्नि. वृत्त–त्रिष्टुभ्.

१. [हवि] वाहून नेणारा, यशस्वी, यज्ञाचा ध्वज, चांगल्या रीतीनें जाणारा [आणि] लवकर जाणारा दूत [असा जो] दोघांपासून जन्मलेला [अग्नि], त्याला मातरिश्व्यानें उत्तम निधि [आणि] मित्रच जणुं [करून] भृगूकरितां आणिला.

## HYMN 60.

To *Agni*. By *Nodhas* (author of the previous hymn). Metre—*Trishṭubh*.

1. Mâtaris'vâ brought [Agni] to Bhrigu [as] an excellent treasure [and] friend, [Agni] the carrier [of the oblation], the glorious, the banner of the sacrifice, the successful [and] quick messenger, [Agni] born of the two.

१ भावार्थः– ‘ मनुष्यांनीं अर्पण केलेलें हवि देवांकडे घेऊन जाणारा, महायशस्वी, यज्ञाचा तर केवळ ध्वजच, लवकर चालणारा आणि उत्तम कार्यसिद्धि करणारा, आकाश आणि पृथिवी या दोन भाईपासून जन्मलेला असा जो अग्नि, त्याला मातरिश्व्यानें उत्तम द्रव्याचा निधेच जणूं समजून आणि मित्र समजून भृगूकडेस आणिलें.’

यांत तात्पर्य असें आहे कीं अग्नीला मातरिश्व्यानें भृगूप्रत आणिलें. मातरिश्वा कोण, आणि त्याणें अग्नीला आणिलें कसें, आणि भृगु कोण, याविषयीं पूर्वी ( सूक्त ३१ मंत्र ३ आणि सूक्त ५८ मंत्र ६ यांजवरील टीपेंत ) सांगितलें आहे. तरी पुनः सांगणें अवश्य दिसतें. मातरिश्व्यानें दुरून म्हणजे. स्वर्गाहून अग्नीला आणिला आणि तो विवस्वताकरितां. भृगूकरितां अथवा मनुष्यांकरितां आणिला असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे (ऋ. १. ९६. ४; ३. २. १३; ३. ५. १०; ६. ८. ४); दुसऱ्या कितीएक मंत्रांत अग्नि हा मनुष्यजातीकरितां प्रथम मातरिश्व्याच्या दृष्टीस पडला ( ऋ. १. १४३. २; १. १२८. २; १. ३१. ३ ); दुसऱ्या कितीएक ऋचांत असें सांगितलें आहे कीं मनुष्याकरितां मातरिश्व्यानें प्रथम अग्नि मथून काढिला, म्हणजे घर्षण करून सिद्ध केला ( ऋ. १. ७१. ४; १. १४१. ३; १. १४८. १; ३. ९. ५ ); आणि ऋ. १०. ४६. ९ यांत अग्नीला प्रथम मातरिश्व्यानें उत्पन्न केला, आणि तो मनुष्याकरितां केला असें सांगितलें आहे. तर

मनुष्यांवर एवढा मोठा उपकार करून अग्नीला स्वर्गाहून आणून देणारा अथवा प्रथम ज्याणें या भूलोकावर अग्नि सिद्ध केला असा जो मातरिश्वा हा कोण?

सायणाचार्य वायु असें म्हणतात, आणि 'मातरि' म्हणजे अंतरिक्षरूप अथवा द्युलोकरूप आईच्या ठायीं श्वास टाकितो म्हणजे जगतो अथवा राहतो म्हणून 'मातरिश्वा' अशी व्युत्पत्ति सांगतात. ही व्युत्पत्ति आम्हांस खरी दिसते; आणि अंतरिक्षाला अथवा द्युलोकाला वायूची आई असें जरी वेदांत म्हटलेलें नाहीं, तथापि ऋ. ७. ९०. ३. (राये नु यं जज्ञतू रोदसीमे राये देवी धिषणा धाति देवम्। अध वायुं नियुतः सश्चत स्वा उत श्वेतं वसुधितिं निरेके= ज्या वायूला या द्यावापृथिवी म्हणजे द्युलोक आणि पृथिवी धनाकरितां निर्माण करिती झालीं इ० ) या मंत्रांत द्युलोक आणि पृथिवी यांणीं त्याला जन्म दिलें असें सांगितलें आहे. तेव्हां कदाचित् वायु असा अर्थ होऊं शकेल. परंतु वायूनें अग्नि द्युलोकाहून मनुष्याकरितां भूमीवर आणिला या समजुतीचें बीज वास्तविक काय आहे तें समजत नाहीं, व त्याणें अग्नीला मंथन करून मनुष्याकरितां पृथिवीवर आणिलें याचें बीज उघड नाहीं. आतां इतकें खरें आहे कीं जेथें जेथें मातरिश्व्यानें अग्नीला प्रथम आणिलें अथवा मंथिलें अथवा उत्पन्न केलें असें सांगितलें आहे त्या सर्व स्थळीं मातरिश्वा म्हणजे वायु होय असें सायणाचार्य म्हणतात. यावरून सायणाचार्यांचा अर्थ व्याख्यानपरंपरेनें आलेला प्राचीन आहे असें समजतां येईल, आणि यास्कानेंहि तोच सांगितला आहे. तथापि वायु ही देवता वेदांत क्षुद्र आहे; आणि तिणें अग्नीला प्रथम मनुष्यहितासाठीं भूमीवर आणिलें हें नीट जुळत नाहीं. यास्तव कितीएक विद्वान् मातरिश्वा म्हणजे कोणीएक देव आहे, पण तो वायुमात्र नव्हे, असें म्हणतात. पण तो कोण देव आणि त्याला मातरिश्वा कां म्हणतात, याचा निर्णय ते करीत नाहींत. तर मातरिश्वा म्हणजे खरोखर कोण आणि त्याला तें नांव कां पडलें?

या गोष्टीचा निर्णय करण्यापूर्वी वेदांत जेथें जेथें मातरिश्वा हें नांव आलें असेल असे सर्व मंत्र पाहिले पाहिजेत. वर जे मंत्र सांगितले त्यांशिवाय दुसऱ्या बऱ्याच मंत्रांत मातरिश्वा हें नांव आलेलें आहे. ऋ. १. ९६. ४ यांत अग्नीलाच मातरिश्वा असें म्हटलें आहे. ऋ. १०. ८८. १९ यांत 'हे मातरिश्वः'= 'हे मातरिश्व्या' असें संबोधन अग्नीलाच केलें आहे. ऋ. ३. ५. ९ यांत अग्नीला मातरिश्वा हें नांव दिलें आहे. ऋ. १०. ८५. ४७ यांत मातरिश्वा आमचीं मनें ज्ञानयुक्त करो अशी प्रार्थना आहे, तेथें अग्नि हा अर्थ करणें उचित दिसतें. (याच संबंधानें ऋ. १०. १०९. १पहा). ऋ. ३.२६.२ "तं शुभ्रम् अग्निम् अवसे हवामहे वैश्वानरं मातरिश्वानम् उक्थ्य-

म्''='तो तेजःपुंज आणि वैश्वानररूप आणि मातरिश्वरूप जो स्तुत्य अग्नि त्याला आम्हीं संरक्षणार्थ बोलावितों.' यांत अग्नीला जसें वैश्वानर असें म्हटलें आहे तसेंच मातरिश्वा म्हटलें आहे. "एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति अग्निं यमं मातरिश्वानमाहुः"= 'एकच अविनाशी जी वस्तु तिला विद्वान् अग्नि, यम, मातरिश्वा अशीं भिन्न भिन्न नांवें देतात.' ऋ. १. १६४. ४६ यांतहि मातरिश्वा ही अग्नीचीच विभूति आहे असें सांगितलें आहे. याशिवायहि दुसरे दोन तीन मंत्र (१०. १४४. १; ९. ६७. ३१) आहेत त्यांत झाला तरी मातरिश्वा या शब्दाचा अर्थ अग्नि असा जुळतो.

आतां अग्नीला मातरिश्वा कां आणि केव्हां म्हणतात यांविषयीं ऋग्वेदांतच एका मंत्रांत सांगितलें आहे. तो मंत्र, ३. २९. ११ हा होय. त्यांत अग्नीला 'तनूनपात्' कां म्हणतात, 'नराशंस' कां म्हणतात, आणि 'मातरिश्वा' कां म्हणतात तें सांगितलें आहे. त्याच्या संबंधानें सायणाचार्य म्हणतात कीं, अंतरिक्षांत जेव्हां प्रकाशतो तेव्हां त्याला 'मातरिश्वा' म्हणावें (" यदान्तरिक्षे विद्योतते तदा मातरिश्वनामको भवति.") यावरून स्पष्ट होतें कीं मातरिश्वा म्हणजे अंतरिक्षांत प्रकाशणारा म्हणजे विद्युद्रूप जो अग्नि तो, म्हणजे वीजच. यावरून सर्व गोष्टींचें निराकरण होतें असें आम्हांस वाटतें. कारण पृथ्वीवर जो अग्नि आहे तो आकाशांतून पडणाऱ्या वीजेपासून उत्पन्न झालेला आहे अशी कल्पना करणें हें अगदी साहजिक आहे. आणि या वैद्युत मातरिश्व्यानें अग्नीला घर्षण करून प्रथम मानवांसाठीं उत्पन्न केलें म्हणणें हेंहि बसतें, कारण कीं वीज पडते तेव्हां दोन मोठे दगड घेऊन घर्षणाकरितां एकमेकावर आदळून आग पाडल्यासारिखें दिसतें. तसेंच मातरिश्व्यानें दूर प्रदेशाहून अथवा द्युलोकाहून अग्नीला पृथ्वीवर आणिलें हेंहि जुळतें; कारण वीज जमिनीवर पडते ती दूरप्रदेशाहून अथवा द्युलोकाहूनच पडते. आणि मातरिश्वा हेंहि नांव त्याला शोभतें, कारण कीं द्युलोकरूप अथवा अंतरिक्षरूप मातेच्या उदरांतच हा वैद्युत अग्नि राहत असतो. अग्नि द्युलोकापासून अथवा अंतरिक्षापासून उत्पन्न झाल्याविषयीं तर वेदांत प्रसिद्धच आहे. (ऋ. १०. ४. ७; १०. ४५. ८; ३. २. २; ३. २५. १ इत्यादि).

आणि याचं संबंधानें 'विवस्वान्,' 'भृगु' आणि 'मनु' म्हणजे कोण यांचाहि विचार करणें अवश्य दिसतें. कारण कीं, मातरिश्व्यानें यांजकरितां प्रथम अग्नीस दूर देशाहून आणिलें असें सांगितलें आहे. विवस्वान् म्हणजे 'उपासक,' 'यजमान' किंवा देवभक्त असा अर्थ वेदांत होतोच. तोच येथें घ्यावा. आणि भृगु म्हणजे अतिपुरातन देवभक्तांचें एक कुळ. आणि 'मनु' म्हणजे

**अस्य शासुरुभयासः सचन्ते हविष्मन्त उशिजो येच मर्ताः ।**
**दिवश्चित्पूर्वो न्यसादि होतापृच्छ्यो विश्पतिर्विक्षु वेधाः ॥ २ ॥**

अस्य । शासुः । उभयासः । सचन्ते । हविष्मन्तः । उशिजः । ये । च । मर्ताः ।
दिवः । चित् । पूर्वः । नि । असादि । होता । आऽपृच्छ्यः । विश्पतिः । विक्षु । वेधाः ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. अस्य [अग्नेः] शासुः (=शासनम्) उभयासः (=उभयेपि) सचन्ते (=सेवन्ते) हविष्मन्तो (=हविर्युक्तः) उशिजः (=हविः कामयमाना) [अमर्त्या] ये च मर्त्या (=मनुष्याः) [सन्ति] [ते उभयेपि सचन्ते]। [स] दिवश्चित् (=सूर्योदयादपि) पूर्वो होता (=देवानामाह्वाता) [भूत्वा] न्यसादि (=स्थापितो गृहीतासनो भवति), आपृच्छ्यः (=पूज्यो) वेधाः (=अभिमतफलस्य दाता) विश्पतिः (=राजा) [अग्निः] विक्षु (=प्रजासु) [न्यसादि-गृहीतासनो भवति] ॥

मनुष्य हा तर अर्थ प्रसिद्धच आहे. यास्तव विवस्वान् म्हणजे कोणीएक विशेष व्यक्ति मानण्याचें कांहीं कारण नाहीं असें आम्हांस दिसतें. ऋ. १. ३१. ३ यावर जें लिहिलें आहे त्याचा पुनः विचार केल्यावरून जें दिसलें तें आम्हीं येथें सांगितलें आहे.

'यज्ञाचा ध्वज'='विदथस्य केतुम्.' म्हणजे, जेथें जेथें यज्ञ होतो तेथें तेथें असणारा. अग्नीशिवाय यज्ञ होणें नाहीं असें असल्यामुळें हें विशेषण दिलें आहे.

'दोघांपासून जन्मलेला'='द्विजन्मानम्.' अग्नि हा द्यावापृथिवींपासून जन्मलेला आहे असें पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. (ऋ. ३. २. २; ३. २५. १; १०. १. २; १०. २. ७; १०. १४०. २ हे मंत्र पहा). पृथिवी आणि आकाश यांमध्यें विजेच्या रूपानें अग्नि उत्पन्न होतो म्हणून त्याला द्यावापृथिवींचा पुत्र असें म्हटलें आहे.

'उत्तम निधि [आणि] मित्रच जणुं करून भृगुकरितां आणिला'='रयिमिव प्रशस्तं रातिं भरद्भृगवे मातरिश्वा.' म्हणजे अग्नीला आणून जो स्थापिला, तो केवळ द्रव्याचा निधीच जणुं होय आणि मूर्तिमंत हितकारी मित्र होय असा भावार्थ. यांत अग्नीविषयीं आपल्या आर्य पूर्वजांची प्रीति दिसून येते.

हा मंत्र वृत्तासाठीं खालीं लिहिल्याप्रमाणें वाचला पाहिजे असें समजावें:-

'वह्निं यशसं विदथस्य केतुं
सुप्राव्यं दूतं सदिओअर्थम् ।
द्विजन्मानं रयिमिव प्रशस्तं
रातिं भरद्भृगवे मातरिश्वा ।

२. याची आज्ञा उभय[जन] पाळितात; हवि घेणारे उत्सुक [देव] आणि जे मर्त्य [यजमान] ते. [तो] सूर्योदयापूर्वींच होत्याच्या ठायीं स्थानापन्न झाला आहे. पूज्य [आणि] बुद्धिमान् राजा [अग्नि] प्रजांमध्यें [स्थानापन्न झाला आहे].

2. His mandate both obey, the earnest [gods] that receive the oblation and [those] that [are] mortals. Even before the rise of the sun [he] is established [as] an invoker, [established as] an honoured [and] wise king among [his] subjects.

२. 'अग्नि हा इतका मोठा आहे कीं, देव आणि मनुष्य असे उभयतां त्याची आज्ञा पाळितात. असा जो अग्नि. तो सूर्योदयापूर्वींच होत्याचे आसनावर बसतो, बुद्धिमान् आणि पूज्य राजा अग्नि आपल्या प्रजांचे मध्यें म्हणजे आम्ही जे यजमान आणि स्तोते त्यांजमध्यें स्थानापन्न होत असतो; म्हणजे सूर्योदयापूर्वींच आम्ही त्याला पेटवून त्याची सेवा करितों आणि तो आम्हांसाठी देवांचें आह्वान करीत असतो.'

'हवि घेणारे उत्सुक [देव]'= 'हविष्मन्तः उशिजः.' ह्या शब्दांचा अर्थ 'हवि देणारे जे उत्सुक स्तोते ते' असाहि होऊं शकेल.

'प्रजांमध्यें' = 'विक्षु.' 'विश्'शब्दाविषयीं सू. ४४ मं. ७ याजवर दिलेली टीप पहा. प्रस्तुतच्या मंत्रावरून सुद्धा 'विश्'शब्दाचा मूळचा प्रजा हा जो खरा अर्थ तो स्पष्ट दिसून येतो.

'याची आज्ञा'='अस्य शासुः.' ऋ. १. ७३. १ हा मंत्र आणि त्याजवरील भाष्य पहा.

श्रुतसुखासाठीं खालीं दाखविल्याप्रमाणें मंत्र म्हटला पाहिजेः—

अस्य शासुरुभयासः सचन्ते
हविष्मन्तः उशिजो ये च मर्ताः ।
दिवश्चित्पूर्वो निअसादि होता
आपृच्छिओ विश्पतिर्विक्षु वेधाः ।

**तं नव्यंसी हृद आ जायंमानमस्मत्सुकीर्तिर्मधुंजिह्वमश्याः ।**
**यमृत्विजो वृजने मानुषासः प्रयस्वन्त आयवो जीजनन्त ॥३॥**

तम् । नव्यंसी । हृदः । आ । जायंमानम् । अस्मत् । सुऽकीर्तिः । मधुंऽजिह्वम् । अश्याः ।
यम् । ऋत्विजः । वृजनें । मानुषासः । प्रयस्वन्तः । आयवः । जीजनन्त ॥ ३ ॥

---

### भाषायाम्.

३. वृजने ( =संग्रामे=संग्रामप्रसङ्गे ) यम् [ अग्निम् ] ऋत्विजः ( =यजनं कुर्वन्तः ) प्रयस्वन्तः ( =हविरन्नयुक्ताः=गृहीतहविष्काः ) मानुषासः ( =मानुषाः=मनुष्याः) आयवो ( =यजमाना ) जीजनन्त ( =अजीजनन्त=जनयन्ति ) तं मधुजिह्वं (=मधुरवाचम् ) ( =अग्निं ) नव्यसी ( =नवीयसी=अतिशयेन नूतना ) हृद आ जायमानम् ( =हृदयादेव उत्पद्यमाना ) अस्मद् ( =अस्माकं) सुकीर्तिः ( =शोभना स्तुतिः) अश्याः ( =आभिमुख्येन प्राप्नोतु=गच्छतु ) ॥

सति युद्धप्रसङ्गे यं मेधाविनमाग्निं मनुष्याः संरक्षणाय आहूय हविषा यजन्ते स्तुवन्ति च तमग्निम् एषाऽस्माकम् अतिशयेन नूतना सूक्तरूपा अन्तःकरणाज्जायमाना स्तुतिः प्राप्नोत्वित्यर्थः ॥

'जायमानम्' इति पदं व्यत्ययेन नपुंसकम् । हृदयान्मन्त्रस्य स्तुतेर्वा जायमानत्वं हि इमं स्वस्मै हृद आ सुतष्टं मन्त्रं वोचेम कुविदस्य वेदत् (ऋ. १. ३५. २ ) इत्यादिष्वनेकेषु स्थलेषु यथा प्रसिद्धं तथा हृदयादग्नेर्जायमानत्वं न प्रसिद्धम् ।

'वृजन'शब्दोत्र सायणानुसारेणैवास्माभिर्व्याख्यातः । सा च व्याख्या मन्त्रान्तरेष्वपि तैः स एवार्थो यस्मात्कृतास्ति तस्माद्व्याख्यातृपरंपरागतेति ज्ञेयम् । युज्यतेपि च तेषु तेषु मन्त्रेषु ॥

३. युद्धप्रसंगी आला म्हणजे ज्याला मनुष्यलोक हविरन्न देऊन यजन करून उत्पन्न करीत असतात, त्या मधुजिह्व [अग्नी]प्रत हें आमचें अंतःकरणापासून उत्पन्न होणारें अगदी नूतन सुस्तोत्र पावो.

3. May this our good praise, born of the heart [and] wholly new, reach that [Agni] of the sweet tongue, whom at the approach of battle human worshippers produce and honour with oblations.

३. भावार्थः—'युद्धप्रसंग आला म्हणजे मनुष्यें अग्नीला समिधांनीं जन्म देतात (म्ह० पेटवितात), आणि त्याला हवि इत्यादि देऊन त्याची सेवा करितात; तर असा जो अग्नि, त्याप्रत हें आमचें अगदी नवें आणि अंतःकरणापासून रचिलेलें सूक्त प्रविष्ट होओ.'

'अगदी नूतन स्तोत्र'='नव्यसी सुकीर्तिः' म्हणजे आतांचें आतांच रचिलेलें, पूर्वी कोणी तरी दुसऱ्या ऋषीनें केलेलें नव्हे. प्राचीन आपले पूर्वज नित्य जुनीं सूक्तें म्हणून देवांची सेवा करीत नसत, तर केव्हां केव्हां नवीं रचूनहि म्हणत असत त्याचें हें एक चांगलें उदाहरण होय. आणि याच सूक्तावरून असाहि प्रश्न निघतो कीं, वेदाचीं सूक्तें अनादिकाळापासून आलेलीं आहेत, तर यांत ऋषि आपल्या सूक्तास अगदी नूतन म्हणतो याचा अर्थ काय?

'युद्धप्रसंग आला म्हणजे'='वृजनें.' अक्षरशः अर्थ 'युद्धांत' हा अर्थ सायणानुसारच केला आहे, आणि कित्येक पाश्चिमात्य विद्वान्—उदाहरणार्थ, डाक्टर ग्रास्मान् वगैरे— जो 'यज्ञशाळेंत' असा अर्थ करितात तो निराधार आहे असें आम्हांस वाटतें. युद्धप्रसंगीं आराध्य देवतेचा धांवा करणें ही चाल सर्व देशांत आणि सर्व युगांत प्रसिद्ध आहे. शिवाजी छत्रपति महाराज अफझुलखानावर गेला तेव्हां भवानीची उपासना करून गेला होता असें इतिहासप्रसिद्ध आहेच. शिवाय रावणादिक जे वेदोत्तरकालिक योद्धे तेहि शत्रूवर चाल करून जाण्यापूर्वी अग्नीला वगैरे हवि देऊन भजत असत असें रामविजय वाचणाऱ्यांस ठाऊक आहेच.

'मधुजिह्व' म्हणजे गोड आहे जिह्वा ज्याची तो, अथवा मधुर हवि ज्याच्या जीभेवर घालतात तो, किंवा ज्याला मधुरवचनें म्हणजे मधुर अशीं स्तोत्रें गातां येतात तो. अग्नि हा होता आहे असें वर्णन येतें त्यापेक्षां त्याला मधुरवचन हें विशेषण चांगलें शोभतें.

'अंतःकरणापासून उत्पन्न होणारें'='हृदः आ जायमानम्.' या शब्दाविषयीं थोडी अडचण आहे. अक्षरशः अर्थ हृदयापासून उत्पन्न होणारा जो [अग्नि] त्याजप्रत, असें अग्नीचें विशे-

उशिक्पावको वसुर्मानुषेषु वरेण्यो होताधायि विक्षु ।
दमूना गृहपतिर्दम आँ अग्निर्भुवद्रयिपती रयीणाम् ॥ ४ ॥
उशिक् । पावकः । वसुः । मानुषेषु । वरेण्यः । होता । अधायि । विक्षु ।
दमूनाः । गृहऽपतिः । दमे । आ । अग्निः । भुवत् । रयिऽपतिः । र-
यीणाम् ॥ ४ ॥
तं त्वा वयं पतिमग्ने रयीणां प्र शंसामो मतिभिर्गोतमासः ।
आशुं न वाजंभरं मर्जयन्तः प्रातर्मक्षू धियावसुर्जगम्यात् ॥५॥२६
तम् । त्वा । वयम् । पतिम् । अग्ने । रयीणाम् । प्र । शंसामः । मतिऽ
भिः । गोतमासः ।
आशुम् । न । वाजम्ऽभरम् । मर्जयन्तः । प्रातः । मक्षु । धियाऽवसुः ।
जगम्यात् ॥ ५ ॥ २६ ॥

## भाषायाम्.

४. उशिक् (=कामयमानो) वसुः (=साधुः) [एतादृशः] पावकः (=शोधकोऽग्निः) मानुषेषु विक्षु (=मानुषरूपासु विक्षु=मानुषीषु प्रजासु) वरेण्यो (=वरणीयः=श्रेष्ठो) होता (=देवानामाह्वाता=होतृत्वे) अधायि (=स्थापितोऽस्ति) । रयीणां रयिपतिः (=धनानां पतिः=पतिः) [एतादृशश्च] अग्निः दमे आ (=गृहे) दमूनाः (=गृहमनाः=गृहप्रियो) गृहपतिः (=गृहस्य पतिः) भुवत् (=अभवत्) ॥

उपासकानां गृहेषु अग्निः खलु होतृकर्म कुर्वन् गृहपतिरिव भातीति भावः ॥
आ इति सप्तमीद्योतकः ॥

५. तं (=तादृशं) रयीणां पतिं (=धनानां पतिं) त्वा (=त्वां) हे अग्ने, वाजंभरं (=वाजस्य हविर्लक्षणस्यान्नस्य वोढारम्) आशुं न (=अश्वमिव), मर्जयन्तः (=मार्जयन्तो) वयं गोतमासः (=गोतमगोत्रोत्पन्नाः पुरुषा) मतिभिः (=स्तुतिभिः) प्र शंसामः (=प्रकर्षेण स्तुमः) । –धियावसुः (=धीमान्=प्रज्ञायुक्तः) [अग्निः] प्रातः (=प्रातःकाले) मक्षु (=सत्वरं) जगम्यात् (=दिने दिन आगच्छतु) ॥

ण आहे. परंतु अग्नि अंतःकरणापासून अथवा हृदयापासून उत्पन्न होतो असें कोठें प्रसिद्ध नाहीं, आणि स्तुति, मंत्र, सूक्त अथवा प्रार्थना हृदयापासून निघालेली आहे असें वर्णन वेदांत पुष्कळ ठिकाणीं येतें. उदाहरणार्थ ऋ. १. १७१. २; २. ३५. २; ३. ३९. १ इत्यादि पहा. तर 'जायमाना' असा पाठ अर्थलाभासाठीं घ्यावा असें आम्हांस वाटतें.

४. मायाळु [आणि] दयाळु जो पावक त्याला श्रेष्ठ होता [करून] मनुष्यलोकीं स्थापिलें आहे. सकल धनांचा स्वामी [जो] अग्नि [तो] घरांत घराचा प्रिय स्वामी झाला आहे.

५. यास्तव हे अग्नी, संपत्तींचा स्वामी जो तूं त्या तुला आम्ही गोतम [आपल्या] स्तोत्रांनीं स्तवितों, आणि अन्न वाहून नेणाऱ्या घोड्याप्रमाणें तुला [आम्ही] रगडतों:- बुद्धिमान् अग्नि प्रतिदिनीं सकाळीं येत जाओ.

4. The loving [and] kind Pâvaka is ordained [as] the best invoker among human beings. Lord of riches, Agni has become in the house the loving Lord of the house.

5. Therefore, with [our] hymns, we the sons of Gotama praise thee, O Agni, who art the Lord of riches, and rub thee like a horse that carries food.—May wise Agni come daily early in the morning.

---

४. भावार्थः-'प्रीति करणारा आणि दयाळु असा जो अग्नि, तो उत्तम होता समजून मनुष्यलोकीं त्याची होत्याच्या कामीं स्थापना झालेली आहे. सकल संपत्तींचा स्वामी असा जो अग्नि, तो प्रत्येक यजमानाच्या घरीं होत्याचें काम करितो आणि प्रिय गृहपतीसारिखाच शोभत असतो.' अग्नि हा उत्तम होता ह्मणजे देवांस यज्ञाप्रत बोलावून आणण्याविषयीं अतिकुशल अशी प्रख्याति वेदांत सर्वत्र आहे.

'पावक' हें अग्नीचें नांव आहे. त्याचा अक्षरशः अर्थ शुद्ध अथवा पवित्र करणारा असा आहे. या अर्थी तें इतर देवांसहि वेदांत लाविलेलें आढळतें.

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें श्लोकरूपास लागतोः—

उशिक्पावको वसुर्मानुषेषु
वरेण्यो होताधायि विक्षु ।
दमूना गृहपतिर्दम आ
अग्निर्भुवद्रयिपती रयीणाम् ।

५. 'वर अग्नीचे गुण आणि माहात्म्य सांगितलें. तर असा जो अग्नि, जो संपत्तींचा स्वामी, त्याला आम्ही गोतमकुळांतील मनुष्य आमच्या स्तोत्रांच्या योगानें स्तवितों, आणि एकादा धान्य वाहून नेणारा घोडा असतो आणि त्याला जसा रगडतात तसा आम्ही याला रगडतों. तर हा अग्नि प्रतिदिनीं प्रातःकाळीं प्रगट होओ आणि आम्हीं दिलेलें हवि ग्रहण करीत जाओ.'

हा या सूक्ताचा उपसंहार आहे. आणि यांत ऋषि ह्मणतो कीं आम्ही

## सूक्तम् ६१.

गौतमो नोधा ऋषिः। इन्द्रो देवता। त्रिष्टुप् छन्दः।

**अस्मा इदु प्र तवसे तुराय प्रयो न हर्मि स्तोमं माहिनाय।**
**ऋचीषमायाध्रिगव ओहमिन्द्राय ब्रह्माणि राततमा॥ १॥**

अस्मै। इत्। ऊम् इति। प्र। तवसे। तुराय। प्रयः। न। हर्मि।
स्तोमम्। माहिनाय।
ऋचीषमाय। अध्रिऽगवे। ओहम्। इन्द्राय। ब्रह्माणि। रातऽतमा॥ १॥

### भाषायाम्.

१. [अहं] तवसे (=प्रवृद्धाय) तुराय (=त्वरमाणाय) माहिनाय (=महते) अस्मै [इन्द्राय] इत् उ (=अस्मै प्रसिद्धाय इन्द्रायैव) प्रयो न (=अन्नमिव) [इमं] स्तोमं प्र हर्मि (=प्रहरामि=प्रभरामि=अर्पयामि)। ऋचीषमाय (=ऋचा समाय=यादृशी स्तुतिः क्रियते तत्समाय) अध्रिगवे (=अप्रतिहतं यथा तथा गच्छते=अप्रतिहतगमनाय) इन्द्राय ओहं (=? वहनीयं=प्रशस्तं) [स्तोमं] [तथा] राततमा (=राततमानि=पूर्वैर्यजमानैर्यानि दत्तानि तेषूत्तमानि) ब्रह्माणि (=हविरन्नानि) [प्र हर्मि=अर्पयामि]॥

इन्द्रमेव स्तुत्या हविषा च परिचरामीत्यर्थः।

'ऋचीषम'शब्दोनुसायणमेवात्र व्याख्यातः। यत्र यत्र हि मन्त्रेष्वयं शब्दः प्रयुक्तो दृश्यते तत्र तत्र सायणा इममेवार्थं कुर्वन्ति। अतश्च तैषां व्याख्यानपरंपरयागतस्तैः पूर्वव्याख्यातृभ्य उपलब्ध इति मन्तव्यम्। निर्वचनदृष्ट्यापि स सर्वत्र युज्यत इति भाति। एवं सति यच्छार्मण्यपण्डिता अन्यथा व्याचक्षते तच्चिन्त्यमिति द्रष्टव्यम्।

ओहमिति पदमीषद्दुर्बोधमनुसायणमेव व्याख्यातमस्माभिः। व्याख्यात्रन्तरैः सूचितार्थस्याधारसापेक्षत्वात्॥

गोतमकुलोत्पन्न मनुष्य अग्नीला स्तोत्रांनीं भजतों. या सूक्ताचा कर्ता जो नोधा ऋषि तो गोतमकुळांत जन्मलेला आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. आणि वस्तुतः सूक्तकर्ता जरी एकटाच नोधा आहे, तरी नोधा हा एकटाच अग्नीच्या भजनास गुंतला होता असें नाहीं. त्याच्या जवळ त्याच्या कुटुंबाची जीं माणसें आहेत त्यांस अनुलक्षून तो 'आम्ही गोतमकुलोत्पन्न' असें म्हणतो हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

'बुद्धिमान् अग्नि इ०.' सूक्त ५८, मं. ९ पहा.

## सूक्त ६१.

ऋषि–नोधा ( पूर्व सूक्ताचा जो तोच ). देवता–इन्द्र. वृत्त–त्रिष्टुभ्.

१. बलाढ्य, त्वरायुक्त [आणि] मोठा [ जो ] हा [ इंद्र ] त्यालाच [मी] अन्न [अर्पण केल्या]प्रमाणें [हें] स्तोत्र अर्पण करितों. स्तुतियोग्य [आणि] अप्रतिहत इंद्राला उत्तम [स्तोत्र] [आणि] सर्वोत्कृष्ट हविरन्नें [ अर्पण करितों ].

## HYMN 61.

To Indra. By *Nodhas* ( author of the previous hymn ). Metre–*Trishtubh.*

1. To Him, to Him alone who is mighty, impetuous [and] great, I offer [ this ] praise like food,—to Indra, who is equal to the praise, who is irresistible, [ I offer ] excellent [ praise ] [ and ] oblations the best [ ever ] given.

---

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हणावाः—

तं त्वा वयं पतिमग्ने रयीणां

प्रशंसामो मतिभिर्गोतमासः ।
आशुं न वाजंभरं मर्जयन्तः
प्रातर्मक्षू धियावसुर्जगम्यात् ॥

---

१. हेंहि सूक्त नोधा ऋषीचेंच आहे. याची देवता इंद्र आहे. ऋषि म्हणतो, ' बलाढ्य, पराक्रमी, आणि मोठा आणि स्तोते जी स्तुति करितात त्यासारिखाच खरोखर असलेला, आणि ज्याच्या शक्तीविरुद्ध अथवा मनाविरुद्ध कोणीहि आड जाऊं शकत नाहींत असा जो इन्द्र, त्यालाच मी हें आतां केलेलें स्तोत्र आणि हीं हविरन्नें अर्पण करितों, दुसऱ्या देवाला अर्पण करीत नाहीं.' असा भावार्थ आहे. दुसऱ्या देवास भजत नाहीं, दुसऱ्या देवाचें इतकें महत्त्व नाहीं, इंद्रच मोठा, इंद्रच स्तवनीय, इंद्रच पराक्रमी असा भावार्थानें ऋषि बोलतो आहे. या सर्व सूक्तभर ' इंद्रालाच ' असें म्हटलें आहे तें ध्यानांत ठेवावें.

'अन्न अर्पण केल्याप्रमाणें'='प्रयो न.' म्हणजे, भुकेलेल्या मनुष्याला जसें अन्न अर्पण करावें त्याप्रमाणें. हा भावार्थ सायणीप्रमाणें आहे.

' स्तुतियोग्य '=' ऋचीषमाय. ' म्हणजे अक्षरशः अर्थ, ' स्तुतीसारिखा ' असा आहे, जी स्तुति केली जाते तिच्या सारिखाच. स्तुति मोठी आणि तो तिजपेक्षां लहान अथवा कमी योग्यतेचा असें नव्हे.

' सर्वोत्कृष्ट '=' राततमानि. ' 'रात ' म्हणजे ' दिलेलें, ' त्यापासून अतिशयदर्शक ' तम ' प्रत्यय झाला आहे. ' अतिशयेंकरून दिलेलीं,' ' पूर्वीच्या उपासकांनीं अतिशयेंकरून अर्पण केलेलीं ' असा अक्षरशः अर्थ होतो. पण जसें स्तोत्र महान असलें म्हणजे देवांस प्रिय होतें तसें उत्तम अन्न असलें म्हणजे

**अस्मा इदु प्रयं इव प्र यंसि भराम्याङ्गूषं बाधे सुवृक्ति ।**

**इन्द्राय हृदा मनसा मनीषा प्रत्नाय पत्ये धियो मर्जयन्त ॥ २ ॥**

अस्मै । इत् । ऊम् इति । प्रयः॑ऽइव । प्र । यंसि । भरामि । आङ्गूषम् । बाधे । सुऽवृक्ति ।

इन्द्राय । हृदा । मनसा । मनीषा । प्रत्नाय । पत्ये । धियः । मर्जयन्त ॥२॥

**अस्मा इदु त्यमुपमं स्वर्षां भराम्याङ्गूषमास्येन ।**

**मंहिष्ठमच्छोक्तिभिर्मतीनां सुवृक्तिभिः सूरिं वावृधध्यै ॥ ३ ॥**

अस्मै । इत् । ऊम् इति । त्यम् । उपऽमम् । स्वःऽसाम् । भरामि । आङ्गूषम् । आस्येन ।

मंहिष्ठम् । अच्छोक्तिऽभिः । मतीनाम् । सुवृक्तिऽभिः । सूरिम् । ववृधध्यै ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. अस्मा इदु (=अस्मा इन्द्रायैव) [न त्वन्यस्मै देवाय] प्रय इव (=अन्नमिव) [स्तोत्रं] प्र यंसि (=प्रयच्छामि=अर्पयामि), [अस्मा एव] सुवृक्ति (=सुसंस्कृतम्) आङ्गूषं (=स्तोत्ररूपमाघोषं) बाधे (=शत्रूणां बाधनाय) भरामि (=प्रभरामि=प्रार्पयामि)। [अन्येपि] हृदा (=हृदयेन=अन्तःकरणेन) मनसा (=बुद्ध्या) मनीषा (=मनीषया=ज्ञानेन) प्रत्नायेन्द्राय पत्ये (=पुरातनाय स्वामिन इन्द्रायैव) धियः (=स्तुतीः) मर्जयन्त (=मार्जयन्ति=संस्कुर्वन्ति) ॥

इन्द्र एव श्रेष्ठः स्तोत्रार्हो हविरर्हश्च । तस्य पुरातनस्वामिभूतत्वात् ॥ अतः कारणादहं तमेव स्तोत्रादिना भजे, अन्येपि तमेव भजन्ते नान्यं देवम् इति भावः ॥

३. अस्मा इदु (=अस्मा इन्द्रायैव) त्यं (=तं=प्रसिद्धम्) उपमम् (=उत्कृष्टं) स्वर्षां (=स्वर्गस्य दातारम्) आङ्गूषम् (=आघोषयुक्तं स्तोत्रम्), मंहिष्ठम् (=अतिशयेन दानशीलं) सूरिं (=विद्वांसम्) [इन्द्रं] मतीनां (=स्तुतीनां) सुवृक्तिभिः (=सुसंस्कृताभिः) अच्छोक्तिभिः (=आभिमुख्येन कृतैर्वचनैः) वावृधध्यै (=वर्धयितुम्), आस्येन (=मद्वदनेन) भरामि (=प्रभरामि=रचयित्वार्पयामि) ॥

उत्कृष्टतमं तथा स्वर्गदायकं स्तोत्रमिन्द्रायैव करोमि परमोदारं च विद्वांसमिन्द्रं प्रत्येव स्तुतिवचनानि गात्वा तस्य कीर्तिं प्रवर्धयामि नान्यस्य देवस्येति भावः ॥

२. ह्या [इंद्रा]लाच [मी] अन्नाप्रमाणें [स्तोत्र] अर्पण करितों, [यालाच] [मी] [शत्रु]बाधक मधुर स्तोत्र अर्पण करितों. [दुसरे लोकहि] पुरातन प्रभु [जो] इंद्र [त्याच्याच] प्रीत्यर्थ अंतःकरणपूर्वक, मनःपूर्वक [आणि] आस्थापूर्वक स्तोत्रें रचीत असतात.

३. उत्कृष्ट [जें] स्वर्गदायक स्तोत्र [तें] [मी माझ्या] तोंडानें या [इंद्रा]प्रीत्यर्थच अर्पण करितों. परम उदार [आणि] बुद्धिमान् [इंद्रा]ची[च] कीर्ति मी भक्तिपूर्वक सुंदर स्तोत्रांनीं वाढवितों.

2. To Him alone I offer [a prayer] like an oblation, [to Him] I offer a well-fashioned loud prayer for the driving off [of the enemy]; to Indra, the ancient Lord, [they] prepare prayers with the heart, with the mind [and] with the thought.

3. To Him alone I offer with [my] mouth that most excellent heaven-giving prayer [which I can make]; I glorify the liberalest wise [Indra alone] with well-fashioned hymns of devotions.

---

देवास प्रिय होतें, आणि आजपर्यंत जें उपासकांनीं अन्न अर्पण केलें त्यांत उत्तम असेल तें देतों असें म्हणणें हें साहजिक आहे.

'हविरन्नें'=' ब्रह्माणि.' याचा अर्थ बहुतकरून 'स्तोत्रें' असा होतो. पण सायणाचार्य केव्हां केव्हां (आणि प्रस्तुत स्थळींहि) 'हविरन्नें' असाहि करीत असतात. आणि 'स्तोत्रें' उच्चारून हविरन्न अर्पण करीत, यास्तव 'ब्रह्म' शब्दाचा 'हविरन्न' असा अर्थ करणें यांत विशेष नवल नाहीं.

या मंत्रांत अक्षरांची भरती खालीं दाखविल्याप्रमाणें करावी लागतेः—

अस्मा इदु प्र तवसे तुराय
प्रयो न हर्मि स्तोमं माहिनाय ।
ऋचीषमायाध्रिगव ओहम्
इन्द्राय ब्रह्माणि राततमा ॥

---

२. भावार्थः—'इंद्रच पुरातन प्रभु होय; यास्तव, भुकेलेल्या मनुष्यास अन्न अर्पण केल्याप्रमाणें मी त्यालाच स्तोत्र अर्पण करितों. आणि मीच इंद्र श्रेष्ठ समजून त्याला भजतों असें नाहीं, तर इतर मनुष्यहि त्यालाच मनःपूर्वक, अंतःकरणपूर्वक आणि ज्ञानपूर्वक स्तोत्रें रचून तीं अर्पण करून भजत आले आहेत.' यांत सुद्धा इतर देवांवर इंद्राचें श्रेष्ठत्व आहे असें दर्शविलें आहे.

'[शत्रु]बाधक'=' बाधे.' अक्षरशः अर्थ 'बाधण्याला, बाधा करण्याला, नाहींसे करण्याला.' 'बाधे' हें 'बाधितुं' याऐवजी तुमर्थी रूप आहे. शत्रूंस

**अस्मा इदु स्तोमं सं हिनोमि रथं न तष्टेव तत्सिनाय।**
**गिरश्च गिर्वाहसे सुवृक्तीन्द्राय विश्वमिन्वं मेधिराय ॥ ४ ॥**

अस्मै । इत् । ऊम् इति । स्तोमम् । सम् । हिनोमि । रथम् । न । तष्टाऽइव । तत्ऽसिनाय ।
गिरः । च । गिर्वाहसे । सुऽवृक्ति । इन्द्राय । विश्वम्ऽइन्वम् । मेधिराय ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

४. अस्मा इदु (=अस्मा इन्द्रायैव), रथं न तत्सिनाय तष्टेव (=रथस्वामिने तष्टा रथकर्ता रथं करोति तद्वद्) [अहं] स्तोमं (=स्तोत्रं) सं हिनोमि (=प्रेरयामि=करोमि)। गिर्वाहसे च (=गीर्भिरुह्यमानाय=अश्ववद् गिर एव यं वहन्ति तमिन्द्रायैव) सुवृक्ति (=शोभनमावर्जनं यथा भवति तथा=शोभनं यथा भवति तथा) गिरः (=स्तोत्राणि) [सं हिनोमि] (=करोमि)। मेधिराय (=मेधाविने) [इन्द्रायैव] विश्वमिन्वं (=विश्वव्यापकं=स्तोत्रं) सं हिनोमि (=करोमि)॥

अत्रेदमुक्तं भवति। स्तोतृभिः प्रेषितानि स्तोत्राणि रथवद् इन्द्रमानयन्ति। अतःकारणाद् रथेच्छां कुर्वते रथकारो रथं करोति तद्वदहमिन्द्रायैव न त्वन्यदेवाय स्तोत्रं रचयामि। यत्स्तोत्रं रथवत् सुवृक्ति। सुसंस्कृतमिति यावत्। इन्द्ररथवत् सर्वव्यापि च करोमि। इन्द्रश्च सर्वेषु देवेषु स्तुत्यर्हस्तस्य मेधावित्वादिति।

यत्तु 'गिर्वाहस्' शब्दं गिरो वाहः अर्पितं हव्यादिकं यस्य स इति प्रकारेण विदुष्टरमास्मानादयो व्याचक्षते तन्न। यथा कस्मैचिद् गन्तुं रथं कृत्वा रथकारः प्रेरयति तथा मम यज्ञं प्रत्यागन्तुम् इन्द्रायाहं स्तोत्रं रचयित्वा प्रेरयामि येन स आगमिष्यति स हि स्तोत्रं रथवद् अधिष्ठाय गच्छतीति भावार्थसद्भावात्॥

---

हाकून देण्यासाठीं स्तोत्र अर्पण करितों म्हणजे, जेणेंकरून शत्रु नाहींसे होतील असें स्तोत्र अर्पण करितों।

'मधुर'='सुवृक्ति.' अक्षरशः अर्थ 'चांगलें तासलेलें,' 'चांगली तासणी ज्यांत झाली आहे.' म्हणजे गुळगुळीत; चांगलें दिसणारें; कानास चांगलें लागणारें. सू.५२, मं.१याजवरील टीप पहा.

'पुरातन प्रभु जो इंद्र त्याच्याच प्रीत्यर्थ'='प्रत्नाय पत्ये इन्द्राय.' यावरून दुसरे देव 'पुरातन' नव्हेत म्हणजे त्यांचे भक्ति आलीकडे जन करूं लागले आहेत असें ऋषीचें हृद्य आहे.

हा मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें आधुनिक वृत्ताला बसतो;-

४. रथाची वांछा करणाऱ्या [मनुष्या]करितां सुतार रथ [करितो] तसा मी या [इंद्रा]प्रीत्यर्थंच स्तोत्र रचितों; स्तोत्रवाहन इंद्राप्रीत्यर्थंच मी सुंदर स्तोत्र [रचितों], बुद्धिमान् [इंद्रा]प्रीत्यर्थंच सर्वव्यापि [स्तोत्र] रचितों.

4. To Him alone I prepare a hymn as a carpenter [prepares] a car for one that desires a car; yes, hymns to Indra who is carried on hymns, a beautiful hymn to [Indra], an all-pervading hymn to wise [Indra].

अस्मा इदु प्रेय इव प्र यंसि
भरामि आङ्गूषं बाधे सुवृक्ति ।
इन्द्राय हृदा मनसा मनीषा
प्रत्नाय पत्ये धियो मर्जयन्त ॥

३. भावार्थः–'जें जें म्हणून उत्कृष्ट स्तोत्र होय असें लोक समजतात, आणि जेणेंकरून स्तोत्याला स्वर्गप्राप्ति होते, असें स्तोत्र मी आपल्या तोंडानें रचून इंद्राप्रीत्यर्थ म्हणत असतों, इतर देवांप्रीत्यर्थ म्हणत नसतों. मी अति उदार आणि बुद्धिमान् इंद्राचीच कीर्ति भक्तियुक्त स्तोत्रांनीं गाऊन वाढवितों, इतरांची वाढवीत नाहीं.'

'स्वर्गदायक '=' स्वर्षाम्.' सायणाचार्य येथें 'धनदायक' असा अर्थ करितात. परंतु अक्षरशः अर्थ जुळत असतां तो सोडणें अवश्य दिसत नाहीं.

'भक्तिपूर्वक सुंदर स्तोत्रांनीं '='अच्छोक्तिभिः मतीनां सुवृक्तिभिः.' अक्षरशः अर्थ, 'भक्तींच्या सुंदर स्तोत्रांनीं.'

'वाढवितों'=' वावृधध्यै.' अक्षरशः अर्थ 'वाढविण्यासाठीं.' परंतु अर्थ स्पष्ट समजावा म्हणून या मंत्राचें भाषान्तर आम्हीं किंचित् अक्षर सोडून केलें आहे.

या मंत्रांत जें ऋषीचें म्हणणें आहे त्याजकडेस लक्ष्य द्यावें. तो म्हणतो, मी स्तोत्रें, म्हणजे सूक्तें रचून इंद्रालाच अर्पण करितों, आणि इंद्राचीच कीर्ति वाढवितों. तो आपणास कोणत्याहि प्रकारची शक्ति इंद्रावर वर्चस्व करण्यासारखी आहे असें जाणवीत नाहीं. दीन अनाथ मनुष्यानें अनन्यभावानें एकाच देवतेवर भरंवसा ठेवून त्या देवतेची स्तुति करावी तशी यांत केलेली आहे.

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें श्लोकवृत्ताला बसतोः—

अस्मा इदु त्यमुपमं स्वर्षा
भरामि आङ्गूषमास्येन ।
मंहिष्ठमच्छोक्तिभिर्मतीनां
सुवृक्तिभिः सूरिं वावृधध्यै ॥

४. भावार्थः–'इन्द्र गिर्वाहस आहे; म्हणजे, तो घोड्यावर अथवा गाडींत बसून फिरल्याप्रमाणें स्तोत्रांवर बसून फिरणारा आहे. वास्तव सुतार जसा रथ करून कोणाला तरी बसून जावयाला देतो, तसा मी स्तोत्रें रचून इन्द्राकडे पाठवून देतों म्हणजे तीं त्याजकडे प्रविष्ट होतील, आणि तो रथांत बसल्याप्रमाणें त्यांजवर बसून येईल. आणि हीं मी स्तोत्रें करितों तीं सुंदर आणि इंद्राच्या

अस्मा इदु सप्तिमिव श्रवस्येन्द्रायार्कं जुह्वा३ समञ्जे ।
वीरं दानौकसं वन्दध्यै पुरां गूर्तश्रवसं दर्माणम् ॥ ५ ॥ २७ ॥

अस्मै । इत् । ऊम् इति । सप्तिम्ऽइव । श्रवस्या । इन्द्राय । अर्कम् । जुह्वा । सम् । अञ्जे ।
वीरम् । दानऽओकसम् । वन्दध्यै । पुराम् । गूर्तऽश्रवसम् । दर्माणम् । ॥ ५ ॥ २७ ॥

---

## भाषायाम्.

५. अस्मा इदु (=अस्मा एव) इन्द्राय श्रवस्या (=अन्नेच्छया=अन्नलाभाय) सप्तिमिव (=अश्वं युञ्जन्ति तद्वत्) जुह्वा (=जिह्वया) अर्कं (=मन्त्रं) समञ्जे (=युनज्मि), दानौकसं (=दामानामेकनिलयं) पुरां (=शत्रूणां नगराणां) गूर्तश्रवसं (=प्रसिद्धकीर्तिं) दर्माणं (=विदारयितारं) वीरं (=शूरम्) [एतादृशमिन्द्रं] वन्दध्यै (=वन्देयेति) ॥

यथा कश्चिन्मित्राद्यानयनार्थम् अश्वं रथेन युनक्ति तथाहं त्वदागमनार्थं मन्त्रं जिह्वया युनज्मि । मन्त्रं रचयामीति यावत् । त्वं हि रथवत् मन्त्रमधिष्ठायागच्छसीति पूर्वमन्त्रे प्रतिपादितमेवेति भावः । एतेनापि पूर्वमन्त्रगतगिर्वाहस्शब्दस्य गीर्भिरुह्यमानः इति सायणाचार्यकृतोर्थ एव युक्तः न तु व्याख्यात्रन्तरकृत इति द्रष्टव्यम् ॥

---

रथाप्रमाणें पाहिजे तिकडे त्याला घेऊन जाणारीं अशीं रचितों. इंद्राप्रीत्यर्थच स्तोत्रें रचितों, कारण कीं तो सर्व देवांत उत्तम बुद्धिमान् आहे.'

'स्तोत्रवाहन इंद्राप्रीत्यर्थच '=' गिर्वाहसे.' 'गिर्वाहस्' याचा अक्षरशः अर्थ 'गिरः' म्हणजे स्तोत्रेंच 'वाहः' म्हणजे वाहन आहे ज्याचें तो. इंद्रानें स्तोत्र गातांच तो रथांत बसून आल्याप्रमाणें येतो म्हणून त्यास 'गिर्वाहस्' असें नांव दिलें आहे.

'सर्वव्यापि '=' विश्वमिन्वम्.' म्हणजे इंद्राच्या मनांत जिकडे जावयाचें असेल तिकडे घेऊन जाणारें असें स्तोत्र.

ही ऋचा श्लोकाप्रमाणें खालीं दाखविल्याप्रमाणें वाचावीः—

अस्मा इदु स्तोमअं सं हिनोमि
रथं न तष्ट इव तत्सिनाय ।
गिरश्च गिर्वाहस सुव्वऋक्ति
इन्द्राय विश्वमिन्वं मेधिराय ॥

५. ह्या इंद्राकरितांच मी अन्नेच्छेनें घोडा [तयार केल्या]प्रमाणें [माझ्या] जिव्हेनें स्तोत्र तयार करितों, आणि दानांचें माहेर [आणि] शत्रूंच्या नगरांचा प्रख्यात विदारणारा [असा जो] वीर [इंद्र] त्याला वंदन करितों.

5 For Him alone, with a desire for food, I yoke with my tongue a eulogy like a horse, that I may do homage to Indra the hero, the home of gifts, the renowned destroyer of the cities [of the enemies].

५. भावार्थः–' जसा कोणीतरी मनुष्य आपल्या मित्राला दुरून आणविण्याकरितां घोडा जोडून पाठवून देतो, तसा इंद्रास इकडे आणविण्याकरितां मी आपल्या मंत्राला जोडितों, आणि सर्व वरप्रदानांचें माहेर, आणि शत्रूंच्या नगरांचें निर्दलन करण्याविषयीं ज्याची मोठी प्रख्याति आहे असा जो वीर इंद्र, त्याला वंदन करितों.'

' दानांचें माहेर'=' दानौकसम्.' अक्षरशः अर्थ, ' देणग्यांचें घर,' म्हणजे पाहिजे तो वर देणारा, पाहिजे त्यांची इच्छा पुरविणारा. हा अर्थ स्पष्ट असतां दुसराच अर्थ जो कितीएक पाश्चिमात्य विद्वानांनीं कल्पिलेला आहे तो निराधार दिसतो.

' वंदन करितों '=' वन्दध्यै.' अक्षरशः ' वंदण्यास,' ' नमण्यास.' याचा संबंध ' तयार करितों ' (=' सम् अञ्जे') या क्रियापदाशीं आहे. परंतु पर्यवसानीं अर्थ आम्हीं केल्याप्रमाणेंच समजावयाचा.

' शत्रूंच्या नगरांचा प्रख्यात विदारणारा.' सू. ५३ मं. ८ हा आणि त्याजवरील टीप पहा.

ही ऋचा खालीं दाखविल्याप्रमाणें वाचल्यास साधारण श्लोकाप्रमाणें बसते:–

अस्मा इदु सप्तिमिव श्रवस्या
इन्द्रायार्कं जुहुआ समञ्जे ।
वीरं दानौकसं वन्दध्यै
पुरां गूर्तश्रवसं दर्माणम् ॥

अस्मा इदु त्वष्टा तक्षद्वज्रं स्वपस्तमं स्वर्यं रणाय ।
वृत्रस्य चिद्विदद्येन मर्म तुजन्नीशानस्तुजता कियेधाः ॥ ६ ॥

अस्मै । इत् । ऊम् इति । त्वष्टा । तक्षत् । वज्रम् । स्वपःऽतमम् ।
स्वर्यम् । रणाय ।
वृत्रस्य । चित् । विदत् । येन । मर्म । तुजन् । ईशानः । तुजता ।
कियेधाः ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. अस्मा इदु (=अस्मा इन्द्रायैव) [न त्वन्यस्मै देवाय] त्वष्टा (=विश्वकर्मा) स्वपस्तमम् (=अतिशयेन शोभनकर्माणं=हननकर्मणि अतिशयेन कुशलं) स्वर्यं (=शब्दयन्तं) वज्रम् (=एतन्नामकम् आयुधं) रणाय (=युद्धार्थं) तक्षत् (=अतक्षत्=निर्मितवान्), तुजता (=हिंसता) येन [वज्रेण] तुजन् (=हिंसन्) कियेधाः (=बलवान्) ईशानः (=ऐश्वर्यवान्) [इन्द्रो] वृत्रस्य चित् (=वृत्रस्यापि) मर्म (=मर्मस्थानं हृदयादिकं) विदत् (=अविदत्=प्रहारार्थं लब्धवान्=प्राहार्षीत्)॥

शत्रुहिंसनकुशलतमं वज्रं त्वष्टा यन्निर्मितवांस्तदिन्द्रायैव निर्मितवान् न त्वन्यस्मै देवाय, तेन वज्रेण च प्रहरन्निन्द्रो वृत्रं जघानेति भावः ॥

'कियेधाः' इत्येतत्पदमस्माभिः सायणमनुसृत्य व्याख्यातम् । यत्तु 'प्रभूतं ददत्' इति व्याख्यानं विदुष्टरेण ग्रासमानेन कृतं तस्य संशयग्रस्ताच्छब्दनिर्वचनादृते नास्त्याधार इति द्रष्टव्यम् । ये च निर्वचनैकावलम्बी सायणः किलेति तं दूषयन्ति त एव निर्वचनैकावलम्बिनो भवितुं नार्हन्तीत्यलम् ॥

६. ह्या [इंद्रा]साठींच विश्वकर्मा परमकौशल्ययुक्त [आणि] गर्जना करणारें वज्र रणाकरितां निर्माण करिता झाला; त्या घातकी [वज्रा]नें प्रहार करणारा बळवान प्रभु [इंद्र] वृत्राचेंहि मर्मस्थान भेदून टाकिता झाला.

6. For Him alone Tvashtâ fashioned [as a weapon] in battle the most skilful [and] rumbling thunderbolt; striking with which deadly [weapon], the mighty Lord [Indra] hit the vital part of Vritra himself.

६. भावार्थः– 'शत्रूला मारून टाकण्याविषयीं अतिकुशल आणि मोठी गर्जना करणारें असें वज्र त्वष्ट्या देवानें म्हणजे विश्वकर्म्यानें अथवा देवांच्या सुतारानें निर्माण केलें तें इंद्राप्रीत्यर्थ निर्माण केलें इतर कोणाहि देवासाठीं केलें नाहीं. त्या वज्राविषयीं तर प्रसिद्धि अशी आहे कीं, महाबलवान् जो सकळ जगाचा शत्रु वृत्र त्यालाहि त्याच्या योगानें इंद्रानें मारून टाकिलें, मग इतरांस मारून टाकील यांत काय आश्चर्य ?'

'त्वष्टा' हा देवांचा सुतार, ज्यास विश्वकर्मा असेंहि म्हणतात तो होय. याविषयीं सू. ३२, मं. २ हा आणि त्याजवरील आमची टीप पहा.

'गर्जना करणारें'='स्वर्यम्.' ऋ.५. ३०. ८ आणि ५. ५६. ४ यांजवरील सायणभाष्य पहा.

'वृत्राचेंहि'='वृत्रस्य चित्.' याजवरून समजून येईल कीं वृत्र म्हणजे यः-कश्चित् शत्रु आहे असें नाहीं. त्याला मारणें म्हणजे अति दूरापास्त होय, आणि म्हणूनच त्याला जो इंद्रानें वध केला त्याविषयीं इंद्राची कीर्ति जिकडे तिकडे वेदांत वर्णिलेली आहे.

ही ऋचा बरीच खडबडीत आहे. खालीं दाखविल्याप्रमाणें ह्रस्वदीर्घांचा व्युत्क्रम दिसतोः–

अस्मा इदु त्वष्टा तक्षद्वज्रं
सुअपस्तमं सुरिअं रणाय ।
वृत्रस्य चिद्विददिएन मर्म
तुजन्नीशानस्तुजता कियेधाः ॥

यांत 'विदत् येन' याचा संधि प्रथम 'विदद्येन' असा होऊन मग 'विददिएन' असें संप्रसारण वृत्तासाठीं होतें तें लक्ष्यांत ठेवण्याजोगें दिसतें.

अस्येदु मातुः सवनेषु सद्यो महः पितुं पपिवाञ्चार्वन्ना ।
मुषायद्विष्णुः पचतं सहीयान्विध्यद्वराहं तिरो अद्रिमस्ता ॥ ७ ॥

अस्य । इत् । ऊम् इति । मातुः । सवनेषु । सद्यः । महः । पितुम् । पपिऽवान् । चारु । अन्ना ।
मुषायत् । विष्णुः । पचतम् । सहीयान् । विध्यत् । वराहम् । तिरः । अद्रिम् । अस्ता ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

७. अस्य इत् महः ( =महत इन्द्रस्यैव ) मातुः सवनेषु (=यज्ञेषु) सद्यः (=शीघ्रं ) पितुं ( =सोमलक्षणमन्नं ) पपिवान् चारु अन्ना ( =चारूणि अन्नानि =शोभनान्नानि ) [ च भक्षितवान् ] सहीयान् (=शत्रूणामतिशयेनाभिभविता ) विष्णुः ( =एतन्नामको देवः ) पचतं ( =पक्वमन्नं ) मुषायत् ( =अपहरन् ), अद्रिम् अस्ता ( =अद्रेर्वज्रस्य क्षेपकः ) [ सन् ], वराहं ( =मेघं ) तिरो विध्यत् ( =तिर्यग्यथा तथा अताडयत् ) ॥

एषा तु दुर्बोधा । सायणा एवं व्याचक्षते । इदु इत्येतन्निपातद्वयं पादपूरणम् । यद्वाऽवधारणार्थम् । मातुर्वृष्टिद्वारेण सकलस्य जगतो निर्मातुर्महो महतोऽस्य यज्ञस्य सवनेष्ववयवभूतेषु प्रातःसवनादिषु त्रिषु सवनेषु पितुं सोमलक्षणमन्नं सद्यः पपिवान् । यदाग्नौ हूयते तदानीमेव पानं कृतवानित्यर्थः । तथा चार्वन्ना चारूणि शोभनानि धानाकरम्भादिहविर्लक्षणान्यन्नानि भक्षितवानिति शेषः । किंच विष्णुः सर्वस्य जगतो व्यापकः पचतं परिपक्वमसुराणां धनं यदस्ति तन्मुषायत् अपहरन् । सहीयान् अतिशयेन शत्रूणामभिभविताद्रिमस्ताद्रेर्वज्रस्य क्षेपकः । एवंभूत इन्द्रस्तिरः । सत इति प्राप्तस्येति यास्कः । तिरः प्राप्तः सन् वराहं मेघं विध्यत् । अताडयत् । यद्वा । विष्णुः सुत्यदिवसात्मको यज्ञः । यज्ञो देवेभ्यो निलीय विष्णुरूपं कृत्वेत्याम्नानात् । स विष्णुः पचतं परिपक्वमसुरधनं यत्तन्मुषायत् । अचूचुरत् । तदनन्तरं दीक्षोपसदात्मनां दुर्गरूपाणां सप्तानामह्नां परस्तादासीत् । अद्रिमस्ता सहीयानिन्द्रो दुर्गाण्यतीत्य तिरः प्राप्तः सन् वराहमुत्कृष्टदिवसरूपं तं यज्ञं विध्यत् । तथा च तैत्तिरीयकम् । वराहोयं वाममोषः सप्तानां गिरीणां परस्ताद्वित्तं वेद्यमसुराणां बिभर्तीति । स दर्भपिञ्जूलमुद्वृह्य सप्त गिरीन् भित्त्वा तमहन्निति चेति ॥

अस्माकं तु पुरा किलेन्द्रस्य मात्रा कृतेषु सवनेषु इन्द्रसहायो विष्णुर्देवः क्षिप्रं सोमं पीत्वा अन्नानि च भक्षयित्वा अन्यच्च सर्वमन्नं यत्पक्वं तद्धृत्वा वज्रं प्रक्षिप्य मेघरूपं वराहं हतवानित्येतादृशीमधुना जनैर्विस्मृततरां कामपि व्याख्यायिकामुद्दिश्य

७. ह्या महान् [इंद्रा]च्याच आईच्या यज्ञांमध्यें एकाएकीं सोम पिऊन [आणि] चांगलीं अन्नें [भक्षून] परम बळवान विष्णु पक्व अन्न हरण करिता झाला [आणि] पाषाण टाकून वराहाचा छेद करिता झाला.

7. In the sacrifices of the mother of this great [Indra] alone all-powerful Vishnu drank quickly the juice [and ate] the good offerings, [and] carrying away what was cooked threw the stone [and] pierced through the boar.

७. ही ऋचा फार कठिण आहे. ऋग्वेदांत केव्हां केव्हां अशा ऋचा आढळतात कीं त्यांचा अर्थ परम दुर्बोध असतो. त्यांपैकींच ही एक होय. तथापि या ऋचेचें तात्पर्य असें दिसतें कीं, 'पूर्वी इंद्राचे आईनें यज्ञ केले, त्यांत विष्णूनें येऊन एकदम सोम पिऊन आणि मधुर मधुर पक्वान्नें भक्षून वज्रप्रहार केला आणि मेघरूप वराहास म्हणजे डुकरास भेदून टाकिलें.' अशी एकादी अतिपुरातन कथा असावी आणि तिला उद्देशून यांत ऋषि बोलत आहे असें दिसतें. इंद्राची माता 'अदिति' असें पुष्कळ ठिकाणीं वेदांत सांगितलें आहे. आणि ऋ. ३. ४८. २ यांत तर इंद्र जन्मतांच त्याच्या आईनें त्याला सोम काढून पाजला असें सांगितलें आहे. 'विष्णु' म्हणजे ऋग्वेदांत कोणता देव समजावयाचा याविषयीं सू. २२, मं. १६ इत्यादि पहा.

अथवा या ऋचेचें तात्पर्य असेंहि होऊं शकेल:— 'सर्व देवांत इंद्रालाच त्याच्या आईनें तो उपजतांच सोमपान केलें त्यामुळें तो बलवान् होऊन एकाएकीं मेघरूप वराहास भेदून मारून टाकिता झाला.'

'यज्ञांमध्यें'=' सवनेषु.' अक्षरशः अर्थ 'सोम काढिले तेव्हां' असा आहे. या ठिकाणीं हा अक्षरशः अर्थच घेतल्यास बरें होईल.

'पाषाण'=' अद्रिम्.' हा पाषाण म्हणजे वज्र समजावयाचा. तो गोफणीच्या धोंड्याप्रमाणें (=पाषाणाप्रमाणें) फेकला जातो म्हणून त्यास वेदांत पाषाण असें नांव आहे.

एकंदरींत ही ऋचा कठिण म्हटली पाहिजे, पण त्याला उपाय नाहीं. वेदासारिख्या अनादिकाळ ग्रंथांत कोटकोटें थोड्या ऋचा दुर्बोध असल्या तर कांहीं नवल नाहीं. बहुतकरून सर्वांचा अर्थ समजण्यासारिखा असतो याचेंच खरोखर नवल वाटलें पाहिजे.

अर्थास कठिण असली तरी वृत्तानें मात्र ही ऋचा सरळ आहे:—

अस्येदु मातुः सवनेषु सद्यो
महः पितुं पपिवाञ्चार्वन्ना ।
मुषायद्विष्णुः पचतं सहीयान्
विध्यद्वराहं तिरो अद्रिमस्ता ॥

अस्मा इदु ग्नाश्चिद्देवपत्नीरिन्द्रायार्कमहिहत्य ऊवुः ।
परि द्यावापृथिवी जभ्र उर्वी नास्य ते महिमानं परि ष्टः ॥ ८ ॥
अस्मै । इत् । ऊम् इति । ग्नाः । चित् । देवऽपत्नीः । इन्द्राय । अर्कम् ।
अहिऽहत्ये । ऊवुरित्यूवुः ।
परि । द्यावापृथिवी इति । जभ्रे । उर्वी इति । न । अस्य । ते इति ।
महिमानम् । परि । स्त इति स्तः ॥ ८ ॥

---

ब्रूते नोधा इति संमतम् । यद्वा महान्तम् इन्द्रमेव जन्मनोनन्तरं ("सद्यः") तस्य मातादितिरभिषुतसोमा सती सोममपाययत् पाययत् भक्षितसोमश्च इन्द्र एव मेघरूपं वराहं हतवान्नान्यो देव इति ॥ उक्तं च मन्त्रान्तरे, "यत् जायथाः तदहः अस्य कामे अंशोः पीयूषम् अपिबः गिरिस्थाम् । तं ते माता परि योषा जनित्री महः पितुः दमे आ असिञ्चत् अग्रे" इति ऋ. ३. ४८. २.

---

## भाषायाम्.

८. अस्मा इदु इन्द्राय (=अस्मा इन्द्रायैव=इन्द्रप्रीत्यर्थमेव=इन्द्रं प्रत्यभिनन्दितुमेव) देवपत्नीः ग्नाश्चित् (=देवाः पतयो यासां ता देवता अपि) अहिहत्ये (=अहेर्वृत्रस्य हनने=वृत्रहननप्रसङ्गे) अर्कं (=स्तोत्रम्) ऊवुः (=समतन्वत =चक्रुः)। [इन्द्र एव] उर्वी (=विस्तीर्णे) द्यावापृथिवी (=द्यावापृथिव्यौ) परि जभ्रे (=परिवेष्टितवान्) अस्य (=इन्द्रस्य) महिमानं (=महत्त्वं) ते (=द्यावापृथिव्यौ) न परि स्तः (=नैव परिवेष्टयतः) ॥

द्यावापृथिव्योरपि सकाशाद् इन्द्रस्य महत्तरभूतत्वात् स एव ते परिवेष्टयति तयोरल्पीयस्त्वात् तं ते न परिवेष्टयतः इति भावः ॥

८. ह्या इंद्राप्रीत्यर्थच दिव्य देवपत्न्या सुद्धा वृत्रयुद्धाच्या प्रसंगीं गीत गात्या झाल्या. [ इंद्रच ] विस्तीर्ण द्यू आणि पृथिवी यांस वेष्टून राहिला, त्या ह्याच्या मोठेपणाला वेष्टूं शकल्या नाहींत.

8. To Him alone, to Indra alone, even the goddesses, the wives of the gods, knit a song when he slew the Serpent. He surrounded the vast Heaven and Earth, never did these surround his greatness.

८. भावार्थः—' वृत्रहनन केलें तेव्हां इंद्राचेच गीत देवपत्नी गात्या झाल्या. देवपत्न्यांनीं गीत गाणें हें सौभाग्य दुसऱ्या देवास नाहीं, इंद्रासच आहे. आणि इंद्राचें माहात्म्य इतकें मोठें आहे कीं, तें द्यावापृथिवींत मावत नाहीं. तें द्यावापृथिवींत मावत नाहीं इतकेंच नाहीं परंतु तें द्यावापृथिवींस वेष्टून राहतें, द्यावापृथिवी ह्या त्यास वेष्टित नाहींत.' हा मंत्र चमत्कारिक आहे. राजानें शत्रूवर जय मिळविला म्हणजे त्याच्या नगरांतील स्त्रिया त्याचें यश गातात ही चाल गुजराथ वगैरे प्रांतांत अजून चालू आहे आणि मध्यंतरींहि आपल्या देशांत चालू होती तशी अत्यंत पुरातन जें वैदिक युग त्यांतहि होती असें दिसून येतें. आणि हे गीत गाणें म्हणजे पूर्वींचे दुसऱ्यांनीं रचिलेले श्लोक वगैरे म्हणत असत असें नाहीं, परंतु जेव्हांचे तेव्हां ओव्या किंवा गीत रचून गात असत असेंहि दिसून येतें. अजून तरी मंगळागौरीच्या दिवसीं, अथवा कार्तिकपौर्णिमेच्या दिवसीं, किंवा लग्नाच्यावेळीं, अथवा जात्याजवळ दळावयास बसल्यावेळीं जशा आपल्या बायका जेव्हांच्या तेव्हां नवीन गीत रचून म्हणत असतात तशा पुरातनकाळीं रचून म्हणत असत असें या मंत्रांतील जें 'ऊवुः' हें क्रियापद आहे त्यावरून समजावयाचें आहे. कारण कीं 'ऊवुः' म्हणजे 'गुंफत्या झाल्या' असा अर्थ आहे. आपला 'ओवी' शब्दाचा तरी हाच अर्थ आहे. माळेंत फुलें ओवल्याप्रमाणें ज्यांत शब्द 'ओवलेले' असतात ती 'ओवी' होय. आणि दुसऱ्या एका अतिप्रसिद्ध वृत्ताच्या नांवाचें निर्वचनहि असेंच आहे. ज्यांत यमकाचें अक्षर एकाला एक 'लाविलेलें' असतें ती 'लावणी' होय. लावणींत टला ट आणि पला प लाविला म्हणजे कविता झाली असें समजतात. म्हणून तिला 'लावणी' हें नांव पडलें आहे.

राजाचें यश बायका गातात ही प्रसिद्धि असल्याविषयीं रघुवंश सर्ग ४, श्लोक १२ पहा:— शुश्राव कुञ्जेषु यशः स्वमुच्चैरुद्गीयमानं वनदेवताभिः ॥ मेघदूत १. ६० हाहि पहा.

'वृत्रयुद्धाच्या प्रसंगीं' = 'अहिहत्ये.' अक्षरशः अर्थ 'सर्पाच्या मारण्यांत.'

**अस्येदेव प्र रिरिचे महित्वं दिवस्पृथिव्याः पर्यन्तरिक्षात् ।**
**स्वराळिन्द्रो दम आ विश्वगूर्तः स्वरिरमत्रो ववक्षे रणाय ॥ ९ ॥**

अस्य । इत् । एव । प्र । रिरिचे । महिऽत्वम् । दिवः । पृथिव्याः । परि । अन्तरिक्षात् ।
स्वऽराट् । इन्द्रः । दमे । आ । विश्वऽगूर्तः । सुऽअरिः । अमत्रः । ववक्षे । रणाय ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

९. अस्येत् एव (=अस्यैव) [इन्द्रस्य] महित्वं (=महिमा) दिवः (=द्युलोकात्) पृथिव्याः अन्तरिक्षात् [च] परि [एतेभ्यः सकाशात्] प्र रिरिचे (=अधिकं वर्तते)। इन्द्र [एव] स्वराट् (=स्वेनैव तेजसा राजमानो) दमे आ विश्वगूर्तः (=दमे दमे विश्वगूर्तः=गृहे गृहे सर्वैः स्तुतः) स्वरिः (=शोभनशत्रुकः) अमत्रः (=महान्) [सन्] रणाय (=युद्धाय=योद्धुं) ववक्षे (=प्रवृद्धोस्ति) ॥

स्वरिरिति पदं गर्जनावान् इति पदेनापि व्याख्यातुं शक्यम् । बृहस्पतिरमत हि त्यदासां नाम स्वरीणां सदने गुहा यत् इत्युक्तत्वात् । तदपि पदपाठे सुऽअरिः इत्यधीतत्वात् सायणकृतस्य शोभनशत्रुक इति व्याख्यानस्य परित्यागे न कोपि हेतुः साधुरिति द्रष्टव्यम् । त्यजन्ति हि तद्विदुरमीस्मामादयः शार्मण्यपण्डिताः ॥

---

म्हणजे 'वृत्ररूप जो सर्प, त्याला मारिला तेव्हां.' वृत्राला सर्प असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं म्हणतात याविषयीं पूर्वी सांगितलेंच आहे.

'त्या ह्याच्या मोठेपणाला वेढूं शकल्या नाहींत'='न अस्य ते महिमानं परि स्तः.' म्हणजे ह्याचा महिमा (=आकार) द्युलोक आणि पृथिवी यांपेक्षां मोठा झाल्यामुळें त्या आकारास त्या आपल्या पोटांत ठेवून घेऊं शकल्या नाहींत.

ही ऋचा खालीं दाखविल्याप्रमाणें आधुनिक वृत्ताला बसते:—

अस्मा इदु ग्नाश्चिद्देवपत्नीः
इन्द्राय अर्कम् अहिहत्ये ऊवुः ।
परि द्यावापृथिवी जभ्र उर्वी
न अस्य ते महिमानं परि स्तः ॥

९. या इंद्राचें मोठेपण द्युलोकापेक्षां, पृथिवीपेक्षां [आणि] अंतरिक्षापेक्षां मोठें होय. इंद्रच स्वतेजस्वी, सकल गृहीं स्तुत, महाशत्रुमान्, [आणि] बलवान् [असा होत्साता] युद्धासाठीं झालेला आहे.

9. Of Him alone the vastness exceeds the Heaven, the Earth [and] the Firmament; vast Indra [alone], praised by all in [every] home, self-resplendent, and having great enemies to fight, has grown for fight.

९. भावार्थः– ' द्युलोक, पृथिवी आणि अंतरिक्ष या सर्वांहूनहि ज्याचें मोठेपण म्हणजे आकार मोठा होय असा देव हा एक इंद्रच होय; इतर देवांचें मोठेपण एवढें नाहीं. आणि जो स्वतःसिद्ध तेजस्वी, जो प्रत्येक मनुष्याचे घरीं सर्वांनीं स्तुत, ज्याचे शत्रु मोठे, जो महान् आणि जो जणुं काय युद्धाकरितांच वाढला आहे असा इंद्रच होय, दुसरा कोणी नाहीं. ' म्हणजे, युद्ध करण्यासच जणुं काय झाला आहे असा हा एक इंद्रच आहे, दुसरा देव कोणी नाहीं. '

इंद्र हा द्युलोक, अंतरिक्ष आणि पृथिवी या तिन्हींपेक्षां मोठा आहे असें या ऋचेंत सांगितलें आहे त्याजकडेस लक्ष द्यावें. ईश्वराच्या मोठेपणाविषयीं आपल्या आर्य पूर्वजांचा विचार कसा होता तें याजवरून दिसतें. द्युलोक, अंतरिक्ष आणि पृथिवी यांपेक्षां मोठा म्हणणें म्हणजे यापेक्षां मोठेपणाविषयीं अधिक चांगलें वर्णन करणें अशक्य आहे. एक ईश्वर आहे हें ज्ञान आणि ईश्वराचा महिमा अपरिमित आहे हेंहि ज्ञान या सूक्तावरून आपल्या परमपुरातन पूर्वजांसहि बीजरूपानें तरी होतें असें निश्चयानें सांगतां येतें.

' सकल गृहीं स्तुत '=' दमे आ विश्रुतः. ' हे शब्द किंचित् संदिग्ध आहेत. अक्षरशः अर्थ, ' घरांत सर्वांनीं स्तविलेला ' म्हणजे, घरोघर ज्याची सर्वजण स्तुति करितात असा.

' युद्धासाठीं झालेला आहे '=' ववक्षे रणाय. ' म्हणजे युद्ध करण्यासच जणुं झालेला आहे. ' ववक्षे ' याचा अक्षरशः अर्थ, ' वाढलेला आहे ' असा होतो.

ही ऋचा खालीं दाखविल्याप्रमाणें वृत्तास बसते:—

अस्येदेव प्र रिरिचे महित्वं
दिवः पृथिव्याः परि अन्तरिक्षात् ।
स्वराळिन्द्रो दम आ विश्वगूर्तः
स्वरिरमत्रो ववक्षे रणाय ॥

**अस्येदेव शवसा शुषन्तं वि वृश्चद्वज्रेण वृत्रमिन्द्रः ।**
**गा न व्राणा अवनीरमुञ्चदभि श्रवो दावने सचेताः ॥१०॥२८॥**

अस्य । इत् । एव । शवसा । शुषन्तम् । वि । वृश्चत् । वज्रेण । वृ-
त्रम् । इन्द्रः ।
गाः । न । व्राणाः । अवनीः । अमुञ्चत् । अभि । श्रवः । दावने ।
सऽचेताः ॥ १० ॥ २८ ॥

## भाषायाम्.

१०. अस्य इत् एव शवसा [इन्द्रः] शुषन्तं [वि वृश्चत्] (=अयम् इन्द्र एव शोषकम् असुरं वृत्रं स्वबलेन व्यवच्छिनत्)। इन्द्र [एव] वज्रेण वृत्रं वि वृश्चत् (=व्यवच्छिनत्)। सचेताः (=समानचित्तः=दयालुः) [इन्द्रो] गा न व्राणाः (=गा इव वृत्रेणावृताः) अवनीः (=अपः=मेघोदकानि) दावने (=हविर्दत्तवते यजमानाय=यज्ञं कुर्वते उपासकाय) अभि श्रवः (=कर्मफलभूतमन्नमभिलक्ष्य=कर्मफलान्नत्वेन) अमुञ्चत् (=अवर्षीत्)॥

इन्द्र एव जलशोषकवृत्रं हत्वा यजमानहितार्थं मेघोदकान्यावर्जयतीत्यर्थः ॥

१०. भावार्थः—'पाणी जिकडून तिकडून शोषून घेऊन चोर जसा गुरें चोरून एकाद्या गुहेंत लपवून ठेवितो तसा मेघाडंबरांत लपवून ठेवणारा जो वृत्र, त्याला इंद्रच आपल्या बळानें आणि वज्रानें छेदून टाकिता झाला; आणि यज्ञादि कर्म करणारा जो उपासक त्याच्या हितार्थ मेघोदकें सोडून देता झाला.' हा इंद्राचा पराक्रम वेदांत जिकडे तिकडे पसरलेला आहे.

या मंत्रांत जी कोंडून ठेविलेल्या गाईंप्रमाणें अशी उपमा मेघोदकांस दिली आहे ती लक्ष्यांत ठेवण्याजोगा आहे. गुरें चोरून गुहेंत नेऊन ठेवणें ही चाल सर्व युगीं सर्व देशीं प्रसिद्ध आहे. ग्रीक आणि रोमन लोकांचीं पुराणें (मैथालजी) वाचणारांस ही गोष्ट चांगली ठाऊक असेलच. आलीकडे विजापूर येथें दुष्काळाच्या संबंधानें आर किल्ल्यांतील जुन्या इमारती साफ करण्याचें काम चाललें असून त्यांपैकीं एकीच्या मोठ्या तळघराचा उपयोग आजपर्यंत बरींच वर्षें चोर लोक अशाच कामीं करीत असत, त्यामुळें त्यांत गुरांच्या हाडांचे आणि सगळ्या सांगाड्यांचे मोठमोठे ढीग सांपडले. ते जनावरांनीं आंत नेलेले

१०. हा इंद्रच आपल्या बळानें शोषक [ असुरा]ला [ छेदून टाकिता झाला ], इंद्रच [ आपल्या ] वज्रानें वृत्राला छेदून टाकिता झाला. दयावान् [ इंद्रच ] गाईप्रमाणें कोंडलेल्या उदकांस हविर्दात्या उपासकासाठीं अन्न मिळावें म्हणून मुक्त करिता झाला.

10. He alone, with his might, slew the Demon of drought; Indra [ alone ] with his thunderbolt slew Vritra. Sympathizing Indra [ alone] let down, like confined cows, the waters for the giver of oblations for food.

नसून मांग महार वगैरे जातींच्या चोरांनीं आंत गुरें नेऊन तेथें त्यांचा आपल्या रीतीप्रमाणें विनियोग केलेला असे.

'शोषक असुराला'=' शुष्न्तम्'. हा शोषक असुर म्हणजे वृत्रच समजावयाचा आहे. यावरून वृत्राचें खरें ( रूपकसिद्ध ) स्वरूप दिसून येतें.

'अन्न मिळावें म्हणून'='अभि श्रवः.' म्हणजे आपली उपासना करणारे जे भक्त त्यांस अन्न मिळावें या उद्देशानें. पाऊस पडल्यावरच धान्य पिकत असतें.

या ऋचेंत वृत्तानुसारानें जें ह्रस्वदीर्घ अधिकउणें वाचावयाचें आहे तें चमत्कारिक आहे; तें असें,–

अस्यें इदेवं शवसा शुष्न्तं
वि वृश्चद्वज्रेण वृत्रमिन्द्रः ।
गा न व्राणा अवनीरमुञ्चद्
अभि श्शरवो दावने सचेताः ॥

यांत 'वृत्रम्' याऐवजीं 'वृत्तरम्,' 'व्राणा' याऐवजीं 'व्वराणा' आणि 'श्रवो' याऐवजीं 'श्शरवो' असें वाचावें लागतें याजकडेस लक्ष्य देण्यासारिखें आहे. यावरून असें सिद्ध होतें कीं रकारानें संयुक्त झालेलें जें अक्षर त्यांतील रकाराच्या पूर्वीचें जें व्यंजन तें, वृत्ताला अवश्य असल्यास, स्वतंत्र अक्षर होत असतें, म्हणजे रकार आणि त्यापूर्वींचें जें व्यंजन यांच्यामध्यें एक ह्रस्व किंवा दीर्घ स्वर घालतां येतो; जसें 'वृत् + र' यांत त् आणि र यांच्यामध्यें अ घातला; 'व् + राणा' यांतील व् आणि र यांच्यामध्यें अ घालून 'व्वराणा' केलें; आणि श् + रवो यांतील श् आणि र यांच्यामध्यें अ घालून 'शरवो' आणि मग 'श्शरवो' असें केलें आहे. याप्रमाणें दुसरेहि ठिकाणीं वृत्तरचनेचे प्रयोग येतील.

**अस्येदु त्वेषसा रन्त सिन्धवः परि यद्वज्रेण सीमयच्छत् ।**
**ईशानकृद्दाशुषे दशस्यन्तुर्वीतये गाधं तुर्वणिः कः ॥ ११ ॥**

अस्य । इत् । ऊम् इति । त्वेषसा । रन्त । सिन्धवः । परि । यत् । वज्रेण । सीम् । अयच्छत् ।
ईशानऽकृत् । दाशुषे । दशस्यन् । तुर्वीतये । गाधम् । तुर्वणिः । करिति कः ॥ ११ ॥

**अस्मा इदु प्र भरा तूतुजानो वृत्राय वज्रमीशानः कियेधाः ।**
**गोर्न पर्व वि रदा तिरश्चेष्यन्नर्णांस्यपां चरध्यै ॥ १२ ॥**

अस्मै । इत् । ऊम् इति । प्र । भर । तूतुजानः । वृत्राय । वज्रम् । ईशानः । कियेधाः ।
गोः । न । पर्व । वि । रद । तिरश्चा । इष्यन् । अर्णांसि । अपाम् । चरध्यै ॥ १२

## भाषाभाष्य.

११. अस्येदु (=अस्यैव) त्वेषसा (बलेन) सिन्धवः (=समुद्रा) रन्त (=स्वे स्वे स्थाने विरमन्ति), यद् (=यथा) सीं (=तान् सिन्धून्) वज्रेण पर्ययच्छत् (=परितो नियमितवान्=तेन सिन्धुषु वज्रद्वारा परिवेष्टितेषु सत्सु यथा ते स्वस्वस्थानेषु विरताः स्युस्तथा विरता भवन्ति)। ईशानकृत् (=वृत्रादिवधेनात्मानमैश्वर्यवन्तं कुर्वन्) [सः] दाशुषे (=हविर्दत्तवत उपासकाय) दशस्यन् (=फलं प्रयच्छन्) [वर्तते] । तुर्वणिः (=शत्रूणां हिंसिता) [एतादृश इन्द्रः] तुर्वीतये (=एतत्संज्ञाय कस्मैचिदुदके निमग्नाय ऋषये) गाधम् (=अवस्थानयोग्यं धिष्ण्यं प्रदेशं) कः (=अकः=अकरोत्) ॥

१२. [हे इन्द्र], तूतुजानः (=क्षिप्रः) कियेधाः (=बलवान्) ईशानः (=प्रभुः) [त्वम्] अस्मा इदु (=अस्मा एव) वृत्राय वज्रं प्र भर (=प्रहर=इमं वृत्रं वज्रेण प्रहर)। अर्णांसि (=वृष्टिजलानि) इष्यन् (=मेघादवगमयन्) [त्वम्] अपां चरध्यै (=उदकानां चरणाय=उदकानि यथा चरन्ति तथा) गोः पर्व न (=गोः पर्वाणीव=गोमांसखण्डानिव) [तस्य वृत्रस्य] [पर्वाणि=खण्डान्] तिरश्चा (=तिर्यग्यथा भवति तथा) वि रद (=छिन्धि) ॥

मेघरूपं वृत्रं गामिव छित्वा लौकिकाः पुरुषा गोमांसखण्डान् भृशं छिन्दन्ति तद्वद्, वृत्रस्य खण्डांश्छित्वा तस्माद्वृष्टिं कृत्वा जलानि प्रवाहय। त्वं हि क्षिप्रतमो बलवान् प्रभुरसि न ते किमप्यसाध्यमिति भावः ॥

११. याच्याच बळाच्या योगानें समुद्र [ आपआपल्या स्थानीं ] राहतात, कीं जणुं [ तो ] त्यांस [ आपल्या ] वज्रानें वेष्टूनच राहतो. ऐश्वर्यवान् [ इंद्र ] उपासकावर अनुग्रह करणारा [होय ]; शत्रुघातक [ इंद्र] तुर्वीतीसाठीं [पाण्यांस ] उतार करिता झाला.

11. Through His might alone, the seas stand [in their places], as though he surrounded them with his thunderbolt. Supreme [Indra] [is] favourable to the worshipper: victorious [Indra] made a ford for Turviti.

१२. [ हे इंद्रा ], अति आवेशी [ आणि] बळवान् प्रभु [असा जो तूं तो] ह्याच वृत्रावर [आपलें ] वज्र मार. [ तूं ] गाईचे आडवेतिडवे [ तुकडे केल्या]प्रमाणें [वृत्राचे ] तुकडे कर, आणि वृष्टि पाडून उदकें वाहायाला लाव.

12. [O Indra], strike [thou], the impetuous [and] mighty Lord, [thy] thunderbolt upon this very Vritra, cut [him] down into fragments like a cow, that the showers may fall, that the waters may flow.

११. 'मोठमोठाले समुद्र आपआपले ठिकाणींच राहतात, मर्यादा उल्लंघून जात नाहींत, तर जणुं काय त्यांस इंद्र आपल्या वज्रानेंच वेष्टून मर्यादेच्या आंत ठेवीत असतो; हा पराक्रम इंद्रच करूं शकतो, दुसरा कोणी नाहीं. सर्वांचा प्रभु जो इंद्र तोच उपासकांवर कृपा करीत असतो. पराक्रमी इंद्रच तुर्वीतिनांवाच्या उपासकाकरितां पाण्याला उतार पडे असें करिता झाला' असा भावार्थ.

'तुर्वीति.' सू. ५४, मं. ६, आणि सू. ३६, मं. १८ पहा. तुर्वीति या नांवाचा उपासक पाण्यांत सांपडला असून उतार नसल्यामुळें बुडून जात असतां इंद्रानें तो बुडूं नये म्हणून तेथें एकाएकी उतार होई असें केलें अशी प्रसिद्धि असल्यामुळें त्याला उद्देशून ह्या चरणाचा अर्थ समजावयाचा आहे. हा आश्चर्यकारक पराक्रम ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. कृष्णप्रभूला गोकुळांत नेत असतां यमुना नदीनें दुभागून मार्ग दिला, आणि जीजस क्रैस्ट समुद्राच्या पाण्यावरून चालले तेव्हां पाणी जमिनीप्रमाणें घट्ट झालें असें प्रसिद्ध आहे. ह्या सर्व कथांचें बीज परमपुरातन वेदांत आहे या संबंधानें पाहिलें असतां सकल धर्मांचें बीज वेद असें म्हटल्यास कांहीं अतिशयोक्ति होते असें वाटत नाहीं.

ह्या ऋचेचेंहि वृत्तरचना ध्यानांत ठेवण्याजोगें आहे, तें असें:—

अस्येदु प्र ब्रूहि पूर्व्याणि तुरस्य कर्माणि नव्य उक्थैः ।
युधे यदिष्णान आयुधान्यृघायमाणो निरिणाति शत्रून् ॥ १३॥

अस्य । इत् । ऊम् इति । प्र । ब्रूहि । पूर्व्याणि । तुरस्य । कर्माणि । नव्यः । उक्थैः ।
युधे । यत् । इष्णानः । आयुधानि । ऋघायमाणः । निऽरिणाति । शत्रून् ॥ १३ ॥

## भाषायाम्.

१३. अस्य इत् उ (=अस्यैव) तुरस्य (=युद्धाय त्वरमाणस्य=जयशालिन) [इन्द्रस्य] पूर्व्याणि (=पुराणानि) कर्माणि (=वृत्रवधादीनि चरितानि) [हे स्तोतः, त्वं] प्र ब्रूहि (=प्रशंस)। [स हि] उक्थैः (=स्तोत्रैः) नव्यः (=स्तवनीयो) [भवति]। यद् (=यस्माद्) युधे (=योद्धुं=योधनार्थम्) आयुधानि इष्णानः (=वज्रादीन्यस्त्राणि प्रक्षिप्य) ऋघायमाणः (=हिंसन) [स इन्द्रः] शत्रून् निरिणाति (=नितराम् अभिगच्छति=नाशयति) ॥

अस्मा इदु त्वेषसा रन्त सिन्धवः
परि यद्वज्जरेण सीमयच्छत्।
ईशानकृद्दाअशुषे दशस्यन्
तुर्वीतये गाअधं तुर्वणिः कः ॥

यांत 'वज्रेण' याला ओढून 'वज्जरेण' असें म्हणावें लागतें आणि 'दाशुषे' आहे तें 'दाअशुषे' आणि 'गाधं' आहे त्याऐवजी 'गाअधं' असें म्हणावें लागतें. या दीर्घीकरणाचीं प्रयोगान्तरें वेदांत पुष्कळ आढळतात. त्यावरून जीं वृत्तें आपणास आतां मधुर लागतात आणि ज्यांत एक अक्षर ह्रस्वाचें दीर्घ आणि दीर्घाचें ह्रस्व चालत नाहीं तेंच वृत्त वैदिक युगांत कसें असे तें समजून येतें.

१३. भावार्थः— 'हे इंद्रा, जसा कोणी एकादा मनुष्य गाई मारून तिचे तुकडे तुकडे करितो तसा वृत्राला मारून त्याचे तूं तुकडे तुकडे कर, आणि वृष्टि पाडून उदकांचे प्रवाह नदीरूपांनीं वाहते असें कर. हें तुला असाध्य नाहीं, कारण कीं तूं बलवान् प्रभु आहेस आणि तुझ्या मनांत वृत्राचा वध करावयाचा असला म्हणजे कोणताहि अवकाश न लावितां एकदम आवेशानें जाऊन तूं वध करिशील. तर हे इंद्रा, तूं वज्रानें वृत्राचा वध कर,— म्हणजे वृष्टि पाड.'

'गाईचे आडवेतिडवे तुकडे केल्याप्रमाणें'=' गोर्न पर्व.' यांत जी उपमा दिली आहे तिच्याविषयीं कांहीं चमत्कारिक विचार मनांत येतात. आलीकडे साधारण शूद्र जरी लिहूं लागला

१३. ह्याचींच [ह्या] पराक्रमी [इंद्राचीं] च पूर्वीचीं चरितें गा. स्तोत्रें गाऊन त्याची स्तुति गाण्यास योग्य [होय]. कारण कीं तो आयुधें टाकून लढून नाश करणारा [होत्साता] शत्रूंचा संहार करीत असतो.

13. Of Him alone sing thou forth the ancient [exploits], the exploits of mighty [Indra]. [He] deserves to be praised with hymns; since throwing missiles for fighting, [he], the destroyer, crushes the enemies.

तरी अशी उपमा देणार नाहीं. तर वैदिक ऋषीनें ही उपमा दिली याचें तात्पर्य इतकेंच कीं, ज्या वस्तु खाऊं नयेत असें आम्ही आतां योग्यरीतीनें समजतों आणि ज्यांचें नांव घेणें म्हणजे पातक आहे असें मानितों ते पदार्थ पूर्वी ऋषिजन अभक्ष्य समजत नसत, आणि त्यांचें नांव घेणें किंवा त्यांची उपमा देणें हें पातक आहे असें मानीत नसत. वस्तुतः पाहिलें असतां अभक्ष्यभक्ष्याचा विचार करूं लागलों तर वैदिक युगापेक्षां आमचें हें बापडें कलियुग अधिक पुण्यवान् आणि अधिक स्तुतिपात्र आहे अशाविषयीं हें तर केवळ ज्ञापक आहे, पण ऋग्वेदांत दुसरे ठिकाणीं बळकट प्रमाणें येत जातील.

'आणि वृष्टि पाडून उदकें वाहायाला लाव'='इष्यन् अर्णांसि अपां चरध्यै.' अक्षरशः अर्थ, 'वृष्टि येई असें करणारा तूं उदकांच्या वाहण्यासाठीं', असा आहे, तो स्पष्ट समजावा म्हणून आम्हीं किंचित् विस्तारानें भाषांतर केलें आहे.

वृत्रासाठीं तिसरा आणि चवथा हे पाद खालीं लिहिल्याप्रमाणें वाचावेः—

गोर्न पर्व वि रदआ तिरश्चा
इष्यन्नर्णांसि अपआं चरध्यै।

१३. 'इंद्र युद्ध करण्यांत अति कुशल होय; तो वज्रादिक आयुधें शत्रूवर टाकून देऊन आपणहि आंगावर धांवून जातो आणि शत्रूंस चिरडून नाहींसे करून टाकितो. यामुळें तो स्तोत्रें गाऊन स्तविला जाण्यास पात्र होय. तर, असा जो इंद्र, त्याचींच वृत्रवधादिक जीं महाकृत्यें तीं तूं गा,' असें ऋषि लोकांस अथवा जवळ असलेल्या मित्रास म्हणतो आहे.

या ऋचेंत इंद्राचें स्वरूप कसें वर्णिलें आहे तिकडे आमच्या वाचकांनीं लक्ष्य द्यावें. आपले आर्य पूर्वज नित्य हातांत गोमुखी घेऊन तप करीत नसत. त्यांस युद्ध करण्याची सवई नित्य असे. त्यामुळें ते आपल्या उपास्य देवतेला सुद्धा

अस्येदु भिया गिरयश्च दृळ्हा द्यावा च भूमा जनुषस्तुजेते ।
उपो वेनस्य जोगुवान ओणिं सद्यो भुवद्वीर्याय नोधाः ॥ १४ ॥

अस्य । इत् । ऊम् इति । भिया । गिरयः । च । दृळ्हाः । द्यावा । च । भूम । जनुषः । तुजेते इति ।
उपो इति । वेनस्य । जोगुवानः । ओणिम् । सद्यः । भुवत् । वीर्याय । नोधाः ॥ १४ ॥

## भाषायाम्.

१४. अस्य इदु (=अस्यैव) [इन्द्रस्य] भिया (=भयेन) दृळ्हा गिरयश्चित् (=दृढा निश्चलाः पर्वता अपि), द्यावाभूमा च (=द्यावापृथिव्यौ च) तुजेते (=कम्पेते), जनुषः (=जना) [अपि] [कम्पन्ते]। [अतः कारणाद्] वेनस्य (=कान्तस्य) [इन्द्रस्य] ओणि (=रक्षणम्) उपो जोगुवानः (=सूक्तैः पुनःपुनरुपशब्दयन्=उपश्लोकयन्) नोधाः (=एतन्नामक ऋषिः) सद्यः (=क्षिप्रमेव) वीर्याय भुवत् (=वीर्यवानभवत्)॥

युद्धकुशल आणि शत्रुहननाविषयीं योग्य अशी वर्णीत. आमचे अर्वाचीन कवि कोणत्याहि देवाचें वर्णन करूं लागले म्हणजे त्याला निजवितील, उष्मा लागतो म्हणून वारा घालवितील, किंवा पाय दुखतात म्हणून देवीकडून त्याचे पाय रगडवितील, अथवा त्याजकडून अंगाला विभूति लावून अनेक वर्षेंपर्यंत तप करवितील. हा जो भेद आम्हीं दाखविला तो, प्राचीन आपले आर्य पूर्वज जे आपला देव कसा आहे म्हणून मानीत आणि आम्हीं कसा मानितो ते दाखविण्याकरितां सांगितला आहे. वस्तुतः देवाचें स्वरूप कवीच्या कल्पनेव्यतिरिक्त असून तें तर बदलत नाहींच; देवाविषयीं आमचे विचार मात्र बदलत जातात.

ही ऋचा खालीं दाखविल्याप्रमाणें म्हणावी लागते:—

अस्मा इदु प्र ब्रूहि पूर्वआणि
तुरस्य कर्मांणि नव्य उक्थैः ।
युधे यदिष्णांन आयुधानि
ऋघायमाणो निरिणाति शत्रून् ॥

यांत 'कर्माणि' आहे त्याऐवजीं वृत्तार्थ 'करमाणि' असें समजावयाचें; आणि 'इष्णानः' आहे त्याऐवजीं 'इष्वणानः' असें म्हणावयाचें; त्याजवरून असा नियम निघतो कीं, 'र्' अथवा 'ष्' हे ज्यांच्या आरंभीं आहेत अशीं संयुक्त अक्षरें संहितेंत असली तर वृत्तानुरोधानें 'र्' बद्दल 'र' असें आणि 'ष्' बद्दल 'ष' असें म्हणावयास चिंता नाहीं; म्हणजे संयुक्त अक्षराचें पहिलें व्यंजन इतकें लांबवून म्हणण्याची चाल पूर्वी होती कीं, त्याचें एक स्वतंत्र अक्षर

१४. ह्याच्याच भीतीनें अचल पर्वत सुद्धा [ आणि ] द्युलोक भूलोक [ हे ] सुद्धा [ आणि ] [ सर्व ] प्राणी सुद्धा थरथर कांपतात. प्रियकर इंद्राच्या अभयाची स्तुति करीत करीत नोधा एकाएकीं बळवान् झाला.

14. Through the dread of Him alone even the solid mountains, even heaven and earth [and] men tremble. Praising again and again the support of beloved [Indra] Nodhas instantly became powerful.

होईल व तेंहि आणखी संयुक्त अक्षर होत असे. खानदेशांत कांहीं एक बालेघाटी लावणी प्रसिद्ध आहे, त्यांत

अल्याड नर्मदा पल्याड बडोदा बडोदा ग बाई। नाकिं नथ सरजांची। इ०

असे दोन चरण आम्हांस आठवतात. यांतहि ' सर्जाची ' याऐवजी ' सरजांची ' असें झालें आहे. ऋषि प्राचीन असो अथवा अर्वाचीन असो, दिव्य असो किंवा ग्राम्य असो, व्याकरण आणि छंद इत्यादि शास्त्रांचे नियम एकत्र आहेत.

४. 'इंद्राला भिऊन मोठमोठे प्रचंड असे जे निश्चळ पर्वत तेहि कांपतात, द्युलोकहि कांपतो, आणि पृथिवीहि कांपते, मग जन कांपतात म्हणून सांगावयास नकोच. असें असून तो सर्वांचें संरक्षण करितो, त्यामुळें तो सर्वांस प्रिय झालेला आहे. तर जो प्रियकर इंद्र त्याणें केलेल्या संरक्षणाची स्तुति करीत करीत मी जो नोधा ऋषि तो बलवान् झालों.'

नोधा हा या सूक्ताचा कर्ता आहे. तो म्हणतो कीं, इंद्राच्या संरक्षणशक्तीची कथा गात गात मी बलवान् झालों. ईश्वराचा गुणानुवाद अथवा प्रार्थना करणारे जे लोक असतात, त्यांस हा अर्थ समजून सांगावयास नकोच. कारण ईश्वरगुणानुवादाच्या योगानें तदनुकरणाची इच्छा उत्पन्न होते; तेणेंकरून सद्विचार आणि सदाचार हे निपजतात, आणि सद्विचारांच्या आणि सदाचारांच्या आंगीं जी शक्ति असते ती दुसऱ्या कोणत्याहि ठिकाणीं नसते.

[१] प्राणी सुद्धा '=' जनुषः'. प्रथमेचें बहुवचन.

या ऋचेचा चौथा चरण खालीं दाखविल्याप्रमाणें म्हणावा लागतोः—

सद्दिओ भुवद्वीरिआय नोधाः

अस्मा इदु त्यदनु दाय्येषामेको यद्वव्ने भूरेरीशानः ।
प्रैतशं सूर्ये पस्पृधानं सौवश्व्ये सुष्विमावदिन्द्रः ॥ १५ ॥
अस्मै । इत् । ऊम् इति । त्यत् । अनु । दायि । एषाम् । एकः । यत् । वव्ने । भूरेः । ईशानः ।
प्र । एतशम् । सूर्ये । पस्पृधानम् । सौवश्व्ये । सुस्विम् । आवत् । इन्द्रः ॥ १५ ॥

---

### भाषायाम्.

१५. अस्मा इदु (=अस्मा एव) [इन्द्राय] एषाम् (=अस्मद्रूपाणामेषां जनानां) त्यत् (=तत् प्रसिद्धं) [स्तोत्रम्] अनुदायि (=अकारि) यत् [स्तोत्रं] भूरेः (=बहुनः प्राणिजातस्य) एकः (=अद्वितीय) ईशानः (=स्वामी) वव्ने (=ययाचे =इष्टवान्)। इन्द्रः सूर्ये सौवश्व्ये (=सूर्यसौवश्व्यनामकेन केनचित्सह) पस्पृधानं (=युध्यन्तं) सुष्वि (=सामानि अभिषोतारम्) एतशम् (=एतन्नामानं कंचिदुपासकम्) प्रावत् (=प्रकर्षेण संरक्षितवान्) ॥

अस्यामृचि 'सूर्ये पस्पृधानं सौवश्व्ये' इति वाक्यं दुर्बोधतरमनुसायणमेवास्माभिर्बोधितम्। ते हि वदन्ति। "उत्तरार्धस्येयमाख्यायिका। स्वश्वो नाम कश्चिद्राजा। स च पुत्रकामः सूर्यमुपासांचक्रे। तस्य सूर्य एव पुत्रो बभूव। तेन सहैतशनाम्नो महर्षेर्युद्धं जातमिति।" अत्र यद्यपि सूर्यसौवश्व्ययोः पदयोर्निर्वचनं सायणेन व्याख्यायिकामनुसृत्य कृतं चिन्त्यं भवेत् तदपि सूर्यः सौवश्व्य इति नाम्ना कश्चित्प्रसिद्धः पुरुषो न भवेदिति न। केचित् पाश्चात्यपण्डितास्तु सूर्ये तेजस्विनि सौवश्व्ये शोभनानामश्वानां समूहे पस्पृधानं स्पृहां कुर्वन्तं शोभनाश्वरूपस्य धनस्येच्छां कुर्वन्तम् इतीच्छन्तीति भाति ॥

१५. असंख्य लोकांचा एकुला प्रभु [ जो इंद्र ] त्याला जें आवडतें तें हें आमचें [ स्तोत्र ] त्या इंद्रालाच अर्पण केलें आहे. सोम अर्पण करून उपासना करणारा एतश सूर्यसौवश्व्याशीं युद्ध करीत असतां त्याचें संरक्षण इंद्र करिता झाला.

15. To Him alone this hymn of ours is offered, which he, the single Lord of all, loves. Indra protected the Soma-pressing Etas'a who was fighting with Sûrya Sauvas'vya.

---

१५. 'अनेक लोकांचा एकला प्रभु असा जो इंद्र, त्याला जें आवडतें असें हें आमचें स्तोत्र आम्हीं इंद्रालाच अर्पण केलें आहे. तर तो आमचें संरक्षण करो. संरक्षण करण्याविषयीं इंद्राची प्रख्याति आहे. उदाहरणार्थ, एतश नांवाचा उपासक सूर्यसौवश्व्य या नांवाच्या मनुष्याबरोबर लढत असतां त्याला इंद्रानें रक्षिलें म्हणून प्रसिद्धि आहेच', असें तात्पर्य.

'सूर्यसौवश्व्याशीं युद्ध करीत असतां' ='सूर्ये पस्पृधानं सौवश्व्ये.' हा अर्थ आम्हीं सायणांस अनुसरून केला आहे. पण त्याच्या निर्विवादत्वाविषयीं विशेष सांगतां येत नाहीं. 'सूर्याची बरोबरी करणाऱ्या घोड्यांची इच्छा करणारा जो त्याला' असाहि अर्थ अक्षरशः होऊं शकेल.

'एतश' हा कोण होता अथवा 'सूर्यसौवश्व्य' कोण होता याविषयीं विशेष कळण्यासारिखें कांहीं ठाऊक नाहीं. सू. ५४, मं. ६ पहा.

वृत्तसुखार्थ ही ऋचा खालीं दाखविल्याप्रमाणें आहे असें समजावें.

अस्मा इदु त्यदनु दायि एषाम्
एको यद्वव्ने भूरेरीशानः ।
प्र एतशं सूरिये पस्पृधानं
सौवश्विए सुष्विमावदिन्द्रः ॥

एवा ते हारियोजना सुवृक्तीन्द्र ब्रह्माणि गोतमासो अक्रन् ।
ऐषु विश्वपेशसं धियं धाः प्रातर्मक्षू धियावसुर्जगम्यात् ॥
॥ १६ ॥ २९ ॥ ४ ॥

एव । ते । हारिऽयोजन । सुऽवृक्ति । इन्द्र । ब्रह्माणि । गोतमासः ।
अक्रन् ।
आ । एषु । विश्वऽपेशसम् । धियम् । धाः । प्रातः । मक्षु । धियाऽवसुः ।
जगम्यात् ॥ १६ ॥ २९ ॥ ४ ॥

## भाषायाम्.

१६. हे हारियोजन (=हर्योरश्वयोर्योजनं युग्मं यस्य रथे स) इन्द्र, गोतमासः (=गोतमाः=गोतमगोत्रोत्पन्ना अस्मद्रूपा उपासका) एव (=एवम् अनेन प्रकारेण) ते (=त्वदर्थं) सुवृक्ति (=सुवृक्तीनि=सुरचनानि=सुन्दराणि) ब्रह्माणि (=स्तोत्राणि) अक्रन् (=अकृषत), आ एषु (=एषु स्तोतृषु गोतमेषु) विश्वपेशसं (=सर्वरूपां) धियं (=धनं) धाः (=धेहि=स्थापय=अस्मभ्यं गोतमेभ्यो देहि)। —धियावसुः (=धीमान्=प्रज्ञायुक्त) [इन्द्रः] प्रातः (=प्रातःकाले) मक्षु (=सत्वरं) जगम्यात् (=दिने दिने आगच्छतु) ॥

१६. या प्रकारेंकरून' हे सु-
र्णवर्णाचे घोडे जोडिलेल्या रथांत
ाणाऱ्या इंद्रा, हे सुंदर मंत्र गो-
मांनीं तुजप्रीत्यर्थ केले आहेत.
र तूं आमच्या ठायीं सर्वप्रकारचें
न स्थापित कर.—बुद्धिमान्[इंद्र]
तिदिवशीं सकाळीं येत जाओ.

16. Thus, O Indra, that harnessest a pair of golden steeds to thy car the Gotamas have made these well-fashioned hymns for thee. Confer thou upon us wealth of all forms.—May wise [ Indra ] come early each day in the morning.

१६. ' सोन्याचे घोडे रथास जोडून ाणाऱ्या हे इंद्रा, या प्रकारेंकरून ाम्हीं गोतमांनी तुझी स्तुति केली आहे ाणि ती सुंदर रीतीनें केली आहे. तर ा तूं मान्य करून घे आणि आम्हां उ- ासकांला सर्व प्रकारचें धन दे ' असा ार्थ. हा या सूक्ताचा उपसंहार झाला ा उपसंहार झाला असें दर्शविण्या- ारितां ऋषीनें ' या प्रकारेंकरून' (एव) ासें या ऋचेंत पद घातलें आहे; आणि ापसंहारांत कांहीं तरी वरप्रदान मागा- याचें असतें तें यांत मागितलें आहे: तें ' कीं, इंद्रानें स्तुति मान्य करून घ्यावी ाणि स्तुतिकर्ते जे गोतमकुळांतील ऋषि त्यांजला सर्व प्रकारचें धन द्यावें.

' सुवर्णवर्णाचे ' इ० = ' हारियोजन.' इंद्राचे घोडे सुवर्णवर्णाचे आहेत असें सांगितलें आहे.

' गोतमांनीं.' सूक्तकर्ता जो नोधा ऋषि तो गोतमकुळांतील आहे हें लक्षांत ठेविलें म्हणजे ' गोतमांनीं ' कां म्हटलें तें समजेल; कारण कीं सूक्तकर्ता आपल्या कुळांतील सर्व माणसें जवळ घेऊन त्यां- जबरोबर इंद्रोपासना करीत आहे आणि त्यांजबरोबर मिळून सूक्त रचून म्हणत आहे असें समजलें पाहिजे.

' बुद्धिमान् ' इ०. हा चवथा चरण ध्रुवपदासारिखा आहे तो पूर्वी आलाच आहे. याचा संबंध या सूक्ताशीं अथवा या ऋचेशीं विशेष आहे अथवा इष्ट तरी आहे असें नाहीं.

891/4 7 5 1880